# सत्यार्थ प्रकाश

महर्षि दयानन्द सरस्वती

अनुवादक
श्री श्रीपाद जोशी

-: संशोधक :-
स्वामी संकल्पानंद सरस्वती

-: प्रकाशक :-
आर्य समाज मुंबई,
विठ्ठलभाई पटेल मार्ग, मुंबई - ४०० ००४.
सन् २००४

- ग्रंथाचे नाव — सत्यार्थ प्रकाश (Satyarth Prakash)
- मूळ लेखक — महर्षि दयानंद सरस्वती
- अनुवादक — श्री श्रीपाद जोशी
- प्रकाशक — आर्य समाज मुंबई, मुंबई - ४.
- आवृत्ती — तेरावी प्रती ७०००
  पूर्व प्रती ४४,६००
  एकुण प्रती ५१,६००

- प्रकाशन — मकर सन्क्रान्ति
  १४ जानेवारी २००४
- सृष्टि संवत — १,९७,२९,४९,१०५
- मूल्य — रु. ५०.००
- प्रकाशक — आर्य समाज मुंबई, मुंबई - ४.
- मुद्रक — निराला मुद्रक, १४०,
  साने गुरुजी मार्ग, मुंबई-११.
  दूरभाष : २३०८४५०९
- अक्षर जुळणी — विकास ग्राफिक्स, मुंबई - ११.


## प्राप्तिस्थान :-

**आर्य समाज मुंबई**
काकड़वाडी, वी.पी. रोड, मुंबई-४.

**आर्य समाज पिंपरी**
महर्षि दयानन्द पथ, पिंपरी, पुणे-१७.

**आर्य समाज फोर्ट**
२३२ पेरीन नरीमन मार्ग,फोर्ट,मुंबई-१.

**आर्य समाज सांताक्रुज**
वी.पी.रोड, सांताक्रुज(प),मुंबई-५४.

**आर्य समाज गांधीरोड**
अकोला-४४४००१

**आर्य समाज परळी वैजनाथ**
परळी वैजनाथ, बीड ४३१ ५१५.

**महाराष्ट्र आर्य प्रतिनिधि सभा**
परळी वैजनाथ, बीड-४३१५१५

**आर्य समाज मन्दिर, सोलापुर**
१९६/१०/११ बुधवार पेठ सोलापुर
४१३००२

**आर्य समाज हदगांव**
महर्षि दयानन्द भवन, हदगांव,
जि. नांदेड - ४३१७१२

**रमेशभाई चैनमल रोंहिडा**
ओम ट्रेडर्स, जूना सकाळ प्रेस कंपाऊंड,
गांधीनगर, कोल्हापूर-४१६११९

**आर्य समाज आंबेजोगाई**
जिला-बिड

**आर्य समाज रामनगर**
रामनगर, लातूर ४१३५३१

**माणिकराव भोसले**
आर्य साहित्य पुस्तक भांडार,
प्रमोद गैस के समीप, सीताराम नगर,
लातूर-४१३५३१

**वैदिक सेवा आश्रम,**
बाजेगांव, नांदेड.

**आर्य समाज संभाजीनगर**
सरस्वती कॉलनी (औरंगाबाद) १.

**आर्य समाज जालना**
राजेन्द्र प्रसाद मार्ग, जालना

**आर्य समाज सोलापूर**
बाळीवेस, सोलापूर.

**आर्य समाज अहमदनगर**
१७९८, रामचंद्र खुंट, नगर, १

**आर्य समाज अमरावती**
सुभाष चौक, अमरावती.

**आर्य समाज धुळे**
कुमारनगर, धुळे-४२४ ००१.

**महाराष्ट्र आर्य प्रतिनिधी सभा**
वैदिक सेवाश्रम, बाजेगाव, नांदेड

**आर्य प्रति.सभा,मप्र. व विदर्भ**
मंगलवारी बाजार, सदर नागपूर १

सत्यार्थ प्रकाश या ग्रंथाचे सर्व प्रमुख आंतरराष्ट्रीय भाषेत अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. आपणास हव्या असलेल्या भाषेत सत्यार्थ प्रकाश मिळू शकेल. कृपया जवळील आर्य समाजामध्ये अथवा खालील पत्यावर संपर्क साधावा.

विश्व की तथा राष्ट्र की प्रमुख भाषाओं में **सत्यार्थ प्रकाश** का भाषांतर आज उपलब्ध है। आपकी सुविधानुसार आपको जिस भाषा में चाहिए उस भाषा में **सत्यार्थ प्रकाश** आप प्राप्त कर सकते हैं, कृपया अपने नजीक के आर्य समाज या नीचे दिये गये पते पर सम्पर्क करें।

This is immortal creation of **Maharshi Dayanand Saraswati. "Satyarth Prakash"** is now available in all major Indian languages and the world. Now you can enjoy its knowledge in your own mother tongue. Please contact your nearest **Arya Samaj** or write to us.

Arya Samaj Mumbai, Kakadwadi, V. P. Road, Mumbai - 400 004.

# -: विषयानुक्रमणिका :-

---

टिप - विषयानुक्रमणिकेत मुळ शिर्षके साधारण पद्धतीने व नवीन शिर्षके तिरकी (इटॅलिक मध्ये) दिली आहेत. ग्रंथामध्ये कंसात दिलेली शिर्षके नवीन आहेत.

# प्रकाशकीय

मानव जीवनाच्या सर्वांगीण विकासाची भूमिका बजावणाऱ्या **'सत्यार्थप्रकाश'** या ग्रथांचे आर्य समाज पिंपरीचे सद्प्रयत्नाने नव्याने भाषांतर केलेली बारावी आवृत्तिचा पुनर्मुद्रण योग्य संशोधन करून वाचकांच्या सेवेत सादर करीत असताना आम्हास अतिशय आनंद होत आहे. १९०४ मध्ये या ग्रंथाचा मराठी भाषेत प्रथम अनुवाद करण्यात आला होता. तो आधुनिक भाषा व शैलीच्या दृष्टीने समर्पक वाटत न होता. भाषेच्या जीवंतपणासाठी कालमानाप्रमाणे झालेला बदल स्वीकार करणे आवश्यक असल्यामुळे आर्य समाज पिंपरी ची सुविज्ञ कार्यकारिणीला नव्याने भाषांतर करणे आवश्यक वाटले. त्यानुसार त्याचे प्रयत्नाने प्रस्तुत भाषांतर करण्यात आले होते.

हिन्दी भाषेत सत्यार्थप्रकाशाचे प्रकाशन महर्षी दयानंदांच्या हयातीत इ.स.१८७५ मध्ये झाले. या आवृत्तीत महर्षींनीच काही संशोधन केले व दुसरी आवृत्ती इ.स. १८८४ मध्ये प्रकाशित झाली. हीच आवृत्ती आज सर्वत्र वापरली जात आहे. सत्यार्थ प्रकाशच्या मराठी भाषांतराचे कार्य १९०४ नंतरच होवू शकले. स्व.श्री सातवळेकरांनी प्रथम हे भाषांतर करून महर्षींचे विचार मराठी जनतेपर्यंत पोहचवण्याचे महान कार्य पार पाडले होते. आजपर्यंत मराठीमध्ये बारा आवृत्त्या प्रकाशित झाल्या आहेत. ऐतिहासिक दृष्टिकोणातून कालक्रमानुसार त्यांचा उल्लेख करणे अयोग्य होणार नाही. प्रकाशनाचा क्रम खालीलप्रमाणे दिसून येतो:-

| आवृत्ती | प्रकाशन वर्ष | प्रकाशक | संख्या |
|---|---|---|---|
| पहिली | १९०५ | शामराव कृष्ण आणि मंडळी | २,००० |
| दुसरी | १९२४ | आर्य समाज कोल्हापूर | २,००० |
| तिसरी | १९२६ | आर्य समाज कोल्हापूर | २,००० |
| चौथी | १९३२ | आर्य समाज कोल्हापूर | २,००० |
| पाचवी | १९३२ | श्री भागोजी बाळूजी कीर, मुंबई | २,००० |
| सहावी | १९३८ | आर्य समाज कोल्हापूर | ७,५०० |
| सातवी | १९५६ | पं. लक्ष्मणराव जी ओघले | ५,००० |
| आठवी | १९६८ | सार्वदेशिक आर्य प्रतिनिधि सभा | ५,००० |
| नववी | १९७५ | आर्य समाज अमरावती | ५,००० |
| दहावी | १९८९ | श्री नन्दकिशोरजी ब्रह्मचारी | १,१०० |
| अकरावी | १९९० | आर्य समाज पिंपरी | ५,००० |
| बारावी | १९९८ | आर्य समाज पिंपरी | ६,००० |
| तेरावी | २००३ | आर्य समाज मुंबई | ७,००० |

दुसऱ्या आवृत्तीत १३ व १४ हे दोन समुल्लास नाहीत. या दोन्हीचे भाषांतर श्री हरि सखाराम तुंगार यांनी नंतर केले. हे भाषांतर तिसऱ्या आवृत्तीत समाविष्ट करण्यात आले.

अकरावी आवृत्ति सर्वथा नवीन भाषान्तर रूपाने देश धर्माभिमानी व प्रबुद्ध मराठी भाषिकांसाठी आर्य समाज पिंपरीचे महाप्रयत्नाने सादर केली होती. नवीन भाषांतर प्रख्यात साहित्यिक, शब्दकोशिकार, व स्वातंत्र्य सैनिक **श्री श्रीपाद जोशी** यांनी आर्य समाज पिंपरीच्या सद्प्रेरणेने अतिशय श्रद्धेने व परिश्रम घेवून केले. आधुनिक भाषा व शैलीस अनुसरून केलेला हा अनुवाद वाचकांना निश्चितच आवडला. ही आवड म्हणजे श्री जोशीजींच्या सत्कार्याचे प्रतिफळ परंतु जोशीजी वर

भरवोसा विश्वास ठेवून कोणीही अनुवादाच्या पुनरावलोकन केलाही नाही, मूळ हिंदी प्रति बरोबर कोणी जुळवणी करायचा विचारसुद्धा केला नाही की अनुवाद मूळाप्रमाणे झाला की नाही. आर्य समाज पिंपरीच्या सत्प्रयत्नाने दोन आवृत्ती प्रचारात झाली असताना एखादा प्रबुद्ध वाचकाने जोशीजींचा अनुवाद वाचला, त्याची जुळवणी मूळ हिंदी प्रतिबरोबर करून घेतली, त्याच्यामध्ये काही ठिकाणी चुका दिसून आल्या त्याचे सखोल शुद्धीकरणाचे कार्य **श्री स्वामी संकल्पानंदजी सरस्वती**, आर्य समाज सेक्टर ४, हिरणमगरी, उदयपुर (राजस्थान) यांनी मूळ हिंदी भाषेतील (परोपकारी, आर्ष प्रकाशन, मधुर प्रकाशन, सार्वदेशिक याद्वारा प्रकाशित) ग्रंथांना प्रमाण मानून स्वामी दयानंदाच्या वैदिक सिद्धांताची जोपासना करण्याचा प्रयत्न केला.

एकदा **आर्य समाज मुंबई** ची व्यवस्थापिका सभेमध्ये चर्चा झाली की **मराठी सत्यार्थ प्रकाश** कमीत कमी किंमतीत कसं देता येईल? माझ्या कडून कोटेशन मागुन घेतले, मी प्रति उत्तरात लिहुन दिले आजच्या महागाईच्या दिवसात ६४० पृष्ठांचे पुस्तक तयार करण्यात जर कमीत कमी दोन हजार प्रती छापल्या गेल्या तर प्रती पुस्तक ४५ रुपये लागु शकतात. आणि जास्त पुस्तक छापल्याने किंमत अजुन कमी होऊ शकते. मी कोटेशन दिल्या नंतर मला त्याच्यामध्ये छापण्याच्या वेळेला राहिलेल्या त्रुटि बघण्यास सांगितल्या गेल्या. मी अकरावी आवृत्ती संपूर्ण **मराठी सत्यार्थ प्रकाश** चे अवलोकन करून जिथे चुका होत्या त्या शोधुन काढल्या. दोन, तीन महिने चर्चा चालू होती आणि **आर्य समाज मुंबई** च्या व्यवस्थापिका सभेमध्ये सर्व मान्य निर्णय घेतला की **आर्य समाज मुंबई** कडून दोन हजार प्रती **मराठी सत्यार्थ प्रकाश** छापून घ्याव्यात. त्याचबरोबर मला असा अधिकार दिला की मी पत्र व्यवहार करून महाराष्ट्रातील इतर आर्य समाजांना संपर्क साधून पुस्तकांच्या प्रतींची संख्या वाढवण्याचा प्रयत्न करू. आर्य समाज पिंपरी ने माझा उत्साह वाढविण्याकरिता पाचशे प्रती घेण्याची समत्ती पत्र प्रथमतः पाठवले नंतर माझ्या आग्रहाने एक हजार प्रति घेण्याची सम्मती दिली तथा इतर व्यक्ति आणि तसेच इतर आर्य समाजांचे पत्ते पाठवले जे मराठी सत्यार्थ प्रकाश घेऊ शकतात. (घेऊ इच्छितात.) तदनुसार १००० प्रति महाराष्ट्र आर्य प्रतिनिधि सभा, परळी वैजनाथ. १००० प्रति-वैदिक सेवा आश्रम, वाजेगाव, नांदेड नी प्रकाशन पूर्वी घेण्यास स्वीकृती दिली.

**आर्य समाज मुंबई** ने प्रथमत: अकरावी आवृत्ती दिली असुन त्यानुसार कंपोज करायला भाग पडला. तेव्हा मी प्रुफ कॉपी **आर्य समाज पिंपरी** कडे संशोधनासाठी पाठवून दिली तेव्हा त्यांनी प्रुफ दुरुस्त करतांना बारावी आवृत्ती प्रुफ कॉपीवर पाठवून दिली आणि आदेश दिला की त्याचेअनुसार प्रत तयार करून घ्यावी. त्यानुसार पुन्हा बारावी आवृत्तीप्रमाणे संशोधन करण्यात आले. छपाईची तयारी चालली होती तेव्हा **स्वामी संकल्पानंद** यांचे पत्र मिळाले ज्याच्यामध्ये त्यांनी जोशीजी ने केलेल्या अनुवादाच्या आवृत्तीमध्ये बऱ्याच चुका आहेत असे लिहिले. म्हणून मी पत्र लिहून त्यांना मुंबईला बोलविले आणि त्यांना निवेदन केले की ज्या चुका आहेत त्या आपण आम्हाला दाखवा. हा एक कपिलाषष्ठीचा योगच म्हणावा लागेल की स्वामी दयानंदांनी उदयपुर येथील नवलखा महालात या ग्रंथाचे पुनर्लेखण केले होते. अनुवादात्मक संभाव्य त्रुटि दुरुस्त करणारेही उदयपुर येथीलच आहेत. स्वामी संकल्पानंद यांनी एकाग्र चित्ताने सतत तीन महिने वीस दिवस बसून हा अनुवाद दुरुस्तीसह प्रस्तुत केला आहे.

**स्वामी संकल्पानंद** हे शिक्षण खात्यातील महाराष्ट्र शासनातील पूर्वाश्रमीचे राजपत्रीत अधिकारी होते ते बी.ए., बी.टी., विशारद आहेत. आर्य समाजाशी निगडीत संबंधीत होऊन त्यांना तब्बल ६० वर्षे झाली आहेत. अशा सुविद्य, अनुभवी व आर्ष पद्धतीचा अवलंब करणाऱ्या व्यक्तीने ह्या अनुवादाच्या दुरुस्त अनुवाद सादर करावा, हे आमच्या आर्य समाजास भूषणावह आहे. आमच्यासह सर्व मराठी भाषी जनता यांचे आभारी आहोत. तसेच त्यांनी दाखविलेल्या चुका व शोधन करायला मला जवळ जवळ एक महिना लागला, मला हे सुद्धा बघायला लागले की जे शोधन केलेले आहे ते बरोबर आहे की नाही. आता मी आपल्या बुद्धीप्रमाणे जे कार्य केले आहे. सुविज्ञ जनांनी ज्या काही चुका आढळतील

त्या सूचित करण्याची कृपा करावी. पुढील आवृत्तीमध्ये त्या चुका दुरुस्त केल्या जातील. प्रस्तुत संपूर्ण **मराठी सत्यार्थ प्रकाशची** सीडी तयार करून मी **आर्य समाज मुंबईकडे** ठेवत आहे. पुढे ज्या आर्य समाजाला अथवा व्यक्तिला पुनर्मुद्रण करायचे असेल त्यांनी **आर्य समाज मुंबई** कडे संपर्क साधावा आणि सीडी घेऊन पुनर्मुद्रण करावे.

२००२-२००३ ची कार्यकारिणी **श्री डॉ. अश्विनभाई व. पटेल**-मॅनेजिंग ट्रस्टी, **श्री अनिलकुमार सी. नेस्ती**-ट्रस्टी, **सुश्री. डॉ. ज्योत्स्ना बेन मेहश्री**-ट्रस्टी, **डॉ. आचार्य-वागीशजी शर्मा**-परामर्शदाता, **श्री पं. देवदत्तजी शर्मा**, **श्री पं. श्रवणकुमारजी शर्मा**-सह परामर्शदाता, **श्री करसनदास जे. गणा**-प्रधान, **श्री देवेश्वर शर्मा**-उपप्रधान, **श्रीमती विशुद्धादेवी आर्या**-उपप्रधान **श्री र[illegible]नाथ पाण्डेय**-मंत्री, **श्री केवलभाई एन. मकवाणा**-उपमंत्री, **श्री विजय कुमार गौतम** - कोषाध्यक्ष, **श्री राघवजीभाई आर. पटेल**-पुस्तकाध्यक्ष, **श्री शान्ताराम नाचरे**, **श्री वेलजीभाई पटेल**, **श्री किशनलाल महाजन** -अन्तरंग सदस्य, **श्रीमती कुमुद आर्या**-अन्तरंग सदस्या ज्यांनी हे सत्कार्य करण्यासाठी माझ्यावर विश्वास ठेवून मला ह्या सत्कार्यासाठी प्रोत्साहित केले, त्या **आर्य समाज मुंबई** कार्यकारिणीचा मी आभारी आहे.

**आर्य समाज पिंपरी** हा महाराष्ट्रात एक जागृत आर्य समाज आहे. त्याची सुयोग्य कार्यकारीणी महर्षिंचे कार्याला जी गती देत आहे ती स्वागतार्ह आहे. महाराष्ट्रातील सर्व आर्य समाजाने त्यांचे अनुकरण करावे असे माझे निवेदन आहे. आर्य समाज पिंपरीचे अध्यक्ष **श्री कृष्णचन्द्रजी आर्य**, मंत्री **श्री मुरलीधरजी** तसेच उपमंत्री **प्रा. एकनाथजी आर्य** यांचे मी मन:पूर्वक आभार व्यक्त करीत आहे, ज्यानी माझ्या कार्याला स्वत:चे कार्य समजून प्रत्येक परिस्थितीमध्ये मदत करून माझे मार्गदर्शन केले.

प्रुफ संशोधन करण्यात महाराष्ट्र आर्य प्रतिनिधि सभेचे पुस्तकाध्यक्ष **श्री ज्ञानकुमारजी आर्य** यांनी खूप लक्षपूर्वक आणि तत्परतेने माझ्याकडून राहिलेल्या त्रुटी मध्ये सुधारणा करण्यात मदत केली. तसेच मी त्यांचेही मन:पूर्वक आभार व्यक्त करतो.

विकास ग्राफिक्स ने मन:पूर्वक कंपोज करण्याचे काम केले आणि दोन वेळा संशोधन करावे लागले त्यामध्ये श्रम करून यथायोग्य मराठी भाषेचा समुचित प्रयोग करताना माझी मदत केली त्यासाठी मी त्यांचे मन:पूर्वक आभार मानत आहे.

श्री सुशिलजी कपूर यांनी योग्य भावात बेलापुर मिलचा कागद **मराठी सत्यार्थ प्रकाश** पुस्तकासाठी उपलब्ध करून दिला त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

सत्यार्थप्रकाश त्या महापुरुषाची रचना आहे, ज्याने संबंध जीवनात व धीस तडजोड केली नाही. ज्याच्या मनात कधीच कुणाविषयीही द्वेष उद्भवला नाही. जो मानवमात्राच्या उन्नती-कल्याणासाठी मृत्युपर्यंत संघर्षमय जीवन जगत राहिला. ज्याचे अंत:करण सर्वांविषयी आईचे वात्सल्य आणि प्रेमाच्या भावनेने ओथबलेले होते. अशा महान युगप्रवर्तक देवदयानंदाच्या अमृत लेखणीने लिहिलेला हा ज्ञानसूर्यरूपी दिव्य ग्रंथाची तेरावी आवृत्ति वाचकांच्या सेवेत मकर संक्रांती २००४ प्रसंगी सादर करीत आहोत.

परमेश्वर आम्हास सामर्थ्य देवो आणि ऋषिभक्त आशीर्वाद देवोत, की आम्ही गुरु देव दयानंदाचा हा महान ग्रंथ जगातील दिशाहीन लोकांपर्यंत व त्यांना सत्यधर्म व ज्ञानाची ओळख करून देवू शकू.

अज्ञानरूपी अंधकार आणि भौतिकवादाच्या प्रवाहात धर्माच्या प्रकाश आणि [illegible] हा ज्ञानग्रंथ घेवून आम्ही उपस्थित आहोत. अंधकार नाहीसा होईल आणि वेदाचा प्रकाश भूमण्डळावरील मानवांना मार्गदर्शन करील असा आमचा पूर्ण विश्वास आहे.

- महर्षि चरणानुचर **देवेश्वर शर्मा**

उपप्रधान- **आर्य समाज मुंबई**

# स्वामीजींचा मुंबई प्रवास व आर्य समाजाची स्थापना

**स्वामी दयानन्द सरस्वती** यांचे पहिल्यांदा मुंबई येथे २० ऑक्टोबर १८७४ रोजी आगमन झाले. भायखळा रेल्वे स्टेशनवर शेठ लक्ष्मीदास खिमजी, मथुरादास लवजी, छबीलदास लल्लूभाई, सेवकलाल कृष्णदास इत्यादि मुंबई नगराचे मान्यवर व्यक्तिंनी स्वामीजींचा स्वागत सत्कार केला होता. तसेच स्वामीजींच्या निवासस्थानाची व्यवस्था वालकेश्वर स्थित गोशालामध्ये परनामी सम्प्रदायचे बाबा रेवागर कुंवरगरं यांच्या मठामध्ये निश्चित केली गेली होती. स्वामीजींच्या व्याख्यानाची व्यवस्था धोबी तलावा जवळ कावसजी इन्स्टीटयूट मध्ये केली होती. स्वामीजींच्या व्याख्यानामुळे वैष्णव सम्प्रदायामध्ये हडकम्प गाजलेली त्या सम्प्रदायाचे आचार्य स्वामींचे शत्रू बनून त्यांच्या अपकाराची व्यवस्था विष देवून करत होते. परंतु स्वामीजींना त्या विषयी माहिती पडल्यावर ते आपला उद्दीष्ट सिद्ध करू शकले नाही. मुंबई निवास दरम्यान स्वामींनी **सन्ध्योपासना विधि, पंचमहायज्ञ विधि, संस्कार विधि, आर्याभिविनय तथा** साम्प्रदायिक खंडन मंडन विषयी **तीन ग्रंथ** १) **वेदान्तिध्वान्त निवारण** २) **वेदविरुद्धमत खंडन** ३) **शिक्षापत्रीध्वान्त निवारण** यांचे लेखन पूर्ण केले. या कालावधीत स्वामींनी गुजरात यात्रेच्या कार्यक्रमामध्ये सूरत, भरूच, अहमदाबादहून राजकोट पोहोचले. राजकोटमध्ये प्रथम आर्य समाजाची स्थापना केली परंतु काही कारणास्तव ती अल्पावधीतच बंद पडली. राजकोटपासून अहमदाबाद वरून पुन्हा २९ जानेवारी १८७५ ला दुसऱ्यांदा पुन्हा मुंबईला पोहोचले. पहिला प्रवास एक महिना आणि दहा दिवसांचा होता. या अल्पावधीत स्वामींनी शिक्षितांबरोबर इतर जनतेला आपली उदारता आणि विद्वत्तेने आविर्भूत केले.

स्वामीजींचा दूसरा मुंबई प्रवास ४ फेब्रुवारी १८७५ ला सुरु झाला. यावेळी स्वामीजींच्या व्याख्यानासाठी एक मोठा वेद मंडप नावाचा पंडाल तयार करण्यात आला होता. या वेद मंडपात स्वामीजींची अनेक व्याख्याने झाली. १० मार्च १८७५ रोजी व्याकरण विषयावर एक शास्त्रार्थ पं. आत्माराम बापू दळवींच्या अध्यक्षतेखाली झाला. त्या शास्त्रार्थामध्ये पंडित वर्गाची हार झाली. याच दरम्यान आर्यसमाज स्थापनेविषयी चर्चेने जोर पकडला. स्वामी याविषयी गंभीर होते आणि सर्व व्यवस्था सावधानतेने करायला पहात होते. कारण त्यांनी कलकत्त्यामध्ये ब्रह्म समाजाचे विघटन पाहिले होते. आपली स्थिति स्पष्ट करताना त्यांनी सांगितले की माझे काही स्वतंत्र मत नाही. मी वेदाचा आधीन आहे. आमच्या भारतात २५ कोटी (१८७५ मध्ये भारताची जनसंख्या) आर्य आहेत. विभिन्न विचारात आपसात काहीतरी मतभेद आहेत, ते विचारपूर्वक मंत्रणा करून सुटून जातील. मी संन्यासी आहे आणि माझे कर्तव्य आहे की आपण लोकांचे जे अन्न खातो त्याच्या मोबदल्यात जे काही मी सत्य समजतो त्याचा मी निर्भयतापूर्वक उपदेश करीत आहे. मी काही किर्तीच्या मागे नाही. कोणी माझी निंदा करो किंवा स्तुती करो मी आपले कर्तव्य समजून उपदेश करीत राहील. कोणी स्वीकार करो अथवा अस्वीकार करो माझी काहीही हानि अथवा लाभ नाही. या एकून एका सज्जनाने विचारले की जर आम्ही आर्य समाजाची स्थापना करू तर त्याच्यामध्ये काहीतरी हानि होईल का ? त्याच्या प्रतिउत्तरात स्वामी म्हणाले - "आपण जर आर्य समाज उघडून काहीतरी उपकार करू शकतील तर आर्यसमाजाची स्थापना करून घ्या. त्याबद्दल माझा काहीही नकार नाही. जर त्यामध्ये समुचित व्यवस्था नाही ठेवली तर भविष्यात त्यामध्ये गडबड होऊ शकते. मी तरी जसा इतरांना उपदेश करीत आहे तसाही आपणाला पण करीन आणि एवढे लक्षात ठेवा की माझे काहीही स्वतंत्र मत नाही. माझ्या म्हणण्यात भविष्यात काहीतरी चूक आढळेल तर त्याची युक्तिपूर्वक परीक्षा करून त्याचे सुद्धा शोधन करावे. जर असे नाही केले तर हे सुद्धा भविष्यात एकमत होऊन जाईल. अशाप्रकारे "बाबा वाक्यं प्रमाणं" होऊन या भारतात नाना प्रकारचे मत-मतान्तर प्रचलित झाले आपसात दुराग्रह होऊन धर्मांध बनून भांडण करून नाना प्रकारच्या सद्विद्येचा नाश करून हा भारतवर्ष वर्तमानाच्या दुर्दशेला प्राप्त झाला. यामध्ये हा सुद्धा एक संप्रदाय वाढेल. माझा अभिप्राय एवढाच आहे की या भारतात नाना प्रकारचे मत-मतान्तर प्रचलित आहे. ते सर्व वेदाला मानतात. याच वेदशास्त्ररूपी समुद्रात एवढे सर्व नदी-नाले पुनः एकत्र करून धर्माची एकता होईल आणि यामध्ये सर्व कला-कौशल्य इत्यादिंची वाढ होऊन अभीष्ठ धारणा होईल. मनुष्यमात्राचे जीवन सफल होऊन शेवटी आपल्या धर्मबलाने अर्थ, काम आणि मोक्षाची प्राप्ति होऊ शकते."

जेव्हा स्वामींच्या उपरोक्त कथनावरून सर्व भक्तजनांची संतुष्टि तसेच सहमति झाली तेव्हा राजमान राजश्री **पानाचंद आनन्द पारेख** यांना आर्य समाजाच्या नियमाचे प्रारूप बनविण्याकरिता आव्हान केले. स्वामीजींनी त्या नियमाला चांगल्या प्रकारे पाहिले आणि त्यामध्ये समुचित संशोधनसुद्धा केले. शेवटी चैत्र शुक्ल प्रतिपदा बुधवार (७ एप्रिल १८७५) रोजी गिरगांवमध्ये प्रार्थना समाजा जवळ एका पारसी सज्जन डॉ. माणिक अदेर यांची वाटिकामध्ये **आर्य समाज मुंबईची** विधिवत् स्थापना संपन्न झाली. सुरुवातीला आर्य समाजाचे २८ नियम निर्धारित केले गेले. स्वामींनी स्वत: त्या नियमांची हिंदीमध्ये व्याख्या केली. तत्पश्चात् **आर्य समाज मुंबईचे** पदाधिकारी यांची निवड करण्यात आली. **श्री गिरधरलाल दयालदास कोठारी** (प्रधान) आणि **श्री पानाचन्द आनन्द पारेख** मंत्री निर्वाचित झाले. सुरुवातीला आर्य समाज मुंबईची सदस्य संख्या जवळजवळ १०० होती. स्वामीसुद्धा स्वत: सदस्यांमध्ये होते. त्यांचे नाव ३१ संख्येवर अंकित केले गेले.

**आर्य समाज मुंबई**चे प्रथम साप्ताहिक अधिवेशन दर शनिवारी संध्याकाळी होत असे. नंतर रविवारच्या वेळेचा विचार करून दर रविवारी संध्याकाळी साप्ताहिक अधिवेशन होऊ लागले. सुरुवातीच्या १७ आणि २४ एप्रिलचे साप्ताहिक अधिवेशन स्वामींनी स्वत: संबोधित केले होते.

यावेळी स्वामी जवळजवळ पावने पाच महिने मुंबईत राहिले. जून १८७५ मध्ये त्यांनी दक्षिणची काशी, पुण्यासाठी प्रस्थान केले. पर्याप्त वेळा पुण्यामध्ये राहून एकदा साताऱ्याला गेले तेथून परतताना पुण्यापासून मुंबईला तिसऱ्या वेळी ऑक्टोबर १८७५ मध्ये आले.

**आर्य समाज मुंबई** ची स्थापना बरोबर स्वामी दयानंदांनी एका प्रतिष्ठित धर्मप्रवक्ता तसेच समाज सुधारक रूपाने आपली ओळख निश्चित करून घेतली. जेव्हा स्वामी पुण्याहून मुंबईला परतले तेव्हा त्यांच्या स्वागतासाठी पुष्कळ संख्येने त्यांचे प्रशंसक तसेच भक्तगण स्टेशनवर जमले होते. ३० ऑक्टोबर १८७५ रोजी स्वामींचे व्याख्यान **"आर्यांचा नववर्षाचा प्रथम दिवस"** विषयावर झाले. त्यावेळी स्वामींची भेट पंजाबचे ब्राह्म समाजाचे नेते श्री नवीनचन्द्र राय यांबरोबर पडली. त्यांच्याबरोबर केशवचन्द्र सेनचे साथी, श्री प्रतापचन्द्र माजूमदार हेही होते. वार्तालापच्या प्रसंगावर स्वामींनी वेदांमध्ये एकेश्वरवाद सिद्धांताची पूर्णता केली. या प्रकारानंतर जवळजवळ एक वर्ष स्वामी मुंबईमध्ये वास्तव्य करून नंतर बडोद्याला गेले. काही काळ तेथे धर्मप्रचार तसेच व्याख्यान इत्यादि करून ते अहमदाबाद, सूरत, बलसाड तसेच वसई रोडच्या मार्गाने पुन: चौथ्यांदा (फाल्गुन १९३२ वि. स.) ला मुंबईला आले. यावेळी ५ मार्च १८७६ ला आर्य समाज मुंबईच्या तत्वावधानामध्ये "वेदांची श्रेष्ठता आणि पवित्रता" या विषयावर स्वामींचे व्याख्यान झाले. त्यावेळी मुंबईमध्ये उपस्थित प्रो. विलीयम्सला विशेष रूपाने त्याप्रसंगी आमंत्रित केले होते. प्रो. विलीयम्स ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीमध्ये संस्कृतचे प्राध्यापक होते. मुंबईचे कलेक्टर श्री शेफर्ड सुद्धा व्याख्यानामध्ये हजर राहिले होते. हे व्याख्यान यद्यपि हिंदी भाषेमध्ये होते पण स्वामीजींच्या व्याख्यानाच्या भाषेमध्ये संस्कृत शब्दाला बाहुल्य असताना प्रो. विलीयम्सला समजायला काहीही अडथळा आला नाही. त्यानंतर १६-१७ मार्च १८७६ ला स्वामींची दोन व्याख्याने हरिश्चंद्र चिन्तामणिंच्या हॉलमध्ये **"ईश्वराचे अस्तित्व आणि यज्ञ"** या विषयावर झाली. २१ मार्चला टाऊन हॉलमध्ये रा. ब. नाना मोरोजींच्या अध्यक्षतेमध्ये झाला. ते त्यावेळी मुंबई नगराचे दण्डनायक होते. व्याख्यानाचा विषय होता - **"आर्यांचा इतिहास"** ४ एप्रिल १८७६ ला आर्य समाज मुंबईचे एक सभासद जीवनदयाल ठक्कर यांनी एक जाहिरात प्रकाशित केली. स्वामी दयानंद गेल्या १८ महिन्यांपासून **"मूर्तिपूजेचे खंडन"** या विषयावर व्याख्यान करीत आहेत. त्याचा आजपर्यंत कोणीही प्रतिवाद केलेला नाही. म्हणून स्वामींच्या पक्षाला सत्य मानून मी आर्य समाज मुंबईची सदस्यता स्वीकार करीत आहे. यावेळी एप्रिल १८७६ ला स्वामींनी मुंबईहून इंदौरला प्रस्थान केले.

जवळजवळ साडे पाच वर्षांच्या कालावधीनंतर स्वामी ३० डिसेंबर १८८१ ला शेवटच्या वेळी पाचव्यांदा मुंबई महानगरला आले. याच नगरामध्ये त्यांनी आर्य समाजाची स्थापना सन् १८७५ ला केलेली. त्यानंतर त्यांनी उत्तर प्रदेश, पंजाब, राजस्थान, बिहारचे भ्रमण केले. त्यादरम्यान उत्तर भारताच्या अनेक नगरांमध्ये त्यांनी आर्य समाजाची स्थापना केली. स्वामींची किर्ती पताका दिवसेंदिवस वाढत राहिली. देशवासियांना त्यांच्याकडून राष्ट्र निर्माणाची भरघोस मार्गदर्शनाची अपेक्षा होती.

यावेळी स्वामीजींची १४ व्याख्याने वेगवेगळ्या तारखांमध्ये जानेवारी १८८२ पासून १२ मार्च १८८२ पर्यंत कावसजी पटेल तलाव येथे झाली. व्याख्यानाचा हा सिलसिला चालूच होता तेव्हा **आर्यसमाज मुंबईचा** वार्षिकोत्सव दिनांक २० ते २२मार्च १८८२ ला संपन्न झाला. पहिल्या दिवशी आर्य समाजाच्या खरेदी केलेल्या जागेवर सकाळी ८ वाजेपासून ११ पर्यंत यज्ञ संपन्न केला गेला.

वेदपाठ गुजराती आणि दक्षिणी ब्राह्मणांद्वारा केला गेला. त्यांच्या वेदपाठाची प्रशंसा करत असताना स्वामींनी स्वतः तानपुऱ्यावर सामवेद गायन केले. जे ऐकून श्रोते मंत्रमुग्ध होऊन गेले. वार्षिकोत्सवाच्या संदर्भात स्वामीजींचे २० आणि २२ मार्च रोजी वेद विषयावर प्रवचन झाले. त्यानंतर २६ मार्च, ३० मार्च, २ एप्रिल, ५ एप्रिल, २८ मे १८८२ ला विविध विषयांवर व्याख्याने होत राहिली. ३ जून १८८२ रोजी स्वामींचे गेइटी हॉलमध्ये देशभक्ति या विषयावर व्याख्यान झाले. ११ जून १८८२ रोजी रविवारीय सत्संगाचे वेळेवर फ्रामजी कावसजी हॉलमध्ये कर्तव्या- कर्तव्य मूर्ति, मंत्र, देव, ऋषि, पितर, उपासना इत्यादि विषयांची स्वामींनी विशेष व्याख्या केली. तसेच या शब्दांच्या वास्तविक अभिप्रायाचे निरूपण करताना त्यांचे भाषण झाले त्या विषयांच्या उर्वरित भागांवर दिनांक १३ जून १८८२ रोजी स्वामींनी पुनः व्याख्या केली. स्वामींचे मुंबई मध्ये शेवटचे भाषण १७ जून १८८२ रोजी योग विद्येवर झाले.

वर लिहिलेल्या विवरणानुसार बघितल्याप्रमाणे जेव्हा **आर्य समाज मुंबई** ची स्थापना झाली होती तेव्हा आर्य समाजाच्या संचालनासाठी २८ नियम बनविले होते. त्यानंतर जून १९७७ मध्ये लाहोर आर्य समाजाची स्थापना झाल्यावर तेथे हा निर्णय घेतला गेला की आर्य समाजाचे मौलिक सिद्धांत आणि उद्देशांना १० नियमात सूत्रबद्ध करून घेतला पाहिजे, तसेच व्यवस्था आणि संगठना संबंधीधारांना पृथक् नियमांमध्ये ठेवले पाहिजे. **आर्य समाज मुंबई** मध्ये २८ नियमांचे पालन १८७५ पासून चालू होते. स्वामींनी १८८२ मध्ये मुंबईच्या आर्य सभासदांना प्रेरणा दिली की संस्थेच्या दृष्टिने सर्वत्र एकरूपता असणे योग्य आहे तेव्हा स्वामींच्या उपस्थितिमध्ये **आर्य समाज मुंबईची** अंतरंग सभेने निश्चय केला, की लाहोर मध्ये स्वीकार केलेल्या १० नियमांचा आर्य समाजानेही स्वीकार करावा. त्याअर्थी १५ एप्रिल १८८२ ला **आर्य समाज मुंबईची** नैमित्तिक साधारण सभेच्या रात्रकालीन बैठकीमध्ये त्या आशयाचा प्रस्ताव सर्वसंमतिने मंजूर करून घेतला. त्याबरोबर असाही निर्णय करून घेतला की मुंबईची परिस्थिति अनुसार **आर्य समाज मुंबई** उपनियमांमध्ये आवश्यक परिवर्तन करू शकेल.

स्वामींचा मुंबईमध्ये अंतिम प्रवास थियोसॉफिकल सोसायटी आणि आर्य समाजाच्या संबंधामध्ये पडद्या गतिरोध दूर करण्याबाबत महत्वपूर्ण होता. जेव्हा स्वामी मुंबईला आले तेव्हा त्यांनी सोसायटीचे संस्थापक कर्नल ऑलकाट तसेच मॅडम ब्लैवेट्स्कीना या आशयाचे पत्र लिहून पाठविले की जेव्हा तुम्ही मेरठला एका व्याख्यानाच्या वेळी मला अशी शंका आली होती आणि असे वाटले होते की तुमचे मत ईश्वरविषयी वैदिक मतापेक्षा भिन्न आहे. जर तुम्हाला योग्य वाटेल तर तुम्ही जवळ येवून माझ्याबरोबर चर्चा करू शकता आणि आपली ईश्वरविषयक शंका दूर करू शकता. जेव्हा पत्रवाहक सोसायटीच्या मुख्यालयात गेला तेव्हा माहिती पडले की कर्नल ऑल्काट कुठेतरी गेलेले आणि मॅडमनी मौखिक रूपाने उत्तर दिले की त्यांच्याजवळ चर्चा किंवा शास्त्रार्थ करायला वेळ नाही. पुन्हा स्वामींनी २२ मार्चला एक पत्र लिहून पाठविले आणि सांगितले की समस्येची गुरुता पाहून थियोसोफीच्या नेत्यांनी त्यावर गंभीरतेने विचार करावा की आपले भावी संबंध कसे असावेत ? त्यांच्याकडून कसलेही उत्तर न आल्यावर स्वामींनी घोषणा केली की ते २६ मार्च रोजी फ्रामजी कावसजी हॉलमध्ये एका भाषणाद्वारे थियोसॉफी आणि आर्य समाजाचे संबंध याबाबत स्पष्टिकरण करणार आहेत. त्या घोषणेनुसार स्वामींनी १८७९ पासून १९८२ पर्यंतचे संबंधाबाबत आपल्या भाषणात पारस्परिक संबंधांना प्रस्तुत केला आणि स्पष्ट केले की या लोकांनी पूर्वी वैदिक धर्माची प्रतिबद्धता व्यक्त केली होती. ते त्या लोकांची ठरविलेली चाल होती. त्यांचा उद्देश आर्य समाजाच्या संबंधाने आपल्या संस्थेला या देशात मजबूत करायची योजना होती. म्हणून मी त्या संस्थेशी आपले काहीही संबंध नाही अशी घोषणा करतो.

# महर्षि दयानंद सरस्वती संक्षिप्त जीवन वृत्त

महर्षि दयानंद सरस्वतींचा जन्म टंकारा (गुजरात प्रांत) या गावी इ.स. १८२४ मध्ये झाला. त्यांचे वडील कर्शनदास हे औदिच्य ब्राह्मण व शैव होते. महर्षींचे मूळ नाव मूळशंकर होते. जन्मतः त्यांची बुद्धी तीव्र होती. वयाच्या १४ व्या वर्षी त्यांनी यजुर्वेद संहिता पूर्ण कंठस्थ केली होती. त्याच वर्षी वडीलांच्या आग्रहावरून महाशिवरात्रीचे व्रत करण्याचे ठरविले. या दिवशी साक्षात् भगवान शिव भक्तांना दर्शन देतात असे वडिलांनी सांगितल्यामुळे मूळ शंकराच्या मनात उत्सुकता जागृत झाली होती. गावापासून ३ कि.मी. अंतरावर असलेल्या शिवमंदिरात जागरण करण्यासाठी दोघेही गेले. मध्यरात्री सर्व भक्त पेंगु लागले. मूळशंकर मात्र उत्सुकतेने महादेवाच्या पिंडीकडे टक लावून पाहत होता आणि साक्षात शिवाच्या दर्शनासाठी आतुर झाला होता. तेवढ्यात दोन-चार उंदीर पिंडीवरील नैवेद्य खाताना व पिंडीवर धुमाकूळ घालत असलेले दिसले. मूळशंकराला मोठे आश्चर्य वाटले. हा कसला देव ! जो आपल्या पिंडीवरील उंदरांना पळवू शकत नाही, तो जगाचे रक्षण काय करणार ? असा विचार त्याच्या मनात डोकावला. त्याने वडिलांना उठवून हा प्रश्न विचारला. ते उत्तर देवू शकले नाहीत, यामूळे मूळशंकराचा मूर्तीपूजेवरील विश्वास उडाला.

बहिण व चुलत्याच्या आकस्मिक मृत्युमुळे मूळशंकरच्या मनात कुतूहल निर्माण झाले. मनुष्य मरतो म्हणजे नेमके काय होते? मृत्यु सर्वांसाठीच आहे तर मी ही मरेन का ? मृत्युच्या तावडीतून सुटण्यासाठी काही उपाय आहे का ?

या बाबतीत त्यांनी अनेकांना प्रश्न विचारले. योगाभ्यासाद्वारे परमेश्वराचा साक्षात्कार झाल्यास मृत्युतून मुक्त होता येते हे समजल्यावर त्यांनी गृहत्याग करण्याचा निश्चय केला व त्यांनी घर सोडले. पूर्णानंद सरस्वती या महाराष्ट्रीय संन्याशाकडून संन्यास घेतला व दयानंद सरस्वती हे नाव धारण केले. यापुढे त्यांनी योग्यांचा शोध घेण्यासाठी भारताचे भ्रमण केले. व मथुरेतील दंडी स्वामी विरजानंद यांच्याकडे पोहोचले. तेथे त्यांनी अडीच वर्षापर्यंत आर्षग्रंथाचे व व्याकरण शास्त्राचे अध्ययन केले. आर्ष (ऋषीकृत) ग्रंथांचा स्वीकार व अनार्ष ग्रंथांचा त्याग केला. त्यानंतर हरिद्वार येथे कुंभमेळ्यात पाखंड खंडनी पताका रोवून अंधविश्वास. पाखंड व कुरीतींचे खंडन करण्यास प्रारंभ केला. या काळात त्याने अव्याहतपणे ग्रंथांची निर्मिती, शास्त्रार्थ, प्रवचने, संस्थानिक राजे लोकांशी सम्बन्ध प्रस्थापित करून त्यांना देशोद्धाराची दृष्टी देण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. वेदांवर आधारित, तर्कनिष्ठ विचारांच्या प्रसारासाठी त्यांनी ७ एप्रिल १८७५, गुढीपाडवा या दिवशी मुंबईत **'आर्य समाज मुंबई'** या संस्थेची स्थापना केली. वयाच्या ५९ व्या वर्षी अजमेर येथे विषप्रयोगामुळे दीपावली ३० ऑक्टोबर १८८३ या दिवशी त्यांची प्राणज्योत मालवली.

आधुनिक भारतात अनेकांनी धार्मिक व सामाजिक सुधारणेबाबत विचार मांडले आहेत. राजा राममोहन रॉय, म. फुले, डॉ. आंबेडकर इत्यादी सुधारकांनी मांडलेल्या विचारांपेक्षा महर्षी दयानंदांचा धार्मिक, सामाजिक, राष्ट्रीय विचार वेगळा व वैशिष्टपूर्ण आहे.

तर्क व वेदशास्त्राधारे जाणल्या जाणाऱ्या, सृष्टीची रचना करणाऱ्या, अनन्तगुणसंपन्न अशा एकाच

परमेश्वराबाबतीत निरनिराळ्या भ्रामक कल्पनांमुळेच सर्व धार्मिक व बऱ्याच सामाजिक अंधश्रद्धा पसरल्या आहेत याची महर्षींना जाणीव होती. महर्षी दयानंदांनी तर्क व वेदशास्त्र या दोन्हींद्वारे परमेश्वराचे बुद्धीसंगत अस्तित्व मानव जातीच्या कल्याणासाठी अत्यावश्यक आहे असे प्रतिपादन केले.

धार्मिक क्षेत्रात मूर्तीपूजा, अवतारवाद, भ्रामक पाप-पुण्य कल्पना, भ्रामक तीर्थ-कल्पना, भ्रामक स्वर्ग-नरक कल्पना प्रचलित होत्या. त्यामुळे समाज निष्क्रिय झाला होता. या निष्क्रिय समाजाला वैदिक कर्मसिद्धांताचे महत्व पटवून दिले. प्रत्येकाला त्याच्या कर्मानुसार फळ मिळते. कोणी गुरू, कोणतेही तीर्थ, कोणतीही पूजा पापाच्या फळातून सुटका करीत नाही. नवस केल्याने कामना-पूर्ती होत नाही. योग्य ते कर्म करणे आवश्यक आहे. ब्राह्मणांना भोजन दिल्याने, वार-व्रत केल्याने पाप नष्ट होत नाही. ईश्वर न्यायकारी आहे आणि सर्वत्र आहे. त्याच्या दृष्टीतून कुणीही पापी शिक्षेविना राहू शकत नाही. म्हणून प्रत्येकाने सतत प्रयत्नशील राहणे अगत्याचे आहे असे महर्षींनी प्रतिपादिले.

निराकार ईश्वराची मूर्ती होवूच शकत नाही. मूर्तीपूजा ही ईश्वरापर्यंत पोहोचण्याची पायरी नसून ती त्या मार्गातील प्रचंड दरी आहे. मूर्तीपूजा ही वेदशास्त्र सम्मत नाही, बुद्धीसंगतही नाही. ईश्वराच्या साक्षात्कारासाठी ज्ञान, कर्म, उपासनेची आवश्यकता आहे. मूर्तीपूजा ज्ञान, कर्म, उपासनेपासून वंचित तर करतेच, असंख्य अंधविश्वासांनाही जन्म देते. परमेश्वरनिर्मित आई, वडील व इतर श्रेष्ठ सज्जन व्यक्तींची यथायोग्य सेवा हीच खरी मूर्तीपूजा आहे, असे तर्काधारे पटविले.

महर्षी दयानंदांपूर्वीही गुरुनानक, कबीर, रैदास इत्यादी अनेक संतांनी मूर्तीपूजेचे खंडन केले होते पण त्यांचा दृष्टिकोण केवळ आध्यात्मिक होता. परंतु महर्षींनी या देशाच्या नैतिक, धार्मिक, सामाजिक व राष्ट्रीय पतनासाठी, मानव-जातीचे ऐक्य नष्ट करण्यामध्ये मूर्तिपूजा हे प्रमुख कारण आहे. असे साधार दाखवून दिले व मूर्तिपूजेच्या उच्चाटनासाठी आटोक्यात प्रयत्न केले.

भारतीय इतिहासाचा मागोवा घेत असतांना वेद हे सर्वात प्राचीन ग्रंथ आहेत असे दिसून येते. सर्व ऋषी-परंपरा वेदांना ईश्वरीय ज्ञान मानते. महर्षी दयानंदानीसुद्धा तर्क व प्रमाणाद्वारे वेद हे ईश्वरीय ज्ञान आहे, सृष्टीच्या प्रारंभी ईश्वराने ऋषींद्वारे विश्वासंबंधी, मानव-जीवनासंबंधी व स्वत:संबंधी ज्ञान बीजरूपात दिले, वेदात इतिहास नाही; वेद हे सर्व सत्यविद्यांचे आगार आहेत, हे दाखवून दिले. मानवजातीच्या कल्याणासाठी वैदिक तत्त्वज्ञानाचा अवलंब हाच एकमात्र उपाय आहे असा विचार महर्षींनी मांडला.

मध्ययुगीन महीधर, सायण, उव्वट इत्यादी आचार्यांनी वेदांचे विकृत, अश्लील भाष्य केले. त्यांचेच अनुसरण करुन प्रो. मॅक्समुलर, डॉ. ग्रिफिथ, डॉ. बेबर वगैरे पाश्चात्य विद्वानांनी वेदाचे अतिशय चुकीचे अर्थ केले आहेत. त्यामुळे वेदांचे महत्त्व कमी झाले. ही बाब ओळखून महर्षींनी वेदांचा बुद्धीसंगत व व्यावहारिक सत्य अर्थ करुन जनतेच्या हृदयात वेदाविषयी श्रद्धाभाव निर्माण केला.

मूर्तिपूजा, अवतारवाद, जन्माधिष्ठित जाति-व्यवस्था, यज्ञातील पशुबळी, स्त्री-शूद्रांना वेदाधिकारापासून वंचित ठेवणे, हे सर्व वेदविरोधी आहे हे महर्षींनी दाखवून दिले. जो पर्यंत वेदविरोधी अनार्ष ग्रंथाचा त्याग व वेदांचा स्वीकार केला जात नाही तो पर्यंत धर्माचे खरे स्वरूप समजू शकणार नाही, असे ठाम मत महर्षींनी

मांडले. वेदांवर हजारो वर्षांपासून चालत आलेला एकाधिकार संपवून वेदांची दारे स्त्री-शूद्र या सर्वांसाठी खुली केली.

तत्त्वज्ञानाबाबतीत शतकानुशतकापासून चालत आलेल्या वाद-विवादाला महर्षींनी तर्क व शास्त्र या दोन्हीद्वारे संपुष्टात आणले. ईश्वर, जीव, प्रकृती (जगाचे उपादानकारण) या तीन्हींच्या अनादि अस्तित्त्वाद्वारे विश्वाच्या व्यवहाराचे सुसंगत स्पष्टीकरण केले. या त्रैतवादाच्या मांडणीद्वारे तत्त्वज्ञानाची परिपूर्णता व व्यावहारिकता सिद्ध केली. या पूर्वीच्या आचार्यांनी अद्वैतवाद, द्वैतवाद, शुद्धाद्वैतवाद; बौद्धांनी शून्यवाद, क्षणिकवाद; जैनांनी स्याद्वाद, या सारख्या अनेक भ्रामक कल्पना मांडल्या. परंतु या अव्यवहार्य आणि बुद्धीविरुद्ध आहेत असे महर्षींनी दाखवून दिले.

विसाव्या शतकात पुरोगामिकतेची जी तत्त्वें उचलून धरण्यात आली, त्या सर्वांचे उद्गमस्थान महर्षी होते, असे म्हणणे अतिशयोक्तिचे होणार नाही. मानव जीवनाच्या सर्वांगीण व समतोल विकासाचा परिपूर्ण दृष्टीकोण महर्षींच्या कार्यशैलीत दिसतो. शंकराचार्यांचा व तदितर संतांच्या भौतिकतेची उपेक्षा करणारा दृष्टीकोण व महर्षींचा 'जर्मनीस भारतीय युवकांना पाठवून अत्याधुनिक अभियांत्रिकीचे ज्ञान मिळवून देशास संपन्न करण्याचा दृष्टीकोण' यात आकाशपाताळाचे अंतर दिसून येते.

महर्षी प्रखर राष्ट्रवादी होते. हा राष्ट्रवाद ईश्वरीय ज्ञानाच्या-वेदांच्या-सत्यज्ञानाच्या रक्षणासाठी साधनमात्र आहे. राष्ट्र केवळ स्वतंत्र्य झाल्यामुळे सुख-शांती मिळणार नाही. पारतंत्र्यात सत्याची स्थापना करणे शक्य नाही. हे सत्य स्थापित व्हावे या साठीच स्वातंत्र्याची ओढ महर्षींना आहे. स्वातंत्र्य हा स्वैराचार नव्हे. ती सत्य-ज्ञानाची बांधिलकी आहे, हे इतर बऱ्याच क्रांतिकाराकांना उमजू शकले नाही. खरे पाहता, दास्यत्वाचे मूळ कारणच अज्ञान, असत्य आणि दूराचार आहे. ज्ञानसंपन्न, कर्मशील राष्ट्र हे कधीच दास्यशृंखलेत बंदिस्त होवू शकणार नाही. भारतीयांचे एकेकाळी चक्रवर्ती साम्राज्य होते, ते पुन्हा प्रस्थापित व्हावे; 'सर्व मानव एक, सर्वांचे देव एक, सर्वांचा धर्म एक, पृथ्वी माता एक' या चतु:सूत्रीची स्थापना चक्रवर्ती राज्याद्वारे व्हावी व ही पृथ्वी स्वर्गापेक्षा ही सुंदर, आनंददायक व्हावी अशी उदात्त विचारसरणी महर्षी दयाननदांची होती.

''कोणी काहीही म्हटले तरी स्वदेशी राज्य असणे, ही गोष्ट सर्वश्रेष्ठ व उत्तम असते. धार्मिक पूर्वग्रहांपासून अलिप्त, आपले व परके यांच्या बाबतीत पक्षपात न करणारे, प्रजेवर माता-पित्याप्रमाणे कृपा, न्याय व दया करणारे अशा परकीयांचे राज्यही पूर्णपणे सुखदायक होत नाही.'' असे इ.स. १८७५ मध्ये सडेतोडपणे लिहून प्रखर राष्ट्रवादाची ज्योत पेटविली. काँग्रेसनी संपूर्ण स्वराज्याची उद्घोषणा १९२८ च्या अधिवेशनात केली. ५० वर्षांपूर्वी स्वराज्याची उद्घोषणा करणारे महर्षी किती दूरद्रष्टे होते व स्वराज्याची किती उत्कट ओढ व तळमळ त्यांना होती, याची प्रचीती यावरून येईलच. महर्षींनी राष्ट्रीयतेबरोबर मानवसमाजाच्या एका विश्व-कुटुंबाची कल्पनाही मांडली. असत्य व पाखंडाच्या खंडनाद्वारे मानवसमाजाच्या उद्धाराचा दृष्टिकोण दिला. महर्षींची राष्ट्रीयता विश्व-कुटुंबासाठी परिपूरक होती.

आर्यावर्त्त (भारत)चे महत्त्व विशद करताना, 'सर्वोत्तम देश भारतच आहे. तो जणू पारसमणीच आहे. ज्याच्या संपर्काने दीन-दरिद्र विदेशी धनसंपन्न झाले. असा हा भारत आज हीन-दीन अवस्थेत आहे.

एकेकाळी कधी आर्यांचे चक्रवर्ती राज्य होते. भारतीयांनी आपले दुर्गुण दूर सारले तर हरवलेले गौरव पद पुन: प्राप्त करू शकतो. इतिहासाच्या आधारावर भारतीयांमध्ये पुनश्च स्वाभिमान जागृत करण्याचा प्रयत्न त्यांनी केला.'

अस्पृश्यता हा हिंदू समाजाला जडलेला सर्वांत मोठा रोग होता. महर्षींनी एका न्हाव्याची भाकर खावून अस्पृश्यता ही खुळचट, अमानवीय कल्पना आहे; जन्माद्वारे नव्हे तर कर्माद्वारेच श्रेष्ठत्त्व प्राप्त होते. असे निक्षून सांगितले. नंतर महर्षींच्या अनुयायांनी अस्पृश्यतेमुळे धर्मांतरित झालेल्या बांधवांना शुद्धीद्वारे पुन: आपल्यात समावून घेतले. सर्वांना जानवे वापरण्याचा अधिकार दिला. अस्पृश्यता नष्ट होईतो, सामाजिक व राष्ट्रीय ऐक्य कधीच स्थापित होणार नाही, असे दाखवून दिले.

ज्ञानावर ब्राह्मणांची मालकी नाही. ब्राह्मणांचे शास्त्र म्हणून वेदशास्त्रांची हेटाळणी करण्याचीही गरज नाही. सत्य हे सर्वांचे, असत्य हे कुणाचेही नाही, असा उदार दृष्टिकोण इतर समाजसुधारकांना बाळगता आला नाही. महर्षींच्या अनुयायांनी गुरुकुले स्थापन करून हजारो दलितांना वेदशास्त्राचे ज्ञान करविले, त्यांना खरे ब्राह्मण बनवून समाजात मानाची जागा मिळवून दिली. त्यामुळे धर्माच्या नावावर पाखंड माजविणाऱ्यांचे पितळ उघडे पडले. 'जिथे आर्यसमाज आहे तिथे सत्यज्ञान आहे.' अशी भूमिका जनतेची झाली. अमेरिकेतील एण्ड्रो जॅक्सननी म्हटले- 'एक प्रेमाची ज्योत (अग्नि), जी जगातील सर्व ईर्ष्या-द्वेषांना भस्मसात करणारी, मी पाहत आहे. ती महर्षी दयानंदांच्या हृदयात प्रज्वलित झाली आहे.' म्हणूनच महर्षींनी आर्यसमाजाच्या सहाव्या नियमात 'जगावर उपकार करणे हाच या समाजाचा उद्देश आहे.' असे लिहून आपल्या प्रेमाच्या व्यापकतेची ग्वाही दिली. महर्षींनी विरोधासाठी विरोध कधीच केला नाही. स्वत:च्या पांडित्य प्रदर्शनासाठी किंवा परंपरेच्या आग्रहासाठीही कुणाचा विरोध केला नाही. विरोध केला तो केवळ असत्याचा, अज्ञानाचा, अंधविश्वासाचा आणि अमानवीय व्यवहारांचा.

स्त्री-जातीबद्दल महर्षींच्या मनात अतिशय आदर आहे. 'माता निर्माता भवति' राष्ट्राची निर्मात्री माताच आहे. स्त्रियांना प्रसन्न ठेवणे हे संबंधित पुरुषांचे आद्य कर्तव्य आहे. बाल-विवाहाचा निषेध, जरठ-कुमारिका विवाह निषेध, विधवा विवाहाचा पुरस्कार यांसाठी महर्षींकडूनच प्रेरणा मिळाली आहे.

''महर्षी दयानंद हे मला 'एव्हरेस्ट' शिखरासारखे वाटतात.'' योगी अरविंदांच्या या समर्पक वाक्यावरुन महर्षींच्या उत्तुंग आणि सर्वांगीण अशा शतपैलू व्यक्तिमत्त्वाची ओळख आम्हास होते. ''आदित्य-ब्रह्मचारी, सत्यान्वेषी, साहसी, क्रांतिकारी, प्रकांड- पण्डित, शास्त्रार्थ-महारथी, तार्किक, ईश्वरभक्त, योगी, व्यवहारनिष्ठ, बुद्धिवादी, शास्त्रमर्यादा पालक, वेदज्ञ, गोभक्त, शिक्षण-प्रसारक, स्त्री-मुक्तिदाता, दलितोद्धारक, समाजसुधारक, पाखंड-विरोधक, सत्य-प्रस्थापक , मानवतावर्द्धक समता-उद्घोषक, प्रभावी वक्ता, उत्तम लेखक, शीघ्र कवी, देशभक्त, राष्ट्रवादी.'' अशा अनेक पैलूंनी विशिष्ट असे स्वामीजींचे जीवन होते. म्हणून आपल्या 'आर्यसमाज' संस्थेचा उद्देश्य जगाचे सर्वांगीण कल्याण करणे अशी घोषणा करुन आपल्या तत्वज्ञानाच्या व्यापकतेची व परिपूर्णतेची ग्वाही दिली.

महर्षींचे जीवन समाजातील सर्वच स्तरावरील व्यक्तींना दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शन करीत आहे व करीत राहील.

**॥ ओ३म् ॥**

**ओ३म् सच्चिदानन्देश्वराय नमो नमः**

# भूमिका

ज्यावेळी मी हा '**सत्यार्थप्रकाश**' ग्रंथ तयार केला त्यावेळी आणि त्यापूर्वी संस्कृतमधून भाषण करण्याची आणि अध्ययन-अध्यापन देखील संस्कृतमधूनच करण्याची आणि माझ्या जन्मभूमीची भाषा गुजराती असल्याने (हिन्दी) भाषेचे ज्ञान मला विशेष नव्हते. म्हणून भाषा अशुद्ध झाली होती. आता ही भाषा बोलण्याचा व लिहिण्याचा मला अभ्यास झाला आहे. म्हणून या ग्रंथाची भाषा व्याकरणानुसार शुद्ध करून तो दुसऱ्यांदा छापविला आहे. काही काही ठिकाणी शब्द व वाक्यरचना यांत भेद झाला होता म्हणून तसे करणे उचित होते. कारण तसा भेद केल्याशिवाय भाषेची परिपाठी सुधारणे कठीण होते. तथापि अर्थामध्ये भेद केलेला नाही. प्रत्युत तो विशेषतेने लिहिला आहे. प्रथम छापण्यात कोठे कोठे ज्या चुका राहिल्या होत्या त्या काढून व सुधारून व्यवस्थित केल्या आहेत.

हा ग्रंथ १४ समुल्लासात म्हणजे चौदा विभागात रचलेला आहे. त्यांतील १० समुल्लास पूर्वार्धात असून चार उत्तरार्धात आहेत. परंतु शेवटचे दोन समुल्लास आणि त्यानंतरचे स्वसिद्धांत काही कारणामुळे पहिल्या आवृत्तीत छापू शकलेनव्हते. आता ते सुद्धा छापण्यात आले आहेत.

**(१) पहिल्या समुल्लासात ईश्वराच्या ओंकार आदि नावांची व्याख्या., (२) दुसऱ्या समुल्लासात मुलामुलींचे शिक्षण., (३) तिसऱ्या समुल्लासात ब्रह्मचर्य, पठण-पाठण व्यवस्था, सत्यासत्य ग्रंथांची नांवे आणि शिकण्याची व शिकविण्याची पद्धति., (४) चौथ्या समुल्लासात विवाह व गृहस्थाश्रम याचे आचरण., (५) पाचव्या समुल्लासात वानप्रस्थ व संन्यास आश्रमांचे विधी., (६) सहाव्या समुल्लासात राजधर्म., (७) सातव्या समुल्लासात वेद ईश्वर विषय., (८) आठव्या समुल्लासात जगाची उत्पत्ति, स्थिती व प्रलय., (९) नवव्या समुल्लासात विद्या, अविद्या, बंध व मोक्ष यांची व्याख्या., (१०) दहाव्या समुल्लासात आचार, अनाचार आणि भक्ष्याभक्ष्य विषय., (११) अकराव्या समुल्लासात आर्यावर्त्तीय मतमतांतरांचे खंडन-मंडन विषय., (१२) बाराव्या समुल्लासात चार्वाक, बौद्ध आणि जैन मतांचे विषय., (१३) तेराव्या समुल्लासात ख्रिस्ती मताचा विषय., (१४) चौदाव्या समुल्लासात मुसलमान मताचा विषय.**, आणि चौदा समुल्लासांच्या शेवटी आर्यांच्या सनातन वेदविहित मताची विशेषेकरून व्याख्या लिहिली आहे. जिला मी सुद्धा यथावत मानतो.

हा ग्रंथ लिहिण्याचे माझे मुख्य प्रयोजन सत्य, सत्य अर्थाचा प्रकाश करणे आहे. अर्थात जे सत्य आहे ते सत्य आणि जे मिथ्या आहे ते मिथ्याच म्हणून प्रतिपादन करणे सत्य अर्थाचा प्रकाश समजला आहे. सत्याच्या ठिकाणी असत्य व असत्याच्या ठिकाणी सत्य प्रकाश करणे हे सत्य म्हटले जात नाही परंतु जो पदार्थ जसा आहे त्याला तसा म्हणणे, लिहिणे व मानने सत्य म्हटले जाते. जो माणूस पक्षपाती असतो तो आपले असत्यही सत्य असल्याचे आणि आपल्या विरोधी मत असणाऱ्याचे सत्यही असत्य असल्याचे सिद्ध करण्यासाठी उद्युक्त होतो. म्हणून त्याला सत्याची प्राप्ती होऊ शकत नाही. म्हणूनच उपदेश किंवा लिखाण यांच्याद्वारे सर्व लोकांसमोर सत्यासत्याचे स्वरूप उलगडून दाखविणे हे विद्वान आप्तजनांचे मुख्य कार्य आहे. नंतर लोकांनी स्वतः आपले हिताहित ओळखून सत्यार्थ ग्रहण करावा आणि मिथ्यार्थ सोडून सदा आनंदात राहवे.

मनुष्याचा आत्मा सत्यासत्य जाणणारा आहे. तथापि आपला स्वार्थ, हट्ट, दुराग्रह आणि अज्ञान वगैरे दोषांमुळे तो सत्याला सोडून असत्याकडे वळतो परंतु या ग्रंथात असे काही करण्यात आलेले नाही आणि कुणाचे मन दुखवावे अथवा कुणाचे

बनून दुबळ्यांचे रक्षण करतो त्यालाच माणूस असे म्हणता येते. जो कोणी स्वार्थाने आंधळा बनून इतरांची हानी मात्र करतो तो पशूंचा मोठा भाऊ आहे.

आता आर्यावर्त्त याविषयी मी मुख्यत: अकराव्या समुल्लासापर्यंत लिहिले आहे. या समुल्लासांमध्ये जे सत्यमत मांडलेले आहे ते वेदोक्त असल्यामुळे मला सर्वथा ग्राह्य आहे आणि नवीन पुराणांतील व तंत्रादि ग्रंथातील ज्या गोष्टींचे मी खंडन केले आहे त्या सर्वस्वी त्याज्य आहेत.

बाराव्या समुल्लासात चार्वाकाच्या मताची चर्चा केलेली आहे. सध्या ते मत जवळजवळ अस्ताला गेले आहे. हा चार्वाक बौद्ध व जैन यांच्यापेक्षा अनीश्वरवादाशी अधिक संबद्ध आहे. तो चार्वाक सर्वाहून अधिक नास्तिक आहे. त्याच्या प्रयत्नांना आळा घालणे जरूर आहे. कारण मिथ्या गोष्टींना आळा घातला नाही तर जगात पुष्कळशे अनर्थ माजतील.

चार्वाकाचे जे मत आहे ते बौद्धजैन मतासारखेच आहे ते विवेचन बाराव्या समुल्लासात केले आहे. बौद्ध व जैन यांची मते चार्वाकाच्या मतांशी जुळणारी आहेत. थोडाफार विरोधही आहे. जैनमतही बहुतांशी चार्वाक व बौद्ध मतांशी मिळते-जुळते आहे तरी काही बाबतीत भेदही आहे. त्यामुळे जैनमत ही वेगळी शाखा समजली जाते. त्या मतातील वेगळेपणा बाराव्या समुल्लासात दाखवून दिला आहे. यथायोग्य तेथे समजून घ्यावे. बौद्ध व जैन या पंथांविषयीही लिहिले आहे.

यांपैकी बौद्धांच्या दीपवंशादि प्राचीन ग्रंथांमध्ये बौद्धमताविषयी 'सर्वदर्शनसंग्रह' मध्ये जे काही आले आहे त्याचा उल्लेख आम्ही केला आहे. जैनांचे सिद्धांत सांगणारे ग्रंथ पुढील प्रमाणे आहेत:-

**४ मूलसूत्र :** (१) आवश्यकसूत्र, (२) विशेष आवश्यकसूत्र, (३) दशवैकालिकसूत्र, (४) पाक्षिकसूत्र.

**११ अंगे :** (१)आचारांगसूत्र, (२)सुगडांगसूत्र, (३) थाणांगसूत्र, (४) समवायांगसूत्र, (५) भगवतीसूत्र, (६) ज्ञाताधर्मकथासूत्र, (७) उपासकदशासूत्र, (८) अन्तगडदशासूत्र, (९) अनुत्तरोववाईसूत्र, (१०) विपाकसूत्र, (११) प्रश्नव्याकरणसूत्र.

**१२ उपांगे :** (१) उपवाईसूत्र, (२) रावप्सेनीसूत्र, (३) जीवाभिगमसूत्र, (४) पन्नगणासूत्र, (५) जम्बुद्वीपपन्नतीसूत्र, (६) चन्दपन्नतीसूत्र, (७) सूरपन्नतीसूत्र, (८) निरियावलीसूत्र, (९) कप्पियासूत्र, (१०) कपवडीसयासूत्र, (११) पूप्पियासूत्र, (१२) पुप्पचूलियासूत्र.

**५ कल्पसूत्रे :** (१) उत्तराध्ययनसूत्र, (२) निशीथसूत्र, (३) कल्पसूत्र, (४) व्यवहारसूत्र, (५) जीतकल्पसूत्र.

**६ छेद :** (१) महानिशीथबृहद्वाचनासूत्र, (२) महानिशीथलघुवाचनासूत्र, (३) मध्यमवाचनासूत्र, (४) पिंडनिरुक्तिसूत्र, (५) औघनिरुक्तिसूत्र, (६) पर्य्यूषणासूत्र.

**१० पयन्नसूत्रे :** (१) चतुस्सरणसूत्र, (२) पंचखाणसूत्र, (३) तदुलवैयालिकसूत्र, (४) भक्तिपरिज्ञानसूत्र, (५) महाप्रत्याख्यानसूत्र, (६) चंदाविजयसूत्र, (७) गणीविजयसूत्र, (८) मरणसमाधिसूत्र, (९) देवेन्द्रस्तवनसूत्र व (१०) संसारसूत्र शिवाय नन्दीसूत्र व योगोद्धारसूत्र ही देखील प्रमाणित मानली जातात.

**५ पंचांगे :** (१) पूर्वीच्या सर्व ग्रंथावरील टिका, (२) निरुक्ति, (३) चरणी, (४) भाष्य, हे चार अवयव आणि सर्व मूळ ग्रंथ मिळून पंचांग म्हटले जाते.

(श्वेतांबर जैनांतील) ढुंढिया पंथाचे लोक अवयव मान्य करीत नाहीत. या व्यतिरिक्त इतरही अनेक ग्रंथ जैन लोक मानतात. त्यासंबंधी विशेष मत बाराव्या समुल्लासात पाहावे.

जैनांच्या ग्रंथात पुनरुक्तीचे लाखो दोष आहेत. त्यांचा असाही स्वभाव आहे की आपला जो ग्रंथ इतर पंथांच्या लोकांच्या हातात असेल अथवा छापलेला असेल त्याला काही लोक अप्रमाणित मानतात. त्यांची ही गोष्ट चुकीची आहे.

कारण एखाद्या ग्रंथाला कोणी मान्यता दिली अथवा नाही दिली म्हणून काही तो ग्रंथ जैन मताबाहेर होत नाही . ज्या ग्रंथाला कुणाचीच मान्यता नसेल व कुणाही जैनाने त्याला कधीच मान्यता दिली नसेल असा ग्रंथ अग्राह्य होऊ शकतो. परंतु ज्याला कोणत्याही जैनाची मान्यता प्राप्त झालेली नाही असा एकही ग्रंथ नाही. म्हणून जो कोणी जो ग्रंथ मानीत असेल त्या ग्रंथातील विषयाचे खंडन-मंडन त्याच्यासाठीच आहे असे समजले जाते. परंतु असे अनेक लोक आहेत की जे त्या ग्रंथासंबंधी जाणतात व त्याला मानतात, तरीही सभेत किंवा वाद विवादामध्ये बदलून जातात. यामुळेच जैन लोक आपले ग्रंथ लपवून ठेवतात. ते इतर मताच्या लोकांना देत नाहीत, ऐकवित नाहीत किंवा वाचू देत नाहीत. कारण त्या ग्रंथामध्ये अशा काही असंभव गोष्टी लिहिलेल्या आहेत की त्यांची उत्तरे जैनांना देता येत नाहीत. खोटी गोष्ट सोडून देणे हेच तिचे उत्तर होय.

तेराव्या समुल्लासात ख्रिस्ती लोकांचे मत लिहिले आहे. हे लोक बायबलला आपला धर्मग्रंथ समजतात. त्या संबंधीचे खास विवेचन तेराव्या समुल्लासात पहावे आणि चौदाव्या समुल्लासात मुसलमानांच्या मतासंबंधी लिहिले आहे. हे लोक कुराणाला आपल्या मताचा मूळ ग्रंथ मानतात. त्यांच्याविषयी चौदाव्या समुल्लासात सविस्तर विवेचन पहावे आणि त्यानंतर वैदिक मताविषयी लिहिले आहे.

या ग्रंथकर्त्याच्या तात्पर्याकडे जो कोणी विरुद्ध मनभावनेतून पाहील त्याला काहीच माहिती होणार नाही. कारण वाक्यार्थाच्या बोधात चार कारणे असतात-आकांक्षा, योग्यता, आसत्ति व तात्पर्य. या चारही गोष्टी ध्यानात ठेवून जो कोणी ग्रंथाचे वाचन करतो तेव्हा त्याला ग्रंथाचा अर्थ योग्य प्रकारे कळतो.

**'आकांक्षा' :** कोणत्याही विषयावर वक्ता आणि वाक्यातील पदे यांची आकांक्षा परस्पर संबद्ध असते.

**'योग्यता' :** ती म्हटली जाते की ज्याच्याकडून जे काही होऊ शकते. उदाहरणार्थ, पाण्याने सिंचन करणे.

**'आसत्ति' :** ज्या पदाचा ज्या अन्य पदाशी संबंध असतो त्याला त्या पदाच्या जवळ ठेवून बोलणे अथवा लिहिणे.

**'तात्पर्य' :** ज्या हेतूने वक्ता शब्दोच्चारण करतो अथवा लेखक लेख लिहितो त्या हेतूशी त्याचे वचन अथवा लेखन संबद्ध करणे.

अनेक हट्टी व दुराग्रही लोक वक्त्याच्या अभिप्रायाविरुद्ध कल्पना करतात. विशेषत: एखाद्या विशिष्ट मताचे किंवा पंथाचे लोक असे करतात. कारण एखाद्या मताच्या आग्रहामुळे त्यांची बुद्धी अज्ञानरूपी अंधकारामुळे नष्ट होते. म्हणून ज्याप्रमाणे मी पुराणे, जैनांचे ग्रंथ, बायबल व कुराण यांच्याकडे प्रथमच वाईट नजरेने न पाहता त्यांच्यातील गुणांचे ग्रहण व दोषांचा त्याग करतो आणि इतर मानवांच्या उन्नतीसाठी प्रयत्न करतो त्याप्रमाणे सर्वांनी करणे उचित होय.

या पंथांचे थोडेसेच दोष मी दाखविले आहेत. ते पाहून लोक सत्यासत्य मताचा निर्णय करू शकतील आणि सत्याचा स्वीकार व असत्याचा त्याग करण्यास समर्थ बनतील. कारण मानव जातीला भडकवून, परस्परविरुद्ध मत निर्माण करून एकमेकांना शत्रू बनवून कलह माजवणे ही गोष्ट विद्वानांच्या स्वभावा बाहेर आहे. हा ग्रंथ वाचून अडाणी लोक उलटाच विचार करतील. तथापि बुद्धिमान लोक याचा योग्य तो अभिप्राय समजून घेतील. म्हणून माझे परिश्रम सफल झाले असे मी समजतो; आणि माझे म्हणणे सर्व सज्जनांसमोर मी ठेवतो.

वाचकांनी हा ग्रंथ स्वत: वाचून व इतरांना वाचून दाखवून माझे परिश्रम यशस्वी करावेत. त्याचप्रमाणे पक्षपात न करता सत्यार्थाचा प्रकाश करणे हे माझे व इतर सर्व सूज्ञांचे मुख्य कर्तव्य आहे.

**सर्वात्मा सर्वान्तर्यामी सच्चिदानन्द परमात्मा कृपा करून हा आशय विस्तृत व चिरस्थायी करो.**

॥ अलमतिविस्तरेण बुद्धिमद्वरशिरोमणिषु ॥

॥ इति भूमिका ॥

स्थान : महाराणाजींचे उदयपुर — **(स्वामी) दयानन्द सरस्वती.**

भाद्रपद शुक्ल पक्ष, संवत १९३९.

असे होते. 'यः प्रकृष्टतया चराऽचरस्य जगतो व्यवहारं जानाति स प्रज्ञः, प्रज्ञ एव प्राज्ञः', जो निर्भ्रांत ज्ञानयुक्त सर्व चराचर जगाचे व्यवहार यथावत जाणतो, म्हणून ईश्वराचे नाव 'प्राज्ञ' आहे. इत्यादि नामार्थ मकाराने ग्रहण होतात. या ठिकाणी जसे एका-एका मात्रेने तीन-तीन अर्थ व्यक्त केले आहेत. तसेच अन्य नामार्थही ओंकारापासून जाणले जातात.

**(शन्नो मित्रः शंव.)** या मंत्रात जी मित्रादि नावे आहेत तीही परमेश्वराची आहेत. कारण स्तुति, प्रार्थना, उपासना ही श्रेष्ठाचीच केली जाते. जो गुण, कर्म, स्वभाव आणि सत्य-सत्य व्यवहारांमध्ये सर्वाहून अधिक असतो त्याला श्रेष्ठ असे म्हणतात. त्या सर्व श्रेष्ठांमध्येही जो अत्यंत श्रेष्ठ आहे त्याला परमेश्वर म्हणतात. ज्याची तुलना कशाशीही होत नाही, ना झाली, ना होईल. त्याच्या बरोबरीचाच कोणी नाही तर त्याच्याहून अधिक श्रेष्ठ कोण कसा असणार ? परमेश्वराचे सत्य, न्याय, दया, सर्वसामर्थ्य आणि सर्वज्ञत्व यांसारखे जे अनंत गुण आहेत तसे गुण इतर कोणत्याही जड (अचेतन) पदार्थात अथवा जीवात नाहीत. जो पदार्थ सत्य आहे त्याचे गुण, कर्म, स्वभावही सत्य असतात. म्हणून मनुष्यांनी परमेश्वराचीच स्तुति, प्रार्थना व उपासना करावी हे योग्य होय. याहून वेगळे कधी करू नये. कारण ब्रह्मा, विष्णु, महादेव नावाचे पूर्वज महाशय विद्वान, दैत्य दानवादि निकृष्ट मानव आणि इतर सामान्य माणसे यांनीही परमेश्वरावर श्रद्धा ठेवून त्याचीच स्तुति, प्रार्थना व उपासना केली. त्याच्याशिवाय दुसऱ्याची केली नाही. तसे आपण सर्वांनी करणे योग्य आहे. याची विशेष चर्चा मुक्ति आणि उपासना या विषयात करण्यात येईल.

**(प्रश्न)** मित्रादि नावांवरून सखा आणि इंद्रादि देवांचे प्रसिद्ध व्यवहार पाहिल्यास त्यांचेच ग्रहण केले पाहिजे.

**(उत्तर)** येथे त्यांचे ग्रहण करणे योग्य नाही. कारण जो माणूस कुणा एकाचा मित्र असतो तोच दुसऱ्या कुणाचा शत्रू असतो आणि एखाद्याच्या बाबतीत तो उदासीन असतो, असे दिसून येते. म्हणून मुख्यार्थामध्ये सखा आदींचे ग्रहण होऊ शकत नाही. परंतु परमेश्वर हा साऱ्या जगाचा निश्चित मित्र असतो. तो कुणाचा शत्रू नाही अथवा कुणाच्या बाबतीत तो उदासीनही असत नाही परमेश्वराखेरीज इतर कोणताही जीव अशाप्रकारे असू शकत नाही. म्हणून येथे परमेश्वराचेच ग्रहण होऊ शकते. तरी पण गौण अर्थाने मित्रादि शब्दापासून सुहृदादि मनुष्यांचे ग्रहण होते.

**(ञिमिदा स्नेहने)** या धातूपासून औणादिक 'क्त' प्रत्यय लागून 'मित्र' शब्द बनतो. 'मेद्यति स्निह्यति स्निह्यते वा स मित्रः' जो सर्वांशी स्नेह करतो आणि सर्वांनी प्रेम करण्यास योग्य असतो तो मित्र. म्हणून त्या परमेश्वराचे नाव '**मित्र**' आहे.

**(वृञ् वरणे, वर ईप्सायाम्)** या धातूपासून उणादि 'उनन्' प्रत्यय लागून 'वरुण' शब्द बनतो. **'यः सर्वान् शिष्टान् मुमुक्षून्धर्मात्मनो वृणोत्यथवा यः शिष्टैर्मुमुक्षुभिर्धर्मात्माभिर्व्रियते वर्य्यते वा स वरुणः परमेश्वरः'** जो आप्तयोगी, विद्वान, मुक्तीची इच्छा बाळगणारे व धर्मात्मा यांचेकडून ग्रहण केला जातो. अथवा जो शिष्ट, मुमुक्षु, मुक्त व धर्मात्मा यांच्याकडून ग्रहण केला जातो त्या ईश्वराला 'वरुण' असे म्हणतात. किंवा 'वरुणो नाम वरः श्रेष्ठः' परमेश्वर सर्वात श्रेष्ठ आहे म्हणून त्याचे नाव '**वरुण**' आहे.





## पहिला समुल्लास

# ईश्वर नाम व्याख्या

**ओ३म् शन्नो मित्रः शं वरुणः शन्नो भवत्वर्य्यमा।**
**शन्नऽइन्द्रो बृहस्पतिः शन्नो विष्णुरुरुक्रमः॥**

**नमो ब्रह्मणे नमस्ते वायो त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि। त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ऋतं वदिष्यामि सत्यं वदिष्यामि। तन्मामवतु तद्वक्तारमवतु। अवतु मामवतु वक्तारम्। ओ३म् शान्तिश्शान्तिश्शान्तिः॥१॥** तै. आ. प्रपा. ७। अनु. १

## ईश्वर/ओ३म् ची संक्षिप्त व्याख्या

**अर्थ-(ओ३म्)** हा ओंकार शब्द परमेश्वराचे सर्वोत्तम नाव आहे. कारण यात जे अ, उ आणि म् ही तीन अक्षरे मिळून एक (ओ३म्) समुदाय बनला आहे. या एका नावातून परमेश्वराची अनेक नावे उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, अकारापासून विराट, अग्नि आणि विश्व आदि. उकारापासून हिरण्यगर्भ, वायु आणि तैजस आदि. मकारापासून ईश्वर, आदित्य आणि प्राज्ञ आदि नावाचा वाचक व बोधक आहे. वेदादि सत्य शास्त्रांमध्ये त्याची अशीच स्पष्ट व्याख्या करण्यात आली आहे. त्यावरून प्रकरणानुसार ही सर्व नावे परमेश्वराचीच आहेत.

**(प्रश्न)** परमेश्वराहून भिन्न अर्थांची वाचक विराट आदि नावे का नाहीत? ब्रह्मांड, पृथ्वी आदि भूत, इंद्रादि देवता आणि वैद्यक शास्त्रातील सुंठ वगैरे औषधी वनस्पतींचीही ही नावे आहेत की नाही?

**(उत्तर)** आहेत. परंतु ती परमेश्वराची ही नावे आहेत.

**(प्रश्न)** केवळ देवांचे ग्रहण या नावांनी तुम्ही करता की नाही?

**(उत्तर)** तुम्ही ग्रहण करता याला काय आधार आहे?

**(प्रश्न)** सगळे देव प्रसिद्ध व उत्तमही आहेत म्हणून हे मी मान्य करतो.

**(उत्तर)** परमेश्वर अप्रसिद्ध आणि त्याहूनही उत्तम असा कोणी आहे काय? मग ही नावे परमेश्वराचीही आहेत असे तुम्ही का मानत नाही? परमेश्वर अप्रसिद्ध नाही आणि त्याच्याशी तुलना करता येईल असा कोणीही नाही. तेव्हा त्याच्याहून उत्तम कोणी कसा असू शकेल? म्हणून तुमचे हे विधान बरोबर नाही. कारण तुमच्या या विधानात अनेक दोष आहेत. उदाहरणार्थ, **'उपस्थितं परित्यज्याऽनुपस्थितं**

**याचत इति बाधितन्याय:** एकाने दुसऱ्यासाठी खाण्याचे पदार्थ ठेवून त्याला सांगितले की, ''तुम्ही जेवण करा.'' अशा वेळी ते खाद्यपदार्थ तसेच टाकून ती दुसरी व्यक्ती न मिळालेल्या अन्नासाठी इकडे-तिकडे भटकू लागली तर तिला शहाणा समजू नये. कारण तो जवळ असलेला तयार पदार्थ सोडून अनुपस्थित म्हणजेच अप्राप्त पदार्थाच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करतो. म्हणून जसा तो पुरुष बुद्धिमान नव्हे तसेच हे तुमचे विधान शहाणपणाचे नव्हे. कारण तुम्ही विराट आदि नावांनी प्रसिद्ध व प्रमाणसिद्ध परमेश्वराचा व ब्रह्मांड आदि उपस्थित अर्थांचा त्याग करून असंभव व अनुपस्थित देवादींचे ग्रहण करण्यासाठी श्रम करता. यामध्ये कसलेही प्रमाण किंवा तर्क (औचित्य) नाही. जर तुम्ही असे म्हणाल की, ''जेथे ज्याचा संबंध असेल तेथे तेच ग्रहण करणे योग्य असते.'' उदाहरणार्थ, एकाने दुसऱ्याला सांगितले की, ''हे भृत्य ! त्वं सैन्धवमानय !'' म्हणजे, हे नोकरा ! तू सैंधव घेऊन ये. तेव्हा त्याने काळ वेळ व प्रसंग यांचा विचार केला पाहिजे. कारण सैंधव हे दोन वस्तूंचे नाव आहे. घोडा आणि मीठ या दोघांनाही सैंधव असे नाव आहे. मालकाची बाहेर जाण्याची वेळ असल्यास घोडा आणि जेवणाची वेळ असल्यास मीठ आणणे उचित होय. परंतु बाहेर जाण्याच्या वेळी मीठ आणि जेवणाच्या वेळी नोकर घोडा घेऊन आला तर मालक क्रुद्ध होऊन त्याला म्हणेल, ''तू मूर्ख आहेस. तुला काळ वेळ समजत नाही. तेवढा विवेक तुझ्या ठिकाणी असता तर ज्यावेळी जी वस्तू आणावयास हवी तीच तू आणली असतीस. प्रसंग कोणता आहे, याचा विचार तू करायला हवा होतास. पण तो तू केला नाहीस. म्हणून तू मूर्ख आहेस. तू चालता हो.'' यावरून हेच सिद्ध झाले की जेथे जो अर्थ घेणे योग्य असेल तेथे तोच अर्थ घेतला पाहिजे. आणि सर्वांनी असेच मानले व केलेही पाहिजे.

## ॥ अथ मन्त्रार्थ ॥

**ओं खम्ब्रह्म ॥१॥** यजु. अ. ४०।मं. १७

'ओ३म्' आदि नावे सार्थक आहेत. उदाहरणार्थ (ओं खं.) **'अवतीत्योम् आकाशमिव व्यापकत्वात् खम्, सर्वेभ्यो बृहत्वाद् ब्रह्म'** म्हणजे रक्षण करण्याने (ओम्), आकाशाप्रमाणे व्यापक असल्याने (खम्) आणि सर्वांहून मोठा असल्याने (ब्रह्म) ईश्वराचे नाव आहे. ॥१॥

पहा, वेदांमध्ये खालील प्रकरणांमध्ये 'ओम्' आदि परमेश्वराची नावे आहेत

**ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत ॥२॥** छान्दोग्य उपनिषद् प्र. पा. १। खं. १। मं. १

**(ओमित्ये.)** ओ३म् ज्याचे नाव आहे आणि जो कधी नष्ट होत नाही त्याचीच उपासना करणे उचित होय. इतरांची नाही. ॥२॥

**ओमित्येतदक्षरमिदꣳ सर्वं तस्योपव्याख्यानम् ॥३॥** माण्डूक्य. मं. १.

**(ओमित्येत.)** सर्व वेदादि शास्त्रांमध्ये परमेश्वराचे प्रमुख व स्वत:चे नाव ओ३म् हे असल्याचे सांगितले आहे. इतर सर्व नावे गुणवाचक आहेत. ॥३॥

**सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति ।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ॥४॥**

कठोपनिषद वल्ली २। मं. १५।

(**सर्वे वेदा.**) ज्याअर्थी सर्व वेद, सर्व धर्मानुष्ठानरूप तपश्चरण ज्याचे कथन करतात आणि मान्यता देतात, ज्याच्या प्राप्तीची इच्छा बाळगून ब्रह्मचर्याश्रमाचे पालन करतात त्याचे नाव 'ओम्' आहे. ॥४॥

**प्रशासितारं सर्वेषामणीयांसमणोरपि।**

**रुक्माभं स्वप्नधीगम्यं विद्यात्तं पुरुषं परम् ॥५॥** मनु. अ. १२। श्लो. १२२

(**प्रशासिता.**) जो सर्वांना उपदेश देणारा, सूक्ष्माहून सूक्ष्म, स्वप्रकाश-स्वरूप, समाधिस्थ बुद्धीने जाणण्यास योग्य आहे त्याला परम पुरुष समजले पाहिजे. ॥५॥

**एतमग्निं वदन्त्येके मनुमन्ये प्रजापतिम्।**

**इन्द्रमेके परे प्राणमपरे ब्रह्म शाश्वतम् ॥६॥** मनु. अ. १२। श्लो. १२३

तो स्वप्रकाश असल्याने 'अग्नि', विज्ञानस्वरूप असल्याने 'मनु', सर्वांचे पालन करणारा असल्याने 'प्रजापति', आणि परम ऐश्वर्यवान असल्याने 'इंद्र', सर्वांच्या जीवनाचे जीवन असल्याने 'प्राण' आणि निरंतर व्यापक असल्याने त्या (परमेश्वराचे) नाव '**ब्रह्म**' आहे. ॥६॥

**स ब्रह्मा स विष्णुः स रुद्रस्स शिवस्सोऽक्षरस्स परमः स्वराट्।**

**स इन्द्रस्स कालाग्निस्स चन्द्रमाः ॥७॥** कैवल्य उपनिषद्.

(**स ब्रह्मा स विष्णुः**) परमेश्वर हा संपूर्ण जग निर्माण करणारा असल्याने तो 'ब्रह्मा' आहे, सर्वव्यापी असल्याने 'विष्णु, दुष्टांना शिक्षा करून रडवितो म्हणून 'रुद्र', मंगलमय व सर्वांचे कल्याण करणारा म्हणून 'शिव' आहे. 'यः सर्वमश्नुते न क्षरति न विनश्यति तदक्षरम्.' 'यः स्वयं राजते स स्वराट्.' 'योऽग्निरिव कालः कलयिता प्रलयकर्ता स कालाग्निरीश्वरः'। (अक्षर) जो सर्वत्र व्याप्त, अविनाशी (स्वराट्) स्वतः प्रकाशस्वरूप आणि (कालाग्नि) प्रलयाच्या वेळी सर्वांचा काळ आणि काळाचाही काळ आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **कालाग्नी** असे आहे. ॥७॥

**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यस्स सुपर्णो गरुत्मान।**

**एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥८॥** ऋ. मं. १। सू. १६४। मं. ४६

(**इन्द्रं मित्रं.**) जो एक अद्वितीय सत्यब्रह्म वस्तु आहे त्याचीच इंद्रादि सर्व नावे आहेत. 'द्युषु शुद्धेषु पदार्थेषु भवो दिव्यः', 'शोभनानि पर्णानि पालनानि पूर्णानि कर्माणि वा यस्य सः', 'यो गुर्वात्मा स गरुत्मान्' 'यो मातारिश्वा वायुरिव बलवान् स मातरिश्वा', (दिव्य) जो प्रकृत्यादि दिव्य पदार्थांमध्ये व्याप्त (सुपर्ण) आहे, जो उत्तम पालन करतो आणि ज्याची कर्मे पूर्ण आहेत, (गरुत्मान), ज्याचा आत्मा अर्थात स्वरूप महान आहे, जो मातरिश्वा वायूसारखा अनंत बलवान आहे. म्हणून परमेश्वराला दिव्य, सुपर्ण, गरुत्मान आणि मातरिश्वा ही नावे आहेत. इतर नावांचे अर्थ पुढे सांगणार आहोत. ॥८॥

**भूरसि भूमिरस्यदितिरसि विश्वधाया विश्वस्य भुवनस्य धर्त्री।**

**पृथिवीं यच्छ पृथिवीं दृ ँ ह पृथिवीं मा हिं ँ सीः ॥९॥** यजु. अ. १३। मं. १८

(**भूमिरसि.**) 'भवन्ति भूतानि यस्यां सा भूमिः' जिच्यामध्ये सर्व प्राणिमात्र राहतात. म्हणून ईश्वराचे नाव '**भूमि**' असे आहे. इतर नावांचे अर्थ नंतर सांगणार आहोत. ॥९॥

**इन्द्रो मह्ना रोदसी पप्रथच्छव इन्द्रः सूर्य्यमरोचयत् ।**
**इन्द्रे ह विश्वा भुवनानि येमिर इन्द्रे स्वानास इन्दवः ॥१०॥**

साम. उत्तरार्चिक प्रपा. ७। तृतीयार्ध त्रिक ८। मं. २

**(इन्द्रो मह्न.)** या मंत्रात इंद्र हे परमेश्वराचेच नाव आहे. म्हणून हे प्रमाण उद्‌धृत केले आहे. ॥१०॥

**प्राणाय नमो यस्य सर्वमिदं वशे ।**
**यो भूतः सर्वस्येश्वरो यस्मिन्त्सर्वं प्रतिष्ठितम् ॥११॥** अथर्व. कां. ११। सू. ४। मं. १

**(प्राणाय)** ज्या प्रमाणे प्राणाच्या स्वाधीन सर्व शरीर व इंद्रिये असतात त्या प्रमाणे सारे जग परमेश्वराच्या स्वाधीन असते. ॥११॥

इत्यादि प्रमाणांचे (पुराव्यांचे) अचूक अर्थ जाणून घेतल्याने या नावांद्वारे परमेश्वराचेच ग्रहण होते. कारण ओ३म् आणि अग्नि नावांच्या मुख्य अर्थाने परमेश्वराचेच ग्रहण होते. ज्याप्रमाणे व्याकरण, निरुक्त, ब्राह्मण, सूत्र इत्यादी ऋषीमुनींनी जे विवरण केले आहे त्यांमध्ये परमेश्वराचेच ग्रहण केलेले दिसते त्याप्रमाणे सर्वांनी ग्रहण करणे योग्य आहे. परंतु 'ओ३म्' हे केवळ परमेश्वराचेच नाव आहे. अग्निआदि नावांनी परमेश्वराचे ग्रहण करण्यामध्ये प्रकरण (वर्णन) व विशेषणही नियमकारक आहेत. यावरून हे सिद्ध झाले की, जेथे-जेथे स्तुति, प्रार्थना, उपासना, सर्वज्ञ, व्यापक, शुद्ध, सनातन व सृष्टिकर्ता आदि विशेषणे आली आहेत तेथे-तेथे या नावांनी परमेश्वराचे ग्रहण होते. आणि जेथे-जेथे अशी वर्णने येतात की,

**ततो विराडजायत विराजो अधि पूरुषः ॥१॥** यजु. अ. ३१। मं. ५

**श्रोत्राद्वायुश्च प्राणश्च मुखादग्निरजायत ॥२॥** यजु. अ. ३१। मं. १२

**तेन देवा अयजन्त ॥** यजु. अ. ३१। मं. ९

**पश्चाद्भूमिमथो पुरः ।** यजु. अ. ३१। मं. ५

**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधिभ्योऽन्नम् । अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः । स वा एष पुरुषोऽन्नरसमयः ॥**

हे वचन तैत्तिरीय उपनिषदातील आहे.

अशा प्रमाणांमध्ये विराट, पुरुष, देव, आकाश, वायु, अग्नि, जल, भूमि इत्यादि नावे लौकिक पदार्थांची असतात. कारण जेथे-जेथे उत्पत्ति, स्थिती, प्रलय, अल्पज्ञ, जड (अचेतन) दृश्य इत्यादि विशेषणेसुद्धा लिहिलेली असतील तेथे-तेथे परमेश्वराचे ग्रहण होत नाही. तो उत्पत्ती वगैरे व्यवहारांपासून वेगळा आहे आणि वरील मंत्रांमध्ये उत्पत्ती वगैरे गोष्टी आहेत म्हणून येथे विराट आदि नावांनी परमेश्वराचे ग्रहण न होता लौकिक पदार्थांचे ग्रहण होतो. परंतु जेथे-जेथे सर्वज्ञ आदि विशेषणे असतील तेथे-तेथे परमेश्वराचे आणि जेथे-जेथे इच्छा, द्वेष, प्रयत्न, सुख, दुःख आणि अल्पज्ञ आदि विशेषणे असतील तेथे-तेथे जीवाचे ग्रहण होते, असे सर्वत्र समजावे. कारण परमेश्वराचा जन्म अथवा मृत्यू कधी होत नसतो. म्हणून विराट आदि नावांनी त्याचे आणि जन्म वगैरे विशेषणांनी जगतातील जड इत्यादि पदार्थांचे ग्रहण करणे उचित होय, परमेश्वराचे नव्हे. आता ज्या प्रकारे विराट आदि नावांनी परमेश्वराचे ग्रहण होते तो प्रकार खाली लिहिल्याप्रमाणे समजून घ्यावा.

## ।। ओंकाराचा अर्थ ।।

**(वि)** उपसर्गपूर्वक **( राजृ दीप्तौ )** या धातुला क्विप् प्रत्यय लावल्याने 'विराट' शब्द बनतो. 'यो विविधं नाम चराऽचरं जगद्राजयति प्रकाशयति स विराट.' विविध म्हणजे जो अनेक प्रकारच्या जगाची निर्मिती करतो तो विराट. म्हणून **'विराट'** या नावाने परमेश्वराचे गहण होते.

**(अञ्चु गतिपूजनयो:)** (अग, अगि, इण् गत्यर्थक) धातु आहेत. त्यांच्यापासून 'अग्नि' हा शब्द तयार होतो. 'गतेस्त्रयोऽर्था: ज्ञानं गमनं प्राप्तिश्चेति, पूजनं नाम सत्कार:।' 'योऽञ्चति अच्यतेऽगत्यङ्गत्येति सोऽयमग्नि:' जो ज्ञानस्वरूप, सर्वज्ञ, जाणण्यास, प्राप्त होण्यास व पूजा करण्यास योग्य आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव 'अग्नी' आहे.

**(विश प्रवेशने)** या धातूपासून **'विश्व'** शब्द बनतो. 'विशन्ति प्रविष्टानि सर्वाण्याकाशादीनि भूतानि यस्मिन् । यो वाऽऽकाशादिषु सर्वेषु भूतेषु प्रविष्ट: स विश्व ईश्वर:' ज्यामध्ये आकाशादि सर्व भूते प्रवेश करीत आहेत अथवा जो यांमध्ये व्याप्त होऊन प्रविष्ट होत आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'विश्व'** आहे. इत्यादि नावांचे ग्रहण अकारमात्राने होते.

**'ज्योतिर्वै हिरण्यम्** (शत. ६।७।१।२); **तेजो वै हिरण्यम्** *(तै. ब्रा. ८।१।६।१)*; **इत्यैतरेय शतपथब्राह्मणे'** 'यो हिरण्यानां सूर्यादीनां तेजसां गर्भ उत्पत्तिनिमित्तमधिकरणं स हिरण्यगर्भ:' ज्यामध्ये सूर्यादि तेजस्वी लोक उत्पन्न होऊन ज्याच्या आधारे राहतात अथवा जो सूर्यादि तेज:स्वरूप पदार्थांचा गर्भ अर्थात नाव उत्पत्तिस्थान व निवासस्थान आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'हिरण्यगर्भ'** आहे. याला यजुर्वेदाच्या मंत्राचा आधार आहे :-

**हिरण्यगर्भ: समवर्त्तताग्रे भूतस्य जात: पतिरेक आसीत् ।**
**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ।।** यजु. अ. १३। मं. ४

इत्यादि ठिकाणी 'हिरण्यगर्भ' शब्दाने परमेश्वराचे ग्रहण केले जाते.

**(वा गतिगन्धनयो:)** या धातूपासून 'वायु' शब्द बनतो. (गन्धनं हिंसनम्) 'यो वाति चराऽचरज्जगद्धरति बलिनां बलिष्ठ: स वायु:' जो चराचर जगाचे धारण, जीवन आणि प्रलय करतो आणि सर्व बलवानांहून बलवान आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'वायु'** आहे.

**(तिज निशाने)** या धातूपासून 'तेज:' शब्द बनतो व त्याचे तद्धित केल्याने 'तैजस' शब्द तयार होतो. जो स्वत: स्वयंप्रकाश आणि सूर्यादि तेजस्वी लोकांना प्रकाशमान करणारा आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'तैजस'** आहे. इत्यादि नामार्थ उकारमात्रापासून ग्रहण होतात.

**(ईश ऐश्वर्ये)** या धातूपासून 'ईश्वर' शब्द तयार होतो. 'य ईष्टे सर्वैश्वर्यवान् वर्त्तते स ईश्वर:' ज्याचे सत्य विचार, शील, ज्ञान व अनंत ऐश्वर्य आहे. यामुळे त्या परमेश्वराचे नाव **'ईश्वर'** आहे.

**(दो अवखण्डने)** या धातूपासून 'अदिति' आणि त्याचे तद्धित केल्यावर 'आदित्य' शब्द तयार होतो. 'न विद्यते विनाशो यस्य सोऽयमदिति:, अदितिरेव आदित्य:, अवखंडनं नाम विनाश:' ज्याचा विनाश कधीही होत नाही त्याच ईश्वराला **'आदित्य'** असे म्हणतात.

**(ज्ञा अवबोधने)** या धातूच्या आधी 'प्र' लावल्याने 'प्रज्ञ' शब्द बनतो. त्याचे तद्धित रूप 'प्राज्ञ'

**(ऋ गतिप्रापणयोः)** या धातूपासून 'यत्' प्रत्यय लागून 'अर्य्य' शब्द तयार होतो. आणि 'अर्य्य' पूर्वक (माङ्माने) या धातूला 'कनिन्' प्रत्यय लागून 'अर्य्यमा' शब्द तयार होतो. 'योऽर्य्यान् स्वामिनो न्यायाधीशान् मिमीते मान्यान् करोति सोऽर्यमा.' जो सत्य न्याय करणाऱ्या मनुष्यांना स्विकारार्ह वाटतो आणि पाप व पुण्य करणाऱ्यांना पापाची व पुण्याची फळे यथावत देणारा सत्य-सत्य नियमकर्ता आहे. म्हणूनच त्या परमेश्वराचे नाव **'अर्यमा'** आहे.

**(इदि परमैश्वर्ये)** या धातूला 'रन्' प्रत्यय लागून 'इन्द्र' शब्द तयार होतो. 'य इन्दति परमैश्वर्यवान् भवति स इन्द्रः परमेश्वर' जो अखिल ऐश्वर्ययुक्त आहे. म्हणून त्याचे नाव **'इन्द्र'** आहे.

'बृहत्' शब्दपूर्वक **(पा रक्षणे)** या धातूपासून 'डति' प्रत्यय लागून, बृहत् मधील तकाराचा लोप व सुडागम होऊन 'बृहस्पति' शब्द बनतो. 'यो बृहतामाकाशादीनां पतिः स्वामी पालयिता स बृहस्पतिः'. जो मोठ्याहून मोठा आणि मोठ्या आकाशादि ब्रह्मांडांचा स्वामी आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'बृहस्पति'** आहे.

**(विष्लृ व्याप्तौ)** या धातूला 'नु' प्रत्यय लागून 'विष्णु' शब्द बनला आहे. **'वेवेष्टि व्याप्नोति चराऽचरं जगत् स विष्णुः'**. परमात्मा चर आणि अचर जगाला व्यापून राहिल्यामुळे परमेश्वराचे नाव **'विष्णु'** आहे.

'उरुर्महान् क्रमः पराक्रमो यस्य स उरुक्रमः' अनंत पराक्रमयुक्त असल्याने परमेश्वराचे नाव 'उरुक्रम' आहे. जो परमेश्वर **(उरुक्रमः)** महापराक्रमयुक्त (मित्रः) सर्वांचा सुहृद अविरोधी आहे तो (शम्) सुखकारक, तो (वरुणः) सर्वोत्तम (शम्) सुखस्वरूप तो (अर्यमा) न्यायाधीश, तो (शम्) सुखप्रचारक, तो (इन्द्रः) (शम्) सकल ऐश्वर्यदायक, तो (बृहस्पतिः) सर्वांचा अधिष्ठाता (शम्) विद्याप्रद आणि (विष्णुः) जो सर्वांमध्ये व्यापक परमेश्वर आहे, तो (नः) आमचा कल्याणकर्ता (भवतु) होवो.

**(वायो ते ब्रह्मणे नमोऽस्तु) (बृह बृहि वृद्धौ)** या धातूंपासून **'ब्रह्म'** शब्द बनला आहे. जो सर्वांवर विराजमान आहे, सर्वांहून मोठा, अनंत बलयुक्त परमात्मा आहे त्या ब्रह्माला आम्ही नमस्कार करतो. हे परमेश्वरा ! **(त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि)** तूच अंतर्यामी रूपाने प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. **(त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि)** मी तुम्हालाच प्रत्यक्ष ब्रह्म म्हणेन कारण तुम्ही सर्वत्र व्याप्त असून सर्वांना नेहमीच प्राप्त असता. **(ऋतं वदिष्यामि)** तुमची जी वेदस्थ यथार्थ आज्ञा आहे तिचाच मी सर्वांना उपदेश करीन व आचरणही करीन. **(सत्यं वदिष्यामि)** मी सत्य बोलेन, सत्य मानीन व सत्यच करीन. **(तन्मामवतु)** म्हणून तुम्ही माझे रक्षण करावे. **(तद्वक्तारमवतु)** म्हणून आप्तनिष्ठ **(आप्त)** व सत्यवक्ता असणाऱ्या माझे तुम्ही रक्षण करावे. ज्यायोगे तुमच्या आज्ञेमध्ये माझी बुद्धि स्थिर होऊन त्या विरुद्ध कधी न होवो. कारण जी तुमची आज्ञा आहे तोच धर्म आहे आणि तिच्या विरुद्ध जे आहे तोच अधर्म आहे. **'अवतु मामवतु वक्तारम्'** हा दुसऱ्यांदा आलेला पाठ अधिक अर्थ देण्यासाठी आहे. उदाहरणार्थ, 'कश्चित् कश्चित् प्रति वदति त्वं ग्रामं गच्छ गच्छ' या वाक्यात क्रियेचा उच्चार दोनदा केल्याने तू लौकर गावाला जा असे स्पष्ट होते. त्याचप्रमाणे येथेही आहे. तुम्ही माझे अवश्य रक्षण करा. अर्थात् मी सुनिश्चितपणे धार्मिकतेत वागावे व नेहमी अधर्माचा तिरस्कार करावा, अशी कृपा तुम्ही माझ्यावर करावी. मी तुमचे खूप उपकार मानीन.

**(ओ३म् शान्तिः शान्तिः शान्तिः)** येथे तीनदा शांतीपाठ केला आहे. त्याचे प्रयोजन असे की ताप त्रिविध आहेत. म्हणजे या जगात तीन प्रकारची दुःखे आहेत :- (१) 'आध्यात्मिक' आत्मा व शरीरातील अविद्या, प्रीति, द्वेष, मूर्खता आणि ज्वर, पीडा इत्यादि आध्यात्मिक दुःखे होत. दुसरे 'आधिभौतिक' जे शत्रु, व्याघ्र, सर्प वगैरे द्वारे मिळते. तिसरे 'आधिदैविक' म्हणजे अतिवृष्टी, कडाक्याची थंडी व भयंकर उन्हाळा आणि मनाची व इंद्रियांची अशांती यांमुळे होणारी दुःखे. या तीन प्रकारच्या क्लेशांपासून तुम्ही आम्हाला दूर ठेवत; आणि नेहमी कल्याणकारक कामांमध्ये प्रवृत्त करावे. कारण तुम्हीच कल्याणस्वरूप, साऱ्या जगाचे कल्याण करणारे आणि धार्मिक मुमुक्षूंना कल्याण प्रदान करणारे आहात. म्हणून तुम्ही स्वतः आपल्या करुणेने सर्व जीवांच्या हृदयात प्रकाशित व्हा. ज्यायोगे सर्व जीव धर्माचे आचरण करतील, अधर्माचा त्याग करून, परमानंदाला प्राप्त होतील आणि दुःखांपासून दूर राहतील.

**'सूर्य्य आत्मा जगतस्तस्थुषश्च'.** यजु. अ. ७ । मं. ४२

यजुर्वेदातील या वचनावरून जगत म्हणजे जे प्राणी चेतन व जंगम (म्हणजे चालणारे-फिरणारे) आहेत आणि 'तस्थुषः' जे अप्राणी म्हणजे स्थावर, जड अर्थात पृथ्वी आदि आहेत त्या सर्वांचा आत्मा असल्याने सर्वांना प्रकाश देतो म्हणून त्याचे नाव **'सूर्य'** आहे.

**(अत सातत्यगमने)** या धातूपासून 'आत्मा' शब्द बनतो. 'योऽतति व्याप्नोति स आत्मा' जो सर्व जीवादि जगतामध्ये निरंतर व्यापक होत आहे. 'परश्चासावात्मा च य आत्मेभ्यो जीवेभ्यः सूक्ष्मेभ्यः परोऽतिसूक्ष्मः स परमात्मा'. जो सर्व जीवांहून उत्कृष्ट आणि जीव, प्रकृति तसेच आकाश यांच्याहूनही अतिसूक्ष्म, तसेच सर्व जीवांचा अंतर्यामी आत्मा आहे. म्हणून ईश्वराचे नाव **'परमात्मा'** आहे.

सामर्थ्यवानाचे नाव ईश्वर आहे. 'य ईश्वरेषु समर्थेषु परमः श्रेष्ठः स परमेश्वरः' जो ईश्वरांमध्ये म्हणजे समर्थांमध्ये समर्थ आहे, ज्याच्या समान कोणीही नाही त्याचे नाव **'परमेश्वर'** आहे.

**(षुञ् अभिषवे, षूङ् प्राणिगर्भविमोचने)** या धातूपासून 'सविता' शब्द बनतो. 'अभिषवः प्राणिगर्भविमोचनं चोत्पादनम्। यश्चराचरं जगत् सुनोति सूते वोत्पादयति स सविता परमेश्वरः' जो साऱ्या जगाची उत्पत्ती करतो. म्हणून परमेश्वराचे नाव **'सविता'** आहे.

**(दिवु क्रीडाविजिगीषाव्यवहारद्युतिस्तुतिमोदमदस्वप्नकान्तिगतिषु)** या धातूपासून 'देव' शब्द बनतो. (क्रीडा) जो शुद्ध सर्व जगताला क्रीडा करविण्याच्या (विजिगीषा) धार्मिकांचा विजय व्हावा असे इच्छिणारा (व्यवहार) सर्व व्यवहारांची साधने-उपसाधने देणारा आहे, (द्युति) स्वयंप्रकाशस्वरूप, सर्वांचा प्रकाशक, (स्तुति) प्रशंसेस योग्य, (मोद) स्वतः आनंदस्वरूप व इतरांना आनंद देणारा, (मद) मदोन्मत्तांना ताडना करणारा, (स्वप्न) सर्वांच्या निद्रेसाठी रात्र व प्रलय निर्माण करणारा (कान्ति) कामना करण्यास योग्य, आणि (गति) ज्ञानस्वरूप आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव 'देव' आहे. अथवा 'यो दीव्यति क्रीडति स देवः' जो आपल्या स्वरूपात आनंदाने स्वतःच क्रीडा करतो किंवा कुणाच्याही साह्याशिवाय क्रीडावत् सहज स्वभावाने साऱ्या जगाची निर्मिती करतो, अथवा सर्व क्रीडांचा आधार आहे. 'विजिगीषते स देवः'. जो सर्वांना जिंकणारा, स्वतः अजय म्हणजे ज्याला कोणीही जिंकू शकत नाही असा आहे. 'व्यवहारयति स देवः'. जो न्याय व अन्यायरूपी व्यवहार जाणणारा व उपदेशक आहे. 'यश्चराचरं जगत् द्योतयति'. जो सर्वांचा

प्रकाशक आहे. 'यः स्तूयते स देवः' जो सर्व मनुष्यांकडून प्रशंसा करण्यास योग्य आहे व निंदा करण्यास योग्य नाही, 'यो मोदयति स देवः'. जो स्वतः आनंद स्वरूप आहे, इतरांना आनंद देतो आणि ज्याला लेशमात्रही दुःख नाही. 'यो माद्यति स देवः' जो सदा हर्षित, शोकरहित आणि इतरांना आनंदित करणारा व दुःखांपासून दूर ठेवणारा आहे. 'यः स्वापयति स देवः' जो प्रलयाच्या वेळी अव्यक्तामध्ये सर्व जीवांना झोपवितो. 'यः कामयते काम्यते वा स देवः'. ज्याची सर्व कामे सत्य असतात आणि ज्याच्या प्राप्तीची कामना सर्व सभ्य लोक करतात. तसेच 'यो गच्छति गम्यते वा स देवः'. जो सर्वांमध्ये व्याप्त व जाणण्यास योग्य आहे. यामुळे त्या परमेश्वराचे नाव **'देव'** आहे.

**(कुबि आच्छादने)** या धातूपासून 'कुबेर' शब्द बनतो. 'यः सर्वं कुंबति स्वव्याप्त्याच्छादयति स कुबेरो जगदीश्वरः' जो आपल्या व्यापकतेने सर्वांना व्यापतो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'कुबेर'** आहे.

**(पृथु विस्तारे)** या धातूपासून 'पृथिवी' (पृथ्वी) शब्द बनतो. 'य पर्थति सर्वं जगद्विस्तृणाति तस्मात् स पृथिवी'. जो सर्व विस्तृत जगाचा विस्तार करणारा आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'पृथिवी'** आहे.

**(जल घातने)** या धातूपासून 'जल' शब्द तयार होतो. 'जलति घातयति दुष्टान् संघातयति-अव्यक्तपरमाण्वादिन् तद् ब्रह्म जलम्'. जो दुष्टांना दंड देतो आणि अव्यक्त व परमाणू यांचा एकमेकांशी संयोग अथवा वियोग करतो त्या परमेश्वराला **'जल'** असे म्हणतात.

**(काशृ दीप्तौ)** या धातूपासून 'आकाश' शब्द बनतो. 'यः सर्वतः सर्वं जगत् प्रकाशयति स आकाशः' जो सर्व बाजूंनी जगाचा प्रकाशक आहे म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'आकाश'** आहे.

**(अद् भक्षणे)** या धातूपासून **'अन्न'** शब्द तयार होतो.

**अद्यतेऽत्ति च भूतानि तस्मादन्नं तदुच्यते ।** तै. उ. २/२

**अहमन्नमहमन्नमहमन्नम् ।**

**अहमन्नादोऽहमन्नादोहमन्नादः ॥** तैत्ति. उपनि. ३/१०

**अत्ता चराऽचरग्रहणात् ॥** वे.सू. १/२/९

हे व्यासमुनिकृत शारीरिक सूत्र आहे. जो सर्वांना स्वतःमध्ये ठेवण्यास, सर्वांना ग्रहण करण्यास योग्य चराचर जगाचे ग्रहण करणारा आहे. यावरून ईश्वराला 'अन्न', 'अन्नाद' आणि 'अत्ता' ही नावे आहेत. यामध्ये एक पाठ जो तीनदा आलेला आहे. तो आदर व्यक्त करण्यासाठी आहे. ज्याप्रमाणे उंबर फळात उत्पन्न होणारे किडे त्यातच राहतात व नष्ट होतात, त्याप्रमाणे परमेश्वरामध्ये सर्व जगाची अवस्था असते.

**(वस निवासे)** या धातूला 'वसु' शब्द बनला आहे. 'वसन्ति भूतानि यस्मिन्नथवा यः सर्वेषु भूतेषु वसति स वसुरीश्वरः'. ज्याच्यामध्ये सर्व आकाशादि भूते वसतात आणि जो सर्वांमध्ये वास करीत आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'वसु'** आहे.

**(रुदिर् अश्रु विमोचने)** या धातूला 'णिच्' प्रत्यय लागून 'रुद्र' शब्द तयार होतो. 'यो रोदयत्य-न्यायकारिणो जनान् स रुद्रः'. जो दुष्ट कृत्ये करणाऱ्यांना रडवितो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'रुद्र'** आहे.

**यन्मनसा ध्यायति तद्वाचा वदति, यद्वाचा वदति, तत् कर्मणा करोति, यत् कर्मणा करोति तदभिसम्पद्यते ॥**

हे यजुर्वेदाच्या ब्राह्मण ग्रंथाचे वचन आहे. जीव ज्याचे मनाने ध्यान करतो ते वाणीने बोलतो, जे वाणीने बोलतो ते कृतीने करतो, जे कृतीने करतो तेच त्याला प्राप्त होते. यावरून असे सिद्ध झाले की जीव जसे कर्म करतो तसेच फळ त्याला मिळते. जेव्हा दुष्ट कर्म करणारे जीव ईश्वराच्या न्यायरूपी व्यवस्थेमुळे दुःखरूपी फळ मिळवतात तेव्हा रडतात. याच प्रकारे ईश्वर त्यांना रडवितो. म्हणून ईश्वराचे नाव **'रुद्र'** आहे.

**आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ।**

**ता यदस्यायनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥** मनु. अ. १। श्लो. १०

जल आणि जीव यांचे नाव नारा आहे. ती ज्याची निवासस्थाने आहेत, म्हणून सर्व जीवांमध्ये व्यापक असलेल्या परमेश्वराला **'नारायण'** म्हणतात.

**(चदि आल्हादे)** या धातूपासून 'चन्द्र' शब्द बनतो. 'यश्चन्दति चन्दयति वा स चन्द्रः'. जो आनंदस्वरूप व सर्वांना आनंद देणारा आहे. म्हणून ईश्वराचे नाव **'चन्द्र'** आहे.

**(मगि गत्यर्थक)** या धातूपासून 'मङ्गेरलच्' या सूत्राने 'मंगल' शब्द तयार होतो. 'यो मङ्गति मङ्गयति वा स मङ्गलः'. जो स्वतः मंगलस्वरूप आणि सर्व जीवांच्या मंगलाचे कारण आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'मंगल'** आहे.

**(बुध अवगमने)** या धातूपासून 'बुध' शब्द बनतो. 'यो बुध्यते बोधयति वा स बुधः' जो स्वतः बोधस्वरूप व सर्व जीवांच्या बोधाचे कारण आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'बुध'** आहे.

'बृहस्पति' शब्दाचा अर्थ यापूर्वी सांगितला आहे.

**(ईशुचिर् पूतीभावे)** या धातूपासून 'शुक्र' शब्द बनला आहे. 'यः शुच्यति शोचयति वा स शुक्रः'. जो अत्यंत पवित्र आहे आणि ज्याच्या संगाने जीवसुद्धा पवित्र होतो. म्हणून ईश्वराचे नाव **'शुक्र'** आहे.

**(चर गतिभक्षणयोः)** या धातूपासून 'शनैस्' अव्यय उपपद लावल्याने 'शनैश्चर' शब्द बनला आहे. 'यः शनैश्चरति स शनैश्चरः'. जो सर्वांमध्ये सहज प्राप्त, धैर्यवान् आहे. म्हणनू त्या परमेश्वराचे नाव **'शनैश्चर'** आहे.

**(रह त्यागे)** या धातूपासून 'राहु' शब्द बनतो. 'यो रहति परित्यजति दुष्टान् राहयति त्याजयति स राहुरीश्वरः'. जो एकांतस्वरूप आहे ज्याच्या स्वरूपात दुसरा पदार्थ मिसळलेला नाही, जो दुष्टांना सोडणारा व इतरांना सोडविणारा आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **'राहु'** आहे.

**(कित निवासे रोगापनयने च)** या धातूपासून 'केतु' शब्द बनतो. 'य केतयति चिकित्सति वा स केतुरीश्वरः'. जो सर्व जगाचे निवासस्थान आहे, सर्व रोगांपासून रहित आहे आणि मुमुक्षूंना मुक्तीच्या वेळी सर्व रोगांपासून सोडवितो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'केतु'** आहे.

**(यज देवपूजासङ्गतिकरणदानेषु)** या धातूपासून 'यज्ञ' शब्द बनतो. **'यज्ञो वै विष्णुः'**. हे ब्राह्मण ग्रंथातील वचन आहे. 'यो यजति विद्वद्भिरिज्यते वा स यज्ञः'. जो सर्व जगातील पदार्थांना जोडतो, सर्व विद्वानांना पूज्य आहे आणि ब्रह्मापासून सर्व ऋषिमुनींना पूज्य होता, आहे व असेल. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'यज्ञ'** आहे. कारण तो सर्वत्र व्यापक आहे.

**(हु दानाऽऽदनयोः, आदाने चेत्येके)** या धातूपासून 'होता' शब्द बनला आहे. 'यो

जुहोति स होता'. जो जीवांना देण्यास योग्य पदार्थांचा दाता आणि ग्रहण करण्यास योग्य पदार्थांचा ग्राहक आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'होता'** आहे.

**(बन्ध बन्धने)** यावरून 'बन्धु' शब्द बनतो. 'यः स्वस्मिन् चराचरं जगद् बध्नाति बन्धुवद्धर्मात्मनां सुखाय सहायो वा वर्तते स बन्धुः'. ज्याने स्वतःमध्ये सर्व लोकलोकांतरांना नियमांनी बद्ध करून ठेवले आहे व जो भावाप्रमाणे सहायक आहे म्हणूनच ते आपापल्या परिधीचे अथवा नियमाचे उल्लंघन करू शकत नाही. ज्याप्रमाणे भाऊ भावांना साह्य करतो त्याप्रमाणे परमेश्वरही पृथ्वी आदि लोकांचे धारण, रक्षण आणि सुख देणारा म्हणून त्याला **'बंधू'** म्हणतात.

**(पा रक्षणे)** या धातूपासून 'पिता' शब्द बनला आहे. 'यः पाति सर्वान् स पिता'. जो सर्वांचे रक्षण करतो, ज्या प्रमाणे बाप आपल्या संतानांवर नेहमी कृपा करून त्यांची उन्नति इच्छितो. त्याच प्रमाणे परमेश्वर सर्व जीवांची उन्नती इच्छितो. म्हणून त्याचे नाव **'पिता'** आहे.

'यः पितृणां पिता स पितामहः'. जो पित्यांचाही पिता आहे. म्हणूनं त्या परमेश्वराचे नाव 'पितामहः' **(आजोबा)** आहे.

'यः पितामहानां पिता स प्रपितामहः'. जो पित्यांच्या पितरांचा पिता आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **'प्रपितामह'** (पणजोबा) आहे. माङ्माने शब्दे च - यावरून माता शब्द सिद्ध होतो.

'यो मिमीते मानयति सर्वाञ्जीवान् स माता'. ज्याप्रमाणे पूर्णकृपायुक्त जननी आपल्या संतानांचे सुख व उन्नती इच्छिते त्याप्रमाणे परमेश्वरही सर्व जीवांची उन्नती इच्छितो. म्हणून परमेश्वराचे नाव **'माता'** आहे.

**(चर गतिभक्षणयोः)** आङ्पूर्वक या धातूपासून 'आचार्य्य' शब्द बनतो. 'य आचारं ग्राहयति, सर्वा विद्या बोधयति स आचार्य ईश्वरः'. जो सत्य आचाराचा ग्रहण करणारा आणि सर्व विद्यांच्या प्राप्तीचा हेतू बनून सर्व विद्या मिळवून देतो. म्हणून परमेश्वराचे नाव **'आचार्य'** आहे.

**(गृ शब्दे)** या धातूपासून 'गुरू' शब्द बनला आहे. 'यो धर्म्यान् शब्दान् गृणात्युपदिशति स गुरुः'. **'स पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्॥'** (योग. सू. १/२६) जो सत्यधर्मप्रतिपादक, सकल विद्यायुक्त, वेदांचा उपदेशक, सृष्टीच्या प्रारंभी अग्नि, वायु, आदित्य, अंगिरा आणि ब्रह्मादि गुरूचांही गुरू आहे व ज्याचा नाश कधी होत नाही. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'गुरू'** आहे.

**(अज गतिक्षेपणयोः, जनी प्रादुर्भावे)** या धातूंपासून 'अज' शब्द बनतो. 'योऽजति सृष्टिं प्रति सर्वान् प्रकृत्यादीन् पदार्थान् प्रक्षिपति जनयति, कदाचिन्न जायते सोऽजः'. जो सर्व प्रकृतीचे अवयव आकाशादि भूत परमाणूंचे यथायोग्य मिश्रण करतो, शरीराशी जीवांचा संबंध जोडून जन्म देतो. पण स्वतः मात्र कधी जन्म घेत नाही. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'अज'** आहे.

**(बृह बृहि वृद्धौ)** या धातूंपासून 'ब्रह्मा' शब्द तयार होतो. 'योऽखिलं जगन्निर्माणेन बर्हति वर्द्धयति स ब्रह्मा'. जो संपूर्ण जगाला रचून वाढवितो. म्हणून परमेश्वराचे नाव **'ब्रह्मा'** आहे.

**'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मं'**. (तै. उ. २/१) हे तैत्तिरीय उपनिषदातील वचन आहे.

'सन्तीति सन्तस्तेषु सत्सु साधु तत्सत्यम्। यज्जानाति चराऽचरं जगत्तज्ज्ञानम्। न विद्यतेऽन्तोऽवधिर्मर्यादा यस्य तदनन्तम्। सर्वेभ्यो बृहत्वाद् ब्रह्म'. जे पदार्थ आहेत त्यांना सत् म्हणतात. त्यांमध्ये साधु असल्याने

परमेश्वराचे नाव 'सत्य' आहे. तो सर्वांचा जाणणारा आहे. म्हणून परमेश्वराचे नाव 'ज्ञान' आहे. ज्याचे अंत, अवधी, मर्यादा म्हणजे तो इतका लांब, रुंद, लहान, मोठा असे परिमाण नाही. म्हणून परमेश्वराची नावे **'सत्, ज्ञान व अनंत'** अशी आहेत.

**(डुदाञ् दाने)** आङ्पूर्वक या धातूपासून 'आदि' आणि नञ् पूर्वक 'अनादि' हे शब्द बनतात. **'यस्मात् पूर्वं नास्ति परं चास्ति स आदिरित्युच्यते'** 'न विद्यते आदिः कारणं यस्य सोऽनादिरीश्वरः'. ज्याच्या आधी काही नसते आणि नंतर असते त्याला आदि म्हणतात. ज्याचे आदि कारण काहीही नाही म्हणून परमेश्वराचे नाव **'अनादि'** आहे.

**(टुनदि समृद्धौ)** आङ् पूर्वक या धातूपासून 'आनंद' शब्द बनतो. 'आनन्दन्ति सर्वे मुक्ता यस्मिन् यद्वा यः सर्वाञ्जीवानानन्दयति स आनन्दः'. जो आनंदस्वरूप आहे, ज्यात सर्व मुक्त जीव आनंदाला प्राप्त होतात आणि जो सर्व धर्मात्मा जीवांना आनंदयुक्त करतो. म्हणून ईश्वराचे नाव **'आनंद'** आहे.

**(अस भुवि)** या धातूपासून 'सत्' शब्द बनतो. 'यदस्ति त्रिषु कालेषु न बाध्यते तत्सद् ब्रह्म'. जो सदा विद्यमान असतो, म्हणजे भूत, भविष्य व वर्तमान या तीन्ही काळांमध्ये त्याचा बाध होत नाही म्हणून त्या परमेश्वराला **'सत्'** म्हणतात.

**(चिती संज्ञाने)** या धातूपासून 'चित्' शब्द बनतो. 'यश्चेतति चेतयति संज्ञापयति सर्वान् सज्जनान् योगिनस्तच्चित्परं ब्रह्म'. जो चेतनस्वरूप आहे, सर्व जीवांना सावधान करणारा व सत्यासत्य जाणणारा आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव 'चित्' आहे. या तीन्ही शब्दांच्या विशेषणांमुळे परमेश्वराला **'सच्चिदानन्दस्वरूप'** म्हणतात.

'यो नित्यध्रुवोऽचलोऽविनाशी स नित्यः' । जो निश्चल अविनाशी आहे. म्हणून तो **'नित्य'** शब्द वाचक ईश्वर आहे.

**(शुन्ध शुद्धौ)** यापासून 'शुद्ध' शब्द बनतो. 'यः शुन्धति सर्वान् शोधयति वा स शुद्ध ईश्वरः'. जो स्वतः पवित्र, सर्व अशुद्धींपासून मुक्त आणि सर्वांना शुद्ध करणारा आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'शुद्ध'** आहे.

**(बुध अवगमने)** या धातूला 'क्त' प्रत्यय लागून 'बुद्ध' शब्द बनतो. 'यो बुद्धवान् सदैव ज्ञाताऽस्ति स बुद्धो जगदीश्वरः'. जो सदा सर्वांना जाणणारा आहे. म्हणून ईश्वराचे नाव **'बुद्ध'** आहे.

**(मुच्लृ मोचने)** या धातूपासून 'मुक्त' शब्द बनतो. 'यो मुञ्चति मोचयति व मुमुक्षुन् स मुक्तो जगदीश्वरः'. जो सर्वदा अशुद्धींपासून दूर असतो आणि सर्व मुमुक्षूंची क्लेशापासून सुटका करतो. म्हणून परमेश्वराचे नाव **'मुक्त'** आहे. 'अत एव नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावो जगदीश्वरः'. यामुळेच परमेश्वराचा स्वभाव नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त आहे.

निर् आणि आङ्पूर्वक **(डुकृञ् करणे)** या धातूपासून 'निराकार' शब्द बनतो. 'निर्गत आकारात्स निराकारः' ज्याला कोणताही आकार नाही आणि जो कधी शरीर धारण करीत नाही. म्हणून परमेश्वराचे नाव **'निराकार'** आहे.

**(अञ्जू व्यक्तिम्लक्षणकान्तिगतिषु)** या धातूपासून 'अञ्जन' शब्द आणि निर् उपसर्ग लागल्याने 'निरञ्जन' शब्द बनतो. 'अञ्जनं व्यक्तिर्म्लक्षणं कुकामइन्द्रियैः प्राप्तिश्चेत्यस्माद्यो निर्गतः पृथग्भूतः स

निरञ्जनः'. जी व्यक्ति अर्थात आकृती, म्लेंच्छाचार, दुष्ट कामना आणि चक्षुरादि इंद्रियांच्या विषयांच्या मार्गापासून दूर आहे. म्हणून ईश्वराचे नाव **'निरंजन'** आहे.

**(गण संख्याने)** या धातूपासून 'गण' शब्द बनतो. याच्या पुढे 'ईश' किंवा 'पति' हे शब्द लावल्यास 'गणेश' व 'गणपती' हे शब्द बनतात. 'ये प्रकृत्यादि जडा जीवाश्च गण्यन्ते संख्यायन्ते तेषामीशः स्वामी पतिः पालको वा'. जो प्रकृत्यादि जड (अचेतन) आणि सर्व जीव प्रख्यात पदार्थांचा स्वामी अथवा पालन करणारा आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'गणेश'** किंवा **'गणपती'** आहे.

'यो विश्वमीष्टे स विश्वेश्वरः'. जो जगाचा अधिष्ठाता आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'विश्वेश्वर'** आहे.

'यः कूटेऽनेकविधव्यवहारे स्वस्वरूपेणैव तिष्ठति स कूटस्थः परमेश्वरः'. जो सर्व व्यवहारांमध्ये व्याप्त आणि सर्व व्यवहारांचा आधार असूनही कोणत्याही व्यवहारात आपले स्वरूप बदलत नाही. म्हणून परमेश्वराचे नाव **'कूटस्थ'** आहे.

'देव' शब्दाचे जितके अर्थ लिहिले आहेत तितकेच 'देवी' शब्दाचेही आहेत. परमेश्वराची नावे तीन्ही लिंगांत आहेत. उदाहरणार्थ, 'ब्रह्म चितिरीश्वरश्चेति', जेव्हा ईश्वराचे विशेषण असेल तेव्हा 'देव' आणि जेव्हा चितीचे असेल तेव्हा देवी असे समजावे. म्हणून ईश्वराचे नाव **'देवी'** आहे.

**(शक्लृ शक्तौ)** या धातूपासून 'शक्ती' शब्द बनतो. 'यः सर्वं जगत् कर्तुं शक्नोति स शक्तिः'. जो संपूर्ण जग निर्माण करण्यास समर्थ आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'शक्ती'** आहे.

**(श्रिञ् सेवायाम्)** या धातूपासून 'श्री' शब्द बनतो. 'यः श्रीयते सेव्यते सर्वेण जगता विद्वद्भिर्योगिभिश्च स श्रीरीश्वरः' ज्याचे ग्रहण संपूर्ण, विश्व, विद्वान आणि योगीजन करतात. त्या परमेश्वराचे नाव **'श्री'** आहे.

**(लक्ष, दर्शनाङ्कनयोः)** या धातूपासून 'लक्ष्मी' शब्द बनतो. 'यो लक्षयति पश्यत्यङ्क्ते चिह्नयति चराचरं जगदथवा वेदैराप्तैर्योगिभिश्च तो लक्ष्यते स लक्ष्मीः सर्वप्रियेश्वरः'. जो सर्व चराचर जगताला पाहतो, चिह्नित म्हणजे दृश्य बनवितो. जसे शरीराचे डोळे, नाक आदि आणि वृक्षाची पाने, फुले, फळे, मुळे, पृथ्वी, पाणी, काळे, लाल, पांढरे, माती-दगड, चंद्र, सूर्य वगैरे चिह्ने बनवितो व सर्वांना पाहतो. जो सर्व शोभांची शोभा आहे आणि जो वेदादि शास्त्रे अथवा धार्मिक विद्वान् योगी यांचे लक्ष्य म्हणजे पाहण्यास योग्य आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'लक्ष्मी'** आहे.

**(सृ गतौ)** या धातूपासून 'सरस्' व त्याला मतुप् आणि ङीप् प्रत्यय लागून 'सरस्वती' शब्द बनतो. 'सरो विविधं ज्ञानं विद्यते यस्यां चितौ सा सरस्वती'. ज्याला विविध विज्ञानांचे म्हणजे शब्द व अर्थ यांचे संबंध प्रयोग यांचे ज्ञान यथावत असते. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'सरस्वती'** आहे.

'सर्वाः शक्तयो विद्यन्ते यस्मिन् स सर्वशक्तिमानीश्वरः'. जो आपले कार्य करण्यात इतर कुणाच्या साह्याची इच्छा बाळगीत नाही, आपल्याच सामर्थ्याने आपली सर्व कामे पूर्ण करतो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'सर्वशक्तिमान'** आहे.

**(णीञ् प्रापणे)** या धातूपासून 'न्याय' शब्द बनतो. 'प्रमाणैरर्थपरीक्षणं न्यायः'. हे वचन न्यायसूत्रांवरील वात्स्यायनमुनिकृत भाष्यातील आहे. 'पक्षपातरहित्याचरणं न्यायः'. जे प्रत्यक्षादि प्रमाणांच्या

परीक्षेने सत्य सिद्ध होते तसेच पक्षपातरहित धर्मरूप आचरण आहे, त्याला न्याय असे म्हणतात. 'न्यायं कर्तुं शीलमस्य स न्यायकारीश्वरः'. ज्याचा स्वभाव न्याय म्हणजे पक्षपातरहित धर्माचरण करण्याचाच आहे. म्हणून त्या ईश्वराचेनाव **'न्यायकारी'** आहे.

**(दय दानगतिरक्षणहिंसादानेषु)** या धातूपासून 'दया' शब्द बनतो. 'दयते ददाति जानाति गच्छति रक्षति हिनस्ति यया सा दया, बह्वीः दया विद्यते यस्य स दयालुः परमेश्वरः'. जो अभय देणारा सत्यासत्य सर्व विद्या जाणणारा, सर्व सज्जनांचे रक्षण करणारा आणि दुष्टांना यथायोग्य शिक्षा देणारा आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **'दयाळू'** आहे.

'द्वयोर्भावो द्वाभ्यामितं सा द्विता द्वीतं वा सैव तदेव वा द्वैतम्, न विद्यते द्वैतं द्वितीयेश्वरभावो यस्मिंस्तदद्वैतम्। अर्थात् सजातीयविजातीय स्वगतभेदशून्यं ब्रह्म'. दोन होणे अथवा दोन युक्त होणे म्हणजे द्विता, द्वीत किंवा द्वैत. जो यापासून रहित आहे जसे सजातीय मनुष्याचा सजातीय दुसरा मनुष्य होतो. विजातीय म्हणजे मनुष्याहून भिन्न जातीचा वृक्ष, पाषाण आदि होतो. स्वगत म्हणजे शरीरामध्ये जसे डोळे, नाक, कान वगैरे अवयवांचा भेद आहे तसा दुसरे स्वजातीय ईश्वर, विजातीय ईश्वर किंवा आपल्या आत्म्यामधील तत्त्वांवर वस्तू यांपासून रहित एक परमेश्वर आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **'अद्वैत'** आहे.

गुण्यन्ते ये ते गुणा वा यैर्गुणयन्ति ते गुणाः, यो गुणेभ्यो: निर्गतः स निर्गुण ईश्वरः'. सत्व, रज, तम; रूप, रस, स्पर्श, गन्ध आदि जडाचे (अचेतनाचे) गुण अविद्या, अल्पज्ञता, राग (मोह), द्वेष आणि अविद्या आदि क्लेश हे जीवाचे गुण आहेत. त्यांच्यापासून जो वेगळा आहे. यामध्ये **'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्'** इत्यादि उपनिषदांचे प्रमाण आहे. जो शब्द, स्पर्श, रूप आदि गुणांनी रहित आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **'निर्गुण'** आहे.

'यो गुणैः सह वर्त्तते स सगुणः'. जो सर्वांचे ज्ञान, सर्वसुख, पवित्रता, अनंत बलादि गुणांनी युक्त आहे. म्हणून परमेश्वराचे नाव **'सगुण'** आहे. ज्या प्रमाणे पृथ्वी गंधादि गुणांमुळे 'सगुण' आणि इच्छादि गुणांनी रहित असल्यामुळे 'निर्गुण' आहे; त्या प्रमाणे जग आणि जीव यांच्या गुणांहून वेगळा असल्यामुळे परमेश्वर 'निर्गुण' आहे आणि सर्वज्ञादि गुणांनी युक्त असल्यामुळे 'सगुण' आहे. अर्थात असा कोणताही पदार्थ नाही जो सगुणता व निर्गुणता यापासून दूर आहे. ज्या प्रमाणे चेतनाच्या गुणांहून भिन्न असल्याने जड (अचेतन) पदार्थ निर्गुण असतो आणि आपल्या गुणांनी युक्त असल्याने सगुण असतो त्याच प्रमाणे जडाच्या (अचेतनाच्या) गुणांहून भिन्न असल्याने जीव निर्गुण असतो आणि इच्छादि आपल्या गुणांनी युक्त असल्याने तो सगुण असतो. परमेश्वराच्या बाबतीतही असेच समजले पाहिजे.

'अन्तर्यन्तुं नियन्तुं शीलं यस्य सोऽयमन्तर्यामी'. जो सर्व प्राणी आणि अप्राणिरूप जगामध्ये व्यापक राहून सर्वांचे नियमन करतो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'अंतर्यामी'** आहे.

'यो धर्म्मे राजते स धर्मराजः'. जो धर्मामध्येच प्रकाशमान असतो आणि अधर्माने रहित धर्माचा प्रकाश करतो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'धर्मराज'** आहे.

**(यमु उपरमे)** या धातूपासून 'यम' शब्द बनतो. 'यः सर्वान् प्राणिनो नियच्छति स यमः'. जो सर्व प्राण्यांना त्यांच्या कर्माची फळे देण्याची व्यवस्था करतो आणि सर्व अन्यायांपासून पृथक राहतो. म्हणून परमेश्वराचे नाव **'यम'** आहे.

**(भज सेवायाम्)** या धातूपासून 'भग' त्यास 'मतुप्' होऊन 'भगवान्' शब्द बनतो. 'भगः सकलैश्वर्य्यं सेवनं वा विद्यते यस्य स भगवान्'. जो समग्र ऐश्वर्यानि युक्त अथवा भजण्यास योग्य आहे. म्हणूनच त्या ईश्वराचे नाव **'भगवान'** आहे.

**(मन ज्ञाने)** या धातूपासून 'मनु' शब्द बनतो. 'जो मन्यते स मनुः'. जो मनु म्हणजे विज्ञानशील आणि मानण्यास योग्य आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'मनु'** आहे.

**(पृ पालनपूरणयोः)** या धातूपासून 'पुरुष' शब्द बनला आहे. 'यः स्वव्याप्त्या चराऽचरं जगत् पृणाति पूरयति वा स पुरुषः'. जो सर्व जगात परिपूर्ण होत आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'पुरुष'** आहे.

**(डुभृञ् धारणपोषणयोः)** विश्वपूर्वक या धातूपासून 'विश्वंभर' शब्द बनतो. 'यो विश्वं बिभर्ति धरति पुष्णाति वा स विश्वंभरो जगदीश्वरः'. जो जगाचे धारण व पोषण करतो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'विश्वंभर'** आहे.

**(कल संख्याने)** या धातूपासून 'काल' शब्द बनला आहे. 'कलयति संख्याति सर्वान् पदार्थान् स कालः'. जो जगातील सर्व पदार्थांची व जीवांची संख्या (गणना) करतो. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'काल'** आहे.

**(शिष्लृ विशेषणे)** या धातूपासून 'शेष' शब्द बनतो. 'यः शिष्यते स शेषः'. जो उत्पत्ती आणि प्रलय यांपासून शेष म्हणजे अलिप्त आहे, (मुक्त असतो). म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'शेष'** आहे.

**(आप्लृ व्याप्तौ)** या धातूपासून आप्त शब्द बनतो. 'यः सर्वान् धर्मात्मनः आप्नोति वा सर्वैर्धर्मात्मभिराप्यते छलादिरहितः स आप्तः'. जो सत्योपदेशक सकल विद्यायुक्त सर्व धर्मात्म्यांना प्राप्त होणारा आणि धर्मात्म्यांकडून प्राप्त होण्यास योग्य, छलकपटादींपासून रहित आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'आप्त'** आहे.

**(डुकृञ् करणे)** 'शम्' पूर्वक या धातूपासून 'शङ्करः' शब्द बनला आहे. 'यः शङ्कल्याणं सुखं करोती स शङ्करः'. जो कल्याण म्हणजे सुखी करणारा आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'शंकर'** आहे.

'महत्' शब्दपूर्वक 'देव' शब्दापासून 'महादेव' हा शब्द बनतो. 'यो महतां देवः स महादेवः'. जो महान देवांचा देव अर्थात विद्वानांचाही विद्वान, सूर्यादि पदार्थांचा प्रकाशक आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'महादेव'** आहे.

**(प्रीञ् तर्पणे कान्तौ च)** या धातूपासून 'प्रिय' शब्द बनतो. 'यः पृणाति प्रीयते वा स प्रियः'. जो सर्व धर्मात्म्यांना, मुमुक्षूंना व सज्जनांना प्रसन्न करतो आणि सर्वांकडून कामना करण्यास योग्य आहे. म्हणून त्या ईश्वराचे नाव **'प्रिय'** आहे.

**(भू सत्तायाम्)** 'स्वयं' पूर्वक या धातूपासून 'स्वयंभू' शब्द बनतो. 'यः स्वयं भवति स स्वयम्भूरीश्वरः'. जो आपण स्वतःच आहे, कधी कोणापासून उत्पन्न झालेला नाही. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'स्वयंभू'** आहे.

**(कु शब्दे)** या धातूपासून 'कवि' शब्द बनतो. 'यः कौति शब्दयति सर्वा विद्याः स कविरीश्वरः'. जो वेदांद्वारे सर्व विद्यांचा उपदेश करणारा आहे आणि जाणणारा आहे म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'कवी'** आहे.

**(शिवु कल्याणे)** या धातूपासून 'शिव' शब्द बनतो. 'बहुलमेतन्नि दर्शनम्' यापासून शिवु धातू मानला जातो. जो कल्याणस्वरूप व कल्याण करणारा आहे. म्हणून त्या परमेश्वराचे नाव **'शिव'** आहे.

परमेश्वराची ही शंभर नावे येथे लिहिली आहेत. परंतु याहून वेगळी अशी परमेश्वराची असंख्य नावे आहेत. कारण जसे परमेश्वराचे अनंत गुण, कर्म, स्वभाव आहेत तशी त्याची अनंत नावेही आहेत. त्यांपैकी प्रत्येक गुण, कर्म व स्वभाव यांचे एक-एक नाव आहे. म्हणून मी जी ही नावे नमूद केली आहेत ती सागरासमोर बिंदुसारखी आहेत. कारण वेदादि शास्त्रांमध्ये परमेश्वराचे असंख्य गुण, कर्म व स्वभाव वर्णिलेले आहेत. ते वाचल्यावर, शिकविल्यावर त्यांचा बोध होऊ शकतो आणि जे लोक वेदादि शास्त्रे वाचतात त्यांनाच इतर पदार्थांचे ज्ञानही पूर्णपणे होऊ शकते.

## मंगलाचरण विचार

**(प्रश्न)** इतर ग्रंथकार लोक आदि, मध्य व अंत प्रसंगी मंगलाचरण करतात तसे आपण काहीच केले नाही किंवा लिहिले नाही. हे कसे ?

**(उत्तर)** तसे तर आम्हांला करणे योग्य नाही. कारण जो आदि, मध्य व अंत प्रसंगी मंगल करील तर त्याच्या ग्रंथामध्ये आदि, मध्य व अंत यांच्या दरम्यान जे काही लिहिलेले असेल ते अमंगलच असेल म्हणून **'मङ्गलाचरणं शिष्टाचारात् फलदर्शनाच्छ्रुतितश्चेति'** (सां. अ. ५। सू. १) असे सांख्यशास्त्राचे वचन आहे. त्याचा अभिप्राय असा की न्याय, पक्षपातरहित सत्य वेदोक्त ईश्वराची जी आज्ञा आहे तिचेच यथावत सर्वत्र सदैव आचरण करणे म्हणजेच मंगलाचरण म्हटले जाते. ग्रंथाच्या प्रारंभापासून समाप्तीपर्यंत सत्याचार करणे हेच मंगलाचरण होय असे नाही की कोठे मंगल व कोठे अमंगल लिहावे. महाशय महर्षींचा लेख पाहा :-

**'यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि'** ॥

हे तैत्तिरीय उपनिषदातील (१/११) वचन आहे. हे मानवांनो ! जी 'अनवद्य', अनिंदनीय म्हणजे धर्मयुक्त कर्मे आहेत तीच तुम्ही करणे योग्य आहे. अधर्मयुक्त कर्मे करणे योग्य नव्हे.

म्हणून आधुनिक ग्रंथात 'श्रीगणेशाय नमः', 'सीतारामाभ्यां नमः', 'राधाकृष्णाभ्यां नमः', 'श्रीगुरुचरणारविन्दाभ्यां नमः', 'हनुमंते नमः', 'दुर्गायै नमः', 'बटुकाय नमः', 'भैरवाय नमः', 'शिवाय नमः', 'सरस्वत्यै नमः', 'नारायणाय नमः', इत्यादि जे काही लिखाण पाहाण्यांत येते ते वेद आणि शास्त्रे यांच्या विरुद्ध असल्यामुळे बुद्धिमान लोक ते मिथ्याच समजतात. कारण वेदांमध्ये आणि ऋषींच्या ग्रंथांमध्ये कोठेही असले मंगलाचरण आढळत नाही. आर्ष (ऋषिकृत) ग्रंथांमध्ये 'ओ३म्' आणि 'अथ' हे शब्द मात्र आढळतात. पहा :-

**'अथ शब्दानुशासनम्' अथेत्ययं शब्दोऽधिकारार्थः प्रयुज्यते ।** व्याकरणमहाभाष्य.

**'अथातो धर्मजिज्ञासा' अथेत्यानन्तर्ये वेदाध्ययनानन्तरम् ।** पूर्वमीमांसा.

**'अथातो धर्मं व्याख्यास्यामः' अथेति धर्मकथनानन्तरं धर्मलक्षणं विशेषेण व्याख्यास्यामः ।** वैशेषिक दर्शन.

**'अथ योगानुशासनम्' अथेत्ययमधिकारार्थः ।** योगदर्शन.

**'अथ त्रिविधदुःखात्यन्तनिवृत्तिरत्यन्तपुरुषार्थः ।'**

**सांसारिकविषयभोगा नन्तरं त्रिविधदुःखात्यन्तनिवृत्यर्थः प्रयत्नः कर्तव्यः।** सांख्यदर्शन. **'अथातो ब्रह्मजिज्ञासा' । चतुष्टय साधन संपत्त्यनन्तरं ब्रह्म जिज्ञास्यम् ।।** वेदान्तसूत्र

**'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत' ।।** हे छांदोग्य उपनिषदातील वचन आहे.

**'ओमित्येतदक्षरमिद ॅ सर्वं तस्योपव्याख्यानम्' ।** हे माण्डूक्य उपनिषदाच्या आरंभीचे वचन आहे.

असेच अन्य ऋषिमुनींच्या ग्रंथांमध्ये 'ओ३म्' व 'अथ' शब्द लिहिलेले आहेत. त्याच प्रमाणे **(अग्नि, इट्, अग्नि, ये त्रिषप्ताः परियन्ति)** हे शब्द चारही वेदांच्या प्रारंभी लिहिलेले आहेत. 'श्री गणेशाय नमः' इत्यादि शब्द कोठेही नाहीत. जे वैदिक लोक वेदाच्या आरंभी 'हरिः ओम्' लिहितात अथवा म्हणतात हे सर्व पौराणिक व तांत्रिक लोकांच्या चुकीच्या कल्पनांवरून शिकले आहेत. वेदादि शास्त्रांमध्ये 'हरि' हा शब्द प्रारंभी कोठेही नाही. म्हणून 'ओ३म्' किंवा 'अथ' हा शब्दच ग्रंथाच्या आरंभी लिहिला पाहिजे.

हे किंचितमात्र ईश्वराविषयी लिहिले. यानंतर शिक्षणाविषयी लिहिण्यात येईल.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषित ईश्वरनामविषये**
**प्रथमः समुल्लासः सम्पूर्णः ।।**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






दुसरा समुल्लास

# शिक्षण विचार

## आईवडिलांची कर्तव्ये

**मातृमान् पितृमानाचार्यवान् पुरुषो वेद ॥**

हे शतपथ ब्राह्मण ग्रंथातील वचन आहे. वस्तुतः आई-वडील व आचार्य (गुरू) हे तीन उत्तम शिक्षक असतात तेव्हाच माणूस ज्ञानवान बनतो. ज्याचे माता पिता धार्मिक विद्वान असतात ती मुले भाग्यशाली होत आणि ते कूळ धन्य होय. मुलांना आईकडून जेवढा उपदेश मिळतो व मुलांवर जेवढे उपकार होतात तेवढे इतर कोणाकडूनही होत नाहीत. आई जशी आपल्या मुलांवर प्रेम करते, त्यांचे कल्याण करू इच्छिते तसे इतर कोणी करीत नाही. म्हणून (मातृमान्) म्हणजे 'प्रशस्ता धार्मिकी विदुषी माता विद्यते यस्य स मातृमान्'. जी माता गर्भधारणेपासून मुलाची विद्या पूर्ण होईपर्यंत त्याला सुशीलतेचा उपदेश करते ती धन्य होय.

माता आणि पिता यांनी गर्भाधानापूर्वी, मध्ये आणि नंतर मादक पदार्थ, मद्य, दुर्गंध, रुक्ष व बुद्धिनाशक पदार्थांचा त्याग करून, ज्यायोगे शांतता, आरोग्य, बळ, बुद्धी, पराक्रम व सुशीलता यांच्या द्वारे सभ्यता अंगी वागवावी. ते तूप, दूध, गोड अन्नपान वगैरे श्रेष्ठ पदार्थांचे सेवन करावे. त्यायोगे रजस् वीर्यही निर्दोष बनून अत्युत्तम गुणयुक्त बनते.

## उत्तम संतान प्राप्त करण्याचा विधि

ऋतुगमनाचा विधी म्हणजे रजोदर्शनाच्या पाचव्या दिवसापासून सोळाव्या दिवसापर्यंत ऋतुदान देण्याचा काळ होय. त्या दिवसातील पहिले चार दिवस त्याज्य आहेत. म्हणजे १२ दिवस उरले. त्यांतील अकरावी व तेरावी रात्र या दोन रात्री वगळून बाकीच्या १० रात्रींमध्ये गर्भाधान करणे उत्तम असते. रजोदर्शनाच्या दिवसापासून सोळाव्या रात्रीनंतर समागम करू नये. पुन:पूर्वी सांगितल्याप्रमाणे ऋतुदानाचा काळ येईपर्यंत आणि गरोदर राहिल्यापासून एक वर्षापर्यंत समागम करू नये. दोघांच्याही शरीरात आरोग्य असेल, परस्पर प्रसन्नता असावी व कोणत्याही प्रकारचे दु:ख नसावे. चरक व सुश्रुत या ग्रंथांमध्ये खानपान व वस्त्रप्रावरण यासंबंधी जे विधान केले आहे आणि मनुस्मृतीत स्त्रीपुरुषांच्या प्रसन्नतेची जी रीत सांगितली आहे त्यानुसार करावे व वागावे.

गर्भाधानानंतर गरोदर स्त्रीने खाणे पिणे व कपडालत्ता यांच्या बाबतीत खूप सावधगिरी बाळगली पाहिजे. गर्भवती झाल्यानंतर एक वर्षापर्यंत स्त्रीने पुरुषाशी संग करू नये. मूल जन्माला येईपर्यंत स्त्रीने बुद्धि, बळ, रूप, आरोग्य, पराक्रम, शांती आदि गुणकारक वस्तूंचेच सेवन करीत राहावे.

मूल जन्मल्यानंतर उत्तम सुगंधी पाण्याने त्याचे स्नान व नाळ छेदन करून सुगंधयुक्त घृतादीचा होम करावा; आणि स्त्रीच्याही स्नानाची व भोजनाची यथायोग्य व्यवस्था करावी. त्यायोगे मूल व बाळंतीण यांची शरीरे निरोगी व धष्टपुष्ट होत जातात. ज्यायोगे दुधामध्ये उत्तम गुण उतरतील असे पदार्थ मातेने किंवा मुलाला दूध पाजणाऱ्या दाईने खावेत. आईचे दूध मुलाला सहा दिवसापर्यंत पिऊ द्यावे. त्यानंतर दाईने दूध पाजावे. मात्र त्या दाईला शिशुच्या आई-वडिलांनी उत्तम पदार्थ खाऊ पिऊ घालावेत. एखादा गरीब माणूस दाई ठेवू शकत नसेल तर त्याने गायीच्या अथवा शेळीच्या दुधात बुद्धि, पराक्रम व आरोग्य देणाऱ्या उत्तम औषधी त्या शुद्ध पाण्यात भिजवून, आटवून, गाळून, त्यात दुधाएवढे पाणी घालून ते बाळास पाजावे. जन्मानंतर मूल आणि त्याची आई यांना शुद्ध हवेच्या ठिकाणी नेऊन ठेवावे. तेथे सुवासिक व प्रेक्षणीय वस्तूही ठेवाव्यात आणि जेथील हवापाणी चांगले आहे अशा प्रदेशात त्यांना फिरवून आणणेही उचित होय.

जेथे दाई, गाय, शेळी वगैरेचे दूध मिळण्याची शक्यता नसेल तेथे योग्य वाटेल तसे करावे. कारण प्रसूता स्त्रीच्या शरीराच्या अंशातून बाळाचे शरीर निर्माण होत असते. त्यामुळे स्त्री प्रसूतीच्या वेळी अशक्त होत असते म्हणून बाळंतिणीने मुलाला दूध पाजू नये. दूध थांबविण्यासाठी स्तनाच्या छिद्रावर औषधाचा लेप लावावा. त्याने दूध स्त्रवण थांबेल, असे केल्याने दुसऱ्या महिन्यात स्त्री पुनः युवती होते. तो पर्यंत पुरुषाने ब्रह्मचर्य पाळून वीर्याचा निग्रह करावा. (संयम बाळगावा.) अशा प्रकारे जे स्त्री-पुरुष वागतील त्यांची संतति उत्तम दीर्घायुषी, शक्ति, बळ याची वृद्धि होत राहील ज्यामुळे ते दिर्घायुषी बनतील आणि त्यांना होणारी सारी मुले उत्तम, बलवान, पराक्रमी, दीर्घायुषी व धार्मिक होतील. स्त्रीने योनिसंकोच मार्जन करावे आणि पुरुषाने वीर्याचे स्तंभन करावे. त्यायोगे नंतर होणारी सर्व मुलेही उत्तम होतील.

## पाच वर्षापर्यंत आई द्वारा शिक्षण

मातेने मुलांना नेहमी चांगली शिकवण द्यावी. म्हणजे ती सभ्य बनतील आणि कोणत्याही अंग प्रत्यंगाशी वेडेवाकडे चाळे करू शकणार नाहीत. मूल बोलू लागले की त्याची जीभ कोमल बनून स्पष्ट उच्चार करू शकेल असे उपाय आईने करावेत. ज्या वर्णाचे जे स्थान व प्रयत्न असेल उदाहरणार्थ 'प' चे स्थान ओठ असून दोन्ही ओठ जुळवून 'प' चा उच्चार कसा करावयाचा ते प्रयत्नपूर्वक शिकवावे. ह्रस्व, दीर्घ, प्लुत (तीन मात्रांचा स्वर किंवा वर्ण) अक्षरांचे योग्य उच्चार करता यावे. मधुर, गंभीर, सुंदर स्वर; अक्षर, मात्रा, पद, वाक्य, संहिता, अवसान यांतील फरक त्यांच्या कानांना नीट समजला पाहिजे. मुले थोडीफार बोलू व समजू लागली की त्यांना सुंदर वाणीचा वापर, लहान, थोर, आदरणीय, माता, पिता, राजा, विद्वान इत्यादींशी कसे बोलावे, कसे वागावे, त्यांच्याजवळ कसे बसावे वगैरे गोष्टी शिकवाव्यात. म्हणजे त्यांच्याकडून कोठेही अयोग्य आचरण होणार नाही आणि सर्वत्र त्यांची प्रतिष्ठा होत राहील. मुले जितेंद्रिय, विद्याप्रिय, सत्संगप्रिय बनतील असा प्रयत्न करत रहावा. निष्कारण खेळणे, रडणे, हसणे, भांडणे, आनंद व दुःख करणे, कोणत्याही पदार्थाची लालसा

बाळगू नये. ईर्ष्या व द्वेष करू नये. जननेंद्रियाला स्पर्श केल्याने, त्याचे मर्दन केल्याने वीर्य क्षीण होते, नपुंसकता येते आणि हाताला घाणही येते. म्हणून जननेंद्रियाला स्पर्श करू नये. मुले नेहमी खरे बोलतील आणि त्यांच्यामध्ये शौर्य, धैर्य, हसमुख वगैरे गुण ज्यामुळे येतील तसे करावे.

मुलगा किंवा मुलगी पाच वर्षाची झाल्यावर त्यांना देवनागरी (बाळबोध) अक्षरांचा अभ्यास शिकवावा. अन्यदेशीय भाषांची अक्षरेही शिकवावीत. त्यानंतर उत्तम शिक्षण, विद्या, धर्म, परमेश्वर, माता, पिता, आचार्य, विद्वान, अतिथी, राजा, प्रजा, कुटुंब, भाऊ, बहिणी, नोकर-चाकर यांच्याशी कसे वागावे याचे शिक्षण देणारे मंत्र, श्लोक, सूत्रे, गद्य, पद्य त्यांच्याकडून अर्थासहित तोंडपाठ करून घ्यावे. त्यायोगे मुले लबाड माणसाकडून फसविली जाणार नाहीत. विद्या व धर्माविरुद्ध भ्रमात गुरफटून टाकणाऱ्या सर्व गोष्टींचीही माहिती त्यांना द्यावी. म्हणजे भूतप्रेतासारख्या खोट्या गोष्टींवर त्यांचा विश्वास बसणार नाही.

## भूत-प्रेत-खंडन

**गुरोः प्रेतस्य शिष्यस्तु पितृमेधं समाचरन् ।**

**प्रेतहारैः समं तत्र दशरात्रेण शुद्ध्यति ।।** मनु. अ. ५। श्लो. ६५

अर्थ : जेव्हा गुरूचा प्राणांत होतो तेव्हा त्याच्या मृत शरीराला प्रेत असे म्हणतात. त्याचे दहन करणारा शिष्य ते शरीर वाहून नेणाऱ्या लोकांसह दहाव्या दिवशी शुद्ध होतो. त्या शरीराचे दहन झाल्यानंतर त्याचे नाव भूत असे होते. म्हणजे तो अमुक नावाचा माणूस होता. ते उत्पन्न होऊन वर्तमानकाळी नसतात ते भूतस्थ झाल्याने त्याचे नाव भूत असे होते. असा ब्रह्मापासून आजपर्यंतच्या विद्वानांचा सिद्धांत आहे. परंतु ज्याला शंका कुसंग व कुसंस्कार असतात त्याला त्याचे भय वाटते; आणि भूत,प्रेत, शाकिनी, डाकिनी वगैरे अनेक शंकाकुशंकांच्या जाळ्यात गुरफटून तो दुःखी बनतो.

पाहा ! जेव्हा एखादा प्राणी मरतो तेव्हा त्याचा जीव त्याच्या पापपुण्यानुसार परमेश्वराच्या व्यवस्थेप्रमाणे सुखदुःख युक्त फळे भोगण्यासाठी दुसरा जन्म धारण करतो. त्या अविनाशी परमेश्वराची व्यवस्था कोणीही नाश करू शकतो काय ? अडाणी लोक वैद्यकशास्त्र अथवा पदार्थविज्ञान यांचे वाचन, श्रवण व विचार शुन्य होऊन सन्निपात ज्वरासारखे शारीरिक आजार आणि उन्मादादीसारखे मानसिक रोग झालेल्या व्यक्तीला भुताने झपाटले आहे असे समजतात. त्यांना योग्य औषधोपचार पथ्यपाणी इ. उचित काम करण्याऐवजी लबाड, पाखंडी, महामूर्ख, अनाचारी, स्वार्थी, भंगी, चांभार, शूद्र, म्लेच्छादि यांच्यावर विश्वास ठेवून अनेक प्रकारची ढोंगबाजी, फसवाफसवी, उष्टे अन्न खाणे, गंडादोरा बांधणे, जादूटोणा, इत्यादी खोटे मंत्रतंत्र करतात व करवितात. त्यायोगे त्यांच्या धनाचा नाश होतो, मुलांची दुर्दशा होते, रोग वाढतो आणि दुःख देत फिरतात. अशा अडोळस आणि पक्क्या दुर्बुद्धि, पापी, स्वार्थी माणसांकडे जाऊन विचारतात की, 'महाराज ! या मुलाला, मुलीला, स्त्रीला किंवा पुरुषाला माहीत नाही काय झालं हो ?' तेव्हा ते सांगतात की, 'यांच्या अंगात मोठं भूत, प्रेत, भैरव किंवा शीतलादि देवी आली आहे. जोवर तुम्ही त्याचा उपाय करीत नाही तोवर ते जाणार नाहीत व त्यांचा ते प्राण घेतील. तुम्ही जर त्यांना मलिदा अथवा इतकी भेट द्याल तर आम्ही मंत्र, जप पुरश्चरण करून त्यांना झाडफूक

करून टाकू.' यावर ते आंधळे आणि त्यांचे नातेवाईक त्याला म्हणतात, 'महाराज! पाहीजे तर आमचं सर्वस्व घ्या; पण याला बरा करा.' याने त्यांचा डाव साधतो. ते धूर्त लोक म्हणतात, 'ठीक आहे. इतक्या वस्तू आणा. एवढी दक्षिणा द्या. देवाला अमुक पदार्थ अर्पण करा. ग्रहदान करा.' झांजा, मृदंग, ढोल, थाळी ते आजाऱ्यासमोर वाजवितात, गातात आणि त्यांच्यापैकी एक ढोंगी उन्मत्तपणे नाचून उड्या मारीत म्हणतो, 'मी याचा प्राणच घेणार.' तेव्हा ते आंधळे म्हणजे अंधश्रद्धाळू लोक निम्नकोटीच्या लोकांच्या पायांवर डोके ठेवून म्हणतात, 'तुम्हाला हवं असेल ते घ्या. पण याला वाचवा.' यावर तो लबाड म्हणतो, 'मी हनुमान आहे. आणा चांगली मिठाई, तेल, शेंदूर, सव्वा मणाचे रोट आणि लाल लंगोट. मी देवी किंवा भैरव आहे. आणा दारूच्या पाच बाटल्या, वीस कोंबड्या, पाच बकरे, मिठाई आणि वस्त्रे.' जेव्हा ते सांगतात की, 'हवं ते घ्या.' तेव्हा तो उन्मत्त जास्तच नाचू लागतो. परंतु जेव्हा एखादा शहाणा माणूस त्याला पाच जोडे मारतो, लाथांनी तुडवतो किंवा दंडुक्याने चोपतो तेव्हा त्याच्या अंगात आलेला मारुती, देवी किंवा भैरव लगेच प्रसन्न होऊन पळून जातात. कारण लोकांना लुबाडण्यासाठी लबाड लोकांनी केलेले ते निव्वळ ढोंग असते.

## ग्रहशांतीचे ढोंग

तसेच, जेव्हा असे अडलेले लोक ग्रहग्रस्त, ग्रहरूप ज्योतिर्विद्याभ्यासीकडे जाऊन विचारतात की, 'महाराज! याला काय झालय?' तेव्हा ते सांगतात की, 'याच्यावर सूर्य वगैरे क्रूर ग्रहांचे आक्रमण झाले आहे. त्यासाठी तुम्ही त्यांची शांती, पाठ, पूजा, दान करविल्यास तो बरा होईल. नाहीतर याच आजारानं कष्ट दुःख सोसत तो मरून गेल्यास आश्चर्य नाही.'

**(उत्तर)** बोला ज्योतिर्विद! जशी ही पृथ्वी जड (अचेतन) आहे तसेच सूर्य आदि लोक आहेत. ते उष्णता आणि प्रकाश देण्याखेरीज इतर काहीही करू शकत नाहीत. काय हे चेतन आहेत? क्रुद्ध होऊन दुःख आणि शांत होऊन सुख देऊ शकतील?

**(प्रश्न)** या जगात राजा व प्रजा सुखी व दुःखी होत आहेत ते ग्रहांचे फळ नाही काय?

**(उत्तर)** नाही. ती सारी पापपुण्याची फळे आहेत.

**(प्रश्न)** तर मग ज्योतिषशास्त्र खोटे आहे काय?

**(उत्तर)** नाही. त्यामध्ये अंकगणित, बीजगणित, रेखागणित या ज्या विद्या आहेत त्या सर्व खऱ्या आहेत. परंतु ग्रहाच्या फळाचे जे ढोंग माजवले आहे ते मात्र सर्व खोटे आहे.

## जन्मपत्रिकेचे ढोंग

**(प्रश्न)** ही जन्मपत्रिका आहे ती निरर्थक आहे काय?

**(उत्तर)** होय. ती जन्मपत्रिका नसून तिचे नाव 'शोकपत्रिका' ठेवले पाहिजे. कारण जेव्हा बाळाचा जन्म होतो तेव्हा सर्वांना आनंद होतो. मात्र त्याची जन्मपत्रिका तयार होऊन ग्रहाची शुभाशुभ फळे समजत नाहीत तो पर्यंतच तो आनंद टिकतो. जेव्हा पुरोहित जन्मपत्रिका बनविण्याची गोष्ट काढतो तेव्हा बाळाचे आईबाप पुरोहीताला सांगतात, ''महाराज! आपण खूप चांगली जन्मपत्रिका तयार करा.'' आईबाप श्रीमंत असल्यास

फलज्योतीषी लाल पिवळ्या रेघोट्या ओढून चित्रविचित्र जन्मपत्रिका तयार करतात आणि आईबाप गरीब असल्यास सामान्य प्रकारची जन्मपत्रिका बनवून शुभाशुभ फळे सांगायला येतात. मग आईबाप ज्योतिषीबुवासमोर बसून विचारतात, 'याची जन्मपत्रिका चांगली आहे ना?' ज्योतिषी सांगतो, 'जे आहे ते सांगतो. याचे जन्मग्रह अत्यंत चांगले असून मित्रग्रहही उत्तम आहेत. यामुळे तो धनाढ्य व प्रतिष्ठावान् होईल. चार लोकांत बसला म्हणजे सर्वांवर त्याचे तेज पडेल. शरीराचे आरोग्य उत्तम असून त्याला राजमान्यताही मिळेल.' इत्यादी गोष्टी ऐकून वडील म्हणतात, 'वाहवा! ज्योतिषीबुवा, तुम्ही खूपच चांगले आहात.' परंतु यातून आपला हेतू साध्य होणार नाही हे ओळखून ज्योतिषी पुढे सांगतो, 'हे ग्रह तर उत्तम आहेत. परंतु काही ग्रह क्रूर आहेत. त्यामुळे अमुक अमुक ग्रहांच्या योगामुळे मुलाला आठव्या वर्षी मृत्युयोग आहे. हे एकताच आईबाप पुत्रजन्माचा आनंद विसरून शोकसागरात बुडू लागतात आणि ज्योतिषबुवांना विचारतात, 'महाराज! आता आम्ही काय करावं.' यावर ज्योतिषीजी सांगतात, 'उपाय करा.' गृहस्थ विचारतो, 'कोणता उपाय करायचा?' मग ज्योतिषीजी सांगू लागतात, 'असं-असं दान करा. ग्रह शांतीसाठी मंत्रजप करवा आणि नेहमी ब्राह्मणांना जेवू घालाल तर बहुधा नवग्रहांची विघ्ने दूर होतील.' येथे ते 'अनुमान' शब्द अशासाठी वापरतात की एवढे सारे करूनही मुलगा मेलाच तर त्यांना असे म्हणता यावे की, 'आम्ही काय करणार? परमेश्वरापुढे कोणाचे काय चालणार? आम्ही तर खूप खटपट केली आणि तुम्हीही करवून घेतली. पण त्याचे कर्म तसचे होते!' आणि जर योगायोगाने मुलगा वाचला तर, तर ते म्हणणार, 'बघा आमचे मंत्र, देवता आणि ब्राह्मण यांचे केवढे सामर्थ्य आहे! यांनी तुमच्या मुलाचा जीव वाचविला.' अशा वेळी त्यांच्या जपाने व मंत्रपाठाने मुलाचे प्राण वाचले नाहीत तर त्या लबाड माणसांकडून दुप्पट-तिप्पट रुपये वसूल केले पाहिजेत आणि मूल वाचले तरीही पैसे वसूल केले पाहिजेत. कारण ज्योतिषबुवांनी सांगितले होते की, 'याचे कर्म आणि परमेश्वराचे नियम मोडण्याचे सामर्थ्य कोणातच नाही.' त्या गृहस्थानेही असे म्हणावे की, 'हा आपल्या कर्मामुळे आणि परमेश्वराच्या नियमामुळे वाचला आहे; तुमच्या प्रयत्नांमुळे नव्हे.' तसेच गुरू वगैरेही दानपुण्य करायला लावून ते स्वत: सारे घेत असतील तर त्यांनाही ज्योतिषीबुवांना जे उत्तर दिले तसेच उत्तर दिले पाहिजे.

## मंत्र-तंत्र

आता शीतळा (देवी रोगाची देवता) आणि मंत्र, तंत्र, यंत्र इत्यादींच्या बाबतीतही हे लोक अशीच सोंगे-ढोंगे करतात. कोणी म्हणतो, 'आम्ही मंत्र म्हणून गंडादोरा किंवा यंत्र वगैरे तयार करून दिल्यास आमचे देव आणि पीर त्या मंत्रयंत्राच्या प्रतापाने त्याला काही विघ्नबाधा होऊ देत नाहीत.' त्यांनाही असेच विचारले पाहिजे की, 'तुम्ही मृत्यू, परमेश्वराचे नियम आणि कर्मफळ यांच्यापासून रक्षण करू शकता काय? तुम्ही हे सारे करता तरीपण कितीतरी मुले मरतात. किंबहुना खुद्द तुमच्या घरची मुलेही मरतात. तुम्ही कुणाचे मरण टाळू शकता काय?' यावर ते लबाड लोक काहीही बोलू शकत नाहीत; आणि येथे आपली डाळ शिजणार नाही असे समजतात. म्हणून हे सर्व खोटे व्यवहार सोडून देऊन धार्मिक, सर्व देशाचे उपकारकर्ते, निष्कपट वृत्तीने सर्वांना विद्या देणारे, उत्तम विद्वान लोक जसे जगावर उपकार करतात तसे त्यांच्यावरही उपकार करावेत. हे काम कधीही

सोडू नये. जे लोक रसायन, जारण, मारण, मोहन, उच्चाटण, वशीकरण वगैरे लीला करतात तेही अत्यंत पामर आहेत असे समजले पाहिजे.

## वीर्य रक्षण

वरील सगळ्या गोष्टी खोट्या आहेत हे मुलांना लहानपणीच पटवून दिले पाहिजे. म्हणजे आपली मुले कोणत्याही भ्रमात सापडून दु:खी होणार नाहीत. वीर्याचे रक्षण केल्याने आनंद मिळतो आणि वीर्यनाश हा दु:खाला कारणीभूत होतो याची जाणीव करून दिली पाहिजे. उदाहरणार्थ, 'बघा, ज्याच्या शरीरात वीर्य सुरक्षित राहते त्याचे आरोग्य, बुद्धि, बळ, पराक्रम वाढून खूप सुख मिळते. वीर्यरक्षणाची रीत अशी आहे की विषयवासनेच्या गोष्टी बोलू-ऐकू नयेत. विषयी लोकांची संगत धरू नये, विषयवासनेचे चिंतन करू नये, स्त्रीचे दर्शन, एकांतसेवन, संभाषण व स्पर्श वगैरे गोष्टी ब्रह्मचाऱ्यांनी टाळून उत्तम शिक्षण व पूर्ण विद्या मिळवावी. असे तुम्हीही वागावे. ज्याच्या शरीरात वीर्य नसते तो नपुंसक महाकुलक्षणी असतो आणि ज्याला प्रमेह (परमा) रोग होतो तो दुर्बळ, निस्तेज, निर्बुद्ध बनतो. त्याच्यातील उत्साह, साहस, धैर्य, बळ, पराक्रम वगैरे गुण नाहीसे होऊन तो स्वत: नष्ट होतो. तुम्ही जर यावेळी उत्तम शिक्षण घेतले नाही, विद्या मिळविली नाही, वीर्याचे रक्षण केले नाही तर या जन्मात पुन: तुम्हाला अशी सुवर्णसंधी मिळणार नाही. जोपर्यंत आम्ही गृहस्थाश्रमातील कर्तव्ये पार पाडणारे जिवंत आहोत तोपर्यंत तुम्ही विद्याध्ययन केले पाहिजे व शरीरसामर्थ्य वाढविले पाहिजे.' अशाच प्रकारचा इतरही उपदेश आई वडिलांनी मुलांना करावा.

म्हणूनच वरील वचनात 'मातृमान् पितृमान्' हे शब्द आले आहेत. याचा अर्थ असा की मुलाच्या जन्मापासून पाचव्या वर्षापर्यंत मुलांना मातेने आणि वयाच्या सहाव्या वर्षापासून आठव्यावर्षापर्यंत पित्याने शिक्षण द्यावे. नवव्या वर्षाच्या प्रारंभी द्विजांनी आपल्या मुलांचे उपनयन (मुंज) करून त्यांना आचार्यकुलात म्हणजे जेथे पूर्ण विद्वान पुरुष व पूर्ण विदुषी स्त्रिया विद्यादान करतात, तेथे मुलांना व मुलींना पाठवावे आणि शुद्रादि वर्णाच्या लोकांनी उपनयन न करता विद्याभ्यासासाठी मुलांना गुरुकुलात पाठवावे. जे लोक शिक्षणाच्या बाबतीत मुलांचे लाड न करता त्यांना शिक्षा करतात त्यांचीच मुले विद्वान, सभ्य व सुशिक्षित बनतात. याला व्याकरण महाभाष्याचा पुढील आधार आहे :-

**सामृतैः पाणिभिर्घ्नन्ति गुरवो न विषोक्षितैः ।**
**लालनाश्रयिणो दोषास्ताडनाश्रयिणो गुणाः ॥** व्या. महा. अ. ८। आ. १। श्लो. ८

अर्थ :- जे आई-वडील आणि आचार्य मुलांना व शिष्यांना ताडन (शिक्षा) करतात ते जणू आपल्या मुलांना व शिष्यांना आपल्या हातांनी अमृत पाजतात; आणि जे मुलांचे किंवा शिष्यांचे लाड करतात ते आपल्या मुलांना व शिष्यांना विष पाजून त्यांचा नाश करतात. कारण लाडाने मुले व शिष्य दुर्गुणी आणि शिक्षेने (ताडनाने) सद्‌गुणी बनतात. मुले आणि शिष्य यांनीही शिक्षा झाल्यास त्याबद्दल वाईट वाटून न घेता आनंदच मानावा आणि लाड झाल्यास त्याचे दु:ख मानावे. मात्र माता, पिता आणि अध्यापक यांनी मनात ईर्ष्या व द्वेष बाळगून शिक्षा करू नये. वरून त्यांनी भीति दाखवावी. परंतु मनातून त्यांच्यावर कृपादृष्टी ठेवावी.

## सदाचाराचे शिक्षण

इतर शिक्षणाप्रमाणेच चोरी, जारी, आळस, प्रमाद, मादक पदार्थ सेवन, मिथ्या भाषण, हिंसा, क्रौर्य, ईर्ष्या, द्वेष, मोह इत्यादी दोष मुलांनी सोडावेत व सत्याचरण करावे, अशी शिकवण त्यांना द्यावी. कारण एखाद्या व्यक्तीने एकदा जरी चोरी, जारी, मिथ्या भाषण अशासारखी गोष्ट केली तरी तिच्या मृत्यूपर्यंत तिला प्रतिष्ठा मिळत नाही. केलेली प्रतिज्ञा मोडल्याने जसे नुकसान होते तसे नुकसान इतर कोणत्याही गोष्टीने होत नाही. म्हणून ज्याच्या समोर जी काही प्रतिज्ञा केली असेल त्याच्या समोर ती जशीच्या तशी पूर्ण केली पाहिजे. उदाहरणार्थ, एखाद्याने दुसऱ्याला सांगितले की, 'मी तुला अमुक वेळी भेटेन किंवा तू मला अमुक वेळी भेट किंवा अमुक वस्तू मी अमुक वेळी तुला देईन.' तसे त्याने केले नाही तर त्याच्यावर कोणी विश्वास ठेवणार नाही. म्हणून प्रत्येकाने नेहमीच खरे बोलावे व दिलेला शब्द पाळावा. कोणीही गर्व करू नये. कारण 'अभिमानः श्रियं हन्ति' असे विदुरनीतीचे वचन आहे. अभिमान म्हणजे अहंकार हा सारी शोभा व लक्ष्मी यांचा नाश करतो. म्हणून गर्व करू नये. फसवाफसवी, कपट व कृतघ्नता यामुळे आपलेच हृदय दुःखी होते; मग इतरांची काय कथा ? आत एक व बाहेर एक असणे, दुसऱ्यास मोहात अडकविणे आणि दुसऱ्याचे काय नुकसान होईल याची पर्वा न करता आपला स्वार्थ साधणे याला फसवणूक व कपट असे म्हणतात. कोणी केलेले उपकार न स्मरणे म्हणजे कृतघ्नता होय. क्रोध वगैरे दुर्गुण आणि कटुवचन सोडून देऊन माणसाने शांत व मधुरवचनच बोलावे आणि फार बडबड करू नये. जेवढे बोलावयास हवे त्याहून कमी अथवा जास्त बोलू नये. मोठ्यांना मान द्यावा. ते समोर येताच आपण उठून त्यांना उच्चासनावर बसवावे आणि प्रथम 'नमस्ते' करावे. त्यांच्यासमोर उत्तमासनावर बसू नये. सभेमध्ये जेथून कोणी आपल्याला उठविणार नाही अशा आपल्या योग्यतेच्या जागी बसावे. जेणेकरून कुणी उठविणार नाही. कोणालाही विरोध करू नये. प्रसन्नतेने गुणांचे ग्रहण व दोषांचा त्याग करावा. सज्जनांची संगत धरावी आणि दुष्टांचा त्याग करावा. आपले आई-वडील आणि आचार्य यांची तनमनधनाने व उत्तमोत्तम पदार्थांनी प्रेमपूर्वक सेवा करावी.

**यान्यस्माक ँ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि ॥** तै. उ. शिक्षा. ११

त्याचा अर्थ असा की आई-वडील व आचार्य यांनी आपल्या मुलांना व शिष्यांना नेहमी सत्याचा उपदेश करावा; आणि असेही सांगावे की आपली जी-जी धर्मयुक्त कृत्ये आहेत त्यांचे तुम्ही ग्रहण करा आणि जी-जी दुष्ट कृत्ये आहेत त्यांचा त्याग करीत जावा. जे-जे सत्य जाणाल त्याचा प्रकाश व प्रचार करा. कोणाही पाखंडी व दुराचारी माणसावर विश्वास ठेवू नका; आणि आई-वडील व आचार्य जे-जे उत्तम कार्य करण्यास आज्ञा देतील त्या आज्ञांचे पुर्णपणे पालन करावे. जसे, आई-वडिलांनी धर्म, विद्या, सदाचरण यांविषयीचे श्लोक, 'निघण्टु', 'निरुक्त', 'अष्टाध्यायी' हे ग्रंथ अथवा इतर सूत्रे किंवा वेदमंत्र तोंडपाठ करवून घ्यावेत व त्यांचा अर्थ पुनःपुनः विद्यार्थ्यांना समजावून सांगावा. जसे प्रथम समुल्लासात परमेश्वराचे व्याख्यान केले आहे त्याप्रमाणे मानून घेऊन परमेश्वराची उपासना करावी. ज्यायोगे आरोग्य, विद्या व बल प्राप्त होईल अशा प्रकारचे भोजन, वस्त्र आणि इतर व्यवहार करावेत व जेवढी भूक असेल त्यापेक्षा थोडे कमीच खावे. मद्य, मांसाचे सेवन करू नये. अज्ञात सखोल

पाण्यात जाऊ नये. कारण जलचर अथवा दुसऱ्या एखाद्या वस्तूपासून दुखापत होण्याची शक्यता असते आणि पोहायला येत नसेल तर बुडून मरण्याचीही भीती असते. **'नाविज्ञाते जलाशये'** हे मनूचे वचन आहे. माहिती नसलेल्या जलाशयात उतरून स्नान वगैरे करू नये.

**दृष्टिपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं जलं पिबेत् ।**
**सत्यपूतां वदेद्वाचं मनः पूतं समाचरेत् ।।** मनु. अ. ६। श्लो. ४६

अर्थ :- दृष्टि खाली करून उंचसखल जागा पाहून चालावे. पाणी वस्त्रगाळ करून प्यावे. सत्याने पवित्र करून वचन बोलावे. मनाने विचाराचे आचरण करावे.

**माता शत्रुः पिता वैरी येन बालो न पाठितः ।**
**न शोभते सभामध्ये हंसमध्ये बको यथा ।।** चाणक्य नीति अ. २। श्लो. ११

हे कोण्या कवीचे वचन आहे. ज्या आईबापांनी आपल्या मुलांना शिक्षण दिले नसेल ते त्यांचे पूर्णपणे वैरीच होत. ज्याप्रमाणे हंसाच्या समुदायात बगळे शोभत नाहीत त्याप्रमाणे ते विद्वानांच्या सभेत तिरस्कृत होतात आणि शोभत नाहीत. आपल्या मुलांना तनमनधनाने विद्या, धर्म, सभ्यता आणि उत्तम शिक्षण देणे हे आईवडिलांचे कर्तव्य कर्म , परमधर्म आणि कीर्तिचे कार्य आहे.

बालशिक्षणाविषयी हे थोडेसे विवेचन केले. एवढ्यावरून बुद्धीमान लोक पुष्कळ काही समजून घेतील.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते**
**सत्यार्थप्रकाशे सुभाषाविभूषिते बालशिक्षाविषये**
**द्वितीयः समुल्लासः सम्पूर्णः ।।२।।**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






## तिसरा समुल्लास

# अध्ययन व अध्यापन

## विद्या हेच खरे भूषण

आता तिसऱ्या समुल्लासात अध्ययन-अध्यापनाविषयी आम्ही लिहित आहोत. संततीस उत्तम विद्या, शिक्षण, गुण, कर्म आणि स्वभावरूपी आभूषणांनी अलंकृत करणे हे माता, पिता, आचार्य व संबंधित यांचे मुख्य काम आहे. सोने, चांदी, माणिक, मोती, मंगळ वगैरे रत्नांचे दागिने धारण केल्याने माणसाचा आत्मा कधीही सुभूषित होऊ शकत नाही. कारण आभूषणे धारण केल्याने केवळ देहाभिमान व विषयासक्ती वाढते; आणि चोरांची भीति तसेच मृत्यूचीही शक्यता असते. आपण जगात असे पाहतो की अंगावर दागिने घातल्यामुळे दुष्टांच्या हातून बालकादिंचा मृत्यूही होतो.

**विद्याविलासमनसो धृतशीलशिक्षाः सत्यव्रता रहितमानमलापहाराः।**
**संसारदुःखदलनेन सुभूषिता ये धन्या नरा विहितकर्मपरोपकाराः ॥**

ज्या पुरुषांचे मन विद्या विलासात मग्न असते, जे सच्छील व सुस्वभावी असतात, जे सत्यव्रती असून गर्व व अपवित्रता यांपासून मुक्त असतात, जे मालिन्याचा नाश करणारे, सत्योपदेश व विद्यादान यांच्या द्वारे संसारी माणसांची दुःखे दूर केल्याने सुभूषित, वेदविहित कर्मांद्वारे परोपकार करण्यात मग्न असतात, ते पुरुष व त्या स्त्रिया धन्य होत, म्हणून मुले आठ वर्षांची होताच मुलांना मुलांच्या व मुलींना मुलींच्या शाळेत घालावे. दुराचारी शिक्षक-शिक्षिकांकडून त्यांना शिक्षण न देववता पूर्ण विद्यायुक्त आणि धार्मिक वृत्तीच्या स्त्री-पुरुष अध्यापकांकडून त्यांना शिक्षण मिळणे योग्य आहे.

द्विजांनी आपल्या घरी मुलांचे उपनयन व मुलींचे यथायोग्य संस्कार करून वर सांगितलेल्या आचार्य कुलात म्हणजे मुलांना मुलांच्या व मुलींना मुलींच्या शाळेत पाठवावे. विद्याध्ययनाचे स्थान एकांत प्रदेशात असले पाहिजे आणि मुले आणि मुली यांच्या शाळा एकमेकांपासून दोन कोस दूर असल्या पाहिजेत. मुलींच्या शाळेतील शिक्षिका, नोकर सेवकादि सर्व स्त्रिया असाव्यात आणि मुलांच्या शाळेत शिक्षक, नोकर चाकर सगळे पुरुष असावेत. मुलींच्या शाळेत पाच वर्षाचा मुलगा आणि मुलांच्या शाळेत पाच वर्षांची मुलगी ही जाता

कामा नये. मुले व मुली जोपर्यंत ब्रह्मचारी व ब्रह्मचारिणी राहतील तो पर्यंत स्त्रीचे किंवा पुरुषांचे दर्शन, स्पर्शन, एकांतसेवन, भाषण, विषयवासनेच्या गोष्टी, परस्पर क्रीडा, विषयवासनेचे चिंतन आणि परस्परांचा संग या आठ प्रकारच्या मैथुनांपासून त्यांनी अलिप्त राहावे. अध्यापकांनी त्यांना या गोष्टीपासून सुरक्षीत ठेवावे. त्यायोगे उत्तम विद्या, शिक्षण, शील, स्वभाव, शरीर व आत्मा सामर्थ्यवान होऊन त्यांना आपला आनंद सतत वृद्धिंगत करता येईल.

शाळेपासून गांव अथवा शहर एक योजन म्हणजे चार कोस दूर असावे. शाळेत सर्वांना समान अन्न, वस्त्र, निवारा आसनादी दिले जावे. मग तो राजकुमार असो की राजकुमारी असो किंवा गरिबाची मुले असोत. सर्वांनी तपस्वी बनले पाहिजे. त्यांच्या आईबापांनी आपल्या मुलांना अथवा मुलांनी आपल्या आईबापांना भेटता कामा नये अथवा एकमेकांशी कसलाही पत्रव्यवहार करता कामा नये. त्यामुळे सांसारिक चिंतेपासून मुक्त होऊन त्यांना आपल्या केवळ विद्याभ्यासाची काळजी करता येईल. ते जेव्हा प्रवासाला जातील तेव्हा त्यांच्या बरोबर त्यांच्या शिक्षकांनी राहिले पाहिजे. त्यामुळे ते कसल्याही वाईट गोष्टी, आळस आणि चुका करणार नाहीत.

**कन्यानां सम्प्रदानं च कुमाराणां च रक्षणम् ॥** मनु. अ. ७। श्लो. १५२

याचा अर्थ असा की वयाच्या पाचव्या अथवा आठव्या वर्षानंतर आपल्या मुलामुलींना आईबाप घरी ठेवू शकणार नाहीत, असा राजनियम व लोकनियम असला पाहिजे जेणेकरून त्यांना शाळेत पाठवितील. जे आईबाप मुलांना शाळेत पाठविणार नाहीत. त्यांना शिक्षा झाली पाहिजे. मुलांची पहिली मुंज घरी आणि दुसरी पाठशाळेत आचार्य कुलात व्हावी. माता पिता, अथवा अध्यापक यांनी मुलांना व मुलींना अर्थासह गायत्री मंत्राचा उपदेश द्यावा तो मंत्र असा -

## गायत्री-मन्त्र

**ओ३म् भूर्भुवः स्वः। तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात् ॥** यजु. ३६। ३

या मंत्रात प्रारंभी जो ओ३म् आहे. याचा अर्थ प्रथम समुल्लासात दिला आहे. तेथे तो पाहावा. आता तीन महाव्याहृतींचे अर्थ थोडक्यात देत आहे. **'भूरिति वै प्राणः'** यः प्राणयति चराऽचरं जगत् स भूः स्वयंभूरीश्वरः जो सर्व जगाच्या जीवनाचा आधार, प्राणाहून प्रिय आणि स्वयंभू आहे त्या प्राणाचा वाचक असल्याने 'भूः' हे परमेश्वराचे नाव आहे. **'भुवरित्यपानः'** 'यः सर्वं दुःखमपानयति सोऽपानः' जो सर्व दुःखांनी रहित आहे, ज्याच्या संगतीने जीव सर्व दुःखांपासून मुक्त होतात. म्हणून त्या परमेश्वराचे नाव 'भुवः' आहे. **'स्वरिति व्यानः'** 'यो विविधं जगद् व्यानयति व्याप्नोति स व्यानः' जो नानाविध जगात व्याप्त होऊन सर्वांचे धारण करीत आहे म्हणून त्या परमेश्वराचे नाव 'स्वः' आहे. ही तीन्ही वचने तैत्तिरीय आरण्यकातील आहेत.

(सवितुः) 'यः सुनोत्युपादयति सर्वं जगत् स सविता तस्य' जो सर्व जगाचा उत्पादक आणि सर्व ऐश्वर्य देणारा आहे, (देवस्य) 'यो दीव्यति दीव्यते वा स देवः' जो सर्व सुखें देणारा आहे आणि ज्याच्या प्राप्तीची इच्छा सर्व करतात. परमेश्वराचे जे (वरेण्यम्) 'वर्त्तुमर्हम्' स्वीकार करण्यास योग्य अतिश्रेष्ठ (भर्गः) 'शुद्धस्वरूपम्' शुद्धस्वरूप आणि पवित्र करणारा चेतन ब्रह्मस्वरूप आहे (तत) त्याच परमेश्वराच्या स्वरूपाला आम्ही (धीमहि)

'धरेमहि' धारण करावे. कशासाठी ? अशासाठी की (यः) 'जगदीश्वरः' जो सविता देव परमेश्वर (नः) 'अस्माकम्' आमच्या (धियः) 'बुद्धी' बुद्धींना (प्रचोदयात्) 'प्रेरयेत्' प्रेरणा करो. म्हणजे वाईट कृत्यांपासून सोडवून चांगली कामे करण्यास प्रवृत्त करो.

'हे परमेश्वर! हे सच्चिदानन्दानन्तस्वरूप! हे नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव! हे अज निरञ्जन निर्विकार! हे सर्वान्तर्यामिन्! हे सर्वाधार जगत्पते सकलजगदुत्पादक! हे अनादे! विश्वम्भर! सर्वव्यापिन्! हे करुणामृतवारिधे! सवितुर्देवस्य तव यदों भूर्भुवः स्वर्वरेण्यं भर्गोऽस्ति तद्वयं धीमहि दधीमहि धरेमहि ध्यायेम वा कस्मै प्रयोजनायेत्यत्राह। हे भगवन्! यः सविता देवः परमेश्वरो भवन्नस्माकं धियः प्रचोदयात्, स एवास्माकं पूज्य उपासनीय इष्टदेवो भवतु नातोऽन्यं भवत्तुल्यं भवतोऽधिकं च कञ्चित् कदाचिन्मन्यामहे।'

हे मनुष्यानो! जो सर्व समर्थामध्ये समर्थ, सच्चिदानन्दानन्तस्वरूप, नित्य शुद्ध, नित्य बुद्ध, नित्य मुक्त स्वभावी, कृपासागर, यथायोग्य न्याय करणारा, जन्ममरणादि क्लेशरहित, आकाररहित, सर्वांची अंतःकरणे जाणणारा, सर्वांचा धर्ता (धारण करणारा) पिता, उत्पादक, अन्नादींनी विश्वाचे पोषण करणारा, सकल ऐश्वर्ययुक्त, जगाचा निर्माता, शुद्धस्वरूप असून प्राप्तीची कामना करण्यास योग्य आहे; त्या परमेश्वराचे जे शुद्ध चेतनस्वरूप आहे तेच आम्ही धारण करावे. याचा उद्देश असा की आमचा आत्मा आणि बुद्धी यांचा अंतर्यामीस्वरूप असलेल्या त्या परमेश्वराने आम्हांला दुराचार व अधर्मयुक्त मार्गापासून दूर करून श्रेष्ठाचारी व सत्यमार्गाने चालवावे. त्याला सोडून दुसऱ्या कोणत्याही वस्तूचे ध्यान आम्ही करू नये. कारण त्याच्या बरोबरीचा अथवा त्याच्याहून मोठा, असा कोणीही नाही. तोच आमचा पिता, राजा, न्यायाधीश व सर्व सुखे देणारा आहे.

अशा प्रकारे गायत्री मंत्राचा उपदेश करून संध्योपासनाच्या क्रिया जे स्नान, आचमन, प्राणायाम वगैरे आहेत त्या शिकवाव्या. प्रथम स्नान अशासाठी की त्यायोगे शरीराच्या बाह्य अवयवांची शुद्धी होते आणि आरोग्य प्राप्त होते. याला आधार :-

**अद्भिर्गात्राणि शुध्यन्ति मनः सत्येन शुध्यति।**
**विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति॥** मनु. अ. ५। श्लो. १०९

हा मनुस्मृतीतील श्लोक आहे. पाण्याने शरीराचे बाह्य अवयव, सत्याचरणाने मन, विद्येने आणि तपाने म्हणजे सर्व प्रकारचे कष्ट देखील सहन करून धर्माचरण केल्याने जीवात्मा, ज्ञानाने म्हणजे पृथ्वीपासून परमेश्वरापर्यंतच्या सर्व पदार्थांच्या विवेकाद्वारे बुद्धी व दृढनिश्चय हे पवित्र बनतात. म्हणून जेवणापूर्वी स्नान अवश्य केले पाहिजे.

## प्राणायाम

दुसरा 'प्राणायाम' त्या बाबतीतील प्रमाण असे आहे :-

**प्राणायामादशुद्धिक्षये ज्ञानदीप्तिराविवेकख्यातेः॥** योग. पा. २। सू. २

हे योगशास्त्रातील सूत्र आहे. जेव्हा माणूस प्राणायाम करतो तेव्हा क्षणोक्षणी उत्तरोत्तर अशुद्धीचा नाश व ज्ञानाचा प्रकाश होत जातो. जो पर्यंत मुक्ती होत नाही तो पर्यंत त्याच्या आत्म्याचे ज्ञान सतत वाढत जाते.

**दह्यन्ते ध्मायमानानां धातूनां च यथा मलाः ।**
**तथेन्द्रियाणां दह्यन्ते दोषाः प्राणस्य निग्रहात् ॥** मनु. अ. ३।श्लो. ७२

हा मनुस्मृतीतील श्लोक आहे. ज्या प्रमाणे अग्नीत तापविल्याने सुवर्णादी धातूंतील मळ नष्ट होऊन ते शुद्ध होतात त्या प्रमाणे प्राणायाम केल्याने मन आदी इंद्रियांचे दोष क्षीण होऊन ती निर्मळ बनतात.

## प्राणायामाचा विधि

**प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य ।** योगसूत्र पा. १।सू. ३४

ज्या प्रमाणे अति वेगाने वमन झाल्यास पोटातील अन्न व पाणी बाहेर पडते त्या प्रमाणे प्राणाला वेगाने बाहेर फेकून यथाशक्ती बाहेरच रोखून धरावे. जेव्हा बाहेर काढावयाचे असेल तेव्हा मूलेंद्रियाला वर ओढून वायू बाहेर फेकावा. जोपर्यंत मूलेंद्रियाला वर ओढून धरले जाते तो पर्यंत प्राण बाहेर राहतो. याच प्रमाणे प्राण जास्त वेळपर्यंत बाहेर राहू शकतो. जेव्हा गुदमरल्यासारखे होईल तेव्हा हळूहळू श्वास आत घ्यावा. परत हीच प्रक्रिया सामर्थ्य व इच्छा असेल तोपर्यंत करीत राहावे आणि त्याचवेळी मनातल्या मनात ओ३म् चा जप करीत राहिल्याने आत्मा व मन ह्यांची पवित्रता व स्थिरता होत असते.

एक 'बाह्यविषय' म्हणजे प्राणाला बाहेरच जास्त वेळ रोखून धरणे. दुसरा 'आभ्यन्तर' म्हणजे प्राणाला आतच जितका वेळ रोखून धरता येईल तितका वेळ रोखून धरणे. तिसरी 'स्तम्भवृत्ति' म्हणजे एकदाच जेथल्या तेथे प्राणाला यथाशक्ती रोखून धरणे. चौथा प्रकार 'बाह्याभ्यन्तराक्षेपी'. म्हणजे प्राण आतून बाहेर जाऊ लागतो तेव्हा त्याच्या विरुद्ध त्याला बाहेरुन आत घ्यावे आणि तो बाहेरुन आत येऊ लागताच त्याला आतून धक्का मारून बाहेरच थोपवून धरावयाचे. अशा प्रकारे एकमेकांच्या विरुद्ध क्रिया केल्यास श्वास व उच्छ्वास यांची गती थांबून प्राण आपल्या स्वाधीन होतो. त्यायोगे मन व इंद्रिये ही आपल्या स्वाधीन राहतात. बळ व पुरुषार्थ वाढून बुद्धी तीव्र व सूक्ष्मरूप होत जाते त्यामुळे ती अत्यंत अवघड व सूक्ष्म विषयही चटकन ग्रहण करते. त्यायोगे माणसाच्या शरीरातील वीर्य संचय वाढतो आणि त्याला स्थिर बळ, पराक्रम व जितेंद्रियता प्राप्त झाल्याने तो थोड्याच काळात सर्व शास्त्र समजून प्रकट करण्यात प्रवीण होतो. अशाच प्रकारे स्त्रीनेही योगाभ्यास करावा. भोजन, कपडालत्ता, बसणे, उठणे, बोलणे, चालणे, लहानमोठ्यांशी योग्य प्रकारे वागणे या बाबतीत उपदेश करावा.

## ब्रह्मयज्ञ

संध्योपासनेला ब्रह्मयज्ञ असेही म्हणतात. तळहातावर 'आचमन' तेवढ्याच जलाने करावयाचे असते. जेवढे पाणी एका घोटात घशातून हृदयापर्यंत जाऊन पोहोचेल तेवढे तळहातावर घेऊन तळव्याचे मूळ व मध्यभाग यांना ओठ लावून ते पाणी प्राशन करावे. त्याहून जास्त अथवा कमी पाणी घेऊ नये. त्यायोगे घशातील कफ व पित्त निवृत्ति थोडी फार होते. त्यानंतर 'मार्जन' म्हणजे मधले व करंगळीच्या जवळचे बोट (मध्यमा व अनामिका) यांच्या टोकांनी डोळे वगैरे अवयवांवर पाणी शिंपडावे, त्याने आळस दूर होतो. आळस नसेल व पाणी नसेल तर मार्जन करू नये. त्यानंतर समंत्रक प्राणायाम, मनसापरिक्रमण, उपस्थान नंतर परमेश्वराची

स्तुती, प्रार्थना व उपासना यांची रीत शिकवावी. मग 'अघमर्षण' म्हणजे पाप करण्याची इच्छा देखील कधीही मनात येऊ देऊ नये. ही संध्योपासना एकांत स्थळी एकाग्रचित्ताने करावी.

**अपां समीपे नियतो नैत्यकं विधिमास्थित: ।**

**सावित्रीमप्यधीयीत गत्वारण्यं समाहित: ॥** मनु. अ. २। श्लो. १०४

हे मनुस्मृतीतील वचन आहे. अरण्यात म्हणजे एकांत ठिकाणी जाऊन, सावधान होऊन, जलाशया जवळ राहून सावित्री म्हणजे गायत्री मंत्राचा उच्चार अर्थ समजून आणि त्याप्रमाणे आपले आचरण ठेऊन नित्य कर्मे करावीत परंतु हे मनातून करणे उत्तम होय.

## देवयज्ञ

दुसरा देवयज्ञ. हा अग्निहोत्र आणि विद्वानांचा सत्संग व सेवा इत्यादींच्या द्वारे होतो. संध्या आणि अग्निहोत्र सकाळी व संध्याकाळी असे दोनचवेळा करावे. दिवस व रात्र यांचे दोनच संधिकाळ असतात. इतर नाही. कमीत कमी एक तास ध्यान अवश्य करावे. ज्याप्रमाणे योगीजन समाधिस्थ होऊन परमेश्वराचे ध्यान करतात तशीच संध्योपासनाही करीत असावे. तसेच सूर्योदयानंतर आणि सूर्यास्ताच्या आधी, अग्निहोत्र करण्याची वेळ आहे. त्यासाठी धातूची किंवा मातीची वेदी बनवावी. ही वेदी वरच्या बाजूस १२ किंवा १६ अंगुळे चौकोनी व तितकीच खोल आणि तळाशी ३ किंवा ४ अंगुळे रुंद असावी. या प्रमाणात वेदी बनवावी. (१२ अंगुळे म्हणजे एकवीत) वरच्या बाजूस जेवढी रुंद असेल त्याच्या एक चतुर्थांश रुंदी तळाशी असावी. तिच्यामध्ये चंदन, पळस किंवा आंबा यांसारख्या श्रेष्ठ काष्ठांचे तुकडे वेदीच्या आकाराचे कापून रचावेत. त्यांच्या मध्यभागी अग्नी ठेवून पुन: त्यावर समिधा म्हणजे वर सांगितलेले लाकडाचे तुकडे रचावेत. एक प्रोक्षणीपात्र असे आणि तिसरे प्रणीतापात्र तसेच एक अशा प्रकारची आज्यस्थाली म्हणजे तूप ठेवण्याचे भांडे व चमचा हे सोने, चांदी, अथवा लाकूड यांचा बनवून घ्यावा. प्रणीता व प्रोक्षणी पात्र पाणी ठेवण्यासाठी व हात धुण्यासाठी पाणी घेणे सुलभ व्हावे यांकरिता आहेत. नंतर ते तूप नीट पाहून घ्यावे आणि पुढील मंत्रांनी होम करावा:-

**ओं भूरग्नये प्राणाय स्वाहा । भुवर्वायवेऽपानाय स्वाहा । स्वरादित्याय व्यानाय स्वाहा । भूर्भुव: स्वरग्निवाय्वादित्येभ्य: प्राणापानव्यानेभ्य: स्वाहा ॥** इ. अग्निहोत्राचा प्रत्येक मंत्र म्हणून एक-एक आहुती द्यावी. जास्त आहुत्या द्यावयाच्या असल्यास,

**विश्वानि देव सवितर्दुरितानि परा सुव । यद्भद्रं तन्न आ सुव ॥** यजु. अ. ३०। मं. ३

हा मंत्र आणि पूर्वोक्त गायत्री मंत्र म्हणून आहुती द्यावी. 'ओं' 'भू:' व 'प्राण' वगैरे सर्व परमेश्वराची नावे आहेत, त्यांचे अर्थ पूर्वी सांगितले आहेत. 'स्वाहा' या शब्दांचा अर्थ हा आहे की आत्म्यामध्ये जसे ज्ञान असेल तसेच वाणीने बोलावे, त्याहून वेगळे बोलू नये. ज्या प्रमाणे परमेश्वराने सर्व प्राण्यांच्या सुखासाठी या जगातील सर्व पदार्थ निर्माण केले आहेत त्या प्रमाणे माणसांनीही परोपकार केला पाहिजे.

## होमाचे फळ

**(प्रश्न)** होमाने काय उपकार होतो ?

**(उत्तर)** सर्व लोक जाणतात की दुर्गंध युक्त वायु व पाणी यांपासून रोग होतात. रोगांमुळे प्राण्यांना

दुःख होते. याउलट सुगंधित वायु व पाणी यांच्या पासून आरोग्य प्राप्त होते आणि रोग नष्ट झाल्याने सुख प्राप्त होत असते.

**(प्रश्न)** चंदन वगैरे घासून ते कुणाच्या अंगाला लावले अथवा तूप वगैरे खावयास दिले तर तो मोठा उपकार होईल. परंतु चंदन व तूप अग्नीत जाळून व्यर्थ नष्ट करणे ही काही शहाणपणाची गोष्ट नाही.

**(उत्तर)** तुम्हांला पदार्थविज्ञानाचे ज्ञान असते तर तुम्ही असे कधीच बोलला नसता. कारण कोणत्याही द्रव्याचा नाश होत नसतो. असे पाहा, जेथे होम होतो. तेथून दूर असणाऱ्या ठिकाणच्या पुरुषाचे नाक सुगंध ग्रहण करते. तसेच ते दुर्गंधही ग्रहण करते. यावरून समजून घ्या की अग्नीत टाकलेला पदार्थ सूक्ष्म होऊन प्रसारीत होऊन वायुबरोबर दूरवर जाऊन दुर्गंधाचा नाश करतो.

**(प्रश्न)** असे असेल तर केशर, कस्तुरी, सुगंधी फुले, अत्तरे वगैरे घरात ठेवण्याने वायू सुगंधित होऊन सुखकारक होईल.

**(उत्तर)** त्या सुगंधात ते सामर्थ्य नसते. त्यामुळे घरातील दूषित वायु बाहेर काढून शुद्ध वायु आत घेणे शक्य होत नाही. कारण त्यामध्ये ती भेदक शक्ती नसते, ते सामर्थ्य अग्नीमध्ये असते. तो दूषित वायु व दुर्गंधयुक्त पदार्थ यांना छिन्नभिन्न व हलके बनवून बाहेर काढतो व पवित्र वायुला आत प्रविष्ठ करतो.

**(प्रश्न)** तर मग मंत्र म्हणून होम करण्याचे काय प्रयोजन ?

**(उत्तर)** मंत्रांमध्ये जी वर्णने आहेत त्यांच्यावरून होमाचे फायदे कळतात आणि मंत्र वारंवार म्हटल्याने ते तोंडपाठ होतात. शिवाय वेदग्रंथांचे पठण-पाठण व रक्षणही होते.

**(प्रश्न)** हा होम केला नाही तर पाप लागते काय ?

**(उत्तर)** होय, कारण ज्या माणसाच्या शरीरापासून जेवढा दुर्गंध उत्पन्न होऊन हवा व पाणी दूषित करून रोगांच्या उत्पत्तीचे निमित्त होऊन प्राण्यांना दुःख पोहचते, तेवढ्या प्रमाणात त्या माणसाला पाप लागते. म्हणून त्या पापाच्या निवारणार्थ तेवढा किंवा त्याहून अधिक सुगंध हवेत व पाण्यात पसरविला पाहिजे परंतु एखाद्या व्यक्तीला खाऊपिऊ घातल्याने फक्त तिलाच विशेष सुख मिळते. एक मनुष्य जेवढे तूप व सुगंधी पदार्थ यांचे सेवन करतो तेवढ्या द्रव्याच्या होमाने लाखो मनुष्यांवर उपकार होतो. अर्थात माणसांनी तूप वगैरे उत्तम पदार्थ खाल्ले नाहीत तर त्यांचे शरीर व आत्मा यांचे बळ वाढणार नाही. म्हणून उत्तमोत्तम पदार्थ खाणे व खाऊ घालणे हे ही इष्टच आहे. तरीपण होम करणे अधिक उचित व म्हणून अत्यावश्यक आहे.

**(प्रश्न)** प्रत्येक माणसाने किती आहुती द्यावी ? एका-एका आहुतीचे परिमाण काय असावे ?

**(उत्तर)** प्रत्येक व्यक्तीने सोळा सोळा आहुत्या द्याव्यात. प्रत्येक आहुतीत सहा-सहामासे वजनाचे तूप असावे. आहुतीचे हे किमान परिमाण असून त्याहून जास्त केल्यास ते चांगलेच आहे. म्हणून आर्यवरशिरोमणी, महाशयऋषि, महर्षी, राजे, महाराजे हे पुष्कळ होम करीत व करवीत असत. जोपर्यंत या होमाचा प्रचार चालू होता तोपर्यंत या आर्यावर्त्त देशात रोगाचे नाव नव्हते आणि तो सर्व सुखांनी परिपूर्ण होता. अजूनही होम प्रचलित झाला तर तशी सुस्थिती येऊ शकेल. यज्ञाचे दोन प्रकार आहेत. पहिला ब्रह्मयज्ञ यामध्ये अध्ययन-अध्यापन, संध्योपासन आणि ईश्वराची स्तुती, प्रार्थना व उपासना यांचा समावेश होतो. दुसरा देवयज्ञ यामध्ये

अग्निहोत्रापासून अश्वमेधापर्यंतचे यज्ञ आणि विद्वानांची सेवा व सत्संग यांचा समावेश होतो. तरीपण ब्रह्मचर्याश्रमात केवळ ब्रह्मयज्ञ व अग्निहोत्रच करावयाचे असते.

**ब्राह्मणस्त्रयाणां वर्णानामुपनयनं कर्त्तुमर्हति, राजन्यो द्वयस्य वैश्यो वैश्यस्यैवेति । शूद्रमपि कुलगुणसम्पन्नं मन्त्रवर्जमनुपनीतमध्यापयेदित्येके॥**

हे सुश्रुताच्या सूत्रस्थानाच्या दुसऱ्या अध्यायातील वचन आहे. ब्राह्मण हे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन्ही वर्णांना, क्षत्रिय हा क्षत्रिय व वैश्य यांना आणि वैश्य हा केवळ वैश्य वर्णाच्या लोकांना मुंज करून शिकवू शकतो. जो कुलीन शुभ गुणयुक्त शुद्र असेल तर त्यास मंत्रसंहिता सोडून सर्व शास्त्र शिकवावे. शुद्राने अध्ययन करावे. परंतु त्याचे उपनयन करू नये असे हे मत पुष्कळ आचार्यांचे आहे. नंतर शूद्राचे उपनयन आचार्यांनि करून यथायोग्य शिकवावे.

पाचव्या किंवा आठव्या वर्षापासून मुलांनी मुलांच्या शाळेत व मुलींनी मुलींच्या शाळेत जावे आणि खाली दिलेल्या नियमानुसार अध्ययनास प्रारंभ करावा :-

## ब्रह्मचर्याचा उपदेश

**षट्त्रिंशदाब्दिकं चर्य्यं गुरौ त्रैवैदिकं व्रतम् ।**
**तदर्धिकं पादिकं वा ग्रहणान्तिकमेव वा ॥** मनु. अ. ३। श्लो. १

अर्थ : आठव्या वर्षापासून छत्तीसाव्या वर्षापर्यंत एकेका वेदाचे सांगोपांग अध्ययन करण्यास प्रत्येकी बारा बारा वर्षे लागतात असे मिळून छत्तीस अधिक आठ वर्षे बरोबर चव्वेचाळीस वर्षे किंवा अठरा वर्षे ब्रह्मचर्य व आधीची आठ मिळून सव्वीस वर्षे, किंवा नवव्या वर्षापासून अध्ययन पूर्ण होईपर्यंत ब्रह्मचर्य पाळावे.

**पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्विं॰ति वर्षाणि तत्प्रात:सवनं चतुर्विंशत्यक्षरा गायत्री गायत्रं प्रात:सवनं तदस्य वसवोऽन्वायत्ता:प्राणा वाव वसव एते हीद॰सर्वं वासयन्ति ॥१॥** छा. उ. प्रपा. ३। खं. १६। व. १

हे छांदोग्य उपनिषदातील वचन आहे. ब्रह्मचर्य तीन प्रकारचे असते. कनिष्ठ ब्रह्मचर्य: जो पुरुष अन्नरसमय देह आणि पुरि म्हणजे देहात शयन करणारा जीवात्मा आहे, जो यज्ञ म्हणजे अत्यंत शुभगुणांनी युक्त व सत्कर्तव्य करतो, त्याने वयाच्या २४ वर्षापर्यंत जितेंद्रिय म्हणजे ब्रह्मचारी राहून वेदादि विद्या आणि सुशिक्षण ग्रहण करावे. आणि विवाह केल्यानंतरही त्याने लंपटपणा न केल्यास त्याच्या शरीरातील प्राण बलवान बनून सर्व शुभ गुणांचा वास करविणारे होतात. ॥१॥

**तञ्चेदेतास्मिन् वयसि किञ्चिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा वसव इदं मे प्रात:सवनं माध्यन्दिन॰सवनमनुसंतनुतेति माहं प्राणनां वसूनां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥२॥** छा. उ. प्रपा. ३। खं. १६। वं. २

आयुष्याच्या या प्रथम चरणात आचार्याने त्याला विद्याभ्यासामध्ये गुंतवावे आणि त्याला तसाच उपदेश करावा. ब्रह्मचाऱ्यानेही असा निश्चय करावा की आयुष्याच्या या प्रथम अवस्थेत जर मी कडक ब्रह्मचर्य पाळीन

तरच माझे शरीर आणि आत्मा दोन्ही निरोगी व बलवान बनतील आणि माझे प्राण शुभगुणांना धारण करणारे ठरतील. हे मनुष्यानो ! तुम्ही अशा प्रकारे सुखांचा विस्तार करा. जेणेकरून मी ब्रह्मचर्य नष्ट करू नये. २४ वर्षानंतर मी गृहस्थाश्रमात प्रवेश करीन त्यावेळी मी नक्कीच रोगरहित असेन आणि माझे आयुष्य ७०-८० वर्षांचे असेल. ॥२॥

**अथ यानि चतुश्चत्वारि९ द्वर्षाणि तन्माध्यन्दिन९ वनं चतुश्चत्वारि ९ शदक्षरा त्रिष्टुप् त्रैष्टुभं माध्यंदिन ९ सवनं तदस्य रुद्रा अन्वायत्ताः प्राणा वाव रुद्रा एते हीद ९ र्व रोदयन्ति ॥३॥** छा. उ. प्रपा. ३। खं. १६। व. ३

**मध्यम ब्रह्मचर्य :** जो मनुष्य ४४ वर्षापर्यंत ब्रह्मचारी राहून वेदाभ्यास करतो त्याचे प्राण, इंद्रिये, अंतःकरण व आत्मा बलिष्ठ बनून सर्व दुष्टांना रडविणारे व श्रेष्ठांचे पालन करणारे होतात. ॥३॥

**तं चेदेतस्मिन्वयसि किञ्चिदुपतपेत्स ब्रुयात्प्राणा रुद्रा इदं मे माध्यन्दि ९ वनं तृतीयसवनमनुसन्तनुतेति माहं प्राणानां ७ रुद्रणां मध्ये यज्ञो वा विलोप्सीयेत्युद्धैवं तत एत्यगदो ह भवति ॥४॥** छा. उ. प्रपा. ३। खं. १६। व. ४

तुम्ही सांगता त्याप्रमाणे मी या प्रथम वयात काही तपश्चर्या केली तर माझे हे रुद्ररूप प्राणयुक्त मध्यम ब्रह्मचर्य सिद्ध होईल. हे ब्रह्मचाऱ्यानो ! तुम्ही हे ब्रह्मचर्य वाढवा. ज्याप्रमाणे मी या ब्रह्मचर्याचा खंड न करता यज्ञस्वरूप बनतो आणि त्याच आचार्य कुलातून येतो व रोगरहित बनतो, जसा हा ब्रह्मचारी उत्तम कार्य करतो तसे तुम्ही करीत असावे. ॥४॥

**अथ यान्यष्टाचत्वारि ९शद्वर्षाणि तत् तृतीयसवनमष्टाचत्वारि ९ शदक्षराजगती जागतं तृतीयसवनं तदस्यादित्या अन्वायत्ताः प्राणा वावदित्या एते हीद९ सर्वमाददते ॥५॥** छां उ. प्रपा. ३ खं. १६। व. ५

**उत्तम ब्रह्मचर्य :** हे ४८ वर्षापर्यंतचे तिसऱ्या प्रकारचे ब्रह्मचर्य होय. जसा ४८ अक्षरांचा जगती छंद आहे. त्या प्रमाणे जो वयाच्या अठ्ठेचाळिस वर्षापर्यंत यथायोग्य ब्रह्मचर्याचे पालन करतो त्याचे प्राण अनुकूल बनून सर्व विद्यांचे ग्रहण करतात. ॥५॥

**तं चेदेतस्मिन् वयसि किञ्चिदुपतपेत्स, ब्रूयात् प्राणा आदित्या इदं मे तृतीय-सवनमायुरनुसन्तनुतेति माहं प्राणानामादित्यानां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत त्यगदो हैव भवति ॥६॥** छा.उ. प्रपा. ३। खं. १६। व. ६

जे आचार्य आणि मातापिता आपल्या मुलांना प्रथम वयात विद्या व गुणग्रहण करण्यासाठी तपस्वी बनवितात व त्याचाच उपदेश करतात; आणि जी मुले स्वयं अखंडित ब्रह्मचर्याचे पालनाने व तिसऱ्या उत्तम ब्रह्मचर्याचे सेवन करून पूर्ण म्हणजे चारशे वर्षांचे आयुष्य वाढवितात त्या प्रमाणे तुम्हीही आपले आयुष्य वाढवा. कारण जे लोक हे ब्रह्मचर्य प्राप्त केल्यावर त्याला खंडित करीत नाहीत ते सर्व प्रकारे निरोगी बनून धर्म, अर्थ, काम व मोक्ष प्राप्त करतात ॥६॥

## विवाहाचा काळ

**चतस्रोऽवस्थाः शरीरस्य वृद्धिर्यौवनं सम्पूर्णता किञ्चित्परिहाणिश्चेति । आषोडशाद्वृद्धिः । आपञ्चविंशतेर्यौवनम् । आचत्वारिंशतः सम्पूर्णता । ततः किञ्चित्परिहाणिश्चेति ।**

**पञ्चविंशे ततो वर्षे पुमान् नारी तु षोडशे ।**
**समत्वागतवीर्यौ तौ जानीयात्कुशलो भिषक् ॥** सु. सूत्रस्थान १. अ. ३५। श्लो. १३

हे सुश्रुताच्या सूत्र स्थानातील वचन आहे.

या शरीराच्या चार अवस्था आहेत, एक (वृद्धि). १६ व्या वर्षापासून २५ व्या वर्षापर्यंत सर्व धातूंची वाढ होते. दुसरी (यौवन) २५ व्या वर्षाच्या अखेरपासून २६ व्या वर्षाच्या प्रारंभी युवावस्थेचा प्रारंभ होतो. तिसरी (संपूर्णता) २५ व्या वर्षापासून ४० व्या वर्षापर्यंत सर्व धातूंची पुष्टी होते. चौथी (किञ्चितपरिहाणि) जेव्हा संपूर्ण शरीरातील सांगोपांग सर्व धातू पुष्ट होऊन पूर्णत्वास प्राप्त होतात. त्यांनतर जो धातू वाढतो तो शरीरात राहत नाही. तो स्वप्नावस्था व घाम वगैरे द्वारे बाहेर निघून जातो. म्हणून ४० वे वर्ष ही विवाहासाठी उत्तम वेळ होय. तरी पण ४८ व्या वर्षी लग्न करणे हे उत्तमोत्तम होय.

**(प्रश्न)** हा ब्रह्मचर्याचा नियम स्त्री आणि पुरुष या दोघांनाही समानपणे लागू होतो का ?

**(उत्तर)** नाही. पुरुष २५ व्या वर्षापर्यंत ब्रह्मचर्य पाळतो तेव्हा कन्येने १६ व्या वर्षापर्यंत ते पाळावे. पुरुष ३० व्या वर्षापर्यंत ब्रह्मचारी.राहिला तर स्त्रीने १७ व्या वर्षापर्यंत राहावे. पुरुष ३६ व्या वर्षापर्यंत ब्रह्मचारी राहिला तर स्त्रीने १८ वर्षा पर्यंत. पुरुषाने ४० वर्षापर्यंत ब्रह्मचर्याचे पालन केले तर स्त्रीने २० वर्षापर्यंत ते करावे, पुरुष ४४ वर्षापर्यंत ब्रह्मचारी राहिला तर स्त्रीने २२ वर्षे ब्रह्मचारी राहावे. पुरुषाने ४८ वर्षे ब्रह्मचर्य पाळले तर स्त्रीने २४ वर्षे ब्रह्मचर्य पाळावे. ४८ वर्षांहून अधिक पुरुषाने आणि २४ वर्षांहून अधिक स्त्रीने ब्रह्मचर्याचे पालन करू नये. अर्थात ज्यांना लग्न करावयाचे आहे अशा स्त्रीपुरुषांसाठी हा नियम आहे. ज्यांना लग्नच करावयाचे नसेल ते आमरण ब्रह्मचारी राहू शकत असतील तर त्यांनी खुशाल तसे राहावे. परंतु हे काम पूर्ण विद्या प्राप्त केलेल्या, जितेंद्रिय व निर्दोष योगी स्त्रीपुरुषांचे आहे. कामवासनेचा आवेग थोपवून धरून इंद्रियांना आपल्या ताब्यात ठेवणे हे अत्यंत अवघड काम आहे.

## यम व नियम

**ऋतं च स्वाध्यायप्रवचने च । सत्यं च स्वाध्यायप्रवचने च।**
**तपश्च स्वाध्यायप्रवचने च । दमश्च स्वाध्यायप्रवचने च।**
**शमश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च।**
**अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च। अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च।**
**मानुषं च स्वाध्यायप्रवचने च । प्रजा च स्वाध्यायप्रवचने च।**
**प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च। प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च।** तै. शिक्षावल्ली. अनु. ९

हे तैत्तिरीय उपनिषदातील वचन आहे. हे अध्ययन-अध्यापन करणाऱ्यांचे नियम आहेत. (ऋतं) यथार्थ आचरणाने शिकावे व शिकवावे. (सत्यं) सत्याचरणाने सत्यविद्यांचे अध्ययन-अध्यापन करावे. (तपः) तपस्वी म्हणजे धर्मानुष्ठान करीत वेदादि शास्त्रे शिकावी व शिकवावीत. (दमः) बाह्य इंद्रियांना दुराचरणांपासून रोखून शिकावे व शिकवावे. (शमः) मनाच्या वृत्तीला सर्व प्रकारच्या दोषांपासून अलिप्त ठेवून अध्ययन-अध्यापन करावे. (अग्नयः) आहवनीय अग्नी आणि विद्युत आदींची जाणून घेऊन शिकावे व शिकवावे. (अग्निहोत्रं) अग्निहोत्र करीत अध्ययन-अध्यापन करावे. (अतिथयः) अतिथींची सेवा करीत शिकावे व शिकवावे. (मानुषं) मानवी व्यवहार यथायोग्य करीत शिकावे व शिकवावे. (प्रजा) संतान व राज्य यांचे पालन करीत अध्ययन-अध्यापन करावे, (प्रजन) वीर्याचे रक्षण व वृद्धी करीत शिकावे व शिकवावे. (प्रजातिः) आपली मुले व शिष्य यांचे पालन करीत अध्ययन-अध्यापन करावे.

**यम पाच प्रकारचे आहेत :**

**यमान् सेवेत सततं न नियमान् केवलान् बुधः।**
**यमान्पतत्यकुर्वाणो नियमान् केवलान् भजन्॥** मनु. अ. ४। श्लो. २०४
**तत्राहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः॥** योगसूत्र पा. २। सू. ३०

अर्थ : (अहिंसा) वैरत्याग, (सत्य), खरे मानणे, खरे बोलणे व खरे करणे, (अस्तेय) मन, वचन व कर्माद्वारे होणाऱ्या चोरीचा त्याग करणे. (ब्रह्मचर्य) जननेंद्रियाचा संयम आणि (अपरिग्रह) अत्यंत लोभ व लालसा न धरणे व स्वत्व-अभिमान रहित बनणे या पाच यमांचे अवलंबन नेहमी करावे. आता नियमांचे पालन करणे, म्हणजे

**शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वर प्रणिधानानि नियमाः॥** योगसूत्र पा. २। सू. ३२

(शौच) म्हणजे स्नानादींनी पवित्रता, (सन्तोष) सम्यक प्रसन्न होऊन निरुद्यमी राहणे म्हणजे संतोष नव्हे तर होऊ शकेल तेवढा पुरुषार्थ करणे, हानी अथवा लाभ झाल्यास त्याबद्दल दुःख किंवा आनंद न मानणे, (तप) म्हणजे कष्ट सहन करूनही धर्मयुक्त कृत्यांचे अनुष्ठान करणे, (स्वाध्याय) शिकणे व शिकविणे, (ईश्वरप्रणिधान) ईश्वराची विशेष भक्ती करून आत्म्याला समर्पित ठेवणे यांना पाच नियम म्हणतात. यमांखेरीज केवळ या नियमांचे पालन करू नये. यम व नियम या दोहोंचे पालन करावे.

जो यमांचा त्याग करून फक्त नियमांचे पालन करतो त्याची उन्नती होत नाही, उलट त्याची अधोगती होते.

**कामात्मता न प्रशस्ता न चैवेहास्त्यकामता।**
**काम्यो हि वेदाधिगमः कर्मयोगश्च वैदिकः॥** मनु. अ. २। श्लो. २

अर्थ : अत्यंत कामातुरता व निष्कामता कुणासही उत्तम नसते. कारण कामना (इच्छा) बाळगली नाही तर वेदांचे ज्ञान व वेदविहित कर्मादी उत्तम कामे कोणाकडूनही होणार नाहीत. म्हणून,

**स्वाध्यायेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः**
**महायज्ञैश्चयज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः॥** मनु. अ. २। श्लो. २८

अर्थ : (स्वाध्याय) सर्व विद्यांचे अध्ययन-अध्यापन, (व्रत) ब्रह्मचर्य, सत्य भाषण आदि नियमांचे

पालन, (होम) अग्निहोत्रादी होम, सत्याचे ग्रहण, असत्याचा त्याग आणि सत्य विद्यांचे दान, (त्रैविद्येन) वेदस्थ कर्मोपासना, ज्ञान व विद्या यांचे ग्रहण, (इज्यया) पाक्षिक इष्टादि, (सुतैः) सुप्रजाजनन, (महायज्ञैः) ब्रह्म, देव, पितृ, वैश्वदेव आणि अतिथी यांची सेवारूपी पंचमहायज्ञ आणि (यज्ञैः) अग्निष्टोमादी आणि शिल्पविद्याविज्ञानादि यज्ञांचे सेवन यांच्याद्वारे या शरीराला ब्राह्मी म्हणजे वेद व परमेश्वर यांच्या भक्तीचा आधार असणारे ब्राह्मणाचे शरीर बनवले जाते. या साधनांखेरीज ब्राह्मणशरीर बनू शकत नाही.

**इन्द्रियाणां विचरतां विषयेष्वपहारिषु ।**
**संयमे यत्नमातिष्ठेद्विद्वान् यन्तेव वाजिनाम् ॥** मनु. अ. २। श्लो. ८८

अर्थ : ज्याप्रमाणे विद्वान सारथी घोड्यांना ताब्यात ठेवतो, त्याप्रमाणे मनाला व आत्म्याला असत्य, वाईट कामांमध्ये ओढणाऱ्या विषयवासनांमध्ये विचरण करणाऱ्या इंद्रियांना ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न सर्व प्रकारे करावा. कारण,

**इन्द्रियाणां प्रसङ्गेन दोषमृच्छत्यसंशयम् ।**
**सन्नियम्य तु तान्येव ततः सिद्धिं नियच्छति ॥** मनु. अ. २। श्लो. ९३

अर्थ : जीवात्मा इंद्रियांच्या आधीन होऊन नक्कीच मोठमोठ्या दोषांना अंगीकारतो. परंतु जेव्हा तो इंद्रियांवर ताबा मिळवितो तेव्हाच त्याला सिद्धी प्राप्त होते.

**वेदास्त्यागश्च यज्ञाश्च नियमाश्च तपांसि च ।**
**न विप्रदुष्टभावस्य सिद्धिं गच्छन्ति कर्हिचित् ॥** मनु. अ. २। श्लो. ९७

जो दुराचारी अजितेंद्रिय पुरुष आहे, त्याची वेद, त्याग, यज्ञ, नियम, तप व इतर चांगली कामे कधीच सिद्धीस जात नाहीत.

**वेदोपकरणे चैव स्वाध्याये चैव नैत्यके ।**
**नानुरोधोऽस्त्यनध्याये होममन्त्रेषु चैव हि ॥१॥** मनु. अ. २। श्लो. १०५

वेदांचे अध्ययन-अध्यापन, संध्योपासनादी पंचमहायज्ञ आणि होममंत्र यांमध्ये अनध्याय (सुटी) विषयक अनुरोध (आग्रह) नाही. ॥१॥

**नैत्यके नास्त्यनध्यायो ब्रह्मसत्रं हि तत्स्मृतम् ।**
**ब्रह्माहुतिहुतं पुण्यमनध्यायवषट्कृतम् ॥२॥** मनु. अ. २। श्लो. १०६

कारण नित्यकर्मांमध्ये अनध्याय नसतो. ज्याप्रमाणे श्वासोच्छ्वास सतत केला जातो, तो थांबविला जात नाही, त्याप्रमाणे नित्यकर्मे दररोज केली पाहिजेत. एक दिवसही त्यांत खंड पडता कामा नये. कारण अनध्यास दिवशीही अग्निहोत्रादी उत्तम कर्म केल्याने पुण्य मिळते. ज्याप्रमाणे खोटे बोलणे हे नेहमीच पाप असते आणि खरे बोलण्यात सदा पुण्य असते त्याचप्रमाणे वाईट कृत्ये करण्यामध्ये नेहमी अनध्याय असतो आणि चांगली कृत्ये करण्यात सदैव स्वाध्यायच असतो. ॥२॥

**अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः ।**
**चत्वारि तस्य वर्द्धन्त आयुर्विद्यायशोबलम् ॥** मनु. अ. २। श्लो. १२१

जो सदैव नम्र व सुशील असतो आणि विद्वान व वृद्ध यांची सेवा करतो त्याचे आयुष्य, विद्या, कीर्ती व बल या चार गोष्टी नेहमी वाढत राहतात. जो असे करीत नाही त्याच्या या चार गोष्टी वृद्धिंगत होत नाहीत.

**अहिंसयैव भूतानां कार्यं श्रेयोऽनुशासनम् ।**
**वाक् चैव मधुरा श्लक्ष्णा प्रयोज्या धर्ममिच्छता ॥१॥** मनु. अ. २। श्लो. १५९

विद्वान आणि विद्यार्थी यांना उचित आहे की त्यांनी वैरबुद्धी सोडून सर्व मानव कल्याणाच्या मार्गाचा उपदेश करावा; तसेच उपदेश करणाऱ्याने नेहमी मधुर, सुशीतल वाणी बोलावी. धर्माची उन्नती इच्छिणाऱ्याने नेहमी सत्याचरण करावे आणि सत्याचाच उपदेश करावा. ॥१॥

**यस्य वाङ्मनसे शुद्धे सम्यग्गुप्ते च सर्वदा ।**
**स वै सर्वमवाप्नोति वेदान्तोपगतं फलम् ॥२॥** मनु. अ.२। श्लो. १६०

ज्या मनुष्याची वाणी आणि मन सदैव शुद्ध व सुरक्षित असते त्यालाच सर्व वेदान्त म्हणजे सर्व वेदांचे सिद्धांतरूपी फळ प्राप्त होते. ॥२॥

**संमानाद् ब्राह्मणो नित्यमुद्विजेत विषादिव ।**
**अमृतस्येव चाकाङ्क्षेदवमानस्य सर्वदा ॥** मनु. अ. २। श्लो. १६२

जो ब्राह्मण सन्मानाला विषाप्रमाणे सदा घाबरतो आणि अमृताप्रमाणे अपमानाची इच्छा बाळगतो तोच समग्र वेद व परमेश्वर यांना जाणतो.

**अनेन क्रमयोगेन संस्कृतात्मा द्विजः शनैः ।**
**गुरौ वसन् संचिनुयाद् ब्रह्माधिगमिकं तपः ॥** मनु. अ. २। श्लो. १६४

याचप्रमाणे ज्याचे उपनयन झाले आहे असा द्विज ब्रह्मचारी कुमार आणि ब्रह्मचारिणी कन्या यांनी हळू-हळू वेदार्थ ज्ञानरूपी उत्तम तप वाढवीत जावे.

**योऽनधीत्य द्विजो वेदमन्यत्र कुरुते श्रमम् ।**
**स जीवन्नेव शूद्रत्वमाशु गच्छति सान्वयः ॥** मनु. अ. २। श्लो. १६८

जो कोणी वेदांचे अध्ययन करण्याऐवजी दुसऱ्याच गोष्टीसाठी श्रम करतो तो लवकरच आपल्या पुत्रपौत्रांसह शूद्रत्वास प्राप्त होतो.

## ब्रह्मचाऱ्याची विशेष कर्तव्ये

**वर्जयेन्मधुमांसञ्च गन्धं माल्यं रसान् स्त्रियः ।**
**शुक्तानि यानि सर्वाणि प्राणिनां चैव हिंसनम् ॥१॥** मनु. अ. २। श्लो. १७७

ब्रह्मचारी आणि ब्रह्मचारिणी यांनी मद्य, मांस, गंध, माला, रस, स्त्री-पुरुषसंग, आंबट पदार्थ, प्राण्यांची हिंसा करणे सोडावे. ॥१॥

**अभ्यङ्गमञ्जनं चाक्ष्णो रूपानच्छत्रधारणम् ।**
**कामं क्रोधं च लोभं न नर्तनं गीतवादनम् ॥२॥** मनु. अ. २। श्लो. १७८

अंगांचे मर्दन, विनाकारण जननेंद्रियाला स्पर्श, डोळ्यांत अंजन, पादत्राणे व छत्री यांचा वापर, काम, क्रोध, लोभ, मोह, भय, शोक, ईर्ष्या, द्वेष, नाच, गाणे व बजावणे सोडावे. ॥२॥

**द्यूतं च जनवादं च परिवादं तथानृतम्।**

**स्त्रीणां च प्रेक्षणालम्भमुपघातं परस्य च॥३॥** मनु. अ. २। श्लो. १७९

जुगार, इतरांची चर्चा व निंदा मिथ्या भाषण, स्त्रियांचे दर्शन, आश्रय, इतरांचे नुकसान वगैरे कुकर्मे कायमची सोडून द्यावीत. ॥३॥

**एकः शयीत सर्वत्र न रेतः स्कन्दयेत् क्वचित्।**

**कामाद्धि स्कन्दयन् रेतो हिनस्ति व्रतमात्मनः॥४॥** मनु. अ. २। श्लो. १८०

नेहमी एकट्याने झोपावे, कधीही वीर्यस्खलन करू नये; जो कोणी कामवासनेने वीर्यपात करील त्याने आपल्या ब्रह्मचर्यव्रताचा नाशच केला असे समजावे. ॥४॥

## गुरूचा उपदेश

**वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति।**

**सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायान्मा प्रमदः। आचार्य्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः। सत्यान्न प्रमदितव्यम्। धर्मान्न प्रमदितव्यम्। कुशलान्न प्रमदितव्यम्। स्वाध्याय प्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम्। देवपितृकार्य्याभ्यां न प्रमदितव्यम्॥१॥ मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्य्यदेवो भव। अतिथिदेवो भव। यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि। यान्यस्माकꣳ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि॥२॥ ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणास्तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यम्। श्रद्धया देयम्। अश्रद्धयाऽदेयम्। श्रिया देयम्। ह्रिया देयम्। भिया देयम्। संविदा देयम्॥३॥ अथ यदि ते कर्मवचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ये तत्र ब्राह्मणाः समदर्शिनी युक्ता अयुक्ताः अलूक्षा धर्मकामाः स्युर्यथा ते तत्र वर्त्तेरन्। तथा तत्र वर्त्तेथाः॥४॥ एष आदेश एष उपदेश एषा वेदोपनिषत्। एतदनुशासनम्। एवमुपासितव्यम्। एवमु चैतदुपास्यम्॥५॥** तैत्ति. उ. शिक्षा. अनु. ११

आचार्याने आपल्या अंतेवासियांना म्हणजे शिष्य व शिष्या यांना असा उपदेश करावा की, तू नेहमी खरे बोल, धर्माचरण कर, प्रमादरहित बनून शीक व शिकव, पूर्ण ब्रह्मचारी राहून सर्व विद्यांचे ग्रहण कर, आचार्याला प्रिय धन देऊन विवाह करून प्रजोत्पादन कर, प्रमादाने सत्याला कधी सोडू नको, प्रमादाने धर्माचा त्याग करू नको. प्रमादाने आरोग्य व चातुर्य सोडू नको. प्रमादाने अध्ययन व अध्यापन कधी सोडू नको. देव, विद्वान आणि माता-पिता इत्यादींच्या सेवेत प्रमाद करू नको. विद्वानांप्रमाणेच माता, पिता, आचार्य व अतिथी यांची सदैव सेवा कर, सत्यभाषणादि जी आनंदित धर्मयुक्त कर्मे आहेत ती तू कर. त्याउलट मिथ्याभाषणादि कर्मे कधीही करू नको. आमची जी सुचरित्रे म्हणजे धर्मयुक्त कर्मे असतील त्यांचे ग्रहण कर, आमच्या पापाचरणाचे अनुकरण कधीही करू नको. आमच्या मध्ये जे कोणी उत्तम धर्मात्मा ब्राह्मण आहे, त्यांच्याजवळ बैस आणि त्यांच्यावरच

विश्वास ठेव. श्रद्धेने द्यावे, अश्रद्धेने द्यावे, आपल्याला शोभेल असे द्यावे, लज्जेने द्यावे, भीतीने द्यावे आणि प्रतिज्ञेनेही द्यावे. जेव्हा कधी तुझ्या मनात कर्म, शील व उपासना ज्ञान यांच्या बाबतीत कसलाही संशय उत्पन्न होईल तेव्हा समदर्शी, पक्षपातरहित योगी-अयोगी, आर्द्रचित्त, धर्माची कामना करणारे, धर्मात्मे जसे धर्ममार्गावरून चालत असतील तसाच तूही वाग. हाच आदेश, हाच उपदेश, हीच वेद उपनिषदांची शिकवण आहे. याप्रमाणेच वागले पाहिजे आणि आपले आचरण सुधारले पाहिजे.

**अकामस्य क्रिया काचिद् दृश्यते नेह कर्हिचित् ।**
**यद्यद्धि कुरुते किञ्चित् तत्तत्कामस्य चेष्टितम् ॥** मनु. अ. २। श्लो. ४

माणसांनी निश्चय केला पाहिजे की, निष्काम पुरुषामध्ये नेत्रांचा संकोच व विकास होणे सुद्धा सर्वथैव असंभव आहे. यावरून असे सिद्ध होते की जे कोणी जे जे काही करतो ते ते प्रयत्न व कामना यांच्या विरहित नसते.

**आचारः परमो धर्मः श्रुत्युक्तः स्मार्त्त एव च ।**
**तस्मादस्मिन्सदा युक्तो नित्यं स्यादात्मवान् द्विजः ॥१॥** मनु. अ. १। श्लो. १०८

सांगणे, ऐकणे, ऐकविणे, शिकणे, शिकविणे यांचा निष्कर्ष हाच की वेद आणि वेदानुकूल स्मृती यांमध्ये प्रतिपादन केलेल्या धर्माचे आचरण करावे. म्हणून सदैव धर्माचरण करीत राहावे. ॥१॥

**आचाराद्विच्युतो विप्रो न वेदफलमश्नुते ।**
**आचारेण तु संयुक्तः सम्पूर्णफलभाग्भवेत् ॥२॥** मनु. अ. १। श्लो. १०९

कारण जो धर्माचरण रहित असतो त्याला वेदप्रतिपादित धर्मजन्य सुखरूपी फळ प्राप्त होऊ शकत नाही; आणि जो विद्या शिकून धर्माचरण करतो त्यालाच संपूर्ण सुख प्राप्त होते. ॥२॥

**योऽवमन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयाद् द्विजः ।**
**स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेदनिन्दकः ॥१॥** मनु. अ. २। श्लो. ११

जो वेद आणि वेदानुकूल आप्त पुरुषांनी रचलेली शास्त्रे यांचा अपमान करतो त्या वेदनिंदक नास्तिकाला जाति, पांति व देश यांतून बहिष्कृत केले पाहिजे. कारण,

**श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।**
**एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥१॥** मनु. अ. २। श्लो. १२

श्रुती वेद, स्मृती वेदानुकूल आप्तोक्त मनुस्मृती आदि शास्त्रे, सत्पुरुषांचे आचरण म्हणजे सनातन वेदांद्वारे परमेश्वर प्रतिपादित कर्मे आणि आपल्या आत्म्याला प्रिय ज्याची आत्मा इच्छा करतो जसे सत्य भाषण धर्माची चार लक्षणे आहेत. म्हणजे त्यावरूनच धर्म व अधर्म यांचा निर्णय होतो. पक्षपातरहित न्याय व सत्य यांचे ग्रहण करणारे आणि असत्याचा संपूर्ण त्याग करणारे जे आचरण त्याचेच नाव धर्म असून त्याच्या उलट असणारे पक्षपात सहित अन्यायाचरण, सत्याचा त्याग व असत्याचे ग्रहण करणारे जे कर्म त्यालाच अधर्म असे म्हणतात.

**अर्थकामेष्वसक्तानां धर्मज्ञानं विधीयते ।**
**धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः ॥** मनु. अ. २। श्लो. १३

जे पुरुष (अर्थ) सुवर्णादि रत्ने आणि (काम) स्त्रीसंग आदिमध्ये आसक्त नाहीत त्यांनाच धर्माचे ज्ञान प्राप्त होते. जे धर्मज्ञानाची इच्छा बाळगतात त्यांनी वेदांद्वारे धर्माचा निर्णय करावा. कारण धर्म आणि अधर्म यांचा निर्णय वेदांशिवाय नीट होत नाही.

## चारही वर्णांस शिक्षणाची आवश्यकता

अशा प्रकारे आचार्याने आपल्या शिष्यांना उपदेश करावा. विशेषत: राजा, इतर क्षत्रिय, वैश्य आणि उत्तम शूद्र यांच्याकडूनही त्याने विद्याभ्यास अवश्य करवून घ्यावा. कारण फक्त ब्राह्मणांनीच विद्याभ्यास केला आणि क्षत्रियादी मंडळींनी तो केला नाही तर विद्या, धर्म, राज्य, व धन यांची वृद्धी कधीही होऊ शकत नाही. कारण ब्राह्मण केवळ अध्ययन-अध्यापनाने आणि क्षत्रियादिकांकडून उपजीविकेचे साधन मिळवू शकतात. उदर निर्वाहाचे आधिन आणि क्षत्रियादिकांना आज्ञा देण्याचे व यथावत परीक्षा करून त्यांना शिक्षा देण्याचे सामर्थ्य नसल्यामुळे ब्राह्मणादी सर्व वर्ण पाखंडात फसतात; आणि जेव्हा क्षत्रियादी विद्वान बनतात तेव्हा ब्राह्मणही अधिक विद्याभ्यास करतात व धर्माच्या मार्गाने चालतात. शिवाय त्या क्षत्रियादी विद्वानांसमोर ते पाखंड व खोटेपणाही करू शकत नाहीत. जेव्हा क्षत्रियादी अविद्वान असतात तेव्हा ब्राह्मण आपल्या मनाप्रमाणे वागतात व मनात येईल तसे करतात व करायला लावतात. म्हणून आपले कल्याण व्हावे असे ब्राह्मणांना वाटत असेल तर त्यांनी क्षत्रियादिकांना वेदादी सत्यशास्त्रांचा अभ्यास करावयास लावण्यासाठी अधिक प्रयत्न करावेत. कारण क्षत्रियादी लोकच विद्या, धर्म, राज्य आणि लक्ष्मी यांची वृद्धी करणारे असतात. ते कधी भिक्षांदेही करीत नाहीत. त्यामुळे ते विद्याव्यवहाराच्या बाबतीत पक्षपातीही होऊ शकत नाहीत आणि जेव्हा सर्व वर्णांमध्ये विद्येचा व सुशिक्षणाचा प्रचार झालेला असतो तेव्हा कोणालाही पाखंडरुपी, अधर्मयुक्त मिथ्या व्यवहार चालविणे शक्य नसते. यावरून असे सिद्ध होते की क्षत्रियादिकांना नियमानुसार चालविणारे ब्राह्मण व संन्यासी असतात तर ब्राह्मण व संन्यासी यांना सुनियमानुसार चालविणारे क्षत्रियादि असतात. म्हणून सर्व वर्णांच्या स्त्रीपुरुषांमध्ये विद्या व धर्म यांचा प्रचार अवश्य झाला पाहिजे.

## सत्यासत्याची पंचविध परीक्षा

आता जे काही अध्ययन-अध्यापन होत आहे ते चांगल्या प्रकारे परीक्षा करून होणे योग्य होईल. परीक्षा पाच प्रकारांनी होत असते.

१) जे-जे ईश्वराचे गुण, कर्म, स्वभाव आणि वेदांना अनुकूल असेल ते-ते सत्य असून त्याच्या विरुद्ध असत्य आहे.

२) जे-जे सृष्टिक्रमाला अनुकूल असेल ते-ते सत्य आहे; आणि जे जे सृष्टिक्रमाच्या विरुद्ध आहे ते सर्व असत्य आहे जसे कोणी म्हटले-माता पिता संयोगाशिवाय पुत्र उत्पन्न झाला हे कथन सृष्टिक्रम विरूध्द असल्याने सर्वथा असत्य आहे.

३) 'आप्त' म्हणजे धार्मिक विद्वान, सत्यवादी, निष्कपटी यांचा सत्संग व उपदेश यांच्याशी जे काही अनुकूल असेल ते सारे ग्राह्य व प्रतिकूल असणारे ते त्याज्य आहे.

४) आपल्या आत्म्याचे पावित्र्य व विद्या यांना अनुकूल जसे मला सुख प्रिय असते व दुःख अप्रिय असते. तसेच सर्वत्र मानले पाहिजे. म्हणून मी कोणाला दुःख अथवा सुख दिल्यास तोही दुःखी अथवा आनंदी होईल, असे समजावे.

५) प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, ऐतिह्य, अर्थापत्ति, संभव आणि अभाव या आठ प्रमाणांपैकी प्रत्यक्ष प्रमाणाच्या लक्षणादींची जी सूत्रे आम्ही खाली दिली आहेत ती सर्व न्यायशास्त्राच्या प्रथम व द्वितीय अध्यायांतील समजावीत.

## अष्टविध प्रमाणांची व्याख्या

**इन्द्रियार्थ सन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारिव्यवसायात्मकं प्रत्यक्षम् ।।** न्याय. अ. १। आ. १। सू. ४

**प्रत्यक्ष प्रमाण :-** श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिह्वा व घ्राण यांचा शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांच्याशी जो अव्यवहित म्हणजे आवरणरहित संबंध असतो आणि इंद्रियांशी मनाचा व मनाशी आत्म्याचा संयोग होऊन जे ज्ञान उत्पन्न होते. त्याला प्रत्यक्ष (ज्ञान) म्हणतात. परंतु जे व्यपदेश्य म्हणजे संज्ञासंज्ञीच्या संबंधातून उत्पन्न होते ते ज्ञान प्रत्यक्ष ज्ञान नव्हे. उदाहरणार्थ, एकाने दुसऱ्याला सांगितले की, 'पाणी घेऊन ये.' त्याप्रमाणे तो पाणी आणून त्याच्या जवळ ठेवून म्हणाला की, 'हे पाणी आहे.' परंतु तेथे 'पाणी' या दोन अक्षरांची संज्ञा आणणारा किंवा मागविणारा पाहू शकत नाही. परंतु ज्या पदार्थाचे नाव पाणी असे आहे तोच प्रत्यक्ष असतो. अशा प्रकारे शब्दापासून जे ज्ञान उत्पन्न होते तो शब्द प्रमाणाचा विषय आहे. 'अव्यभिचारी' म्हणजे काय ? एखाद्याने रात्रीच्या वेळी खांब पाहून तो पुरुष आहे असे गृहीत धरले; परंतु दिवसा तो खांब पाहिल्यावर रात्रीचे पुरुषज्ञान नष्ट होऊन स्तंभज्ञान झाले. अशा विनाशी ज्ञानाला व्यभिचारी म्हणतात. प्रत्यक्ष ज्ञान असे नसते म्हणून त्याला 'अव्यभिचारी' असे म्हणतात. 'व्यवसायात्मक:' कोणी तरी दुरून नदीतील वाळू पाहून म्हणाला, 'तेथे वस्त्रे वाळत घातली आहेत की पाणी आहे की आणखी काही आहे.' किंवा 'तो देवदत्त उभा आहे की यज्ञदत्त ?' याचा अर्थ असा की जो पर्यंत नक्की काही सांगता येत नाही तोपर्यंत ते प्रत्यक्ष ज्ञान नसते. मात्र जे ज्ञान अव्यपदेश्य, अव्यभिचारी व निश्चयात्मक ज्ञान असते त्यालाच प्रत्यक्ष ज्ञान असे म्हणतात.

### दुसरे अनुमान :

**अथ तत्पूर्वकं त्रिविधमनुमानं पूर्ववच्छेषवत्सामान्यतो दृष्टश्च ।।**

न्याय. अ. १। आ. १। सू. ५

प्रत्यक्ष पूर्वक अप्रत्यक्षाचे ज्ञान म्हणजे अनुमान. एखाद्या पदार्थाचा एक देश (अवयव) अथवा संपूर्ण पदार्थ एखाद्या ठिकाणी अथवा कोणत्याही काळी प्रत्यक्ष दिसला असेल तर त्यावरून दूरस्थ सहचारी एके ठिकाणी प्रत्यक्ष झाल्याने अदृष्ट अवयवीचे जे ज्ञान प्राप्त होते त्याला अनुमान असे म्हणतात. उदाहरणार्थ मुलाला पाहून त्याच्या पित्याचे, पर्वतादी ठिकाणी धूर पाहून अग्नीचे आणि जगातील सुखदुःखे पाहून पूर्वजन्माचे ज्ञान होते. हे अनुमान तीन प्रकारचे असते.

१) 'पूर्ववत' : कारणाला पाहून जेथे कार्याचे ज्ञान होते ते पूर्ववत् अनुमान होय. उदाहरणार्थ, ढग पाहून पाऊस, विवाह पाहून संतती होणार आणि विद्याभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना पाहून त्यांस विद्या मिळणार असा निश्चय होतो.

२) 'शेषवत' : म्हणजे जेथे कार्य पाहून कारणाचे ज्ञान होते. उदाहरणार्थ, नदीचे पाणी वाढलेले पाहून वरच्या बाजूला पाऊस पडला असावा, मुलाला पाहून त्याला बाप असला पाहिजे, सृष्टीला पाहून तिचे अनादी कारण व कर्ता परमेश्वर असला पाहिजे आणि पाप-पुण्याचे आचरण पाहून ते सुख दुःखाचे कारण असले पाहिजे, असे ज्ञान होणे यालाच 'शेषवत' अनुमान म्हणतात.

३) 'सामान्यतोदुष्ट' : जेथे दोन गोष्टींमध्ये कार्यकारणभाव नसतो, परंतु एखाद्या प्रकारचे एकदुसऱ्याशी साधर्म्य मात्र असते त्याला 'सामान्यतो दुष्ट' अनुमान असे म्हणतात. उदाहरणार्थ, कोणीही चालल्याशिवाय दुसऱ्या ठिकाणी जाऊ शकत नाही. यावरुन दुसऱ्याचेही स्थानांतर चालल्या शिवाय होऊ शकत नाही. म्हणून स्थलांतरावरून गमनाचे अनुमान काढता येते. अनुमान या शब्दाचा अर्थ हाच आहे की, अनु अर्थात 'प्रत्यक्षस्य पश्चान्मीयते ज्ञायते येन तदनुमानम्' म्हणजे जे प्रत्यक्षाच्या नंतर उत्पन्न होते ते अनुमान. उदाहरणार्थ, प्रत्यक्ष धूर पाहिल्याखेरीज अदृष्ट अग्नीचे ज्ञान कधीच होऊ शकत नाही.

### तिसरे उपमान :

**प्रसिद्धसाधर्म्यात्साध्यसाधनमुपमानम् ॥** न्याय. अ. १। आ. १। सू. ६

प्रसिद्ध अशा प्रत्यक्ष पदार्थाच्या साधर्म्याने साध्य म्हणजे सिद्ध करण्यास योग्य ज्ञानाची सिद्धी करण्याचे जे साधन त्याला उपमान म्हणतात. 'उपमीयते येन तदुपमानम्' उदाहरणार्थ, एखाद्याने आपल्या नोकराला सांगितले की, 'तू देवदत्तासारख्या विष्णुमित्राला बोलावून आण' त्यावर तो नोकर म्हणाला, 'मी त्याला कधी पाहिलेलं नाही' तेव्हा त्याच्या मालकाने त्याला सांगितले, ''जसा हा देवदत्त आहे तसाच तो विष्णुमित्र आहे.'' त्याप्रमाणे जेव्हा तो तेथे गेला आणि देवदत्तासारखा दिसणारा इसम पाहून तोच विष्णुमित्र आहे हे त्याने ओळखले; व तो त्याला घेऊन आला. असेच आणखी एक उदाहरण 'जशी ही गाय आहे तशीच जंगलातली नीलगाय असते.' असे सांगितल्यावर जंगलामध्ये गायीसारखे दिसणारे जनावर पाहून निश्चय केला की हीच नीलगाय होय, याचे ज्ञान होते.

### चौथे शब्द प्रमाण :

**आप्तोपदेशः शब्दः ॥** न्याय. अ. १। आ. १। सू. ६

जो आप्त म्हणजे पूर्ण विद्वान, धर्मात्मा, परोपकार प्रिय, सत्यवादी, पुरुषार्थी, जितेंद्रिय पुरुष असतो. ज्याने आपल्या आत्म्यामधील ज्ञान व त्यायोगे मिळणारे सुख प्राप्त केले आहे व आत्म्याच्याच कथनाच्या इच्छेने प्रेरित होऊन जो सर्व मानवांच्या कल्याणासाठी उपदेश करतो, म्हणजे ज्याला पृथ्वीपासून परमेश्वरापर्यंत असणाऱ्या सर्व पदार्थांचे ज्ञान झालेले असल्याने तो उपदेष्टा बनलेला असतो. असा पुरुष आणि पूर्ण आप्त परमेश्वर याचा उपदेश वेद आहेत. म्हणून वेदांचे शब्दप्रामाण्य मान्य करावे.

### पाचवे ऐतिह्य प्रमाण :

**न चतुष्ट्वमैतिह्यार्थापत्तिसम्भवाभावप्रामाण्यात् ॥** न्याय. अ. २। आ. २। सू. २

इति ह म्हणजे 'अशा प्रकारचा होता' किंवा 'त्याने असे केले' म्हणजे एखाद्याच्या जीवनचरित्राला ऐतिह्य म्हणतात.

**सहावे अर्थापत्ति प्रमाण :**

'अर्थादापद्यते सा अर्थापत्तिः' केनचिदुच्यते 'सत्सु घनेषु वृष्टिः' सति कारणे कार्य्यं भवतीति किमत्र प्रसज्यते, असत्सु घनेषु वृष्टिसति कारणे च कार्य्यं न भवति. जसे कोणी कोणाला तरी सांगितले की, 'ढग असले म्हणजे पाऊस, आणि कारण असले की कार्य उत्पन्न होते.' यावरून न सांगताही दुसरी गोष्ट सिद्ध होते की ढगांशिवाय पाऊस पडत नाही व कारणाशिवाय कार्य कधीही घडत नाही. याला अर्थापत्ति असे म्हणतात.

**सातवे संभव प्रमाण :**

**'सम्भवति यस्मिन् स सम्भवः'** सृष्टि क्रमानुसार संभवते (घडते) ते 'संभव प्रमाण' होय. कोणी असे म्हटले की, 'आई बापांशिवाय मूल जन्मले, मेलेल्यास जिवंत केले, डोंगर उचलले, समुद्रावर दगड तरंगविले, चंद्राचे तुकडे केले, परमेश्वराचा अवतार झाला, माणसाला शिंगे फुटली आणि वांझेच्या मुला-मुलीचे लग्न केले वगैरे' पण या सर्व गोष्टी असंभव (अशक्य) आहेत. कारण त्या सृष्टिक्रमाच्या विरुद्ध आहेत. जी गोष्ट सृष्टिक्रमाच्या अनुकूल असेल तीच संभव मानावी.

**आठवे अभाव प्रमाण :**

**'न भवति यस्मिन् सोऽभावः'** कोणी कोणाला सांगितले की, 'हत्ती घेऊन ये. तेव्हा तेथे हत्तीचा अभाव पाहून जेथे हत्ती होता तेथून तो घेऊन आला.' अशी ही आठ प्रमाणे आहेत.

यापैकी जर कोणी शब्द प्रमाणात ऐतिह्याचा आणि अनुमानामध्ये अर्थापत्ती, संभव व अभाव यांचा अंतर्भाव केला तर चार प्रमाणे उरतात. या पाच प्रकारच्या परीक्षांनी मनुष्य सत्यासत्याचा निर्णय करू शकतो. अन्यथा नाही.

## षट्तत्त्वांचे ज्ञान

**धर्मविशेषप्रसूताद् द्रव्यगुणकर्मसामान्यविशेषसमवायानां पदार्थानां तत्त्वज्ञानान्निःश्रेयसम्॥** वै. अ. १। आ. १। सू. ४

जेव्हा मनुष्य धर्माचे यथायोग्य अनुष्ठान केल्याने पवित्र होतो आणि साधर्म्य व वैधर्म्य यांच्या योगाने द्रव्य, गुण, कर्म सामान्य, विशेष, व समवाय या सहा तत्त्वांचे ज्ञान (तत्त्वज्ञान) म्हणजे स्वरूपज्ञान मिळवितो तेव्हा त्याला 'निःश्रेयसम्' म्हणजे मोक्ष प्राप्त होतो. साधर्म्य म्हणजे समान धर्म असणे आणि वैधर्म्य म्हणजे विरुद्ध धर्म असणे. पृथ्वी आणि जल यांमध्ये जडत्व (अचेतनत्व) हे साधर्म्य आहे. तर पृथ्वी कठोर व जल कोमल असल्याने त्यांच्यात त्या बाबतीत वैधर्म्य आहे. या सहा तत्त्वांचे स्पष्टीकरण पुढे दिले आहे :

## द्रव्यांची गणना

**पृथिव्यापस्तेजोवायुराकाशं कालो दिगात्मा मन इति द्रव्याणि।**

वै. अ. १। आ. १। सू. ५

पृथ्वी, जल, तेज, वायू, आकाश, काल, दिशा, आत्मा, मन ही नऊ द्रव्ये आहेत.

**क्रियागुणवत्समवायिकारणमिति द्रव्यलक्षणम् ।।** वै. अ. १। आ. १। सू. १५

'क्रियाश्च गुणाश्च विद्यन्ते यस्मिँस्तत् क्रियागुणवत्' ज्यामध्ये क्रिया व गुण आणि केवळ गुणही असतात त्याला द्रव्य म्हणतात. त्यांपैकी पृथ्वी, जल, तेज, वायु, मन आणि आत्मा ही सहा द्रव्ये क्रिया व गुण असणारी आहेत. तर आकाश, काळ व दिशा ही तीन द्रव्ये क्रियारहित गुण असणारी आहेत. (समवायि) 'समवेतुं शीलं यस्य तत् समवायि. प्राग्वृत्तित्वं कारणं. समवायि च तत्कारणं च समवायिकारणम्' 'लक्ष्यते येन तल्लक्षणम्' जो मिसळण्याचा स्वभावयुक्त कार्याने कारण पूर्व कालस्थ असतो त्यालाच द्रव्य म्हणतात. ज्याच्या योगे लक्ष्य जाणले जाते, त्याला लक्षण असे म्हणतात. जसे, नेत्राने रूपाचे ग्रहन होते ते लक्षण आहे. या नऊ द्रव्यांची लक्षणे पुढील प्रमाणे आहेत :-

**रूपरसगन्धस्पर्शवती पृथिवी ।।** वै. अ. २। आ. १। सू. १

रूप, रस, गंध व स्पर्श हे पृथ्वीचे गुण आहेत. यांतील रूप, रस, आणि स्पर्श हे गुण अग्नी, जल आणि वायु यांच्या योगाने आलेले आहेत.

**व्यवस्थित: पृथिव्यां गन्ध: ।।** वै. अ. २। अ. २। सू. २

पृथ्वीमध्ये गंध हा स्वाभाविक गुण आहे. त्याचप्रमाणे जलामध्ये रस, अग्नीमध्ये रूप, वायूमध्ये स्पर्श, आकाशामध्ये शब्द हे स्वाभाविक गुण आहेत.

**रूपरसस्पर्शत्व आपो द्रवा: स्निग्धा ।।** वै. अ. २। आ. १। सू. २

रूप, रस आणि स्पर्श द्रवरूप व कोमल हे गुण ज्यात आहे त्याला जल असे म्हणतात. मात्र यामध्ये जलाचा स्वाभाविक गुण रस हा आहे; आणि रूप व स्पर्श हे गुण अग्नि व वायु यांच्या योगाने आले आहेत.

**अप्सु शीतता ।।** वै. अ. २। आ. २। सू. ५

पाण्यात शीतलता हा ही त्याचा स्वाभाविक गुण आहे.

**तेजो रूपस्पर्शवत् ।।** वै. अ. २। आ. १। सू. ३

रूप व स्पर्श हे तेजाचे गुण आहेत. मात्र त्यातील रूप हे स्वाभाविक असून स्पर्श हा गुण वायूमुळे आलेला आहे.

**स्पर्शवान् वायु: ।** वै. अ. २। आ. १। सू. ४

स्पर्श हा वायुचा गुण आहे. परंतु त्यातही उष्णता व शीतलता हे गुण तेज व जल यांच्या योगाने असतात.

**त आकाशे न विद्यन्ते ।।** वै. अ. २। आ. १। सू. ५

रूप, रस, गंध व स्पर्श हे गुण आकाशात नाहीत. परंतु शब्द हाच आकाशाचा गुण होय.

**निष्क्रमणं प्रवेशनमित्याकाशस्य लिङ्गम् ।।** वै. अ. २। आ. १। सू. २०

ज्यात प्रवेश व निर्गमन होते ते आकाशाचे लिंग आहे.

**कार्यान्तराप्रादुर्भावाच्च शब्द: स्पर्शवतामगुण: ।।** वै. अ. २। आ. १। सू. २५

इतर पृथ्वी आदिकांच्या कार्याने शब्द हा गुण प्रकट होत नाही. तसेच स्पर्शगुण असणाऱ्या भूमी आदींचा शब्द हा गुण नाही, परंतु शब्द हा आकाशाचाच गुण आहे.

**अपरस्मिन्नपरं युगपच्चिरं क्षिप्रमिति काललिङ्गानि ॥** वै. अ. २। आ. २। सू. ६

ज्यामध्ये अपर, पर, (युगपत्) एकवार, (चिरम्) विलंब, (क्षिप्रम्) शीघ्र इत्यादी प्रयोग होतात त्याला काळ असे म्हणतात.

**नित्येष्वभावादनित्येषु भावात्कारणे कालाख्येति ॥** वै. अ. २। आ. २। सू. ९

जो नित्य पदार्थांमध्ये नसतो आणि अनित्य पदार्थांत असतो, म्हणून कारणातच काळ असे नाव आहे.

**इत इदमिति यतस्तद्दिश्यं लिङ्गम् ॥** वै. अ. २। आ. २। सू. १०

येथून ही पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर, वर, खाली असे जिच्यामध्ये व्यवहार होत असतो. तिला दिशा म्हणतात.

**आदित्यसंयोगाद् भूतपूर्वाद् भविष्यतो भूताच्च प्राची ॥** वै. अ. २। आ. २। सू. १४

ज्या दिशेला प्रथम सूर्याचा संयोग आहे, होता व होणार तिला पूर्व असे म्हणतात. ज्या बाजूला सूर्यास्त होतो तिला पश्चिम म्हणतात. पूर्वेकडे तोंड करून उभे राहिले असता उजव्या बाजूची दक्षिण व डाव्या बाजूची उत्तर दिशा म्हटली जाते.

**एतेन दिगन्तरालानि व्याख्यातानि ॥** वै. अ. २। आ. २। सू. १६

पूर्व व दक्षिण यांमधील दिशेला आग्नेय, दक्षिण व पश्चिम यांमधील दिशेला नैर्ऋत्य, पश्चिम व उत्तर यांमधील दिशेला वायव्य आणि उत्तर व पूर्व यांमधील दिशेला ईशान्य असे म्हणतात.

**इच्छाद्वेषप्रयत्नसुखदुःखज्ञानान्यात्मनो लिङ्गमिति ॥** न्या. अ. १। आ. १। सू. १०

ज्याच्यामध्ये (इच्छा) प्रीति, (द्वेष) वैर, (प्रयत्न) पुरुषार्थ, सुख, दुःख व (ज्ञान) जाणीव हे गुण असतात तो जीवात्मा होय. वैशेषिकामध्ये एवढा विशेष आहे.

**प्राणाऽपाननिमेषोन्मेषजीवनमनोगतीन्द्रियान्तरविकाराः सुखदुःखेच्छा द्वेषप्रयत्नाश्चात्मनो लिङ्गानि ॥** वै. अ. ३। आ. २। सू. ४

(प्राण) आतील वायू बाहेर टाकणे (अपान) बाहेरचा वायू आत घेणे, (निमेष) डोळे मिटणे, (उन्मेष) डोळे उघडणे, (जीवन) प्राण धारण करणे, (मनः) मनन, चिंतन करणे म्हणजे ज्ञान (गति) यथेष्ट गमन करणे (इन्द्रिय) इंद्रियांनी विषयांचे ग्रहण करणे, (अन्तर्विकार) क्षुधा, तृष्णा, ज्वर, पीडा, इत्यादी विकार होणे. तसेच सुख, दुःख, इच्छा, द्वेष व प्रयत्न ही सर्व आत्म्याची लिंगे म्हणजे कर्म व गुण आहेत.

**युगपज्ज्ञानानुत्पत्तिर्मनसो लिङ्गम् ॥** न्याय. अ. १। आ. १। सू. १६

ज्याच्याकडून एका वेळी दोन पदार्थांचे ज्ञान ग्रहण होत नाही त्याला मन म्हणतात. या प्रमाणे द्रव्यांचे स्वरूप व लक्षण सांगितले. आता गुणांचे वर्णन करतो.

**रूपरसगन्धस्पर्शाः संख्याः परिमाणानि पृथक्त्वं संयोगविभागौ परत्वाऽपरत्वे बुद्धयः सुखदुःखेच्छाद्वेषौ प्रयत्नाश्च गुणाः ॥** वै. अ. १। आ. १। सू. ६

रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिमाण, पृथकत्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, बुद्धी, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, गुरुत्व, द्रवत्व, स्नेह, संस्कार, धर्म, अधर्म आणि शब्द हे चोवीस गुण आहेत.

**द्रव्याश्रय्यगुणवान् संयोगविभागेष्वकारणमनपेक्ष इति गुणलक्षणम् ॥**

वै. अ. १। आ. २। सू. १६

जो द्रव्याच्या आश्रयाने राहतो. अन्य गुण धारण करीत नाही. संयोग व विभाग यासाठी जो कारण होत नाही. अनपेक्ष म्हणजे एक दुसऱ्याची अपेक्षा न करणे. त्याला गुण असे म्हणतात.

**श्रोत्रोपलब्धिर्बुद्धिनिर्ग्राह्यः प्रयोगेणाऽभिज्वलित आकाशदेशः शब्दः ॥**

महाभाष्य. अ. १। पा. १। आ. १

जो श्रोत्रांनी (कानांनी) प्राप्त होतो, बुद्धीने ज्याचे ग्रहण होते, जो प्रयोगाने प्रकाशित होतो व आकाश हा ज्याचे स्थान आहे त्याला शब्द असे म्हणतात. नेत्रांनी ज्याचे ग्रहण होते ते रूप, जिव्हेने जो मिष्टान्नादि अनेक प्रकारचे ग्रहण होते तो रस, नाकाने ज्याचे ग्रहण होते तो गंध, त्वचेने ग्रहण होते तो स्पर्श, जिच्या योगे एक, दोन इत्यादी गणना होते ती संख्या, ज्याने वचनाचा म्हणजे हलकेपणाचा किंवा वजनदार पणाचा बोध होतो ते परिमाण, एकमेकांपासून वेगळे होणे म्हणजे पृथकत्व, एक दुसऱ्याशी मिळणे (मिसळणे) म्हणजे संयोग, एकमेकात मिसळलेल्याचे अनेक तुकडे होणे म्हणजे विभाग, यापासून पलीकडले ते पर, अपर, त्यापासून जे शेष ते सत व असत यांचे ज्ञान जिच्या योगे होते ती बुद्धि, आनंदाचे नाव सुख, क्लेशाचे नाव दुःख, (इच्छा) अनुराग, (द्वेष) विरोध, (प्रयत्न) अनेक प्रकारचा बलयुक्त पुरुषार्थ, (गुरुत्व) भारीपणा, (द्रवत्व) पातळपणा किंवा वितळणे, (स्नेह) प्रीती आणि स्निग्धपणा, (संस्कार) दुसऱ्याच्या संयोगाने वासना होणे, (धर्म) न्यायाचरण आणि कठिणत्व  (अधर्म) अन्यायाचरण व काठिण्याच्या विरुद्ध कोमलता हे चोवीस गुण आहेत.

**उत्क्षेपणमवक्षेपणमाकुञ्चनं प्रसारणं गमनमिति कर्माणि ।** वै. अ. १। आ. १। सू. ७

'उत्क्षेपण' म्हणजे वर फेकणे, 'अवक्षेपण' म्हणजे खालील चेष्टा, 'आकुञ्चन' म्हणजे संकोच करणे, 'प्रसारण' म्हणजे पसरविणे, 'गमन' म्हणजे येणे, जाणे, फिरणे वगैरे. ही कर्मे आहेत. आता कर्माचे लक्षण:-

**एकद्रव्यमगुणं संयोगविभागेष्वनपेक्षकारणमिति कर्मलक्षणम् ॥**

वै. अ. १। आ. १। सू. १७

'एकं द्रव्यमाश्रय आधारो यस्य तदेकद्रव्यं, न विद्यते गुणो यस्य यस्मिन् वा तदगुणं, संयोगेषु विभागेषु चाऽपेक्षारहितं कारणं तत्कर्मलक्षणम्' अथवा 'यत् क्रियते तत्कर्म, लक्ष्यते येन तल्लक्षणम्, कर्मणो लक्षणं कर्मलक्षणम्'. जे द्रव्याश्रित पण गुण रहित संयोग व विभाग होण्यामध्ये अपेक्षारहित कारण असते त्याला कर्म म्हणतात.

**द्रव्यगुणकर्मणां द्रव्यं कारणं सामान्यम् ॥** वै. अ. १। आ. १। सू. १८

जे कार्य द्रव्य, गुण व कर्म या कारण द्रव्य असते ते सामान्य द्रव्य होय.

**द्रव्याणां द्रव्यं कार्यं सामान्यम् ॥** वै. अ. १। आ. १। सू. २३

जे द्रव्यांचे कार्य द्रव्य आहे ते कार्यत्वाच्या दृष्टीने सर्व कार्यांमध्ये सामान्य आहे.

**द्रव्यत्वं गुणत्वं कर्मत्वञ्च सामान्यानि विशेषाश्च ॥** वै. अ. १। आ. २ सू. ५

द्रव्यांमध्ये द्रव्यत्व, गुणांमध्ये गुणत्व, कर्मांमध्ये कर्मत्व या सर्वांना सामान्य व विशेष म्हणतात. कारण

द्रव्यांमध्ये द्रव्यत्व सामान्य आहे आणि गुणत्व व कर्मत्व यांच्याहून द्रव्यत्व विशेष आहे. याचप्रमाणे सर्वत्र जाणावे.

**सामान्यं विशेष इति बुद्ध्यपेक्षम् ॥** वै. अ. १। आ. २। सू. ३

सामान्य व विशेष हे बुद्धीच्या अपेक्षेने सिद्ध होते. उदाहरणार्थ, मनुष्यांमध्ये मनुष्यत्व सामान्य आहे आणि पशुत्वादींहून ते विशेष आहे. तसेच स्त्रियांमध्ये स्त्रीत्व आणि पुरुषांमध्ये पुरुषत्व ही सामान्य आहेत. परंतु ब्राह्मणत्व, क्षत्रियत्व, वैश्यत्व व शूद्रत्व ही विशेष आहेत. ब्राह्मण व्यक्तीमध्ये ब्राह्मणत्व हे सामान्य आहे; आणि ते क्षत्रियादिकांहून विशेष आहे. या प्रमाणेच सर्वत्र जाणावे.

**इहेदमिति यतः कार्यकारणयोः स समवायः ॥** वै. अ. ७। आ. २। सू. २६

अवयवांमध्ये अवयवी, कार्यांमध्ये क्रिया-क्रियावान, गुण-गुणी, जाती-व्यक्ती, कार्य-कारण, अवयव-अवयवी यांचा नित्य संबंध असतो. म्हणून त्याला समवाय असे म्हणतात. जो दुसरा द्रव्यांचा परस्पर संबंध असतो त्याला संयोग म्हणजे अनित्य संबंध असे म्हणतात.

**द्रव्यगुणयोः सजातीयारम्भकत्वं साधर्म्यम् ॥** वै. अ. १। आ. १। सू. ९

द्रव्य व गुण यांपासून समानजातीय कार्याचा जो आरंभ होतो त्याला साधर्म्य असे म्हणतात. ज्याप्रमाणे पृथ्वीमध्ये जडत्व धर्म आणि घटादी कार्योत्पदकत्व स्वसदृश धर्म आहे त्याचप्रमाणे जलामध्येही जडत्व (अचेनत्व)व हिम (बर्फ) आदी स्वसदृश कार्यारंभ पृथ्वी व जल यांचा परस्पर समान धर्म आहे. अर्थात 'द्रव्यगुणयोर्विजातीयारम्भकत्वं वैधर्म्यम्'. यावरून हे लक्षात आले की द्रव्य व गुण यांपासून विजातीय धर्म व कार्य यांचा जो आरंभ होतो त्याला वैधर्म्य असे म्हणतात. जसे पृथ्वीमध्ये कठिणत्व, शुष्कत्व आणि गंधत्व हे जलाच्या धर्माशी विरुद्ध आहेत आणि जलाचे द्रवत्व, कोमलत्व व रसगुणयुक्तत्व हे गुण पृथ्वीतत्त्वाच्या विरुद्ध आहेत. (म्हणून या दोन द्रव्यांमध्ये वैधर्म्य आहे.)

## कार्यकारणसंबंध

**कारणभावात्कार्यभावः ।** वै. अ. ४। आ. १। सू. ३

कारण असेल तरच कार्य घडते.

**न तु कार्याभावात्कारणाभावः ॥** वै. अ. १। आ. २। सू. २

कार्याचा अभाव असेल तर कारणाचा अभाव असतो असे नाही.

**कारणाऽभावात्कार्याऽभावः ॥** वै. अ. १। आ. २। सू. १

कारण नसेल तर कार्य कधीही होत नाही.

**कारणगुणपूर्वकः कार्यगुणो दृष्टः ॥** वै. अ. २। आ. १। सू. २४

कारणामध्ये जसे गुण असतात तसेच ते कार्यामध्ये असतात. परिमाण दोन प्रकारचा आहे :-

**अणुमहदिति तस्मिन्विशेषभावाद्विशेषाभावाच्च ॥** वै. अ. ७। आ. १। सू. ११

(अणू) सूक्ष्म व (महत्) मोठा असे दोन प्रकारचे परिमाण आहेत. ज्याप्रमाणे त्रसरेणू हा लिक्षाहून छोटा व द्व्यणुकाहून मोठा आहे. तसेच पर्वत हे पृथ्वीपेक्षा लहान व वृक्षांहून मोठे असतात.

**सदिति यतो द्रव्यगुणकर्मसु सा सत्ता ॥** वै. अ. १। आ. २। सू. ७

द्रव्य, गुण, कर्मे यांमध्ये सत् शब्द अन्वित (संबद्ध) असतो. त्यांचे वर्तमानत्व म्हणजे अस्तित्व. त्यालाच सत्ता असे म्हणतात. 'सद् द्रव्यम्, सन् गुण:, सत् कर्म' म्हणजे सत्कर्म सत् द्रव्य, सत् गुण, सत् कर्म याप्रमाणे वर्तमानकालवाचक शब्दाचा अन्वय सर्वांशी असतो.

**भावोऽनुवृत्तेरेव हेतुत्वात्सामान्यमेव ॥** वै. अ. १। आ. २। सू. ४

जो सर्वांबरोबर अनुवर्तमान असल्यामुळे सत्तारूप भाव आहे त्याला महासामान्य असे म्हणतात. हा क्रम भावरूप द्रव्यांचा आहे आणि अभाव जो आहे तो पाच प्रकारचा असतो.

**क्रियागुणव्यपदेशाभावात्प्रागसत् ॥** वै. अ. ९। आ. १। सू. १

क्रिया व गुण यांचे विशेष निमित्त अभावाने, प्राक् म्हणजे आधी (असत्) नव्हता. जसे घट, वस्त्र आदी उत्पत्तिपूर्वी नव्हते. याचे नाव 'प्रागभाव' दुसरा,

**सदसत् ॥** वै. अ. ९। आ. १। सू. २

जे उत्पन्न होऊन रहात नाही. उदाहरणार्थ घट तयार होऊन नष्ट होतो. याला 'प्रध्वंसाभाव' असे म्हणतात. तिसरा,

**सच्चासत् ॥** वै. अ. ९। आ. १। सू. ४

जे असते आणि नसते त्याला 'अन्योऽन्याभाव' असे म्हणतात. उदाहरणार्थ, 'अगौरश्वोऽनश्वो गौ:', हा घोडा गाय नव्हे; आणि ही गाय घोडा नव्हे. अर्थात् घोड्यांमध्ये गायीचा व गायीमध्ये घोड्याचा अभाव आहे. हा 'अन्योऽन्याभाव' आहे. चौथा,

**यच्चान्यदसदतस्तदसत् ॥** वै. अ. ९। आ. १। सू. ५

जो पूर्वी सांगितलेल्या तीन्ही अभावांहून भिन्न आहे त्याला 'अत्यन्ताभाव' असे म्हणतात. उदाहरणार्थ 'नरशृंग' (माणसाचे शिंग), 'खपुष्प' (आकाशाचे फूल) आणि 'वन्ध्यापुत्र' (वांझेचा मुलगा) वगैरे पाचवा,

**नास्ति घटो गेह इति सतो घटस्य गेह संसर्गप्रतिषेधः ॥** वै. अ. ९। आ. १। सू. १०

घरात माठ नाही. म्हणजे तो अन्यत्र आहे. घराशी माठाचा संबंध नाही. याला 'संसर्गाभाव' म्हणतात. असे हे पाच प्रकारचे अभाव म्हटले जातात.

**इन्द्रियदोषात्संस्कारदोषाच्चाविद्या ॥** वै. अ. ९। आ. २। सू. १०

इंद्रियांच्या व संस्कारांच्या दोषांपासून अविद्या उत्पन्न होते.

**तद् दुष्टं ज्ञानम् ॥** वै. अ. ९। आ. २। सू. ११

जे दुष्ट म्हणजे विपरीत ज्ञान असते त्याला अविद्या असे म्हणतात.

**अदुष्टं विद्या ॥** वै. अ. ९। आ. २। सू. १२

जे अदुष्ट म्हणजे यथार्थ ज्ञान आहे त्याला विद्या असे म्हणतात.

**पृथिव्यादिरूपरसगन्धस्पर्शा द्रव्याऽनित्यत्वादनित्याश्च ॥** वै. अ. ७। आ. १। सू. २

**एतेन नित्येषु नित्यत्वमुक्तम् ॥** वै. अ. ७। आ. १। सू. ३

पृथ्वी वगैरे कार्यरूप पदार्थ व त्यांमध्ये रूप, रस, गंध, स्पर्श हे गुण आहेत. हे सर्व द्रव्यांचे अनित्य असल्यामुळे त्यांचे गुणही अनित्य आहेत आणि जे कारणरूप पृथिव्यादी नित्य द्रव्यामध्ये गंधादी गुण आहेत ते नित्य आहेत.

**सदकारणवन्नित्यम् ॥** वै. अ. ४। आ. १। सू. १

जे विद्यमान असेल आणि ज्याचे कसलेही कारण नसेल ते नित्य आहे. अर्थात 'सत्कारणवदनित्यम्'. म्हणजे जे कारणयुक्त कार्यरूप द्रव्य गुण आहेत त्यांना अनित्य म्हटले जाते.

**अस्येदं कार्यं कारणं संयोगि विरोधि समवायि चेति लैङ्गिकम् ॥** वै. अ. ९। आ. २। सू. १

'याचे हे कार्य अथवा कारण आहे.' इत्यादी समवायी, सयोगी, एकार्थ समवायी आणि विरोधी या चार प्रकारच्या लैंगिक म्हणजे लिंगलिंगी संबंधाने ज्ञान प्राप्त होते. समवायि जसे आकाश परिमाण युक्त आहे. शरीर त्वचायुक्त आहे इत्यादी नित्य संयोग आहे. तो संयोगिसंबंध होय. एका अर्थामध्ये दोहोचे अस्तित्व असणे याला 'एकार्थसमवायि' संबंध म्हणतात. जसे कार्यरूप स्पर्श कार्याचे लिंग म्हणजे कार्याची जाणीव करून देणारा आहे. तसेच, झालेल्या वृष्टिच्या चिह्नांचा होणाऱ्या वृष्टिच्या चिह्नांशी विरोधी संबंध (लिंग) असतो. अशा प्रकारे हे चार प्रकारचे लिंगलिंगी संबंध जाणावे.

**'व्याप्ति' :-**

**नियतधर्मसाहित्यमुभयोरेकतरस्य वा व्याप्तिः ॥** सांख्यसूत्रे अ. ५। सू. २९

जे दोन ही साध्य साधन म्हणजे जे सिद्ध करण्यास योग्य असते ते साध्य आणि ज्याच्या योगाने सिद्ध करावयाचे असते त्या दोन्ही अथवा एक साधन मात्राचा निश्चित धर्म सहचार आहे त्याला व्याप्ती असे म्हणतात. जसे धूर व अग्नि यांचे साहचर्य असते. ॥२९॥

**निजशक्त्युद्भवमित्याचार्याः ॥** सांख्यसूत्रे अ. ५। सू. ३१

तसेच व्याप्य जो धूर स्वतःच्या शक्तीने उत्पन्न होतो. अर्थात धूर जेव्हा अन्य दूरच्या एखाद्या ठिकाणी जातो तेव्हा तो अग्नीच्या संयोगाशिवाय राहू शकतो. त्याचेच नाव व्याप्ती होय. अग्नीच्या छेदन व भेदन या सामर्थ्याने जलादी पदार्थही धूर रूपाने उत्पन्न होतो. ॥३१॥

**आधेयशक्तियोग इति पञ्चशिखः ॥** सांख्यसूत्रे अ. ५। सू. ३२

जसे महत्तत्त्वांमध्ये प्रकृतीची व्यापकता, बुध्दि इत्यादींमध्ये व्याप्यता धर्माचा जो संबंध असतो त्याचे नाव व्याप्ती. आधेयरूप शक्ती आणि शक्तिमान आधाररूप यांचा संबंध असतो त्याला व्याप्ती असे नाव आहे.

इत्यादी शास्त्रांच्या प्रमाणादिकांनी परीक्षा करून शिकावे व शिकवावे. नाही तर विद्यार्थ्यांना सत्याचा बोध कधीच होऊ शकणार नाही. म्हणून जो-जो ग्रंथ शिकवावयाचा त्याची पूर्वोक्त प्रकारांनी तपासणी करून जर तो खरा उतरला तरच तो शिकवावा. जे ग्रंथ या परीक्षांच्या कसोटीला उतरणार नाहीत ते ग्रंथ वाचू नयेत व शिकवू नयेत. कारण,

**लक्षणप्रमाणाभ्यां वस्तुसिद्धिः ॥**

**'गन्धवती पृथिवी'** जी पृथ्वी आहे ती गंधवती आहे. म्हणजे पृथ्वीला गंध असतो हे तिचे लक्षण

आहे. अशा प्रकारची लक्षणे आणि प्रत्यक्षादी प्रमाणे यांच्या आधारानेच सत्यासत्याचा व सर्व पदार्थांचा निर्णय होतो. यांच्याखेरीज काहीही होत नाही.

## पठनपाठनविधि [अध्ययन व अध्यापन]

आता अध्ययन व अध्यापनचा प्रकार सांगतो. प्रथम पाणिनिमुनिकृतशिक्षा जे सूत्ररूप पुस्तक आहे ते शिकवावे. त्यात अमुक अक्षराचे अमुक स्थान, अमुक प्रयत्न व अमुक करण आहे उदाहरणार्थ 'प' चे स्थान ओष्ठ असून स्पृष्ट प्रयत्न आणि प्राण व जीभ यांची जी क्रिया करावयाची तिला करण असे म्हणतात. याच पद्धतीने यथायोग्य सर्व अक्षरांचे उच्चारण आई, बाप व शिक्षक यांनी शिकवावे. त्यानंतर व्याकरण अर्थात प्रथम पाणिनीचे अष्टाध्यायीसूत्र पाठ जसे

**'वृद्धिरादैच्'** हे प्रथम सूत्र आहे. त्यामध्ये पदच्छेद 'वृद्धिः, आत्, ऐच् किंवा आदैच्' नंतर समास 'आच्च ऐच्च आदैच' असा आहे. त्याचा अर्थ असा की, 'आदैचां वृद्धिसंज्ञा क्रियते' म्हणजे 'आ, ऐ, औ यांना वृध्दि नाव आहे.' **'तः परो यस्मात्स तपरस्तादपि परस्तपरः'** तकार ज्याच्या पुढे आहे व जो तकाराच्याही पुढे आहे त्याला तपर म्हणतात. यावरून असे सिद्ध होते की जो आकाराच्या पलीकडे त् आहे आणि त् च्या पलीकडे ऐच आहे. हे दोन्ही तपर आहेत. तपरचे प्रयोजन हे आहे की ऱ्हस्व व प्लुत यांची वृद्धी संज्ञा झाली नाही. उदाहरणार्थ, (भागः) येथे 'भज्' धातूला 'घञ्' प्रत्यय लावून 'भागः' हा शब्द बनविला आहे. 'घञ्' प्रत्ययामध्ये 'घञ्' हे इत्संज्ञक असल्याने त्यांचा लोप झाला आहे व 'अ' हा प्रत्यय राहिला आहे. 'भज्+अ' अशी स्थिती झाल्यानंतर 'ज' कार पूर्व 'भ' कारातील 'अ' काराची वृद्धि होते; आणि 'ज्' काराच्या ठिकाणी 'ग्' कार होतो; व 'भाग्+अ' मिळून 'भागः' असा शब्द तयार होतो.

तसेच 'अध्यायः' हा शब्द 'अधि' उपसर्गपूर्वक 'इङ्' धातूच्या ऱ्हस्व 'इ' च्या ठिकाणी 'घञ्' प्रत्ययानंतर 'इ', 'ऐ' अशी वृद्धि आणि त्यास आय मिळून नंतर 'अध्यायः' असा शब्द बनतो.

'नायकः' येथे 'नीञ्' धातू दीर्घ 'इ' काराच्या ठिकाणी 'ण्वुल्' प्रत्ययानंतर 'ऐ' अशी वृद्धि आणि त्यास आय होऊन नायक शब्द बनतो.

तसाच 'स्तावकः' हा शब्द. 'स्तु' धातूवरून 'ण्वुल्' प्रत्यय होऊन ऱ्हस्व 'उ' काराची 'औ' अशी वृद्धी आणि आव् आदेश होऊन अ कारात मिळुन स्तावकः। शब्द बनला.

तसेच 'कृञ्' धातूला 'ण्वुल्' प्रत्यय लागून त्यातील 'ण्, ल्' ची इत्संज्ञा होऊन लोप शेष राहिलेल्या 'वु' प्रत्ययाला 'अक' असा आदेश झाला आणि ऋकाराला 'आर्' अशी वृद्धि होऊन (कार्+अक) 'कारकः' असे सिद्ध झाले.

अशा प्रकारे जी-जी सूत्रे मागील व पुढील प्रयोगांमध्ये लागू होतात त्यांची कार्ये दाखवीत जावी आणि दगडी पाटीवर किंवा लाकडी फळीवर ती लिहून दाखवून कच्चे रुप ठेवावे. उदाहरणार्थ 'भज+घञ्+सु' अशी स्थिती प्रथमतः होती. नंतर धातूतील 'अ' काराचा लोप झाला. त्यानंतर 'घ्' कार व मग 'ञ्' कार यांचा लोप होऊन 'भज्+अ+सु' अशी स्थिती झाली. नंतर 'अ' ला वृद्धी होऊन 'आ' कार बनला व 'ज्' च्या ठिकाणी 'ग्' झाल्याने आणि 'भाग्+अ+सु' अशी स्थिती झाली. अकार मिसळल्यानंतर 'भाग+सु' असे झाले. आता

उकाराची इत्संज्ञा होऊन 'स्' च्या जागी 'रुँ' होऊन पुन: उकाराची इत्संज्ञा लोप पावली. त्यानंतर 'भागर्' असे रूप सिध्द झाले. आता रेफाच्या ठिकाणी विसर्ग (:) येऊन 'भाग:' हे रूप सिद्ध झाले.

ज्या ज्या सूत्राकडून जे-जे कार्य होते ते ते विद्यार्थ्यांना शिकवावे आणि त्यांच्याकडून ते वदवून घेऊन त्यांना ते लिहावयास सांगावे. अशा प्रकारे शिकविले असता विद्यार्थ्यांना तो विषय लौकर व चांगला समजतो.

एकदा अशा प्रकारे अष्टाध्यायी शिकविल्यावर धातुपाठ ही अर्थासह शिकवून झाल्यावर दश लकारांची रूपेही उत्तम प्रकारे करवून घ्यावीत. नंतर प्रक्रिया सहित उत्सर्ग म्हणजे सामान्य सूत्रे शिकवावीत. उदाहरणार्थ **'कर्मण्यण्'** हे उत्सर्गसूत्र आहे. याचा अर्थ असा की, कर्म उपपद असता धातूवरून 'अण्' प्रत्यय होतो. जसे, कुंभ हे कर्म उपपद असता 'कृ' धातूवरून 'अण्' प्रत्यय होऊन 'कुंभकार:' हे रूप बनते. याला अपवाद सूत्र **'आतोऽनुपसर्गे क:'** म्हणजे उपसर्गभिन्न कर्म उपपद लागल्यास आकारान्त धातूवरून 'क' प्रत्यय होतो. याचा अर्थ असा की जो बहुव्यापक सूत्रानुसार कर्मोपपद लागल्यास सर्व धातूंवरून 'अण्' प्राप्त होतो; परंतु त्यापेक्षा विशेष म्हणजे अन्य विषय त्याच पूर्व सुत्राच्या विषयातून 'आ' कारान्त धातूला 'क' प्रत्ययाने ग्रहन केले. उत्सर्गाच्या विषयात अपवाद सूत्राची प्रवृत्ती होते तशी अपवाद सूत्राच्या बाबतीत उत्सर्गसूत्राची प्रवृत्ती होत नाही. ज्या प्रमाणे चक्रवर्ती राजाच्या राज्यात मांडलिक व जमीनदार यांची प्रवृत्ती असते परंतु मांडलिक राजांच्या राज्यात चक्रवर्ती राजांची प्रवृत्ती नसते, तसेच हे आहे.

अशाच प्रकारे पाणिनी महर्षींनी सहस्त्र श्लोकांमध्ये अखिल शब्द, अर्थ व संबंध यांची विद्या प्रतिपादन केली आहे. धातुपाठ शिकवून झाल्यावर उणादिगण शिकवावा. तो शिकविताना सर्व सुबंताचा विषय उत्तम प्रकारे समजावून द्यावा. नंतर पुन: शंका, समाधान, वार्तिक, कारिका, परिभाषा वगैरे विषयीची घटना शिकवून अष्टाध्यायीची दुसरी अनुवृत्ति शिकवावी.

त्यानंतर महाभाष्य शिकवावे. शिकणारे व शिकविणारे बुद्धिमान, पुरुषार्थी, निष्कपटी, विद्याव्यासंगी असतील तर दीड वर्षात अष्टाध्यायी आणि दीड वर्षात महाभाष्य शिकून तीन वर्षात पूर्ण वैयाकरणी होता येते. वैदिक व लौकिक शब्दांचे व्याकरण उत्तम रीतीने समजल्यामुळे इतर शास्त्रांमध्येही शीघ्र व सहज शिकणे शिकविणे होऊ शकते. मात्र व्याकरण शिकण्यात जेवढे परिश्रम घ्यावे लागतात तेवढे श्रम इतर शास्त्रांच्या अध्ययनात घ्यावे लागत नाहीत; आणि अष्टाध्यायी व महाभाष्य हे आर्ष ग्रंथ शिकल्याने तीन वर्षात जेवढे ज्ञान प्राप्त होते तेवढे सारस्वत, चंद्रिका, कौमुदी, मनोरमा इत्यादी पन्नास वर्षे शिकल्यानेही होत नाही. कारण महाशय महर्षींनी महान विषयांचे जे विवेचन जितक्या सहजपणे आपल्या ग्रंथांमध्ये केले आहे तसे ते या क्षुद्राशय मनुष्यांच्या कल्पित ग्रंथांमध्ये कोठून असणार ?

महर्षींनी रचलेल्या ग्रंथांमध्ये विषयाचे विवेचन सुगम आणि थोड्या वेळात पुष्कळ करता येईल असे असते. तर क्षुद्राशयी लोकांची इच्छा अशी असते की रचना होईल तितकी अवघड करावी; तिचे परिश्रमपूर्वक अध्ययन केल्यानंतर त्यापासून अगदीच थोडा लाभ पदरात पडावा. डोंगर पोखरून उंदीर मिळावा तसे ते असते. याउलट आर्ष ग्रंथांच्या अभ्यासाने समुद्रात एक बुडी मारल्यावर असंख्य बहुमूल्य मोती मिळावेत अशी स्थिती होते.

व्याकरण शिकून झाल्यावर यास्कमुनींचे 'निघण्टु' व 'निरुक्त' हे दोन ग्रंथ सहा किंवा आठ महिन्यांत अर्थासह शिकावे शिकवावे. नास्तिकांच्या अमरकोशादी ग्रंथांच्या अध्ययनात वर्षानुवर्षे वाया घालवू नयेत.

त्यानंतर पिंगलाचार्यकृत छन्दोग्रन्थ चार महिन्यात शिकता व शिकविता येतो. या ग्रंथाच्या अध्ययनाने वैदिक लौकिक छंदांचे परिज्ञान होऊन नवीन रचना कशी करावी ते समजते. हा ग्रंथ आणि श्लोकांची रचना व प्रस्तार हे चार महिन्यात शिकता शिकविता येईल आणि वृत्तरत्नाकरासारखे अल्पबुद्धीच्या लोकांनी रचलेले ग्रंथ शिकण्यात व शिकविण्यात अनेक वर्षे वाया घालवू नयेत.

यानंतर मनुस्मृति, वाल्मीकी रामायण आणि महाभारतातील उद्योगपर्वातर्गत विदुरनीती इत्यादि चांगली चांगली प्रकरणे, म्हणजे ज्यांच्यापासून विद्यार्थ्यांना नीतीचा बोध होऊन ते दुष्ट व्यसनांपासून दूर राहतील व उत्तम, सभ्य नागरिक बनतील तसेच पद्यग्रंथ काव्य शिकविण्याच्या पद्धतीने म्हणजे पदच्छेद, पदार्थोक्ती, अन्वय, विशेष्य विशेषण संबंध आणि भावार्थ यांचे विवेचन करीत शिकवावे; आणि विद्यार्थ्यांनी ते सारे समजून घ्यावे. यांचे अध्ययन-अध्यापन एका वर्षात पूर्ण करावे.

त्यानंतर पूर्वमीमांसा, वैशेषिक, न्याय, योग, सांख्य व वेदान्त ही षड्दर्शने शक्य असल्यास ऋषिप्रणीत भाष्यांसह किंवा ते शक्य नसल्यास उत्तम विद्वानांनी केलेल्या सरल व्याख्यांसह शिकवावीत. परंतु वेदान्तसूत्रे शिकण्यापूर्वी ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माण्डूक्य, ऐतरेय, तैत्तिरीय, छान्दोग्य व बृहदारण्यक ही दहा उपनिषदे शिकावीत. ही उपनिषदे व भाष्य सूत्रवृत्तीसह षट् दर्शने दोन वर्षांच्या आत शिकावी आणि शिकवावीत.

त्यानंतर सहा वर्षांमध्ये ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चार वेद व त्यांची ऐतरेय, शतपथ, साम व गोपथ ही ब्राह्मणे स्वर, शब्द, अर्थ, संबंध व क्रिया यांसह शिकणे उचित आहे. याला प्रमाण :-

**स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम्।**
**योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥** निरुक्त अ. १। मं. १८

हा निरुक्तातील मंत्र आहे. जो मनुष्य वेद केवळ स्वरानुसार पाठ करतो, पण त्यांचा अर्थ जाणत नाही तो केवळ भारवाही म्हणजे ओझे वाहणारा आहे असे समजावे. ज्या प्रमाणे एखादा वृक्ष फांद्या, पाने, फुले व फळे यांचे ओझे अंगावर वागवतो किंवा एखादा पशू, धान्य वगैरेचे ओझे वाहतो तसा हा मनुष्य भारवाहक असतो आणि जो कोणी वेदांचा यथावत अर्थ नीट समजून घेतो, वाचन करतो त्यालाच संपूर्ण आनंद प्राप्त होतो. देहान्तानंतर त्याची पापे ज्ञानाने धुतली जातात आणि पवित्र धर्माचरणाच्या प्रतापाने त्याला सर्वानंद प्राप्त होतो.

**उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम्।**
**उतो त्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्य उशती सुवासाः ॥** ऋ. मं. १०। सू. ७१। मं. १४

जे अविद्वान असतात ते ऐकत असूनही ऐकत नाहीत, पाहत असूनही पाहत नाहीत, बोलत असूनही बोलत नाहीत. याचा अर्थ असा की अविद्वान लोक या विद्यावाणीचे रहस्य जाणत नाहीत. परंतु जो शब्द अर्थ व संबंध जाणतो त्याच्या बाबतीत विद्या ही जशी सुंदर वस्त्रे व आभूषणे धारण करून आपल्या पतीची इच्छा बाळगणाऱ्या आणि शरीर व रूप यांचा प्रकाश पतीला अर्पण करणाऱ्या स्त्री सारखी असते तशी विद्या ही विद्वानांना आपल्या स्वरूपाचे दर्शन घडविते. ती अविद्वानांसाठी असे करीत नाही.

**ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः।**
**यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते॥** ऋ. म. १। सू. १६४। मं. ३९

ज्या व्यापक अविनाशी सर्वोत्कृष्ट परमेश्वरामध्ये सर्व विद्वान आणि पृथ्वी, सूर्य इत्यादी सर्व लोक स्थित आहेत, त्याच्यामध्येच सर्व वेदांचे मुख्य तात्पर्य आहे. त्या ब्रह्माला जो जाणत नाही त्याला ऋग्वेदादींचे काय सुख प्राप्त होऊ शकते ? मुळीच नाही ! परंतु जे लोक वेदांचे अध्ययन करून, धर्मात्मा योगी बनून त्या ब्रह्माला जाणतात ते सर्व परमेश्वरामध्ये स्थित होऊन मुक्तिरूपी परमानंद प्राप्त करतात. यासाठी जे काही अध्ययन-अध्यापन करावयाचे ते अर्थज्ञानासहित असले पाहिजे.

अशा प्रकारे सर्व वेदांचे अध्ययन झाल्यावर आयुर्वेदाचा अभ्यास करावा. आयुर्वेद म्हणजे चरक, सुश्रुत आदि ऋषिमुनिप्रणीत वैद्यक शास्त्र. त्यांचे अर्थ, क्रिया, शस्त्र, छेदन, भेदन, लेप, चिकित्सा, निदान, औषध, पथ्य, शरीर, देश, काल आणि वस्तूंचे गुण या गोष्टी ज्ञानपूर्वक चार वर्षांत शिकाव्या, शिकवाव्या.

त्यानंतर धनुर्वेद. त्यामध्ये राज्यासंबंधीची सर्व कार्य करणे समाविष्ट आहे. त्याचे दोन भेद आहेत. एक स्वत: राजपुरुषासंबंधीचा भाग आणि दुसरा प्रजेशी संबंधित भाग असतो. राजकार्यामध्ये सेनाध्यक्ष, सर्व सैन्याची रचना, शस्त्रास्त्र विद्या, नाना प्रकारचे व्यूह यांचा अभ्यास ज्याला आजकाल कवायत म्हणतात जी लढाईच्या वेळी शत्रूंच्या बाबतीत ज्या क्रिया कराव्या लागतात त्यांना व्यूह रचना याचा यथायोग्य अभ्यास करावा. त्या सर्व पद्धतशीरपणे शिकून घ्याव्यात. तसेच प्रजेचे पालन व तिची सुखसमृद्धी यांसाठी काय करावे लागते ते शिकून घ्यावे. साऱ्या प्रजेला न्यायपूर्वक कसे सुखात ठेवावे, दुष्टांना कशी यथायोग्य शिक्षा द्यावी आणि श्रेष्ठांचे पालन, प्रकार हे सर्वप्रकारे शिकून घ्यावे.

ही राजविद्या दोन वर्षात शिकून त्यानंतर गांधर्ववेद शिकावा. त्यालाच गानविद्या किंवा संगीत शास्त्र असे म्हणतात. त्यामध्ये स्वर, राग, रागिण्या, समय, ताल, ग्राम, तान, वाद्य, नृत्य, गीत इत्यादी. ते सर्व व्यवस्थितपणे शिकून घ्यावे. परंतु मुख्यत: सामवेदाचे गायन वाद्यवादनासह शिकावे आणि नारदसंहिता वगैरे जे आर्ष ग्रंथ आहेत त्यांचे अध्ययन करावे. मात्र भडवे, वेश्या आणि विषयासक्तीकारक अरागी यांचे गर्दभशब्दवत् व्यर्थ आलाप कधी काढू नयेत.

त्यानंतर अर्थवेद ज्याला शिल्पविद्या म्हणतात ज्यात पदार्थगुणविज्ञान, क्रियाकौशल, नानाविध पदार्थांची निर्मिती, पृथ्वीपासून आकाशापर्यंतच्या विद्येचा समावेश होतो. त्या सर्वांचे नीट अध्ययन करावे. अर्थवेद हा ऐश्वर्य वाढविणारा आहे. ती विद्या शिकून घेऊन दोन वर्षात ज्योतिषशास्त्र, सूर्यसिद्धांत इत्यादी ज्यामध्ये बीजगणित, अंकगणित, भूगोल, खगोल व भूगर्भविद्या आहे हे यथायोग्य अभ्यासावे.

त्यानंतर सर्वप्रकारच्या हस्तकला, यंत्रकला वगैरे शिकाव्यात. मात्र जितके ग्रह, नक्षत्र, जन्मपत्रिका, राशी, मुहूर्त वगैरेशी संबंधित फलज्योतिषाचे ग्रंथ आहेत ते खोटे समजून त्यांचे अध्ययन-अध्यापन कधी करू नये.

शिकणारे व शिकविणारे यांनी असा प्रयत्न करावा की ज्यायोगे वीस-एकवीस वर्षांत सर्व विद्या उत्तम शिक्षण प्राप्त होऊन, माणूस कृतकत्य होऊन सदैव आनंदात राहावा या पद्धतीने जेवढी विद्या वीस एकवीस वर्षांत प्राप्त होऊ शकते तेवढी दुसऱ्या पद्धतीने शंभर वर्षांतही मिळू शकणार नाही.

## ग्रंथप्रामाण्य

ऋषिप्रणीत ग्रंथांचे अध्ययन यासाठी करावयाचे की ऋषी हे मोठे विद्वान, सर्व शास्त्रे जाणणारे व धर्मात्मे होते. जे अनृषी, अल्पज्ञ व थोडीच शास्त्रे शिकलेले असतात आणि ज्यांचा आत्मा पक्षपाती असतो त्यांनी लिहिलेले ग्रंथही तसेच असतात.

पूर्वमीमांसेवर व्यासमुनिकृत व्याख्या, वैशेषिकदर्शनावर गौतममुनिकृत भाष्य, न्यायसूत्रावर वात्स्यायनमुनिकृत भाष्य, पतंजलीमुनिकृत (योग) सूत्रावर व्यासमुनिकृत भाष्य, कपिलमुनिकृत सांख्यदर्शनावर भागुरिमुनिकृत भाष्य, व्यासमुनिकृत वेदान्तसूत्रावर वात्स्यायनमुनिकृत भाष्य अथवा बौधायनमुनिकृत भाष्य वृत्तिसहित शिकावे व शिकवावे. इत्यादी सूत्रांना कल्प अंगांतही समाविष्ट समजावे.

ज्याप्रमाणे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चारही वेद ईश्वरकृत आहेत, त्या प्रमाणे ऐतरेय, शतपथ, साम व गोपथ ही चार ब्राह्मणे, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघण्टु, निरुक्त, छन्द व ज्योतिष ही वेदांची सहा अंगे, मीमांसादी वेदांची सहा उपांगे, आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद व अर्थवेद हे चार वेदांचे उपवेद, इत्यादी सगळे ऋषिमुनिप्रणीत ग्रंथ आहेत. यांमध्ये जे-जे वेदविरुद्ध प्रतीत होईल ते-ते सोडून द्यावे. कारण वेद ईश्वरकृत असल्याने निर्भ्रान्त स्वत: प्रमाण आहेत. म्हणजे वेदाचे प्रामाण्य वेदावरूनच होते. ब्राह्मणादी सर्व ग्रंथ परत: प्रमाण आहेत. म्हणजे त्यांचे प्रामाण्य वेदाधीन आहे. वेदांविषयींचे अधिक विवेचन 'ऋग्वेदादिभाष्यभूमिका' या ग्रंथात पाहावे. या ग्रंथामध्येही त्यासंबंधी पुढे लिहिण्यात येईल.

आता परित्यागास योग्य असणाऱ्या ग्रंथांची मोजणी थोडक्यात करतो. पुढे ज्या ग्रंथांचा उल्लेख केला आहे ते भ्रामक ग्रंथ आहेत असे समजावे. व्याकरणामध्ये कातंत्र, सारस्वत, चंद्रिका, मुग्धबोध, कौमुदी, शेखर, मनोरमा वगैरे; कोशांमध्ये अमरकोश वगैरे; छंदोग्रंथांमध्ये वृत्तरत्नाकर वगैरे; शिक्षण ग्रंथांमध्ये 'अथ शिक्षां प्रवक्ष्यामि पाणिनीयं मतं यथा' इत्यादी. ज्योतिषग्रंथांमध्ये शीघ्रबोध, मूहूर्तचिंतामणि इत्यादी काव्यांमध्ये नायिकाभेद, कुवलयानन्द, रघुवंश, माघ, किरातार्जुनीय वगैरे. मीमांसा ग्रंथांमध्ये धर्मसिंधु, व्रतार्क वगैरे. वैशेषिकांमध्ये तर्कसंग्रह वगैरे न्यायामध्ये जागदीशी वगैरे; योगामध्ये हठप्रदीपिका आदी; सांख्य ग्रंथामध्ये सांख्यतत्त्वकौमुदि वगैरे, वेदान्तामध्ये योगवासिष्ठ पञ्चदशी इत्यादी. वैद्यकामध्ये शार्ङ्गधर आदी. स्मृतिग्रंथामध्ये मनुस्मृतीतील प्रक्षिप्त श्लोक आणि इतर सर्व स्मृतिग्रंथ, सगळे तंत्रग्रंथ, सर्व पुराणे, सगळी उपपुराणे, तुलसीदासाचे भाषारामायण, रुक्मिणीमंगल आणि सर्व भाषाग्रंथ. हे सर्व कपोलकल्पित, मिथ्या ग्रंथ आहेत.

**(प्रश्न)** या ग्रंथामध्ये थोडेही सत्य नाही काय ?

**(उत्तर)** थोडेसे सत्य आहे. परंतु त्याच बरोबर पुष्कळसे असत्यही आहे. म्हणून 'विषसम्पृक्तान्नवत् त्याज्या:' म्हणजे अत्युत्तम अन्न विषयुक्त झाल्यास त्याज्य ठरते, या न्यायाने हे ग्रंथ त्याज्य आहेत.

**(प्रश्न)** तुम्ही पुराणे, इतिहास यांना मानीत नाही काय ?

**(उत्तर)** अवश्य मानतो. पण आम्ही सत्याला मानतो असत्याला नाही.

**(प्रश्न)** खरी कोणती व खोटी कोणती ?

**(उत्तर) ब्राह्मणानीतिहासान् पुराणानि कल्पान् गाथा नारशंसीरिति।**

हे गृह्यसूत्रातील वचन आहे. पूर्वी जो ऐतरेय, शतपथ आदी ब्राह्मण ग्रंथांचा उल्लेख केला आहे. त्यांचीच इतिहास, पुराण, कल्प, गाथा व नाराशंसी ही पाच नावे आहेत. श्रीमद्भागवत आदीचे नाव पुराण नाही.

**(प्रश्न)** त्याज्य ग्रंथांमध्ये जे सत्य आहे त्याचा स्वीकार का करीत नाही ?

**(उत्तर)** त्यांमध्ये जे-जे सत्य आहे ते सर्व वेदादी सत्यशास्त्रांतील आहे व जे मिथ्या आहे ते त्यांचे स्वत:चे आहे. वेदादी सत्यशास्त्रांचा स्वीकार करण्यामध्ये सर्व सत्याचे ग्रहण होऊन जाते. जर कोणी या मिथ्या ग्रंथांमधून सत्याचे ग्रहण करू पाहील तर त्याच्या गळ्यात असत्यही पडेल. म्हणून 'असत्यमिश्रं सत्यं दूरतस्त्याज्यमिति' म्हणजे असत्याने भरलेल्या ग्रंथातील सत्याचाही विषयुक्त अन्नाप्रमाणे त्याग केला पाहिजे.

**(प्रश्न)** तुमचे मत काय आहे ?

**(उत्तर)** वेदमत. वेदांमध्ये जे-जे करावे असे सांगितले आहे ते करावे आणि जे-जे सोडावे असे सांगितले आहे ते सोडावे (करू नये.) असे आम्ही मानतो. ज्याअर्थी वेद आम्हाला मान्य आहेत त्याअर्थी वेद हेच आमचे मत आहे. तसेच मानून सर्व मनुष्यमात्रास विशेषत: आर्यांनी एकमताने राहिले पाहिजे.

**(प्रश्न)** सत्यासत्याच्या बाबतीत इतर ग्रंथांमध्ये जसा परस्पर विरोध आहे. तसा अन्य शास्त्रांमध्येही आहे उदाहरणार्थ, सृष्टीच्या बाबतीत सहा शास्त्रांचा आपसात विरोध आहे. मीमांसा कर्मापासून, वैशेषिक काळापासून, न्याय परमाणूपासून, योग पुरुषार्थापासून, सांख्य प्रकृतीपासून आणि वेदान्त ब्रह्मापासून सृष्टीची उत्पत्ती मानतात. हा विरोध नव्हे काय ?

**(उत्तर)** पहिली गोष्ट अशी की सांख्य आणि वेदान्त यांच्या खेरीज इतर चार शास्त्रांमध्ये सृष्टीच्या उत्पत्तीविषयी स्पष्टपणे काहीच सांगितलेले नाही; आणि त्यात मुळीच विरोध नाही. तुम्हांला विरोध व अविरोध यांचे ज्ञान नाही असे दिसते, मी तुम्हांला विचारतो की, विरोध कोणत्या ठिकाणी होतो ? एका विषयात की भिन्न-भिन्न विषयांमध्ये ?

**(प्रश्न)** एका विषयामध्ये अनेकांचे परस्परविरोधी कथन असेल तर त्यास विरोध असे म्हणतात. वरील सहाही दर्शनात सृष्टी हा एकच विषय आहे.

**(उत्तर)** विद्या ही एक आहे की दोन ? एक आहे. ती जर एक आहे तर व्याकरण, वैद्यक, ज्योतिष आदि भिन्न-भिन्न विषय का आहेत ? ज्या प्रमाणे एका विद्येत अनेक विद्यांच्या अवयवांचे एकमेकांहून भिन्न प्रतिपादन असते. त्याचप्रमाणे सृष्टिविद्येच्या वेगवेगळया सहा अवयवांचे सहा शास्त्रांमध्ये प्रतिपादन करण्यात आलेले आहे. म्हणून त्यात काहीही विरोध नाही. ज्या प्रमाणे माठ बनवावयाचा असतो तेव्हा कर्म, वेळ, माती, विचार, संयोगवियोगादिचा पुरुषार्थ, प्रकृतीचे गुण आणि कुंभार अशी कारणे आहेत. त्याच प्रमाणे सृष्टिचे जे कारण आहे त्याची व्याख्या मीमांसेमध्ये, काळाविषयी वैशेषिकामध्ये, उपादान कारणाविषयी न्यायदर्शनामध्ये, पुरुषार्थाविषयी योगामध्ये, तत्त्वांच्या अनुक्रमाने परिगणनेविषयी सांख्यामध्ये आणि निमित्तकारण असणाऱ्या परमेश्वराविषयी वेदान्तशास्त्रामध्ये विवेचन करण्यात आले आहे. त्यामुळे कसलाच विरोध नाही. ज्याप्रमाणे वैद्यशास्त्रात निदान, चिकित्सा, औषधिदान आणि पथ्य प्रकरणे वेगवेगळी सांगितली आहेत. परंतु सर्वांचा

सिद्धांत रोगनिवारण हाच असतो. त्याच प्रमाणे सृष्टीची सहा कारणे आहेत. त्यांपैकी एकेका कारणाची व्याख्या षड्दर्शनातील एकेका शास्त्रकाराने केलेली आहे. त्यामुळे त्यात परस्पर विरोध मुळीच नाही याचे विशेष विवेचन सृष्टिप्रकरणात करू.

## विघ्ने

विद्येचे अध्ययन-अध्यापन करण्यात जी विघ्ने येतात ती टाळावीत. उदाहरणार्थ कुसंग म्हणजे दुष्ट, विषयासक्त लोकांची संगत, दुष्ट व्यसन; मद्यपान व वेश्यागमनादि वाईट व्यसने; बाल विवाह म्हणजे पुरुषाचे वयाच्या पंचवीसाव्या वर्षापूर्वी आणि स्त्रीचे वयाच्या सोळाव्या वर्षापूर्वी लग्न होणे, पूर्ण ब्रह्मचर्याचे पालन न होणे; राजा, माता, पिता आणि विद्वानाचा स्नेह वेदादी शास्त्रांच्या प्रचारामध्ये स्वारस्य नसणे; अतिभोजन, अतिजागरण; अध्ययन-अध्यापन व परीक्षा देणे-घेणे यांमध्ये आळस व कपट करणे; विद्येचा लाभ हा सर्वश्रेष्ठ असतो असे न समजणे; बळ, बुद्धि, पराक्रम, आरोग्य, राज्य व धन यांची वृद्धी होते यावर विश्वास न ठेवणे; ईश्वराचे ध्यान करण्याचे सोडून दगडाधोंड्याच्या निर्जीव मूर्तींच्या दर्शन-पूजनात निरर्थक वेळ वाया घालविणे; माता, पिता, अतिथी, आचार्य व विद्वान यांना सत्याचे प्रतीक मानून त्यांची सेवा व सत्संग न करणे; वर्णाश्रमधर्म सोडून ऊर्ध्वपुंड्र, त्रिपुंड, तिलक, कंठी, मालाधारण, एकादशी, त्रयोदशी इत्यादी व्रते करणे; काशी आदि तीर्थांची यात्रा आणि राम, कृष्ण, नारायण, शिव, भगवती, गणेश इत्यादींचे नामस्मरण याने पापे नाहीशी होतात असा विश्वास ठेवणे, पाखंडी लोकांचा उपदेश ऐकून विद्याभ्यासाच्या बाबतीत अश्रद्धा असणे; विद्या, धर्म, योग, परमेश्वराची उपासनाविना मुक्ती मिळते असे मानतो. भागवतादी भ्रामक पुराणातील कथा वाचून-ऐकून मोक्ष मिळतो असे समजणे; लोभाच्या आहारी जाऊन धनप्राप्तीची प्रवृत्ती होऊन विद्येची गोडी ठेवणे; इकडे-तिकडे निष्कारण भटकत राहणे. इत्यादी मिथ्या व्यवहारांमध्ये फसून लोक ब्रह्मचर्य व विद्या यांच्यापासून होणाऱ्या लाभांना मुकतात आणि त्यामुळे रोगी व अडाणी होत राहतात.

## स्त्रिया-शूद्र यांना वेदाध्ययनाचा अधिकार

आजकालचे जे सांप्रदायी व स्वार्थी ब्राह्मण वगैरे इतरांना विद्या व सत्संग यांपासून दूर ठेवतात आणि आपल्या जाळ्यात अडकवून त्यांचे तन, मन, धन नष्ट करतात आणि अशी इच्छा करतात की क्षत्रियादी वर्ण विद्याभ्यास करून विद्वान बनले तर ते आमच्या पाखंडाच्या जाळ्यातून बाहेर पडतील आणि आमचे कपट ओळखून आमचा अपमान करतील. 'म्हणून राजा व प्रजा यांनी ही विघ्ने दूर करून आपल्या मुलांना व मुलींना विद्वान बनविण्यासाठी तन, मन, धनाने प्रयत्न केला जावा.'

**(प्रश्न)** स्त्रिया व शूद्र यांनीही वेदाभ्यास करावा काय ? त्यांनी वेदपठण केले तर मग आम्ही काय करायचे ? शिवाय त्यांनी वेदपठण करावे याला काही आधारही नाही. उलट असा निषेध आहे :-

**स्त्रीशूद्रौ नाधीयातामिति श्रुतेः ।**

स्त्री व शूद्र यांनी अध्ययन करू नये, ही श्रुती आहे.

**(उत्तर)** तुमचा सर्वनाश होवो जे तुम्ही असे म्हणता. कारण सर्व स्त्रिया आणि पुरुष यांना म्हणजेच

मनुष्यमात्राला वेदाध्ययनाचा अधिकार आहे. तुम्ही म्हणता ती श्रुती म्हणजे तुमची कपोलकल्पना आहे. श्रुतींमध्ये ते वाक्य नाही.

कोणत्याही प्रमाणित ग्रंथातील ती श्रुती नाही. सर्व मनुष्यांना वेदादी शास्त्रे अध्ययनाचा व ऐकण्याचा अधिकार आहे असा पुरावा यजुर्वेदाच्या सव्वीसाव्या अध्यायातील दुसऱ्या मंत्रात आहे.

**यथेमां वाचं कल्याणीमावदानि जनेभ्यः।**

**ब्रह्मराजन्याभ्यां शूद्राय चार्याय च स्वाय चारणाय ॥** यजु. अ. २६। मं. २

परमेश्वर सांगतो की (यथा) जसा मी (जनेभ्यः) सर्व मनुष्यांसाठी (इमाम्) ही (कल्याणीम्) सुखे म्हणजे संसार व मुक्ती यांची सुखे प्राप्त करून देणारी (वाचम्) जी ऋग्वेदादी चारही वेदांच्या वाणीचा (आ वदानि) उपदेश करतो तसे तुम्हीही करा.

**(प्रश्न)** येथे कोणी असा प्रश्न विचारील की, 'स्मृतिग्रंथांप्रमाणे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनाच वेदाध्ययनाचा अधिकार आहे, स्त्रिया व शूद्र यांना नाही.' म्हणून जन या शब्दाचा अर्थ द्विज असा, केला पाहिजे ?

**(उत्तर)** परमेश्वर स्वतःच सांगतो आहे की मी (ब्रह्मराजन्याभ्यां) ब्राह्मण, क्षत्रिय, (अर्य्याय) वैश्य, (शूद्राय) शूद्र आणि (स्वाय) आपले नोकर अथवा स्त्रिया वगैरे व (अरणाय) अतिशूद्रादी यांच्यासाठी वेदांचा प्रकाश केला आहे. म्हणून सर्वांनी वेदांचे अध्ययन-अध्यापन व श्रवण-कीर्तन करून आपले ज्ञान वाढवून, चांगल्या गोष्टींचा स्वीकार व वाईट गोष्टींचा त्याग करून दुःखांपासून सुटका करून घ्यावी आणि आनंद मिळवावा. आता तुम्हीच सांगा, आम्ही तुमचे म्हणणे मान्य करावे की परमेश्वराचे ?

परमेश्वराचे सांगणेच माननीय आहे, यात शंका नाही, तरी पण जर कोणी हे मान्य करीत नसेल तर तो नास्तिक म्हटला जाईल. कारण **'नास्तिको वेदनिन्दकः'** वेदांची निंदा करणारा आणि वेदांना न मानणारा नास्तिक म्हटला जातो. परमेश्वर शूद्रांचे कल्याण करू इच्छित नाही काय ? परमेश्वर पक्षपाती आहे काय ? की द्विजांनीच वेदाध्ययन करावे आणि शूद्रांसाठी निषेध आहे ? शूद्रादींनी वाचन, श्रवण करू नये अशी परमेश्वराची इच्छा असती तर त्याने त्यांच्या शरीरामध्ये वाणी व कान ही इंद्रिये कशाला निर्माण केली ? ज्या प्रमाणे परमेश्वराने पृथ्वी, जल, अग्नि, वायु, चंद्र, सूर्य आणि अन्नादी पदार्थ सर्वांसाठी निर्माण केले आहेत. त्याच प्रमाणे त्याने वेदही सर्वांसाठी प्रकाशित केले आहेत, जेथे कोठे 'शूद्रांनी वेद म्हणू नयेत' असा निषेध केला असेल तेथे त्याचा अभिप्राय हा आहे की ज्याला शिकविले असता काहीच येत नाही तो निर्बुद्ध व अडाणी असल्याने त्याला शूद्र म्हटले जाते. त्याचे शिकणे त्याला शिकविणे व्यर्थ आहे आणि जे लोक स्त्रियांना शिकवू नये असे म्हणतात. तो त्यांचा मूर्खपणा, स्वार्थीपणा व निर्बुद्धपणाचा प्रभाव आहे. पाहा ! वेदांमध्ये मुलींना शिकण्याचा हा पुरावा :

**ब्रह्मचर्य्येण कन्या३ युवानं विन्दते पतिम् ॥** अथर्व. अनु. ३। प्र. २४। का. ११। मं. १८

ज्याप्रमाणे मुले ब्रह्मचर्याचे पालन करून पूर्ण विद्या व सुशिक्षण प्राप्त केल्यानंतर युवती, विदुषी व आपल्याला अनुकूल व प्रिय अशा स्त्रियांशी विवाह करतात त्याप्रमाणे (कन्या) कुमारी (ब्रह्मचर्येण) ब्रह्मचर्य

पालन करून वेदादि शास्त्रे शिकून पूर्ण विद्या व उत्तम शिक्षण मिळवून युवती होऊन आणि पूर्ण यौवनात प्रवेश केल्यावर आपल्यासारखा प्रिय विद्वान (युवानम्) व पूर्ण यौवनयुक्त पुरुष (विन्दते) प्राप्त करो. म्हणून स्त्रियांनीही ब्रह्मचर्याचे पालन करून विद्याध्ययन अवश्य केले पाहिजे.

**(प्रश्न)** स्त्रियांनीही वेदांचे पठण करावे काय?

**(उत्तर)** अवश्य करावे, पाहा : श्रौतसूत्रादींमध्ये :- **इमं मन्त्रं पत्नी पठेत्॥**

अर्थात यज्ञामध्ये पत्नीने हा मंत्र म्हणावा. जर स्त्रीने वेदादी शास्त्रांचा अभ्यास केलेला नसेल तर तिला यज्ञामध्ये स्वरसहित मंत्रांचे उच्चारण व संस्कृत भाषण कसे करता येईल? भारतवर्षामध्ये स्त्रियांना भूषणास्पद ठरलेल्या गार्गी वगैरे महिला वेदादी शास्त्रांचे अध्ययन करून पूर्ण विदुषी बनल्या होत्या, असे शतपथ ब्राह्मणात स्पष्ट सांगितले आहे. जर पुरुष विद्वान आणि स्त्री अडाणी किंवा स्त्री विदुषी व पुरुष अडाणी अशी स्थिती असेल तर उठल्यासुटल्या घरात देवासुर संग्राम माजून राहील, मग सुख कोठले? तसेच, स्त्रिया शिकल्या नाहीत तर मुलींच्या शाळांमध्ये शिक्षिका कोठून मिळणार? राज्यकार्य, न्यायाधीशत्व वगैरे कामे गृहाश्रमाचे कार्य जे पतिला स्त्री आणि स्त्रीला पति प्रसन्न ठेवणे. घरातील सर्व कामांची जबाबदारी स्त्रीवर असते, ती स्त्री सुशिक्षित नसेल तर इत्यादि कामे तिच्याकडून चांगल्या प्रकारे कधीच होऊ शकत नाहीत.

पहा! आर्यावर्तातील राजपुरुषांच्या स्त्रिया धनुर्वेदात म्हणजे युद्धविद्येतही अत्यंत निष्णात असत. तशा त्या नसत्या तर कैकयी सारख्या राण्या दशरथासारख्या राजांबरोबर लढाईत का म्हणून गेल्या असत्या? आणि युद्ध कशा करू शकल्या असत्या? म्हणून ब्राह्मण स्त्रीला सर्व विद्या, क्षत्रिय स्त्रीला सर्व विद्यांबरोबरच युद्धशास्त्र व विशेष राजविद्या, वैश्य स्त्रीला व्यवहार विद्या आणि शूद्र स्त्रीला पाकक्रियादी सेवांच्या विद्या यांचे शिक्षण अवश्य दिले गेले पाहिजे. ज्या प्रमाणे पुरुषांनी किमान व्याकरण, धर्मशास्त्र व आपल्या व्यवहाराची किमान विद्या अवश्य शिकून घेतली पाहिजे त्या प्रमाणे स्त्रियांनीही व्याकरण, धर्मशास्त्र, वैद्यक, गणित व शिल्पविद्या, अवश्य शिकून घेतली पाहिजेत. कारण त्यावाचून सत्यासत्याचा निर्णय, पती वगैरेशी अनुकूल वर्तन, यथायोग्य संतानोत्पत्ति, मुलांचे संगोपन संवर्धन व सुशिक्षण, घरातील सर्व कामे योग्य प्रकारे पार पाडणे, वैद्यक शास्त्राच्या ज्ञानाच्या आधारे समतोल आहार बनविणे वगैरे गोष्टी त्यांना करता येणार नाहीत. त्यांनी या सगळ्या गोष्टींकडे नीट लक्ष पुरविले तर घरामध्ये कधीही आजार प्रवेश करणार नाही आणि सर्व लोक आनंदित राहतील. शिल्पविद्येचे ज्ञान नसेल तर घराची मांडणी, वस्त्रे व आभूषणे तयार करणे व करवून घेणे, गणित विद्या अवगत नसेल तर हिशेब ठेवणे व इतरांना समजावून सांगणे, आदी वेदादी शास्त्रविद्येविना ईश्वर व धर्म यांना जाणून अधर्मापासून कधीही दूर राहू शकत नाहीत.

म्हणून जे लोक आपल्या मुलांना ब्रह्मचर्य, उत्तम शिक्षण व विद्या यांच्या द्वारे शरीर व आत्मा यांना सामर्थ्यपूर्ण बनविण्याची प्रेरणा देतात ते धन्यवादार्ह व कृतकृत्य होत. या शिक्षणामुळे मुले आईवडील, पती, सासू, सासरा, राजा, प्रजा, शेजारी, इष्टमित्र आणि मुलेबाळे यांच्याशी यथायोग्य धर्माप्रमाणे वर्तन करतील. विद्या हाच अक्षय कोष (खजिना) आहे. जो जितका खर्चावा तितका वाढत जातो. इतर सर्व कोष खर्च केल्याने घटत जातात. शिवाय वारसदारही आपापले वाटे काढून घेतात. परंतु विद्यारूपी भांडाराची चोरी किंवा त्याचा

कुणीही वारसदार होऊ शकत नाही. या कोषाचे रक्षण व वृद्धि करण्याची जबाबदारी घेणारी विशेषत: राजा व प्रजा ही असते.

**कन्यानां सम्प्रदानं च कुमाराणां च रक्षणम्॥** मनु. अ. ७। श्लो. १५२

सर्व कुमार व कुमारिका यांना अमुक काळापासून अमुक काळापर्यंत ब्रह्मचर्य पाळावयास लावणे व विद्वान बनविणे हे राजास योग्य आहे. या राजाज्ञेचे पालन जे करणार नाहीत त्यांच्या आईवडिलांना शिक्षा करणे उचित होय. आठव्या वर्षानंतर मुलामुलींना घरी न ठेवता राजाज्ञेने आचार्यकुलामध्ये ठेवावे. समावर्तनाची वेळ येईपर्यंत कोणीही लग्न करू नये.

**सर्वेषामेव दानानां ब्रह्मदानं विशिष्यते।**
**वार्यन्नगोमहीवासस्तिलकाञ्चनसर्पिषाम्॥** मनु. अ. ४। श्लो. २२३

जल, अन्न, गाय, पृथ्वी, वस्त्र, तीळ, सुवर्ण व तूप इत्यादी जितकी दाने जगात आहेत त्या सर्वांहून वेदविद्येचे दान हे अत्यंत श्रेष्ठ आहे, म्हणून विद्यावृद्धीसाठी तन मन धनाने होईल तेवढा प्रयत्न करावा. ज्या देशात यथायोग्य ब्रह्मचर्य, विद्या आणि वेदोक्त धर्म यांचा प्रचार होत असतो तो देश सौभाग्यशाली होत असतो.

या प्रकरणात ब्रह्मचर्याश्रमातील शिक्षणाविषयी संक्षेपाने लिहिले आहे. या नंतरच्या चौथ्या समुल्लासात समावर्तन, विवाह व गृहस्थाश्रमाचा उपदेश यांची चर्चा करण्यात येईल.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते शिक्षाविषये**
**तृतीयः समुल्लासः सम्पूर्णः ॥३॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा '**सत्यार्थ प्रकाश**' या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.





## चौथा समुल्लास

# समावर्तन संस्कार

## समावर्तन विवाह गृहाश्रम विधि विषयी

**वेदानधीत्य वेदौ वा वेदं वापि यथाक्रमम् ।**
**अविप्लुतब्रह्मचर्यो गृहस्थाश्रममाविशेत् ॥१॥** मनु. अ. ३। श्लो. २

यथायोग्य ब्रह्मचर्याचे पालन करून, आचार्यांच्या अनुकूल वागून, धर्मपूर्वक चार, तीन, दोन किंवा एका वेदाचे सांगोपांग अध्ययन करून ज्याचे ब्रह्मचर्य खंडित झाले नसेल अशा पुरुषाने अथवा स्त्रीने गृहस्थाश्रमामध्ये प्रवेश करावा. ॥१॥

**तं प्रतीतं स्वधर्मेण ब्रह्मदायहरं पितुः ।**
**स्त्रग्विणं तल्प आसीनमर्हयेत्प्रथमं गवा ॥२॥** मनु. अ. ३। श्लो. ३

जो स्वधर्म म्हणजे यथावत आचार्य व शिष्य यांचा धर्म आहे त्याने संयुक्त, पिता, जनक अथवा अध्यापक यांच्याकडून ब्रह्मदाय म्हणजे विद्यारूपी भाग ग्रहण केला आहे आणि जो माला धारण करणारा, आपल्या पलंगावर बसलेल्या आचार्यांचा प्रथम गोप्रदान करून सत्कार करावा. अशा लक्षणांनी युक्त विद्यार्थ्याचाही मुलीच्या पित्याने गोप्रदान करून सत्कार करावा. ॥२॥

## विवाह

**गुरुणानुमतः स्नात्वा समावृत्तो यथाविधि ।**
**उद्वहेत द्विजो भार्यां सवर्णां लक्षणान्विताम् ॥** मनु. अ. ३। श्लो. ४

गुरूची अनुमती घेऊन, स्नान करून, गुरुकुलातून अनुक्रमपूर्वक येऊन ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आपापल्या वर्णास अनुकूल व सुंदर लक्षणांनी युक्त कन्येशी विवाह करावा. ॥३॥

**असपिण्डा च या मातुरसगोत्रा च या पितुः ।**
**सा प्रशस्ता द्विजातीनां दारकर्मणि मैथुने ॥४॥** मनु. अ. ३। श्लो. ५

जी कन्या मातृघराण्याच्या सहा पिढ्यांमध्ये येत नसेल आणि पित्याच्या गोत्रातील नसेल अशा कन्येशी विवाह करणे योग्य होय. ॥४॥

त्याचे कारण असे की,

## दूर देशी विवाह संबंध

**परोक्षप्रिया इव हि देवा: प्रत्यक्षद्विष: ।।** शतपथ प्रपा. १४। बा ६। कं ११। व २

परोक्ष वस्तू जशी प्रिय असते तशी प्रत्यक्ष वस्तु प्रिय असत नाही. यात तिळमात्रही संदेह नाही. ज्याप्रमाणे एखाद्याने खडीसाखरेचे गुण ऐकले असतील पण ती खाल्ली नसेल तर त्याचे मन त्या खडीसाखरेत गुंतून राहते. त्याप्रमाणे एखाद्या परोक्ष वस्तूची प्रशंसा ऐकल्यानंतर तिच्या प्राप्तीची उत्कट इच्छा उत्पन्न होते. म्हणूनच जी आपल्या गोत्राशी मातेच्या कुळाशी जिचा जवळचा संबंध नसेल अशाच दूरस्थ मुलीशी वराचा विवाह झाला पाहिजे.

जवळच्या व दूरच्या नात्यात विवाह करण्यामध्ये हे गुण आहेत :-

(१) जी मुले लहानपणापासून जवळ रहात असतात, एकमेकांशी खेळणे, भांडणे आणि प्रेम करतात, ज्यांना एकमेकांचे गुण-दोष, स्वभाव व बाल्यावस्थेतील विपरीत आचरणाची माहीती झालेली असते आणि ज्यांनी एकमेकांना उघडे-नागडे पाहिलेले असते त्यांचा परस्परांशी विवाह झाल्यास त्यांच्यामध्ये प्रेम कधीही उत्पन्न होत नाही.

(२) ज्याप्रमाणे पाण्यात पाणी मिसळल्याने काही विशेष गुण उत्पन्न होत नाही त्याप्रमाणे सपिंडात व सगोत्रात विवाह झाल्याने धातूंमध्ये अदलाबदल होत नसल्याने असा विवाह उन्नतिकारक ठरत नाही.

(३) ज्याप्रमाणे दुधामध्ये खडीसाखर किंवा सुंठ वगैरे औषधी मिसळल्याने त्या मिश्रणात उत्तम गुण निर्माण होतात त्याचप्रमाणे भिन्न गोत्रे व भिन्न कुळे यांतील स्त्रीपुरुषांचा विवाह होणे उत्तम आहे.

(४) ज्याप्रमाणे एका देशातील (प्रदेशातील) रोगी दुसऱ्या देशात जातो व हवा आणि अन्न पाणी बदलल्याने रोगमुक्त होतो. त्याप्रमाणे दूरदेशी राहणाऱ्या स्त्रीपुरुषांचा विवाह होण्यात उत्तमता आहे.

(५) जवळच्या नात्यांत विवाहसंबंध झाल्याने व पतिपत्नींची घरे जवळ असल्याने एकमेकांच्या सुखदु:खांची जाणीव व विरोध तीव्र होणेसुद्धा संभव आहे. दूर राहणाऱ्या कुटुंबांमध्ये तसे होण्याची शक्यता नसते. दूरस्थ स्त्रीपुरुषांमधील विवाहामुळे प्रेमाचा धागा लांबवर वाढत जातो तसे निकटस्थांच्या विवाहामध्ये होत नाही.

(६) दूर-दूरच्या प्रदेशातील स्त्रीपुरुषांचे विवाह झाल्याने तिकडील वर्तमान समजते व तद्देशीय पदार्थांची सहज प्राप्ती होते. जवळच्या विवाहातून हा लाभ मिळत नाही.

**दुहिता दुर्हिता दूरेहिता भवतीति ।।** निरु. अ. ३ मं. ४

कन्येचे नाव दुहिता आहे याचे कारण असे की तिचे लग्न दूरच्या गावी झाल्याने ते हितकारक होते. जवळ लग्न झाल्यास त्याने हित होत नाही.

(७) मुलीचे माहेर जवळ असल्यास ती बारंवार माहेरी येईल व दर खेपेस तिला काही ना काही द्यावे लागेल. त्यामुळे तिच्या माहेरच्या लोकांना दारिद्र्य येण्याची शक्यता आहे.

(८) सासर व माहेर एकमेकांजवळ असल्यास पती व पत्नी यांना आपल्या आपल्या पित्याच्या कुटुंबाकडून साह्य मिळून त्याबद्दल त्यांच्या मनांत घमेंड उत्पन्न होईल आणि पतिपत्नींमध्ये थोडेसे वैमनस्य निर्माण होताच

पत्नी चटकन माहेरी निघून जाईल. एकमेकांची निंदा आणि विरोधही अधिक होईल. कारण स्त्रियांचा स्वभाव बहुधा तीक्ष्ण व मृदु असतो. या अशाच इतर कारणांमुळे पित्याचे गोत्र, आईच्या कुळातील सहा पिढ्यांचा संबंध आणि जवळचा प्रदेश यांमध्ये विवाह करणे हितकारक नसते.

**महान्त्यपि समृद्धानि गोऽजाविधनधान्यतः ।**

**स्त्रीसम्बन्धे दशैतानि कुलानि परिवर्जयेत् ॥१॥** मनु. अ. ३। श्लो. ६

धन, धान्य, गायी, शेळ्या, हत्ती, घोडे, राज्य, श्री इत्यादींनी कुळे कितीही समृद्ध असली तरी विवाहसंबंधाच्या दृष्टीने पुढील दहा कुळांचा त्याग करा. ॥१॥

**हीनक्रियं निष्पुरुषं निश्छन्दो रोमशार्शसम् ।**

**क्षय्यामयाव्यपस्मारिश्वित्रिकुष्ठिकुलानि च ॥२॥** मनु. अ. ३। श्लो. ७

जे घराणे सदाचारहीन, सत्पुरुषरहित, वेदाध्ययनापासून विमुख असेल, ज्या कुळात अंगावर लांब केस असणारी माणसे असतील अथवा ज्या कुटुंबात मूळव्याध, क्षय, दमा, खोकला, अमांश (आव), अपस्मार, श्वेतकुष्ठ व गलितकुष्ठ (महारोग) हे रोग असतील अशा कुळातील वधू किंवा वर यांच्याशी विवाह करू नये. कारण हे सर्व दुर्गुण व रोग विवाह करणाऱ्या कुळातही प्रविष्ट होत जातात. म्हणून उत्तम कुळातील तरुण व तरुणी यांच्यामध्येच विवाह झाला पाहिजे. ॥२॥

**नोद्वहेत्कपिलां कन्यां नाऽधिकाङ्गीं न रोगिणीम् ।**

**नालोमिकां नातिलोमां न वाचाटान्न पिङ्गलाम् ॥** मनु. अ. ३। श्लो. ८

रंगाने पिवळी, पुरुषाहून अधिक लठ्ठ, उंच किंवा बलिष्ठ, रोगट, अंगावर मुळीच केस नसलेली, किंवा फार केस असलेली, बडबडणारी, गारसे डोळ्यांच्या मुलीशी विचार न करता विवाह करू नये.

**नर्क्षवृक्षनदीनाम्नीं नान्त्यपर्वतनामिकाम् ।**

**न पक्ष्यहिप्रेष्यनाम्नीं न च भीषणनामिकाम् ॥४॥** मनु. अ. ३। श्लो. ९

अश्विनी, भरणी, रोहीणीदेवी, रेवतीबाई, चित्तारी वगैरे नक्षत्रांची नावे; तुळशी, झेंडू, गुलाब, चंपा, चमेली, वगैरे झाडा-फुलांची नावे; गंगा, यमुना अशी नद्यांची नावे; चांडाली वगैरे अत्यंज नावे; विंध्या, हिमालया, पार्वती यांसारखी पर्वतांची नावे; कोकिळा, मैना अशी पक्ष्यांची नावे; नागी, भुजंगी यांसारखी सापांची नावे; माधोदासी, मीरादासी यांसारखी दासभाव व्यक्त करणारी नावे; आणि भीमाबाई, चंडीका, काली असली भीषण असणाऱ्या कन्येशी विवाह करू नये. कारण अशी नावे निंदनीय व इतर पदार्थांचीही असतात.

**अव्यङ्गाङ्गीं सौम्यनाम्नीं हंसवारणगामिनीम् ।**

**तनुलोमकेशदशनां मृद्वङ्गीमुद्वहेत् स्त्रियम् ॥५॥** मनु. अ. ३। श्लो. १०

जी अव्यंग असेल म्हणजे जिचे सर्व अवयव प्रमाणबद्ध असतील, जिचे नाव सुंदर अर्थात यशोदा, सुखदा असेल, हंस व हत्तीणी यांसारखी जिची चाल असेल, (जी गजगामिनी असेल,) जिचे लोम (अंगावरील लव), केस व दात सूक्ष्म असतील आणि जिचे सर्वांग कोमल असेल अशा स्त्रीबरोबर विवाह केला पाहिजे. ॥५॥

# बालविवाह निषेध

**(प्रश्न)** विवाहाचा कोणता काळ व प्रकार चांगला असतो ?

**(उत्तर)** मुलीच्या वयाच्या सोळाव्या वर्षापासून चोवीसाव्या वर्षापर्यंत आणि पुरुषाच्या पंचविसाव्या वर्षापासून अठ्ठेचाळीसाव्या वर्षापर्यंतचा काळ विवाहाच्या दृष्टीने उत्तम होय. यापैकी सोळा वर्षाची मुलगी व पंचवीस वर्षाचा मुलगा यांचा विवाह कनिष्ठ, अठरा-वीस वर्षाची तरुणी आणि तीस-पस्तीस किंवा चाळीस वर्षाचा तरुण यांचा विवाह मध्यम, आणि चोवीस वर्षाची स्त्री आणि अठ्ठेचाळीस वर्षाचा पुरुष यांचा विवाह उत्तम होय. ज्या देशात याप्रमाणे श्रेष्ठ विवाह होतात, ब्रह्मचर्यपालन आणि विद्याभ्यास या गोष्टी मोठ्या प्रमाणावर चालतात तो देश सुखी होतो. याउलट ज्या देशातील मुले ब्रह्मचर्याचे पालन करीत नाहीत, विद्याभ्यासाकडे लक्ष देत नाहीत आणि बाळपणी व अयोग्य स्त्रीपुरुषांचे विवाह होतात तो देश दु:खात बुडून जातो. कारण ब्रह्मचर्यपालन व विद्याभ्यास केल्यानंतर लग्न करण्याची सुधारणा अमलात आल्यास सर्व गोष्टीत सुधारणा घडून येते. तसे झाले नाही तर सर्व काही बिघाड होत असतो.

**(प्रश्न) अष्टवर्षा भवेद् गौरी नववर्षा च रोहिणी।**
**दशवर्षा भवेत्कन्या तत ऊर्ध्वं रजस्वला ॥१॥**
**माता चैव पिता तस्या ज्येष्ठो भ्राता तथैव च।**
**त्रयस्ते नरकं यान्ति दृष्ट्वा कन्यां रजस्वलाम् ॥२॥**

हे श्लोक पाराशरी व शीघ्रबोध या ग्रंथामध्ये लिहिले आहेत. त्यांचा अर्थ असा आहे की मुलीला आठव्या वर्षी गौरी, नवव्या वर्षी रोहिणी, दहाव्या वर्षी कन्या आणि त्यानंतर रजस्वला अशी नावे होतात. ॥१॥

दहाव्या वर्षापर्यंत मुलीचे लग्न न करता तिला रजस्वला या स्वरूपात पाहून तिचे आई-बाप व मोठा भाऊ हे तिघेही नरकात जातात. ॥२॥

**(उत्तर) ब्रह्मोवाच-**
**एकक्षणा भवेद् गौरी द्विक्षणेयन्तु रोहिणी।**
**त्रिक्षणा सा भवेत्कन्या ह्यत ऊर्ध्वं रजस्वला ॥१॥**
**माता पिता तथा भ्राता मातुलो भगिनी स्वसा।**
**सर्वे ते नरकं यान्ति दृष्ट्वा कन्यां रजस्वलाम् ॥२॥**

हे सद्योनिर्मित ब्रह्मपुराणातील वचन आहे.

अर्थ :- परमाणूला स्वत:भोवती फिरण्यास जेवढा वेळ लागतो त्याला क्षण असे म्हणतात. मुलगी जन्मली की पहिल्या क्षणी गौरी, दुसऱ्या क्षणी रोहिणी, तिसऱ्या क्षणी कन्या आणि चौथ्या क्षणी रजस्वला होते. ॥१॥

त्या रजस्वला मुलीला पाहून तिची आई, बाप, भाऊ, मामा आणि बहीण सगळे नरकात जातात. ॥२॥

**(प्रश्न)** हे श्लोक प्रमाण नाहीत.

**(उत्तर)** का प्रमाण नाहीत ? ब्रह्मदेवाने उच्चारलेले हे श्लोक जर प्रमाण नसतील तर तुम्ही उद्धृत केलेले श्लोकही प्रमाण होऊ शकत नाहीत.

**(प्रश्न)** वाहवा ! पराशर व काशीनाथ यांचे श्लोकही तुम्ही प्रमाण मानीत नाही काय?

**(उत्तर)** वाहवा ! तुम्ही ब्रह्मदेवाचे श्लोक प्रमाण मानीत नाही ? पराशर व काशीनाथ यांच्यापेक्षा ब्रह्मदेव मोठा नाही काय ? तुम्ही ब्रह्मदेवाचे श्लोक प्रमाण मानीत नसाल तर आम्हीही पराशर व काशीनाथ यांचे श्लोक प्रमाण मानीत नाही.

**(प्रश्न)** तुमचे श्लोक अशक्य कोटीतील असल्यामुळे त्यांना प्रमाण मानता येत नाही. कारण मुलगी जन्माला येताच तिच्या लग्नाची तयारी सुरू केली तरी त्यात हजारो क्षण निघून जाणार. मग चार क्षणांत विवाह कसा होऊ शकतो ? आणि त्या अवस्थेत लग्न करण्याने काहीही लाभ दिसून येत नाही.

**(उत्तर)** आमचे श्लोक अशक्य कोटीतील असतील तर तुमचे श्लोकही तसेच आहेत. कारण आठव्या, नवव्या व दहाव्या वर्षीही लग्न करणे निरर्थक आहे. कारण सोळाव्या वर्षानंतर स्त्रीच्या गर्भाशयाची पूर्ण वाढ होते व तिचे शरीर बलवान होते; आणि पुरुषाचे शरीर चोवीस वर्षानंतर सुदृढ होऊन त्याचे वीर्य परिपक्व होते. म्हणून अशा स्त्रीपुरुषांची संतति उत्तम होत असते. ज्याप्रमाणे आठ वर्षे वयाच्या मुलीला संतति होणे असंभव असते त्याचप्रमाणे सरसकट सर्व मुलींना गौरी रोहिणी अशी नावे देणेही अयोग्य आहे. मुलगी गोरी नसून काळी असेल तर तिचे नाव गौरी असे ठेवणे व्यर्थ आहे. शिवाय गौरी ही महादेवाची पत्नी व रोहिणी ही वसुदेवाची पत्नी होती. त्यांना तुम्ही पौराणिक लोक मातेसमान मानता. प्रत्येक मुलगी ही गौरी वगैरे समान असते अशी तुमची भावना असेल तर तिच्याशी लग्न करणे कसे योग्य व धर्मयुक्त ठरते ? म्हणून तुम्ही व आम्ही प्रस्तुत केलेले दोन-दोन श्लोक मिथ्याच आहेत. ज्याप्रमाणे 'ब्रह्मोवाच' म्हणून नमूद केलेले श्लोक आम्हीच रचलेले आहेत, त्याचप्रमाणे पराशर वगैरेंच्या नावांनी तुम्ही उद्धृत केलेले श्लोक कोणीतरी रचलेले आहेत. म्हणून असल्या श्लोकांचा आधार घेणे सोडून वेदांनाच प्रमाण माना आणि त्याप्रमाणे सर्व कामे करा. मनुस्मृतीमध्ये असे सांगितले आहे की,

**त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्यृतुमती सती ।**
**ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ।।** मनु. अ. ९। श्लो. ९०

कन्या ऋतुमती झाल्यानंतर तीन वर्षापर्यंत तिच्यासाठी योग्य पतीचा शोध करावा आणि योग्य वराशी तिचा विवाह करून द्यावा. दर महिन्यास एकदा रजोदर्शन होते. याप्रमाणे तीन वर्षात छत्तीस वेळा रजोदर्शन झाल्यावर तिचे लग्न करणे योग्य होय. तत्पूर्वी विवाह करणे उचित नाही.

**काममामरणात्तिष्ठेद् गृहे कन्यर्तुमत्यपि ।**
**न चैवैनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ।।** मनु. अ. ८। श्लो. ८९

मुला मुलीने वाटल्यास जन्मभर अविवाहित राहवे, परंतु गुण-कर्म-स्वभाव असदृश परस्परविरुद्ध असलेल्यांचा विवाह कधीही होता कामा नये. यावरून असे सिद्ध होते की पूर्वोक्त वेळेच्या आधी आणि विजोड स्त्रीपुरुषांचा विवाह होणे अयोग्य आहे.

**(प्रश्न)** विवाह हा आईवडिलांच्या इच्छेप्रमाणे व्हावा की मुला व मुलीच्या अधीनस्थ रहावा ?

**(उत्तर)** विवाहाचा निर्णय मुला व मुलीचे मताने होणे हे चांगले. आईवडिलांच्या मनात कधी आपल्या

मुलामुलींचा विवाह करण्याचा विचार आला असेल तरीही त्यांनी मुलाच्या किंवा मुलीच्या प्रसन्नते शिवाय विवाह करू नये. कारण वधुवरांनी एकमेकांना पसंत केल्यावर विवाह झाल्यास त्यांच्यात फारसा विरोध निर्माण होत नाही; आणि संततिही चांगली निपजते. मनाविरुद्ध केलेल्या विवाहाने नेहमीच दुःख होत राहते. विवाहामध्ये मुख्य संबंध वधू व वर यांचा असतो; आईबापांचा नव्हे कारण ती दोघे एकमेकांवर अनुरक्त असतील तर त्यांनाच सुख होते; आणि त्यांच्यात विरोध असल्यास त्यांनाच दुःख भोगावे लागते.

**सन्तुष्टो भार्यया भर्त्ता भर्त्रा भार्य्या तथैव च।**
**यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम्॥** मनु. अ. ३। श्लो. ६०

ज्या कुळामध्ये स्त्री पुरुष हे एकमेकांवर सदैव प्रसन्न असतात, त्याच कुळात आनंद, लक्ष्मी आणि कीर्ती निवास करतात आणि जेथे पतिपत्नींमध्ये विरोध व कलह असतो तेथे दुःख, दारिद्र्य व अपकिर्ती निवास करतात.

म्हणून आर्यावर्तात परंपरेने चालत आलेली स्वयंवराची विवाह पद्धतच उत्तम होय. जेव्हा स्त्रीपुरुष विवाह करू इच्छितात तेव्हा विद्या, विनय, शील, रूप, वय, बळ, कूळ, शरीर यांचे परस्परांशी प्रमाण यथायोग्य असले पाहिजे. जोपर्यंत या बाबतीत त्यांच्यामध्ये मेळ होत नाही तोपर्यंत अशा विवाहापासून काहीही सुख होत नाही. तसेच लहानपणी विवाह केल्यानेही सुख मिळत नाही.

**युवा सुवासाः परिवीत आगात्स उ श्रेयान्भवति जायमानः।**
**तं धीरासः कवय उन्नयन्ति स्वाध्यो३ मनसा देवयन्तः॥१॥** ऋ. मं. ३। सू. ८। मं. ४

जो पुरुष (परिवीतः) सर्व प्रकारे यज्ञोपवीत धारण करून, ब्रह्मचर्याचे पालन करून उत्तम शिक्षण व विद्या यांनी युक्त बनून (सुवासाः) सुंदर वस्त्रे परिधान करतो आणि ब्रह्मचर्याच्या पालनाने (युवा) पूर्ण यौवनसंपन्न होऊन विद्याग्रहण करून गृहस्थाश्रमात (आगात्) प्रवेश करतो (स उ) तोच दुसऱ्या विद्याजनामध्ये (जायमानः) प्रसिद्ध होऊन (श्रेयान्) अतिशय शोभिवंत व मंगलकारक (भवति) होतो. (स्वाध्यः) उत्तम ध्यानाने युक्त असणाऱ्या (मनसा) विज्ञानाने (देवयन्तः) विद्यावृद्धीची अभिलाषा बाळगणारे (धीरासः) धैर्यवान (कवयः) विद्वान लोक (तम्) त्याच पुरुषाला (उन्नयन्ति) उन्नतिशील समजून प्रतिष्ठा देतात. याउलट जे पुरुष ब्रह्मचर्याचे पालन करीत नाहीत आणि उत्तम विद्या व सुशिक्षण प्राप्त केल्याशिवाय लहानपणीच लग्न करतात अशा स्त्रीपुरुष नष्ट भ्रष्ट होऊन विद्वानांमध्ये प्रतिष्ठेस प्राप्त होत नाहीत. ॥१॥

**आ धेनवो धुनयन्तामशिश्वीः सबर्दुघाः शशया अप्रदुग्धाः।**
**नव्यानव्या युवतयो भवन्तीर्महद्देवानामसुरत्वमेकम्॥२॥** ऋ. मं. ३। सू. ५५। मं. १६

(अप्रदुग्धाः) ज्यांची कुणीही धार काढलेली नाही अशा (धेनवः) गायींप्रमाणे ब्रह्मचारी असणाऱ्या, (अशिश्वीः) बालपण ओलांडून तारुण्यात पदार्पण केलेल्या, (सबर्दुघाः) सर्वप्रकारचे उत्तम व्यवहार पूर्ण करणाऱ्या, (शशयाः) कौमार्यावस्था ओलांडलेल्या (नव्यानव्याः) नवनवीन शिक्षण व अवस्था यांनी परिपूर्ण, (भवन्तीः) असलेल्या (युवतयः) पूर्ण यौवनात असणाऱ्या स्त्रिया (देवानाम्) ब्रह्मचर्य व चांगले नियमानी युक्त पूर्ण विद्वान बनलेल्या (एकम्) अद्वितीय (महत्) महान (असुरत्वम्) प्रज्ञाशास्त्रशिक्षण युक्त प्रज्ञेत रममाण

भावार्थासह तरुण पतींना प्राप्त करून (आधुनयन्ताम्) त्यांच्या पासून गर्भ धारण करतात. स्त्रियांनी कधी चुकूनसुद्धा बालपणी पुरुषाचा विचार मनात आणू नये. कारण तसे कर्मच इहलोकी व परलोकी सुखाचे साधन आहे. बालविवाहामुळे जितके नुकसान पुरुषाचे होते त्याहून अधिक स्त्रीचे नुकसान होते. ॥२॥

**पूर्वीरहं शरदः शश्रमाणा दोषावस्तोरूषसो जरयन्तीः ।**
**मिनाति श्रियं जरिमा तनूनामप्यू नु पत्नीर्वृषणो जगम्युः ॥३॥**

ऋ. मं. १। सू. १७९। मं. १

ज्याप्रमाणे (नु) शीघ्र (शश्रमाणाः) अत्यंत श्रम म्हणजे पुरुषार्थ करणारे (वृषणः) वीर्यसिंचन करण्यास समर्थ पूर्ण यौवनयुक्त पुरुष (पत्नीः) युवावस्थेतील हृदयांना प्रिय स्त्रियांना (जगम्युः) प्राप्त करून पूर्ण शंभर वर्षे किंवा त्याहूनही अधिक आयुष्य आनंदाने उपभोगून पुत्रपौत्रादिकांसह सुखाने एकत्र राहतात; त्याचप्रमाणे इतर स्त्रीपुरुषांनीही सदोदित राहावे. तसेच, (पूर्वीः) पूर्वी व हल्ली असणारे (शरदः) शरदऋतू व (उषसः) प्रभातकाळच्या वेळा (जरयन्तीः) ज्याप्रमाणे वृद्धावस्थेला प्राप्त करतात व नाहीसेही करतात किंवा (दोषाः) रात्री व (वस्तोः) दिवस हे ज्याप्रमाणे (तनूनाम्) शरीरांची (श्रियम्) शोभा (जरिमा) अतिशय वाढवितात किंवा ती (मिनाति) नाहीशी करतात त्याप्रमाणे (अहम्) मी स्त्री अथवा पुरुष (उ) चांगल्याप्रकारे निश्चयपूर्वक ब्रह्मचर्याचे पालन करून, उत्तम विद्या, सुशिक्षण प्राप्त करून, शरीर व आत्मा यांचे बळ आणि तारुण्य प्राप्त करून विवाह करीन. त्यानेच मला सुख मिळेल. त्याविरुद्ध वर्तन करणे हे वेदाच्या विरुद्ध असल्यामुळे असा विवाह कधीही सुखकारक होत नाही. ॥३॥

जोपर्यंत अशा प्रकारे सर्व ऋषीमुनी, राजेमहाराजे,.आर्य लोक ब्रह्मचर्य पालन करून, विद्याध्ययन पूर्ण केल्यावरच स्वयंवर पद्धतीने विवाह करीत असत तोपर्यंत या देशाची सतत उन्नती होत होती. परंतु जेव्हापासून ब्रह्मचर्याकडे दुर्लक्ष होऊ लागले. विद्याभ्यास थांबला आणि पराधीन अशा बाल्यावस्थेत आईबापांच्या इच्छेप्रमाणे विवाह होऊ लागले तेव्हापासून या आर्यावर्त देशाची अवनती उत्तरोत्तर होऊ लागली. म्हणून ही वाईट प्रथा बंद करून सज्जनांनी पूर्वीप्रमाणे स्वयंवर विवाह करावे ते विवाह वर्णानुसार झाले पाहिजेत आणि वर्णव्यवस्थाही गुण-कर्म-स्वभावानुसार असली पाहिजे.

## गुण कर्मानुसार वर्ण व्यवस्था

**(प्रश्न)** ज्याचे आईवडील ब्राह्मण असतात तोच ब्राह्मण होतो आणि ज्यांचे आईवडील इतर वर्णांचे असतील तर त्यांची मुले कधीतरी ब्राह्मण होऊ शकतात काय ?

**(उत्तर)** होय. पुष्कळ झाले, आज होत आहेत आणि पुढे होतीलही. जसे, छांदोग्य उपनिषदातील अज्ञातकुल जाबाल ऋषी, महाभारतातील क्षत्रिय वर्णाचे विश्वामित्र आणि चांडाळ कुळात जन्मलेले मातंग ऋषी हे ब्राह्मण झाले होते. आजही ज्याने उत्तम ज्ञान मिळविले आहे व जो सुस्वभावी आहे तो ब्राह्मणच आहे; आणि मूर्ख माणूस हा शूद्रच असतो. यापूढेही असेच होत राहणार आहे.

**(प्रश्न)** जे शरीर ज्या वर्णाच्या रजोवीर्यापासून उत्पन्न झाले आहे ते बदलून दुसऱ्या वर्णाचे कसे काय होऊ शकते ?

**(उत्तर)** ब्राह्मण शरीर रज व वीर्य यांच्या संयोगाने होत नसते ते खालील नियमांच्या पालनाने होते.

**स्वाध्यायेन जपैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः ।**

**महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥** मनु. अ. २। श्लो. २८

याचा अर्थ पूर्वी सांगितला आहे. तरीपण तो पुन: संक्षेपाने सांगतो. (स्वाध्यायेन) अध्ययन-अध्यापन, (जपैः) विचार करणे व करविणे, नानाविध होमांची अनुष्ठाने, संपूर्ण वेदांचे शब्द, अर्थ, संबंध, स्वरोच्चारण यांसह शिकणे-शिकविणे, (इज्यया) पौर्णमासी, इष्टि वगैरे करणे, पूर्वी सांगितल्याप्रमाणे विधिपूर्वक (सुतैः) धर्माने प्रजोत्पादन करणे, (महायज्ञैश्च) पूर्वोक्त ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, वैश्वदेवयज्ञ आणि अतिथियज्ञ, (यज्ञैश्च) अग्निष्टोमादी यज्ञ, विद्वानांचा सत्संग, सत्कार, सत्यभाषण, परोपकारादी सत्कर्मे करणे आणि संपूर्ण शिल्पविद्यादी शिकणे, दुराचार सोडून सदाचाराचे वर्तनाने (इयम्) हे (तनुः) शरीर (ब्राह्मी) ब्राह्मण वर्णाचे (क्रियते) केले जात असते. हा श्लोक तुम्ही मान्य करीत नाही काय ? अवश्य मान्य करता. मग रज व वीर्य यांच्या संयोगापासून वर्णव्यवस्था का समजता ? मी एकटाच तसे मानतो असे नसून परंपरेने पुष्कळ लोक असेच मानतात.

**(प्रश्न)** तुम्ही परंपरेचेही खंडन करणार काय ?

**(उत्तर)** नाही. पण तुमच्या चुकीच्या समजूतीला न मानून तिचे खंडनही करतो.

**(प्रश्न)** आमची समजूत चुकीची व तुमची बरोबर आहे, याला काय आधार ?

**(उत्तर)** याला आधार हाच की तुम्ही पाच-सात पिढ्यांमध्ये असणाऱ्यास सनातन व्यवहार असे समजता आणि आम्ही वेद व सृष्टीच्या आरंभापासून आजपर्यंतची परंपरा मानतो. असे बघा, ज्याचा पिता सज्जन असतो त्याचा पुत्र दुर्जन, आणि ज्याचा पुत्र सज्जन असतो त्याचा पिता दुर्जन अथवा कोठे-कोठे दोघेही सज्जन किंवा दुर्जन असल्याचे आढळून येते. तरीही तुम्ही भ्रमात पडला आहात. मनु महाराजांनी काय म्हटले आहे पाहा :-

**(प्रश्न) येनास्य पितरो याता येन याता पितामहाः ।**

**तेन यायात्सतां मार्गं तेन गच्छन्न रिष्यते ॥** मनु. अ. ४। श्लो. १७८

ज्या मार्गाने पिता, आजोबा गेले असतील त्या मार्गाने मुलाने जावे. परंतु (सताम्) जे वाडवडील सत्पुरुष, सज्जन असतील त्यांच्याच मार्गाने जावे आणि जे वाडवडील दुष्ट, दुर्जन असतील तर त्यांच्या मार्गाने कधीही जाऊ नये. कारण उत्तम धर्मात्मा पुरुषांच्या मार्गाने गेल्यास कधीही दुःख होत नाही. ही गोष्ट तुम्ही मान्य करता की नाही ?

**(उत्तर)** होय, मान्य करतो.

**(प्रश्न)** आणि असे पाहा की परमेश्वराने वेदात जे सांगितले आहे तेच सनातन आहे आणि त्याच्या विरुद्ध जे काही आहे ते कधीही सनातन होऊ शकत नाही. असेच सर्व लोकांनी मानले पाहिजे की नाही ?

**(उत्तर)** अवश्य मानले पाहिजे. जो कोणी असे मानीत नसेल त्याला असे सांगा की, एखाद्याचा बाप दरिद्री असेल आणि त्याचा मुलगा धनाढ्य असेल तर त्याने आपल्या पित्याच्या दारिद्र्याचा अभिमान बाळगण्यासाठी संपत्ती फेकून द्यावी काय ? ज्याचा बाप आंधळा आहे म्हणून त्याच्या मुलाने डोळे फोडून घ्यावेत काय ? ज्याचा बाप कुकर्मी असेल त्या पुत्रानेही कुकर्मच करावे काय ? मुळीच नाही. परंतु पूर्वजांची जी उत्तम कामे असतील त्यांचे अनुकरणे, आणि दुष्कर्माचा त्याग करणे हे सर्वांना अत्यावश्यक आहे.

जो कोणी रजोवीर्याच्या संयोगाने वर्णाश्रम व्यवस्था मानतो आणि ती गुणकर्मानुसार मानीत नसेल तर त्याला असे विचारले पाहिजे की जर कोणी आपला वर्ण सोडून नीच, अन्त्यज किंवा ख्रिश्चन, मुसलमान झाला असेल त्यालाही ब्राह्मण का मानीत नाही ? येथे तुम्ही असेच म्हणाल की त्याने ब्राह्मणाची कर्मे सोडून दिली, म्हणून तो ब्राह्मण नाही. यावरून असेही सिद्ध होते की जे ब्राह्मणादी लोक उत्तम कर्म करतात त्यांनाच ब्राह्मण समजावे तसेच पूर्वी नीच असलेली व्यक्ती उच्चवर्णाचे गुण-कर्म-स्वभाव बाळगणारी असेल तर तिलाही उच्च वर्णीय समजावे आणि उच्च वर्णाचे लोक वर्णानुसार कर्मे करीत नसतील तर त्यांची गणना योग्य त्या वर्णात अवश्य करावी.

**(प्रश्न) ब्राह्मणोऽस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः ।**
**ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्या ँ शूद्रो अजायत ॥** यजु. अ. ३१। मं. ११

हा यजुर्वेदातील ३१ व्या अध्यायातील ११ वा मंत्र आहे. याचा अर्थ आहे की ईश्वराच्या मुखातून ब्राह्मण, बाहूतून क्षत्रिय, उदरातून वैश्य व पायांपासून शूद्र उत्पन्न झाले. म्हणून ज्याप्रमाणे मुख हे बाहू आदी होऊ शकत नाहीत आणि बाहू आदि मुख होऊ शकत नाहीत त्याचप्रमाणे ब्राह्मण हे क्षत्रियादी किंवा क्षत्रियादी हे ब्राह्मण होऊ शकत नाहीत.

**(उत्तर)** या मंत्राचा जो अर्थ तुम्ही लावला आहे तो बरोबर नाही. कारण येथे पुरुष या शब्दाची अनुवृत्ती म्हणजे निराकार, सर्वव्यापक परमात्मा असा आहे. तो निराकार असल्यामुळे त्याला मुखादी अवयव असू शकत नाहीत. ज्याला मुखादी अवयव असतील तो पुरुष अर्थात व्यापक नाही आणि जो व्यापक नसेल तो सर्वशक्तिमान, जगाचा निर्माता, धारणकर्ता, प्रलयकर्ता, जीवांच्या पापपुण्याची व्यवस्था किंवा निर्णय करणारा, सर्वज्ञ, अजन्मा मरणरहीत इत्यादी विशेषणयुक्त होऊ शकत नाही. म्हणून या मंत्राचा अर्थ असा आहे की, जो (अस्य) पूर्ण व्यापक परमेश्वराच्या सृष्टीमध्ये मुखाप्रमाणे सर्व अवयवांमध्ये प्रमुख व उत्तम गुणांनी युक्त असेल तो (ब्राह्मणः) ब्राह्मण होय. (बाहू) **'बाहुर्वै बलं बाहूर्वै वीर्यम्'** – शतपथब्राह्मण. बळ व वीर्य म्हणजे बाहू. ते ज्यामध्ये अधिक असते तो (राजन्यः) क्षत्रिय होय. (ऊरू) कमरेच्या खालचा व गुडघ्याच्या वरचा जो भाग त्याला ऊरू म्हणतात. जो सर्व पदार्थांच्या प्राप्तीसाठी व सर्व देशांत ऊरूच्या बळावर प्रवेश करतो, जातो व येतो तो (वैश्यः) वैश्य होय आणि जो (पद्भ्याम्) पायाप्रमाणे नीच अंग सदृश मूर्खत्वादि गुणवाला असेल तो शूद्र होय. अन्यत्र शतपथादी ब्राह्मण ग्रंथामध्येही या मंत्राचा असाच अर्थ केला आहे.

**यस्मादेते मुख्यास्तस्मान्मुखतो ह्यसृज्यन्त ।** इत्यादि.

ज्यामुळे हे मुख्य आहे ते मुखापासून उत्पन्न झाले असे म्हणणे सुसंगत ठरते. म्हणजे असे की ज्याप्रमाणे मुख हे सर्व अंगामध्ये श्रेष्ठ आहे त्याप्रमाणे पूर्ण विद्या आणि उत्तम गुण-कर्म-स्वभाव यांनी युक्त असल्यामुळे मनुष्यजातीमध्ये उत्तम ब्राह्मण म्हटला जातो. परमेश्वर निराकार असल्यामुळे त्याला मुख वगैरे अवयव असू शकत नाहीत. तेव्हा त्याच्या मुखापासून ब्राह्मण उत्पन्न होणे असंभव आहे. वंध्या स्त्रीच्या मुलाचे लग्न झाले असे म्हणण्यासारखेच हे आहे. मुखादी अवयवांपासून ब्राह्मण उत्पन्न झाले असते तर उपादान कारणाप्रमाणे ब्राह्मणादिची आकृति अवश्य असती. उदाहरणार्थ, मुखाचा आकार गोल असतो. म्हणून मुखापासून उत्पन्न होणाऱ्या ब्राह्मणाचे शरीर तोंडासारखे वाटोळे असावयास हवे होते. क्षत्रियांचे शरीर बाहूंसारखे, वैश्यांचे मांडीसारखे आणि शूद्रांचे शरीर पायांसारखे आकाराचे असावयास हवे हाते. परंतु तसे असत नाही. म्हणून जे

कोणी प्रश्न करील की मुखापासून उत्पन्न झाले त्यांना ब्राह्मण ही संज्ञा प्राप्त झाली परंतु तशी तुमची नाही कारण जसे इतर लोक गर्भाशयातून जन्माला येतात तसेच तुम्हीही जन्मला आहात. तुम्ही कांही मुखातून उत्पन्न झाला नाहीत. म्हणून तुम्ही ब्राह्मण या संज्ञेचा अभिमान करता आहात म्हणून तुम्ही केलेला अर्थ चुकीचा असून आम्ही लावलेला जो अर्थ आहे तो बरोबर आहे. असेच इतर ग्रंथामध्येही सांगितलेले आहे. उदाहरणार्थ,

**शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम्।**
**क्षत्रियाज्जातमेवन्तु विद्याद्वैश्यात्तथैव च॥** मनु. अ. १०। श्लो. ६५

जो शूद्र कुळात उत्पन्न होऊनही ज्याच्या अंगी ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्यासारखे गुण, कर्म व स्वभाव असतील तर तो शूद्र, ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य होईल. याचप्रमाणे जो ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य कुळात उत्पन्न झाला असेल आणि त्याचे गुण, कर्म, स्वभाव हे शूद्रासारखे असतील तर तो शूद्र होतो. अर्थात चार वर्णांपैकी ज्या-ज्या वर्णाचे गुण, कर्म व स्वभाव स्त्रीपुरुषांमध्ये असतील त्या-त्या वर्णाची ती स्त्री किंवा तो पुरुष गणला जाईल.

**धर्मचर्य्यया जघन्यो वर्णः पूर्वं पूर्वं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ॥१॥**
**अधर्मचर्य्यया पूर्वो वर्णो जघन्यं जघन्यं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ॥२॥**

ही सूत्रे आपस्तंबातील आहेत.

धर्माप्रमाणे आचरण करून खालच्या वर्णातील माणूस आपल्याहून उत्तम वर्णात जाऊ शकतो आणि त्याच वर्णात त्याची गणना केली जावी. ज्या वर्णाची योग्यता त्यास असेल. ॥१॥

याचप्रमाणे अधर्माचरण करणारा उत्तम वर्णातील मनुष्य आपल्यापेक्षा खालच्या वर्णास प्राप्त होतो आणि त्याची गणना त्याच वर्णात केली जावी. ॥२॥

ज्याप्रमाणे पुरुष ज्या वर्णाच्या योग्यतेचा असतो त्या वर्णाचा तो आहे. त्याचप्रमाणे स्त्रियांच्या बाबतीतही समजावे. यावरून असे सिद्ध होते की असे झाल्याने सर्व वर्ण आपापल्या गुण-कर्म-स्वभावानुसार पवित्रतेने राहतात. अर्थात ब्राह्मणकुळात कुणीही क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्याप्रमाणे राहू नये आणि क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्णही शुद्ध राहतात. त्यायोगे वर्णसंकर होणार नाही; आणि मग कोणत्याही वर्णाची निंदा अथवा तो अयोग्य आहे असे देखील होणार नाही.

**(प्रश्न)** एखाद्याला एकच मुलगा किंवा मुलगी असेल आणि तो किंवा ती दुसऱ्या वर्णात प्रविष्ट झाली तर त्यांच्या आईबापांची सेवा कोण करणार ? शिवाय त्याने वंशही खुंटणार याची काय व्यवस्था असली पाहिजे?

**(उत्तर)** कुणाचाही सेवाभंग अथवा वंशच्छेद होणार नाही. कारण त्यांना स्वतःच्या मुलगा अथवा मुलगी यांच्या बदली त्यांच्या स्वतःच्या वर्णास योग्य असा मुलगा किंवा मुलगी विद्यासभा व राजसभा यांच्या व्यवस्थेप्रमाणे मिळेल. त्यामुळे काहीही अव्यवस्था होणार नाही.

ही गुणकर्मानुसार वर्णांची व्यवस्था. मुलींच्या सोळाव्या वर्षी आणि मुलांच्या पंचविसाव्या वर्षी परीक्षा करून निश्चित केली पाहिजे आणि त्याप्रमाणे ब्राह्मण वर्णाचा ब्राह्मणी स्त्रीशी, क्षत्रिय पुरुषाचा क्षत्रिय स्त्रीशी, वैश्य पुरुषाचा वैश्य स्त्रीशी व शूद्र पुरुषाचा शूद्र स्त्रीशी विवाह करावा. तेव्हाच आपापल्या वर्णाचे कर्म आणि परस्पर प्रेम सुद्धा यथायोग्य राहिल.

या चारही वर्णांची कर्तव्यकर्मे व गुण पुढीलप्रमाणे आहेत :-

## ब्राह्मणाची गुणकर्मे

**अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा।**
**दानं प्रतिग्रहंश्चैव ब्राह्मणानामकल्पयत् ॥१॥** मनु. अ. १। श्लो. ८८
**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्मस्वभावजम् ॥२॥** भ. गी. अ. १८। श्लो. ४२

शिकणे, शिकविणे, यज्ञ करणे व करविणे, दान देणे व घेणे ही ब्राह्मणाची सहा कर्मे आहेत. परंतु **'प्रतिग्रहः प्रत्यवरः'** ॥ मनु.॥ म्हणजे प्रतिग्रह दान घेणे हे नीच कार्य आहे. ॥१॥ (शमः) मनामध्ये वाईट काम करण्याची इच्छा देखील न आणणे आणि त्याला अधर्म करण्यास कधीही प्रवृत्त होऊ न देणे, (दमः) कान, डोळे आणि इंद्रियांना अन्यायाचरणापासून परावृत्त करून धर्ममार्गावरून चालविणे, (तपः) सदैव ब्रह्मचारी जितेंद्रिय राहून धर्मानुष्ठान करणे, (शौच)

**अद्भिर्गात्राणि शुध्यन्ति मनः सत्येन शुध्यति।**
**विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति ॥** मनु. अ. ५। श्लो. १०९

पाण्याने बाह्य अंग, सत्याचरणाने मन, विद्या व धर्मानुष्ठान यांनी जीवात्मा आणि ज्ञानाने बुद्धि पवित्र होते. आतील रागद्वेषादी दोष आणि बाहेरील मळ काढून शुद्ध राहणे म्हणजे सत्य व असत्याचे विवेकपूर्वक सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करणे या मार्गाने मन पवित्र होते. (क्षान्तिः) म्हणजे निंदा, स्तुती, सुख, दुःख, शीतोष्ण, क्षुधा, तृष्णा, हानी, लाभ, मानापमान, हर्ष, शोकचा त्याग करून धर्मावर दृढ राहणे, (आर्वजम्) कोमलता, निरभिमान, सरलता, सरळ स्वभाव बाळगणे व कुटिलपणा वगैरे दोषांचा त्याग करणे. (ज्ञानम्) सर्व वेदादि शास्त्रे सांगोपांग शिकून व शिकविण्याची क्षमता, विवेक, सत्याचा निर्णय. जी वस्तू जशी असेल तशीच समजून घेणे म्हणजे जडाला जड (निर्जीवाला निर्जीव) व चेतनाला चेतन मानणे व जाणणे. (विज्ञानम्) पृथ्वीपासून परमेश्वरापर्यंत सर्व पदार्थांचे विशेष ज्ञान मिळवून त्यांचा यथायोग्य उपयोग करून घेणे (आस्तिक्यम्) वेद, ईश्वर, मुक्ती, पूर्वजन्म, धर्म, विद्या, सत्संग, माता, पिता, आचार्य व अतिथि यांची सेवा कधीही न सोडणे आणि कधीही निंदा न करणे. ही पंधरा कर्मे व गुण ब्राह्मण वर्णाच्या मनुष्यांमध्ये अवश्य असले पाहिजेत. ॥२॥

## क्षत्रियांचे गुण, कर्मे व स्वभाव

**प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च।**
**विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ॥१॥** मनु. अ. १। श्लो. ८९

न्यायाने प्रजेचे रक्षण, म्हणजे पक्षपात न करता सज्जनांचा सत्कार व दुर्जनांचा तिरस्कार करणे, सर्व प्रकारे सर्वांचे पालन,(दानम्) विद्या, धर्मप्रवृत्ती व सत्पात्रांची सेवा यांमध्ये धनादी पदार्थांचा व्यय, (इज्या) अग्निहोत्रादी यज्ञ करणे अथवा करविणे, (अध्ययनम्) वेदादी शास्त्रांचे अध्ययन-अध्यापन करणे, (विषयेषु अप्रसक्तिः) विषयवासनांमध्ये न गुंतता जितेंद्रिय राहून सदा शरीर व आत्माद्वारा बलवान राहावे. ॥१॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥२॥** भ. गी. अ. १८। श्लो. ४३

(शौर्यम्) शेकडो, हजारो लोकांशी एकट्याने युद्ध करताना भय न वाटणे, (तेज:) सदैव तेजस्वी म्हणजे दीनता रहित प्रगल्भतायुक्त दृढ राहणे, (धृति:) धैर्यवान् बनणे, (दाक्ष्यम्) राजा व प्रजा संबंधीत व्यवहार व सर्व शास्त्रे यांमध्ये अत्यंत चतुर असणे, (युद्धे अपलायनम्) युद्धामध्ये दृढपणे व नि:शंक राहून, युद्धापासून दूर पळून न जाणे अर्थात याप्रमाणे लढावे की निश्चित विजय होईल. पळून जाऊन अथवा शत्रूला चुकवून विजय होत असेल तर तसे करणे, (दानम्) दानशील असणे, (ईश्वरभाव:) पक्षपातरहित सर्वांशी यथायोग्य वर्तन करणे, विचार करून देणे, प्रतिज्ञा पूर्ण करणे, कधीही वचनभंग होऊ न देणे ही अकरा कर्म व गुण क्षत्रिय वर्णाचे आहेत. ।।२।।

## वैश्याचे गुण व कामे

**पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च।**
**वणिक्पथं कुसीदं च वैश्यस्य कृषिमेव च।।** मनु. अ. १। श्लो. ९०

(पशुरक्षणम्) गायी, बैल वगैरे पशूंचे पालनपोषण, वर्धन करणे, (दानम्) विद्या धर्म यांची वृद्धी करण्यासाठी व करविण्यासाठी धनादी खर्च करणे, (इज्या) अग्निहोत्रादी यज्ञ करणे, (अध्ययनम्) वेदादी शास्त्रांचे अध्ययन करणे, (वणिक्पथम्) सर्व प्रकारचा व्यापार करणे, (कुसीदम्) दरसाल दर शेकडा चार, सहा, आठ, बारा, सोळा, किंवा वीस आणे त्यापेक्षा अधिक व्याज न घेणे आणि मूळ मुद्दलाच्या दुपटीपेक्षा जास्त रक्कम न घेणे, म्हणजे एक रुपया दिला असल्यास शंभर वर्षानंतरही दोन रुपयाहून जास्त रक्कम न घेणे व न देणे आणि (कृषिम्) शेती करणे हे वैश्याचे गुण व कर्मे आहेत.

## शूद्राचे गुण व कामे

**एकमेव हि शूद्रस्य प्रभु: कर्म समादिशत्।**
**एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया।।** मनु. अ. १। श्लो. ९१

शूद्रास उचित आहे की निंदा, ईर्ष्या, अभिमान आदी दोष सोडून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांची योग्य प्रकारे सेवा करणे आणि त्यावरच आपला उदरनिर्वाह चालविणे. शूद्राचे हेच एकमेव कर्म व गुण होय.

असे थोडक्यात वर्णांचे गुण व कर्मे लिहिली आहेत. ज्या पुरुषामध्ये ज्या वर्णाचे गुण व कर्मे असतील त्याला त्या वर्णाचा अधिकार द्यावा. अशी व्यवस्था ठेवल्यास सर्व माणसाची उन्नती होते. कारण उच्चवर्णीयांना सदैव अशी भीती वाटत राहील की आपली मुले मुर्खत्वादि दोषयुक्त राहिली तर ती शूद्र समजली जातील. तसेच मुलांनाही भिती राहील की आपण सदाचारी राहिलो नाही व विद्यार्जन केले नाहीतर आपल्याला शूद्र बनावे लागेल. याउलट खालच्या वर्णातील लोकांना वरच्या वर्णात जाण्यास या व्यवस्थेमुळे प्रोत्साहन मिळेल.

विद्या व धर्म यांच्या प्रसाराचा अधिकार ब्राह्मणांना द्यावा. कारण ते पूर्ण विद्यावान व धार्मिक असल्याने हे काम उत्तम प्रकारे करू शकतात. क्षत्रियांना राज्य करण्याचा अधिकार दिल्यास कधी राज्याची हानी अथवा देशावर संकट येत नाही. पशुपालनादिकाचा अधिकार वैश्यांनाच असणे योग्य होय. कारण ते काम ते उत्तम प्रकारे करू शकतात. शूद्रांना सेवेचा अधिकार यासाठी आहे की तो विद्याशून्य मुर्ख असल्याने ज्ञान विज्ञानासंबंधी काहीही काम करू शकत नाही. परंतु ते शारीरिक सर्व कामे करू शकतात. अशा प्रकारे चारही वर्णांना त्यांच्या त्यांच्या अधिकारानुसार कार्य करण्यास प्रवृत्त करणे राजाचे व सभ्य सज्जनांचे काम आहे.

# विवाहाची लक्षणे (व प्रकार)

**ब्राह्मो दैवस्तथैवार्षः प्राजापत्यस्तथाऽसुरः ।**

**गान्धर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोऽधमः ॥** मनु. अ. ३। श्लो. २१

विवाह आठ प्रकारचे होतात :-

ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस व पैशाच या विवाहांची ही व्यवस्था आहे की (१) वधू व वर दोघेही यथावत ब्रह्मचर्य पूर्ण विद्वान, धार्मिक व सुशील असावे त्यांचा एकमेकांच्या प्रसन्नतापूर्वक विवाह होणे त्याला **ब्राह्म विवाह** असे म्हणतात. (२) विस्तृत यज्ञ करीत असता ऋत्विजाचे काम करणाऱ्या जावयास अलंकारयुक्त कन्या देणे याला **'दैव'**, (३) वराकडून काही घेऊन विवाह होणे, हा **'आर्ष'**, (४) **'प्राजापत्य'** विवाहात केवळ धर्माच्या वृद्धीसाठी वधुवरांचे लग्न लावले जाते. (५) वधू व वर या दोघांनाही काही देऊन केला जाणार विवाह **'आसुर'** होय. (६) नियम व काळ-वेळ यांना सोडून काही कारणाने वधू व वर यांचा स्वेच्छेने परस्पर संयोग होणे याला **'गांधर्व'**, (७) लढाई करून, बलात्कार म्हणजे हिसकाहिसकी करून किंवा कपटाने मुलीचे ग्रहण किंवा हरण करून केला जाणारा विवाह हा **'राक्षस'** विवाह होय. (८) झोपलेल्या अथवा मद्य वगैरे पिऊन वेड्या मुलीशी बलात्काराने संयोग करणे हा **'पैशाच'** विवाह होय.

या सर्व विवाहांमध्ये ब्राह्मविवाह हा सर्वोत्कृष्ट होय. दैव व प्राजापत्य हे विवाह मध्यम-प्रतीचे आणि आर्ष, असुर गंधर्व हे निकृष्ट प्रतीचे, राक्षस हा अधम प्रकारचाआणि पैशाच हा महाभ्रष्ट विवाह होय. म्हणून हा निश्चय ठेवला पाहिजे की लग्न होण्यापूर्वी मुलगा व मुलगी यांची एकांतात गाठ पडावयास नको कारण यौवनावस्थेत स्त्रीपुरुषांचा एकान्तवास हा दोषास्पद असतो. परंतु जेव्हा वर व वधू यांच्या विवाहाची वेळ येईल म्हणजे त्यांचा ब्रह्मचर्याश्रम व विद्याभ्यास पूर्ण होण्यास एक वर्ष अथवा सहा महिने अवकाश असेल, तेव्हा त्यांना एकमेकांची चित्रे, फोटो दाखवावे अथवा प्रतिकृती तयार करून मुलींच्या अध्यापिकांकडे मुलांची व मुलांच्या अध्यापकांकडे मुलींची छायाचित्रे पाठवून द्यावीत. ज्यांचे रंगरूप जुळत असेल त्यांचा इतिहास अर्थात जन्मापासूनची माहिती अद्यावत मिळवून अध्यापकांनी जन्मपत्रिका पुस्तिका असल्यास मागवून ती तपासावी. ज्यांचे गुणकर्म व स्वभाव सारखे असतील तेव्हा ज्याचे ज्याचे बरोबर जिचा जिचा विवाह होणे योग्य वाटले त्यांना परस्परांची छायाचित्रे व जीवनवृत्तांत पाहण्यास द्यावेत व त्यांचे त्याबाबतीतील अभिप्राय निवेदन करावा तो जाणावा तेव्हा दोघांनी एकमेकांशी विवाह करण्याचे ठरविले तर त्या दोघांचा समावर्तन संस्कार एकाच वेळी करावा.

वधू व वर या दोघांची इच्छा अध्यापकांसमोर विवाह करण्याची असल्यास तसे करावे; नाहीतर मुलीच्या आईवडिलांच्या घरी विवाह होणे योग्य होय. अध्यापक, मुलीचे आईवडील आणि इतर सभ्य लोक यांच्यासमोर वधुवरांनी एकमेकांशी जे काही बोलावयाचे असेल ते बोलावे, शास्त्रार्थ करावा आणि काही गुप्त गोष्ट विचारावयाची असेल तर ती सर्वांच्या देखत कागदांवर लिहून ते कागद एकमेकांच्या हातात द्यावेत; व अशा प्रकारे प्रश्नोत्तरे करावीत.

जेव्हा दोघांमध्ये दृढ प्रेम विवाह करण्याचे निर्माण होऊन तेव्हा त्यांच्या खाण्यापिण्याची उत्तम व्यवस्था करावी. त्यायोगे आतापर्यंत ब्रह्मचर्यपालन व विद्याध्ययनरूपी तपश्चर्या व कष्ट केल्याने शिणलेले त्यांची शरीरे दुर्बल झाली होती ती चंद्राच्या कलेप्रमाणे विकसित होऊन थोड्याच दिवसात परिपुष्ट होतील.

त्यानंतर वधू रजस्वला होऊन ज्या दिवशी शुद्ध होईल त्या दिवशी वेदी व मंडप रचून अनेक सुगंधी द्रव्ये व तूप वगैरेंनी होम करावा आणि अनेक विद्वान स्त्रीपुरुषांचा यथायोग्य सत्कार करावा. नंतर जो दिवस ऋतुदानास योग्य असेल त्या दिवशी 'संस्कारविधी' या पुस्तकात सांगितल्याप्रमाणे सर्व विधी करून रात्री दहा वाजता किंवा मध्यरात्री अत्यंत प्रसन्न चित्ताने सर्वांसमोर पाणि ग्रहण करून विवाहाचा विधी पूर्ण करावा आणि मग एकान्तसेवन करावे. वीर्यस्थापनेच्या विधीप्रमाणे पुरुषाने वीर्यस्थापन करावे आणि वीर्याकर्षणाच्या विधीप्रमाणे स्त्रीने वीर्याकर्षण करावे. ब्रह्मचर्याने प्राप्त झालेल्या वीर्याचा शक्यतोवर अपव्यय होऊ देऊ नये. कारण वीर्यापासून अथवा रजापासून जे शरीर निर्माण होते ते अपूर्व व उत्तम संतानाचे असते. जेव्हा वीर्याचे गर्भाशयात पतन होण्याची वेळ येताच स्त्री व पुरुष या दोघांनीही स्थिर राहावे आणि नाकासमोर नाक व डोळ्यांसमोर डोळे येतील अशाप्रकारे शरीर सरळ ठेवावे आणि अत्यंत प्रसन्नचित्त ठेवावे. इकडे-तिकडे हलू नये. पुरुषाने आपले शरीर ढीले सोडावे आणि स्त्रीने वीर्याचा स्वीकार करताना अपान वायू वर ओढून घ्यावा, योनीचा संकोच करून आणि वीर्य वर आकर्षण करून ते गर्भाशयात स्थिर करावे. त्यानंतर दोघांनीही शुद्ध पाण्याने स्नान करावे.

गर्भधारणा झाली आहे की नाही याचे पूर्ण ज्ञान विदुषी स्त्रीला त्याचवेळी होऊन जाते. परंतु एक महिन्यानंतर येणारी पाळी चुकली की गर्भ राहिला असल्याविषयी सर्वांची खात्री होते. गरम दुधात सुंठ, केशर, अश्वगंधा, वेलदोडा व सालममिश्री घालून आधीच तयार व थंड केलेले दूध प्यावे व मग पतिपत्नींनी आपापल्या वेगवेगळ्या शय्येवर झोपावे. जेव्हा जेव्हा गर्भाधान करण्यात येईल तेव्हा तेव्हा हा विधी करणे उचित होय.

त्यानंतर एक वर्षभर पतीपत्नींनी कधीही समागम करू नये. अशाप्रकारे ब्रह्मचर्याचे पालन केल्यास मूल चांगले निपजते आणि दुसरे मूलही उत्तम होते. असे केले नाही तर वीर्य व्यर्थ जाते. दोघांचे आयुष्य कमी होते व अनेक प्रकारचे रोग होतात. मात्र दोघांतील संभाषणादी बाह्य व्यवहार प्रेमपूर्ण अवश्य ठेवावा. पुरुषाने वीर्याचे व स्त्रीने गर्भाचे रक्षण करावे. भोजन व आच्छादन यांची व्यवस्था अशा प्रकारे करावी की पुरुषाचे वीर्य स्वप्नातही नष्ट होऊ नये आणि गर्भातील बालकाचे शरीर अत्यंत देखणे, धष्टपुष्ट, पराक्रमयुक्त बनून दहाव्या महिन्यात त्याचा जन्म व्हावा. चौथ्या महिन्यापासून व विशेषत: आठव्या महिन्यापासून गर्भाला फार जपले पाहिजे. गर्भवती स्त्रीने कधीही रेचक, रूक्ष, मादक आणि बुद्धी व बळ यांचा नाश करणारे पदार्थ खाऊ नयेत. त्या ऐवजी दूध, तूप, उत्तम, तांदूळ, गहू, मूग, उडीद इत्यादी पदार्थांचे देशकालाचा विचार करून युक्तिपूर्वक सेवन करावे.

गर्भावर चौथ्या महिन्यात पुंसवन आणि आठव्या महिन्यात सीमंतोन्नयन असे दोन संस्कार विधिपूर्वक करावेत. मूल जन्मल्यानंतर बाळ व बाळंतीण यांच्या शरीराचे रक्षण खूप काळजी घेऊन करावे. स्त्री प्रसूत होण्याच्या आधीच सुंठपाक किंवा सौभाग्यसुंठी पाक तयार करून ठेवावा. बाळंतिणीला किंचित उष्ण अशा सुगंधी पाण्याने स्नान घालावे; व मुलालाही न्हाऊ घालावे. नाळ कापतांना मुलाच्या बेंबीजवळ मऊ सुताने नाळ बांधावी आणि त्यामध्ये चार अंगुळे अंतर सोडून नाळेचा पुढील भाग कापून टाकावा. नाळ अशा पद्धतीने बांधावी की शरीरातील रक्ताचा एकही थेंब बाहेर जाणार नाही. त्यानंतर प्रसूतीची ती जागा शुद्ध करून त्या ठिकाणी दाराच्या आतील बाजूस तूप व सुगंधी द्रव्ये यांचा होम करावा. त्यानंतर मुलाच्या बापाने त्याच्या

कानात 'वेदोऽसीति' म्हणजे 'तुझे नाव वेद आहे' असे म्हणून तूप व मध यांनी सोन्याच्या सळईने मुलाच्या जिभेवर 'ओ३म्' हे अक्षर लिहावे; आणि त्याच सळईने त्याला तूप व मध चाटवावा. मुलाला हवे असल्यास त्याच्या आईने दूध पाजावे. आईला दूध नसल्यास एखाद्या स्त्रीची तपासणी करून तिचे दूध पाजावे.

त्यानंतर दुसऱ्या एका शुद्ध हवा असलेल्या खोलीमध्ये बाळ व बाळंतीण यांना ठेवून तेथे सकाळी व संध्याकाळी सुगंधित तुपाचा होम करावा. सहा दिवसापर्यंत आईने मुलाला अंगावर पाजावे. तिने शरीर पुष्ट होण्यासाठी उत्तम व पौष्टिक आहार घ्यावा आणि योनिसंकोच आदी करावे. सहाव्या दिवशी स्त्रीने बाहेर पडावे व मुलाला दूध पाजण्यासाठी एखादी दाई ठेवावी. त्या दाईला उत्तम खाऊपिऊ घालावे. तिने मुलाला अंगावर पाजावे व त्याचे पालनपोषण करावे. मात्र मुलाच्या आईनेही मुलावर पूर्ण लक्ष ठेवावे आणि त्याच्या पालनपोषणात मुळीच हेळसांड होऊ नये. स्तनांतील दूध स्रवण होऊ नये म्हणून स्तनांच्या अग्रभागांवर विशिष्ट लेप लावावा. तसेच आपले खाणेपिणे हा व्यवहार यथायोग्य ठेवावा.

'संस्कारविधि' या पुस्तकात सांगितल्याप्रमाणे नामकरणादी संस्कार योग्यवेळी केला जावा. स्त्री पुन: रजस्वला होईल तेव्हा ती शुद्ध झाल्यावर पूर्वीप्रमाणेच ऋतुदान करावे.

**ऋतुकालाभिगामी स्यात्स्वदारनिरतः सदा।**
**ब्रह्मचार्य्येव भवति यत्र तत्राश्रमे वसन्॥** मनु. अ. ३। श्लो. ४।५०

जो आपल्याच पत्नीशी प्रसन्न असतो व ऋतुकाली रममाण होतो तो गृहस्थ असूनही ब्रह्मचारी असल्यासारखा आहे.

**सन्तुष्टो भार्यया भर्त्ता भर्त्रा भार्या तथैव च।**
**यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम्॥१॥** मनु. अ. ३। श्लो. ६०

ज्या कुळात पत्नीवर पती व पतीवर पत्नी हे पूर्णपणे संतुष्ट असतात त्याच कुळात सर्व प्रकारचे सौभाग्य व ऐश्वर्य निवास करते. जेथे पतिपत्नींमध्ये कलह असतो तेथे दुर्भाग्य व दारिद्र्य स्थिरावते. ॥१॥

**यदि हि स्त्री न रोचेत पुमांसन्न प्रमोदयेत्।**
**अप्रमोदात्पुनः पुंसः प्रजनं न प्रवर्त्तते॥२॥** मनु. अ. ३। श्लो. ६१

जी स्त्री आपल्या पतीवर प्रेम करीत नाही व पतीला संतुष्ट ठेवीत नाही तर पतीच्या अप्रसन्नतेने कामभावना उत्पन्न होत नाही. ॥२॥

**स्त्रीयां तु रोचमानायां सर्वं तद्रोचते कुलम्।**
**तस्यां त्वरोचमानायां सर्वमेव न रोचते॥३॥** मनु. अ. ३। श्लो. ६२

स्त्री प्रसन्न असली की सारे कुळ प्रसन्न राहते व तिच्या अप्रसन्नतेत सर्व कुटुंब अप्रसन्न म्हणजे दुःखदायक होत जाते.

**पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा।**
**पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः॥१॥** मनु. अ. ३। श्लो. ५५

ज्यांना आपले खूप कल्याण व्हावे असे वाटत असेल अशा पिता, भ्राता, पती व दीर यांनी स्त्रियांना भूषणादिकांनी प्रसन्न ठेवावे. ॥१॥

**यत्र नार्य्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।**
**यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राऽफलाः क्रियाः ॥२॥** मनु. अ. ३। श्लो. ५६

ज्या घरात स्त्रियांचा सत्कार होतो तेथे विद्यासंपन्न पुरुष, देव या संज्ञेला पात्र होऊन ते आनंदाने क्रीडा करतात आणि ज्या घरात स्त्रियांना सन्मानाने वागविले जात नाही तेथे केलेल्या सर्व क्रिया निष्फळ होतात.॥२॥

**शोचन्ति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ।**
**न शोचन्ति तु यत्रैता वर्द्धते तद्धि सर्वदा ॥३॥** मनु. अ. ३। श्लो. ५७

ज्या घरातील अथवा कुळातील स्त्रिया शोकग्रस्त होऊन दु:खी असतात ते कुळ लवकरच नष्ट भ्रष्ट होते. परंतु ज्या घरातील अथवा कुळातील स्त्री वर्ग आनंदी उत्साही व प्रसन्नतेने परिपूर्ण असतो त्या कुळाची सदैव अभिवृद्धी होते. ॥३॥

**तस्मादेताः सदा पूज्या भूषणाच्छादनाशनैः ।**
**भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषु च ॥४॥** मनु. अ. ३। श्लो. ५९

म्हणून ऐश्वर्याची इच्छा बाळगणाऱ्यांनी नेहमी व उत्सवप्रसंगी स्त्रियांना भूषणे, वस्त्रे, भोजन इत्यादी देऊन त्यांचा वारंवार सत्कार करावा. ॥४॥

येथे ही गोष्ट सदैव लक्षात ठेवावी की 'पूजा' या शब्दाचा अर्थ 'सत्कार' असा आहे. जेव्हा जेव्हा दिवसा अथवा रात्री प्रथमत: गाठ पडेल तेव्हा किंवा निरोप घेताना परस्परांनी प्रेमाने 'नमस्ते' करावे.

**सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ।**
**सुसंस्कृतोपस्करया व्यये चामुक्तहस्तया ॥** मनु. अ. ५। श्लो. १५०

स्त्रीस उचित आहे की अति प्रसन्नतेने गृहकृत्यांमध्ये चातुर्याने सर्व पदार्थ उत्तम प्रकारे बनवावेत. घराची स्वच्छता ठेवावी आणि खर्च करताना फार उदार होऊ नये. जो जो खर्च होईल त्याचा हिशेब यथावत ठेवावा व तो पतीला सांगावा. सर्व खाद्य पदार्थ अशा प्रकारे पवित्र व शुद्ध बनवावेत की ज्यायोगे ते औषधरूप बनून शरीर व आत्मा यात रोगांना येऊ देणार नाही. घरातील नोकराचाकरांकडून यथायोग्य काम करून घ्यावे. घरातील कोणतेही काम बिघडू देऊ नये.

**स्त्रियो रत्नान्यथो विद्या सत्यं शौचं सुभाषितम् ।**
**विविधानि च शिल्पानि समादेयानि सर्वतः ॥** मनु. अ. २। श्लो. २४०

उत्तम स्त्री, नाना प्रकारची रत्ने, विद्या, सत्य, पावित्र्य, सुभाषित, विविध प्रकारची शिल्पविद्या या गोष्टी सर्व देशांकडून व सर्व लोकांकडून घ्याव्यात.

**सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम् ।**
**प्रियं च नानृतं ब्रूयादेष धर्मः सनातनः ॥१॥** मनु. अ. ४। श्लो. १३८

नेहमी प्रिय, सत्य, इतरांना हितकारक असेल असेच बोलावे. जे अप्रिय सत्य असेल ते बोलू नये. म्हणजे जो तिरळा असेल त्याला तिरळा म्हणू नये. मात्र इतरांना खुष करण्यासाठी खोटे बोलू नये. ॥१॥

**भद्रं भद्रमिति ब्रूयाद्भद्रमित्येव वा वदेत् ।**
**शुष्कवैरं विवादं च न कुर्यात्केनचित्सह ॥२॥** मनु. अ. ४। श्लो. १३९

सदैव भद्र म्हणजे सर्वांना कल्याणकारक वचन बोलावे. कोणाशीही विना अपराध निष्कारण शत्रुत्व आणि निरर्थक वादविवाद करू नये. ॥२॥ जे दुसऱ्याच्या हिताचे असेल ते त्याला त्याचे वाईट वाटत नसले तरी सांगितल्याशिवाय राहू नये.

**पुरुषा बहवो राजन् सततं प्रियवादिनः ।**
**अप्रियस्य तु पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ॥** (महा.) उद्योगपर्व; ३७।१५, विदुरनीति

हे धृतराष्ट्रा ! या जगात इतरांना सदैव खुष करण्यासाठी गोड बोलणारे तोंडपुजे पुष्कळ लोक आहेत; परंतु ऐकण्यास अप्रिय वाटणारे मात्र अंती कल्याण करणारे वचन बोलणारा व ते ऐकणारा माणूस विरळा. जे सत्पुरुष असतात ते इतरांचे दोष त्यांच्या तोंडावर सांगतात व आपले दोष ऐकतात. परोक्ष त्यांच्या गुणांची वाखाणणी करतात. याउलट दुष्ट लोकांची हीच रीत असते की ते तोंडावर गोड बोलतात आणि पाठीमागे निंदा करतात. जोपर्यंत मनुष्य इतरांच्या तोंडून आपले दोष ऐकून घेत नाही अथवा सांगणारा सांगत नाही तोपर्यंत मनुष्य दोषांपासून मुक्त होऊन सद्‌गुणी होऊ शकत नाही.

कधी कोणाची निंदा करू नये. उदाहरणार्थ, 'गुणेषु दोषारोपणमसूया' अर्थात् 'दोषेषु गुणारोपणमप्यसूया', 'गुणेषु गुणारोपणं दोषेषु दोषारोपणं च स्तुतिः' गुणांच्या ठिकाणी दोषांचा व दोषांच्या ठिकाणी गुणांचा आरोप करणे ही निंदा होय आणि गुणांना गुण व दोषांना दोष म्हणणे ही स्तुति होय. अर्थात मिथ्याभाषणाचे नाव निंदा व सत्यभाषणाचे नाव स्तुति होय.

**बुद्धिवृद्धिकारण्याशु धन्यानि च हितानि च ।**
**नित्यं शास्त्राण्यवेक्षेत निगमांश्चैव वैदिकान् ॥१॥** मनु. अ. ४। श्लो. १९

जे शीघ्र बुद्धि, धन व हित यांची वृद्धि करणारी जी शास्त्रे व वेद आहेत त्यांचे नित्य श्रवण व श्रावण करावे. ब्रह्मचर्याश्रमात जे अध्ययन केले असेल ते ग्रंथ स्त्रीपुरुषांनी नित्य वाचावेत व शिकवावेत. ॥१॥

**यथा यथा हि पुरुषः शास्त्रं समधिगच्छति ।**
**तथा तथा विजानाति विज्ञानं चास्य रोचते ॥२॥** मनु. अ. ४। श्लो. २०

कारण मनुष्य जसजसा शास्त्रांना यथावत जाणतो तसतसे त्या विद्येविषयीचे त्याचे विशेष ज्ञान वाढत जाते आणि त्यातच त्याची रूचि वाढत जाते. ॥२॥

## गृहस्थाश्रमाची कर्तव्ये - पंच महायज्ञ

**ऋषियज्ञं देवयज्ञं भूतयज्ञं च सर्वदा ।**
**नृयज्ञं पितृयज्ञं च यथाशक्ति न हापयेत् ॥१॥** मनु. अ. ४। श्लो. २१
**अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञश्च तर्प्पणम् ।**
**होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥२॥**
**स्वाध्यायेनार्चयेत् ऋषीन् होमैर्देवान् यथाविधि ।**
**पितृन् श्राद्धैश्च नृनन्नैर्भूतानि बलिकर्मणा ॥३॥** मनु. अ. ३। श्लो. ७०,८१

यांपैकी पहिल्या दोन यज्ञांविषयी ब्रह्मचर्य प्रकरणामध्ये विवेचन केले आहे. पहिल्यामध्ये वेदादी शास्त्रांचे अध्ययन व अध्यापन करणे, संध्योपासना व योगाभ्यास, दुसऱ्या देवयज्ञामध्ये विद्वानांचा

सत्संग, सेवा, पावित्र्य, दिव्य गुण अंगी वाढविणे, दातृत्व, विद्येची वृद्धी करणे. हे दोन्ही यज्ञ दररोज सकाळी व संध्याकाळी करावयाचे असतात.

**सायं सायं गृहपतिर्नो अग्निः प्रातः प्रातः सौमनसस्य दाता ॥१॥**
**प्रातः प्रातर्गृहपतिर्नो अग्निः सायं सायं सौमनसस्य दाता ॥२॥**

अ. कां. १९। अनु. ७। मं. ३,४

जो संध्याकाळी यज्ञ होतो त्या होमात टाकलेले द्रव्य सकाळपर्यंत हवा शुद्ध ठेवून हितकारक बनते. ॥१॥ जो सकाळी होम केला जातो त्या होमात टाकलेले द्रव्य संध्याकाळपर्यंत वायु शुद्धिद्वारा बळ बुद्धि आरोग्यकारक असते. ॥२॥

**तस्मादहोरात्रस्य संयोगे ब्राह्मणः सन्ध्यामुपासीत ।**
**उद्यन्तमस्तं यान्तमादित्यमभिध्यायन् ॥३॥** (षड्विंश)ब्राह्मणे ४।५। तै. आ. २।२

म्हणून दिवस व रात्र यांच्या संधिकाळी म्हणजे सूर्योदय व सूर्यास्तावेळी परमेश्वराचे ध्यान व अग्निहोत्र अवश्य केले पाहिजे. ॥३॥

**न तिष्ठति तु यः पूर्वां नोपास्ते यस्तु पश्चिमाम् ।**
**स साधुभिर्बहिष्कार्यः सर्वस्माद् द्विजकर्मणः ॥४॥** मनु. अ. २। श्लो. १०४

जे कोणी सकाळ संध्याकाळ संध्या व अग्निहोत्र करीत नाहीत त्यांना सज्जन लोकांनी द्विजांच्या कर्मांतून बहिष्कृत करून काढून टाकावे म्हणजे त्यास शूद्रवत समजावे. ॥४॥

**(प्रश्न)** त्रिकाळ संध्या का करू नये ?

**(उत्तर)** तीन वेळेला संधिकाळ होत नसतो. प्रकाश व अंधकार यांची संधीही फक्त सकाळी व संध्याकाळी अशा दोन वेळाच होते. जो कोणी ही गोष्ट लक्षात न घेता दिवसाच्या मध्यभागीही म्हणजे मध्याह्नीस आणखी एक संधिकाळ मानून तिसऱ्यांदा संध्यावंदन करतो त्याने रात्रीच्या मध्यभागीही संध्योपासना का करू नये ? मध्यरात्रीही संध्या करावयाची इच्छा असेल तर प्रत्येक प्रहरा प्रहराला, घटके घटकेला, प्रत्येक पळाला व क्षणालाही संधिकाळ असतो तेव्हाही संध्योपासना करावी ! वस्तुतः तसे करण्याची इच्छा असली तरीही तसे होऊ शकत नाही आणि अशा प्रकारे मध्याह्न संध्या करण्यास कोणत्याही शास्त्रांत आधारसुद्धा नाही. म्हणून फक्त सकाळी आणि संध्याकाळी अशी दोनदाच संध्या व अग्निहोत्र करणे समूचित होय. तिसऱ्यावेळी नव्हे आणि काळाची जी विभागणी शास्त्रकारानी भूत, भविष्य व वर्तमान यांच्यातील भेदाने अशी केली आहे ते तीनकाळ वेगळे आहेत. त्यांचा संध्योपासनेशी काही संबंध नाही.

**तिसरा पितृयज्ञ.** ज्यात देव जे विद्वान-अध्ययन-अध्यापन करणारे ऋषी, माता, पिता आदी वयोवृद्ध ज्ञानी आणि परमयोगी यांची सेवा करणे म्हणजे पितृयज्ञ होय. पितृयज्ञाचे दोन भेद आहेत. एक श्राद्ध व दुसरे तर्पण. श्राद्ध म्हणजे 'श्रत्' हे सत्याचे नाव आहे. 'श्रत्सत्यं दधाति यया क्रियया सा श्रद्धा श्रद्धया यत्क्रियते तच्छ्राद्धम्।' ज्या क्रियेने सत्याचे ग्रहण केले जाते तिला श्रद्धा असे म्हणतात. श्रद्धेने जे कर्म केले जाते ते श्राद्ध होय. तसेच 'तृप्यन्ति तर्पयन्ति येन पितृन् तत्तर्पणम्' म्हणजे ज्या ज्या कर्माच्या योगाने विद्यमान म्हणजे हयात असणारी

मातापितादि संतुष्ट होतात व त्यांना जे सतुष्ट केले जाते त्याला तर्पण असे म्हणतात. मात्र हा दोन्ही प्रकारचा पितृयज्ञ जिवंत पितरांसाठी आहे, मृतकासाठी नाही.

## तर्पण

**ओं ब्रह्मादयो देवास्तृप्यन्ताम्। ब्रह्मादिदेवपत्न्यस्तृप्यन्ताम्। ब्रह्मादिदेवसुतास्तृप्यन्ताम्। ब्रह्मादिदेवगणास्तृप्यन्ताम्। इति देवतर्पणम्॥**

**'विद्वा ँ सो हि देवाः'** जे विद्वान आहेत त्यांनाच देव म्हणतात, असे शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे. ज्यांनी चारही वेदांचे सांगोपांग ज्ञान मिळविले आहे त्यांना ब्रह्मा असे म्हणतात. या ब्रह्मापेक्षा कमी शिकलेल्यांनाही देव म्हणजे विद्वान असे म्हणतात. त्यांच्याप्रमाणे विदुषी स्त्रीचे नाव ब्रह्माणी व देवी असे आहे. त्यांच्यासारखेच त्यांचे जे पुत्र, शिष्य व गण म्हणजे सेवक असतील त्यांची सेवा करणे म्हणजेच 'श्राद्ध' व 'तर्पण' होय.

## ऋषितर्पण

**ओं मरीच्यादय ऋषयस्तृप्यन्ताम्। मरीच्याद्यृषिपत्न्यस्तृप्यन्ताम् मरीच्याद्यृषिसुतास्तृप्यन्ताम्। मरीच्याद्यृषिगणास्तृप्यन्ताम्॥ इति ऋषितर्पणम्॥**

जे ब्रह्माचे प्रपौत्र मरीची सारखे विद्वान बनून इतरांना शिकवितात आणि त्यांच्याप्रमाणे ज्या स्त्रिया विदुषी असतात व मुलींना विद्यादान करतात त्यांची सेवा करावी. तसेच त्यांचे विद्वान पुत्र, शिष्य व सेवक त्यांच्याप्रमाणेच विद्यादान करीत असतील तर त्यांचाही सत्कार करावा. हेच खरे ऋषितर्पण होय.

## पितृतर्पण

**ओं सोमसदः पितरस्तृप्यन्ताम्। अग्निष्वत्ताः पितरस्तृप्यन्ताम्। बर्हिषदः पितरस्तृप्यन्ताम्। सोमपाः पितरस्तृप्यन्ताम्। हविर्भुजः पितरस्तृप्यन्ताम्। आज्यपाः पितरस्तृप्यन्ताम्। सुकालिनः पितरस्तृप्यन्ताम्। यमादिभ्यो नमः यमादींस्तर्पयामि। पित्रे स्वधा नमः पितरं तर्पयामि। पितामहाय स्वधा नमः पितामहं तर्पयामि। प्रपितामहाय स्वधा नमः प्रपितामहं तर्पयामि। मात्रे स्वधा नमो मातरं तर्पयामि। पितामह्यै स्वधा नमः पितामहीं तर्पयामि। प्रपितामह्यै स्वधा नमः प्रपितामहीं तर्पयामि। स्वपत्न्यै स्वधा नमः स्वपत्नीं तर्पयामि। सम्बन्धिभ्यः स्वधा नमः सम्बन्धिनस्तर्पयामि। सगोत्रेभ्यः स्वधा नमः सगोत्राँस्तर्पयामि॥ इति पितृतर्पणम्॥**

'ये सोमे जगदीश्वरे पदार्थविद्यायां च सीदन्ति ते सोमसदः' जे परमात्मा जाणण्यात व पदार्थविद्येमध्ये निपुण असतात ते 'सोमसद', 'यैरग्नेर्विद्युतो विद्या गृहीता ते अग्निष्वात्ताः'. जे अग्नि म्हणजे विद्युत यांच्यासंबंधीच्या विद्यांचे जाणकार असतात ते अग्निष्वात्त होत. 'ये बर्हिषि उत्तमे व्यवहारे सीदन्ति ते बर्हिषदः'. जे उत्तम विद्यावृद्धीयुक्त व्यवहारांमध्ये गुंतलेले असतात ते बर्हिषद होय. 'ये सोममैश्वर्यमोषधीरसं वा पान्ति पिबन्ति वा

ते सोमपाः'. जे ऐश्वर्याचे रक्षक आणि सोमरसाचे पान केल्याने निरोगी बनलेले आहेत, तसेच जे दुसऱ्यांच्या ऐश्वर्याचे रक्षण करणारे असतात व इतरांना औषधे देऊन त्यांचे रोग नाहीसे करतात ते सोमपा होत. 'ये हविर्होतुमत्तुमर्ह भुञ्जते भोजयन्ति वा ते हविर्भुजः' जे मादक व हिंसायुक्त पदार्थांचा त्याग करून उत्तम खाद्यपदार्थांचे भोजन करतात त्यांना हविर्भुज म्हणतात. 'य आज्यं ज्ञातुं प्राप्तुं वा योग्यं रक्षन्ति वा पिबन्ति ते आज्यपाः' जाणण्यास व प्राप्त करून घेण्यास योग्य वस्तूंचे रक्षण करणारे आणि तूप खाणारे व दूध पिणारे जे लोक त्यांना आज्यपा म्हणतात. 'शोभनः कालो विद्यते येषान्ते सुकालिनः' चांगले धर्मकृत्ये करण्यास ज्यांना सदैव उत्तम वेळ असतो त्यांना सुकालिन असे म्हणतात. 'ये दुष्टान् यच्छन्ति निगृह्णन्ति, ते यमा न्यायाधीशाः' जे दुष्टांना शासन करतात व सज्जनांचे रक्षण करणारे न्यायकारी आहेत ते यम. 'यः पाति स पिता' जो मुलाबाळांना अन्नवस्त्रादिक पुरवून त्यांचे पालनपोषण व रक्षण करतो, तो जनक पिता होय. 'पितुः पिता पितामहः, पितामहस्य पिता प्रपितामहः' पित्याच्या पित्याला पितामह (आजोबा) आणि पितामहाच्या पित्याला प्रपितामह (पणजोबा) असे म्हणतात. 'या मानयति सा माता'. जी अन्न आणि सत्कार देऊन संतानाची मान्यता करते ती माता. 'या पितुर्माता या पितामही, पितामहस्य माता प्रपितामही.' पित्याची माता ती पितामही (आजी) आणि पितामहाची माता ती प्रपितामही (पणजी). आपली पत्नी, बहीण, नातेवाईक, स्वगोत्रज व अन्य कोणी सभ्य पुरुष अथवा वृद्ध या सर्वांना अत्यंत श्रद्धापूर्वक उत्तम अन्न, वस्त्र, सुंदर वाहन वगैरे देऊन त्यांना उत्तम प्रकारे संतुष्ट करावे. अर्थात ज्या-ज्या कृत्याने त्यांचा आत्मा तृप्त होईल आणि शरीर स्वस्थ राहील त्या-त्या कृत्याने त्यांची प्रेमपूर्वक सेवा करणे म्हणजेच श्राद्ध व तर्पण होय.

**चौथ यज्ञ म्हणजे बलि वैश्वदेव :-** स्वयंपाक तयार झाल्यावर भोजनासाठी जे पदार्थ बनले त्यांतून आंबट, खारट पदार्थ व मीठ घातलेले पदार्थ वगळून, तूप घातलेले पदार्थ व मिष्टान्ने घेऊन चुलीतून अग्नि बाहेर काढून त्या अग्नीमध्ये पुढील मंत्रांसह त्या अन्नाच्या आहुती द्याव्यात आणि भाग करावे. :-

**वैश्वदेवस्य सिद्धस्य गृह्योऽग्नौ विधिपूर्वकम् ।**
**आभ्यः कुर्य्याद्देवताभ्यो ब्राह्मणो होममन्वहम् ॥** मनु. अ. ३। श्लो. ८४

पाकशाळेमध्ये भोजनासाठी जे काही अन्न तयार असेल त्याचा दिव्य गुणांच्या प्राप्तीसाठी त्याच पाकाग्नीमध्ये खाली दिलेल्या मंत्रांनी नित्य विधिपूर्वक होम करावा :-

## होम करण्याचे मंत्र

**ओं अग्नये स्वाहा । सोमाय स्वाहा । अग्नीषोमाभ्यां स्वाहा । विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा । धन्वन्तरये स्वाहा । कुह्वै स्वाहा । अनुमत्यै स्वाहा । प्रजापतये स्वाहा । सह द्यावापृथिवीभ्यां स्वाहा । स्विष्टकृते स्वाहा ॥**

या प्रत्येक मंत्राने एक-एक आहुती प्रज्वलित अग्नीमध्ये टाकावी. नंतर थाळीमध्ये अथवा जमिनीवर पान ठेवून त्याच्या पूर्वदिशेकडून क्रमानुसार यथाक्रम या मंत्रांसह भाग ठेवावेत :-

**ओं सानुगायेन्द्राय नमः । सानुगाय यमाय नमः । सानुगाय वरूणाय नमः। सानुगाय सोमाय नमः । मरूद्भ्यो नमः । अद्भ्यो नमः । वनस्पतिभ्यो नमः । श्रियै नमः । भद्रकाल्यै नमः । ब्रह्मपतये नमः । वास्तुपतये नमः । विश्वेभ्यो**

देवेभ्यो नमः । दिवाचरेभ्यो भूतेभ्यो नमः । नक्तञ्चरिभ्यो भूतेभ्यो नमः । सर्वात्मभूतये नमः ॥

पानावर किंवा थाळीत ठेवलेले हे भाग एकत्र करावेत आणि त्यावेळी कोणी अतिथी आला असल्यास त्याला जेवू घालावे; किंवा अग्नीमध्ये सोडून द्यावे. त्यानंतर लवणान्न म्हणजे वरण, भात, भाजी, पोळी वगैरे घेऊन सहा भाग जमिनीवर ठेवावे. यासाठी आधार :-

**शुनां च पतितानां च श्वपचां पापरोगिणाम् ।**
**वायसानां कृमीणां च शनकैर्निर्वपेद् भुवि ॥** मनु. अ. ३। श्लो. ९२

या प्रकारे 'श्वभ्यो नमः, पतितेभ्योनमः, श्वपग्भ्यो नमः, पापरोगिभ्यो नमः, वायसेभ्यो नमः, कृमिभ्यो नमः' असे सहा भाग ठेवून कोणी दु:खी, उपाशी प्राणी अथवा कुत्रे, कावळे इत्यादींना देऊन टाकावेत.

या मंत्रातील 'नमः' या शब्दाचा अर्थ 'अन्न' असा आहे. कुत्री, पापी, चांडाळ, पापरोगी, कावळे आणि कृमी, मुंग्या इत्यादींना अन्न द्यावे असे मनुस्मृती आदिची विधि आहे.

पाकशाळेत होम-हवन करण्याचा उद्देश असा की तेथील हवा शुद्ध व्हावी आणि जी अज्ञात अदृष्ट जीवांची नकळत जी हत्या होते त्याचा प्रति उपकार करणे होय.

**आता पाचवी अतिथिसेवा.** ज्याच्या येण्याची तिथी निश्चित नसते त्याला अतिथी असे म्हणतात म्हणजे अकस्मात धार्मिक, सत्योपदेशक, सर्वांवर उपकार करण्यासाठी सर्वत्र हिंडणारा, पूर्ण विद्वान, परमयोगी, संन्यासी असा गृहस्थाच्या घरी आला तर त्याला प्रथम पाद्य, अर्घ्य व आचमनीय असे तीन प्रकारचे पाणी देऊन नंतर त्याला सत्कारपूर्वक आसनावर बसवून त्याला उत्तमोत्तम पदार्थ खाण्यास व पिण्यास द्यावेत आणि त्याची सेवाशुश्रूषा करून त्याला प्रसन्न करावे. त्यानंतर त्याच्या संगतीत बसून त्याच्या कडून ज्ञान-विज्ञानाच्या ज्या गोष्टींतून धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांची प्राप्ती होईल अशा उपदेशाचे श्रवण करावे. त्याने केलेल्या उपदेशानुसार आपले आचरण ठेवावे. प्रसंगानुसार गृहस्थ व राजा आदी देखील अतिथींप्रमाणे सत्कार करण्यास योग्य आहेत. परंतु,

## धूर्तांची लक्षणे

**पाषण्डिनो विकर्मस्थान् वैडालवृत्तिकान् शठान् ।**
**हैतुकान् बकवृत्तींश्च वाङ्मात्रेणापि नार्चयेत् ॥** मनु. अ. ४। श्लो. ३०

(पाषण्डी) पाखंडी अर्थात वेदांची निंदा करणारे, वेदविरुद्ध आचरण करणारे, (विकर्मस्थ), वेदविरुद्ध कृत्ये करणारे, मिथ्याभाषण आदी दुर्गुणांनी युक्त, (वैडाल.) जसा बोका लपून छपून दबा धरून टपून बसतो आणि उंदीर वगैरे प्राण्यांवर झडप घालून आपले पोट भरतो, तसे वर्तन करणाऱ्याला वैडालवृत्ती असे म्हणतात. (शठ) अर्थात हट्टी, दुराग्रही, घमेंडखोर. ज्यांना स्वत:ला कळत नाही व दुसऱ्यांनी सांगितलेले ऐकत नाहीत, ते शठ. (हैतुक) तर्क-कुतर्क म्हणजे व्यर्थ बडबड करणारे जसे आजकालचे वेदांती बकतात 'मी' ब्रह्म आहे, जग मिथ्या आहे, वेदादी शास्त्रे व ईश्वरसुद्धा कल्पित आहे, अशा थापा ठोकणारे आजकालचे वेदांती, (बकवृत्ती) जसा बगळा एका पायावर उभा राहून, ध्यानस्थ असल्याचा आव आणतो व समोर मासळी येताच तिला पकडून गट्ट करतो त्याप्रमाणे आपला स्वार्थ साधण्यासाठी आजकालचे बैरागी, गोसावी वगैरे हट्टी, दुराग्रही व

वेदविरोधी आहेत. अशा लोकांचा सत्कार नुसत्या वाणीनेही करू नये. कारण त्यांचा सत्कार केल्यास त्यांची भरभराट होऊन ते जगाला अधर्मयुक्त करतात. ते स्वत: तर अवनतीची कामे करतातच; पण जे त्यांच्या नादी लागतात त्यांनाही ते अविद्यारूपी महासागरात बुडवून टाकतात.

**या पाच महायज्ञांची फळे** अशी आहेत :-

ब्रह्मयज्ञ केल्याने विद्या, शिक्षण, धर्म, सभ्यता इत्यादी शुभ गुणांची वृद्धी होते. अग्निहोत्राने वायु, वृष्टी व जल यांची शुद्धी होऊन वृष्टीच्या द्वारे जगाला सुख मिळते. अर्थात शुद्ध वायुचा श्वासोच्छ्वास, स्पर्श व खानपान केल्याने आरोग्य, बुद्धि, बळ, पराक्रम वाढून 'धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचे अनुष्ठान पूर्ण होते. म्हणूनच त्याला देवयज्ञ म्हणतात.'

पितृयज्ञामध्ये माता, पिता आणि ज्ञानी महात्म्यांची सेवा केली जाते. त्यायोगे सेवा करणाऱ्यांचे ज्ञान वृद्धिंगत होईल त्यापासून सत्यासत्याचा निर्णय करून सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करून तो सुखी होईल. दुसरा पैलू कृतज्ञतेचाही असतो. जशी सेवा माता, पिता व आचार्य यांनी आपल्या मुलांची व शिष्यांची केलेली असते, त्यांची परतफेड करणे उचितच आहे.

बलिवैश्वदेवाचे फळ पूर्वी सांगितले तेच आहे.

जोपर्यंत जगामध्ये उत्तम अतिथी नसतील तोवर जगाची उन्नती होत नाही. त्यांच्या सर्वत्र संचार भ्रमणाने व सत्याचा उपदेश केल्याने पाखंड वाढत नाही आणि सर्व ठिकाणी गृहस्थाना सहजासहजी सत्य विज्ञानाची प्राप्ती होत राहते आणि मनुष्यमात्रामध्ये एकच धर्म स्थिर राहतो. अतिथीशिवाय संदेहनिवृत्ती होत नाही. संदेह म्हणजे संशय दूर झाल्याशिवाय दृढ निश्चय होत नाही आणि निश्चयाशिवाय सुख कसे प्राप्त होईल ?

**ब्राह्मे मुहूर्त्ते बुध्येत धर्मार्थौ चानुचिन्तयेत् ।**
**कायक्लेशांश्च तन्मूलान् वेदतत्त्वार्थमेव च ॥** मनु. अ. ४। श्लो. ९२

रात्रीच्या चौथ्या प्रहरी किंवा चार घटका रात्र असताना उठावे. आवश्यक कार्य करून धर्म व अर्थ शारीरिक रोगांचे निधान व परमात्म्याचे ध्यान करावे. कधीही अधर्माचरण करू नये. कारण,

**नाधर्मश्चरितो लोके सद्यः फलति गौरिव ।**
**शनैरावर्त्तमानस्तु कर्तुर्मूलानि कृन्तति ॥** मनु. अ. ४। श्लो. १७२

केलेला अधर्म कधीही निष्फळ होत नाही. मात्र ज्यावेळी माणूस अधर्म करतो त्याचवेळी त्यांचे फळ देखील मिळत नाही. म्हणून अज्ञानी लोक अधर्म करण्यास कचरत नाहीत. परंतु लक्षात ठेवा की, ते अधर्माचरण हळूहळू तुमच्या सुखाची मुळे कुरतडत जाते त्याचा क्रम असा:-

**अधर्मेणैधते तावत्ततो भद्राणि पश्यति ।**
**ततः सपत्नाञ्जयति समूलस्तु विनश्यति ॥** मनु. अ. ४। श्लो. १७४

जेव्हा तलावाचा बांध फोडून पाणी जसे चोहोकडे पसरते तसा अधर्मात्मा मनुष्य धर्माच्या मर्यादा ओलांडून मिथ्याभाषण, कपट, पाखंड म्हणजे रक्षण करणाऱ्या वेदांचे खंडन आणि विश्वासघात वगैरे नीच कर्मे करून इतरांच्या वस्तू लुबाडत प्रथम तो खूप भरभराटीस येतो. नंतर त्याला धन, धान्य, ऐश्वर्य, खानपान, वस्त्रे, आभूषणे, यान, स्थान, मान, प्रतिष्ठा वगैरे गोष्टी त्याला प्राप्त होतात. अन्यायाने तो शत्रूंसही जिंकतो. मात्र

त्यानंतर लवकरच नष्ट होऊन जातो जसे पाळे मुळे कापलेला वृक्ष नष्ट होतो तसा हा अधर्मी माणूस नष्टभ्रष्ट होत जातो.

**सत्यधर्मार्यवृत्तेषु शौचे चैवारमेत्सदा ।**
**शिष्यांश्च शिष्याद्धर्मेण वाग्बाहूदरसंयतः ॥** मनु. अ. ४। श्लो. १७५

वेदोक्त सत्य धर्म अर्थात पक्षपातरहित होऊन सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग, न्यायरूप वेदोक्त धर्मादि, आर्य, उत्तम पुरुषांचे गुण, कर्म, स्वभाव व पावित्र्य यांमध्ये सदा रममाण व्हावे. वाणी, बाहू, उदर आदी अवयवांचा संयम करून म्हणजे धर्माने चालत राहून आपल्या शिष्यांचे उत्तम शिक्षण करीत असावे.

**ऋत्विक् पुरोहिताचार्य्यैर्मातुलातिथिसंश्रितैः ।**
**बालवृद्धातुरैर्वैद्यैर्ज्ञातिसम्बन्धिबान्धवैः ॥१॥** मनु. अ. ४। श्लो. १७९

(ऋत्विक्) यज्ञ करणारा, (पुरोहित) सदा उत्तम आचरणाचे शिक्षण देणारा, (आचार्य) विद्या शिकविणारा, (मातुल) मामा, (अतिथि) ज्यांच्या येण्याजाण्याची तिथी ठरलेली नसते तो, (संश्रित) आपले आश्रित, (बाल) बालक, (वृद्ध) म्हातारे, (आतुर) पीडित, (वैद्य) आयुर्वेद जाणणारा, (ज्ञाति) आपल्या वर्णाचे किंवा गोत्राचे, (संबन्धी) सासरे वगैरे (बान्धव) मित्र ॥१॥

**मातापितृभ्यां यामिभिर्भ्रात्रा पुत्रेण भार्यया ।**
**दुहित्रा दासवर्गेण विवादं न समाचरेत् ॥२॥** मनु. अ. ४। श्लो. १८०

(माता) आई, (पिता) बाप, (यामि) बहीण, (भ्राता) भाऊ, (पुत्र) मुलगा, (भार्या) पत्नी, (दुहिता) मुलगी व (दास) नोकर यांच्याशी वाद म्हणजे त्यांच्याशी भांडण किंवा तंटाबखेडा कधीही करू नये. ॥२॥

## दान

**अतपास्त्वनधीयानः प्रतिग्रहरूचिर्द्विजः ।**
**अम्भस्यश्मप्लवेनैव सह तेनैव मज्जति ॥** मनु. अ. ४। श्लो. १९०

एक (अतपाः) ब्रह्मचर्य, सत्यभाषण वगैरे तपरहित, दुसरा (अनधीयानः) न शिकलेला, तिसरा (प्रतिग्रहरूचिः) दुसऱ्यांकडून केवळ दान घेणारा असे हे तीन प्रकारचे लोक दगडी नौकेत समुद्रावर तरंगण्यासमान आपल्या दुष्कर्मानेच दुःख सागरात बुडून जातात. ते स्वतः तर बुडतातच परंतु स्वतःबरोबर दान देणाऱ्यांनाही बुडवितात.

**त्रिष्वप्येतेषु दत्तं हि विधिनाप्यर्जितं धनम् ।**
**दातुर्भवत्यनर्थाय परत्रादातुरेव च ॥** मनु. अ. ४। श्लो. १९३

जो धर्माने प्राप्त झालेले धन वर वर्णिलेल्या तीन पुरुषांना देतो त्या दान दात्याचा नाश याच जन्मात आणि घेणाऱ्याचा नाश पुढील जन्मी करते. जे असे असतात त्यांचे काय व्हावे?

**यथा प्लवेनौपलेन निमज्जत्युदके तरन् ।**
**तथा निमज्जतोऽधस्तादज्ञौ दातृप्रतीच्छकौ ॥** मनु. अ. ४। श्लो. १९४

ज्याप्रमाणे दगडी नौकेत बसून पाण्यावर तरंगणारा बुडतो त्याप्रमाणे अज्ञानी दाता व ग्रहीता (दान घेणारा) हे दोघेही अधोगतीला अर्थात दुःखास प्राप्त होतात.

## पाखंड्यांची लक्षणे

**धर्मध्वजी सदा लुब्धश्छाद्मिको लोकदम्भकः ।**
**वैडालव्रतिको ज्ञेयो हिंस्त्रः सर्वाभिसन्धकः ॥१॥** मनु. अ. ४। श्लो. १९५

(धर्मध्वजी) काहीही धर्म न करता धर्माच्या नावाने लोकांना ठकविणारा, (सदालुब्धः) सर्वदा लोभी, (छाद्मिकः) कपटी, (लोकदम्भकः) संसारी लोकांसमोर आपल्या बढाईच्या गप्पा मारणारा, ढोंगी, (हिंस्त्र) प्राण्यांची हिंसा करणारा व इतरांशी वैर बाळगणारा, (सर्वाभिसन्धकः) भल्या व वाईट अशा सर्व लोकांशी मिळून राहणारा असेल त्याला वैडालव्रतिक म्हणजे बोक्याप्रमाणे लबाड व नीच समजावे. ॥१॥

**अधोदृष्टिर्नैष्कृतिकः स्वार्थसाधनतत्परः ।**
**शठो मिथ्याविनीतश्च बकव्रतचरो द्विजः ॥२॥** मनु. अ. ४। श्लो. १९६

(अधोदृष्टिः) कीर्तीसाठी अधोदृष्टि ठेवणारा, (नैष्कृतिकः) खुनशी, कोणी त्याचा थोडासा पैसा भर अपराध केला असेल तर त्याचा सूड घेण्यासाठी मरेपर्यंत धडपडणारा, (स्वार्थसाधनतत्परः) कपट, अधर्म, विश्वासघात वगैरे वाटेल त्या साधनांचा वापर आपल्या हेतु सिद्धिसाठी करणारा, (शठः) आपले म्हणणे खोटे असले तरी आपला हट्ट न सोडणारा, (मिथ्याविनितः) आपण अत्यंत सुशील, संतुष्ट व सज्जन आहोत असे खोटे नाटे वरून भासविणारा (बकव्रत चरः) त्याला बगळ्याप्रमाणे नीच समजावे, अशी लक्षणे असणारे लोक नीच व पाखंडी असतात. त्यांचा विश्वास अथवा त्यांची सेवा करू नये. ॥२॥

## गृहस्थांची कर्तव्ये

**धर्मं शनैः सञ्चिनुयाद् वल्मीकमिव पुत्तिकाः ।**
**परलोकसहायार्थं सर्वलोकान्यपीडयन् ॥१॥** मनु. अ. ४। श्लो. २३८

मुंग्या (किंवा वाळवी) ज्याप्रमाणे हळूहळू प्रयत्न करून वारूळ बांधतात त्याप्रमाणे स्त्रीपुरुषांनी, कोणालाही पीडा न देता, परलोकात म्हणजे परजन्मात सुख मिळावे म्हणून, हळूहळू धर्माचा संचय करावा. ॥१॥

**नामुत्र हि सहायार्थं पिता माता च तिष्ठतः ।**
**न पुत्रदारं न ज्ञातिर्धर्मस्तिष्ठति केवलः ॥२॥** मनु. अ. ४। श्लो. २३९

कारण, परलोकामध्ये माता, पिता, पुत्र, पत्नी अथवा आपली जाती, लोक यांपैकी कोणीही साह्य करू शकत नाही परंतु फक्त धर्मच सहायक होत असतो. ॥२॥

**एकः प्रजायते जन्तुरेक एव प्रलीयते ।**
**एको नु भुङ्क्ते सुकृतमेक एव च दुष्कृतम् ॥३॥** मनु. अ. ४। श्लो. २४०

पहा ! प्राणी एकटाच जन्माला येतो व एकटाच मरतो. तसेच धर्माचरणाचे फळ सुख आणि अधर्माचरणाचे दुःखरूपी फळ तो एकटाच भोगतो. ॥३॥

**एकः पापानि कुरु ते फलं भुङ्क्ते महाजनः ।**
**भोक्तारो विप्रमुच्यन्ते कर्त्ता दोषेण लिप्यते ॥४॥** महा. उद्योग. अ. ३३। श्लो. ४७

हेही समजून घ्यावे की कुटुंबातील एक पुरुष पाप करून वस्तू आणतो आणि महाजन म्हणजे कुटुंब

त्याचा उपभोग घेतात ते उपभोग घेणारे पापाचे भागीदार होत नाहीत. परंतु अधर्म अथवा पाप करणाराच पापाचा भागीदार होतो. ॥४॥

**मृतं शरीरमुत्सृज्य काष्ठलोष्ठसमं क्षितौ।**
**विमुखा बान्धवा यान्ति धर्मस्तमनुगच्छति॥२॥** मनु. अ. ४। श्लो. २४१

जेव्हा कुणाचा नातेवाईक मरतो तेव्हा त्याला मातीच्या ढेकळाप्रमाणे त्याचे शरीर जमिनीत पुरून त्याच्याकडे पाठ देऊन बंधुवर्ग विमुख होऊन निघून जातात. त्याच्या बरोबर जाणारा कोणीही नसतो परंतु एकटा धर्मच त्याचा साथी होतो. ॥५॥

यासाठी

**तस्माद्धर्मं सहायार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः।**
**धर्म्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम्॥२॥** मनु. अ. ४। श्लो. २४२

परलोकात म्हणजे परजन्मात सुख व्हावे म्हणून या जन्मातच सहायतार्थ नित्य धर्माचा संचय हळू हळू करीत जावे. कारण धर्माच्याच साहाय्याने जीव मोठेमोठे दुस्तर दुःखसागर तरून जाऊ शकतो. ॥१॥

**धर्मप्रधानं पुरुषं तपसा हतकिल्बिषम्।**
**परलोकं नयत्याशु भास्वन्तं खशरीरिणम्॥२॥** मनु. अ. ४। श्लो. २४३

परंतु जो पुरुष धर्मालाच मुख्य समजतो, धर्माच्या अनुष्ठानाने ज्याचे केलेले पाप दूर झाले असते त्याला त्याने धर्मच, प्रकाशस्वरूपी आणि आकाश हे ज्याला शरीराप्रमाणे आहे अशा परलोक म्हणजे परमदर्शनीय परमात्म्याची शीघ्र प्राप्ती करवून देतो. ॥२॥ म्हणून

**दृढकारी मृदुर्दान्तः क्रूराचारैरसंवसन्।**
**अहिंस्रो दमदानाभ्यां जयेत्स्वर्गं तथाव्रतः॥१॥** मनु. अ. ४। श्लो. २४६

सदा दृढ असणारा, कोमल स्वभावाचा, जितेंद्रिय असतो, हिंसक, क्रूर व दुराचारी लोकांपासून जो दूर राहतो, तो धर्मात्मा, मनावर जय मिळवून आणि विद्यादी दानाने सुख प्राप्त करतो. ॥१॥

**वाच्यर्था नियताः सर्वे वाङ्मूला वाग्विनिःसृताः।**
**तां तु यः स्तेनयेद्वाचं स सर्वस्तेयकृन्नरः॥२॥** मनु. अ. ४। श्लो. २५६

परंतु हेही लक्षात ठेवावे की सर्व अर्थ व व्यवहार वाणीने निश्चित होतात, ती वाणीच सर्वांच्या मुळाशी असते व तिच्या द्वारेच सर्व व्यवहार सिद्ध होतात. त्या वाणीची जो चोरी करतो, म्हणजे खोटे बोलतो तो सर्व प्रकारची चोरी वगैरे पापे करणारा आहे. ॥२॥

**आचाराल्लभते ह्यायुराचारादीप्सिताः प्रजाः।**
**आचाराद्धनमक्षय्यमाचारो हन्त्यलक्षणम्॥३॥** मनु. अ. ४। श्लो. १५६

म्हणून जो मिथ्याभाषणादी अधर्माचा त्याग करून धर्माचरण करतो, म्हणजे ब्रह्मचर्य, जितेंद्रियतेने पूर्ण आयुष्य आणि धर्माचरणाद्वारे उत्तम संतती व अक्षय धन प्राप्त करतो, जो धर्माप्रमाणे वागून दुष्ट लक्षणांचा नाश करतो. त्याच्या सारखे आचरण सदैव करावे. ॥३॥ कारण

**दुराचारो हि पुरुषो लोके भवति निन्दितः ।**
**दुःखभागी च सततं व्याधितोऽल्पायुरेव च ॥** मनु. अ. ४ श्लो. १५७

जो पुरुष दुराचारी असतो त्याची जगामध्ये सदाचरणी लोकांत निंदेस पात्र होतो, तो दु:ख भोगणारा नेहमी व्याधिग्रस्त होऊन अल्पायुषी होतो. म्हणून असा प्रयत्न करावा :-

**यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत् ।**
**यद्यदात्मवशं तु स्यात्तत्तत्सेवेत यत्नतः ॥१॥** मनु. अ. ४ श्लो. १५९

जे-जे पराधीन कर्म असेल त्याचा प्रयत्नपूर्वक त्याग करावा आणि जे-जे स्वाधीन कर्म असेल ते प्रयत्नपूर्वक आचरावेत. ॥१॥

**सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।**
**एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥२॥** मनु. अ. ४। श्लो. १६०

कारण जी जी पराधीनता ती ती दु:खदायक व जी स्वाधीनता आहे ती सुखदायक असते हेच संक्षेपाने सुख व दु:ख यांचे थोडक्यात हेच लक्षण जाणले पाहिजे. ॥२॥

परंतु जी एकमेकांच्या आधीन कामे आहेत ती ती आधीनतेनेच केली पाहिजेत. जसे की, स्त्री आणि पुरुष यांनी एकमेकांच्या आधीन राहून परस्परांशी संबंधित कर्तव्ये करावी. म्हणून स्त्री आणि पुरुष यांनी परस्परांशी प्रिय आचरण करावे, कोणीही दुसऱ्या व्यक्तीला विरोध करू नये अथवा व्यभिचार करू नये. घरातील सगळी कामे पुरुषाच्या आज्ञेप्रमाणे स्त्रीने आणि बाहेरची कामे पुरुषाने करावीत. एकमेकांना वाईट व्यसनात फसण्यापासून अडविणे हाच निश्चय जाणावा.

विवाह झाल्यानंतर स्त्री आणि पुरुष एकमेकांबरोबर विकल्या गेले अर्थात त्या दोघांचे हावभाव, वीर्य आदी नखशिखांत जे काही आहे ते परस्परांचे आधीन होऊन जाते.

स्त्रीने अथवा पुरुषाने एकमेकाला प्रसन्नतेशिवाय कोणतेही वर्तन करू नये. यात व्यभिचार, वेश्यागमन, परपुरुषगमन ह्या अत्यंत दु:खदायक मोठ्या गोष्टी आहेत. त्यांच्या वाटेला न जाता आपल्या पतीवर पत्नीने व पत्नीवर पतीने सदा अनुरक्त, प्रसन्न राहावे.

जे ब्राह्मण वर्णस्थ असतील त्यांच्यातील पुरुषांनी मुलांना शिकवावे आणि सुशिक्षित स्त्रियांनी मुलींना शिकवावे. नाना प्रकारे उपदेश करून व व्याख्याने देऊन त्या मुलांना विद्वान बनवावे. स्त्रीचा पूजनीय देव तिचा पती आणि पुरुषाची पूजनीय, सत्कारणीय देवी त्याची पत्नी असते.

मुले व मुली जोपर्यंत गुरूकुलात राहतात तोपर्यंत त्यांनी आपल्या अध्यापकांना आईवडिलांसमान मानावे आणि अध्यापकांनी आपल्या शिष्यांना स्वत:च्या मुलांप्रमाणे समजावे.

## अध्यापक व अध्यापिका हे कसे असावेत?

## पंडिताचे लक्षण

**आत्मज्ञानं समारम्भास्तितिक्षा धर्मनित्यदा ।**
**यमर्था नापकर्षन्ति स वै पण्डित उच्यते ॥१॥** महा. उद्योग. वि. प्र. अ. ३३। श्लो. २०

**अर्थ :** ज्याला आत्मज्ञान झालेले आहे, जो सम्यक् आरंभ म्हणजे नित्य उद्योगात असतो. कधीही रिकामटेकडा व आळशी राहत नाही, सुख-दु:ख, हानि-लाभ, मानापमान, निंदा-स्तुती यांविषयी जो कधी हर्ष अथवा शोक करीत नाही, जो नेहमी धर्माचरणात नित्य मग्न असतो, ज्याच्या मनाला उत्तमोत्तम पदार्थ म्हणजे विषय वासनांच्या वस्तू आकर्षित करू शकत नाहीत, त्यालाच पंडित असे म्हणतात. ।।१।।

**निषेवते प्रशस्तानि निन्दितानि न सेवते ।**
**अनास्तिकः श्रद्दधान एतत्पण्डितलक्षणम् ।।२।।** महा.उद्योग.वि.प्र.अ.३३। श्लो. २१

जो सदैव धर्मयुक्त कामे करतो, अधर्मयुक्त कृत्यांचा त्याग करतो, ईश्वर, वेद व सत्याचार यांची निंदा करीत नाही, जो ईश्वरावर अढळ श्रद्धा ठेवतो हीच पंडिताची कर्तव्याकर्तव्य कर्मे होत. ।।२।।

**क्षिप्रं विजानाति चिरं श्रृणोति, विज्ञाय चार्थं भजते न कामात् ।**
**नासम्पृष्टो ह्युपयुङ्क्ते परार्थे, तत्प्रज्ञानं प्रथमं पण्डितस्य ।।३।।**

महा. उद्योग. वि. प्र. अ. ३३। श्लो. २७

ज्याला अवघड विषयही चटकन समजू शकतो, जो दीर्घ काळपर्यंत शास्त्रांचे वाचन, श्रवण व मनन करतो, जे काही ज्ञान प्राप्त होईल त्याचा परोपकारासाठी वापर करतो, कोणतेही काम आपल्या स्वार्थासाठी करीत नाही, कोणी न विचारता अथवा योग्य वेळ नसताना दुसऱ्या विषयी सम्मति देत नाही, तसेच प्रथम कोटीचे प्रज्ञान पंडितास झाले पाहिजे तो पंडित. ।।३।।

**नाप्राप्यमभिवाञ्छन्ति नष्टं नेच्छन्ति शोचितुम् ।**
**आपत्सु च न मुह्यन्ति नराः पण्डितबुद्धयः ।।४।।** महा. उद्योग. वि. प्र. अ. ३३। श्लो. २८

जी वस्तू प्राप्तीसाठी अयोग्य असते तिची इच्छा जो कधी करीत नाही, नष्ट झालेल्या गोष्टींविषयी शोक करीत नाही, संकटकाळी मोहात पडत नाही अथवा व्याकुळ होत नाही तोच बुद्धिमान पंडित होय. ।।४।।

**प्रवृत्तवाक् चित्रकथ ऊहवान् प्रतिभानवान् ।**
**आशु ग्रन्थस्य वक्ता च यः स पण्डित उच्यते ।।५।।** महा.उद्योग.वि.प्र.अ.३३। श्लो. ३३

ज्याची वाणी सर्व विद्यांमध्ये आणि प्रश्नोत्तरे करण्यात अत्यंत निपुण असते, जो विविध शास्त्रांच्या प्रकरणाचा वक्ता यथायोग तर्क आणि स्मृतिमान, अशांच्या यथार्थ अर्थाचा शीघ्र वक्ता असतो तोच पंडित म्हटला जातो. ।।५।।

**श्रुतं प्रज्ञानुगं यस्य प्रज्ञा चैव श्रुतानुगा ।**
**असंभिन्नार्यमर्यादः पण्डिताख्यां लभेत सः ।।६।।** महा. उद्योग. वि.प्र. अ. ३३। श्लो. ३४

ज्याची बुद्धी ऐकलेल्या सत्य अर्थाच्या अनुकूल असते आणि ज्याचे श्रवण बुद्धिच्या अनुसार असते, जो कधीही आर्य म्हणजे श्रेष्ठ धार्मिक पुरुषांच्या मर्यादेचे उल्लंघन करीत नाही तोच पंडित ह्या संज्ञेस प्राप्त होतो. ।।६।।

हे सर्व महाभारताच्या उद्योगपर्वातील विदुरप्रजागराचे श्लोक आहेत.

जेथे अशा योग्यतेचे स्त्रीपुरुष अध्यापन करतात तेथे विद्या, धर्म व उत्तम आचरण यांची वृद्धी होऊन प्रतिदिन आनंदच वाढत असतो.

## अध्यापनास अयोग्य व मूर्ख माणसाची लक्षणे :-

**अश्रुतश्च समुन्नद्धो दरिद्रश्च महामनाः ।**
**अर्थांश्चाऽकर्मणा प्रेप्सुर्मूढ इत्युच्यते बुधैः ॥१॥** महा. उद्योग पर्व. वि. प्र. अ. ३३। श्लो. ३५

(**अर्थ**) ज्याने कोणतेही शास्त्र वाचलेले अथवा ऐकलेले नाही, जो अत्यंत घमेंडखोर आहे, जो दरिद्री असून मोठमोठी मनोराज्ये करतो, कर्म केल्यावाचून त्याच्या फळांच्या प्राप्तीची इच्छा बाळगतो, त्यालाच बुद्धीमान लोक मूढ असे म्हणतात. ॥१॥

**अनाहूतः प्रविशति ह्यपृष्टो बहु भाषते ।**
**अविश्वस्ते विश्वसिति मूढचेता नराधमः ॥२॥** महा. उद्योगपर्व. वि.प्र.अ.३३। श्लो.४१

जो न बोलावता सभेत किंवा कोणाच्या तरी घरी जाऊन तेथे उच्च आसनावर बसू इच्छितो, विचारल्याशिवाय सभेमध्ये बाष्कळ बडबड करतो, अविश्वासू माणसावर अथवा वस्तूवर विश्वास ठेवतो तो मूर्ख आणि सर्व मनुष्यांमध्ये हीन दर्जाचा माणूस म्हटला जातो. ॥२॥

जेथे अशा प्रकारची माणसे अध्यापक, उपदेशक, गुरू व माननीय असतात तेथे अविद्या (अज्ञान), अधर्म, असभ्यता, कलह, विरोध व दुही वाढून दु:खच वाढीस लागते :-

## आता विद्यार्थ्यांची लक्षणे

**आलस्यं मदमोहौ च चापल्यं गोष्ठिरेव च ।**
**स्तब्धता चाभिमानित्वं तथाऽत्यागित्वमेव च ।**
**एते वै सप्त दोषाः स्युः सदा विद्यार्थिनां मताः ॥१॥** महा. वि. प्र. अ. ४०। श्लो. ५

(आलस्य) शारीरिक व बौद्धिक जडता, नशा, मोह, कोणत्याही गोष्टीत फसणे, अस्थिरपणा, इकडच्या तिकडच्या निरर्थक गप्पा गोष्टी करणे व ऐकणे, शिकताना किंवा शिकविताना थांबणे, अभिमानी व अत्यागी हे सात दोष विद्यार्थ्यांमध्ये असतात. त्यांना कधीच विद्या येत नाही. ॥१॥

**सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ।**
**सुखार्थी वा त्यजेद्विद्यां विद्यार्थी वा त्यजेत्सुखम् ॥२॥** महा. वि.प्र.अ.४०। श्लो.६

सुख भोगण्याची इच्छा बाळगणाऱ्याला विद्या कशी मिळणार ? आणि विद्याध्ययन करणाऱ्याला सुख कसे मिळणार ? कारण विषयसुखार्थीने विद्येला सोडावे आणि विद्यार्थ्याने विषयसुखांचा त्याग करावा. ॥२॥ असे केल्याखेरीज विद्याध्ययन होऊ शकत नाही. खालील गुण बाळगणाऱ्यांना विद्या मिळते :-

**सत्ये रतानां सततं दान्तानामूर्ध्वरेतसाम् ।**
**ब्रह्मचर्यं दहेद्राजन् सर्वपापान्युपासितम् ॥१॥** महा. अनु. प. अ. ७५। श्लो. ३७

जे नेहमी सत्याचरणात प्रवृत्त, जितेंद्रिय आणि ज्यांचे वीर्य कधीही अध:स्खलित होत नाही, त्यांचेच ब्रह्मचर्य खरे आणि तेच विद्वान होत असतात. ॥१॥

यासाठी अध्यापक व विद्यार्थी यांनी शुभ लक्षणांनी युक्त झाले पाहिजे.

विद्यार्थी सत्यवादी, सत्याभिमानी, सत्यकारी, सभ्य, जितेंद्रिय, सुशील, आदि शुभ गुणयुक्त शारीरिक व आत्मिक बळ वाढवून समग्र वेदादी शास्त्रांमध्ये प्रवीण बनतील असा प्रयत्न अध्यापकांनी करावा. विद्यार्थ्यांच्या

वाईट सवयी काढून टाकाव्यात आणि त्यांना विद्या शिकविण्यात त्यांनी सतत प्रयत्न करावे. विद्यार्थ्यांनीही स्वत: जितेंद्रिय, शांत, अध्यापकांविषयी प्रेम, विचारशील, परिश्रमी होऊन असा पुरुषार्थ करावा ज्यामुळे पूर्ण विद्या, पूर्ण आयुष्य, पूर्ण धर्म आणि पुरुषार्थ करणे येऊन जाईल. ही सारी ब्राह्मण वर्णाची कामे आहेत. क्षत्रियांची कामे राजधर्म प्रकरणात सांगणार आहोत.

वैश्यांनी ब्रह्मचर्याद्वारे वेदादी विद्या शिकून विवाह करून नाना देशांच्या भाषा शिकणे, नाना प्रकारच्या व्यापारांच्या पद्धती व वस्तूंचे भाव जाणून घेणे, खरेदी विक्री करणे, द्वीपद्वीपांतरी (देशोदेशी) जाणे-येणे, लाभ मिळविण्यासाठी कामे सुरू करणे, पशुपालन व शेती यांच्यात चातुर्याने उन्नति करणे व सुधारणा घडवून आणणे, धन वाढविणे आणि विद्या व धर्म यांच्या उन्नतीसाठी त्याचा खर्च करणे, सत्यवादी निष्कपटी बनून सचोटीने सर्व व्यापार करणे, कोणतीही वस्तू नष्ट होणार नाही, अशा प्रकारे सर्व वस्तूंचे रक्षण करणे, (ही सारी वैश्यांची कर्तव्ये होत.)

शूद्रांनी सर्व प्रकारच्या सेवा करण्यात प्रवीण, पाकविद्येत निपुण, अत्यंत प्रेमाने द्विजांची सेवा आणि त्यावरच आपला चरितार्थ चालवावा आणि द्विजांनी शूद्रांच्या अन्न-वस्त्र-निवाऱ्याची सोय, त्यांच्या लग्नकार्यात होणारा सर्व खर्चही त्यांनी द्यावा किंवा त्या कामांबद्दल त्यांना मासिक पगार द्यावा.

चारही वर्णांनी परस्परांवर प्रेम, उपकार, सज्जनता, सुख, दु:ख, लाभ, हानीमध्ये एकमताने राहून राज्य व प्रजा यांच्या उन्नतीसाठी तनमनधनाने प्रयत्न करीत राहावा.

स्त्री आणि पुरुष यांचा वियोग कधी होत कामा नये. कारण,

**पानं दुर्जनसंसर्गः पत्या च विरहोऽटनम् ।**
**स्वप्नोऽन्यगेहवासश्च नारीसन्दूषणानि षट् ॥२॥** मनु. अ. ९ श्लो. १३

मद्य, भांग, वगैरे मादक पदार्थांचे सेवन, दुष्ट पुरुषांची संगत, पतिवियोग, पाखंडी किंवा ढोंगी लोकांच्या दर्शनाच्या मिषाने उगीचच एकटीने इकडे तिकडे भटकणे आणि दुसऱ्यांच्या घरी जाऊन झोपणे किंवा वास्तव्य करणे, हे स्त्रियांना दूषित करणारे सहा दुर्गुण आहेत तसेच हे पुरुषांचेही आहेत. पती व पत्नी यांचा वियोग दोन प्रकारचा असतो :- कामासाठी परदेशी जाणे व दुसरा मृत्यूच्या योगे होणारा वियोग. यापैकी पहिल्या प्रकारच्या वियोगावर हा उपाय आहे की दूर देशी प्रवासास जाताना पुरुषाने पत्नीला आपल्या बरोबर न्यावे ह्याचे कारण दीर्घकाळपर्यंत पतिपत्नीचा वियोग राहणे योग्य नाही.

## पुनर्विवाह

**(प्रश्न)** स्त्री व पुरुष यांचा बहु विवाह करणे योग्य आहे की नाही ?

**(उत्तर)** एकाच वेळी स्त्रीपुरुषांनी अनेक विवाह करू नयेत.

**(प्रश्न)** काय कालांतराने अनेक विवाह झाले पाहिजेत ?

**(उत्तर)** होय. जसे,

**या स्त्री त्वक्षतयोनिः स्याद् गतप्रत्यागतापि वा ।**
**पौनर्भवेन भर्त्रा सा पुनः संस्कारमर्हति ॥** मनु. अ. ९ श्लो. १७६

ज्या स्त्रीचा अथवा पुरुषाचा फक्त पाणिग्रहण संस्कार झाला असेल आणि त्यांचा समागम झाला नसेल

तर अशी अक्षतयोनी स्त्री आणि अक्षतवीर्य पुरुष (यांना वैधव्य वा विधुरावस्था प्राप्त झाल्यास) त्यांनी अन्य पुरुषाशी अथवा स्त्रीशी पुनर्विवाह केला पाहिजे. मात्र ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांतील क्षतयोनी स्त्री व क्षतवीर्य पुरुष यांचा पुनर्विवाह होऊ नये.

**(प्रश्न)** पुनर्विवाह करण्यात काय दोष आहे ?

**(उत्तर)** (१) पाहिजे तेव्हा स्त्रीपुरुषांनी एकमेकांस सोडचिठ्ठी देऊन दुसऱ्या बरोबर संबंध करून असे केल्याने स्त्रीपुरुषांतील प्रेम कमी होते, हा पहिला दोष.

(२) जेव्हा स्त्री अथवा पुरुष पतीपत्नी यांच्या निधनानंतर पती अथवा पत्नी दुसरे लग्न करावयास तयार होतात तेव्हा पहिल्या पत्नीच्या किंवा पतीच्या वस्तू पळविल्या जातात. त्यामुळे त्यांच्या कुटुंबातील लोकांमध्ये तंटे उत्पन्न होणे हा दुसरा दोष.

(३) तिसरा दोष असा की अशा प्रकारच्या पुनर्विवाहामुळे पुष्कळशा घरंदाज कुळांची नावे अथवा चिह्ने, न राहून त्यांच्या पदार्थांचे छिन्नविछिन्न होणे.

(४) चौथा दोष असा की त्यामुळे पतिव्रत व पत्नीव्रत हे धर्म नष्ट होतात. इत्यादि दोष उत्पन्न होत असल्यामुळे द्विजांमध्ये पुनर्विवाह अथवा अनेक विवाह कधी होता कामा नयेत.

**(प्रश्न)** मूलबाळ नसल्यास निर्वंश होऊन कुळाचाच नाश होईल. शिवाय स्त्रीपुरुष व्यभिचार करून गर्भपातादी दुष्टकृत्ये करतील. म्हणून पुनर्विवाह होणे चांगले आहे काय ?

**(उत्तर)** छे: छे: ! कारण ज्या स्त्रीपुरुषांनी ब्रह्मचर्य स्थिर राहण्याची इच्छा केली तर काहीही उपद्रव होणार नाही आणि आपल्या कुळाची परंपरा चालू ठेवण्यासाठी आपल्या जातीतील मुलगा दत्तक घेतील. म्हणजे कुळवंश चालेल आणि व्यभिचारही होणार नाही. मात्र जे ब्रह्मचर्य ठेवू शकत नाही त्यांनी नियोग करून प्रजोत्पादन करावे.

## नियोग विधि

**(प्रश्न)** पुनर्विवाह व नियोग यांत काय फरक आहे ?

**(उत्तर)** (१) ज्याप्रमाणे विवाहानंतर मुलगी आपल्या बापाचे घर सोडून पतीच्या घरी जाऊन राहाते व तिचा पित्याशी फारसा संबंध राहत नाही आणि विधवा स्त्री त्याच विवाहित पतीच्या घरी जाऊन राहते.

(२) त्या पुनर्विवाहात स्त्रीची मुले पुनर्विवाहित पतीच्या मालमत्तेचे हक्कदार होतात आणि विधवा स्त्रीची मुले विर्यदान करणाऱ्याची मुले म्हटली जात नाहीत त्यांचे गोत्रही असत नाही आणि त्याचे स्वामित्व त्या मुलावर रहात नाही परंतु ते मृत पतीचे पुत्र म्हटले जातात ह्याचेच गोत्र राहते व त्याच्याच संपत्तीचे हक्कदार होऊन त्याच्याच घरात ते राहतात.

(३) विवाहित स्त्रीपुरुषांनी एकमेकांची सेवा व पालनपोषण करणे आवश्यक असते. नियोगातील स्त्रीपुरुषांचा परस्परांशी काही संबंध नसतो.

(४) विवाहित स्त्रीपुरुषांचा संबंध मरणापर्यंत कायम राहतो; तर नियुक्त स्त्रीपुरुषांचा संबंध संतानोत्पत्तीनंतर सुटून जातो.

(५) विवाहित स्त्रीपुरुष परस्परांच्या सहकार्याने घरची कामे करण्याचा प्रयत्न करतात. पण नियुक्त स्त्रीपुरुष आपापल्या घराची कामे करीत असतात.

**(प्रश्न)** विवाह आणि नियोग यांचे नियम सारखेच आहेत की वेगवेगळे ?

**(उत्तर)** काही थोडा फरक आहे. काहींचा उल्लेख पूर्वी केला आहे आणि हा आहे की विवाहित स्त्रीपुरुषांनी, एक पती व एकच पत्नी यांनी मिळून दहा संतानांना जन्म देवू शकतात. तर नियुक्त स्त्रीने अथवा पुरुषाने दोन किंवा चार याहून अधिक संतानोत्पत्ति करू शकत नाही. अर्थात ज्याप्रमाणे कुमार व कुमारी यांचाच विवाह होतो, त्याप्रमाणे ज्याची पत्नी अथवा जिचा पती निधन पावतो अशांचाच नियोग होतो. कुमार व कुमारी यांचा नियोग होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे विवाहित स्त्रीपुरुष सदैव जोडप्यात राहतात तसा नियुक्त स्त्रीपुरुषांचा व्यवहार नाही. किंबहुना ऋतुदानाच्या वेळेखेरीज त्यांनी एकत्र येऊ नये. जेव्हा स्त्री स्वत:साठी नियोग करते तेव्हा दुसरा गर्भ राहिल्यानंतर त्या दिवसापासून तिने नियुक्त पुरुषाशी संबंध सोडलेला असतो. त्याचप्रमाणे पुरुष स्वत:साठी नियोग करीत असेल तर ज्या दिवशी दुसरा गर्भ राहील त्या दिवसापासून संबंध विच्छेद होईल. स्त्रीने दोन-तीन वर्षापर्यंत मुलांचे पालनपोषण करून ती नियुक्त पुरुषाच्या स्वाधीन करावीत. अशा प्रकारे एक विधवा स्त्री स्वत:साठी दोन आणि नियुक्त पुरुषासाठी दोन अशा एकूण चार संताने करू शकते. याचप्रमाणे एक विधुर पुरुष स्वत:साठी दोन आणि चार विधवांसाठी आठ अशा एकूण दहा मुलांना जन्म देऊ शकतो. अशा प्रकारे नियुक्त स्त्रीपुरुषांना प्रत्येकी दहा मुलांना जन्म देण्याची परवानगी वेदांमध्ये आहे. उदाहरणार्थ,

**इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु।**
**दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि ॥** ऋ. १०।मं. १० सू. ८५।मं. ४५

हे (मीढ्व इन्द्र) वीर्य सेचन करण्यास समर्थ ऐश्वर्यसंपन्न पुरुषा ! तू या विवाहित स्त्रीला अथवा विधवा स्त्रियांना श्रेष्ठ पुत्र देऊन सौभाग्यशाली बनव. तू या विवाहित स्त्रीच्या ठिकाणी दहा पुत्र उत्पन्न कर आणि आपली पत्नी हा अकरावा पुत्र आहे असे समज. हे स्त्री ! तू ही विवाहित पुरुषाकडून (पतीकडून) किंवा नियुक्त पुरुषांकडून दहा संतान उत्पन्न कर आणि पती हा अकरावा पुत्र आहे असे समज. वेदाच्या या आज्ञेप्रमाणे ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य वर्णातील स्त्रीपुरुषांनी प्रत्येकी दहा मुलांहून अधिक उत्पन्न करू नयेत. कारण जास्त संतती झाल्याने ती निर्बल, निर्बुद्ध व अल्पायुषी होते; आणि स्त्री-पुरुषही दुर्बळ अल्पायुषी व रोगी होऊन म्हातारपणी खूप दु:ख भोगतात.

**(प्रश्न)** हा नियोगाचा प्रकार व्यभिचारासारखाच दिसतो.

**(उत्तर)** ज्याप्रमाणे अविवाहिताचा व्यभिचार होतो. त्याप्रमाणे अनियुक्तांच्या समागमाला व्यभिचार म्हटला जातो. यावरून असे सिद्ध होते की नियमाने विधिवत विवाह झाल्यावर व्यभिचार म्हणत नाहीत तसा नियोग हा नियमपूर्वक नियोग असल्यामुळे त्यालाही व्यभिचार म्हणता येत नाही. ज्याप्रमाणे दुसऱ्याची कन्या व दुसऱ्याचा मुलगा यांचा शास्त्रोक्त विधिपूर्वक विवाह झाल्यानंतर होणाऱ्या त्यांच्या समागमामध्ये व्यभिचार, पाप अथवा लज्जा नसते त्याप्रमाणे वेदशास्त्रोक्त नियोगामध्ये व्यभिचार, पाप अथवा लज्जा मानावयास नको.

**(प्रश्न)** आहे तर ठीक. परंतु सारे वेश्यागमनासारखे कर्म दिसते.

**(उत्तर)** तसे नाही. कारण वेश्येच्या समागमनात कोणी निश्चित पुरुष किंवा कोणताही नियम नाही परंतु

नियोगात विवाहासारखे नियम आहेत. ज्या प्रमाणे आपली मुलगी विधिपूर्वक विवाहाद्वारे दुसऱ्याला देण्यात अथवा विवाहित स्त्रीपुरुषांनी एकमेकांशी समागम करण्यात लाज वाटण्यासारखे काही नसते तसेच नियोगाच्या बाबतीतही काही लज्जास्पद आहे असे समजू नये. अर्थात जे स्त्रीपुरुष व्यभिचारी असतात ते लग्नानंतरही व्यभिचारापासून अलिप्त राहतात काय?

**(प्रश्न)** आम्हाला तर नियोगात पापच आढळून येते.

**(उत्तर)** जर नियोगात तुम्ही पाप मानत असाल तर मग लग्नातही पाप का मानत नाही ? खरे तर नियोगाला अडथळा करण्यातच पाप आहे. कारण ईश्वराच्या सृष्टिक्रमानुसार स्त्रीपुरुषांचा स्वाभाविक व्यवहार थांबू शकत नाही. शिवाय वैराग्यवान व पूर्णविद्वान योगी याला अपवाद असतात. गर्भपातरूप, भ्रूणहत्या आणि विधवा स्त्रिया व विधुर पुरुष यांच्याकडून होणारी अनेक संतापजनक कुकर्मे हीच खरी पापे नव्हेत काय ? जोपर्यंत स्त्रीपुरुष तरुण असतात तोपर्यंत त्यांच्या मनात प्रजोत्पादनाची इच्छा व विषयवासना असणे स्वाभाविक असते. त्यांच्या त्या इच्छेच्या मार्गात राजव्यवहार अथवा लोकव्यवहार यांच्यामुळे अडथळा निर्माण झाल्यास त्यांच्याकडून गुप्तपणे दुष्कृत्ये वाईट मार्गाने होऊ लागतात.

अशा प्रकारे चालणारा व्यभिचार व कुकर्मे थांबविण्याचा एकमेव श्रेष्ठ उपाय हा आहे की जे जितेंद्रिय राहू शकत असतील त्यांनी विवाह अथवा नियोगही करू नये. तर ठीक आहे परंतु ज्यांना असे राहता येणे शक्य नसेल त्यांनी योग्य वेळी विवाह व आपत्काळी नियोग अवश्य करावा. तसे झाल्यास व्यभिचाराचे प्रमाण खूप कमी होईल आणि प्रेमातून उत्तम प्रजा निर्माण होऊन माणसांची वृद्धी संभव होईल. गर्भपात पूर्णपणे बंद होतील. नीच पुरुषांशी उत्तम स्त्रीचा संबंध वेश्यादी नीच स्त्रियांशी उत्तम पुरुषांची व्यभिचाररूपी कुकर्मे कमी होतील. उत्तम कुळे कलंकित होणे, वंशांचा उच्छेद, स्त्रीपुरुषांना होणारे मानसिक क्लेश व भ्रूण हत्यादी कुकर्मे वगैरे गोष्टींना विवाह व नियोग यांनी आळा बसतो. म्हणून नियोग केला पाहिजे.

**(प्रश्न)** नियोगामध्ये कोणकोणत्या गोष्टी असल्या पाहिजेत ?

**(उत्तर)** विवाह जसा प्रसिद्धिपूर्वक होतो तसा नियोगही उघडपणे झाला पाहिजे. ज्याप्रमाणे विवाहामध्ये सभ्य पुरुषांची अनुमती आणि वधू-वरांची प्रसन्नता असते तशीच ती नियोगामध्येही असली पाहिजे. याचा अर्थ असा की जेव्हा स्त्रीपुरुषांचा नियोग व्हावयाचा असेल तेव्हा त्यांनी आपापल्या कुटुंबातील स्त्रीपुरुषांसमोर असे सांगावे की, 'आम्ही दोघे संतानोत्पत्तीसाठी नियोग करीत आहोत. जेव्हा नियोगाचा नियम पूर्ण होईल त्यानंतर आम्ही एकमेकांशी समागम करणार नाही. याविरुद्ध आम्ही वागलो तर पापी आणि समाज व शासन यांच्याकडून दंडनीय ठरू. महिन्यातून एकदा आम्ही गर्भाधानाचे कार्य करू आणि गर्भ राहिल्यानंतर एक वर्षभर एकमेकांपासून दूर राहू.'

**(प्रश्न)** नियोग आपल्या वर्णातच व्हावा की अन्य वर्णाशीही व्हावा ?

**(उत्तर)** आपल्या वर्णातील अथवा आपल्यापेक्षा उत्तम वर्णातील पुरुषाबरोबर नियोग करावा. वैश्य स्त्रीने वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण पुरुषांशी; क्षत्रिय स्त्रीने क्षत्रिय व ब्राह्मण पुरुषाशी आणि ब्राह्मण स्त्रीने ब्राह्मण पुरुषाशी नियोग करावा. याचे तात्पर्य असे आहे की वीर्य हे समान किंवा उत्तम वर्णाचे असले पाहिजे;

आपल्याहून खालच्या वर्णातील नाही. धर्माने म्हणजे वेदोक्त पद्धतीने विवाह अथवा नियोग यांच्या द्वारे संतानोत्पत्ती करणे हेच स्त्री व पुरुष यांच्या सृष्टीचे प्रयोजन आहे.

**(प्रश्न)** पुरुषाला नियोग करण्याची काय गरज आहे ? तो तर दुसरे लग्न करू शकतो.

**(उत्तर)** आम्ही पूर्वी सांगितलेच आहे की वेदादी शास्त्रांमध्ये द्विज स्त्री आणि पुरुष यांनी एकदाच लग्न करावे. दुसरे लग्न करू नये. कुमार आणि कुमारी यांचा विवाह होणे हा न्याय होय. विधवा स्त्रीचा कुमाराशी आणि विधुराचा कुमारीशी विवाह होणे हा अन्याय, अधर्म आहे. ज्याप्रमाणे पुरुष विधवा स्त्रीशी विवाह करू इच्छित नाही त्याचप्रमाणे विवाहित स्त्रीशी समागम केलेल्या पुरुषाशी आपले लग्न व्हावे अशी इच्छा कोणतीही कुमारी बाळगणार नाही. अशा प्रकारे विवाहित (विधुर) पुरुषाशी कोणतीही कुमारी आणि विधवेशी कोणताही कुमार विवाह करणार नाही. तेव्हा पुरुष व स्त्री यांना नियोग करण्याची गरज भासेल. हाच धर्म आहे की जसा पुरुष तशी स्त्री यांचा संबंध झाला पाहिजे.

**(प्रश्न)** वेदादी शास्त्रांमध्ये विवाहासंबंधी जशी प्रमाणे आहेत तशी प्रमाणे नियोगासंबंधीही आहेत किंवा नाही ?

**(उत्तर)** या बाबतीत अनेक प्रमाणे आहेत, पाहा आणि ऐका :

**कुहं स्विद्दोषा कुह वस्तोरश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः ।**
**को वां शयुत्रा विधवेव देवरं मर्य्यं न योषा कृणुते सधस्थ आ ॥१॥**

ऋ. मं. १०। सू. ४०। मं. २

हे (अश्विना) स्त्री पुरुषांनो ! ज्या प्रमाणे (देवरं विधवेव) विधवा स्त्री दिराशी म्हणजे नियुक्त पुरुषाशी (योषा यर्मन्न) विवाहित स्त्री आपल्या पतीशी (सधस्थे) समान स्थानी व शय्येवर एकत्र होऊन सर्व प्रकारे संतानोत्पत्ती (आकृणुते) करते, त्याप्रमाणे तुम्ही उभयता स्त्री पुरुषांनीही करावे. (कुहस्वित् दोषा) तुम्ही रात्री कोठे होता आणि (कुह वस्तः) दिवसा कोठे होता ? (कुहभिपित्वम्) पदार्थांची प्राप्ती कोठे (करतः) केली ? आणि (कुहोषतुः) कोणत्या वेळी कोठे राहत होता ? (को वां शयुत्रा) तुमचे शयनस्थान कोठे आहे ? तुम्ही कोणत्या देशाचे रहिवासी आहात ? ॥१॥

यावरून हे सिद्ध झाले की स्त्री पुरुषांनी देशात व परदेशात एकमेकांबरोबर राहावे त्याचप्रमाणे विधवा स्त्रीनेही विवाहित पती प्रमाणे नियुक्त पतीचा स्वीकार करून संतानोत्पत्ती करून घ्यावी.

**(प्रश्न)** पण एखाद्या स्त्रीच्या पतीला धाकटा भाऊ दीर नसेल तर विधवेने कोणाशी नियोग करावा ?

**(उत्तर)** देवराशी. परंतु देवर शब्दाचा अर्थ जसा तुम्ही समजता तसा नाही. पाहा, निरुक्तमध्ये (असे सांगितले) आहे.

**देवरः कस्माद् द्वितीयो वर उच्यते ॥** निरु. अ. ३। खं. १५

(द्वितीय वर म्हणजे देवर.) विधवेचा दुसरा पती असतो त्याला देवर असे म्हणतात. मग तो पतीचा धाकटा भाऊ असो की थोरला, आपल्या वर्णाचा असो की आपल्याहून उच्च वर्णाचा ज्याच्याशी नियोग केला जातो त्याचे नाव देवर आहे.

**उदीर्ष्व नार्यभिजीवलोकं गतासुमेतमुप शेष एहि।**
**हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि सं बभूथ॥२॥** ऋ. मं. १०।सू. १८।मं. ८

(नारि) हे विधवे, तू (एतं गतासुम्) या मेलेल्या पतीची आशा सोडून (शेषे) बाकीच्या पुरुषांपैकी (अभि जीवलोकम्) जिवंत असलेल्या दुसऱ्या पतीला (उपैहि) प्राप्त हो आणि (उदीर्ष्व) असा विचार व निश्चय कर की जर (हस्तग्राभस्य दिधिषोः) तुझे पुनः पाणिग्रहण करणाऱ्या नियुक्त पतीसाठी तुझा नियोग झाला असेल तर (इदम्) हे (जनित्वम्) जन्मलेले बालक त्याच नियुक्त (पत्युः) पतीचे होईल आणि जर तू स्वतःसाठी नियोग करणार असशील तर हे मूल (तव) तुझे होईल. हा नियम लक्षात घेऊन (अभि सम् बभूथ) तू निश्चय कर. नियुक्त पुरुषानेही याच नियमाचे पालन करावे.

**अदेवृघ्न्यपतिघ्नीहैधि शिवा पशुभ्यः सुयमा सुवर्चाः।**
**प्रजावती वीरसूर्देवृकामा स्योनेममग्निं गार्हपत्यं सपर्य॥** अथर्व. कां. १४। अनु. २। मं. १८

हे (अपतिघ्नदेवृघ्नि) पतीला व दिराला दुःख न देणाऱ्या स्त्रिये, तू (इह) या गृहस्थाश्रमामध्ये (पशुभ्यः) पशूंचे (शिवा) कल्याण करणारी, (सुयमाः) उत्तम प्रकारे धर्मनियमांचे पालन करणारी, (सुवर्चाः) रूपवती व सर्व शास्त्रे जाणणारी, (प्रजावती) उत्तम पुत्रपौत्रादींनी युक्त, (वीरसूः) शूर पुत्रांना जन्म देणारी (देवृकामा) देवराची (दीराची) इच्छा करणारी व (स्योना) सुख देणारी, पती किंवा देवर यांना (एधि) प्राप्त होऊन (इमम्) या (गार्हपत्यम्) गृहस्थसंबंधी (अग्निम्) अग्निहोत्राचे (सपर्य) आचरण करीत जा.

**तामनेन विधानेन निजो विन्देत देवरः॥** मनु. अ. ९। श्लो. ६९

अक्षतयोनी स्त्री विधवा झाली तर तिच्या पतीच्या धाकटा भाऊसुद्धा तिच्याशी लग्न करू शकतो.

**(प्रश्न)** एका स्त्रीने अथवा पुरुषाने किती नियोग करावेत ? आणि विवाहित नियुक्त पतींची नावे काय असतात ?

**(उत्तर) सोमः प्रथमो विविदे गन्धर्वो विविद उत्तरः।**
**तृतीयो अग्निष्टे पतिस्तुरीयस्ते मनुष्यजाः॥** ऋ. मं. १०। सू. ८५। मं. ४०

हे स्त्रिये, जो (ते) तुला (प्रथमः) पहिला विवाहित (पतिः) पती (विवेद) प्राप्त होतो त्याचे नाव (सोमः). सुकुमारत्व आदी गुणयुक्त असल्याने सोम जो नियोगाने दुसरा पती (विविद) प्राप्त होतो त्याला (गंधर्वः) त्याने पूर्वी स्त्रीशी संभोग केला असल्यामुळे गंधर्व असे म्हणतात. जो (तृतीय उत्तरः) या दोघांनंतर तिसरा पती असतो त्याला (अग्निः) त्याच्या शरीरात फार उष्णता असल्यामुळे अग्नी संज्ञक आणि जे (ते) तुला (तुरीयः) चौथ्यापासून अकराव्या क्रमापर्यंत नियोगाने पती प्राप्त होतात त्यांना (मनुष्यजाः) मनुष्य असे म्हटले जाते. इमां त्व मिन्द्र या मंत्रावरून स्त्रीने अकराव्या पुरुषापर्यंत आणि पुरुषानेही अकराव्या स्त्रीपर्यंत नियोग करण्यास हरकत नाही.

**(प्रश्न)** 'एकादश' या शब्दाचा अर्थ दहा पुत्र व अकरावा पती असा का समजू नये ?

**(उत्तर)** असा अर्थ केल्यास **'विधवेव देवरम्' 'देवरः कस्माद् द्वितीयो वर उच्चते' 'अदेवृघ्नि'** आणि **'गंधर्वो विविद उत्तरः'** इत्यादी वेदप्रमाणांच्या विरुद्ध अर्थ होईल. कारण तसा अर्थ केल्यास दुसरा पतीही प्राप्त होऊ शकत नाही.

## नियोग अपादधर्म

**देवराद्वा सपिण्डाद्वा स्त्रिया सम्यङ् नियुक्तया।**
**प्रजेप्सिताधिगन्तव्या सन्तानस्य परिक्षये ॥१॥**
**ज्येष्ठो यवीयसो भार्य्यां यवीयान्वाग्रजस्त्रियम्।**
**पतितौ भवतो गत्वा नियुक्तावप्यनापदि ॥२॥**
**औरसः क्षेत्रजश्चैव.** ॥ मनु. अ. ९। श्लो. ५९, ५८, १५९

मनु महाराजांनी सांगितले आहे की, सपिड म्हणजे पतीच्या सहा पिढ्यांध्ये येणारा, नवऱ्याचा लहान किंवा मोठा भाऊ किंवा स्वजातीय तथा आपल्यापेक्षा उत्तम जातीचा, अशा पुरुषाशी विधवा स्त्रीचा नियोग झाला पाहिजे. मात्र विधवा अथवा विधुर यांना संतानोत्पत्तीची इच्छा असेल तरच नियोग होणे उचित होय किंवा पूर्वी झालेल्या संतानांचा जेव्हा सर्वथा क्षय झाला असेल तेव्हा नियोग करावा. जेव्हा आपत्काल म्हणजे संतानोत्पत्तीची इच्छा नसता मोठ्या भावाच्या पत्नीशी धाकट्या भावाचा आणि धाकट्या भावाच्या पत्नीशी मोठ्या भावाचा नियोग होऊन मुले झाल्यानंतरही नियुक्त स्त्रीपुरुष पुन: परस्परांशी समागम करतील तेव्हा ते पतित होतील. दुसऱ्या पुत्राचा गर्भ राही पर्यंतच एका नियोगाचा अवधी असतो. त्यानंतर त्यांनी समागम करू नये. जर नियोग दोघांसाठी झालेला असेल तर चौथा गर्भ राहीपर्यंत अर्थात पूर्वोक्त रीतीने नियोगाद्वारे दहा पर्यंत मुले होऊ शकतात. त्यानंतर शरीरसंबंध ठेवल्यास ती विषयासक्ती समजली जाते व त्यामुळे ते दोघे पतित समजले जातात. आणि जर विवाहित स्त्रीपुरुषही दहाव्या गर्भानंतर समागम करीत राहतील तर तेही कामासक्त व निंदनीय समजले जातात. म्हणजे विवाह अथवा नियोग हे केवळ संतानोत्पत्तीसाठीच असतात; पशूंप्रमाणे कामक्रीडा करण्यासाठी नव्हे.

**(प्रश्न)** नियोग हा पतीच्या मृत्यू नंतरच होतो की त्याच्या जिवंतपणीही ?

**(उत्तर)** पती जिवंत असतानाही नियोग होऊ शकतो.

**अन्यमिच्छस्व सुभगे पतिं मत्** ॥ ऋ. मं. १०। सू. १०। मं. १०

जेव्हा पती संतानोत्पत्ती करण्यास असमर्थ होतो तेव्हा त्याने आपल्या पत्नीला 'आज्ञा करावी की,' "हे (सुभगे) सौभाग्याची इच्छा करणाऱ्या स्त्रिये, तू (मत्) माझ्याहून (अन्यम्) दुसऱ्या पतीची (इच्छस्व) इच्छा कर. कारण आता माझ्यापासून संतानोत्पत्तीची आशा नाही." तेव्हा स्त्रीने दुसऱ्या पुरुषाशी नियोग करून संतोनोत्पत्ती करावी. मात्र आपल्या विवाहित पतीच्या सेवेमध्ये तिने सदैव तत्पर राहावे. याच प्रमाणे जेव्हा पत्नीही रोगादी दोषांनी ग्रस्त होऊन संतानोत्पत्ती करण्यास असमर्थ झाली असेल तेव्हा तिने आपल्या पतीला अशी आज्ञा करावी की, 'हे स्वामी! तुम्ही आता माझ्याकडून संतानोत्पत्तीची इच्छा सोडून दुसऱ्या एखाद्या विधवा स्त्रीशी नियोग करून संतानोत्पदन करावी.' ज्याप्रमाणे पांडू राजाच्या कुंती व माद्री या राण्यांनी नियोग केले होते; आणि जसे व्यास महर्षींनी चित्रांगद व विचित्रवीर्य हे निधन पावल्यावर त्या आपल्या भावाच्या बायकांशी नियोग करून अंबिकेला धृतराष्ट्र, अंबालिकेला पांडू व दासीला विदुर यांची उत्पत्ति केली. या इतिहासावरूनही वर सांगितलेले नियोगविषयक विधान प्रमाण आहे.

**प्रोषितो धर्मकार्यार्थं प्रतीक्ष्योऽष्टौ नरः समाः ।**
**विद्यार्थं षड् यशोऽर्थं वा कामार्थं त्रींस्तु वत्सरान् ॥१॥** मनु. अ. ९। श्लो. ७६

पती जर धर्मकार्यासाठी परदेशी गेला असेल तर आठ वर्षे, विद्या व कीर्ती मिळविण्यासाठी गेला असेल तर सहा वर्षे आणि पैसा कमावण्यासाठी गेला असेल तर तीन वर्षे त्याच्या विवाहित पत्नीने प्रतीक्षा करून नंतर नियोग करून विवाहीत स्त्रीने संतानोत्पत्ती करून घ्यावी. विवाहित पती परत आल्यावर नियुक्त पती सुटून जाईल. ॥१॥

**वन्ध्याष्टमेऽधिवेद्याब्दे दशमे तु मृतप्रजाः ।**
**एकादशे स्त्रीजननी सद्यस्त्वप्रियवादिनी ॥२॥** मनु. अ. ९। श्लो. ८१

अशाच प्रकारचा नियम पुरुषासाठीही आहे. पत्नी वंध्या असेल तर आठ वर्षे (लग्ना नंतर आठ वर्षापर्यंत गर्भ राहिला नाही तर) मुले होऊन मरत असतील तर दहा वर्षे, फक्त मुलीच होत असतील, मुलगा होत नसेल तर अकरा वर्षे पर्यंत आणि जर पत्नी अप्रिय भाषण करणारी असेल तर पतीने तिला ताबडतोब सोडून देऊन, दुसऱ्या स्त्रीशी नियोग करून प्रजोत्पादन करून घ्यावे. ॥२॥

याच प्रमाणे पुरुष जर अत्यंत दुःखदायक असेल तर त्याच्या पत्नीस योग्य आहे की तिने त्याला सोडून दुसऱ्या पुरुषाशी नियोग करून संतानोत्पत्ती करून व आपल्या विवाहित पतीच्या संपत्तीला वारसदार निर्माण करावेत. ही सर्व प्रमाणे व युक्त्यानुसार स्वयंवर विवाह व नियोग यांद्वारे आपापल्या कुळाची उन्नती करावी जसे विवाहित पतीपासून होणारा 'औरस' मुलगा आपल्या बापाच्या मालमत्तेचा मालक बनतो तसेच नियोगातून जन्मास आलेल्या मुलाला 'क्षेत्रज' असे म्हणतात. ही क्षेत्रज मुलेही औरस मुलांप्रमाणे मृत पित्याची वारसदार बनतात.

आता या संदर्भात स्त्री व पुरुष यांनी हे लक्षात ठेवावे की आपल्या शरीरातील वीर्य व रज यांना अमूल्य समजावे. जे कोणी या अमूल्य वस्तूंचा परस्त्री, वेश्या अथवा दुष्ट पुरुष यांच्या संगाने अपव्यय करतात ते महामूर्ख होत. सामान्य शेतकरी अथवा माळी अडाणी असला तरी आपल्या शेताखेरीज, बागेखेरीज इतरत्र बी पेरत नाही. सामान्य बीज व अडाणी माणूस यांची अशी स्थिती असताना जो कोणी सर्वोत्तम मनुष्य शरीररूपी वृक्षाचे बीज वाईट क्षेत्रात टाकून वाया घालवितो त्याला महामूर्ख म्हणतात. कारण त्याचे फळ त्याला मिळत नाही आणि

**'आत्मा वै जायते पुत्रः'** हे ब्राह्मण ग्रंथाचे वचन आहे.

**अङ्गादङ्गात्सम्भवसि हृदयादधि जायसे ।**
**आत्मासि पुत्र मा मृथाः स जीव शरदः शतम् ॥१॥** सामवेद ब्राह्मण

हे सामवेदातील वचन आहे. हे पुत्रा! तू माझ्या अंगाअंगातून निर्माण होणाऱ्या वीर्यापासून व हृदयापासून उत्पन्न होतोस. म्हणून तू माझा आत्मा आहेस. तू माझ्या आधी मरू नकोस किंतु तू शंभर वर्षे जग. ज्या वीर्यापासून महात्मे व थोर पुरुष यांची शरीरे उत्पन्न होतात ते वीर्य वेश्यादी दुष्ट क्षेत्रात पेरणे अथवा वाईट बीज चांगल्या क्षेत्रात पेरणे हे महापापाचे काम आहे.

# विवाह

**(प्रश्न)** विवाह का करायचा ? विवाह केल्याने स्त्री पुरुष बंधनात गुंतून त्यायोगे त्यांना फार संकोच होतो व दुःख भोगावे लागते. म्हणून ज्यांची त्याचेवर प्रीती असेल त्यांनी तोपर्यंत मिळून आणि प्रीती संपली की सोडून द्यावे.

**(उत्तर)** असे करणे हे पशुपक्ष्यांचे वर्तन होय, माणसांचे नव्हे. मानवजातीत विवाहाचे बंधन नसेल तर गृहस्थाश्रमातील सर्व उत्तम व्यवहार नष्ट भ्रष्ट होऊन जातील. कोणी कोणाची सेवा करणार नाही आणि महाव्यभिचार माजून सर्व माणसे रोगट, दुर्बळ व अल्पायुषी बनून त्यांचा कुळनाश होईल. कोणी कोणाच्या वस्तूंचा मालक अथवा वारस होऊ शकणार नाही आणि कोणाचा कोणत्याही वस्तूवर दीर्घकाळपर्यंत मालकी हक्क राहणार नाही अशा प्रकारच्या दोषाच्या निवारणार्थ विवाहाच होणे सर्वथा योग्य आहे.

**(प्रश्न)** जेव्हा एकच विवाह होईल एका पुरुषाला एक स्त्री व एका स्त्रीला एक पुरुष मिळेल. अशा स्थितीत स्त्री गरोदर असेल, कायमची आजारी असेल, अथवा पुरुष दीर्घकाळ रोगग्रस्त असेल, आणि दोघेही तरुण असतील आणि त्यांच्याने राहवले नाही तर मग त्यांनी काय करावे ?

**(उत्तर)** याचे उत्तर नियोगविषयक विवेचनात आले आहे. स्त्री गरोदर असताना एक वर्षभर तिच्याशी समागम न करण्याने त्या काळात पुरुष अथवा स्त्री यांच्याने राहवले नाही तर कुणाशी तरी नियोग करून त्याच्यासाठी पुत्रोत्पत्ती करावी. परंतु वेश्यागमन अथवा व्यभिचार मुळीच करू नये.

माणसाने शक्य तोवर अप्राप्त वस्तूची इच्छा बाळगावी प्राप्त वस्तूंचे रक्षण करावे आणि रक्षण केलेल्या वस्तूंमध्ये वाढ करावी. तसेच वाढलेल्या धनाचा उपयोग देशाच्या उपकारासाठी करावा. आपापल्या वर्णाश्रमाचे सर्व व्यवहार पूर्वी सांगितल्याप्रमाणे अत्यंत उत्साहाने, प्रयत्नपूर्वक तन-मन-धनाने सदैव करून परमार्थ केला पाहिजे. आपले आई-बाप व सासू-सासरे यांची मनापासून सेवाशुश्रूषा करावी. मित्र, शेजारी-पाजारी, राजा, विद्वान वैद्य व सत्पुरुष यांच्यावर प्रेम करावे आणि जे दुष्ट व अधर्मी आहेत यांची उपेक्षा करावी. परंतु त्यांचा द्वेष न करता त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करावा. शक्य असेल त्याप्रमाणे प्रेमाने आपल्या मुलांना विद्वान व सुशिक्षित करण्या करविण्यात आणि संपत्ती खर्च करून त्यांना पूर्ण विद्वान सुशिक्षित करावे तसेच धर्मयुक्त आचरणाने मोक्षाचेही साधन करावे. त्यामुळे परमानंदाचा उपभोग घेता येईल. खाली दिलेल्या श्लोकांना प्रमाण मानू नयेत हे पाराशरीचे कपोलकल्पित श्लोक आहेत.

**पतितोऽपि द्विजः श्रेष्ठो न च शूद्रो जितेन्द्रियः ।**
**निर्दुग्धा चापि गौः पूज्या न च दुग्धवती खरी ॥१॥**

दुष्ट कर्म करणारा, द्विजाला श्रेष्ठ व श्रेष्ठ कर्म करणाऱ्या शुद्राला नीच मानावे यापेक्षा मोठा पक्षपात, अन्याय, अधर्म दुसरा कोणता असेल ? जसी दूध देणारी व न देणारी गाय गोपालांना पालनीय होते तसे कुंभाराला गाढवी पालनीय होत नाही काय ? आणि हा दृष्टान्त सुद्धा विषम आहे कारण द्विज व शुद्र मनुष्य जाती एकच आहे त्यात गाय व गाढवी यांसारखी भिन्न जाति नाही कदाचित पशुजातीबद्दल दृष्टान्ताचा एकदेशी उदाहरण जरी मिळत असले तरी या दृष्टान्ताचा आशय अयोग्य असल्यामुळे असले श्लोक विद्वानांना कधीच मान्य होऊ शकत नाही. ॥१॥

**अश्वालम्भं गवालम्भं संन्यासं पलपैत्रिकम्।**
**देवराच्च सुतोत्पत्तिं कलौ पञ्च विवर्जयेत् ॥२॥**

अश्वालंभ म्हणजे घोड्याला ठार मारून त्याचा होम करणे आणि गवालंभ म्हणजे गाईल मारून तिच्या मांसाचा होम करणे ही कर्मे वेदविहित नाहीत तर त्यांचा कलियुगापुरताच निषेध करणेही वेदविरुद्धच समजावे. जर कलियुगामध्ये ही नीच कर्मे निषिद्ध असतील तर कृतत्रेतादी युगांमध्ये ती कशी योग्य ठरतील ? श्रेष्ठ युगामध्ये असली दुष्कृत्ये होणे सर्वथा असंभव आहे. वेदादिशास्त्रामध्ये संन्यासाचा विधी सांगितलेला आहे. म्हणून त्याचा निषेध करणे निरर्थक आहे. मांस निषिद्ध असेल तर ते सर्वकाळी निषिद्धच आहे. दिरापासून पुत्रोत्पत्ती करून घ्यावी असे वेदांत लिहिले आहे. तर मग हा श्लोकर्ता त्याविरुद्ध का बरळतो ? ॥२॥

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ।**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥३॥**

(नष्टे) पती परदेशी गेला असता घरी स्त्रीने नियोग करून घ्यावा आणि त्याच वेळी विवाहित पती परत आला तर ती स्त्री कोणाची समजावी ? कोणी म्हणेल की ती विवाहित पतीची समजावी. आम्ही ते मानले. परंतु तशी व्यवस्था पाराशरीमध्ये दिलेली नाही, काय पाचच आपत्काल स्त्रीच्या बाबतीत आहेत काय ? रोग ग्रस्त होणे व लढाईत मारले जाणे इत्यादी आपत्काल पाचाहून अधिक आहेत. म्हणून असल्या श्लोकांवर मुळीच विश्वास ठेवू नये. ॥३॥

**(प्रश्न)** काय हो ! तुम्ही पराशर मुनीचे वचनही मानीत नाही काय ?

**(उत्तर)** कोणाचेही वचन असो, ते वेदविरुद्ध असल्याने आम्ही मानीत नाही आणि हे तर पराशरांचे वचनही नाही. काही लबाड लोक 'ब्रह्मोवाच, वसिष्ठ उवाच, राम उवाच, शिव उवाच, विष्णुरुवाच, देव्युवाच' इत्यादी श्रेष्ठांचे नाव घालून यासाठी ग्रंथरचना करतात की ही नावे सर्वमान्य असल्यामुळे जगभर त्या ग्रंथांना मान्यता प्राप्त व्हावी आणि आपली उपजीविका उत्तम प्रकारे चालावी म्हणून हे अनर्थकारक गाथग्रंथ रचतात. मनुस्मृतीमधील काही प्रक्षिप्त श्लोक वगळल्यास बाकीचा ग्रंथ वेदानुकूल आहे. इतर स्मृती तशा नाहीत याचप्रमाणे इतर (नकली) ग्रंथांच्या बाबतीतही असेच समजावे.

## गृहाश्रमाची श्रेष्ठता

**(प्रश्न)** गृहस्थाश्रम हा सर्वात लहान आहे की मोठा आहे ?

**(उत्तर)** आपापल्या कर्तव्यकर्माच्या बाबतीत सर्व आश्रम श्रेष्ठच आहेत. परंतु

**यथा नदीनदाः सर्वे सागरे यान्ति संस्थितिम्।**
**तथैवाश्रमिणः सर्वे गृहस्थे यान्ति संस्थितिम् ॥१॥** मनु. अ. ६। श्लो. ९०

ज्याप्रमाणे नद्या आणि मोठेमोठे नद समुद्राची भेट होईपर्यंत भ्रमण करीत राहतात जोपर्यंत समुद्राला मिळत नाहीत त्याप्रमाणे गृहस्थाच्या आश्रयानेच इतर सर्व आश्रम स्थिर राहतात. ॥१॥

**यथा वायुं समाश्रित्य वर्त्तन्ते सर्वजन्तवः।**
**तथा गृहस्थमाश्रित्य वर्त्तन्ते सर्व आश्रमाः ॥२॥** मनु. अ. ३। श्लो. ७७

गृहस्थाश्रमाच्या आधाराशिवाय कोणत्याही आश्रमाचा व्यवहार सिद्ध होत नाही. ॥२॥

**यस्मात्त्रयोऽप्याश्रमिणो दानेनान्नेन चान्वहम्।**
**गृहस्थेनैव धार्य्यन्ते तस्माज्ज्येष्ठाश्रमो गृही ॥३॥** मनु. अ. ३। श्लो. ७८

ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्यासी या तीन्ही आश्रमांतील व्यक्तींना गृहस्थच दान व अन्न वगैरे देऊन नियमीत गृहस्थ धर्मच धारण करतो. म्हणून गृहस्थाश्रम हा सर्वांत ज्येष्ठ आश्रम समजला जातो आणि सर्व व्यवहारांमध्ये गृहस्थ हा धुरंधर आहे असे म्हटले जाते. यासाठी मोक्षाची व संसारसुखाची इच्छा बाळगणाऱ्याने प्रयत्नपूर्वक गृहस्थाश्रमाचे पालन करावे. ॥३॥

**स संधार्य्यः प्रयत्नेन स्वर्गमक्षयमिच्छता।**
**सुखं चेहेच्छता नित्यं योऽधार्यो दुर्बलेन्द्रियैः ॥४॥** मनु. अ. ३। श्लो. ७९

हा गृहस्थाश्रम दुबळ्या इंद्रियाच्या म्हणजे भित्र्या व दुर्बळ पुरुषांना धारण करण्यास अयोग्य आहे म्हणून त्याचे धारण चांगल्याप्रकारे करावे. ॥४॥

अशा प्रकारे जगामध्ये जो काही व्यवहार आहे त्याचा आधार गृहस्थाश्रम आहे जर गृहस्थाश्रम नसता तर संतानोत्पत्ती न होऊन ब्रह्मचर्य वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम कोठून होणे शक्य असते ? जो कोणी गृहस्थाश्रमाची निंदा करतो तोच निंदनीय आहे आणि जो प्रशंसा करतो तोच प्रशंसनीय आहे, जेव्हा स्त्री व पुरुष दोघेही एकमेकांवर प्रसन्न, विद्वान, पुरुषार्थी व सर्व प्रकारच्या व्यवहारांचे जाणकार असतात तेव्हाच गृहस्थाश्रमात सुख मिळते म्हणून पूर्वी सांगितल्याप्रमाणे गृहस्थाश्रमातील सुखाचे मुख्य कारण ब्रह्मचर्य व पूर्वोक्त स्वयंवर विवाह हे आहे.

या प्रमाणे संक्षेपाने समावर्तन, विवाह व गृहस्थाश्रम यांविषयी आम्ही उपदेश लिहिला आहे. या नंतरच्या प्रकरणात वानप्रस्थ व संन्यास या विषयांसंबंधी लिहिला जाईल.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते समावर्तनविवाहगृहाश्रमविषये**
**चतुर्थः समुल्लासः सम्पूर्णः ॥४॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






## पाचवा समुल्लास

# वानप्रस्थ-संन्यास

**ब्रह्मचर्य्याश्रमं समाप्य गृही भवेत्,**

**गृही भूत्वा वनी भवेत्, वनी भूत्वा प्रव्रजेत् ॥** शत कां. १४

मनुष्यांना योग्य आहे की त्यांनी ब्रह्मचर्याश्रम समाप्त केल्यावर गृहस्थाश्रमात प्रवेश करावा. तो संपल्यावर वानप्रस्थाश्रम स्वीकारावा व नंतर संन्यास घ्यावा, हे क्रमानुसार आश्रमाचे विधान आहे.

**एवं गृहाश्रमे स्थित्वा विधिवत्स्नातको द्विजः ।**

**वने वसेत्तु नियतो यथावद्विजितेन्द्रियः ॥१॥** मनु. अ. ६। श्लो. १

अशा प्रकारे स्नातक अर्थात ब्रह्मचर्य पूर्वक गृहाश्रम करता द्विज म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजांनी गृहस्थाश्रमात प्रवेश करावा. गृहस्थाश्रमात राहून त्यांनी निश्चितात्मा व यथावत जितेंद्रिय बनून आणि वानप्रस्थाश्रमासाठी वनात जाऊन राहावे. ॥१॥

**गृहस्थस्तु यदा पश्चेद्वलीपलितमात्मनः ।**

**अपत्यस्यैव चापत्यं तदारण्यं समाश्रयेत् ॥२॥** मनु. अ. ६। श्लो. २

जेव्हा गृहस्थाच्या डोकीवरील केस पांढरे होतात, अंगावरील चामडी ढिली झाल्याने सुरकुत्या पडतात आणि मुलाला जेव्हा मुलगाही झाला तेव्हा त्याने वनात निवास करावा. ॥२॥

**संत्यज्य ग्राम्यमाहारं सर्वं चैव परिच्छेदम् ।**

**पुत्रेषु भार्यां निःक्षिप्य वनं गच्छेत्सहैव वा ॥३॥** मनु. अ. ६। श्लो. ३

गावातील सर्व आहार व कपडेलत्ते वगैरे सर्व उत्तमोत्तम वस्तू सोडून देऊन आपल्य पत्नीला मुलांजवळ ठेवून अथवा आपल्या बरोबर घेऊन त्याने वनात जाऊन राहावे. ॥३॥

**अग्निहोत्रं समादाय गृह्यं चाग्निपरिच्छदम् ।**

**ग्रामादरण्यं निःसृत्य निवसेन्नियतेन्द्रियः ॥४॥** मनु. अ. ६। श्लो. ४

आपल्या गावातून निघताना त्याने सांगोपांग अग्निहोत्र बरोबर घ्यावे व दृढ जितेंद्रिय बनून अरण्यात जाऊन राहावे. ॥४॥

**मुन्यन्नैर्विविधैर्मेध्यैः शाकमूलफलेन वा।**

**एतानेव महायज्ञान्निर्वपेद्विधिपूर्वकम् ॥५॥** मनु. अ. ६। श्लो. ५

नानाप्रकारचे साहित्यादि अन्न, सुंदर भाज्या, कंदमुळे, फळे, फुले वगैरे अन्नाद्वारे त्याने पंचमहायज्ञ करावेत आणि त्याच अन्नाने अतिथीची सेवा करून त्यानेच आपला निर्वाह करावा. ॥५॥

**स्वाध्याये नित्ययुक्तः स्याद्दान्तो मैत्रः समाहितः।**

**दाता नित्यमनादाता सर्वभूतानुकम्पकः ॥१॥** मनु. अ. ६। श्लो. ८

स्वाध्यायामध्ये म्हणजे अध्ययन-अध्यापनात सदैव गढून गेलेला, जितात्मा, सर्वांचा मित्र, इंद्रियांचे नित्य दमन करणारा, विद्यादान करणारा, सर्वांवर दया करणारा, कोणाकडून काहीही पदार्थ न घेणारा, असा वानप्रस्थाश्रमी सर्वकाळ राहावे. ॥१॥

**अप्रयत्नः सुखार्थेषु ब्रह्मचारी धराशयः।**

**शरणेष्वममश्चैव वृक्षमूलनिकेतनः ॥२॥** मनु. अ. ६। श्लो. २६

शरीरसुखासाठी फार धडपड करू नये परंतु ब्रह्मचारी अर्थात पत्नी बरोबर असली तरी तिच्याशी वैषयिक व्यवहार करू नये. जमिनीवर झोपावे. आपल्या आश्रित व स्वकीय गोष्टींवर ममता करू नये. वृक्षाखाली राहावे. ॥२॥

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्षचर्य्यां चरन्तः।**

**सूर्य्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्राऽमृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥१॥**

मुण्डक. खं. २। मं. ११

जे शांत व विद्वान लोक वनामध्ये राहून तप व धर्मानुष्ठान करतात, सत्यावर श्रद्धा ठेवून भिक्षावृत्तीचा अवलंब करून वनात राहतील आणि जेथे अविनाशी पूर्ण पुरुष, लाभहानिरहित परमेश्वराचा वास आहे तेथे निर्मळ बनून प्राणाच्या द्वाराने त्या परमेश्वराला प्राप्त करून घेऊन आनंदित होतात. ॥१॥

**अभ्यादधामि समिधमग्ने व्रतपते त्वयि।**

**व्रतञ्च श्रद्धां चोपैमीन्धे त्वा दीक्षितो अहम् ॥१॥** यजुर्वेद अ. २०। मं. २४

वानप्रस्थाश्रमी व्यक्तीला उचित आहे 'मी अग्नीमध्ये होम करून, दीक्षित व्रती होऊन, सत्याचरण व श्रद्धा यांना प्राप्त करून घेईन' अशी इच्छा मनात बाळगून नाना प्रकारची तपश्चर्या, सत्संग, योगाभ्यास, सुविचाराने ज्ञान व पावित्र्य मिळवावे. त्यानंतर जेव्हा संन्यास घेण्याची इच्छा होईल तेव्हा पत्नीला अपत्याकडे पाठवून द्यावे आणि स्वत: संन्यास घ्यावा. हा संक्षिप्त वानप्रस्थ विधी आहे.

## संन्यास विधि

**वनेषु च विहृत्यैवं तृतीयं भागमायुषः।**

**चतुर्थमायुषो भागं त्यक्त्वा सङ्गान् परिव्रजेत् ॥** मनु. अ. ६। श्लो. ३३

अशा प्रकारे वनांमध्ये आयुष्याचा तिसरा भाग, म्हणजे वयाच्या पन्नासाव्या वर्षापासून पंचाहत्तराव्या

वर्षापर्यंत, वानप्रस्थाश्रमात घालवून आयुष्याच्या चौथ्या भागात सर्वसंगपरित्याग करून परिव्राट म्हणजे संन्यासी व्हावे.

**(प्रश्न)** गृहस्थाश्रम व वानप्रस्थाश्रम यांचा स्वीकार न करता ब्रह्मचर्याश्रमातून एकदम संन्यासाश्रमात प्रवेश केला तर पाप होते किंवा नाही ?

**(उत्तर)** होते व होत ही नाही.

**(प्रश्न)** असे दुटप्पी उत्तर कसे देता ?

**(उत्तर)** यात दुटप्पीपणा नाही. कारण, जर कोणी बाल्यावस्थेत विरक्त होऊन पुढे विषयवासनेत फसले तर ते महापापी; आणि जर कोणी तसे गुंतले नाहीत तर ते महापुण्यात्मा सत्पुरुष आहेत.

**यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेद्वनाद्वा गृहाद्वा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत ।।**

जाबालोपनिषद खंड ।।४।।

हे ब्राह्मण ग्रंथातील वचन आहे. "ज्या दिवशी वैराग्य प्राप्त होईल त्याच दिवशी घराचा अथवा वनाचा त्याग करून संन्यास घ्यावा." प्रथम संन्यासाचा पक्षक्रम या वचनात सांगितला आहे आणि त्यात विकल्प अथवा पर्याय आहे की वानप्रस्थाश्रमात प्रवेश न करता गृहस्थाश्रमातूनच सरळ संन्यास घ्यावा. तिसरा पक्ष असा की जो पूर्ण विद्वान, जितेंद्रिय, विषयवासनांनी रहित परोपकार करण्याची इच्छा बाळगणारा असेल त्याने ब्रह्मचर्याश्रमातूनच संन्यास घ्यावा आणि वेदांमध्येही **'यतयः ब्राह्मणस्य विजानतः'** इत्यादी मंत्राशयातून संन्यासाचे वर्णन आलेले आहे. परंतु,

**नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः ।**
**नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ।।** कठ. वल्ली २। मं. २४

जो दुराचारापासून अलिप्त नाही, ज्याच्या मनाला शांती नाही, ज्याचा आत्मा योगी नाही, ज्याचे मन शांत नाही त्याने संन्यास घेतला तरीही प्रज्ञानाच्या द्वारे त्याला परमेश्वराची प्राप्ती होत नाही. म्हणून,

**यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञस्तद्यच्छेद् ज्ञान आत्मनि ।**
**ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छेच्छान्त आत्मनि ।।** कठ. वल्ली ३। मं. १३

बुद्धिमान संन्याशाने वाणीला व मनाला अधर्मापासून परावृत्त करावे; व त्यांना ज्ञान व आत्मा यांच्या ठिकाणी लावावे. मग त्या ज्ञानाला व स्वात्म्याला परमात्म्यामध्ये लावावे. अशा मार्गाने प्राप्त होणाऱ्या विज्ञानाला शांतस्वरूप आत्म्यामध्ये स्थिर करावे.

**परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ।**
**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ।।**

मुण्डक.। ख. २। मं. १२

सर्व लौकिक भोगांना कर्मानं संचित झाले आहेत असे पाहून ब्राह्मण म्हणजे संन्याशाला वैराग्य प्राप्त होते. कारण अकृत म्हणजे न केलेले असा परमात्मा कृताने म्हणजे केवळ कर्माने प्राप्त होत नाही. म्हणून त्याने गुरूला अर्पण करण्यासाठी काही पदार्थ हातात घेऊन वेदवित व परमेश्वर यांना जाणणाऱ्या गुरूजवळ

विज्ञानप्राप्तीसाठी जाऊन त्यांच्याकडून सर्व संदेह दूर करून घ्यावेत. मात्र याकरिता खाली वर्णिलेल्या लोकांची संगत त्याने कायमची सोडावी :-

**अविद्यायामन्तरे वर्त्तमानाः स्वयं धीराः पण्डितम्मन्यमानाः ।**

**जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥१॥**

मुण्डक. खं. २। मं. ८

जे अविद्येत गुरफटलेले असूनही आपण धैर्यवान व पंडित आहोत असे समजतात ते मूढ नीच गतीला प्राप्त होतात जसे आंधळ्यांच्या मागे जाणाऱ्या आंधळ्यांची दुर्दशा होते तसे ते दुःख प्राप्त करतात. ॥१॥

**अविद्यायां बहुधा वर्त्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः ।**

**यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥२॥**

मुण्डक. खं. २। मं. ९

जे बालीश वृत्तीचे बहुधा अविद्येमध्येच रममाण होणारे असतात आणि तरीही आपण कृतार्थ आहोत असे समजतात, ज्यांना केवळ कर्मकांडी लोक मोहाने मोहित होऊन त्याला समजू अथवा समजावू शकत नाहीत ते मोहातूर होऊन जन्ममरणरूपी दुःखात पडून राहतात. ॥२॥ म्हणून,

**वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ।**

**ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥** मुण्डक. खं. ३। मं. ६

जे लोक वेदान्त म्हणजे परमेश्वरप्रतिपादक वेदमंत्राचे अर्थज्ञान जाणतात, आणि जे आचरणाने चांगल्याप्रकारे संन्यासयोगाने निश्चितपणे शुद्धांतःकरण संन्यासी बनलेले असतात ते परमेश्वरामध्ये असलेल्या मुक्तीच्या सुखाला प्राप्त होतात. त्या सुखाचा उपभोग घेतल्यानंतर मुक्तीच्या सुखाचा अवधी पूर्ण होतो तेव्हा तेथून सुटून ते जगात परत येतात. मुक्तीखेरीज दुःखाचा नाश होत नाही. कारण,

**न (वै) सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोरपहतिरस्त्यशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः ॥** छान्दो. प्रपा. ८। खं. १२। व. १

जो देहधारी आहे तो सुख-दुःखाच्या प्राप्तीपासून कधीच वेगळा राहू शकत नाही; आणि जो शरीररहित जीवात्मा मुक्तीमध्ये सर्वव्यापक परमेश्वराबरोबर शुद्ध होऊन राहतो तेव्हा त्याला सांसारिक सुखदुःखे स्पर्श करीत नाहीत. म्हणून,

**लोकैषणायाश्च वित्तैषणायाश्च पुत्रैषणायाश्चोत्थायाथ भैक्षचर्यं चरन्ति ॥**

शत.कां. १४, ५, २, १

लोकांकडून मानसन्मान लाभ, धनदौलतीने अभिलाषा, पुत्रादि भोग किंवा माता यांच्या मोहांपासून दूर राहून संन्यासी लोक भिक्षावृत्तीचा अवलंब करून रात्रंदिवस मोक्षाची साधना करण्यात गढून गेलेले असतात.

**प्राजापत्यां निरूप्येष्टिं तस्यां सर्ववेदसं हुत्वा ब्राह्मणः प्रव्रजेत् ॥१॥** यजुर्वेद ब्राह्मण

**प्राजापत्यां निरूप्येष्टिं सर्ववेदसदक्षिणाम् ।**

**आत्मन्यग्नीन् समारोप्य ब्राह्मणः प्रव्रजेद् गृहात् ॥१॥** मनु. अ. ६। श्लो. ३८

प्रजापतीची म्हणजे परमेश्वराची प्राप्ती व्हावी म्हणून इष्टि म्हणजे यज्ञ करून, त्या यज्ञामध्ये यज्ञोपवीत (जानवे), शिखा (शेंडी) इत्यादी चिह्नांचा त्याग करून, आहवनीय आदी पाच अग्नींचे प्राण, अपान, व्यान, उदान व समान या पाच प्राणांमध्ये आरोपण करून ब्रह्म जाणणाऱ्या ब्राह्मणाने घरातून बाहेर पडून संन्यासी व्हावे. ॥१॥

**यो दत्त्वा सर्वभूतेभ्यः प्रव्रजत्यभयं गृहात्।**
**तस्य तेजोमया लोका भवन्ति ब्रह्मवादिनः ॥२॥** मनु. अ. ६। श्लो. ३९

जो सर्व प्राणिमात्रांना अभय देऊन घरातून बाहेर पडतो व संन्यासी बनतो त्या ब्रह्मवादी म्हणजे परमेश्वर प्रकाशित वेदोक्त धर्मादी विद्यांचा उपदेश करणाऱ्या संन्याशाला प्रकाशमय म्हणजे मुक्तीचा आनंद स्वरूप लोक प्राप्त होतो. ॥२॥

**(प्रश्न)** संन्याशांचा कोणता धर्म आहे ?

**(उत्तर)** पक्षपातरहित न्यायाचरण, सत्याचा स्वीकार व असत्याचा त्याग, वेदोक्त ईश्वराच्या आज्ञेचे पालन, परोपकार, सत्यभाषण ही सर्वच आश्रमस्थांची लक्षणे असून सर्व मनुष्यमात्राचा धर्म एकच आहे. तरीपण संन्याशाचा विशेष धर्म हा आहे की,

**दृष्टिपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं जलं पिबेत्।**
**सत्यपूतां वदेद्वाचं मनःपूतं समाचरेत् ॥१॥** मनु. अ. ६। श्लो. ४६

जेव्हा संन्यासी रस्त्याने चालत असेल तेव्हा त्याने इकडे तिकडे न पाहता खाली जमिनीकडे नजर ठेवून चालावे; नेहमी वस्त्रातून गाळलेलेच पाणी प्यावे, निरंतर सत्य बोलावे; सर्वदा मनाने विचार करून सत्याचे ग्रहण करावे व असत्य सोडून द्यावे. ॥१॥

**क्रुद्ध्यन्तं न प्रतिक्रुद्ध्येदाक्रुष्टः कुशलं वदेत्।**
**सप्तद्वारावकीर्णां च न वाचमनृतां वदेत् ॥२॥** मनु. अ. ६। श्लो. ४८

उपदेश किंवा संभाषण-संवाद करताना कोणी संन्याशावर रागावला अथवा त्याची निंदा केली तर संन्याशास आवश्यक आहे की त्याने त्याच्यावर रागावू नये. तथापि नेहमी त्याच्या कल्याणाचाच उपदेश करावा आणि एक मुख, नासिकेची दोन छिद्रे, दोन डोळे आणि दोन कान या सात द्वारांमध्ये विखुरलेल्या वाणीने कधीही कोणत्याही कारणाने खोटे बोलू नये. ॥२॥

**अध्यात्मरतिरासीनो निरपेक्षो निरामिषः।**
**आत्मनैव सहायेन सुखार्थी विचरेदिह ॥३॥** मनु. अ. ६। श्लो. ४९

त्याने आपला आत्मा व परमात्मा यांच्यात स्थिर होऊन, अपेक्षारहित होऊन मद्यमांसादी वर्ज्य करून, आत्म्याच्याच सहायाने सुखार्थी होऊन या जगात धर्म व विद्या यांची वृद्धी करण्याचा उपदेश करीत सदा फिरत राहावे. ॥३॥

**क्लृप्तकेशनखश्मश्रुः पात्री दण्डी कुसुम्भवान्।**
**विचरेन्नियतो नित्यं सर्वभूतान्यपीडयन् ॥४॥** मनु. अ. ६। श्लो. ५२

केस, नखे, दाढी व मिशा काढून टाकाव्यांत. सुंदर पात्र व दंड घेऊन, कुसुंभादिने रंगविलेली भगवी वस्त्रे धारण करून, स्थिरात्मा होऊन, कोणत्याही प्राण्याला पीडा न देता सर्वत्र संचार करावा. ।।४।।

**इन्द्रियाणां निरोधेन रागद्वेषक्षयेण च ।**
**अहिंसया च भूतानाममृतत्वाय कल्पते ।।५।।** मनु. अ. ६। श्लो. ६०

इंद्रियांना अधर्माचरणापासून परावृत करावे, मोह व द्वेष यांचा त्याग करावा. सर्व प्राण्यांशी निर्वैर भावनेने वागून मोक्षप्राप्तीचे सामर्थ्य वाढवित असावे. ।।५।।

**दूषितोऽपि चरेद्धर्मं यत्र तत्राश्रमे रतः ।**
**समः सर्वेषु भूतेषु न लिङ्गं धर्मकारणम् ।।६।।** मनु. अ. ६। श्लो. ६६

जगामध्ये त्याला कोणी दूषण दिले किंवा त्याचा गौरव केला तरी त्याची पर्वा न करता त्या-त्या आश्रमात असणाऱ्या पुरुषाने म्हणजे संन्याशाने सर्व प्राण्यांच्या बाबतीत निष्पक्ष वृत्ती ठेवून स्वतः धर्मात्मा बनावे व इतरांना धर्मात्मा बनविण्याचा प्रयत्न करावा. त्याने आपल्या मनात हे पूर्णपणे ओळखून असावे की दंड, कमंडलू व भगवी वस्त्रे वगैरे चिह्ने धारण करणे हे काही धर्माचे कारण नव्हे. सर्व मानवांना सत्याचा उपदेश व विद्यादानाने त्यांची उन्नती करणे हे संन्याशाचे प्रमुख कर्तव्य आहे. ।।६।।

**फलं कतकवृक्षस्य यद्यप्यम्बुप्रसादकम् ।**
**न नामग्रहणादेव तस्य वारि प्रसीदति ।।७।।** मनु. अ. ६। श्लो. ६७

कारण, निवळीच्या वृक्षाचे फळ चूर्ण करून गढूळ पाण्यात टाकले असता ते पाणी शुद्ध करते; पण तसे ते पाण्यात न टाकता केवळ नामस्मरण किंवा त्याचे कथन-श्रवण केल्यास गढूळ पाणी कधीही शुद्ध होणार नाही. ।।७।।

**प्राणायामा ब्राह्मणस्य त्रयोऽपि विधिवत्कृताः ।**
**व्याहृतिप्रणवैर्युक्ता विज्ञेयं परमं तपः ।।८।।** मनु. अ. ६। श्लो. ७०

म्हणून ब्राह्मण म्हणजे ब्रह्मज्ञानी संन्याशास उचित आहे की ओंकारपूर्वक, सप्तव्याहृतींनी युक्त, विधिपूर्वक प्राणायाम यथाशक्ती करावेत. मात्र किमान तीन पेक्षा कमी प्राणायाम करू नयेत हेच संन्याशाचे परम तप आहे. ।।८।।

**दह्यन्ते ध्मायमानानां धातूनां हि यथा मलाः ।**
**तथेन्द्रियाणां दह्यन्ते दोषाः प्राणस्य निग्रहात् ।।९।।** मनु. अ. ६। श्लो. ७१

कारण ज्याप्रमाणे अग्नीत तापविल्याने व वितळविल्याने धातूंमधील मळ नष्ट होतो त्याचप्रमाणे प्राणांच्या निग्रहाने मन वगैरे इंद्रियांचे दोष भस्म होतात. ।।९।।

**प्राणायामैर्दहेद्दोषान् धारणाभिश्च किल्बिषम् ।**
**प्रत्याहारेण संसर्गान् ध्यानेनानीश्वरान् गुणान् ।।१०।।** मनु. अ. ६। श्लो. ७२

म्हणून संन्याशांनी नित्यनेमाने प्राणायामांद्वारे आत्मा, अंतःकरण व इंद्रिय यांचे दोष, धारणेद्वारे पाप, प्रत्याहाराच्या योगे संसर्गदोष, ध्यानाद्वारे हर्ष, शोक, अविद्या आदी अनीश्वरी गुणांचा व आत्म्यासंबंधी अविद्यादि दोषांचा नाश करावा. ।।१०।।

**उच्चावचेषु भूतेषु दुर्ज्ञेयामकृतात्मभिः ।**
**ध्यानयोगेन संपश्येद् गतिमस्यान्तरात्मनः ॥११॥** मनु. अ. ६। श्लो. ७३

अयोगी व अविद्वान यांना समजण्यास अवघड आणि सर्व लहान मोठ्या पदार्थांना व्यापलेल्या परमेश्वराची व्याप्ती ध्यानयोगाने जाणून घ्यावी आणि आपला आत्मा व अंतर्यामी परमेश्वर यांची गती जाणावी. ॥११॥

**अहिंसयेन्द्रियासङ्गैर्वैदिकैश्चैव कर्म्मभिः ।**
**तपसश्चरणैश्चोग्रैस्साधयन्तीह तत्पदम् ॥१२॥** मनु. अ. ६। श्लो. ७५

सर्व भूतांशी निर्वैर होणे, इंद्रियांच्या वाईट विषयवासनांचा त्याग करणे, वेदोक्त कर्मे आणि अत्यंत उग्र तपश्चर्येने पूर्वोक्त जगामध्ये राहून संन्याशीच मोक्षाची प्राप्ती करतात व करवितात. इतरांना ते शक्य नाही. ॥१२॥

**यदा भावेन भवति सर्वभावेषु निःस्पृहः ।**
**तदा सुखमवाप्नोति प्रेत्य चेह च शाश्वतम् ॥१३॥** मनु. अ. ६। श्लो. ८०

जेव्हा संन्यासी सर्व भाव म्हणजे सर्व पदार्थांच्या ठिकाणी निःस्पृह, आकांक्षारहित बनतो आणि सर्व बाहेरच्या व आंतरिक व्यवहारांत पवित्र भावना बाळगतो तेव्हाच त्याला या देहामध्ये व मरणानंतर शाश्वत सुख प्राप्त होते. ॥१३॥

**चतुर्भिरपि चैवैतैर्नित्यमाश्रमिभिर्द्विजैः ।**
**दशलक्षणको धर्मः सेवितव्यः प्रयत्नतः ॥१४॥** मनु. अ. ६। श्लो. ८१

म्हणून ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी यांना उचित आहे की त्यांनी दहा लक्षणांनी युक्त असलेल्या खालील धर्माचे नित्य पालन करावे. ॥१४॥

**धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः ।**
**धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥१५॥** मनु. अ. ६। श्लो. ९१

## धर्माची १० लक्षणे

(१) **(धृति)** नेहमी धैर्य बाळगणे. (२) **(क्षमा)** निंदा-स्तुती, मानापमान, हानी-लाभ, इत्यादि दुःखांमध्ये सहनशील राहणे. (३) **(दम)** मनाला सदैव धर्माचरणासाठी प्रवृत्त करणे आणि अधर्मापासून परावृत्त करणे. अधर्माचरणाची इच्छाच मनात निर्माण होऊ नये असे करणे. (४) **(अस्तेय)** चौर्य कर्म त्याग अर्थात मालकाच्या परवानगी शिवाय छल, कपट, विश्वासघाताने, कोणताही व्यवहार करून, वेदाविरुद्ध उपदेश करून दुसऱ्याच्या वस्तूंचा अपहार करणे ही चोरी होय. चोरी न करणे हेच अस्तेय होय. (५) **(शौच)** रागद्वेष व पक्षपात सोडून अंतःशुद्धी करणे आणि पाणी, माती, मार्जन इत्यादींद्वारे बाह्य पावित्र्य ठेवणे. (६) **(इंद्रियनिग्रह)** इंद्रियांना अधर्माचरणापासून परावृत्त करून त्यांना धर्माच्या मार्गाने चालविणे. (७) **(धीः)** मादक द्रव्ये, इतर बुद्धिनाशक पदार्थ, दुष्टांची संगत, आळस, प्रमाद आदी दोषांचा त्याग करून, श्रेष्ठ पदार्थांचे सेवन व सज्जनांची संगती, योगाभ्यास, धर्माचरण, ब्रह्मचर्य आदी शुभ कर्मांनी बुद्धीचे सामर्थ्य वृद्धिंगत करणे. (८) **(विद्या)** पृथ्वीपासून परमेश्वरापर्यंत असणाऱ्या सर्व पदार्थांचे यथार्थ ज्ञान मिळविणे

आणि त्यापासून यथायोग्य उपकार करून घेणे. सत्य जसे आत्म्यात असेल तसे ते मनात आणणे, जसे सत्य मनात असेल तसेच ते वाणीने व्यक्त करणे, वाणीमध्ये जे सत्य असेल तेच आचरणात आणणे, ही विद्या होय, याहून जी विपरीत ती अविद्या होय. (९) **(सत्य)** जो पदार्थ जसा असेल त्याला तसाच समजणे, तसेच बोलणे व तसेच करणे म्हणजे सत्य होय. (१०) **(अक्रोध)** क्रोधादी दोषांचा त्याग करून शांतता वगैरे गुणांचे ग्रहण करणे, ही धर्माची दहा लक्षणे आहेत. या दशलक्षणयुक्त, पक्षपातरहित, न्यायाचरण युक्त धर्माचे पालन चारही आश्रमातील लोकांनी करावे आणि या वेदोक्त धर्मानुसार स्वत: आचरण करणे आणि इतरांना समजावून सांगून आचरण करण्यास प्रवृत्त करणे हा संन्याशांचा विशेष धर्म आहे. ॥१५॥

**अनेन विधिना सर्वांस्त्यक्त्वा सङ्गाच्छनैः शनैः ।**
**सर्वद्वन्द्वविनिर्मुक्तो ब्रह्मण्येवावतिष्ठते ॥१६॥** मनु. अ. ६। श्लो. ९२

अशा प्रकारे हळूहळू सर्व संगदोष टाळून हर्षशोकादि द्वंद्वातून मुक्त होऊन संन्यासी ब्रह्ममध्ये अवस्थित होतो. संन्याशांचे मुख्य कर्तव्य हेच आहे की त्यांनी सर्व गृहस्थादी आश्रमांतील लोकांना सर्व प्रकारच्या सत्य व्यवहाराचा निश्चिय करून अधार्मिक व्यवहारांपासून परावृत्त करून त्यांच्या सर्व संशयांचे निराकरण करून आणि त्यांना सत्यधर्मयुक्त व्यवहार करण्यास प्रवृत्त करावे. ॥१६॥

**(प्रश्न)** संन्यास ग्रहण करणे हा ब्राह्मणांचाच धर्म आहे की क्षत्रियादिकांचाही आहे?

**(उत्तर)** संन्यासाचा अधिकार ब्राह्मणालाच आहे. कारण जो सर्व वर्णामध्ये पूर्ण विद्वान, धार्मिक, परोपकारप्रिय असतो त्यालाच ब्राह्मण असे म्हणतात. पूर्ण विद्ये व्यतिरिक्त धर्म व परमेश्वरावर निष्ठा व वैराग्य या गोष्टी नसतील तर तशा माणसाने संन्यास घेतल्याने त्यापासून जगाचे काही विशेष भले होऊ शकत नाही. म्हणून लोकोक्ति आहे की ब्राह्मणालाच संन्यासाचा अधिकार आहे. इतरांना नाही, या बाबतीत मनुचे हे प्रमाण सिद्ध आहे.

**एष वोऽभिहितो धर्मो ब्राह्मणस्य चतुर्विधः ।**
**पुण्योऽक्षयफलः प्रेत्य राजधर्मं निबोधत ॥** मनु. अ. ६। श्लो. ९७

मनु महाराज म्हणतात की, "हे ऋषींनो! ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रम स्वीकारणे हा ब्राह्मणांचा धर्म आहे. त्यांपैकी संन्यासधर्म हा (साद्यंत) पुण्यस्वरूप असून मृत्यूनंतर मोक्षरूपी अक्षय आनंद देणारा आहे. यानंतर राजाचा धर्म माझ्याकडून ऐका." यावरून असे सिद्ध होते की संन्यास घेण्याचा अधिकार मुख्यत: ब्राह्मणांना आहे आणि ब्रह्मचर्याश्रमादी इतर तीन आश्रमांचा अधिकार क्षत्रियादिकांना आहे.

**(प्रश्न)** संन्यासग्रहणाची काय आवश्यकता असते?

**(उत्तर)** ज्याप्रमाणे शरीरामध्ये मस्तकाची आवश्यकता असते, त्याचप्रमाणे आश्रमांमध्ये संन्यासाश्रमाची आवश्यकता असते. कारण त्या आश्रमावाचून विद्या व धर्म यांची उन्नति होऊ शकत नाही. इतर आश्रमांमध्ये विद्याग्रहण, गृहकृत्ये, तपश्चर्या आदी त्या त्या आश्रमांतील कामे करावी लागत असल्यामुळे सवड फार कमी मिळते. नि:पक्षपाती वर्तन ठेवणे इतर आश्रमांमध्ये अवघड असते. संन्यासी जसा सर्वतोमुक्त होऊन जगावर

उपकार करतो तसा इतर आश्रमातील मनुष्य करू शकत नाही. कारण संन्याशाला सत्यविद्यांच्या योगे पदार्थांच्या विज्ञानाची उन्नती करण्यास जितका वेळ मिळतो तितका इतर आश्रमातील व्यक्तीला मिळू शकत नाही. परंतु जो ब्रह्मचर्याश्रमातून संन्यासी होऊन जगाला सत्याचे शिक्षण देऊन जगाची जेवढी उन्नती करू शकतो तेवढी गृहस्थ अथवा वानप्रस्थ या आश्रमांतून संन्यासाश्रमात प्रविष्ट होणारा करू शकत नाही.

**(प्रश्न)** संन्यास घेणे हे ईश्वरी इच्छेच्या विरुद्ध आहे. कारण ईश्वराचा अभिप्राय माणसांची संख्या वाढ करण्यात आहे. माणसांनी गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला नाही तर मुलेंच ज़न्माला येणार नाहीत. जर आपण संन्यासाश्रम हाच मुख्य आहे असे मानले आणि सर्व लोक संन्यासी बनले तर मानवजातीचा निर्वंश होईल ?

**(उत्तर)** ठीक आहे. लग्न करूनही अनेकांना मूल होत नाही किंवा मुले झाल्यावर लहानपणीच मरून जातात. म्हणून काय अशा लोकांना ईश्वरी इच्छेच्या विरुद्ध वागणारे म्हणावयाचे ? यावर तुम्ही म्हणाल की, ''एका कवीचे वचन आहे की, **'यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः'** म्हणजे प्रयत्न केल्यावरही कार्यसिद्धि झाली नाही तर त्यात कर्त्याचा काय दोष ? अर्थात काहीही नाही.'' यावर आम्ही तुम्हाला विचारतो की गृहस्थाश्रमामध्ये पुष्कळ मुले झाली आणि ती विरुद्धाचरणाने आपापसात भांडून मरून गेली तर ती केवढी मोठी हानी होते ! एकमेकांच्या समजुतींमध्ये विरोध निर्माण झाला की भांडणे पुष्कळ होतात. जेव्हा एखादा संन्यासी वेदोक्त धर्माचा उपदेश करून परस्परांमध्ये प्रेमभाव निर्माण करील तेव्हा लाखो माणसांना वाचवू शकेल. असा संन्यासी हजारो गृहस्थ सदृश माणसाची उन्नती घडवून आणतो. शिवाय सर्व माणसे संन्यास घेऊच शकणार नाहीत. कारण सर्वांची विषयासक्ती कधीच नष्ट होणार नाही. जे लोक संन्याशांच्या उपदेशाने धर्मपरायण बनतात ते सगळे जणू त्यांचे पुत्र तुल्य आहेत.

**(प्रश्न)** संन्यासी असे म्हणतात की आम्हाला कशाशी काही कर्तव्य नाही. अन्न, वस्त्र घेऊन मजेत राहावे, एवढेच आम्हाला माहीत. अविद्यारूपी जगाच्या बाबतीत डोकेफोड कशाला करायची ? आम्ही स्वतःला ब्रह्म समजून संतुष्ट राहतो. कोणी येऊन विचारले तर त्यालाही आम्ही असाच उपदेश करावा की, ''तूही ब्रह्म आहेस. तुला पापपुण्य लागत नाही. कारण शीत व उष्ण यांची जाणीव होणे हा शरीराचा, क्षुधा व तृष्णा हा प्राणाचा आणि सुख-दुःख हा मनाचा धर्म आहे. जग मिथ्या असून जगातील सारे व्यवहारही काल्पनिक म्हणजे खोटे आहेत. म्हणून शहाण्यांनी त्यात गुंतणे योग्य नव्हे. जे काही पापपुण्य घडते तो देहाचा व इंद्रियांचा धर्म आहे, आत्म्याचा नव्हे.'' अशा प्रकारचा उपदेश हे संन्यासी करतात. परंतु तुम्ही ज्या संन्यासाश्रमाच्या धर्मविषयी सांगत आहात तो अगदीच विलक्षण दिसतो. अशा वेळी आम्ही कोणाचे म्हणणे खरे मानावे आणि कोणाचे खोटे मानावे ?

**(उत्तर)** त्यांना चागली कृत्ये देखील कर्तव्य नसतात काय ? मनु महाराजांनी तर लिहिले आहे की, **'वैदिकैश्चैव कर्मभिः'** म्हणजे वैदिक कर्मे ही धर्मयुक्त सत्य कर्मे असतात. ती संन्याशांनीही अवश्य केली पाहिजेत. भोजन, आच्छादन वगैरे कर्मे ते टाळू शकतात काय ? जर ही कर्मे सुटू शकत नसतील तर उत्तम

कर्मे सोडल्याने ते पतित व पापभागी होणार नाहीत काय ? हे संन्यासी गृहस्थांकडून अन्नवस्त्रादी घेतात. त्यांच्या त्या उपकाराची परतफेड करीत नाही तर ते महापापी होणार नाहीत काय ? जसे डोळ्यांनी दिसत नाही व कानांनी ऐकू येत नाही तर डोळे व कान असून नसल्यासारखेच असतात. याच प्रमाणे जे संन्यासी सत्योपदेश आणि वेदादी सत्यशास्त्रांचा विचार, प्रचार करीत नाहीत तर तेही या जगात व्यर्थ, भाररूप आहेत.

आणि अडाणी लोकांशी डोकेफोड कशाला करायची, असे लिहिणारे व सांगणारे तसा उपदेश करणारेच खोटारडे व पाप वाढविणारे पापी आहेत. जे काही शरीरादिकाकडून कर्म केले जाते ते सर्व आत्म्याचेच असते व त्याचे फळ भोगणाराही आत्माच आहे.

जे जीवाला ब्रह्म प्रतिपादन करतात ते अविद्यारूपी निद्रेत गुंग झालेले असतात. कारण जीव हा अल्प व अल्पज्ञ असतो आणि ब्रह्म हे सर्वव्यापक व सर्वज्ञ आहे. ब्रह्म नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावयुक्त आहे. जीव हा कधी बद्ध तर कधी मुक्त राहतो. ब्रह्म हे सर्वव्यापक, सर्वज्ञ असल्यामुळे त्याला कधी भ्रम अथवा अविद्या होऊ शकत नाही. जीवाला मात्र कधी विद्या तर कधी अविद्या प्राप्त होते. ब्रह्म हे जन्ममरण व दुःख यांच्या फेऱ्यात कधी अडकत नाही परंतु जीव मात्र त्या फेऱ्यात अडकतो. म्हणून त्यांचा तो उपदेश खोटा आहे.

**(प्रश्न)** 'संन्यासी सर्वकर्मविनाशी' असतात आणि ते अग्नी व धातू यांना स्पर्श करीत नाहीत. ही गोष्ट खरी आहे की नाही ?

**(उत्तर)** नाही, 'सम्यङ् नित्यमास्ते यस्मिन् यद्वा सम्यङ् न्यस्यन्ति दुःखानि कर्माणि येन स संन्यासः, स प्रशस्तो विद्यते यस्य स संन्यासी'।

जो ब्रह्म व त्याची आज्ञा यांमध्ये उपविष्ट म्हणजे स्थित असतो, जो दुष्ट कर्माचा त्याग करतो, ज्याचा स्वभाव उत्तम असतो त्याला संन्यासी म्हणतात. यात सत्कर्म कर्ता व दुष्कृत्यांचा विनाश करणारा संन्यासी म्हटला जातो.

**(प्रश्न)** अध्यापन व उपदेश तर गृहस्थही करतात. मग संन्याशाची काय गरज ?

**(उत्तर)** सर्वच आश्रमांतील लोकांनी सत्याचा उपदेश करावा व ऐकावा. परंतु जितकी सवड व निष्पक्षता संन्याशाजवळ असते तितकी गृहस्थांजवळ नसते. होय ! जे ब्राह्मण आहेत त्यांचे हेच काम आहे की त्यांच्यातील पुरुषांनी पुरुषांना व स्त्रियांनी स्त्रियांना सत्याचा उपदेश करावा व शिकवावे. सर्वत्र भ्रमण करण्यासाठी आवश्यक असणारी सवड संन्याशांना जेवढी मिळते तेवढी गृहस्थ ब्राह्मणादिकांना कधीही मिळू शकत नाही. ब्राह्मणांनी वेदविरुद्ध आचरण केले तर त्यांचे नियंत्रक संन्यासी असतो. म्हणून संन्यासी असणे उचित आहे.

**(प्रश्न) 'एकरात्रिं वसेद् ग्रामे.'** इत्यादी वचनानुसार संन्याशाने एके ठिकाणी फक्त एकच रात्र राहावे, जास्त राहू नये. हे योग्य आहे काय ?

**(उत्तर)** ही गोष्ट काही प्रमाणात खरी आहे की संन्यासी एकाच ठिकाणी राहू लागला तर त्यामुळे जगाचे अधिक कल्याण होणार नाही. उलट एकाच जागी राहिल्यामुळे त्या स्थानाविषयी मनात अभिमान निर्माण होतो व आसक्ती, द्वेषही होतात. एके ठिकाणी राहिल्याने लोकांवर विशेष उपकार होत असेल तर राहावे. जसे पूर्वी

जनक राजाकडे पंचशिखादी अन्य संन्यासी चार-चार महिने राहत असत व इतर काही संन्यासी अनेक वर्षे राहिले होते. एका जागी जास्त काळ राहू नये, ही गोष्ट आजकालच्या पाखंडी सांप्रदायिकांनी बनविली आहे. कारण संन्यासी एका जागी अधिक राहिला तर आजचा पाखंड खंडित होईल आणि पाखंडाची अधिक वाढ होणे शक्य नाही.

**(प्रश्न) यतीनां काञ्चनं दद्यात्ताम्बूलं ब्रह्मचारिणाम् ।**
**चौराणामभयं दद्यात्स नरो नरकं व्रजेत् ॥**

इत्यादी वचनांचा आशय असा आहे की संन्याशांना सुवर्णाचे दान देणारा दाता नरकात जातो असे सांगितले आहे. त्याचा अर्थ काय ?

**(उत्तर)** ही गोष्ट देखील वर्णाश्रमविरोधी सांप्रदायिक व स्वार्थसाधू पौराणिकांनी कल्पिलेली आहे. कारण त्यांना अशी भीती वाटते की संन्याशांना धन मिळाल्यास ते आमच्या देखील पुष्कळशा सिद्धांतांचे खंडन करतील, त्यामुळे आमची हानी होईल; आणि ते आमच्या कह्यात देखील राहणार नाहीत आणि जेव्हा संन्याशांना द्यावयाची भिक्षा वगैरे आमच्या आधीन राहतील तेव्हा ते आम्हाला भिऊन राहतील जेव्हा मूर्ख व स्वार्थी लोकांना दान देणे चांगले समजले जाते, तेव्हा विद्वान व परोपकारी संन्याशांना दान देण्यात कसलाही दोष होऊ शकत नाही ! पाहा !

**विविधानि च रत्नानि विविक्तेषूपपादयेत् ॥** मनु. अ. ११। श्लो. ६

नाना प्रकारची रत्ने व सुवर्णादी धन (विविक्तानां) म्हणजे संन्याशांना द्यावे, असे या श्लोकात सांगितले आहे. हा श्लोकही निरर्थक आहे. कारण संन्याशाला सुवर्ण दान केल्यास यजमान नरकात जात असेल तर चांदी, मोती, हिरे वगैरे दिल्याने तो स्वर्गात कसा जाणार ?

**(प्रश्न)** पंडितजी हा पाठ बोलताना विसरून गेले. तो मुळात असा आहे की, 'यतिहस्ते धनं दद्यात्', म्हणजे जो संन्याशांच्या हातात धन देतो तो नरकाला जातो.

**(उत्तर)** हे वचनही कुणातरी अडाण्याने कपोलकल्पनेने रचलेले आहे. कारण हातात धन दिल्याने दाता नरकात जात असेल तर त्याने ते त्याच्या पायावर ठेवले अथवा गाठोड्यात बांधून दिले म्हणजे तो स्वर्गाला जातो काय ? म्हणून असल्या कल्पनांवर विश्वास ठेवू नये. होय ही गोष्ट खरी आहे की संन्यासी योगक्षेमासाठी आवश्यक असणाऱ्या गोष्टीपेक्षा जास्त काही स्वत:जवळ ठेवील तर त्याला चोरांपासून त्रास होईल आणि त्या द्रव्याचा मोहही त्याला पडेल. परंतु जो विद्वान असेल तो अयोग्य व्यवहार कधी करणार नाही अथवा मोहामध्ये फसणार नाही. कारण त्याने प्रथम गृहस्थाश्रमात अथवा ब्रह्मचर्याश्रमात सर्व काही भोगलेले किंवा पाहिलेले आहे आणि जो माणूस ब्रह्मचर्याश्रमातून सरळ संन्यासाश्रमात आलेला असता तो पूर्णपणे वैराग्ययुक्त असल्यामुळे तो कधी केव्हाही असल्या मोहात फसत नाही.

**(प्रश्न)** लोक असे म्हणतात की जर श्राद्धामध्ये संन्यासी आले किंवा जेवले तर जेवू घालणाऱ्याचे पितर पळून जातात व नरकात पडतात.

**(उत्तर)** मुळात मेलेल्या पितरांनी येणे आणि श्राद्धात दिलेले अन्न त्यांना पोहचणे ही गोष्ट असंभव, वेदविरुद्ध व तर्कदुष्ट असल्याने खोट्याच आहेत आणि जे येतच नाहीत ते पळून तरी कसे जाणार ? ईश्वराच्या व्यवस्थेप्रमाणे आपापल्या पापपुण्यानुसार जीव मरणानंतर जन्म घेतात तर तेथून ते कसे येऊ शकतील ? म्हणून ही गोष्ट देखील पोटभरू पौराणिक व गोसावी यांनी आपल्या कल्पनेने रचलेली व खोटीच आहे. हो ! संन्यासी जेथे जातील तेथे हे मृतकश्राद्ध करणे वेदादी शास्त्रांच्या विरुद्ध असल्याने, ही गोष्ट लोकांना पटवून देतील. त्यायोगे हे पाखंड नाहीसे होईल.

**(प्रश्न)** जो ब्रह्मचर्याश्रमातून संन्यास घेईल त्याला चरितार्थ चालविणे फार अवघड जाईल आणि कामवासना ताब्यात ठेवणेही अत्यंत कठिण आहे. म्हणून गृहस्थाश्रम व वानप्रस्थाश्रम यांचा अनुभव घेतल्यानंतर वृद्धापकाळी संन्यास घ्यावा, हे चांगले आहे काय ?

**(उत्तर)** ज्याला निर्वाह करता येत नाही व इंद्रियांवर नियंत्रण ठेवणे शक्य होत नाही त्याने ब्रह्मचर्यातून संन्यास घेऊ नये. परंतु ज्याला आपल्या इंद्रिय विकारांवर ताबा मिळविता येत असेल त्याने तसा संन्यास का घेऊ नये ? ज्या पुरुषाला विषयवासनेचे दोष व वीर्यसंरक्षणाचे गुण समजले आहेत तो कधी विषयासक्त होत नाही. त्याचे वीर्य विचाररूपी अग्नीच्या इंधनासारखे असते. त्यातच ते खर्च होते. वैद्य व औषधे यांची आवश्यकता जशी रोग्याला असते तशी निरोगी व्यक्तीला नसते. याचप्रमाणे ज्या पुरुषाला अथवा स्त्रीला विद्येचा व धर्माचा प्रसार करणे व जगाचे कल्याण करणे हेच प्रयोजन आहे असे वाटत असेल त्यांनी विवाह करू नये. उदाहरणार्थ पंचशिखादी पुरुष आणि गार्गी वगैरे स्त्रिया होऊन गेल्या.

म्हणून अधिकारी (सुयोग्य) व्यक्तींनीच संन्यासी होणे हे उचित होय. जो अनधिकारी पुरुष संन्यास घेईल तो स्वत:ही बुडेल आणि इतरांनाही बुडवील. ज्याप्रमाणे चक्रवर्ती राजा 'सम्राट' असतो, त्याप्रमाणे संन्याशी 'परिव्राट' असतो. एवढेच नव्हे तर राजाचा सन्मान व सत्कार फक्त त्याच्या देशात स्व संबंधियांकडून केला जातो; पण संन्यासी सर्वत्र पूज्य असतो.

**विद्वत्त्वं च नृपत्त्वं च नैव तुल्यं कदाचन।**
**स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥१॥** चा. श. ३

हा चाणक्य नीतिशास्त्रातील श्लोक आहे. विद्वान आणि राजा यांची कधी तुलना होऊ शकत नाही. कारण राजाचा सन्मान व सत्कार फक्त त्याच्या राज्यातच होतो; तर विद्वानाला सर्वत्र मान व प्रतिष्ठा प्राप्त होते. म्हणून विद्याध्ययन करणे, सुशिक्षण घेणे व बलवान बनणे यांसाठी ब्रह्मचर्याश्रम आणि सर्व प्रकारचे उत्तम व्यवहार सिद्ध करण्यासाठी गृहस्थाश्रम आहे; विचार, ध्यान व विज्ञान यांच्या वृद्धीसाठी व तपश्चर्या करण्यासाठी वानप्रस्थाश्रम आहे आणि वेदादी सत्य शास्त्रांचा प्रचार, धार्मिक व्यवहारांचा स्वीकार व दुष्ट व्यवहारांचा त्याग, सर्वांना सत्योपदेश करून नि:संदेह बनविण्यासाठी संन्यासाश्रम आहे. परंतु जे लोक संन्यासाच्या सत्योपदेशादी मुख्य धर्माचे पालन करीत नाहीत ते पतित होऊन नरकात जातात. म्हणून संन्याशांनी सदैव सत्योपदेश, शंकासमाधान, वेदादी सत्यशास्त्रांचे अध्यापन आणि वेदोक्त धर्माची अभिवृद्धी या गोष्टी प्रयत्नपूर्वक करून जगाची उन्नती केली पाहिजे.

**(प्रश्न)** जे संन्यासी नाहीत असे साधू, बैरागी, गोसावी, खाकी, जोगी वगैरे लोकांचा समावेश संन्यासाश्रमात होतो की नाही ?

**(उत्तर)** नाही. कारण त्यांच्यात संन्याशाचे एकही लक्षण नाही. ते वेदविरुद्ध मार्गात प्रवृत्त होऊन वेदाहून अधिक आपल्या संप्रदायाच्या आचार्यांची वचने प्रमाण मानतात; आणि आपल्याच पंथाची प्रशंसा करतात. मिथ्या प्रपंचात गुंतून आपल्या स्वार्थासाठी इतरांना आपल्या पंथात ओढून फसवितात. जगाची सुधारणा करणे तर दूरच राहिले; उलट ते लोकांना फसवून अधोगतीला नेतात; आणि स्वत:चा स्वार्थ साधतात. म्हणून त्यांची गणना संन्यासाश्रमात करता येत नाही परंतु ते तर पक्के स्वार्थाश्रमी असतात, यात मुळीच शंका नाही.

जे स्वत: धर्माने चालून साऱ्या जगाला धर्माप्रमाणे चालवितात, जे स्वत:बरोबर साऱ्या जगाला इहलोकी म्हणजे या जन्मात आणि परलोकी म्हणजे दुसऱ्या जन्मात स्वर्गाचा म्हणजे सुखाचा उपभोग करतात व करवितात तेच धर्मात्मा, संन्यासी व महात्मा आहेत.

हे संक्षेपाने संन्यासाश्रमाचे विवेचन केले. यानंतर राजप्रजाधर्मविषयी विवेचन करणार आहोत.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते वानप्रस्थसंन्यासाश्रमविषये**
**पञ्चमः समुल्लासः सम्पूर्णः ॥५॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






## सहावा समुल्लास

# राजधर्म

**राजधर्मान् प्रवक्ष्यामि यथावृत्तो भवेन्नृपः।**
**संभवश्च यथा तस्य सिद्धिश्च परमा यथा ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १

मनु महाराज ऋषींना सांगतात की, "चार वर्ण व चार आश्रम यांच्या व्यवहारांसंबंधी माहिती दिल्यानंतर आता मी राजधर्माचे विवेचन करतो. राजा कसा असला पाहिजे त्याची नियुक्ति कशी होते, त्याला परमसिद्धी कशी प्राप्त होते, हे सर्व मी सांगणार आहे. ॥१॥

**ब्राह्मं प्राप्तेन संस्कारं क्षत्रियेण यथाविधि।**
**सर्वस्यास्य यथान्यायं कर्त्तव्यं परिरक्षणम् ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. २

जसा परमविद्वान ब्राह्मण असतो तसे विद्वान व सुशिक्षित होऊन क्षत्रियांना उचित आहे की या सर्व राज्याचे रक्षण न्यायाने योग्य प्रकारे करावे. त्याचा प्रकार असा आहे. ॥२॥

राजाने आपले कर्तव्य अशा प्रकारे पार पाडावे :-

## तीन सभांची योजना

**त्रीणि राजाना विदथे पुरूणि परि विश्वानि भूषथः सदांसि ॥** ऋ.मं.३। सू.३८। मं. ६

ईश्वर उपदेश करतो की, (राजाना) राजा व प्रजेतील पुरुष मिळून (विदथे) सुखप्राप्तिकारक व विज्ञानवृद्धिकारक, राजा व प्रजा यांच्यातील संबंधरूप व्यवहारामध्ये (त्रीणि सदांसि) तीन सभा म्हणजे विद्यार्य सभा, धर्मार्य सभा, राजार्य सभा स्थापन करून (पुरुणि) पुष्कळ प्रकारच्या (विश्वानि) समग्र प्रजासंबंधी, मनुष्यादी प्राण्यांना (परिभूषथः) सर्वप्रकारे विद्या, स्वातंत्र्य, धर्म, सुशिक्षण व धन इत्यादींनी अलंकृत करावे.

**तं सभा च समितिश्च सेना च ॥१॥** अथर्व. कां. १५। अनु. २। व. ९। मं. २

(तम्) त्या राजधर्माचे (सभा च) त्या तीनही सभांनी (समितिश्च) संग्रामादि व्यवस्था आणि (सेना च) सैन्य यांनी मिळून पालन करावे. ॥१॥

**सभ्यं सभां मे पाहि ये च सभ्याः सभासदः ॥** अथर्व. कां. १९। अनु. ७। व. ५५। मं. ६

सभासद व राजा यांना उचित आहे की राजाने सर्व सभासदांना अशी आज्ञा करावी की हे (सभ्य) सभे योग्य मुख्य सभासदा, तू (मे) माझ्या सभेच्या धर्मयुक्त व्यवस्थेचे (पाहि) पालन कर आणि (ये च) जे (सभ्याः) सभे योग्य असे (सभासदः) सभासद आहेत त्यांनीही सभेच्या व्यवस्थेचे पालन करावे. ॥२॥

याचा अर्थ असा की कुणा एका विशिष्ट व्यक्तीला राज्याचा स्वतंत्र अधिकार देता कामा नये. परंतु सभापती राजाच्या आधीन सभा असावी, सभेच्या आधीन राजा, राजा व सभा यांनी प्रजेच्या आधीन रहावे आणि प्रजेने राजसभेच्या आधीन रहावे. असे केले नाही तर,

**राष्ट्रमेव विश्याहन्ति तस्माद्राष्ट्री विशं घातुकः ॥**
**विशमेव राष्ट्रायाद्यां करोति तस्माद्राष्ट्री विशमत्ति न पुष्टं पशं मन्यत इति ॥१॥** शत. का. १३। अनु. २। ब्रा. ३

जो प्रजेपासून स्वतंत्र स्वाधीन राजवर्ग असतो, (राष्ट्रमेव विश्याहन्ति) तो राज्यामध्ये प्रवेश करून प्रजेचा नाश करतो. अर्थात एकटा राजा स्वाधीन किंवा उन्मत्त होऊन (राष्ट्री विशं घातुकः) प्रजानाशक होतो. (विशमेव राष्ट्रायाद्यां करोति) म्हणजे तो राजा प्रजेला खाऊन टाकतो म्हणून राज्यामध्ये कोणीही एकाला स्वाधीन करू नये. ज्याप्रमाणे सिंहव्याघ्रादी हिंस्र पशू (पुष्टं पशुं न मन्यते) इतर धष्टपुष्ट पशूंना मारून खातात त्याचप्रमाणे अनियंत्रित उन्मत्त राजा (राष्ट्री विशम् अत्ति) प्रजेचा नाश करतो. तो आपल्या राज्यात कोणालाही वरचढ होऊ देत नाही; श्रीमंतांना लुटतो, अन्यायाने दंड करून लुबाडतो आणि आपला हेतू साध्य करतो. म्हणून,

**इन्द्रो जयाति न परा जयाता अधिराजो राजसु राजयातै।**
**चर्कृत्य ईड्यो वन्द्यश्चोपसद्यो नमस्यो भवेह ॥** अथर्व. कां. ६। अनु. १०। व. ९८। मं. १

हे मनुष्यांनो ! जो (इह) या मनुष्य समाजात (इन्द्रः) परम ऐश्वर्याचा कर्ता व शत्रूंना (जयाति) जिंकू शकणारा, (न पराजयाता) शत्रूंकडून पराभूत न होणारा, (राजसु) राजांमध्ये, (अधिराजः) सर्वश्रेष्ठ विराजमान (राजयातै) प्रकाशमान होतो. (चर्कृत्यः) सभापती होण्यास अत्यंत योग्य, (ईड्यः) प्रशंसनीय गुणकर्मस्वभावयुक्त, (वन्द्यः) सत्कर्म करण्यास योग्य, (चोपसद्यः) जवळ जाण्यास व शरण देण्यास योग्य, (नमस्यः) सर्वांनी नमस्कार करण्यास योग्य असतो. त्यालाच सभापती (भव) राजा करावा.

## राजाची लक्षणे

**इमं देवाऽ असपत्नं सुवध्वं महते क्षत्राय महते ज्यैष्ठ्याय महते जानराज्यायेन्द्रस्येन्द्रियाय ॥१॥** यजु. अ. ९। मं. ४०

हे (देवाः) विद्वान, राज प्रजाजनहो, तुम्ही (इमम्) अशा प्रकारच्या पुरुषाला (महते क्षत्राय) मोठ्या चक्रवर्ती राज्यासाठी (महते ज्यैष्ठ्याय) सर्वांहून मोठे होण्यासाठी (महते जानराज्याय) मोठमोठ्या विद्वानांनी युक्त अशा राज्याचे पालन करण्यासाठी (इन्द्रस्य इन्द्रियाय) परम ऐश्वर्ययुक्त राज्याचे व धनाचे रक्षण करण्यासाठी (असपत्न सुवध्वम्) सर्वसंमती करून सर्वत्र पक्षपातरहित, पूर्ण विद्यायुक्त, विनयशील, सर्वांचा मित्र, अशा लोकनियुक्त सभापतीला, राजाला सर्वसत्ताधीश मानून सारा भूगोल म्हणजे सारे जग शत्रुरहित करा आणि

**स्थिरा वः सन्त्वायुधा पराणुदे वीळू उत प्रतिष्कभे।**
**युष्माकमस्तु तविषी पनीयसी मा मर्त्यस्य मायिनः ॥** ऋ.मं.१।सू.३९।मं.२

ईश्वर उपदेश करतो की हे राजपुरुषांनो, (वः) तुमची (आयुधा) आग्नेयादि अस्त्रे शतघ्नी (तोफा) भुशुंडी (बंदुका), धनुष्य-बाण, तलवार, आदी शस्त्रे शत्रूंचा (पराणुदे) पराजय करण्यासाठी व (उत प्रतिष्कभे) त्यांना रोखण्यासाठी (वीळू) प्रशंसित आणि (स्थिरा) दृढ (सन्तु) असावीत. (युष्माकम्) तुमची (तविषी) सेना (पनीयसी) प्रशंसनीय (अस्तु) असावी जेणे करून तुम्ही नेहमी विजयी व्हावे. (मा मर्त्यस्य मायिनः) परंतु जो निंदनीय व अन्यायरूपी काम करीत असेल त्याच्यासाठी वर सांगितलेली शस्त्रास्त्रे नसावीत. याचा अर्थ असा की जोपर्यंत माणसे धार्मिक असतात तोपर्यंतच त्यांच्या राज्याची वृद्धी होत असते. पण जेव्हा ती दुराचारी बनतात तेव्हा त्यांचे राज्य नष्टभ्रष्ट होते.

महाविद्वानांना विद्यासभेचे अधिकारी, धार्मिक विद्वानांना धर्मसभेचे अधिकारी, प्रशंसनीय धार्मिक पुरुषांना राजसभेचे सभासद बनवावे; आणि त्यांमध्ये सर्वोत्तम गुणांनी, कर्मानि व स्वभावाने युक्त महान पुरुष असेल तर त्याला राजसभेचा सभापती मानून सर्व प्रकारे सर्वांनी आपली उन्नती करावी. तिन्ही सभांच्या संमतीने राजनीतीचे उत्तम नियम करावेत आणि त्या नियमांनुसार सर्व लोकांनी वागावे. सर्वांच्या संमतीने सार्वजनिक हिताची कामे करावीत. माणसाने सर्वांचे हित करण्यासाठी परतंत्र असावे आणि धर्मयुक्त कामांत जी जी स्वतःची कामे आहेत त्या त्या साठी स्वतंत्र असावे. पुनः त्या सभापतीचे गुण कसे असले पाहिजे?

## सभापतीचे लक्षण

**इन्द्राऽनिलयमार्काणामग्नेश्च वरुणस्य च।**
**चन्द्रवित्तेशयोश्चैव मात्रा निर्हृत्य शाश्वतीः ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. ४

तो सभाधीश राजा इन्द्र विजेप्रमाणे शीघ्र ऐश्वर्य संपादन करणारा, वायूप्रमाणे सर्वांना प्राणांसारखा प्रिय असणारा व अंतःकरणातील गोष्ट जाणणारा, यम म्हणजे निष्पक्ष न्यायाधीशाप्रमाणे वागणारा, सूर्याप्रमाणे न्याय, धर्म, विद्या, यांचा प्रकाशक आणि अन्धकार म्हणजे अविद्या व अन्याय यांचा निरोधक, अग्नीप्रमाणे दुष्टांचे भस्म करणारा, वरुण म्हणजे बांधणाऱ्या सारखा, दुष्टांना अनेक प्रकारे बांधणारा, चंद्रासारखा श्रेष्ठ पुरुषांना आनंद देणारा, कुबेराप्रमाणे खजिने भरून ठेवणारा असा (तो सभापती) असावा. ॥१॥

**तपत्यादित्यवच्चैष चक्षूंषि च मनांसि च।**
**न चैनं भुवि शक्नोति कश्चिदप्यभिवीक्षितुम् ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. ६

तो सूर्याप्रमाणे प्रतापी, आपल्या तेजाने सर्वांना बाहेरून व आतून मनाला तापविणारा असतो. पृथ्वीच्या पाठीवर त्याच्याकडे करड्या नजरेने पाहण्यास कोणीही समर्थ नसतो. ॥२॥

**सोऽग्निर्भवति वायुश्च सोऽर्कः सोमः स धर्मराट्।**
**स कुबेरः स वरुणः स महेन्द्रः प्रभावतः ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. ७

जो आपल्या प्रभावाने अग्नी, वायु, सूर्य व सोम यांच्यातील गुणांनी युक्त, धर्म प्रकाशक, धन वर्धक दुष्टांना वठणीवर आणणारा मोठा ऐश्वर्यशाली असावा तोच सभाध्यक्ष किंवा सभेश होण्यास योग्य असतो. ॥३॥

आता खरा राजा कोण ते पाहू :-

## शिक्षे संबंधी विवेचन

**स राजा पुरुषो दण्डः स नेता शासिता च सः ।**

**चतुर्णामाश्रमाणां च धर्मस्य प्रतिभूः स्मृतः ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १७

जो दंड आहे तोच पुरुष राजा, तोच न्यायाचा प्रचारक, तोच सर्वांचा शासक व तोच चार वर्ण व चार आश्रम यांच्या धर्माचा प्रतिभू म्हणजे जामीन आहे. ॥१॥

**दण्डः शास्ति प्रजाः सर्वा दण्ड एवाभिरक्षति ।**

**दण्डः सुप्तेषु जागर्त्ति दण्डं धर्मं विदुर्बुधाः ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १८

दंड हाच प्रजेचा शासनकर्ता, सर्व प्रजेचा रक्षक, सारी प्रजा झोपली असता जागणारा आहे. म्हणून बुद्धिमान लोक दंडालाच धर्म म्हणतात. ॥२॥

**समीक्ष्य स धृतः सम्यक् सर्वा रञ्जयति प्रजाः ।**

**असमीक्ष्य प्रणीतस्तु विनाशयति सर्वतः ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १९

जो दंड योग्य प्रकारे विचार करून धारण केला जातो तो साऱ्या प्रजेला आनंदित करतो आणि जो दंड अविचाराने वापरला जातो तो सर्व बाजूंनी राजाचा विनाश करतो आहे. ॥३॥

**दुष्येयुः सर्ववर्णाश्च भिद्येरन् सर्वसेतवः ।**

**सर्वलोक प्रकोपश्च भवेद्दण्डस्य विभ्रमात् ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. २४

दंड नसेल तर सर्व वर्ण दूषित होतील आणि सर्व मर्यादा छिन्नभिन्न होतील. दंडाचा योग्य वापर न झाल्यास सर्व लोकांवर प्रकोप होत असतो. ॥४॥

**यत्र श्यामो लोहिताक्षो दण्डश्चरति पापहा ।**

**प्रजास्तत्र न मुह्यन्ति नेता चेत्साधु पश्यति ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. २५

जेथे कृष्णवर्ण, रक्तनेत्र, भयंकर पुरुषासमान पापांचा नाश करणारा दंड सर्वत्र संचार करतो तेथे प्रजा मोहवश न होता आनंदित होते. मात्र जेथे दंड चालविणारा शासक पक्षपातरहित विद्वान असेल तरच असे घडते. ॥५॥

**तस्याहुः संप्रणेतारं राजानं सत्यवादिनम् ।**

**समीक्ष्यकारिणं प्राज्ञं धर्मकामार्थकोविदम् ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. २६

जो शासक सत्यवादी, विचार करणारा, बुद्धिमान आणि धर्म, अर्थ व काम सिद्ध करण्यात पंडित असतो तोच दंड देण्यास योग्य आहे, असे विद्वान लोक म्हणतात. ॥६॥

**तं राजा प्रणयन्सम्यक् त्रिवर्गेणाभिवर्द्धते ।**

**कामात्मा विषमः क्षुद्रो दण्डेनैव निहन्यते ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. २७

जो राजा उत्तम प्रकारे दंड चालवितो तो धर्म, अर्थ आणि काम यांची सिद्धता वाढवितो आणि जो विषयलंपट, वाकड्या मार्गाने जाणारा, ईर्ष्या करणारा, क्षुद्र व नीच बुद्धीचा न्यायाधीश असतो तो त्या दंडानेच मारला जातो. ॥७॥

**दण्डो हि समुहत्तेजो दुर्धरश्चाकृतात्मभिः ।**
**धर्माद्विचलितं हन्ति नृपमेव सबान्धवम् ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. २८

अशा प्रकारे दंड हा अत्यंत तेजोमय असल्यामुळे त्याला अविद्वान अधर्मात्मा धारण करू शकत नाही. तेव्हा तो दंड अधार्मिक राजाचा त्याच्या कुटुंबासह नाश करतो. ॥८॥

**सोऽसहायेन मूढेन लुब्धेनाकृतबुद्धिना ।**
**न शक्यो न्यायतो नेतुं सक्तेन विषयेषु च ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. २९

कारण ज्याला आप्त पुरुषांचे साह्य नाही, जो अशिक्षित, अविद्यावान, विषयलंपट व मूढ आहे तो न्याययुक्त दंड देण्यास कधीही समर्थ होऊ शकत नाही. ॥९॥

**शुचिना सत्यसन्धेन यथाशास्त्रनुसारिणा ।**
**प्रणेतुं शक्यते दण्डः सुसहायेन धीमता ॥१०॥** मनु. अ. ७। श्लो. ३०

आणि जो पवित्रात्मा, सत्याचरण करणारा, सत्पुरुषांच्या सहवासात राहणारा, नीतिशास्त्राप्रमाणे यथायोग्य चालणारा, श्रेष्ठ पुरुषांकडून साह्य प्राप्त होणारा व बुद्धिमान असतो तोच न्यायरूपी दंडाचा वापर करण्यास समर्थ असतो. ॥१०॥ म्हणून,

## राजाची कर्तव्ये

**सैनापत्यं च राज्यं च दण्डनेतृत्वमेव च ।**
**सर्वलोकाधिपत्यं च वेदशास्त्रविदर्हति ॥१॥** मनु. अ. १२। श्लो. १००

सर्व सैन्य आणि सेनापतीच्या वर राजाधिकार दंड देण्याच्या व्यवस्थेचे सर्वोच्च अधिपत्य आणि या सर्वांवर विद्यमान सर्वाधीश राज्याधिकार अशा चार सर्वोच्च अधिकारस्थानांवर संपूर्ण वेदशास्त्रांमध्ये प्रवीण, पूर्ण विद्यायुक्त, धर्मात्मा, जितेंद्रिय व सुशील अशा लोकांचीच स्थापना केली पाहिजे. याचा अर्थ असा की मुख्य सेनापती, मुख्य राज्याधिकारी, मुख्य न्यायाधीश, प्रधान आणि राजा हे चौघे सर्व विद्यांमध्ये पूर्ण विद्वान असले पाहिजेत. ॥१॥

**दशावरा वा परिषद् यं धर्मं परिकल्पयेत् ।**
**त्र्यवरा वापि वृत्तस्था तं धर्मं न विचालयेत् ॥२॥** मनु. अ. १२। श्लो. ११०

कमीत कमी दहा विद्वानांची किंवा निदान पक्षी तीन विद्वानांची, एक सभा किंवा समिती जशी व्यवस्था करील त्या धर्मसभेच्या अथवा विद्वत सभेच्या व्यवस्थेचे उल्लंघन कोणी करू नये. ॥२॥

**त्रैविद्यो हैतुकस्तर्की नैरुक्तो धर्मपाठकः ।**
**त्रयश्चाश्रमिणः पूर्वे परिषत् स्याद्दशावरा ॥३॥** मनु. अ. १२। श्लो. १११

या सभेमध्ये चारही वेद, न्यायशास्त्र, निरुक्त, धर्मशास्त्र यांचे ज्ञान असलेले विद्वान सभासद असावेत परंतु ते ब्रह्मचारी, गृहस्थ अथवा वानप्रस्थी असावेत तेव्हा अशा सभेमध्ये दहाहून कमी विद्वान असू नयेत. ॥३॥

**ऋग्वेदविद्यजुर्विच्च सामवेदविदेव च ।**
**त्र्यवरा परिषज्ज्ञेया धर्मसंशयनिर्णये ॥४॥** मनु. अ. १२। श्लो. ११२

आणि त्या सभेमध्ये ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद जाणणारे किमान तीन सभासद तरी असावेत. त्यांनी व्यवस्था करावी. त्या सभेने केलेल्या नियमांचे उल्लंघन कोणी करू नये. ॥४॥

**एकोऽपि वेदविद्धर्मं यं व्यवस्येद् द्विजोत्तमः ।**
**स विज्ञेयः परो धर्मो नाज्ञानामुदितोऽयुतैः ॥५॥** मनु. अ. १२। श्लो. ११३

जरी एकच पण सर्व वेद जाणणारा, द्विजांमधील उत्तम संन्यासी ज्या धर्माची व्यवस्था (रचना) करील तोच सर्वश्रेष्ठ धर्म होय. कारण हजारो, लाखो, करोडो, अज्ञानी लोकांनी एकत्र येऊन जी काही व्यवस्था केली असेल ती मुळीच मानता कामा नये. ॥५॥

**अव्रतानाममन्त्रणां जातिमात्रोपजीविनाम् ।**
**सहस्रशः समेतानां परिषत्त्वं न विद्यते ॥६॥** मनु. अ. १२। श्लो. ११४

जे लोक ब्रह्मचर्य, सत्यभाषण आदी व्रत, वेदविद्या व विचार रहित, जन्मापासूनच जे शूद्राप्रमाणे वर्तन करतात असे हजारो पुरुष जमले तरी देखील सभा म्हणविली जाणार नाही. ॥६॥

**यं वदन्ति तमोभूता मूर्खा धर्ममतद्विदः ।**
**तत्पापं शतधा भूत्वा तद्वक्तॄननुगच्छति ॥७॥** मनु. अ. १२। श्लो. ११५

जे अविद्यावान, मूर्ख, वेदांचे ज्ञान नसणारे मनुष्य ज्याला धर्म म्हणतील त्याला मुळीच मान्यता देऊ नये. कारण जे लोक मूर्खांनी सांगितलेल्या धर्मानुसार चालतात त्यांचेमागे शेकडो प्रकारची पापे लागतात. ॥७॥

म्हणून विद्यासभा, धर्मसभा व राज्यसभा या तीन्ही संस्थांमध्ये मूर्खांना कधीही भरती करू नये. तथापि त्यांमध्ये नेहमीच विद्वान व धार्मिक पुरुषांना नियुक्त करावे. त्यात असणारे सर्व लोक असे असावेत :-

## राजा व सभासदांची योग्यता

**त्रैविद्येभ्यस्त्रयीं विद्यां दण्डनीतिं च शाश्वतीम् ।**
**आन्वीक्षिकीं चात्मविद्यां वार्त्तारम्भांश्च लोकतः ॥१॥** मनु.अ. ७ श्लो. ४३

ज्यांना चारही वेदांतील कर्म, उपासना व ज्ञान या तीन विद्या अवगत असतील, सनातन दंडनीती, न्यायविद्या व आत्मविद्या म्हणजे परमात्म्याचे गुण, कर्म व स्वभाव यथावत जाणण्याची ब्रह्मविद्या यांचे ज्ञान असेल तसेच लोकांशी संभाषणाचा प्रारंभ (सांगणे व विचारणे) ज्यांनी शिकून घेतला असेल तेच राजा, राजसभेचे सभासद किंवा सभापती होऊ शकतात. ॥१॥

**इंद्रियाणां जये योगं समातिष्ठेद्दिवानिशम् ।**
**जितेन्द्रियो हि शक्नोति वशे स्थापयितुं प्रजाः ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. ४४

सर्व सभासद व सभापती यांनी जितेन्द्रिय अर्थात इंद्रियांवर ताबा मिळवून सदैव धर्माप्रमाणे वर्तन करावे आणि अधर्मापासून दूर राहावे, दूर राहविल्या जावे त्यासाठी त्यांनी रात्रंदिन ठरलेल्या वेळी योगाभ्यास सुद्धा करावा. कारण जो जितेन्द्रिय आपल्या इंद्रियांना म्हणजे मन, प्राण व शरीररूपी प्रजेला जिंकल्याशिवाय तो आपल्या राज्यातील बाहेरील प्रजेला ताब्यात ठेवण्यास कधीही समर्थ होऊ शकणार नाही ॥२॥

## अठरा व्यसनांचा निषेध

**दश कामसमुत्थानि तथाष्टौ क्रोधजानि च।**

**व्यसनानि दुरन्तानि प्रयत्नेन विवर्जयेत्॥३॥** मनु. अ. ७ श्लो. ४५

कामापासून दहा व क्रोधापासून आठ दुष्ट व्यसने की ज्यामध्ये अडकलेला माणूस दृढोत्साही होऊन त्यांतून मोठ्या मुष्किलीने स्वतःची सुटका करू शकतो. म्हणून त्यांना माणसाने प्रयत्नपूर्वक सोडावे व सोडवावे. ॥३॥

**कामजेषु प्रसक्तो हि व्यसनेषु महिपतिः।**

**वियुज्यतेऽर्थधर्माभ्यां क्रोधजेष्वात्मनैव तु॥४॥** मनु. अ.७ श्लो. ४६

कारण जो राजा कामवासनेतून निर्माण होणाऱ्या दहा दुष्ट व्यसनांत फसतो तो अर्थाला म्हणजे राज्य, धन इत्यादींना मुकतो व धर्माला पारखा होतो; आणि जो क्रोधापासून उत्पन्न होणाऱ्या आठ वाईट व्यसनांत गुंततो त्याला तर शरीरालाही मुकावे लागते.॥४॥

**मृगयाक्षो दिवास्वप्नः परिवादः स्त्रियो मदः।**

**तौर्य्यत्रिकं वृथाट्या च कामजो दशको गणः॥५॥** मनु. अ.७ श्लो. ४७

कामापासून उत्पन्न होणारी व्यसने अशी आहेत :- मृगया म्हणजे शिकारीचा खेळ, (अक्ष) म्हणजे फाशांचा खेळ, जुगार, दिवसा झोपणे, कामविषयक गोष्टी करणे किंवा इतरांची निंदा करणे, अत्यधिक स्त्रीसंग करणे, मादक द्रव्यांचे म्हणजे दारू, अफू, भांग, गांजा, चरस इत्यादींचे सेवन करणे, गाणे-बजावणे, नाचणे, नाच करविणे, पाहणे व ऐकणे, निष्कारण इकडे तिकडे भटकणे ही दहा कामोत्पन्न व्यसने आहेत. ॥५॥

**पैशुन्यं साहसं द्रोह ईर्ष्यासूयार्थदूषणम्।**

**वाग्दण्डजं च पारुष्यं क्रोधजोऽपि गणोऽष्टकः॥६॥** मनु. अ. ७ श्लो. ४८

क्रोधापासून उत्पन्न होणारी आठ व्यसने अशी आहेत :- 'पैशुन्यम्' म्हणजे चुगली करणे, विचार न करता बळजबरीने एखाद्या स्त्रीशी कुकर्म करणे, द्रोह करणे, 'ईर्ष्या' म्हणजे दुसऱ्याची उन्नती पाहून जळफळणे, 'असूया' म्हणजे दोषांना गुण व गुणांना दोष समजणे, 'अर्थदूषण' म्हणजे अधर्मयुक्त दुष्कृत्यांमध्ये धनादीचा व्यय करणे, कठोर वचन बोलणे, अपराधावाचून टाकून बोलणे अथवा विशेष शिक्षा करणे, हे आठ दुर्गुण क्रोधापासून उत्पन्न होतात. ॥६॥

**द्वयोरप्येतयोर्मूलं यं सर्वे कवयो विदुः।**

**तं यत्नेन जयेल्लोभं तज्जावेतावुभौ गणौ॥७॥** मनु. अ. ७ श्लो. ४९

लोभापासून ही कामज व क्रोधज व्यसने निर्माण होतात ही गोष्ट सर्व विद्वान लोक जाणतात. म्हणून या सर्व दुर्गुणांच्या मुळाशी असलेल्या लोभाचा सर्वांनी प्रयत्नपूर्वक त्याग करावा. ॥७॥

**पानमक्षाः स्त्रियश्चैव मृगया च यथाक्रमम्।**

**एतत्कष्टतमं विद्याच्चतुष्कं कामजे गणे॥८॥** मनु. अ. ७ श्लो. ५०

कामापासून उत्पन्न होणाऱ्या दहा दुर्गुणांपैकी चार फारच भयंकर आहेत :- (१) मद्यादि मादक द्रव्यांचे सेवन. (२) फाशांचा खेळ किंवा जुगार. (३) स्त्रियांशी अती संग करणे. (४) शिकार खेळणे. ही चार महादुष्ट व्यसने आहेत. ॥८॥

**दण्डस्य पातनं चैव वाक् पारुष्यार्थदूषणे ।**
**क्रोधजेऽपि गणे विद्यात्कष्टमेतत्त्रिकं सदा ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. ५१

क्रोधापासून उत्पन्न होणाऱ्या आठ दुर्गुणांपैकी (१) अपराधावाचून शिक्षा करणे, (२) कठोर वचन बोलणे व (३) अन्यायत कामी द्रव्य खर्च करणे हे तीन दुर्गुण अत्यंत दुःखदायक आहेत. ॥९॥

**सप्तकस्यास्य वर्गस्य सर्वत्रैवानुषंकगिण: ।**
**पूर्वं पूर्वं गुरुतरं विद्यात् व्यसनमात्मवान् ॥१०॥** मनु. अ. ७। श्लो. ५२

या सात दुर्गुणांमध्ये पहिल्यापेक्षा दुसरा जास्त भयंकर आहे. द्रव्याच्या अपव्ययापेक्षा कठोर वचन, कठोर वचनापेक्षा अन्यायाने शिक्षा करणे, त्याहून शिकार खेळणे, त्याहून अधिक स्त्रियांशी जादा संग, त्याहून जुगार आणि त्याहून मद्यादी मादक पदार्थांचे सेवन करणे हे अत्यंत वाईट व्यसन आहे. ॥१०॥

**व्यसनस्य च मृत्योश्च व्यसनं कष्टमुच्यते ।**
**व्यसन्यधोऽधो व्रजति स्वर्यात्यव्यसनी मृत: ॥११॥** मनु. अ. ७। श्लो. ५३

वाईट व्यसनात रुतण्यापेक्षा मरणे जास्त चांगले, यात हाच निश्चय आहे. कारण दुराचारी पुरुष जास्त जगला तर तो अधिकाधिक पाप करून अधोगतीला जाणार व अधिकाधिक दुःखी होणार पण जो कोणत्याही व्यसनात गुंतत नाही तो मरून गेला तरी त्याला सदैव सुखच मिळत राहील. म्हणून विशेषत: राजा व सर्व मनुष्यांना उचित आहे की सर्वांनी शिकार, मद्यपान वगैरे दुष्ट व्यसनांपासून दूर राहून चांगली धर्मयुक्त सत्कृत्ये आपापल्या गुण-कर्म-स्वभावानुसार नेहमी करीत राहावे. ॥११॥

राजसभासद व मंत्री कसे असावेत ?

## राजसभासद व मंत्री यांचे लक्षण

**मौलान् शास्त्रविद: शूराँल्लब्धलक्ष्यान् कुलोद्गतान् ।**
**सचिवान्सप्त चाष्टौ वा प्रकुर्वीत परीक्षितान् ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. ५४

स्वराज्यात, स्वदेशात जन्मलेले, वेदादी शास्त्रे जाणणारे, शूरवीर, ज्यांचे लक्ष व विचार निष्फळ होत नाही आणि कुलीन, ज्यांची सर्व प्रकारे उत्तम परीक्षा करण्यात आलेली आहे, असे सात किंवा आठ उत्तम, धार्मिक, चतुर 'सचिवान्' म्हणजे मंत्री करावेत. ॥१॥

**अपि यत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करम् ।**
**विशेषतोऽसहायेन किन्तु राज्यं महोदयम् ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. ५५

कारण, अगदी सोपे काम असले तरी इतरांच्या विशेष मदतीशिवाय एकट्याने ते करणे अवघड जाते. असे असल्याने एवढा मोठा राज्य कारभार एकट्याला कसा चालविता येईल ? म्हणून एका माणसाला राजा बनविणे आणि त्याच्या एकट्याच्याच बुद्धीवर सारा राज्य कारभार सोपविणे अत्यंत वाईट आहे. ॥२॥

**तैः सार्द्धं चिन्तयेन्नित्यं सामान्यं सन्धिविग्रहम्।**
**स्थानं समुदयं गुप्तिं लब्धप्रशमनानि च ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. ५६

म्हणून सभापतीने नियमितपणे राज्यकारभारात कुशल अशा विद्वान मंत्र्यांशी विचार विनिमय करावा. कोणाशी (सन्धि) मैत्री, कोणाशी (विग्रह) संघर्ष करावा, (स्थान) परिस्थिती व काळवेळ पाहून केव्हा गप्प बसावे, आपल्या राज्याचे रक्षण करून कसे स्वस्थ राहावे, (समुदयम्) आपली बाजू वरचढ असेल अशावेळी दुष्ट शत्रूवर कशी चढाई करावी, (गुप्तिम्) मूळ राजसेना व खजिना आदीचे रक्षण कसे करावे, (लब्धप्रशमनानि) जे-जे प्रदेश मिळविले असतील तेथे उपद्रव देणाऱ्यांचा बंदोबस्त करून शांतता कशी स्थापन करावी या सहा गोष्टींचा दररोज मंत्र्यांशी विचार विनिमय करावा. ॥३॥

**तेषां स्वं स्वमभिप्रायमुपलभ्य पृथक् पृथक्।**
**समस्तानाञ्च कार्य्येषु विदध्याद्धितमात्मनः ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. ५७

विचारानेच प्रत्येक सभासदाशी वेगवेगळी सल्लामसलत करावी आणि सर्वांचे म्हणणे ऐकून घेतल्यावर बहुमतानुसार जे काम आपल्या व इतरांच्या हिताचे असेल ते करू लागावे. ॥४॥

**अन्यानपि प्रकुर्वीत शुचीन् प्राज्ञानवस्थितान्।**
**सम्यगर्थसमाहर्तॄनमात्यान्सुपरीक्षितान् ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. ६०

याचप्रमाणे आणखीही पवित्रात्मा, बुद्धिमंत, निश्चयात्मक बुद्धीचे, अनेक वस्तूंचा संग्रह करण्यात अत्यंत चतुर अशा लोकांची पारख करून त्यांना मंत्री बनवावे. ॥५॥

**निवर्त्ततास्य यावद्भिरितिकर्तव्यता नृभिः।**
**तावतोऽतन्द्रितान् दक्षान् प्रकुर्वीत विचक्षणान् ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. ६१

कार्यसिद्धीसाठी जितक्या माणसांची आवश्यकता असेल तेवढ्यांना उद्योगी, बलवान व अत्यंत चतुर अशा मुख्य मुख्य पुरुषांना अधिकारी म्हणजे नोकर करावे. ॥६॥

**तेषामर्थे नियुञ्जीत शूरान् दक्षान् कुलोद्गतान्।**
**शुचीनाकरकर्मान्ते भीरूनन्तर्निवेशने ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. ६२

त्यांच्या हाताखाली शूरवीर, बलवान, कुलीन, पवित्र नोकरांना मोठमोठ्या कामासाठी सोपवावीत आणि भिती बाळगणाऱ्या लोकांना घरातील कामांवर नेमावे. ॥७॥

## दूताचे लक्षण

**दूतं चैव प्रकुर्वीत सर्वशास्त्रविशारदम्।**
**इङ्गिताकारचेष्टज्ञं शुचिं दक्षं कुलोद्गतम् ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. ६३

जो प्रतिष्ठित कुळात जन्मला आहे, जो चतुर व पवित्र आहे, जो हावभाव व हालचाली यांवरून त्यांच्या अंतःकरणातील भाव ओळखतो व भावी काळात काय होणार ते जाणतो जो सर्व शास्त्रांमध्ये विशारद चतुर आहे त्या दूतालाही नोकरीवर ठेवावे. ॥८॥

**अनुरक्तः शुचिर्दक्षः स्मृतिमान् देशकालवित् ।**
**वपुष्मान्वीतभीर्वाग्मी दूतो राज्ञः प्रशस्यते ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. ६४

हा राजदूत असा असावा की जो राज्य कारभारात स्वारस्य असणारा, अत्यंत उत्साही, निष्कपटी, पवित्रात्मा, चतुर, खूप जुन्या काळच्या गोष्टी न विसरणारा, देशकाळावर्तमानाप्रमाणे वर्तनानुसार वर्तमान कार्यकर्ता, सुंदर, देखणा, निर्भय व मोठा वक्ता असावा. तोच राजाचा दूत होण्यास प्रशस्त आहे. ॥९॥

कोणाला कोणते अधिकार देणे योग्य आहेत ?

## मंत्र्यांचे कार्य

**अमात्ये दण्ड आयत्तो दण्डे वैनयिकी क्रिया ।**
**नृपतौ कोशराष्ट्रे च दूते सन्धिविपर्ययौ ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. ६५

अमात्याला दंडाधिकार असावा. दंड म्हणजे शिक्षा देताना विनयता अर्थात कोणावरही अन्याय रुप दंड होता कामा नये राजाचे अधिनस्थ राज्याचा खजिना व सर्व कामे राजसभेच्या आधीन असावीत; आणि कोणाशीही मैत्री किंवा वैर करण्याचा अधिकार दूताला द्यावा. ॥१॥

**दूत एव हि सन्धत्ते भिनत्त्येव च संहतान् ।**
**दूतस्तत्कुरुते कर्म भिद्यन्ते येन वा न वा ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. ६६

ज्यांच्यात फूट पडली आहे त्यांच्यात मेळ आणि एकी झालेल्या दुष्टांमध्ये फाटाफूट निर्माण करावी दूताने असे कार्य करावे जेणेकरून शत्रूंमध्ये फूट पडावी हे कार्य करणाऱ्यास दूत असे म्हणतात. ॥२॥

**बुद्ध्वा च सर्वं तत्त्वेन परराज चिकीर्षितम् ।**
**तथा प्रयत्नमातिष्ठेद्यथात्मानं न पीडयेत् ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. ६८

सभापती व सर्व सभासद किंवा दूतादी यथायोग्याकडून दुसऱ्या विरोधी राजाचा हेतू ओळखून त्या राजापासून आपल्याला त्रास होणार ना ही, असा प्रयत्न करावा. ॥३॥

### राजरक्षणाचे उपाय

## दुर्गाची लक्षणे

**धनुर्दुर्गं महीदुर्गमब्दुर्गं वार्क्षमेव वा ।**
**नृदुर्गं गिरिदुर्गं वा समाश्रित्य वसेत्पुरम् ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. ७०

यासाठी जेथे सुंदर जंगल आहे व धनधान्य उत्तम प्रकारे उत्पन्न होऊ शकते अशा ठिकाणी (धनुर्दुर्गम्) धनुर्धारी पुरुषांनी वेढलेला (महीदुर्गम्) भुईकोट किल्ला बांधावा. त्याच्या सभोवती (अब्दुर्गम्) पाण्याने भरलेला खंदक असावा. तसेच (वार्क्षम्) चारही बाजूंना वन असावे, (निदुर्गम्) चारही बाजूंना सेना रहावी, (गिरिदुर्गम्) सभोवती डोंगर असून मध्ये परकोट बांधून त्याच्या आत नगर वसवावे. ॥४॥

**एकः शतं योधयति प्राकारस्थो धनुर्धरः ।**
**शतं दशसहस्त्राणि तस्माद्दुर्गं विधीयते ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. ७४

नगराच्या चारी बाजूंना (प्राकार) प्रकोट बांधावेत. कारण प्राकारात असणारा एक वीर धनुर्धारी शस्त्रसज्ज पुरुष शंभर माणसांशी लढू शकतो आणि असे शंभर वीर दहा हजारांशी युद्ध करू शकतात. म्हणून दुर्ग किंवा किल्ले बांधणे उचित आहे. ॥५॥

**तत्स्यादायुधसम्पन्नं धनधान्येन वाहनैः ।**
**ब्राह्मणैः शिल्पिभिर्यन्त्रैर्यवसेनोदकेन च ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. ७५

त्या दुर्गामध्ये शस्त्रास्त्रे, धन-धान्य, वाहने, अध्यापन व उपदेश करणारे ब्राह्मण, कारागीर, यंत्रे, नाना प्रकारच्या कला, (यवसेन) चारा, गवत व पाणी इत्यादींचा साठा संपन्न अर्थात परिपूर्ण असावा. ॥६॥

**तस्य मध्ये सुपर्याप्तं कारयेद् गृहमात्मनः ।**
**गुप्तं सर्वर्त्तुकं शुभ्रं जलवृक्षसमन्वितम् ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. ७६

त्याच्या मध्यभागी जल, वृक्ष, पुष्प आदी सर्वप्रकारे सुरक्षित, सर्व ऋतूंमध्ये सुखकारक, श्वेतवर्ण आणि सारा राज्यकारभार चालविण्यास पुरेल असे विशाल भवन आपल्यासाठी राजाने बनवावे. ॥७॥

**तदध्यास्योद्वहेद्भार्यां सवर्णां लक्षणान्विताम् ।**
**कुले महति सम्भूतां हृद्यां रूपगुणान्विताम् ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. ७७

त्याप्रमाणे ब्रह्मचर्याश्रमात विद्या शिकून इतके राजकार्य केल्यानंतर सौंदर्यवती, गुणवान, हृदयाला प्रिय वाटणारी, उत्तम कुळात जन्मलेली सुंदर लक्षणांनी युक्त, क्षत्रिय कुळातील आणि आपल्या सारख्याच विद्यादी गुणकर्म स्वभावाने युक्त असणाऱ्या या एकाच कन्येशी विवाह करावा इतर सर्व स्त्रियां अगम्य समजून त्यांच्याकडे नजरेनेही पाहू नये. ॥८॥

**पुरोहितं प्रकुर्वीत वृणुयादेव चर्त्विजम् ।**
**तेऽस्य गृह्याणि कर्माणि कुर्य्युर्वैतानि कानि च ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. ७८

राजघरातील अग्निहोत्र व पक्षेष्टी वगैरे धार्मिक कृत्ये करण्यासाठी पुरोहित व ऋत्विज यांचा स्विकार करावा आणि आपण सदैव राज्यकारभारात तत्पर राहावे. रात्रंदिवस राजकार्यामध्ये गढून जाणे आणि कोणतेही राजकार्य बिघडू न देणे हेच राजाचे संध्योपासनादी कर्म आहे. ॥९॥

## राज्यकारभाराचे सामान्य नियम

**सांवत्सरिकमाप्तैश्च राष्ट्रादाहारयेद् बलिम् ।**
**स्याच्चाम्नायपरो लोके वर्त्तेत पितृवन्नृषु ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. ८०

राजाने प्रजेकडून वार्षिक कर आप्त-विद्वान् पुरुषांद्वारे ग्रहण करावा. सभापतीरूपी राजाने व इतर प्रमुख मंडळींनी वेदानुकूल वागावे व प्रजेचे पित्याप्रमाणे पालन करावे. ॥१॥

**अध्यक्षान्विविधान् कुर्यात् तत्र तत्र विपश्चितः ।**
**तेऽस्य सर्वाण्यवेक्षेरन् नृणां कार्याणि कुर्वताम् ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. ८१

राज्य कारभारासाठी विविध प्रकारच्या विद्वान अध्यक्षांची नेमणूक करावी. राज्यकारभार चालविण्यासाठी नेमलेले पुरुष आपापली कामे नियमानुसार करतात की नाही ते पाहणे, जे योग्य प्रकारे कामे करीत असतील त्यांचा सत्कार करणे व जे आपले काम नीट करीत नसतील त्यांना यथोचित शिक्षा करावी. ॥२॥

**आवृत्तानां गुरुकुलाद्विप्राणां पूजको भवेत् ।**
**नृपाणामक्षयो ह्येष निधिर्ब्राह्मो विधीयते ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. ८२

सदैव वेदप्रचार हे राजाचे मुख्य काम आहे. तो त्यांचा अक्षय कोष आहे. जो कोणी यथावत ब्रह्मचर्याचे पालन करून वेदादी शास्त्रे शिकून गुरुकुलातून येईल त्याचा सत्कार राजा व सभा यांनी योग्यप्रकारे करावा. त्याचप्रमाणे उत्तम प्रकारे शिकवून आपल्या विद्यार्थ्यांना विद्वान बनविणाऱ्यांचाही सत्कार करावा. असे केल्याने राज्यामध्ये विद्येचा प्रसार होऊन सर्व प्रकारे उन्नती होते. ॥३॥

## राजाचे युद्धाविषयी कर्तव्य

**समोत्तमाधमै राजा त्वाहूतः पालयन् प्रजाः ।**
**न निवर्वेत संग्रामात् क्षात्रं धर्ममनुस्मरन् ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. ८७

आपल्या प्रजेचे यथायोग्य पालन करणाऱ्या राजाला त्याच्यापेक्षा लहान, बरोबरीचा किंवा मोठा राजा युद्धाचे आव्हान देईल तेव्हा क्षात्रधर्माला स्मरून त्याने युद्धापासून कधी परावृत्त होऊ नये. त्याने मोठ्या चातुर्याने युद्ध करून जय मिळवावा. ॥४॥

**आहवेषु मिथोऽन्योन्यं जिघांसन्तो महीक्षितः ।**
**युध्यमानाः परं शक्त्या स्वर्गं यान्त्यपराङ्मुखाः ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. ८९

संग्रामांमध्ये एकमेकांना ठार मारण्याची इच्छा बाळगणारे जे राजे लोक आपले सारे सामर्थ्य पणाला लावून, निर्भयपणे, शत्रूला पाठ न दाखविता, युद्ध करतात त्यांना सुख प्राप्त होते. म्हणून युद्धापासून कधीही विमुख होऊ नये. मात्र कधी-कधी शत्रूवर जय मिळविण्यासाठी त्याला हुलकावणी देणे, त्याच्या नजरेआड होणे योग्य असते. कारण कसेही करून शत्रूवर जय मिळविण्याचेच कार्य करावे. एखादा क्रुद्ध सिंह पुढे येऊन शस्त्राग्नीमध्ये झटकन भस्म होऊन जातो. तसे मूर्खपणाने नष्ट होऊ नये. ॥५॥

## युद्धाचे नियम

**न च हन्यात्स्थलारूढं न क्लीबं न कृताञ्जलिम् ।**
**न मुक्तकेशं नासीनं न तवास्मीति वादिनम् ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. ९१

युद्धाच्या वेळी इकडे-तिकडे उभे असणारे, नपुंसक, हात जोडणारे, ज्यांच्या डोकीचे केस विस्कटले आहेत असे, बसलेले, 'मी तुला शरण आलो,' असे म्हणणारे, ॥६॥

**न सुप्तं न विसन्नाहं न नग्नं न निरायुधम् ।**
**नायुध्यमानं पश्यन्तं न परेण समागतम् ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. ९२

निजलेले, मूर्च्छित झालेले, नग्न, निःशस्त्र, युद्ध करणाऱ्यांकडे पाहात असलेले, शत्रूच्या बरोबर आलेले (पण त्याला प्रत्यक्ष साह्य न करणारे) ॥७॥

**नायुधव्यसनं प्राप्तं नार्त्तं नातिपरिक्षतम् ।**
**न भीतं न परावृत्तं सतां धर्ममनुस्मरन् ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. ९३

आयुधांच्या प्रहाराने जखमी झालेले, दुःखी, अत्यंत घायाळ झालेले, घाबरलेले व पळून चाललेले, अशा प्रकारच्या लोकांना, सत्पुरुषांच्या धर्माचे स्मरण करून वीर पुरुषांनी कधी मारू नये. पण त्यांना पकडून त्यांच्यापैकी जे चांगले असतील त्यांना तुरुंगात ठेवावे व त्यांच्या खाण्यापिण्याची नीट व्यवस्था ठेवावी; आणि जे घायाळ झाले असतील त्यांच्यावर विधिप्रमाणे औषधोपचार करावेत. त्यांना हिणवू नये अथवा दुःख देऊ नये. त्यांच्याकडून करवून घेण्यासारखी कामे करवून घ्यावीत. स्त्रिया, मुले, म्हातारे आणि आतुर व दुःखी पुरुष यांच्यावर कधीही शस्त्र चालवू नये. या गोष्टींवर विशेष लक्ष द्यावे. कैद केलेल्या लोकांच्या मुलाबाळांचे पालन पोषण स्वतःच्या मुलाप्रमाणे करावे आणि त्यांच्या स्त्रियांचेही पालन पोषण करावे. त्या आपल्या आया-बहिणी किंवा मुलीबाळी आहेत असे समजावे. त्यांच्याकडे कधी वैषयिक नजरेने पाहू नये. जेव्हा राज्यात पूर्ववत शांतता प्रस्थापित होईल आणि पुनः युद्ध होण्याची शक्यता दिसणार नाही तेव्हा पकडलेल्या लोकांना सन्मानपूर्वक सोडून द्यावे आणि त्यांच्या घरी अथवा देशाला पाठवून द्यावे. ज्यांच्यापासून भावी काळात धोका संभवणार असेल त्यांना कायमचे तुरुंगात डांबून ठेवावे. ॥८॥

## योद्ध्याचे कर्तव्य

**यस्तु भीतः परावृत्तः सङ्ग्रामे हन्यते परैः ।**
**भर्तुर्यद् दुष्कृतं किञ्चित् तत्सर्वं प्रतिपद्यते ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. ९४

जो समरांगणातून पळून जातो आणि घाबरून पळत असता शत्रूकडून मारला जातो त्याला त्याच्या मालकाचे अपराध लागल्यामुळे तो शिक्षा भोगण्यास पात्र होतो. ॥९॥

**यच्चास्य सुकृतं किञ्चित् अमुत्रार्थमुपार्जितम् ।**
**भर्त्ता तत्सर्वमादत्ते परावृत्तहतस्य तु ॥१०॥** मनु. अ. ७। श्लो. ९५

त्याच्या ज्या सुकृतामुळे किंवा प्रतिष्ठेमुळे त्याला इहलोकी व परलोकी सुख मिळाले असते ते सुकृत त्याच्या धन्याला प्राप्त होते. अर्थात जो पळून जातो किंवा मारला जातो त्याला कसलेच सुख मिळत नाही. त्याचे सारे पुण्यफळ नष्ट होते. मात्र ज्याने धर्मयुद्ध केले असेल त्याला प्रतिष्ठा प्राप्त होते. ॥१०॥

**रथाश्वं हस्तिनं छत्रं धनं धान्यं पशून्स्त्रियः ।**
**सर्वद्रव्याणि कुप्यं च यो यज्जयति तस्य तत् ॥११॥** मनु. अ. ७। श्लो. ९६

लढाईमध्ये रथ, घोडे, हत्ती, छत्र, धन-धान्य, गाय वगैरे पशू आणि स्त्रिया तसेच इतर सर्व प्रकारची द्रव्ये, तूप, तेल यांचे साठे इत्यादी ज्या काही गोष्टी नोकराने अथवा अध्यक्षाने जिंकून घेतल्या असतील त्यांचा स्वीकार त्यांनी करावा. हा नियम केव्हाही मोडू नये. ॥११॥

**राज्ञश्च दद्युरुद्धारमित्येषा वैदिकी श्रुतिः ।**
**राज्ञा च सर्वयोधेभ्यो दातव्यमपृथग्जितम् ॥१२॥** मनु. अ. ७। श्लो. ९७

परंतु सैन्यातील लोकांनीही स्वतः जिंकलेल्या वस्तूंपैकी सोळावा भाग राजाला द्यावा. त्याचप्रमाणे जे धन सर्वांना मिळून जिंकून आणले असेल त्याचा सोळावा भाग सैन्यातील योद्ध्यांना द्यावा. तसेच जो कोणी युद्धात

मारला गेला असेल त्याची पत्नी व मुले यांना त्यांचा भाग द्यावा; आणि त्याच्या पत्नीचे व अज्ञान बालकांचे यथायोग्य पालनपोषण करावे. जेव्हा ती मुले मोठी होऊन सज्ञान बनतील तेव्हा त्यांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे अधिकार द्यावेत. जो कोणी आपल्या राज्याचे रक्षण, वृद्धी, प्रतिष्ठा, विजय व आनंदवृद्धी व्हावी अशी इच्छा बाळगत असेल त्याने या मर्यादेचे उल्लंघन कधीही करू नये. ॥१२॥

## राज्य रक्षणाचे उपाय

**अलब्धं चैव लिप्सेत लब्धं रक्षेत्प्रयत्नतः ।**
**रक्षितं वर्द्धयेच्चैव वृद्धं पात्रेषु निःक्षिपेत् ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. ९९

राजा आणि राजसभा यांनी अलब्ध वस्तूच्या प्राप्तीची इच्छा, जे प्राप्त होईल त्याचे प्रयत्नपूर्वक रक्षण, रक्षित गोष्टींमध्ये वाढ आणि वाढलेल्या धनाचा उपयोग वेदविद्याप्रसार, धर्माचा प्रचार, विद्यार्थी, वेदमार्गोपदेशक तसेच असमर्थ अनाथ यांचे पालनपोषण करण्यासाठी करावा. ॥१॥

**अलब्धमिच्छेद्दण्डेन लब्धं रक्षेदवेक्षया ।**
**रक्षितं वर्द्धयेद् वृद्ध्या वृद्धं दानेन निःक्षेत् ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १०१

हे चार प्रकारचे पुरुषार्थाचे प्रयोजन जाणून घ्यावे आणि आळस सोडून त्यांचे उत्तम प्रकारे सदा अनुष्ठान करावे. दंडाच्या साह्याने अप्राप्त वस्तू प्राप्त करून घेण्याची इच्छा, प्राप्त वस्तूवर नेहमी लक्ष ठेवून तिचे रक्षण, रक्षित वस्तूची वृद्धि म्हणजे व्याज वगैरे उपायांनी धन वाढवावे आणि वाढविलेल्या धनाचा विनियोग वर सांगितलेल्या कामांसाठी नेहमी करावा. ॥२॥

## दक्षता

**अमाययैव वर्तेत न कथंचन मायया ।**
**बुध्येतारिप्रयुक्तां च मायां नित्यं स्वसंवृतः ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १०४

केव्हाही कोणाशीही कपट करू नये परंतु सर्वांशी निष्कपटपणे वागावे. सदैव आपले रक्षण करून शत्रूने केलेले छल कपटाचे डावपेच ओळखून ते निरस्त काढावेत. ॥३॥

**नास्य छिद्रं परो विद्याच्छिद्रं विद्यात्परस्य तु ।**
**गूहेत्कूर्म इवाङ्गानि रक्षेद्विवरमात्मनः ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. १०५

कोणी शत्रू आपली छिद्रे म्हणजे कमजोरी जाणू शकणार नाही आणि आपण मात्र शत्रूची छिद्रे जाणत राहावे. ज्याप्रमाणे कासव आपली अंगे झाकून ठेवतो त्याप्रमाणे ज्या छिद्रांतून शत्रूला प्रवेश करता येईल अशी छिद्रे गुप्त ठेवावीत. ॥४॥

**बकवच्चिन्तयेदर्थान् सिंहवच्च पराक्रमेत् ।**
**वृकवच्चावलुम्पेत शशवच्च विनिष्पतेत् ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. १०६

बगळा जसा ध्यानस्थ होऊन मासळी पकडण्यासाठी टपून असतो तसा धनसंग्रहाचा सतत विचार करावा. द्रव्यादी गोष्टींची व सामर्थ्याची वृद्धी करून शत्रूला जिंकण्यासाठी सिंहाप्रमाणे पराक्रम करावा. चित्त्याप्रमाणे

दबा धरून शत्रूला पकडावे. बलवान शत्रूपासून सशाप्रमाणे दूर पळून जावे आणि मग डावपेच करून त्याला पकडावे. ॥५॥

**एवं विजयमानस्य येऽस्य स्युः परिपन्थिनः ।**

**तानानयेद्वशं सर्वान् सामादिभिरुपक्रमैः ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. १०७

अशा प्रकारे विजयी होणाऱ्या सभापतीच्या राज्यात जे कोणी परिपंथी म्हणजे वाटमाऱ्ये, दरोडेखोर, लुटारू असतील त्यांना साम, दाम, भेद व दंड या उपायांनी वश करून घ्यावे. साम म्हणजे मिळवून घेणे, दाम म्हणजे पैसा वगैरे देणे, भेद म्हणजे फंदफितुरी करणे आणि दंड म्हणजे शिक्षा किंवा युद्ध करणे. पहिल्या तीन उपयांनी आपले अधिकारात करावे आणि जर यामुळे अधीन झाला नाही तरच अति कठीण दंडाचा चौथा उपाय करावा. ॥६॥

**यथोद्धरति निर्दाता कक्षं धान्यं च रक्षति ।**

**तथा रक्षेन्नृपो राष्ट्रं हन्याच्च परिपन्थिनः ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. ११०

ज्याप्रमाणे धान्य निसविणारा धान्याची टरफले काढून धान्याचे रक्षण करतो, म्हणजे धान्याचे दाणे तुटू देत नाही त्याप्रमाणे राजाने चोर व दरोडेखोर यांना मारून राज्याचे रक्षण करावे. ॥७॥

**मोहाद्राजा स्वराष्ट्रं यः कर्षयत्यनवेक्षया ।**

**सोऽचिराद् भ्रश्यते राज्याजीविताच्च सबान्धवः ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. १११

जो राजा मोहाने, अविचाराने आपले राज्य दुर्बळ करतो तो आपले राज्य घालवून बसतो आणि आपल्या बांधवांसह जिवंतपणीच बघता बघता नष्टभ्रष्ट होऊन जातो. ॥८॥

**शरीरकर्षणात्प्राणाः क्षीयन्ते प्राणिनां यथा ।**

**तथा राज्ञामपि प्राणाः क्षीयन्ते राष्ट्रकर्षणात् ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. ११२

ज्याप्रमाणे प्राण्यांचे प्राण शरीराला कृश केल्याने क्षीण होतात त्याप्रमाणे प्रजेला दुर्बळ बनविल्याने राजांचे प्राण म्हणजे सामर्थ्य आदी बंधुसह नष्ट होऊन जातात. ॥९॥

**राष्ट्रस्य संग्रहे नित्यं विधानमिदमाचरेत् ।**

**सुसंगृहीतराष्ट्रो हि पार्थिवः सुखमेधते ॥१०॥** मनु. अ. ७। श्लो. ११३

म्हणून ज्यायोगे राज्यकारभार नीट चालत राहील असा प्रयत्न राजा व राजसभा यांनी राजकार्याच्या सिद्धीसाठी करीत राहावे. जो राजा राज्यपालनाच्या बाबतीत सर्व प्रकारे तत्पर असतो त्याचे सुख सदैव वाढत राहते. ॥१०॥

**द्वयोस्त्रयाणां पञ्चानां मध्ये गुल्ममधिष्ठितम् ।**

**तथा ग्रामशतानां च कुर्य्याद्राष्ट्रस्य संग्रहम् ॥११॥** मनु. अ. ७। श्लो. ११४

म्हणून दोन, तीन, पाच आणि शंभर गावांमध्ये एक राजस्थान म्हणजे प्रशासकीय कार्यालय स्थापन करावे. त्यामध्ये यथायोग्य नोकर म्हणजे कामदार वगैरे राजपुरुषांची नियुक्ती करून साऱ्या राज्याचा कारभार चालवावा. ॥११॥

# ग्राम-प्रमुखाचे वर्णन

**ग्रामस्याधिपतिं कुर्याद्दशग्रामपतिं तथा ।**
**विंशतीशं शतेशं च सहस्त्रपतिमेव च ॥१२॥** मनु. अ. ७। श्लो. ११५

प्रत्येक गावात एकेक प्रधान पुरुष नेमावा. दर दहा गावांवर आणखी एक अधिकारी, वीस गावांवर तिसरा अधिकारी, शंभर गावांवर चौथा व हजार गावांवर पाचवा अधिकारी नेमावा. आजकाल एका गावासाठी एक तलाठी (पटवारी), दहा गावांसाठी एक ठाणेदार, दोन ठाण्यांवर एक मोठा ठाणेदार, पाच ठाण्यांवर एक तहसीलदार (मामलेदार) असतो आणि दहा तहशिली मिळून एक जिल्हा बनतो. ही सारी व्यवस्था मनुस्मृती आदी धर्मशास्त्रांतील राजनीतीचा प्रकार घेतला आहे. ॥१२॥

**ग्रामदोषान्समुत्पन्नान् ग्रामिकः शनकैः स्वयम् ।**
**शंसेद ग्रामदशेशाय दशेशो विंशतीशिनम् ॥१३॥** मनु. अ. ७। श्लो. ११६

या संबंधात अशी व्यवस्था करावी व आज्ञा देऊन ठेवावी की प्रत्येक गावाच्या सभापतीने आपल्या गावात नेहमी जे दोष उत्पन्न होतील ते गुप्तपणे दहा गावांच्या सभापतीला कळवावेत. त्या दहा गावांच्या सभापतीने याच प्रकारे वीस गावांच्या अधिपतीला आपापल्या गावांतील दररोजचे वर्तमान कळवावे. ॥१३॥

**विंशतीशस्तु तत्सर्वं शतेशाय निवेदयेत् ।**
**शंसेद ग्रामशतेशस्तु सहस्त्रपतये स्वयम् ॥१४॥** मनु. अ. ७। श्लो. ११७

वीस गावांच्या अधिपतीने आपल्या वीस गावांची बातमी शतग्रामाधिपतीला दरदिवशी नियमितपणे कळवावी; त्या शंभर गावांच्या अधिपतींनी सहस्त्राधिपतीला आपापल्या शंभर गावांची हकीगत दररोज कळवाव. वीस-वीस ग्रामांचे पाच अधिपती शंभर गावांच्या अध्यक्षाला व शंभर गावांच्या अध्यक्षांनी सहस्त्र गावांच्या अधिपतीला, सहस्त्र गावांच्या दहा अधिपतींनी दहा हजार गावांच्या अधिपतीला आणि त्या प्रत्येकी दहा हजार गावांच्या दहा अधिपतींनी लक्षग्रामांवर नियंत्रण ठेवणाऱ्या राजसभेला रोजची हकीगत कळवावी. अशाच प्रकारे सर्व राजसभांनी महाराजसभेला म्हणजे सार्वभौम चक्रवर्ती महाराज सभेला साऱ्या भूमंडळाचे वृत्त कळवावे.॥१४॥

**तेषां ग्राम्याणि कार्याणि पृथक्कार्याणि चैव हि ।**
**राज्ञोऽन्यः सचिवः स्निग्धस्तानि पश्येदतन्द्रितः ॥१५॥** मनु. अ. ७। श्लो. १२०

दहा हजार गावांच्या एकेका गटावर दोन सभापतींची नेमणूक करावी. त्यांतील एक जण राजसभेचा प्रतिनिधी असावा व दुसरा अध्यक्ष असावा. त्याने आळस सोडून न्यायाधीश आदि सर्व राजपुरुषाच्या कामाची नेहमी फिरत राहून पाहणी करावी, आपापली कामे नीट करतात की नाही ते पाहावे. ॥१५॥

**नगरे नगरे चैकं कुर्यात्सर्वार्थचिन्तकम् ।**
**उच्चैः स्थानं घोररुपं नक्षत्राणामिव ग्रहम् ॥१६॥** मनु. अ. ७। श्लो. १२१

मोठमोठ्या शहरांमध्ये कामासंबंधी एक एक विचार करणारी सभा असावी. त्या एकेका सभेचे भवन उंच, विशाल, भव्य व चंद्रासारखे देखणे असावे. त्या सभेमध्ये मोठमोठ्या ज्ञानवृद्ध ज्यांनी विद्येद्वारा सर्व

प्रकारची परीक्षा केली असेल त्यांनी बसून विचारविनिमय करावा. ज्या नियमांनी राजा व प्रजा यांची उन्नती होईल तसे तसे नियम आणि विद्येचा प्रचार-प्रसार करावा. ॥१६॥

**स तानुपरिक्रामेत्सर्वानेव सदा स्वयम्।**
**तेषां वृत्तं परिणयेत्सम्यग्राष्ट्रेषु तच्चरैः ॥१७॥** मनु. अ. ७। श्लो. १२२

नित्य फिरणारा असेल त्याच्या हाताखाली सर्व गुप्तचर म्हणजे दूत ठेवावेत. ते राजपुरुष व प्रजापुरुष यांच्याशी नित्य संबंध ठेवणारे व वेगवेगळ्या योग्यतेचे असावेत. या हेरांकडून त्याने राज व प्रजापुरुषांचे सर्व गुणदोष गुप्तपणे जाणून घ्यावेत. जे अपराधी असतील त्यांना शिक्षा करावी आणि जे गुणी असतील त्यांचा नेहमी सन्मान करीत जावा. ॥१७॥

**राज्ञो हि रक्षाधिकृताः परस्वादायिनः शठाः।**
**भृत्या भवन्ति प्रायेण तेभ्यो रक्षेदिमाः प्रजाः ॥१८॥** मनु. अ. ७। श्लो. १२३

राजाने धार्मिक वृत्तीच्या, कुलीन, नीट पारख करण्यात आलेल्या विद्वान लोकांनाच प्रजेच्या रक्षणाचा अधिकार द्यावा. त्यांच्या हाताखाली बहुधा लबाड, पर पदार्थ हरण करणारे चोर, दरोडेखोर यांनाही नोकर म्हणून नेमावे. त्यांना दुष्कृत्यांपासून परावृत्त करण्यासाठी त्यांना राजाचे नोकर बनवून जनतेचे रक्षण करणाऱ्या विद्वानांच्या स्वाधीन करावे. अशा प्रकारे त्यांच्यापासून या प्रजेचे रक्षण यथायोग्य करावे. ॥१८॥

**ये कार्यिकेभ्योऽर्थमेव गृह्णीयुः पापचेतसः।**
**तेषां सर्वस्वमादाय राजा कुर्यात् प्रवासनम् ॥१९॥** मनु. अ. ७। श्लो. १२४

जे राजपुरुष अन्यायाने वादी व प्रतिवादी यांच्याकडून गुप्तपणे लाच घेतात व पक्षपात करून अन्याय करतात, त्यांचे सर्वस्व हरण करून त्यांना यथायोग्य शिक्षा करून त्यांना अशा ठिकाणी ठेवावे की जेथून ते परत येऊ शकणार नाहीत कारण जर अशा लाचखाऊ नोकरांना कडक शिक्षा दिली गेली नाही तर त्यांचे पाहून इतर राजपुरुषही तशीच दुष्कृत्ये करतील. परंतु त्यांना शिक्षा दिल्यास इतर लोक लाचलुचपतीपासून दूर राहतील परंतु जितक्या पैशांनी राजपुरुषांचा योगक्षेम उत्तम प्रकारे चालेल व ते बऱ्यापैकी धनाढ्यही बनू शकतील एवढे धन अथवा भूमी शासनातर्फे त्यांना दिली जावी. त्यांचे वेतन मासिक अथवा वार्षिक असावे किंवा एकाच हप्त्यात दिले जावे आणि राजपुरुष वृद्ध झाल्यानंतर त्यांना त्यांचा निम्मा पगार जीवंत असेपर्यंत उदर भरण्यासाठी मिळावा. त्यांच्या निधनानंतर तो बंद व्हावा. मात्र त्यांच्या मुलांचा सत्कार त्यांच्या गुणानुसार करावा अथवा त्यांच्या लायकीप्रमाणे नोकरी अवश्य द्यावी. मृत राजपुरुषांची मुले लहान असतील व पत्नी जिवंत असेल त त्या सर्वांच्या पोटापाण्याची योग्य ती व्यवस्था शासनाकडून व्हावी. मात्र मृत राजपुरुषांची मुले अथवा स्त्री दुराचारी असतील तर त्यांना काहीही देऊ नये. अशी नीति राजाने बरोबर ठेवावी. ॥१९॥

## कर वसूली

**यथा फलेन युज्येत राजा कर्त्ता च कर्मणाम्।**
**तथाऽवेक्ष्य नृपो राष्ट्रे कल्पयेत्सततं करान् ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १२८

राजा व कर्मचारी राजपुरुष आणि प्रजा यांना सुख व्हावे म्हणून राजा व राजसभा यांनी आपसात विचार विनिमय करून कर बसवावा. ॥१॥

**यथाल्पाऽल्पमदन्त्याद्यं वार्य्योकोवत्सषट्पदा: ।**
**तथाऽल्पाऽल्पो ग्रहीतव्यो राष्ट्रद्राज्ञाब्दिक: कर: ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १२९

ज्याप्रमाणे जळू, वासरू व भुंगा हे आपल्या भोग्य पदार्थांचे (म्हणजे रक्त, दूध व मध यांचे) थोडे-थोडे ग्रहण किंवा शोषण करतात त्याप्रमाणे राजाने प्रजेकडून थोडा-थोडा वार्षिक कर घ्यावा. ॥२॥

**नोच्छिन्द्यादात्मनो मूलं परेषां चातितृष्णया ।**
**उच्छिन्दन्ह्यात्मनो मूलमात्मानं तांश्च पीडयेत् ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १३९

अतिलोभाने आपल्या व इतरांच्या सुखाचे मूळच कधीही नष्ट करू नये. कारण जो व्यवहार व सुख यांची मुळेच उपटून टाकतो तो स्वत:ला व इतरांना दु:खात लोटतो. ॥३॥

**तीक्ष्णश्चैव मृदुश्च स्यात्कार्यं वीक्ष्य महीपति: ।**
**तीक्ष्णश्चैव मृदुश्चैव राजा भवति सम्मत: ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. १४०

जो महीपती कार्यानुसार कठोर किंवा कोमल बनतो तो दुष्टांशी कठोर व सज्जनांशी सौम्य वागणूक ठेवल्याने सर्वांना प्रिय होतो. ॥४॥

## प्रजेचे रक्षण

**एवं सर्वं विधायेदमितिकर्तव्यमात्मन: ।**
**युक्तश्चैवाप्रमत्तश्च परिरक्षेदिमा: प्रजा: ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. १४२

अशा प्रकारे सर्व राज्याची व्यवस्था लावून सदैव लक्ष देऊन, राजाने प्रमादरहित होऊन प्रजेचे निरंतर पालन करावे. ॥५॥

**विक्रोशन्त्यो यस्य राष्ट्राद् ह्रियन्ते दस्युभि: प्रजा : ।**
**सम्पश्यत: सभृत्यस्य मृत: स न जीवति ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. १४३

ज्या राजाच्या राज्यात त्याच्या अधिकाऱ्यांच्या डोळ्यादेखत चोर व लुटारू आक्रोश करणाऱ्या प्रजेचे वित्त व प्राण हरण करतात. तो राजा आपले नोकर-चाकर व मंत्री-अमात्य यांच्यासह जिवंत असून मेलेलाच आहे व महादु:ख भोगण्याच्या लायकीचा आहे. ॥६॥

**क्षत्रियस्य परो धर्म: प्रजानामेव पालनम् ।**
**निर्दिष्टफलभोक्ता हि राजा धर्मेण युज्यते ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. १४४

म्हणून प्रजेचे पालन करणे हाच राजांचा परम धर्म आहे. मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायामध्ये ज्याप्रकारे कर घ्यावा असे लिहले आहे त्या प्रकारे व राजसभा ठरवील तेवढाच कर घेणारा राजा धर्माने युक्त होऊन सुखी होतो आणि याविरुद्ध वर्तन केल्यास दु:खी होतो. ॥७॥

## राजाची दिनचर्या

**उत्थाय पश्चिमे यामे कृतशौच: समाहित: ।**
**हुताग्निर्ब्राह्मणाँश्चार्च्य प्रविशेत्स शुभां सभाम् ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १४५

एक प्रहर रात्र शिल्लक राहिली असता उठून शौचमुखमार्जन आदी उरकून स्नान करावे आणि सावध चित्ताने परमेश्वराचे ध्यान, अग्निहोत्र, धार्मिक विद्वानांचा सत्कार व भोजन करून राजाने राजसभेत प्रवेश करावा. ॥१॥

**तत्र स्थितः प्रजाः सर्वाः प्रतिनन्द्य विसर्जयेत्।**

**विसृज्य च प्रजाः सर्वाः मन्त्रयेत्सह मन्त्रिभिः ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १४६

तेथे त्याने उभे राहून उपस्थित प्रजाजनांना मान द्यावा आणि मग त्यांना निरोप देऊन मुख्य मंत्र्याशी राज्यकारभाराविषयी विचार विनिमय करावा. ॥२॥

**गिरिपृष्ठं समारुह्य प्रासादं वा रहोगतः ।**

**अरण्ये निःशलाके वा मंत्रयेदविभावितः ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १४७

त्यानंतर त्याने मुख्य मंत्र्यांसह फिरायला जावे. यावेळी डोंगरावर जावे, अरण्यात जावे अथवा एकांतात बसावे. जेथे गवताची एक काडीही असणार नाही अशा निर्जन ठिकाणी बसून अविरुद्ध भावनेने मंत्र्यांशी विचार विनिमय करावा. ॥३॥

**यस्य मन्त्रन जानन्ति समागम्य पृथग्जनाः ।**

**स कृत्स्नां पृथिवीं भुङ्क्ते कोशहीनोऽपि पार्थिवः ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. १४८

अनेक लोक एकत्र येऊन सुद्धा ज्या राजाचे गुप्त विचार जाणू शकत नाहीत, ज्याचे विचार गंभीर, शुद्ध, परोपकारी असून सदैव गुप्त राहातात तो राजा धनहीन असला तरी सर्व पृथ्वीवर राज्य करण्यास समर्थ असतो. म्हणून त्याने आपल्या एकट्याच्या विचाराने एकही काम करू नये जोपर्यंत सर्व सभासदांची संमती असत नाही. ॥४॥

## संधि व विग्रह

**आसनं चैव यानं च सन्धिं विग्रहमेव च।**

**कार्यं वीक्ष्य प्रयुञ्जीत द्वैधं संश्रयमेव च॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १६१

राजादी सर्व राजपुरुषांनी ही गोष्ट लक्षात ठेवावी की (आसनम्) स्थिरता बसणे, (यानम्) शत्रूशी लढायला जाणे, (सन्धिम्) त्याच्याशी तह करणे, (विग्रहम्) दुष्ट शत्रूंशी लढाई करणे, (द्वैधम्) सैन्याचे दोन भाग करून स्वतःचा विजय होणे, (संश्रयम्) स्वतः दुर्बळ असता दुसऱ्या प्रबळ राजाचा आश्रय घेणे, या सहा प्रकारची कामे उपायांचा योग्य प्रसंगाचा विचार करून करणे उचित असते. ॥१॥

**सन्धिं तु द्विविधं विद्याद्राजा विग्रहमेव च।**

**उभे यानासने चैव द्विविधः संश्रयः स्मृतः ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १६२

संधी, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव व संश्रय यांचे २-२ प्रकार होतात. ते राजाने नीट जाणून घ्यावेत. ॥२॥

**समानयानकर्मा च विपरीतस्तथैव च।**

**तथा त्वायतिसंयुक्तः सन्धिर्ज्ञेयो द्विलक्षणः ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १६३

(संधि:) शत्रूशी मैत्री करावी किंवा त्याच्याशी विरोध करावा. परंतु वर्तमानकाळी व भविष्यकाळी करावयाची कामे राजाने बरोबर करीत राहावे. याला द्विविध संधी म्हणतात. ॥३॥

**स्वयंकृतश्च कार्यार्थमकाले काल एव वा ।**
**मित्रस्य चैवापकृते द्विविधो विग्रहः स्मृतः ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. १६४

(विग्रहः) कार्यसिद्धीसाठी उचित किंवा अनुचित वेळी आपल्या शत्रूला किंवा आपल्या मित्राचा अपराध करणाऱ्या शत्रूबरोबर विरोध हे दोन प्रकारचे विग्रह केले पाहिजेत. ॥४॥

**एकाकिनश्चात्ययिके कार्ये प्राप्ते यदृच्छया ।**
**संहतस्य च मित्रेण द्विविधं यानमुच्यते ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. १६५

(यानम्) अकस्मात काही कारण घडले असता आपण एकट्याने किंवा मित्राच्या बरोबर शत्रूकडे जाणे चाल करणे, ही दोन प्रकारची गमने किंवा याने म्हटली जातात. ॥५॥

**क्षीणस्य चैव क्रमशो दैवात् पूर्वकृतेन वा ।**
**मित्रस्य चानुरोधेन द्विविधं स्मृतमासनम् ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. १६६

काही प्रकाराने हळूहळू (आसनम्) स्वत: क्षीण झाल्याने किंवा निर्बळ झाल्याने, अथवा मित्रांनी रोखल्यामुळे आपल्या ठिकाणी स्वस्थ बसणे, ही दोन प्रकारची आसने म्हटली जातात.

**बलस्य स्वामिनश्चैव स्थितिः कार्यार्थसिद्धये ।**
**द्विविधं कीर्त्यते द्वैधं षाड्गुण्यगुणवेदिभिः ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. १६७

(द्वैधम्) कार्यसिद्धीसाठी सेनापती व सेना यांचे दोन विभाग करून विजय मिळविणे याला दोन प्रकारचे द्वैध म्हणतात. ॥७॥

**अर्थसंपादनार्थं च पीड्यमानः स शत्रुभिः ।**
**साधुषु व्यपदेशार्थं द्विविधः संश्रयः स्मृतः ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. १६८

(संश्रय:) एखादा आपला हेतू सफल व्हावा म्हणून एखाद्या बलवान राजाचा किंवा एखाद्या महात्म्याचा आश्रय घेणे व त्यामुळे शत्रूच्या त्रासातून सुटणे, हा दोन प्रकारचा आश्रय होय. ॥८॥

**यदावगच्छेदायत्यामाधिक्यं ध्रुवमात्मनः ।**
**तदात्वे चाल्पिकां पीडां तदा सन्धिं समाश्रयेत् ॥९॥** मनु. अ. ७। श्लो. १६९

यावेळी शत्रूशी युद्ध केल्यास आपली हानी होण्याची शक्यता आहे आणि नंतर युद्ध केल्यास आपला लाभ व विजय नक्की होईल, असे लक्षात आल्यास शत्रूशी तह करून योग्य संधीची वाट पाहावी. ॥९॥

**यदा प्रहृष्टा मन्येत सर्वास्तु प्रकृतीर्भृशम् ।**
**अत्युच्छ्रितं तथात्मानं तदा कुर्वीत विग्रहम् ॥१०॥** मनु. अ. ७। श्लो. १७०

जेव्हा आपली सारी प्रजा व सेना अत्यंत प्रसन्न, उन्नत व श्रेष्ठ असल्याचे आढळून येईल व आपणही तसेच असल्याचे वाटेल त्याचवेळी शत्रूशी विग्रह (युद्ध) करावे. ॥१०॥

**यदा मन्यते भावेन हृष्टं पुष्टं बलं स्वकम् ।**
**परस्य विपरीतं च तदा यायाद्रिपुं प्रति ॥११॥** मनु. अ. ७। श्लो. १७१

जेव्हा आपले सैन्य आनंदी, प्रबळ व प्रसन्न असेल आणि याउलट शत्रूचे बळ दुबळे आहे असे समजेल तेव्हा शत्रूवर चाल करून जावे. ॥११॥

**यदा तु स्यात्परिक्षीणो वाहनेन बलेन च ।**
**तदासीत प्रयत्नेन शनकैः सान्त्वयन्नरीन् ॥१२॥** मनु. अ. ७। श्लो. १७२

जेव्हा आपले सैन्य, बळ वाहने यांच्यामुळे क्षीण झाले असेल तेव्हा सावकाश प्रयत्नाने शत्रूला शांत करीत राजाने आपल्या जागी स्वस्थ बसून राहावे. ॥१२॥

**मन्येतारिं यदा राजा सर्वथा बलवत्तरम् ।**
**तदा द्विधा बलं कृत्वा साधयेत्कार्यमात्मनः ॥१३॥** मनु. अ.७। श्लो. १७३

जेव्हा शत्रू अत्यंत बलवान आहे असे आढळून येईल तेव्हा आपल्या सैन्याचे दोन भाग करून आपले कार्य साधावे. ॥१३॥

**यदा परबलानां तु गमनीयतमो भवेत् ।**
**तदा तु संश्रयेत् क्षिप्रं धार्मिकं बलिनं नृपम् ॥१४॥** मनु. अ. ७। श्लो. १७४

आपल्यावर शत्रू लवकरच चाल करून येईल असे वाटल्यास ताबडतोब कोणत्याही धार्मिक व बलवान राजाचा आश्रय घ्यावा. ॥१४॥

**निग्रहं प्रकृतीनां च कुर्याद्योरिबलस्य च ।**
**उपसेवेत तं नित्यं सर्वयत्नैर्गुरुं यथा ॥१५॥** मनु. अ. ७। श्लो. १७५

जो राजा आपली प्रजा व आपली सेना व शत्रूचे सामर्थ्य यांच्यावर नियंत्रण ठेवतो त्याची गुरूप्रमाणे सर्व प्रकारे नित्य सेवा करीत असावे. ॥१५॥

**यदि तत्रापि संपश्येद्दोषं संश्रयकारितम् ।**
**सुयुद्धमेव तत्राऽपि निर्विशङ्कः समाचरेत् ॥१६॥** मनु. अ. ७। श्लो. १७६

ज्याचा आपण आश्रय घेतला असेल त्या पुरुषाच्या कृतीमध्ये काही दोष दिसून आले तर त्याच्याशीही निःशंकपणे जोरदार युद्ध करावे. ॥१६॥

जो राजा धार्मिक असेल त्याला कधीही विरोध न करता त्याच्याशी नेहमी मैत्री ठेवावी; आणि जो दुष्ट प्रबळ असेल त्याला जिंकण्यासाठी वर सांगितलेले उपाय करणे योग्य आहे.

## मित्र, तटस्थ व शत्रूबाबतीत दक्षता

**सर्वोपायैस्तथा कुर्यान्नीतिज्ञः पृथिवीपतिः ।**
**यथास्याभ्यधिका न स्युर्मित्रोदासीनशत्रवः ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १७७

राजनीती जाणणाऱ्या पृथ्वीपती राजाने आपले मित्र, उदासीन (तटस्थ) व शत्रू आपणांहून अधिक होणार नाहीत, या दृष्टीने सर्व उपायांनी आचरण करावे. ॥१॥

**आयतिं सर्वकार्याणां तदात्वं च विचारयेत् ।**
**अतीतानां च सर्वेषां गुणदोषौ च तत्त्वतः ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १७८

सर्व कामांच्या बाबतीत वर्तमानकाळी काय केले पाहिजे. भविष्यकाळी काय केले पाहिजे आणि भूतकाळी केलेल्या कामांमध्ये कोणते गुण-दोष आहेत याचा यथायोग्य विचार राजाने करावा. ॥२॥

**आयत्यां गुणदोषज्ञस्तदात्वे क्षिप्रनिश्चयः।**
**अतीते कार्य्यशेषज्ञः शत्रुभिर्नाभिभूयते ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १७९

त्यानंतर दोष काढून टाकण्याचे व गुणाची स्थिरता टिकवून ठेवण्याचा प्रयत्न करावा. जो राजा भावी काळात करावयाच्या कामांचे गुणदोष जाणतो, वर्तमानकाळी करावयाच्या कामांच्या बाबतीत चटकन निर्णय घेतो आणि पूर्वी केलेल्या कामांमध्ये काम करावयाचे राहून गेले आहे, हे ओळखतो तो कधीही शत्रूकडून पराजित होत नाही. ॥३॥

**यथैनं नाभिसंदध्युर्मित्रोदासीनशत्रवः।**
**तथा सर्वं संविदध्यादेष सामासिको नयः ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. १८०

राजपुरुषाने, विशेषतः राजसभेच्या सभापतीने आपले मित्र, उदासीन (तटस्थ) व शत्रू यांना वश करून घ्यावे. शत्रू आपल्या विरुद्ध काही करणार नाहीत अशा मोह भ्रमतेत कधी ते फसणार नाहीत या बाबतीत कोणत्याही प्रकारे दुर्लक्ष किंवा हेळसांड करू नये. यालाच थोडक्यात 'विनय' म्हणजे राजनीती असे म्हटले जाते. ॥४॥

## लढाईची तयारी

**कृत्वा विधानं मूले तु यात्रिकं च यथाविधि।**
**उपगृह्यास्पदं चैव चारान् सम्यग्विधाय च ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १८४

जेव्हा राजा शत्रूंशी युद्ध करण्यास जाईल तेव्हा त्याने प्रथम आपल्या राज्याच्या रक्षणाची व्यवस्था करावी आणि प्रवासाची जय्यत तयारी करून सेना, याने, वाहने, शस्त्रास्त्रे वगैरे भरपूर बरोबर घ्यावीत. सगळीकडच्या बातम्या आणण्यासाठी गुप्त हेरांची नेमणूक करावी आणि मगच शत्रूवर चढाई करण्यास निघावे. ॥१॥

**संशोध्य त्रिविधं मार्गं षड्विधं च बलं स्वकम्।**
**सांपरायिककल्पेन यायादरिपुरं शनैः ॥२॥** मनु. अ. ७। श्लो. १८५

स्थल (जमिनीवरील) जल (समुद्रातील व नद्यांवरील) आणि आकाश हे तीन्ही मार्ग निर्विघ्न व सुरक्षित करून भूमार्गावर रथ, घोडे, हत्ती; जलमार्गावर नौका व आकाश मार्गावर विमाने यांचा वापर करावा. पायदळ, रथी, हत्तीस्वार, घोडेस्वार, या सर्वांना लागणारी शस्त्रास्त्रे व खाण्यापिण्याची सामग्री भरपूर प्रमाणात बरोबर घ्यावी. अशा प्रकारे पूर्णपणे सामर्थ्यशाली बनून काहीतरी कारण प्रसिद्ध करून सांगून हळूहळू शत्रूच्या नगराजवळ जावे. ॥२॥

**शत्रूसेविनि मित्रे च गूढे युक्ततरो भवेत्।**
**गतप्रत्यागते चैव स हि कष्टतरो रिपुः ॥३॥** मनु. अ. ७। श्लो. १८६

जो आतून शत्रूला सामील झालेला असतो पण वरून आपल्याशीही मैत्री असल्याचे भासवितो आणि गुप्तपणे शत्रूला माहिती पुरवितो त्याच्या येण्याजाण्यावर नजर ठेवावी आणि त्याच्याशी बोलताना अत्यंत सावधगिरी बाळगावी. कारण आतून शत्रू व वरून मित्र असणारा माणूस हा फार मोठा शत्रू समजला पाहिजे. ॥३॥

## व्यूहाचे प्रकार

**दण्डव्यूहेन तन्मार्गं यायात्तु शकटेन वा।**

**वराहमकराभ्यां वा सूच्या वा गरुडेन वा ॥४॥** मनु. अ. ७। श्लो. १८७

सर्व राजपुरुषांना युद्ध करण्याची विद्या शिकवावी. तसेच ती स्वत: शिकावी आणि प्रजाजनांनाही शिकवावी. ज्या योद्ध्यांनी युद्धाचे शिक्षण घेतलेले असते तेच उत्तम प्रकारे लढणे व लढविणे जाणतात. सैनिकांना प्रशिक्षण देताना (दण्डव्यूह:) दंडाप्रमाणे सरळ रांगेत सैन्य चालवावे, (शकट) शकट म्हणजे गाडी प्रमाणे, (वराह) डुकरांप्रमाणे एका मागून एक या प्रमाणे धावत जाणे किंवा कधी-कधी सर्वांनी मिळून कळप केला जाणे, (मकर) मगरी पाण्यात संचार करतात तशी सैन्याची रचना करणे, (सूचीव्यूह) सुई जशी टोकाला अत्यंत सूक्ष्म असून मागच्या बाजूला जाड होत जाते आणि तिच्यात ओवलेला दोरा त्याहून जाडजूड असतो. त्या धर्तीवर सैन्यास शिकवावे, (गरुड) ज्याप्रमाणे गरुड हवेमध्ये वर खाली झेप घेऊन झडप घालतो त्याप्रमाणे सैन्याची तयारी करून त्यांना लढवावे. ॥४॥

**यतश्च भयमाशङ्केत्ततो विस्तारयेद् बलम्।**

**पद्मेन चैव व्यूहेन निविशेत सदा स्वयम् ॥५॥** मनु. अ. ७। श्लो. १८८

ज्या बाजूने भय वाटेल त्याच बाजूला सैन्य पसरून ठेवावे. सर्व सेनापतींना चारी बाजूंना ठेवावे आणि (पद्मव्यूह) कमळाप्रमाणे चारी बाजूंना सैन्य ठेवून मध्यभागी आपण स्वत: राहावे. ॥५॥

**सेनापतिबलाध्यक्षौ सर्वदिक्षु निवेशयेत्।**

**यतश्च भयमाशङ्केत् प्राचीं तां कल्पयेद्दिशम् ॥६॥** मनु. अ. ७। श्लो. १८९

सेनापती व बलाध्यक्ष म्हणजे आज्ञा देणारे व सैन्याबरोबर स्वत: लढणारे आणि लढविणारे अशा वीरांना आठही दिशांना जय्यत तयारीने ठेवावे. जिकडे लढाई चालू असेल त्या दिशेला सर्व सैन्याचे मुख असावे. परंतु इतर बाजूंचाही पक्का बंदोबस्त ठेवावा. नाहीतर शत्रूचा हल्ला मागून अथवा आजूबाजूंनी होण्याचा धोका असतो. ॥६॥

**गुल्मांश्च स्थापयेदाप्तान् कृतसंज्ञान् समन्तत:।**

**स्थाने युद्धे च कुशलान भीरुनविकारिण: ॥७॥** मनु. अ. ७। श्लो. १९०

गुल्म म्हणजे दृढ स्तंभाप्रमाणे युद्ध-विद्येत निष्णात, धार्मिक स्थिर वृत्तीचे, युद्ध करण्यात चतुर, निर्भय आणि ज्यांचे मनात कसलाही विकार उत्पन्न होत नाही अशा वीरांना सैन्याच्या चारही बाजूंना नियुक्त करावे. ॥७॥

**संहतान् योधयेदल्पान् कामं विस्तारयेद् बहून्।**

**सूच्या वज्रेण चैवैतान् व्यूहेन व्यूह्य योधयेत् ॥८॥** मनु. अ. ७। श्लो. १९१

थोड्या सैन्यानिशी फार मोठ्या सेनेशी युद्ध करावयाचे असेल तर एकजुटीने लढावे; आणि वेळ पडल्यास त्यांना झटकन विखरून टाकावे. नगरात, दुर्गात किंवा शत्रूच्या सैन्यात घुसून युद्ध करावयाचे असेल

तेव्हा 'सूचीव्यूह' किंवा 'वज्रव्यूह' रचून युद्ध करावे. दुधारी तलवारीप्रमाणे दोन्ही बाजूंनी युद्ध करीत जावे आणि शत्रूच्या सैन्यात प्रवेश घेत चलावे तशी अनेक प्रकारची व्यूह रचना करून युद्ध करावे. समोरून शत्रूची (शतघ्नी) तोफ अथवा (भुशुंडी) बंदूक मारा करीत असेल तर सर्पव्यूहाची रचना करावी म्हणजे सापाप्रमाणे सरपटत जावे आणि तोफांजवळ पोहचून गोलंदाजांना मारून अथवा पकडून तोफा-बंदूका ताब्यात घ्याव्यात आणि त्यांची तोंडे शत्रूकडे फिरवून त्यांचा मारा शत्रूवर करावा किंवा तोफांच्या समोर वृद्ध पुरुषांना घोड्यावरून धावावयास लावावे व मारावे. त्यांच्या मध्यभागी उत्तम योद्धे असावेत. त्यांनी शत्रूवर हल्ला करून शत्रूचे सैन्य उध्वस्त करून त्यांच्या सैनिकांना पकडावे किंवा पिटाळून लावावे. ॥८॥

**स्यन्दनाश्वैः समे युध्येदनूपे नौद्विपैस्तथा।**
**वृक्षगुल्मावृत्ते चापैरसिचर्मायुधैः स्थले॥९॥** मनु. अ. ७। श्लो. १९२

समतल सपाट भुमिवर युद्ध करावयाचे असेल तर रथ, घोडे व पायदळ यांद्वारा करावे. समुद्रावरचे युद्ध असेल तर नौकाद्वारा व थोडे पाणी असल्यास हत्तीद्वारा, वृक्ष व झाडे झुडुपे असल्यास बाणांच्याद्वारा आणि वाळवंट असल्यास ढाल-तलवारीद्वारा युद्ध करावे, करवावे ॥९॥

**प्रहर्षयेद् बलं व्यूह्य तांश्च सम्यक् परीक्षयेत्।**
**चेष्टाश्चैव विजानीयादरीन् योधयतामपि॥१०॥** मनु. अ. ७ श्लो. १९३

युद्ध चालू असताना लढणाऱ्यांना उत्साहित व हर्षित करावे. युद्ध थांबल्यावर सैनिकांचे शौर्य वाढेल व लढण्यास प्रोत्साहन मिळेल अशी भाषणे करून सर्वांची मने उल्हासित करावीत; आणि सर्वांना खाणे-पिणे, अन्न-वस्त्र, औषधपाणी इत्यादींची उत्तम सोय करून सर्वांना प्रसन्न ठेवावे. व्यूहरचना केल्याशिवाय युद्ध करू नये अथवा करवू नये. आपल्या लढणाऱ्या सैन्याच्या हालचालींवर लक्ष ठेवून ते योग्य प्रकारे लढत आहे की छल कपट करीत आहे हे पाहावे. ॥१०॥

**उपरुध्यारिमासीत राष्ट्रं चास्योपपीडयेत्।**
**दूषयेच्चास्य सततं यवसान्नोदकेन्धनम्॥११॥** मनु. अ. ७ श्लो. १९४

एखादे वेळी योग्य वाटल्यास शत्रूला चारी बाजूंनी घेऊन कोंडीत पकडावे; आणि त्याच्या राज्याला सतवावे. त्याचे चारा, अन्न, पाणी व इंधन यांचे साठे नष्ट किंवा दूषित करावेत. ॥११॥

**भिन्द्याच्चैव तडागानि प्राकारपरिखास्तथा।**
**समवस्कन्दयेच्चैनं रात्रौ वित्रासयेत्तथा॥१२॥** मनु. अ. ७ श्लो. १९६

शत्रूचे तलाव, नगरांचे परकोट व खंदक तोडून-फाडून टाकावेत, रात्री अपरात्री त्यांना घाबरवून सोडावे आणि आपला जय होण्यासाठी उपाय योजावेत. ॥१२॥

## पराजित शत्रू संबंधी व्यवहार

**प्रमाणानि च कुर्वीत तेषां धर्म्यान्यथोदितान्।**
**रत्नैश्च पूजयेदेनं प्रधानपुरुषैः सह॥१३॥** मनु. अ. ७ श्लो. २०३

शत्रूला जिंकल्यावर त्याच्याशी करारनामे व प्रतिज्ञापत्रे करावीत आणि योग्य वाटल्यास त्याच्याच वंशातील एखाद्या धार्मिक वृत्तीच्या पुरुषाला राजा करावे आणि त्याच्याकडून असे लिहून घ्यावे की तुम्हांला आमच्या

आज्ञेप्रमाणे म्हणजे जी धर्मयुक्त राजनीती आहे त्याप्रमाणे वागून न्यायाने प्रजेचे पालन करावे लागेल. असा उपदेश करावा. त्याच्याजवळ आपली अशी माणसे नेमावीत की ज्यायोगे पुन: त्याच्याकडून उपद्रव होणार नाही. जो पराभूत झाला असेल त्याचा सत्कार प्रधान पुरुषांसह रत्ने आदी उत्तम वस्तू त्याला भेट देऊन करावा मात्र त्याचा योगक्षेमही नीट चालणार नाही, असे करू नये. त्याला तुरुंगात टाकले तरी त्याची योग्य बडदास्त ठेवावी. ज्यायोगे तो पराभवाचे दु:ख विसरून आनंदात राहील. ॥१३॥

**आदानमप्रियकरं दानञ्च प्रियकारकम् ।**

**अभीप्सितानामर्थानां काले युक्तं प्रशस्यते ॥१४॥** मनु. अ. ७ श्लो. २०४

कारण या जगामध्ये दुसऱ्याची वस्तू घेणे हे अप्रीती व दुसऱ्याला काही देणेही प्रेम निर्माण करणारे असते. योग्य वेळ पाहून उचित व्यवहार करणे आणि पराजित राजाला मनोवांछित वस्तू देणे हे अत्यंत उत्तम असते. त्याला कधी चिडवू नये, हसू नये किंवा त्याची थट्टामस्करी करू नये. आम्ही तुला पराभूत केले आहे, असे त्याच्या तोंडावर म्हणू नये. उलट तुम्ही आमचे भाऊच आहात, इत्यादि गोड बोलून त्याची प्रतिष्ठा नेहमी ठेववी. ॥१४॥

## मित्राचे महत्त्व

**हिरण्यभूमिसंप्राप्त्या पार्थिवो न तथैधते ।**

**यथा मित्रं ध्रुवं लब्ध्वा कृशमप्यायतिक्षमम् ॥१॥** मनु. अ. ७ श्लो. २०८

मित्राचे हे लक्षण आहे :- अढळ प्रेमयुक्त, भावी काळात घडणाऱ्या गोष्टींचा विचार करणारा आणि कार्य सिद्ध करण्यास समर्थ असा सबळ किंवा दुर्बळ मित्र लाभल्यास राजाची जशी उन्नती होते तशी सुवर्ण किंवा भूमी प्राप्त झाल्यानेही होत नाही. ॥१॥

**धर्मज्ञं च कृतज्ञं च तुष्टप्रकृतिमेव च ।**

**अनुरक्तं स्थिरारम्भं लघुमित्रं प्रशस्यते ॥२॥** मनु. अ. ७ श्लो. २०९

धर्म जाणणारा, कृतज्ञ, म्हणजे केलेले उपकार सदा स्मरणारा, प्रसन्न वृत्तीचा स्थिर अनुरागी लहान मित्राकडून तो प्रशंसनीय होत असतो. ॥२॥

## शत्रूपासून दक्षता

**प्राज्ञं कुलीनं शूरं च दक्षं दातारमेव च ।**

**कृतज्ञं धृतिमन्तञ्च कष्टमाहुररिं बुधा: ॥३॥** मनु. अ. ७ श्लो. २१०

बुद्धिमान, कुलीन, शूरवीर, चतुर, दाता, कृतज्ञ आणि धैर्यवान अशा पुरुषाला कधीही शत्रू बनवू नये. कारण अशा माणसाला जो शत्रू बनवील त्याला दु:ख भोगावे लागते, ही सदैव खूणगाठ ठेवावी. ॥३॥

## तटस्थाचे लक्षण

**आर्य्यता पुरुषज्ञानं शौर्य्यं करुणवेदिता ।**

**स्थौललक्ष्यं च सततमुदासीनगुणोदय: ॥४॥** मनु. अ. ७ श्लो. २११

उदासीनाचे (तटस्थाचे) लक्षण :- जो प्रशंसनीय गुणयुक्त आहे, बऱ्या व वाईट माणसांची पारख ज्याला

आहे, जो शूरवीर व दयाळू आहे, परंतु जो नेहमी वरवरच्या गोष्टीच बोलत राहतो, त्याला उदासीन किंवा तटस्थ असे म्हणतात. ॥४॥

**एवं सर्वमिदं राजा सह संमन्त्र्य मंत्रिभिः ।**
**व्यायाम्याप्लुत्य मध्याह्ने भोक्तुमन्तःपुरं विशेत् ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. २१६

पूर्वी सांगितल्याप्रमाणे पहाटे उठून शौचमुखमार्जन, स्नान, संध्योपासना, अग्निहोत्र वगैरे करून अथवा करवून, सर्व मंत्र्यांशी विचार विनिमय करून, सभेत जाऊन सर्व कर्मचाऱ्यांना व सेनाध्यक्षांना भेटून, त्यांना आनंदित करून विविध प्रकारची व्यूहरचना म्हणजे कवाईत करून घेऊन, घोडे व हत्ती यांचे तबेले व गायींचे गोठे यांची तपासणी करून, शस्त्रास्त्रांची भांडारे, वैद्यालय, संपत्तीचे खजिने वगैरे सर्वांचे दररोज नियमाने निरीक्षण करून, त्यांत काही दोष असतील तर ते काढून टाकण्याचे उपाय सुचवून राजाने व्यायामशाळेत जावून तेथे व्यायाम केल्यावर भोजनासाठी अंतःपुरात म्हणजे जेथे पत्नी राहत असेल तेथे जावे आणि सुपरिक्षित भोजन करावयाचे ते बुद्धिबळ पराक्रमवर्धक व रोगनाशक असावे नानाप्रकारचे अन्न व्यंजनादि त्यातील खाण्याचे व पिण्याचे पदार्थ सुगंधित, मिष्टादी अनेक रसांनी युक्त असावेत. अशा अन्नाच्या सेवनाने सदा सुखी राहावे. अशा प्रकारे राजाने राज्याच्या सर्व कार्याची उन्नति करीत असावे. ॥१॥

## करांचे प्रमाण

प्रजेकडून कर घेण्याचे प्रकार-

**पञ्चाशद्भाग आदेयो राज्ञा पशुहिरण्ययोः ।**
**धान्यानामष्टमो भागः षष्ठो द्वादश एव वा ॥१॥** मनु. अ. ७। श्लो. १३०

व्यापारी किंवा कारागीर यांना सोने व चांदी यांच्या रूपाने जेवढा नफा मिळत असेल त्याचा पन्नासावा भाग कर म्हणून राजाने घ्यावा. तांदूळ वगैरे धान्याचा सहावा, आठवा किंवा बारावा भाग घ्यावा. शेतकऱ्यांकडून तो पैशाच्या रूपात घ्यावयाचा कर अशाप्रकारे घ्यावा की ज्यायोगे शेतकऱ्यांना खाण्यापिण्याची टंचाई होणार नाही आणि ते निर्धन बनून दुःखी होणार नाहीत. ॥१॥

कारण प्रजा धनाढ्य व आरोग्यसंपन्न व खाऊनपिऊन सुखी असेल तरच राजाची मोठी उन्नति होते. राजाने प्रजेला आपल्या मुलांबाळांप्रमाणे सुखी ठेवावे आणि प्रजेने राजाला व राजपुरुषांना पित्याप्रमाणे मानावे. ही गोष्ट उचित आहे की परिश्रम करणारे शेतकरी राजांचे राजे असतात आणि राजा त्यांचा रक्षणकर्ता असतो, प्रजाच नसेल तर राजा कुणाचा ? आणि राजा नसेल तर प्रजा कुणाची ? राजा आणि प्रजा दोघेही आपापल्या कामात स्वतंत्र आणि परस्परांशी मिळालेल्या प्रेमयुक्त कामात परतंत्र असतात. प्रजेच्या सर्वसाधारण संमतीच्या विरुद्ध राजाने किंवा राजपुरुषांनी वागू नये. राजाच्या आज्ञेविरुद्ध प्रजेने किंवा राजपुरुषांनी आचरण करू नये. अशा प्रकारे राजाचे राजकीय मुख्य काम म्हणजे ज्याला 'पोलिटिकल' म्हणतात ते थोडक्यात सांगितले आहे.

या विषय विशेष पहावयाचे ज्यांना असतील त्यांनी चारही वेद, मनुस्मृती, शुक्रनीती, महाभारत वगैरे ग्रंथांचे परिशीलन करून प्रजेला योग्य न्याय मिळवून देण्याचे काम आहे ते मनुस्मृतीच्या आठव्या व नवव्या अध्यायात सांगितलेल्या रीतीनुसार केले पाहिजे. तरीपण ते संक्षेपाने येथे नमूद करतो :-

## न्यायव्यवस्था

**प्रत्यहं देशदृष्टैश्च शास्त्रदृष्टैश्च हेतुभिः ।**
**अष्टादशसु मार्गेषु निबद्धानि पृथक् पृथक् ॥१॥** मनु. अ. ८। श्लो. ३

सभा, राजा व राजपुरुष यांनी देशाचार (देशाचे कायदे) व शास्त्रव्यवहार यांच्या आधाराने खाली दिलेल्या अठरा विवादास्पद गोष्टींचा न्यायपूर्ण निर्णय दररोज करावा. तसेच जे नियम शास्त्रोक्त नसतील आणि ज्यांची आवश्यकता भासेल असे नवे उत्तमोत्तम नियम तयार करून राजा आणि प्रजा यांची उन्नती व्हावी. ॥१॥

**तेषामाद्यमृणादानं निक्षेपोऽस्वामिविक्रयः ।**
**संभूय च समुत्थानं दत्तस्यानपकर्म च ॥२॥** मनु. अ. ८। श्लो. ४

विवादाचे अठरा मुद्दे असे आहेत :- (१) (ऋणादान) कोणाकडून कर्ज घेणे व देणे यासंबंधीचा विवाद. (२) (निक्षेप) एखाद्याकडे ठेव ठेवणे अथवा एखादी वस्तू गहाण ठेवणे आणि त्याने ती मागितल्यावर परत न देणे. (३) (अस्वामि विक्रय) एकाची वस्तू दुसऱ्याने विकून टाकणे. (४) (संभूय च समुत्थानम्) काही लोकांनी मिळून एखाद्यावर अत्याचार करणे. (५) (दत्तस्यानपकर्म च) दिलेल्या वस्तुंना परत न देणे ॥२॥

**वेतनस्यैव चादानं संविदश्च व्यतिक्रमः ।**
**क्रयविक्रयानुशयो विवादः स्वामिपालयोः ॥३॥** मनु. अ. ८। श्लो. ५

(६) (वेतनस्यैव चादानम्) वेतन अर्थात पगारातून घेणे किंवा तो किंवा काही न देणे. (७) (प्रतिज्ञा) प्रतिज्ञेच्या विरुद्ध वर्तन करणे. (८) (क्रयविक्रयानुशय) खरेदी व विक्रीतील देण्या-घेण्या बाबतीतील भांडण. (९) गुराचा मालक व पालक यांच्यातील भांडण. ॥३॥

**सीमाविवादधर्मश्च पारुष्ये दण्डवाचिके ।**
**स्तेयं च साहसं चैव स्त्री सङ्ग्रहणमेव च ॥४॥** मनु. अ. ८। श्लो. ६

(१०) सीमा विवाद. (११) एखाद्याला कठोर शिक्षा देणे. (१२) कठोर शब्द बोलणे. (१३) चोरी, दरोडा घालणे. (१४) बळजबरीने एखादे कृत्य करणे. (१५) परस्त्रीशी अथवा परपुरुषाशी व्यभिचार. ॥४॥

**स्त्रीपुंधर्मो विभागश्च द्यूतमाह्वय एव च ।**
**पदान्यष्टादशैतानि व्यवहारस्थिताविह ॥५॥** मनु. अ. ८। श्लो. ७

(१६) स्त्री व पुरुष यांच्या धर्मात व्यतिक्रम म्हणजे उलटा पालट होणे. (१७) वारसा हक्कासंबंधीचा वाद. (१८) द्यूत म्हणजे जडपदार्थ (शेत, घर व संपत्ती) व समाह्वय म्हणजे चेतन पणास लावून जुगार खेळणे. ही अठरा प्रकारची परस्परांविरुद्ध व्यवहारांची विवादस्थाने आहेत. ॥५॥

**एषु स्थानेषु भूयिष्ठं विवादं चरतां नृणाम् ।**
**धर्मं शाश्वतमाश्रित्य कुर्यात्कार्यविनिर्णयम् ॥६॥** मनु. अ. ८। श्लो. ८

या व्यवहारांमध्ये अनेक विवाद करणाऱ्या पुरुषांना सनातन धर्माच्या आधाराने न्याय द्यावा; म्हणजे कोणाच्याही बाजूने पक्षपात करू नये. ॥६॥

## धर्मरक्षण

**धर्मो विद्धस्त्वधर्मेण सभां यत्रोपतिष्ठते।**
**शल्यं चास्य न कृन्तन्ति विद्धास्तत्र सभासदः ॥७॥** मनु. अ. ८। श्लो. १२

ज्या सभेमध्ये अधर्माकडून घायाळ झालेला धर्म विद्यमान होतो व जेथील सभासद त्या धर्माचे शल्य म्हणजे बाणासारखा असलेला कलंक काढून टाकीत नाहीत व अधर्माचा उच्छेद करीत नाहीत, म्हणजे जेथे धर्माने चालणाऱ्याचा सन्मान व अधर्माने वागणाऱ्याला शिक्षा होत नाही त्या सभेतील सर्व सभासद घायाळ झाले आहेत असे समजले जाते. ॥७॥

**सभा वा न प्रवेष्टव्या वक्तव्यं वा समञ्जसम्।**
**अब्रुवन्विब्रुवन्वापि नरो भवति किल्बिषी ॥८॥** मनु. अ. ८। श्लो. १३

धार्मिक माणसाने कधीही राजसभेत पाऊल टाकू नये. पण एकदा प्रवेश केल्यावर सत्य असेल तेच बोलावे. जर कोणी सभेमध्ये अन्याय होत असलेला पाहूनही मौन राहतो अथवा सत्य व न्याय यांच्या विरुद्ध बोलला तर तो महापापी होतो. ॥८॥

**यत्र धर्मो ह्यधर्मेण सत्यं यत्रानृतेन च।**
**हन्यते प्रेक्षमाणानां हतास्तत्र सभासदः ॥९॥** मनु. अ. ८। श्लो. १४

ज्या सभेमध्ये सर्व सभासदांच्या देखत अधर्माकडून धर्माची व असत्याकडून सत्याची हत्या केली जाते त्या सभेतील सर्व सभासद जणू जिवंत असून मेल्यासारखेच असतात. त्यांच्यापैकी कुणीच जिवंत नसतो. ॥९॥

**धर्म एव हतो हन्ति धर्मो रक्षति रक्षितः।**
**तस्माद्धर्मो न हन्तव्यो मा नो धर्मो हतोऽवधीत् ॥१०॥** मनु. अ. ८। श्लो. १५

मेलेला धर्म मारणाऱ्याचा नाश करतो आणि रक्षण केलेला धर्म रक्षण करणाऱ्याचे रक्षण करतो. म्हणून मारल्या गेलेल्या धर्माकडून आपण कधी मारले जाऊ या भीतीने धर्महनन कधीही करू नये. ॥१०॥

**वृषो हि भगवान् धर्मस्तस्य यः कुरुते ह्यलम्।**
**वृषलं तं विदुर्देवास्तस्माद्धर्मं न लोपयेत् ॥११॥** मनु. अ. ८। श्लो. १६

सर्व ऐश्वर्य देणाऱ्या आणि सुखाची वर्षा करणाऱ्या धर्माचा जो कोणी लोप करतो त्याला विद्वान लोक वृषल म्हणजे शूद्र व नीच समजतात. म्हणून कोणीही धर्माचा लोप करणे योग्य नाही. ॥११॥

**एक एव सुहृद्धर्मो निधनेऽप्यनुयाति यः।**
**शरीरेण समं नाशं सर्वमन्यद्धि गच्छति ॥१२॥** मनु. अ. ८। श्लो. १७

या जगामध्ये केवळ धर्म हाच असा एक मित्र आहे की जो मृत्युनंतरही बरोबर राहतो. इतर सर्व पदार्थ अथवा सोबती-मित्र शरीराच्या नाशा बरोबरच नाश पावतात. म्हणजे मृत्यू होताच सर्वांचा संग सुटतो. पण धर्माचा संग कधीच सुटत नाही. ॥१२॥

**पादो अधर्मस्य कर्तारं पादः साक्षिणमृच्छति।**
**पादः सभासदः सर्वान् पादो राजानमृच्छति ॥१३॥** मनु. अ. ८। श्लो. १८

जेव्हा राजसभेत पक्षपात व अन्याय केला जातो तेथे अधर्माचे चार विभाग होतात. त्यातील एक भाग अधर्म करणाऱ्याला, दुसरा त्याचा साक्षीदार असणाऱ्याला, तिसरा सभासदांना व चौथा भाग अधर्मी सभेच्या सभापतीला म्हणजे राजाला प्राप्त होतो.॥१३॥

**राजा भवत्यनेनास्तु मुच्यन्ते च सभासदः ।**
**एनो गच्छति कर्त्तारं निन्दार्हो यत्र निन्द्यते ॥१४॥** मनु. अ. ८। श्लो. १९

ज्या सभेमध्ये निंदनीय मनुष्याची निंदा व स्तुत्य माणसाची स्तुती केली जाते आणि दंडनीय माणसाला शासन व माननीय व्यक्तीला सन्मान दिला जातो तेथील राजा व सर्व सभासद निष्पाप व पवित्र होतात. पाप करणाऱ्यालाच पाप लागते. ॥१४॥

**आता साक्षी कसे आसावेत ?**

## साक्षीचे लक्षण

**आप्ताः सर्वेषु वर्णेषु कार्य्याः कार्येषु साक्षिणः ।**
**सर्वधर्मविदोऽलुब्धा विपरीतांस्तु वर्जयेत् ॥१॥** मनु. अ. ८। श्लो. ६३

सर्व वर्णांमध्ये जे धार्मिक, विद्वान, निष्कपटी, सर्व प्रकारे धर्म जाणणारे, निर्लोभी व सत्यवादी त्यांना न्याय व्यवस्थेत साक्षीदार बनवावे. याहून विपरीत गुण असणाऱ्यांना साक्षीदार करू नये. ॥१॥

**स्त्रीणां साक्ष्यं स्त्रियः कुर्युर्द्विजानां सादृशा द्विजाः ।**
**शूद्राश्च सन्तः शूद्राणामन्त्यानामन्त्ययोनयः ॥२॥** मनु. अ. ८। श्लो. ६८

स्त्रियांसाठी स्त्रिया, द्विजांसाठी द्विज, शूद्रांसाठी शूद्र, अंत्यजांसाठी अंत्यज साक्षीदार असावेत. ॥२॥

**साहसेषु च सर्वेषु स्तेयसङ्ग्रहणेषु च ।**
**वाग्दण्डयोश्च पारुष्ये न परीक्षेत साक्षिणः ॥३॥** मनु. अ. ८। श्लो. ७२

बलात्कार, चोरी, व्यभिचार, कठोर भाषण, लाठी प्रहार यांसारख्या अपराधांमध्ये साक्षदाराची फेर तपासणी करू नये; व तशी साक्ष अत्यावश्यकही समजावी. कारण ही सारे कामे गुप्तपणे होत असतात. ॥३॥

**बहुत्वं परिगृह्णीयात्साक्षिद्वैधे नराधिपः ।**
**समेषु तु गुणोत्कृष्टान् गुणिद्वैधे द्विजोत्तमान् ॥४॥** मनु. अ. ८। श्लो. ७३

दोन्ही बाजूंच्या साक्षीदारांमध्यणे बहुमतानुसार सारखेच साक्षीदार असतील तर त्यांपैकी उत्तम, गुणी पुरुषाच्या साक्षीला अनुकूल असा निर्णय करावा. दोन्ही बाजूंना उत्तम व गुणी असे तुल्यबळ साक्षीदार असतील तर त्यांच्यात जे द्विजोत्तम म्हणजे ऋषी, महर्षी व यती असतील त्यांच्या साक्षीप्रमाणे न्याय करावा. ॥४॥

**समक्षदर्शनात्साक्ष्यं श्रवणाच्चैव सिध्यति ।**
**तत्र सत्यं ब्रुवन्साक्षी धर्मार्थाभ्यां न हीयते ॥५॥** मनु. अ. ८। श्लो. ७४

साक्षीदार दोन प्रकारचे असतात. एक प्रत्यक्ष पाहणारा व दुसरा ऐकलेले सांगणारा. सभेमध्ये प्रश्न विचारण्यात आले असता जे साक्षीदार खरे बोलतात ते धर्महीन व दंडनीय नसतात. पण जे खोटे बोलतात ते यथायोग्य शिक्षेस पात्र असतात. ॥५॥

**साक्षी दृष्टश्रुतादन्यद्विब्रुवन्नार्य्यसंसदि।**
**अवाङ्नरकमभ्येति प्रेत्य स्वर्गाच्च हीयते ॥६॥** मनु. अ. ८। श्लो. ७५

राजसभेमध्ये किंवा दुसऱ्या एखाद्या उत्तम विद्वत्सभेमध्ये जे साक्षीदार पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टी जशाच्या तशा न सांगता त्याविरुद्ध म्हणजे खोटे बोलतात त्यांना (अवाङ्नरक) जीभ छाटून टाकल्यामुळे होणाऱ्या दुःखाच्या रूपाने जीवंतपणी नरक प्राप्त होतो आणि मेल्यानंतरही ते सुखापासून वंचित होतील. ॥६॥

**स्वभावेनैव यद् ब्रूयुस्तद् ग्राह्यं व्यावहारिकम्।**
**अतो यदन्याद्विब्रूयुर्धर्मार्थं तदपार्थकम् ॥७॥** मनु. अ. ८। श्लो. ७८

साक्षीदार जे काही स्वाभाविक रीतीने व्यवहारिक बोलेल तेच खरे मानावे आणि त्याविपरीत जे काही बोलेल ते सर्व खोटे व निरर्थक आहे असे न्यायाधीशाने समजावे. ॥७॥

**सभान्तः साक्षिणः प्राप्तानर्थिप्रत्यर्थिसन्निधौ।**
**प्राड्विवाकोऽनुयुञ्जीत विधिनाऽनेन सान्त्वयन् ॥८॥** मनु. अ. ८। श्लो. ७९

जेव्हा अर्थी (वादी) व प्रत्यर्थी (प्रतिवादी) यांच्या समक्ष साक्षीदार न्यायसभेपुढे येतील तेव्हा न्यायाधीश व प्राड्विवाक म्हणजे वकील किंवा बॅरिस्टर यांनी त्यांना शांतपणे असे विचारावे. ॥८॥

**यद् द्वयोरनयोर्वेत्थ कार्येऽस्मिँश्चेष्टितं मिथः।**
**तद् ब्रूत सर्वं सत्येन युष्माकं ह्यत्र साक्षिता ॥९॥** मनु. अ. ८। श्लो. ८०

हे साक्षीदारांनो! या दोघांच्या परस्पर कृत्यांच्या बाबतीत तुम्ही जे काही जाणता ते खरे खरे सांगा. कारण या बाबतीत तुमची साक्ष आहे. ॥९॥

**सत्यं साक्ष्ये ब्रुवन्साक्षी लोकानाप्नोति पुष्कलान्।**
**इह चानुत्तमां कीर्तिं वागेषा ब्रह्मपूजिता ॥१०॥** मनु. अ. ८। श्लो. ८१

जो साक्षीदार खरे बोलतो त्याला पुढील जन्मी उत्तम लोकात उत्तम जन्म प्राप्त होतो व तो सुख भोगतो. या जन्मी व पुढील जन्मी त्याला उत्तम कीर्ती मिळते. कारण ही वाणीच सत्काराचे व तिरस्काराचे कारण आहे असे वेदांमध्ये लिहिले आहे. जो सत्य बोलतो त्याची प्रतिष्ठा होते आणि जो खोटे बोलतो त्याची निंदा होते. ॥१०॥

**सत्येन पूयते साक्षी धर्मः सत्येन वर्द्धते।**
**तस्मात्सत्यं हि वक्तव्यं सर्ववर्णेषु साक्षिभिः ॥११॥** मनु. अ. ८। श्लो. ८३

सत्य बोलण्याने साक्षीदार पवित्र होतो आणि सत्य बोलण्यानेच धर्म वाढतो. म्हणून सर्व वर्णांच्या साक्षीदारांनी खरे बोलणेच योग्य होय. ॥११॥

**आत्मैव ह्यात्मनः साक्षी गतिरात्मा तथात्मनः।**
**मावमंस्थाः स्वमात्मानं नृणां साक्षिणमुत्तमम् ॥१२॥** मनु. अ. ८। श्लो. ८४

आत्म्याचा साक्षीदार आत्मा आणि आत्म्याची गतीही आत्माच आहे. हे जाणून, हे मनुष्य! तू सर्व मनुष्यांमधील उत्तम साक्षीदार आहेस. तू आपल्या आत्म्याचा अपमान करू नकोस. अर्थात तुझ्या आत्म्यात, मनात व वाणीत जे आहे ते सत्य आहे आणि त्याच्या उलट बोलणे म्हणजे मिथ्याभाषण होय. ॥१२॥

**यस्य विद्वान्हि वदतः क्षेत्रज्ञो नाभिशङ्कते।**
**तस्मान्न देवाः श्रेयांसं लोकेऽन्यं पुरुषं विदुः ॥१३॥** मनु. अ. ८। श्लो. ९६

ज्या बोलणाऱ्या पुरुषाचा विद्वान क्षेत्रज म्हणजे शरीराला जाणणारा आत्मा आतून साशंक होत नाही तोच उत्तम पुरुष होय. विद्वान लोक त्याहून भिन्न माणसाला उत्तम पुरुष समजत नाहीत. ॥१३॥

**एकोऽहमस्मीत्यात्मानं यत्त्वं कल्याण मन्यसे।**

**नित्यं स्थितस्ते हृद्येषः पुण्यपापेक्षिता मुनिः ॥१४॥** मनु. अ. ८। श्लो. ९१

हे कल्याणाची इच्छा बाळगणाऱ्या पुरुषा! 'मी एकटा आहे' असे आपल्या मनात समजून जो तू खोटे बोलतोस ते बरे नाही. परंतु जो दुसरा तुझ्या हृदयामध्ये अंतर्यामी रूपाने वास करणारा, पाप-पुण्य पाहणारा मुनी परमेश्वर आहे, त्या परमेश्वराला भिऊन तू सदैव सत्य बोलत रहा. ॥१४॥

## खोट्या साक्षीसाठी शिक्षा

**लोभान्मोहाद्भयान्मैत्रात्कामात्क्रोधात्तथैव च।**

**अज्ञानाद् बालभावाच्च साक्ष्यं वितथमुच्यते ॥१॥** मनु. अ. ८। श्लो. ११८

जो कोणी लोभ, मोह, भय, मैत्री, काम, क्रोध, अज्ञान व पोरकटपणाने साक्ष देईल तर ती सर्व खोटी आहे असे समजावे. ॥१॥

**एषामन्यतमे स्थाने यः साक्ष्यमनृतं वदेत्।**

**तस्य दण्डविशेषांस्तु प्रवक्ष्याम्यनुपूर्वशः ॥२॥** मनु. अ. ८। श्लो. ११९

यांपैकी कोणत्याही कारणास्तव खोटी साक्ष देणाऱ्याला त्या-त्या कारणानुसार पुढील प्रमाणे विविध प्रकारची शिक्षा देत जावी. ॥२॥

**लोभात्सहस्रं दण्ड्यस्तु मोहात्पूर्वन्तु साहसम्।**

**भयाद् द्वौ मध्यमौ दण्ड्यौ मैत्रात्पूर्वं चतुर्गुणम् ॥३॥** मनु. अ. ८। श्लो. १२०

लोभाने खोटी साक्ष देणाऱ्याकडून पंधरा रुपये दहा आणे दंड घ्यावा. मोहाने खोटी साक्ष देणाऱ्याकडून तीन रुपये दोन आणे, भीतीने खोटी साक्ष देणाऱ्याकडून सव्वा सहा रुपये, मैत्रीसाटी खोटी साक्ष देणाऱ्याकडून साडे बारा रुपये दंड घ्यावा. ॥३॥

**कामाद्दशगुणं पूर्वं क्रोधात्तु त्रिगुणं परम्।**

**अज्ञानाद् द्वे शते पूर्णे बालिश्याच्छतमेव तु ॥४॥** मनु. अ. ८। श्लो. १२१

वासनेपोटी खोटी साक्ष देणाऱ्याकडून पंचवीस रुपये, क्रोधाने खोटी साक्ष देणाऱ्याकडून शेहेचाळीस रुपये चौदा आणे, अज्ञानाने खोटी साक्ष देणाऱ्याकडून तीन रुपये आणि पोरकटपणाने खोटी साक्ष देणाऱ्याकडून एक रुपया नऊ आणे दंड घ्यावा. ॥४॥

## अपराध्यास दण्ड

**उपस्थमुदरं जिह्वा हस्तौ पादौ च पञ्चमम्।**

**चक्षुर्नासा च कर्णौ च धनं देहस्तथैव च ॥५॥** मनु. अ. ८। श्लो. १२५

दंडासाठी जननेंद्रिय, उदर, जिव्हा, हात, पाय, डोळे, नाक, कान, धन व देह ही दंड देण्याची दहा स्थाने आहेत की त्यांच्यावर दंड केला जात असतो. ॥५॥

**अनुबन्धं परिज्ञाय देशकालौ च तत्त्वतः ।**
**साराऽपराधौ चालोक्य दण्डं दण्ड्येषु पातयेत् ॥६॥** मनु. अ. ८। श्लो. १२६

देश, काल, गुन्हेगाराची अर्थिक स्थिती व अपराधाचे स्वरूप लक्षात घेऊन योग्य तो दंड करावा. जसे लोभाने खोटी साक्ष देणाऱ्यास पंधरा रुपये दहा आणे दंड लिहिला आहे व पुढे लिहिल्याप्रमाणे जर गुन्हेगार अत्यंत निर्धन असेल तर त्याच्याकडून कमी दंड घ्यावा आणि तो श्रीमंत असेल तर त्याच्याकडून दुप्पट, तिप्पट, चौपट दंड घ्यावा.॥६॥

**अधर्मदण्डनं लोके यशोघ्नं कीर्तिनाशनम् ।**
**अस्वर्ग्यश्च परत्रापि तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥७॥** मनु. अ. ८। श्लो. १२७

कारण या जगात जो कोणी अधर्माने दंड करतो त्यामुळे त्याची भुतकालीन प्रतिष्ठा व वर्तमानकाळी प्रतिष्ठा आणि भविष्यकाळी व पुढील जन्मी त्याची होणारी कीर्ति नाश पावते. शिवाय पुढील जन्मी दुःख होते. म्हणून कोणालाही अधर्मयुक्त दंड करू नये. ॥७॥

**अदण्ड्यान्दण्डयन् राजा दण्ड्यांश्चैवाप्यदण्डयन् ।**
**अयशो महदाप्नोति नरकं चैव गच्छति ॥८॥** मनु. अ. ८। श्लो. १२८

जो राजा अपराध्यांना शिक्षा करीत नाही व निरपराध्यांना शिक्षा करतो अर्थात दंडास पात्र असणाऱ्यास सोडून देतो आणि ज्याला दंड देणे नको त्यास दंड देतो तो जिवंतपणी मोठ्या निंदेस आणि मृत्युनंतर मोठ्या दुःखास पात्र ठरतो म्हणून अपराध्याला नेहमी शिक्षा करावी व निरपराध्याला कधीही शिक्षा करू नये. ॥८॥

**वाग्दण्डं प्रथमं कुर्याद्धिग्दण्डं तदनन्तरम् ।**
**तृतीयं धनदण्डं तु वधदण्डमतः परम् ॥९॥** मनु. अ. ८। श्लो. १२९

प्रथम वाणीने शिक्षा म्हणजे त्याची भर्त्सना हा वाग्दंड होय. दुसरा धिग्दंड म्हणजे त्याचा धिःकार की तु हे दुष्कृत्य का केले. तिसरा त्याला पैशाच्या रूपातील दंड आणि शेवटी वधदंड द्यावा. म्हणजे त्याला फटके मारावेत किंवा त्याचे डोके छाटावे. ॥९॥

## चोरीसाठी शिक्षा

**येन येन यथाङ्गेन स्तेनो नृषु विचेष्टते ।**
**तत्तदेव हरेदस्य प्रत्यादेशाय पार्थिवः ॥१॥** मनु. अ. ८। श्लो. ३३४

चोर आपल्या ज्या-ज्या अवयवांनी समाज विघातक कृत्य म्हणजे चोरी करतो त्याचे ते-ते अवयव, इतरांना धडा मिळावा म्हणून, राजाने हरण अर्थात छाटून टाकावेत. ॥१॥

**पिताचार्य्यः सुहृन्माता भार्य्या पुत्रः पुरोहितः ।**
**नादण्ड्यो नाम राज्ञोऽस्ति यः स्वधर्मे न तिष्ठति ॥२॥** मनु. अ. ८। श्लो. ३३५

किंबहुना पिता, आचार्य, मित्र, पत्नी, पुत्र व पुरोहित यांपैकी कोणीही का असेनात, जे स्वधर्माचे पालन करीत नसतील तर त्यांना राजाने अदण्ड ठरवू नये. याचा अर्थ असा की राजा जेव्हा न्यायासनावर बसून न्याय करतो तेव्हा त्याने कुणाचाही बाबतीत पक्षपात करू नये किंतु योग्य न्याय शिक्षा द्यावी. ॥२॥

**कार्षापणं भवेद्दण्ड्यः यत्रान्यः प्राकृतो जनः ।**
**तत्र राजा भवेद्दण्ड्यः सहस्रमिति धारणा ॥३॥** मनु. अ. ८। श्लो. ३३६

ज्या अपराधाबद्दल सामान्य माणसाला एक पैसा दंड होतो त्याच अपराधाबद्दल राजाला हजार पैसे दंड व्हावा. म्हणजे सामान्य माणसाच्या हजार पट शिक्षा राजाला झाली पाहिजे. मंत्री किंवा दिवाण यांना आठशे पट, त्याहून खालच्या पातळीवरील व्यक्तींना सातशे पट, त्याहून खालच्या दर्जाच्या लोकांना साहशे पट, याप्रमाणे ज्याची जी योग्यता असेल तिच्याप्रमाणे त्याला कमी कमी शिक्षा करण्यात यावी. सर्वात खालचा कर्मचारी म्हणजे पट्टेवाला होय. त्याला सामान्य माणसापेक्षा किमान आठपट शिक्षा झाली पाहिजे. याचे कारण असे की सामान्य प्रजाजनापेक्षा राजपुरुषाला म्हणजे सरकारी नोकराला जास्त शिक्षा झाली नाही तर हे राजपुरुष प्रजाजनांचा नाश करून टाकतील जसे सिंहाला ताब्यात ठेवावयाचे असेल तर त्याला कडक शिक्षा करावी लागते परंतु शेळीला थोडीशी शिक्षा पुरे होते. तसेच हे आहे. म्हणून राजापासून अगदी तळागाळाच्या नोकरापर्यंतच्या राजपुरुषांना त्यांच्या अपराधाबद्दल सामान्य जनतेपेक्षा जास्त शिक्षा करण्यात आली पाहिजे. ॥३॥

**अष्टापाद्यन्तु शूद्रस्य स्तेये भवति किल्बिषम्।**
**षोडशैव तु वैशस्य द्वात्रिंशत्क्षत्रियस्य च ॥४॥** मनु. अ. ८। श्लो. ३३७

याच प्रमाणे जो कोणी विवेकी असून चोरी करतो त्या शुद्राला त्याने चोरी केलेल्या वस्तूच्या किमतीच्या आठपट, वैश्याला सोळापट व क्षत्रियाला बत्तीस पट दंड केला पाहिजे. ॥४॥

**ब्राह्मणस्य चतुःषष्टिः पूर्णं वापि शतं भवेत्।**
**द्विगुणा वा चतुःषष्टिस्तद्दोषगुणविद्धि सः ॥५॥** मनु. अ. ८। श्लो. ३३८

ब्राह्मणाला चौसष्ट पट किंवा शंभर पट किंवा एकशे अठ्ठावीस पट दंड झाला पाहिजे. म्हणजे ज्यांची जितके अधिक ज्ञान व प्रतिष्ठा असेल त्याला त्या प्रमाणात त्याच्या अपराधाबद्दल जास्त शिक्षा झाली पाहिजे. ॥५॥

**ऐन्द्रं स्थानमभिप्रेप्सुर्यशश्चाक्षयमव्ययम्।**
**नोपेक्षेत क्षणमपि राजा साहसिकं नरम् ॥६॥** मनु. अ. ८। श्लो. ३४४

राज्याचे अधिकारी आणि धर्म व ऐश्वर्य यांची इच्छा बाळगणारा राजा यांनी बळजबरीचे काम करणाऱ्या डाकूंना शिक्षा देण्यात एका क्षणाचाही विलंब करू नये. ॥६॥

**वाग्दुष्टात्तस्कराच्चैव दण्डेनैव च हिंसतः।**
**साहसस्य नरः कर्त्ता विज्ञेयः पापकृत्तमः ॥७॥** मनु. अ. ८। श्लो. ३४५

जो दुष्ट वचन बोलणारा, चोरी करणारा, अपराध नसताना शिक्षा करणारा या सर्वांपेक्षा साहसाने बळजबरी करणारा माणूस अत्यंत पापी व दुष्ट आहे. ॥७॥

**साहसे वर्त्तमानं तु यो मर्षयति पार्थिवः।**
**स विनाशं व्रजत्याशु विद्वेषं चाधिगच्छति ॥८॥** मनु. अ. ८। श्लो. ३४६

जो राजा अशा जुलमी माणसाला शिक्षा न करता त्याचे अत्याचार सहन करतो तो लवकरच नाशास कारणीभूत ठरतो आणि राज्यात वैमनस्य निर्माण होते. ॥८॥

**न मित्रकारणाद्राजा विपुलाद्वा धनागमात्।**
**समुत्सृजेत् साहसिकान्सर्वभूतभयावहान् ॥९॥** मनु. अ. ८। श्लो. ३४७

मैत्रीमुळे अथवा पुष्कळ धन मिळते म्हणून राजाने सर्व प्राणीमात्रास दु:ख देणाऱ्या अत्याचारी माणसाला पकडणे, मारणे इत्यादि शिक्षा केल्याशिवाय राहू नये. ॥९॥

**गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम्।**
**आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्॥१०॥** मनु. अ. ८। श्लो. ३५०

गुरू, पुत्रादी बालक, पिता वगैरे वृद्ध किंवा ब्राह्मण आणि पाहिजे तर बहुश्रुत विद्वान यांच्यापैकी कोणीही असो, जो धर्म सोडून अधर्माने जात असेल इतरांना विनाकरण मारीत असेल तर त्याला विचार न करता ठार मारावे. म्हणजे आधी ठार मारावे व मग विचार करावा. ॥१०॥

**नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन।**
**प्रकाशं वाऽप्रकाशं वा मन्युस्तन्मन्युमृच्छति॥११॥** मनु. अ. ८। श्लो. ३५१

दुष्ट लोकांना मारल्याने मारणाऱ्याला पाप लागत नाही. मग त्यांची हत्या उघडपणे की गुप्तपणे झालेली असो कारण क्रोधी माणसाला क्रोधाने मारणे म्हणजे क्रोधाची क्रोधाशी लढाई असते. ॥११॥

**यस्य स्तेनः पुरे नास्ति नान्यस्त्रीगो न दुष्टवाक्।**
**न साहसिकदण्डघ्नौ स राजा शक्रलोकभाक्॥१२॥** मनु. अ. ८। श्लो. ३८६

ज्या राजाच्या राज्यात चोर, परस्त्रीगामी, दुर्वचन बोलणारे, दरोडेखोर व निर्ढावलेले गुन्हेगार शिक्षेची अवज्ञा करणारे म्हणजे राजाज्ञेचा भंग करणारे नसतात तो राजा अत्यंत श्रेष्ठ होय. ॥१२॥

**भर्त्तारं लङ्घयेद्या स्त्री स्वज्ञातिगुणदर्पिता।**
**तां श्वभिः खादयेद्राजा संस्थाने बहुसंस्थिते॥१॥** मनु. अ. ८। श्लो. ३७१

जी स्त्री आपल्या जाति व गुणांच्या घमेंडीने नवऱ्याला सोडून देऊन व्यभिचार करते तिला स्त्रीपुरुषांच्या जमावासमोर जिवंतपणीच कुत्र्यांकडून लचके तोडून राजाने मारुन टाकावे. ॥१॥

**पुमांसं दाहयेत्पापं शयने तप्त आयसे।**
**अभ्यादध्युश्च काष्ठानि तत्र दह्येत पापकृत्॥२॥** मनु. अ. ८। श्लो. ३७२

त्याचप्रमाणे जो पुरुष आपल्या बायकोला सोडून देऊन परस्त्रीगमन अथवा वेश्यागमन करतो त्या पापी माणसाला तापून लाल झालेल्या लोखंडी पलंगावर झोपवून पुष्कळ स्त्रीपुरुषांसमोर जिवंतपणी जाळून भस्म करून टाकावे. ॥२॥

**(प्रश्न)** जर राजा, राणी, न्यायाधीश अथवा त्याची पत्नी व्यभिचारादी दुष्कृत्ये करतील तर त्यांना कोणी शिक्षा द्यावी?

**(उत्तर)** राजसभेने शिक्षा द्यावी, मात्र त्यांना तर सामान्य प्रजाजनांपेक्षा जास्त कडक शिक्षा झाली पाहिजे.

**(प्रश्न)** राजा वगैरे प्रजेकडून होणारी शिक्षा कशी स्वीकार करतील?

**(उत्तर)** राजाही एक पुण्यात्मा व भाग्यशाली मनुष्य आहे. त्यालाच शिक्षा केली गेली नाही आणि ती त्याने मान्य केली नाही तर इतर लोक राजदंडाला का मानतील? आणि जेव्हा सारी प्रजा, प्रधान राज्याधिकारी व राज्यसभा राजाला धार्मिकपणे शिक्षा देऊ इच्छितात तेव्हा एकटा राजा काय करू शकणार? अशाप्रकारे व्यवस्था नसेल तर राजा, प्रधान व सर्व समर्थ पुरुष अन्यायात बुडून, न्यायधर्माला बुडवून टाकतील आणि

साऱ्या प्रजेचा नाश करून स्वत:ही नष्ट होतील. न्याययुक्त दंड ह्याचेच नाव राजा व धर्म आहे आणि जो त्याचा लोप करतो त्याच्याहून नीच पुरुष दुसरा कोण असेल ? या अर्थाचा जो श्लोक आहे त्याचे स्मरण करा.

**(प्रश्न)** एवढी कडक शिक्षा देणे योग्य नाही. कारण मनुष्य शरीराचा कोणताही अवयव बनवू शकत नाही, जिवंत करू शकत नाही. म्हणून प्राणदंडाची शिक्षा देता कामा नये, हे योग्य नाही काय ?

**(उत्तर)** जे लोक याला कडक शिक्षा असे समजतात त्यांना राजनीती कळत नाही, कारण एका माणसाला अशी कडक शिक्षा दिली गेल्याने शिक्षेच्या भीतीने इतर सर्व लोक दुष्कर्म करण्यापासून दूर राहतील; आणि अधर्माचा त्याग करून धर्म मार्गाचा अवलंब करतील. खरे म्हणाल तर ही शिक्षा सर्व लोकांच्या वाट्याला कणभरही येणार नाही आणि जर सौम्य शिक्षा दिली तर दुष्कृत्यांना ऊत येईल. जिला तुम्ही सौम्य शिक्षा म्हणता ती लाखो पट अधिक असल्यामुळे लाखो पट कडक होत असते. कारण जेव्हा अनेक माणसे दुष्कृत्ये करतील तेव्हा त्यांना दिलेली थोडी-थोडी शिक्षा देखील द्यावी लागेल उदाहरणार्थ एकाला मणभर शिक्षा झाली व दुसऱ्याला पावशेर शिक्षा झाली तर दोघांची मिळून एकूण एक मण अधिक पावशेर शिक्षा झाली. म्हणजे प्रत्येकाच्या वाट्याला वीसशेर व अदपाव शिक्षा आली. अशा सौम्य शिक्षेला दुष्ट लोक काय जुमानणार ? जसे एका माणसाला मणभर शिक्षा झाली व हजार माणसांना प्रत्येकी पावशेर शिक्षा झाली तर एकूण सव्वासहा मण शिक्षा सर्व माणसांना होईल. म्हणजे तीच अंतिमत: अधिक आणि कडक होईल म्हणून एकाला एक मण दिलेली शिक्षा अगदीच कमी व सौम्य होईल.

## जलमार्गाची नाकेबंदी आणि कर

**दीर्घाध्वनि यथादेशं यथाकालं तरो भवेत्।**
**नदीतीरेषु तद्विद्यात्समुद्रे नास्ति लक्षणम् ।।३।।** मनु. अ. ८। श्लो. ४०६

लांब मार्गामध्ये ज्याप्रमाणात समुद्राच्या खाड्या, नद्या अथवा महानद यात जितके क्षेत्र येत असेल त्याप्रमाणात नाकेबंदी करून कर बसवावा. महासमुद्रात निश्चित स्वरूपाचा कर बसवता येणार नाही. परंतु त्याबाबतीत राजा आणि समुद्रावर मोठमोठ्या नौका चालविणारे या दोघांना सोयीची होईल अशी व्यवस्था करावी. देशदेशांतरी व द्वीपद्वीपांतरी नौका घेऊन जाणाऱ्या आपल्या प्रजेचे सर्वप्रकारे उत्तम रक्षण होईल आणि त्यांना कोठेही कोणाकडूनही त्रास होणार नाही असा बंदोबस्त राजाने करावा. येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की या देशात पूर्वी जहाजे नौकानयन नव्हते असे जे लोक म्हणतात ते खोटे आहेत.

## राजाचे दैनंदिन कार्य

**अहन्यहन्यवेक्षेत कर्मान्तान्वाहनानि च।**
**आयव्ययो च नियतावाकरान्कोषमेव च ।।४।।** मनु. अ. ८ श्लो. ४२०

राजाने दररोज कोणती कामे पुरी झाली आहेत ते पाहावे तसेच हत्ती, घोडे वगैरे वाहने, झालेला जमाखर्च आयकर रत्नादिकांच्या खाणी व खजिना यांची तपासणी करावी.

**एवं सर्वानिमान् राजा व्यवहारान्समापयन्।**
**व्यपोह्य किल्बिषं सर्वं प्राप्नोति परमांगतिम् ।।५।।** मनु. अ. ८ श्लो. ४२१

जो राजा अशा प्रकारे सर्व व्यवहार योग्य प्रकारे पुरे करतो व करून घेतो. तो पापापासून दूर होऊन त्याला परमगती मोक्ष सुख प्राप्त होते.

**(प्रश्न)** संस्कृतविद्येत संपूर्ण राजनीती आहे की अपूर्ण ?

**(उत्तर)** संपूर्ण आहे. कारण या जगात जी राजनीती चालत आली आहे व यापुढे चालणार आहे ती सर्व संस्कृत ग्रंथांतून घेतलेली आहे आणि ज्या विषयांची प्रत्यक्ष नोंद झालेली नाही त्यांच्यासाठी

**प्रत्यंहं लोकदृष्टैश्चशास्त्रदृष्टैश्च हेतुभिः ॥** मनु. अ. ८ श्लो. ३

म्हणजे जे-जे नियम राजा व प्रजा यांच्यासाठी सुखकारक व धर्मयुक्त समजले जातील असे नियम पूर्ण विद्वानांच्या राजसभेने नियत करावेत. मात्र ही गोष्ट नेहमी लक्षात ठेवावी की शक्यतोवर बालपणी विवाह करू देऊ नयेत. तरुणपणीही पतिपत्नींच्या संमतीशिवाय विवाह करू नये ना होऊ द्यावेत. ब्रह्मचर्याचे यथावत पालन झाले पाहिजे. व्यभिचार व बहुविवाह बंद झाले करावेत. यायोगे शरीर व आत्मा यांचे पूर्ण सामर्थ्य सदा रहावे. जर कोणी केवळ आत्म्याचे बळ म्हणजे विद्या व ज्ञान वृद्धिंगत करील आणि शारीरिक सामर्थ्याकडे दुर्लक्ष करील तर कारण एकटा बलवान पुरुष शेकडो ज्ञानी व विद्वान लोकांना जिंकू शकतो. या उलट जर फक्त शारीरिक बळच वाढविले आणि आत्म्याचे बळ वाढविले नाही तरीही विद्येच्या अभावी उत्तम राज्यकारभार चालू शकत नाही. राज्यव्यवस्था नीट नसेल तर सगळे जण आपापसात भांडणे, दुफळी विरोध व लढाई करून नष्ट होऊन जातील. म्हणून नेहमी शरीर व आत्म्याचे बळ वाढवीत राहिले पाहिजे. व्यभिचार व अति विषयासक्ती यांच्या सारखी बळ व बुद्धी नाशक व्यवहार करणारी दुसरी गोष्ट नाही.

विशेषतः क्षत्रियांनी सुदृढ व सबळ असले पाहिजे. कारण तेच विषयासक्त झाले तर राज्यधर्मच नष्ट होईल. हेही लक्षात ठेवावे की 'यथा राजा तथा प्रजा' म्हणजे जसा राजा असेल तशीच त्याची प्रजा असते. म्हणून राजा व राजपुरुष यांना आवश्यक आहे की त्यांनी कधीही दुराचार करू नये. त्यांनी सदैव धर्माने व न्यायाने वागून सर्वांच्या उन्नतिसाठी आदर्श बनावे.

येथे संक्षेपाने राजधर्माचे वर्णन केले आहे. या विषयाची सविस्तर चर्चा वेद, मनुस्मृतीचे सात, आठ व नऊ हे अध्याय, शुक्रनीती, विदुरप्रजागर, महाभारतातील शांतिपर्वांतर्गत राजधर्म व आपद्धर्म वगैरे ग्रंथात किंवा पाहून पूर्ण राजनीती जाणून व धारण करून मांडलिक किंवा सार्वभौम, चक्रवर्ती राजांनी राज्य करावे आणि सर्वांनी हे ओळखावे की **'वयं प्रजापतेः प्रजा अभूम'** ॥ यजु. अ. १८। मं. २९

आम्ही प्रजापतीची म्हणजे परमेश्वराची प्रजा असून परमात्मा आमचा राजा आहे. आम्ही त्याचे किंकर, सेवकवत आहोत. त्याने कृपावंत होऊन आपल्या सृष्टीत आम्हाला राज्याधिकारी करावे, आणि आमच्या हातून आपल्या सत्याची व न्यायाची प्रवृत्ति करावी. आता पुढील प्रकरणात ईश्वर व वेद यांविषयी लिहिण्यात येईल.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते राजधर्मविषये**
**षष्ठः समुल्लासः सम्पूर्णः ॥६॥**





# सातवा समुल्लास

# ईश्वर

## देवता व परमेश्वर

**ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः।**
**यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते॥१॥** ऋ. मं. १।सू. १६४।मं. ३९

(ऋचो अक्षरे) या मंत्राचा अर्थ ब्रह्मचर्याश्रम विषयक प्रकरणात दिला आहे. जो सर्व दिव्य गुणकर्मस्वभाव व विद्या यांनी युक्त आहे, ज्याच्यामध्ये पृथ्वी, सूर्य आदी लोक स्थित आहेत, जो आकाशाप्रमाणे सर्वव्यापक आहे व जो सर्व देवांचा देव आहे त्या परमेश्वराला जे लोक जाणत नाहीत, मानीत नाहीत व त्याचे ध्यानही करीत नाहीत ते नास्तिक व मंदमति लोक सदैव दु:खसागरात बुडालेले राहतात. म्हणून जे लोक त्याचीच जाणीव बाळगतात ते सर्व सुखी होतात.

**(प्रश्न)** वेदामध्ये ईश्वर अनेक आहेत, ही गोष्ट तुम्ही मान्य करता की नाही ?

**(उत्तर)** आम्ही ते मान्य करीत नाही. कारण चारही वेदांमध्ये असे कुठेही लिहिलेले नाही की ज्यायोगे ईश्वर अनेक आहेत हे सिद्ध होऊ शकेल. परंतु ईश्वर एक आहे, असेच लिहिले आहे.

**(प्रश्न)** मग वेदांमध्ये ज्या अनेक देवतांचा उल्लेख येतो त्याचा अर्थ काय ?

**(उत्तर)** जे दिव्य गुणयुक्त असतात त्यांना देवता असे म्हणतात. उदाहरणार्थ पृथ्वी, परंतु तिला कोठेही ईश्वर अथवा उपासनीय मानण्यात आलेली नाही. पाहा या मंत्रात असे सांगितले आहे की, ''ज्याच्यामध्ये सर्व देवता वास करतात तो जाणण्यास व उपासना करण्यास योग्य ईश्वर आहे.'' जे लोक देवता या शब्दाचा अर्थ परमेश्वर असा करतात त्यांची ती चूक आहे. परमेश्वर हा देवांचा देव असल्याने त्याला महादेव असे म्हणतात. तोच साऱ्या जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारा, न्यायाधीश व अधिष्ठाता आहे.

**'त्रयस्त्रिंशत् त्रिशता.'** इत्यादी वेदमंत्रांमध्ये जे प्रमाण आहे त्याची व्याख्या शतपथ ब्राह्मणामध्ये अशी करण्यात आली आहे की तेहतीस देव आहेत. पृथ्वी, जल, अग्नी, वायु, आकाश, चंद्रमा, सूर्य आणि नक्षत्रे ही आठ. सर्व सृष्टीची निवासस्थाने असल्याने ते आठ वसू आहेत. प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय व जीवात्मा हे शरीराला सोडून जाताना रुदन करायला लावतात म्हणून या

अकरांना रुद्र असे म्हणतात. संवत्सराच्या बारा महिन्यांना बारा आदित्य म्हणतात. कारण ते सर्वांचे आयुष्य घेऊन जातात. विजेचे नाव इंद्र यासाठी आहे की तो परम ऐश्वर्याचा हेतू असतो. यज्ञाला प्रजापती म्हणण्याचे कारण असे की त्यामुळे वायु, वृष्टि, जल व औषधी यांची शुद्धी होते. विद्वानांचा सत्कार व नाना प्रकाराने शिल्पविद्येच्या प्रजेचे पालन होते. या तेहतीसांमध्ये पूर्वोक्त गुण असल्यामुळे त्यांना देव असे म्हणतात. त्यांचा स्वामी व सर्वांहून श्रेष्ठ असा जो चौतीसावा परमात्मा तोच उपास्य देव आहे असे शतपथाच्या चौदाव्या कांडामध्ये स्पष्ट सांगितले आहे. असेच इतरत्रही लिहिलेले आहे. लोकांनी ही शास्त्रे पाहिली असती तर वेदांमध्ये अनेक ईश्वर मानल्याप्रमाणे भ्रमजाळात गुरफटून ते कशाला भरकटले असते ? ॥१॥

**ईशा वास्यमिद९ सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ।**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥२॥** यजु. अ. ४०। मं. १

हे मनुष्या ! जे काही या जगात गतिमान आहे त्या सर्वांमध्ये व्यापक होऊन जो सर्वांचे नियमन करतो त्याला ईश्वर असे म्हणतात. त्याला भिऊन तू कोणाच्याही धनाची अन्यायाने अभिलाषा बाळगू नकोस. अन्यायाचरणाचा त्याग कर आणि न्यायाचरणरूपी धर्माने आपल्या आत्म्याने आनंदाचा उपभोग घे. ॥२॥

**अहम्भुवं वसुनः पूर्व्यस्पतिरहं धनानि सं जयामि शश्वतः ।**
**मां हवन्ते पितरं न जन्तवोऽहं दाशुषे विभजामि भोजनम् ॥३॥** ऋ मं. १०।सू. ४८।मं. १

ईश्वर सर्वांना उपदेश करतो की, ''हे मनुष्यांनो ! मी ईश्वर सर्व जगाच्या आधी विद्यमान होतो व मी जगाचा पती आहे. मी सनातन, जगत्कारण आणि सर्व धनाचा विजय करणारा व देणारा आहे. मलाच सर्व जीवांनी जशी मुले बापाला हाक मारतात तशी हाक मारावी. मी सर्वांना सुख देणाऱ्या जगासाठी नाना प्रकारच्या भोज्य पदार्थांची विभागणी त्यांच्या पालनासाठी करतो.'' ॥३॥

**अहमिन्द्रो न परा जिग्य इद्धनं न मृत्यवेऽवतस्थे कदाचन ।**
**सोममिन्मा सुन्वन्तो याचता वसु न मे पूरवः सख्ये रिषाथन ॥४॥**

ऋ. मं. १०।सू. ४८।मं. ५

मी परम ऐश्वर्यवान सूर्याप्रमाणे सर्व जगाचा प्रकाशक आहे. माझा कधी पराजय होत नाही अथवा मला कधी मरण येत नाही. मीच जगत्‌रूपी धनाचा निर्माता आहे. मी साऱ्या जगाची उत्पत्ती करणारा, मलाच जाणा. हे जीवांनो ! ऐश्वर्य प्राप्तीसाठी प्रयत्न करीत असता तुम्ही माझ्याकडे विज्ञानादी धन मागा आणि माझ्या मैत्रीपासून तुम्ही दूर जाऊ नका. ॥४॥

**अहं दां गृणते पूर्व्यं वस्वहं ब्रह्म कृणवं मह्यं वर्धनम् ।**
**अहं भुवं यजमानस्य चोदिताऽयज्वनः साक्षि विश्वस्मिन् भरे ॥५॥**

ऋ. मं. १०।सू. ४९।मं. १

मानवांनो ! सत्यभाषणरूपी स्तुती करणाऱ्या लोकांना मी सनातन ज्ञानादी धन देतो. मी ब्रह्म म्हणजे वेदांचा प्रकाश करणारा आणि तेच वेद माझ्याविषयी सर्वकाही सांगतात. वेदाद्वारेच मी सर्वांचे ज्ञान वाढवितो. मी सत्पुरुषांचा प्रेरक, यज्ञ करणाऱ्यांना फळ देणारा आणि या विश्वात जे काही आहे ते सर्व कार्य करणारा,

धारण करणारा आहे. म्हणून तुम्ही माझ्याऐवजी माझ्या ठिकाणी दुसऱ्या कुणाचीही पूजा करू नका अथवा इतर कुणालाही मानू नका व जाणू नका. ॥५॥

**हिरण्यगर्भः समवर्त्तताग्रे भूतस्य जातः पतिरेकऽआसीत्।**
**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥१॥** यजु. अ. १३। मं. ४

हा यजुर्वेदातील मंत्र आहे. हे मनुष्यांनो ! जो या सृष्टीच्या आधी होता, जो सूर्यादि तेजोमय लोकांचे उत्पत्तिस्थान आधार आणि जे काही उत्पन्न झाले होते, आहे व होईल त्याचा स्वामी होतो, आहे व असेल. तो पृथ्वीपासून सूर्यलोकापर्यंतची सारी सृष्टी निर्माण करून तिचे धारण (पालन) करीत आहे. त्या सुखस्वरूप परमेश्वराचीच भक्ती जशी आम्ही करतो तशीच तुम्हीसुध्दा करा.

## ईश्वराचे अस्तित्व

**(प्रश्न)** तुम्ही ईश्वर-ईश्वर असे म्हणता. परंतु त्याचे अस्तित्व कसे सिद्ध करता ?

**(उत्तर)** सर्व प्रत्यक्षादी प्रमाणांनी (आम्ही ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करतो).

**(प्रश्न)** ईश्वराच्या बाबतीत प्रत्यक्षादी प्रमाणे कधीच लागू पडत नाहीत.

**(उत्तर) इन्द्रियार्थसन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारि व्यवसायात्मकं प्रत्यक्षम्॥** न्या. अ. १। सू. ४ हे गौतम महर्षीकृत न्यायदर्शनातील सूत्र आहे. कान, त्वचा, डोळे, जीभ, नाक व मन यांचा अनुक्रमे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, सुख-दु:ख व सत्यासत्य या विषयांशी संबंध होऊन जे ज्ञान उत्पन्न होते त्याला प्रत्यक्ष ज्ञान म्हणतात. पण ते भ्रमरहित असावे.

आता विचार केला पाहिजे की इंद्रिये व मन यांच्या द्वारे गुणांचे प्रत्यक्ष ज्ञान होते, गुणीचे नव्हे. ज्याप्रमाणे चारही त्वचा वगैरे इंद्रियांनी स्पर्श, रूप, रस व गंध यांचे प्रत्यक्ष ज्ञान झाल्याने गुणी म्हणजे पृथ्वी तिचे आत्मायुक्त मनाने प्रत्यक्ष ज्ञान होते, त्याचप्रमाणे या प्रत्यक्ष सृष्टिमधील रचना विशेषादी गुणांचे प्रत्यक्ष ज्ञान झाल्याने परमेश्वराचेही प्रत्यक्ष ज्ञान होते.

आणि अशाच प्रकारे जेव्हा आत्मा मन व मन इंद्रियांना एखाद्या विषयात लावतो किंवा चोरी वगैरे वाईट कृत्ये किंवा परोपकारासारखी सत्कृत्ये करण्यास ज्या क्षणी प्रारंभ करते त्या क्षणी जीवाच्या इच्छा, ज्ञान वगैरे त्याच इच्छित विषयांकडे आकृष्ट होतात. त्यावेळी आत्म्यामध्ये वाईट कृत्य करण्याविषयी भय, शंका व लज्जा आणि चांगले काम करण्याविषयी अभय, नि:शंकता व आनंदोत्साह उत्पन्न होतो. हे सारे जीवात्म्याकडून नव्हे तर परमात्म्याकडून होते.

आणि जेव्हा जीवात्मा शुद्ध होऊन परमेश्वराचा विचार करण्यात तत्पर राहतो तेव्हा त्याला स्वत:चे व परमेश्वराचे प्रत्यक्ष ज्ञान होते. जेव्हा परमेश्वराचे प्रत्यक्ष ज्ञान होत असते. तर मग अनुमान आदींनी परमेश्वराचे ज्ञान होण्यात काय संदेह? कारण कार्यावरून कारणाचे अनुमान होत असते.

**(प्रश्न)** ईश्वर व्यापक आहे की एखाद्या विशिष्ट क्षेत्रात राहतो ?

**(उत्तर)** ईश्वर सर्वव्यापक आहे. कारण जो एका देशात राहतो तो सर्वांतर्यामी, सर्वज्ञ, सर्वनियता, सर्वांचा स्त्रष्टा, सर्वांचा धर्ता व प्रलयकर्ता होऊ शकत नाही (कारण) अप्राप्त क्षेत्रात कर्त्याची क्रिया असंभव असते.

**(प्रश्न)** परमेश्वर दयाळू व न्याय करणारा आहे किंवा नाही?

**(उत्तर)** होय, आहे.

**(प्रश्न)** हे दोन्ही गुण परस्परविरुद्ध आहेत. जो न्याय करतो तो दया कशी करणार ? आणि जो दया करील तो न्यायापासून दूर होईल कारण केलेल्या कृत्यानुसार तंतोतंत सुखदु:ख देणे, याला न्याय असे म्हणतात; आणि अपराध्याला शिक्षा न करता सोडून देणे, याला दया असे म्हणतात.

**(उत्तर)** न्याय व दया यांमध्ये नाममात्र भेद आहे. कारण जो हेतू न्यायाने साध्य होतो तोच दयेने साध्य होतो. माणसाने गुन्हा करणे सोडून द्यावे व दु:खात पडू नये हा शिक्षा करण्याचा हेतू असतो यामुळे इतरांचे दु:ख दूर करणे, याला दया असे म्हणतात. दया व न्याय यांचा जो अर्थ तुम्ही लावला आहे तो बरोबर नाही. कारण ज्याने जेवढे व जसे वाईट कृत्य केले असेल त्याला तेवढी व तशीच शिक्षा झाली पाहिजे. त्याचेच नाव न्याय आहे. अपराध्याला शिक्षा दिली गेली नाही तर दयेचाच नाश होईल कारण एका गुन्हेगार डाकूला सोडून दिल्याने हजारो धर्मात्मा पुरुषांना दु:ख देणे होय. जेव्हा एकाला सोडून दिल्याने हजारो माणसांना दु:ख प्राप्त होते तेव्हा ती कसली दया ? त्या डाकूला तुरुंगात डांबून ठेवून पापापासून त्याला वाचविणे म्हणजे त्या डाकूवर दया करणे होय आणि त्या डाकूला मारून टाकल्याने हजारो माणसांवर दया प्रदर्शित होत असते.

**(प्रश्न)** तर मग दया आणि न्याय हे दोन शब्द का निर्माण झाले ? दोन शब्दांचा अर्थ एकच असेल तर दोन वेगवेगळे शब्द असणे निरर्थक ठरते. म्हणून एकच शब्द असता तर बरे झाले असते. यावरून हेच सिद्ध होते की दया व न्याय यांचे एक प्रयोजन नाही.

**(उत्तर)** एका अर्थाचे अनेक शब्द व एका शब्दाचे अनेक अर्थ असत नाहीत काय?

**(प्रश्न)** असतात.

**(उत्तर)** तर मग तुम्हांला पुन: शंका का आली ?

**(प्रश्न)** जगात तसे ऐकू येते, म्हणून.

**(उत्तर)** जगात तर खरे आणि खोटे दोन्ही कानांवर येते. परंतु आपण त्याच्या विचाराने निर्णय करणे आपले काम आहे.

पाहा ! ईश्वराने सर्व जीवांचे मनोरथ सिद्ध व्हावेत म्हणून या जगात सर्व पदार्थ निर्माण करून ते जीवांना दान दिले आहेत. ही ईश्वराची मोठीच दया आहे. याहून दुसरी मोठी दया कोणती आहे ? आता न्यायाचे फळ तर प्रत्यक्षच दिसते. सुखदु:खाची व्यवस्था कमी-जास्त फळावरून परमेश्वराचा न्याय दिसून येत आहे. **दया आणि न्याय यांमध्ये एवढाच फरक आहे की मनाने सर्वांना सुख प्राप्त व्हावे व दु:ख दूर व्हावे ही इच्छा व तशी कृती करणे ही दया होय आणि बंधनछेदनादी बाह्य मार्गांनी अपराधानुसार शिक्षा करणे म्हणजे न्याय होय.** सर्वांना पाप व दु:ख यांपासून दूर ठेवणे हेच या दोहोचे उद्दिष्ट आहे.

**(प्रश्न)** ईश्वर साकार आहे की निराकार ?

**(उत्तर)** ईश्वर निराकार आहे. कारण जो साकार असतो तो सर्वव्यापक होऊ शकत नाही. ईश्वर सर्वव्यापक नसता तर त्याला सर्वज्ञ आदी गुणही लागू पडले नसते. कारण परिमित वस्तूमधील गुण, कर्म, स्वभावही परिमित असतात. तसेच तो (साकार असता तर) शीत-उष्ण, क्षुधा, तृषा, रोग, दोष, छेदन, भेदन इत्यादी

गोष्टींपासून मुक्त राहिला नसता. यावरून हेच सिद्ध होते की ईश्वर निराकार आहे. तो साकार असता तर त्याचे नाक, कान, डोळे इत्यादी अवयव बनविणारा दुसरा कोणीतरी असला पाहिजे. कारण जो संयोगाद्वारे उत्पन्न होतो त्याचा संयोग घडवून आणणारा निराकार चेतन अवश्य वेगळा असला पाहिजे. येथे कोणी असे म्हणेल की ईश्वराने स्वेच्छेने आपले शरीर बनविले, तर ते शरीर बनण्यापूर्वी तो निराकार होता, असेच सिद्ध होते म्हणूनच परमात्मा कधी शरीर धारण करीत नाही. परंतु निराकार असल्यामुळे साऱ्या जगाला सूक्ष्म कारणांपासून स्थूलाकार बनवितो.

**(प्रश्न)** ईश्वर सर्वशक्तीमान आहे की नाही ?

**(उत्तर)** आहे. परंतु सर्वशक्तिमान या शब्दाचा जो अर्थ तुम्ही समजता तसा तो नाही. परमेश्वर जगाची उत्पत्ती, पालन (स्थिती), प्रलय (लय) आदी आणि सर्व जीवांना त्यांच्या पापपुण्यांनुसार यथायोग्य सुखदुःख देण्याची व्यवस्था करण्यात आपल्या कामांमध्ये कोणाचीही किंचितही मदत घेत नाही. अर्थात आपल्या अनंत सामर्थ्यानेच तो आपली सर्व कामे पूर्ण करतो.

**(प्रश्न)** आम्ही असे समजतो की ईश्वर त्याला हवे ते करू शकतो; कारण त्याच्यावर दुसरा कोणी नाही.

**(उत्तर)** त्याची काय इच्छा आहे? तुम्ही असे म्हणाल की त्याला सर्व काही हवे असते आणि तो ते करू शकतो. यावर आम्ही तुम्हाला असे विचारतो की परमेश्वर स्वत:चा नाश करू शकतो काय ? अनेक ईश्वरांची उत्पत्ती करू शकतो काय ? स्वत: अविद्वान बनून चोरी, व्यभिचार वगैरे पाप कर्मे करून तो स्वत: दु:खीही होऊ शकतो काय ? ज्याप्रमाणे या गोष्टी परमेश्वराच्या गुणकर्मस्वभावाविरुद्ध आहेत. म्हणून तुमच्या म्हणण्यानुसार तो सर्व काही करू शकतो, असे कधी घडू शकत नाही. म्हणून सर्वशक्तिमान या शब्दाचा जो अर्थ आम्ही केला आहे तोच बरोबर आहे.

**(प्रश्न)** परमेश्वर सादी आहे की अनादी ?

**(उत्तर)** परमेश्वर अनादी आहे. ज्याचे आदि काही कारण अथवा समय नसतो त्याला अनादी असे म्हणतात. हे सर्व अर्थ पहिल्या समुल्लासामध्ये सांगितलेच आहेत. तेथे पाहावे.

**(प्रश्न)** परमेश्वर काय इच्छितो ?

**(उत्तर)** परमेश्वर सर्वांचे कल्याण आणि सर्वांसाठी सुख इच्छितो परंतु स्वतंत्रतापूर्वक तो कोणालाही पाप, अपराधावाचून पराधीन करीत नाही.

**(प्रश्न)** परमेश्वराची स्तुती, प्रार्थना व उपासना केली पाहिजे की नाही ?

**(उत्तर)**

**(प्रश्न)** स्तुती वगैरे केल्याने ईश्वर आपला नियम मोडून स्तुती, प्रार्थना करणाऱ्याचे पाप मुक्त करील काय ?

**(उत्तर)** नाही.

**(प्रश्न)** तर मग स्तुती, प्रार्थना कां, कशासाठी करायची ?

**(उत्तर)** स्तुती, प्रार्थना करण्याचे फळ वेगळेच आहे.

**(प्रश्न)** ते कोणते ?

(उत्तर) स्तुतीमुळे ईश्वराविषयी प्रीती निर्माण होते. त्याच्या गुण-कर्म-स्वभावामुळे आपल्या गुणकर्मस्वभावात सुधारणा होऊ शकते. प्रार्थनेने निरभिमानता उत्पन्न होऊन उत्साह वाढतो व साहाय्य मिळते. उपासनेने परब्रह्माशी मेळ होऊन त्याचा साक्षात्कार होतो.

(प्रश्न) हे जरा स्पष्ट करून सांगा.

(उत्तर) जसे,

## प्रार्थना व उपासना

**स पर्य्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविर ँ शुद्धमपापविद्धम्।**

**कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥१॥** यजु. अ.४०। मं. ८

**ईश्वराची स्तुती :-** तो परमात्मा सर्वत्र व्यापक, शीघ्रकारी व अनंत बलवान आहे. जो शुद्ध, सर्वज्ञ, सर्वांचा अंतर्यामी, सर्वांवर विराजमान, सनातन, स्वयंसिद्ध तो परमेश्वर अनादी काळापासून आपल्या अनादी सनातन जीवरूपी प्रजेला आपल्या सनातन विद्येने यथावत अर्थांचा बोध वेदांद्वारे करीत आहे. ही सगुण स्तुती झाली. परमेश्वरामध्ये जे-जे गुण आहेत त्या गुणांची स्तुती करणे म्हणजे सगुण स्तुती होय. (अकाय) तो परमेश्वर कधी शरीर धारण करीत नाही, अथवा जन्म घेत नाही. त्याच्यामध्ये छिद्र अथवा व्रण असत नाही, जो नाडीशिरास्नायूच्या बंधनात अडकत नाही आणि तो कधी पापाचरण करीत नाही, त्याला क्लेश, दु:ख, अज्ञान ही कधीही होत नाहीत, रागद्वेषादी विकारांपासून तो अलिप्त मानून परमेश्वराची जी स्तुती केली जाते ती निर्गुण स्तुती होय. परमेश्वरामध्ये जे गुण आहेत तसे गुण-कर्म-स्वभाव आपलेही करणे हे या स्तुतीचे फळ आहे. जसे परमेश्वर न्यायी आहे. तसेच आपणही न्यायी व्हावे. असे न करता केवळ भाटाप्रमाणे जो परमेश्वराचे गुण कीर्तन करतो पण आपले आचरण सुधारीत नाही त्याचे ते गुणसंकीर्तन व्यर्थ आहे.

## प्रार्थना

**यां मेधां देवगणाः पितरश्चोपासते।**

**तया मामद्य मेधयाऽग्ने मेधाविनं कुरु स्वाहा ॥१॥** यजु. अ. ३२। मं. १४

हे अग्ने ! ज्ञानस्वरूप परमेश्वरा ! तुझ्या कृपेने ज्या बुद्धीची उपासना विद्वान, ज्ञानी व योगी करतात त्याच बुद्धीच्या योगाने मला याच वर्तमान काळात तू बुद्धिमान कर. ॥१॥

**तेजोऽसि तेजो मयि धेहि। वीर्य्यमसि वीर्य्यं मयि धेहि।**

**बलमसि बलं मयि धेहि। ओजोऽस्योजो मयि धेहि।**

**मन्युरसि मन्युं मयि धेहि। सहोऽसि सहो मयि धेहि ॥२॥** यजु. अ. १९। मं. ९

हे परमेश्वरा ! तू ज्ञानस्वरूप आहेस. कृपा करून माझ्यामध्येही ज्ञानाचा प्रकाश कर. तू अनंत पराक्रमयुक्त आहेस. म्हणून आपल्या कृपाकटाक्षाने माझ्यामध्येही पूर्ण पराक्रम धारण करावे. तू अनंत बलयुक्त आहेस म्हणून माझ्यामध्येही बल निर्माण कर. तू अनंत सामर्थ्ययुक्त आहेस. तू मलाही पूर्ण सामर्थ्य दे. तू दुष्कृत्ये व दुष्ट माणसे यांच्यावर क्रोध करणारा आहेस. मलाही तू तसाच कर. तू निंदा व स्तुती यांची पर्वा करीत नाहीस आणि तुझा अपराध करणाऱ्यांना सहन करतोस. कृपा करून मलाही तसाच करावे. ॥२॥

**यज्जाग्रतो दूरमुदैति दैवं तदु सुप्तस्य तथैवैति।**
**दूरङ्गमं ज्योतिषां ज्योतिरेकं तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ॥३॥** यजु. अ.३४। मं.१

हे दयानिधे! तुझ्या कृपेने माझे मन जागेपणी दूरवर जाते आणि दिव्य गुणांनी युक्त राहते. तेच मन मी झोपलो असताना सुषुप्तीत म्हणजे गाढ निद्रेत प्रवेश करते; किंवा स्वप्नात दूरदूर गेल्यासारखा व्यवहार करते. सर्व प्रकाशकांचे प्रकाशक असणारे ते एक माझे मन शुभसंकल्पयुक्त म्हणजे स्वतःचे व इतरांचे कल्याण व हित चिंतणारे होवो. कोणाचीही हानी करण्याची इच्छा बाळगणारे ते कधीही न होवो. ॥३॥

**येन कर्माण्यपसो मनीषिणो यज्ञे कृण्वन्ति विदथेषु धीराः।**
**यदपूर्वं यक्षमन्तः प्रजानां तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ॥४॥**

हे सर्वांतर्यामी! ज्याच्या साह्याने कर्म करणारे धैर्ययुक्त विद्वान लोक यज्ञ व युद्धादी कृत्ये करतात, जे अपूर्व सामर्थ्ययुक्त, पूजनीय व प्रजेच्या अंतःकरणात वसणारे आहे ते माझे मन शुभ संकल्पाने युक्त होवो. ते सदैव धर्माचरणाची इच्छा बाळगणारे व अधर्मापासून दूर राहणारे होवो. ॥४॥

**यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्ज्योतिरन्तरमृतं प्रजासु।**
**यस्मान्नऽऋते किंचन कर्म क्रियते तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ॥५॥**

जे उत्कृष्ट ज्ञानाने युक्त आहे, जे इतरांना चेतना देते, निश्चयात्मक वृत्तीचे आहे आणि सर्व प्रजेच्या अंतर्यामी असणारा प्रकाशयुक्त आहे, जे अविनाशी आहे, ज्याच्या वाचून कोणी कोणतेही काम करू शकत नाही ते माझे मन शुद्ध गुणांची आकांक्षा बाळगणारे व दुष्ट गुणांपासून दूर राहो. ॥५॥

**येनेदं भूतं भुवनं भविष्यत् परिगृहीतममृतेन सर्वम्।**
**येन यज्ञस्तायते सप्त होता तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ॥६॥**

हे जगदीश्वरा! ज्याच्या योगाने सर्व योगी लोक भूत, भविष्य व वर्तमान काळांतील व्यवहार जाणतात, जे अविनाशी जीवात्म्याचे परमेश्वराशी मीलन घडवून त्याला सर्व प्रकारे त्रिकालज्ञ बनविते, ज्याच्यामध्ये ज्ञान व कर्म आहे, पाच ज्ञानेंद्रिये, बुद्धी व आत्मायुक्त असतो, त्या योगरूपी यज्ञाची वृद्धी होते, ते माझे मन योगविज्ञानयुक्त बनून अविद्या आदी क्लेशांपासून दूर राहो. ॥६॥

**यस्मिन्नृचः साम यजूꣳषि यस्मिन्प्रतिष्ठिता रथनाभाविवाराः।**
**यस्मिँश्चित्तꣳ सर्वमोतं प्रजानां तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ॥७॥**

हे परम विद्वन परमेश्वरा! तुझ्या कृपेने माझ्या मनामध्ये, रथाच्या चाकाच्या मध्यभागी तुंब्यामध्ये बसविलेल्या आऱ्यांप्रमाणे, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व ज्यात अथर्ववेदसुद्धा प्रतिष्ठित होतो आणि ज्याच्यामध्ये सर्वज्ञ, सर्वव्यापक, प्रजांचा साक्षी चित्त चेतन जाणवते, ते माझे मन अविद्येचा नाश करून सदैव विद्याप्रिय होवो. ॥७॥

**सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिनऽइव।**
**हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ॥८॥** यजु. अ. ३४। मं.१ते ६

हे सर्वनियंत्या ईश्वरा! जे माझे मन लगाम घातलेल्या घोड्यांप्रमाणे अथवा घोड्यांवर नियंत्रण ठेवणाऱ्या सारथ्याप्रमाणे माणसांना इकडे-तिकडे अनन्तरीत्या फिरविते, जे हृदयामध्ये प्रतिष्ठित, गतिमान व अत्यंत

वेगवान आहे, ते माझे मन सर्व इंद्रियांना अधर्माचरणा पासून दूर ठेवून धर्माच्या मार्गाने सदैव नेईल, अशी कृपा तू माझ्यावर कर.॥८॥

**अग्ने नय सुपथा राये अस्मान् विश्वानि देव वयुनानि विद्वान्।**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ॥१॥** यजु. अ. ४०। मं. १६

हे सुखदायक स्वप्रकाशस्वरूप सर्वज्ञ परमात्मन! तू आम्हाला श्रेष्ठ मार्गाने ने व सर्व प्रज्ञानांची प्राप्ती करून दे आणि आमच्यामध्ये जे काही कुटिल पापाचरणरूप आहे त्यापासून दूर करावे. तू आम्हांला पवित्र करावेस म्हणून आम्ही तुझी नम्रतापूर्वक पुष्कळ स्तुती करतो. ॥१॥

**मा नो महान्तमुत मा नोऽअर्भकं मा न उक्षन्तमुत मा न उक्षितम्।**
**मा नो वधीः पितरं मोत मातरं मा नः प्रियास्तन्वो रुद्र रीरिषः॥१॥**

यजु.अ. १६।मं.१५

हे रुद्रा! दुष्टांना त्यांच्या पापाबद्दल दु:खरूपी शिक्षा देऊन त्यांना रडावयास लावणाऱ्या परमेश्वरा! आमचे लहानमोठे लोक, गर्भ, माता, पिता आणि प्रिय बंधु वर्ग तसेच शरीरांचा नाश करण्यास तू आम्हांला प्रेरित करू नकोस. ज्यायोगे आम्ही तुझ्या शिक्षेस पात्र होणार नाही अशा मार्गाने तू आम्हांला चालव. ॥१॥

**असतो मा सद् गमय, तमसो मा ज्योतिर्गमय, मृत्योर्माऽमृतं गमयेति॥**

शतपथ ब्रा. प्रपा. १४। ब्रा. ३। कं. १। व. ३०

हे परमगुरो परमात्मन! तू आम्हांला असत् मार्गापासून दूर करून सन्मार्गाने ने. अविद्यारूपी अंधकारातून सोडवून विद्यारूपी सूर्य मिळवून दे; आणि मृत्यूरूपी रोगापासून दूर करून मोक्षाच्या आनंदरूपी अमृताची प्राप्ती करून दे. अर्थात ज्या दोषांपासून किंवा दुर्गुणांपासून परमेश्वर मुक्त आहे त्यांपासून आपणांसही अलिप्त समजून परमेश्वराची जी प्रार्थना केली जाते ती प्रार्थना विधि निषेधमुख असल्यामुळे ती सगुणनिर्गुणात्मक प्रार्थना होय. जी व्यक्ती ज्या गोष्टीसाठी प्रार्थना करीत असेल तिने त्याप्रमाणे आपले आचरण ठेवले पाहिजे. उदाहरणार्थ, जसे एखादी व्यक्ती सर्वोत्तम बुद्धी मिळावी म्हणून परमेश्वराची प्रार्थना करीत असेल तर तिने आपणाकडून प्रयत्न होईल तितका विद्याव्यासंग केला पाहिजे. म्हणजे असे की, आपल्या पुरुषार्थाची पराकाष्ठा केल्यानंतरच परमेश्वराची प्रार्थना करणे उचित होय.

अशी प्रार्थना कधीही करता कामा नये की, "हे परमेश्वरा! तू माझ्या शत्रूंचा नाश कर. मला सर्वात मोठा बनव. माझीच प्रतिष्ठा वाढव आणि माझ्या आधीन सर्व राहतील असे कर." अशी प्रार्थना परमेश्वर कधीही स्वीकारीत नाही. कारण जेव्हा दोनही शत्रू एकमेकांच्या नाशासाठी ईश्वराची प्रार्थना करीत असतील तेव्हा परमेश्वराने दोघांची प्रार्थना मान्य करून दोघांचा नाश करावा काय? कोणी असे म्हणेल की ज्याची भक्ती अधिक असेल त्याची प्रार्थना ईश्वराने ऐकावी. यावर आमचे म्हणणे असे की ज्याची भक्ती कमी असेल त्याच्या शत्रूचाही कमी नाश व्हावा. अशा मूर्खपणाच्या प्रार्थना करता-करता एखादा माणूस अशीही प्रार्थना करील की, "हे परमेश्वरा! तू आम्हाला भाकरी भाजून खाऊ घाल. माझे घर झाडून काढ. माझे कपडे धू आणि माझी शेतवाडीही कसून दे." अशा प्रकारे जे लोक देवावर हवाला ठेवून आळशी होऊन बसून राहतात ते महामूर्ख

आहेत. कारण परमेश्वराची पुरुषार्थ करण्याची जी आज्ञा आहे ती आज्ञा जो मोडेल त्याला कधीच सुख मिळणार नाही. पाहा :-

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ॥** यजु. अ. ४० । मं. २

परमेश्वर आज्ञा देतो की माणसाने शंभर वर्षे म्हणजे जिवात जीव असेपर्यंत कर्म करीत जगण्याची इच्छा धरावी. (कधीही आळशी बनू नये.)

पाहा ! सृष्टीमध्ये जितके प्राणी अथवा अप्राणी आहेत ते सर्व आपापली कामे व प्रयत्न करीतच असतात. मुंग्या वगैरे प्राणी सतत प्रयत्न करीत असतात. पृथ्वी वगैरे सदैव फिरत असतात आणि वृक्ष वगैरे सदा वाढतात व घटतात. या गोष्टींवरून माणसानेही धडा घेतला पाहिजे. पुरुषार्थी माणूस पुरुषार्थ करतो त्याला इतर लोक साह्य करीत असतात. त्याचप्रमाणे धर्मयुक्त पुरुषार्थ करणाऱ्याला ईश्वरही मदत करतो. जसे काम करणाऱ्या माणसास नोकर ठेवतात आळशाला कोणी ठेवत नाही. डोळे असणारा व पाहण्याची इच्छा बाळगणारा असतो त्यालाच दाखविले जाते. आंधळ्याला नाही.

याचप्रमाणे परमेश्वरही सर्वांच्या परोपकाच्या प्रार्थनेत साह्य करतो. हानिकारक कृत्यामध्ये तो सहायक बनत नाही. गूळ गोड आहे असा जप करीत करणाऱ्याला गूळ मिळत नाही किंवा त्याचा स्वादही कधी कळत नाही. परंतु गूळाच्या प्राप्तीसाठी जो यत्न करतो त्याला लवकर किंवा उशीरा गूळ अवश्य मिळतच असतो. आता तिसरी उपासना-

## उपासना

**समाधिनिर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत् ।**
**न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयन्तदन्तःकरणेन गृह्यते ॥** मैत्रायण्युपनिषद प्र. ४। ख.४। व. ९।

हे उपनिषदांतील वचन आहे. समाधीच्या योगाने ज्या पुरुषाचे अविद्यादी दोष नष्ट झाले आहेत, ज्याने आत्मस्थ होऊन परमात्म्यामध्ये आपले चित्त लावले आहे त्याला परमात्म्याशी संयोगाचे जे सुख प्राप्त होते त्याचे वर्णन वाणीने करता येऊ शकत नाही. कारण जीवात्मा आपल्या अंतःकरणाने त्या आनंदाचे ग्रहण करतो. उपासना या शब्दाचा अर्थ जवळ बसणे असा आहे. अष्टांग योगाद्वारे परमात्म्याचे समिपस्थ होणे आणि त्याला सर्वव्यापी, सर्वान्तर्यामी या रूपांत प्रत्यक्ष पाहण्यासाठी जे काही करावे लागते ते ते सर्व केले पाहिजे त्याला उपासना असे म्हणतात.

**तत्राऽहिंसासत्याऽस्तेयब्रह्मचर्याऽपरिग्रहा यमाः ॥** योग. साध. सू. ३०

इत्यादी सूत्र पातंजल योगशास्त्रातील आहे. उपासनेचा प्रारंभ हाच आहे की उपासना करू इच्छिणाऱ्याने कोणाशीही वैर ठेवू नये, सर्वांवर सर्वकाळ प्रेम करावे. खरे बोलावे. कधीही खोटे बोलू नये. चोरी करू नये. सदैव सत्य व्यवहार करावा. जितेंद्रिय व्हावे. विषयलंपट बनू नये. निरभिमानी व्हावे. अभिमान कधीही करू नये. कसलाही लोभ धरू नये. हे पाच प्रकारचे यम मिळून उपासनायोगाचे प्रथम अंग आहे.

**शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वर प्रणिधानानि नियमाः ॥** योग. साध. सू. ३२

राग (मोह) द्वेषाचा त्याग करून आंतरिक आणि पाणी वगैरे साधनांनी बाह्य शुद्धी करावी. धर्मयुक्त

पुरुषार्थ केल्याने लाभ झाला तर त्यात आनंद मानू नये आणि हानी झाली तर दु:ख करू नये. प्रसन्न चित्ताने आळस सोडून सदैव पुरुषार्थ करीत असावे. सदोदित सुखदु:ख सहन करावे आणि धर्माचे अनुष्ठान करावे. अधर्माचे नाही. नेहमी सत्य शास्त्रांचे अध्ययन व अध्यापन करावे. सत्पुरुषांचा संग करावा आणि ओ३म् या एका परमेश्वराच्या नावाचा अर्थ समजून नित्य जप करावा. आपल्या आत्म्याला परमेश्वराच्या आज्ञेनुसार समर्पित करावे. हे पाच प्रकारचे नियम मिळून उपासने योगाचे दुसरे अंग म्हटले जाते. यानंतरच्या सहा अंगांचे वर्णन योगशास्त्रात किंवा 'ऋग्वेदादिभाष्यभूमिका' या ग्रंथाच्या उपासना या प्रकरणात पाहून घ्यावे.

जेव्हा उपासना करावयाची असेल तेव्हा शुद्ध व एकांत ठिकाणी जाऊन आसनात बसून, प्राणायाम करून इंद्रियांना बाह्य विषयांपासून परावृत्त करून मनाला नाभिप्रदेश किंवा हृदय, कंठ, नेत्र, शिखा किंवा पाठीचे मधले हाड इत्यादी स्थानांपैकी कोणत्या तरी एका स्थानावर स्थिर करून आपला आत्मा व परमात्मा यांचे चिंतन करून आणि परमात्म्यामध्ये तल्लीन होऊन संयमी व्हावे.

साधक जेव्हा ही साधना करतो तेव्हा त्याचा आत्मा व अंत:करण पवित्र होऊन तो सत्यपूर्ण होतो. त्याचे ज्ञान व विज्ञान नित्य वाढून तो मुक्तीपर्यंत पोहोचतो. जो आठ प्रहरांमध्ये एक घटकाभर जरी अशा प्रकारे ध्यान करतो तो सदैव उन्नतीची प्राप्ति करतो. सर्वज्ञत्व आदी गुणांसह चिंतन करून परमेश्वराची उपासना करणे ही सगुणोपासना होय आणि द्वेष, रूप, रस, गंध, स्पर्श आदी गुणांपासून तो अलिप्त समजून अतिसूक्ष्म आत्म्याच्या आत व बाहेर असणाऱ्या सर्वव्यापक परमेश्वरामध्ये दृढ स्थित होणे ही निर्गुणोपासना म्हटली जाते.

याचे फळ ज्याप्रमाणे थंडीने कुडकुडणारा माणूस अग्नीजवळ जाताच तो थंडीपासून निवृत्त होतो त्याप्रमाणे परमेश्वराच्या सान्निध्यात गेल्यामुळे सर्व दोष व दु:खे दूर होऊन परमेश्वराच्या गुणकर्मस्वभावाप्रमाणे जीवात्म्याचे गुणकर्मस्वभाव पवित्र होतात. म्हणून परमेश्वराची स्तुती, प्रार्थना व उपासना अवश्य केली पाहिजे. उपासनेची इतर फळे आणखी असली तरी उपासनेमुळे आत्म्याचे बळ इतके वाढते की पर्वतप्राय दु:ख कोसळले तरी तो घाबरत नाही आणि सर्व काही सहन करू शकेल. ही काय लहानसहान गोष्ट आहे ? जो परमेश्वराची स्तुती, प्रार्थना व उपासना करीत नाही तो कृतघ्न व महामूर्खही असतो. कारण ज्या परमेश्वराने जीवांच्या सुखासाठी सर्व पदार्थ निर्माण केले आहेत त्याच्या गुणांना विसरणे, ईश्वरच न मानणे, ही कृतघ्नता व मूर्खता आहे.

## ईश्वरास जाणण्याची पद्धति

**(प्रश्न)** परमेश्वराला कान, डोळे वगैरे इंद्रिये नाहीत. तर मग तो इंद्रियांची कामे कशी करू शकतो ?

**(उत्तर) अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।**
**स वेत्ति विश्वं न च तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् ॥१॥**

श्वेताश्वेतर. उ. अ. ३ मं. १९

हे उपनिषदातील वचन आहे. परमेश्वराला हात नाहीत. पण तो आपल्या सामर्थ्यरूपी हातांनी जगाची रचना, ग्रहण करतो. त्याला पाय नाहीत; परंतु तो सर्वव्यापक असल्यामुळे सर्वांहून अधिक वेगवान आहे. त्याला डोळे नसले तरी तो सर्वांना यथावत पाहतो. कान नसले तरी सर्वांच्या गोष्टी ऐकतो. त्याला अंत:करण नाही. तरीही तो सर्व जगतास जाणतो. अशा त्या परमेश्वराला अवधिसहीत जाणणारा कोणीही नाही. त्यालाच

सनातन, सर्वश्रेष्ठ व सर्वात पूर्ण असल्यामुळे पुरुष म्हणतात. इंद्रिये व अंत:करण नसतानाही तो आपल्या सामर्थ्याने आपली सर्व कामे करीत आहे.

**(प्रश्न)** अनेक लोक परमेश्वर हा निष्क्रिय व निर्गुण आहे असे म्हणतात.

**(उत्तर) न तस्य कार्य्यं करणं च विद्यते न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते।**
**परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च॥१॥**

श्वेताश्वतर उ. अ. ६। मं. ८

हे उपनिषदांतील वचन आहे. परमेश्वरापासून कोणतेही तद्रूप कार्य आणि त्याचे कारण अर्थात साधकतम दुसरा अपेक्षित नाही. त्याच्या बरोबरीचा कोणी नाही अथवा त्याच्याहून अधिक मोठा कोणी नाही. त्याच्यामध्ये अनंत ज्ञान, अनंत बळ व अनंत क्रिया म्हणजे सर्वोत्तम शक्ती स्वाभाविकपणे त्याचे ठिकाणी ऐकली जाते. परमेश्वर निष्क्रिय असता तर त्याने जगाची उत्पत्ती, स्थिती व लय या गोष्टी करू शकला नसता. म्हणून तो 'विभु'. तथापि तो चेतन असल्यामुळे त्याच्यात क्रियाही आहे.

**(प्रश्न)** जेव्हा तो एखादी क्रिया करीत असेल तेव्हा ती सान्त असते की अनन्त?

**(उत्तर)** जेवढ्या देशकाळामध्ये क्रिया करणे तो उचित समजतो तेवढ्याच देशकालामध्ये तो क्रिया करतो. जास्त नाही की कमी नाही. कारण तो विद्वान आहे.

**(प्रश्न)** परमेश्वर स्वत:चा अंत जाणतो की नाही?

**(उत्तर)** परमात्मा पूर्ण ज्ञानी आहे. कारण ज्ञान त्यालाच म्हणतात की ज्यामुळे जी वस्तू जशी आहे तशीच तिला जाणणे अर्थात जो पदार्थ जसा असेल त्याला तसेच जाणण्याचे नाव ज्ञान आहे. परमेश्वर अनन्त असताना त्याला अनन्त समजणे हे ज्ञान आणि त्याविरुद्ध समजणे अज्ञान अर्थात अनन्ताला सान्त आणि सान्ताला अनन्त समजणे हा भ्रम म्हटला जातो. 'यथार्थदर्शनं ज्ञानमिति.' ज्याचा जसा गुणकर्मस्वभाव असेल त्या पदार्थाला तसेच जाणून मानणे हे ज्ञान व विज्ञान म्हटले जाते. याच्या उलट असेल ते अज्ञान होय. म्हणून-

**क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः॥** योग सू. समाधि. सू. २४

जो अविद्यादि क्लेश आणि कुशल-अकुशल, इष्ट-अनिष्ट व मिश्र फलदायक कर्मांच्या वासनांपासून अलिप्त आहे तो सर्व जीवांहून विशेष असण्याने ईश्वर म्हटला जातो.

## ईश्वराचे अस्तित्व

**(प्रश्न) ईश्वरासिद्धेः॥१॥** सांख्य. अ. १। सू. ९२ **प्रमाणाभावान्न तत्सिद्धिः॥२॥** सांख्य.अ.५।सू.१० **सम्बन्धाभावान्नानुमानम्॥३॥** सांख्य. अ. ५। सू. ११

प्रत्यक्ष (प्रमाणाने) ईश्वर सिद्ध होत नाही. ॥१॥ ज्याअर्थी त्याची सिद्धी प्रत्यक्ष प्रमाणाने होत नाही त्याअर्थी अनुमानादी प्रमाणेही लागू होत नाहीत. ॥२॥ व्याप्तिसंबंध नसल्यामुळे त्याचे अनुमानही होऊ शकत नाही. अर्थात प्रत्यक्ष व अनुमान ही प्रमाणे जेथे लागू होत नाहीत तेथे शब्दप्रमाण वगैरेही लागू होऊ शकत नाही. म्हणून ईश्वराचे अस्तित्व सिद्ध होऊ शकत नाही. ॥३॥

**(उत्तर)** येथे ईश्वरसिद्धिसाठी प्रत्यक्ष प्रमाण नाही; आणि ईश्वर हा जगाचे उपादान कारणही नाही. परमात्मा

हा पुरुषाहून विलक्षण अर्थात सर्वत्र भरलेला असल्यामुळे त्याचे नाव पुरुष आहे. तसेच जीव हा शरीरामध्ये वास करीत असल्यामुळे त्यालाही पुरुष असे नाव आहे कारण याच प्रकरणात असे म्हटले आहे की, **प्रधानशक्तियोगाच्चेत्संङ्गापत्तिः ॥१॥ सत्तामात्राच्चेत्सर्वैश्वर्यम् ॥२॥ श्रुतिरपि प्रधान कार्य्यत्वस्य ॥३॥** सांख्य. अ. ५। सू. ८,९,१२

जर पुरुषाला प्रधानशक्तीचा योग होईल तर त्याच्यामध्ये संगापत्ती होईल. याचा अर्थ असा की ज्याप्रमाणे प्रकृती सूक्ष्माशी मिळून कार्यरूप झाली आहे, त्याप्रमाणे परमेश्वरही स्थूल होईल. म्हणून परमेश्वर हा जगाचे उपादानकारण नसून निमित्त कारण आहे. ॥१॥ जर चैतन्यमय परमेश्वर हे जगाचे उपादानकरण मानले तर जसा परमेश्वर समग्र ऐश्वर्ययुक्त आहे तसे हे जगही सर्वैश्वर्ययुक्त झाले पाहिजे. पण तसे ते नाही. म्हणून परमेश्वर जगाचे उपादान कारण नाही परंतु निमित्त कारण आहे. ॥२॥ कारण उपनिषदांतसुद्धा प्रधानप्रकृती हेच जगाचे उपादान कारण आहे असे सांगितले आहे. ॥३॥ जसे, **अजामेकां लोहितशुक्लकृष्णां बह्वीः प्रजाः सृजमानां स्वरूपाः ॥** श्वेताश्व. अ. ४। मं. ५

हे श्वेताश्वेतर उपनिषदातील वचन आहे. जी जन्मरहित आणि सत्व, रज, तम या तीन गुणांनी युक्त प्रकृती आहे तीच आपल्या आकाराच्या योगाने बहुप्रजारूपी होत असते. अर्थात प्रकृती परिणामिनी असल्याने ती अवस्थांतर होऊन जाते. या उलट पुरुष हा अपरिणामी असल्याने त्याचे अवस्थांतर होऊन त्याला दुसरे रूप प्राप्त होत नाही. तो सदा कूटस्थ निर्विकार राहतो आणि प्रकृती ही सृष्टीमध्ये सविकार व प्रलयामध्ये निर्विकार राहते.

म्हणून जो कोणी कपिलाचार्यांना अनीश्वरवादी म्हणतो तो स्वतःच अनीश्वरवादी आहे. कपिलाचार्य अनीश्वरवादी नाहीत. तसेच मीमांसकांच्या धर्माधर्मांने ईश्वर न्याय वैशेषिकांतसुद्धा 'आत्मा' या शब्दप्रयोगाने ते निरीश्वरवादी नाहीत. कारण सर्वज्ञत्वादि धर्मयुक्त आणि अतति सर्वत्र व्याप्नोति इति आत्मा जो सर्वत्र व्यापक आणि सर्वज्ञादि धर्मयुक्त सर्व जीवांचा आत्मा आहे त्याला मीमांसक, वैशेषिककार व नैयायिक ईश्वर मानतात.

## ईश्वराच्या अवताराचे खंडन

**(प्रश्न)** ईश्वर अवतार घेतो की नाही ?

**(उत्तर)** नाही. कारण यजुर्वेदात **'अज एकपात्'** व **'सपर्य्यगाच्छुक्रमकायम्'**. अशा वचनांवरून परमेश्वर जन्म घेत नाही.

**(प्रश्न) यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥** भ. गी. अ. ४। श्लो. ७

भगवद्गीतेत श्रीकृष्ण म्हणतात की, ''जेव्हा जेव्हा धर्माचा लोप होतो तेव्हा-तेव्हा मी शरीर धारण करतो !''

**(उत्तर)** ही गोष्ट वेदविरुद्ध असल्यामुळे ती प्रमाण नाही आणि असे असू शकते की श्रीकृष्ण हे धर्मात्मे होते आणि ते धर्माचे रक्षण करू इच्छित होते. त्यामुळे युगायुगामध्ये जन्म घेऊन मी सज्जनांचे रक्षण व दुष्टांचा नाश करीन तर त्यात काही वावगे नाही. कारण **'परोपकाराय सतां विभूतयः'** म्हणजे परोपकारासाठी सत्पुरुषांचे तन, मन, धन असते. तथापि एवढ्यावरून श्रीकृष्ण ईश्वर होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** जर असे असेल तर जगात ईश्वराचे चोवीस अवतार होतात आणि त्यांना अवतार का मानतात ?

**(उत्तर)** वेदांचा अर्थ न जाणल्यामुळे, सांप्रदायिक लोकांनी गैरसमज करून दिल्यामुळे आणि स्वत: अज्ञानी असल्यामुळे लोक या भ्रमजालात फसतात आणि अशा अप्रामाणिक गोष्टी बोलतात व त्यांना मानतात.

**(प्रश्न)** ईश्वराने अवतार घेतले नसते तर कंस, रावण आदी दुष्टांचा नाश कसा होऊ शकला असता ?

**(उत्तर)** पहिली गोष्ट जो जन्मला आहे तो अवश्य मरणार. जो ईश्वर अवतार न घेता, शरीर धारण न करता जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करतो त्याच्या समोर कंस, रावण वगैरे किडामुंगी सारखेही नाहीत. तो सर्वव्यापक असल्यामुळे कंस रावणादिकांच्या शरीरांमध्येही परिपूर्ण झाला आहे त्याने त्याचवेळी मर्मच्छेदन करून त्यांचा नाश करू शकला असता. या अनंत गुणकर्मस्वभावयुक्त परमेश्वराला एखाद्या क्षुद्र जीवाला मारण्यासाठी जन्ममरणयुक्त बनावे लागते असे म्हणणाऱ्याला मूर्ख या खेरीज दुसरे कोणते विशेषण मिळू शकेल?

जर कोणी असे म्हणत असेल की भक्तजनांचा उद्धार करण्यासाठी परमेश्वर जन्म घेतो, तर तेही खरे नाही. कारण जे भक्तजन ईश्वराच्या आज्ञेनुसार चालतात त्यांचा उद्धार करण्याचे पूर्ण सामर्थ्य ईश्वरामध्ये आहे. पृथ्वी, सूर्य, चंद्र आदी विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय या कामांहून कंस रावणादिकांचा वध आणि गोवर्धन पर्वत उचलणे ही कामे मोठी आहेत काय ?

जो कोणी या सृष्टीतील परमेश्वराच्या कामांचा विचार करील त्याला त्याच्या सारखा कोणी झाला नाही व होणार नाही, 'न भूतो न भविष्यति', युक्तिवादाने सुद्धा ईश्वराचा जन्म सिद्ध होत नाही. जर कोणी असे म्हणेल की हे अनंत आकाश गर्भात आले किंवा ते मुठीत सामावले, तर ते म्हणणे खरे असू शकत नाही. कारण आकाश हे अनंत व सर्वात व्यापक आहे. त्यामुळे ते बाहेर जात नाही अथवा आत येत नाही त्याचप्रमाणे परमेश्वर हा अनंत व सर्वव्यापक असल्यामुळे त्याचे येणे-जाणे कधी सिद्ध होऊ शकत नाही. जेथे त्याचे अस्तित्व नसेल तेथे जाणे-येणे घडू शकते काय ? तो गर्भात व्यापक नव्हता म्हणून तो बाहेरून गेला ? आणि काय तो बाहेर नव्हता म्हणून आतून निघाला ? ईश्वराच्या बाबतीत अशा गोष्टी बोलणे व मानणे हे अडाण्यांखेरीज दुसरे कोण करणार ? म्हणून परमेश्वराचे येणे-जाणे व जन्म-मरण या गोष्टी कधीच सिद्ध होऊ शकत नाहीत. म्हणून येशू वगैरेही ईश्वराचे अवतार नाही हे समजून घ्यावे. कारण राग, द्वेष, क्षुधा, तृष्णा, भय, शोक, दु:ख, सुख, जन्म, मरण आदी गुणांनी युक्त असल्यामुळे ते माणसेच होते.

**(प्रश्न)** ईश्वर आपल्या भक्तांचे पाप क्षमा करतो की नाही ?

**(उत्तर)** नाही. कारण तो पाप क्षमा करील तर त्याचा न्याय नष्ट होईल; आणि सारी माणसे महापापी बनतील. कारण पाप क्षमेची बाब ऐकताच पाप करण्यात त्यांना निर्भयता आणि उत्साह होत जाईल जसे राजा अपराध्यांचे अपराध क्षमा करील तर ते अधिक जोमाने मोठमोठे गुन्हे करतील कारण राजा आपला अपराध क्षमा करील आणि त्यांनाही विश्वास वाटेल की राजाजवळ आम्ही हातपाया पडून, गयावया करून आपले अपराध क्षमा करून घेऊ आणि जे अपराध करीत नाही तेसुद्धा अपराध करण्यात भीती ठेवणार नाही यामुळे पाप करण्यात प्रवृत्त होतील म्हणूनच सर्व कर्मांचे यथायोग्य फळ देणे हेच ईश्वराचे काम आहे. क्षमा करणे नव्हे.

## जीवाची स्वतंत्रता

**(प्रश्न)** जीव स्वतंत्र आहे की परतंत्र ?

**(उत्तर)** आपली कर्तव्यकर्मे करण्यात जीव स्वतंत्र आणि ईश्वरी व्यवस्थेत परतंत्र आहे. 'स्वतन्त्र: कर्ता' हे पाणिनीय व्याकरणाचे सूत्र आहे. जो स्वतंत्र म्हणजे स्वाधीन आहे तोच कर्ता आहे.

**(प्रश्न)** स्वतंत्र कोणाला म्हणावे ?

**(उत्तर)** ज्याच्या आधीन शरीर, प्राण, इंद्रिये व अंतःकरण आदी गोष्टी असतात त्याला स्वतंत्र म्हणतात. जो स्वतंत्र नसेल तर त्याला त्याच्या पापपुण्याचे फळ कधी मिळू शकत नाही. कारण जसे नोकर स्वामीच्या व सेना सेनापतीच्या आज्ञेने किंवा प्रेरणेने युद्धामध्ये सैनिक अनेकांना मारून देखील ते गुन्हेगार ठरत नाहीत. त्याचप्रमाणे परमेश्वराच्या प्रेरणेने व आधीनतेने जीवांनी कामे केली तर त्यांना पाप किंवा पुण्य लागणार नाही. त्या फळांचा भोक्ता प्रेरक परमेश्वर होईल स्वर्ग-नरक किंवा सुख-दुःख हे परमेश्वरालाच मिळेल. जर एखाद्या माणसाने विशेष शस्त्राने एखाद्याला मारून टाकले तर तो मारणारा पकडला जातो; आणि त्याला शिक्षा होते. शस्त्राला शिक्षा होत नाही. याचप्रमाणे पराधीन जीव पापपुण्याचा भोक्ता होऊ शकत नाही. म्हणून आपल्या सामर्थ्यानुसार कर्म करण्याच्या बाबतीत जीव स्वतंत्र आहे. पण जेव्हा तो पाप करतो तेव्हा ईश्वराच्या व्यवस्थेमध्ये तो पराधीन असल्यामुळे पापाची फळे भोगतो. म्हणून कर्म करण्याच्या बाबतीत जीव स्वतंत्र असून पापाचे दुःखस्वरूप फळ भोगण्याच्या बाबतीत परतंत्र असतो.

**(प्रश्न)** परमेश्वराने जीवाला निर्माण केले नसते व सामर्थ्य दिले नसते तर जीव काहीच करू शकला नसता. म्हणून परमेश्वराच्या प्रेरणेनेच जीव कर्म करतो ?

**(उत्तर)** जीवाची उत्पत्ती कधी झालीच नाही. तो अनादी आहे. जसे जगाचे उपादान कारण आणि ईश्वर हे नित्य आहेत; आणि जीवाचे शरीर व इंद्रियांचे गोलक परमेश्वराने बनविलेले आहेत. पण ते सर्व जीवाच्या आधीन आहेत. म्हणून जो कोणी मन, कर्म व वचन यांच्या द्वारे पाप अथवा पुण्य करतो त्यालाच त्याचे फळ भोगावे लागते, ईश्वराला नव्हे.

एखाद्या कारागिराने डोंगरातून लोखंड काढले. ते लोखंड कुणा व्यापाऱ्याने विकत घेतले. त्याच्या दुकानातून ते घेऊन लोहाराने त्याची तलवार बनविली. कोणा शिपायाने ती तलवार विकत घेऊन तिने कुणाला तरी ठार मारले. आता या साऱ्या प्रकरणात लोखंड बाहेर काढणारा, ते विकत घेणारा, त्यापासून तलवार बनविणाऱ्यांना अथवा तलवारीला राजा शिक्षा करीत नाही, तर ज्याने तलवारीने हत्या केली त्यालाच शिक्षा मिळते. याचप्रमाणे शरीरादिकांची उत्पत्ती करणारा परमेश्वर त्याच्या कर्मफळांचा भोक्ता होत नाही, तर जीवाला ती फळे भोगावयास लावतो. परमेश्वरच सर्व कर्मे करविणारा असता तर कोणत्याही जीवाने पाप केले नसते. कारण परमेश्वर पवित्र व धार्मिक असल्यामुळे तो कोणाही जीवाला पाप करण्याची प्रेरणा देत नाही. म्हणून जीव आपली कामे करण्यात स्वतंत्र आहे. ज्याप्रमाणे जीव आपली कामे करण्यास स्वतंत्र आहे, त्याचप्रमाणे परमेश्वरही आपली कामे करण्यास स्वतंत्र आहे.

**(प्रश्न)** जीव आणि ईश्वर यांचे स्वरूप व गुणकर्मस्वभाव कसे आहेत ?

**(उत्तर)** दोघेही चेतनस्वरूप आहेत. दोघांचाही स्वभाव पवित्र, अविनाशी व धार्मिक आहे. परंतु परमेश्वर सृष्टीची उत्पत्ती, स्थिती व लय करतो, सर्वांना नियमात ठेवतो, जीवांना पापपुण्याची यथायोग्य फळे देतो, ही सर्व धर्मयुक्त कामे करतो. मुलाबाळांना जन्म देणे, त्यांचे पालनपोषण करणे, शिल्पविद्यादि बरीवाईट कामे जीव करतो. ईश्वरामध्ये नित्यज्ञान, आनंद, अनंत सामर्थ्य इत्यादी गुण आहेत. तर जीवामध्ये

**इच्छाद्वेषप्रयत्नसुखदु:खज्ञानान्यात्मनो लिंगमिति ॥** न्याय.सू.अ.१। आ.१ सूत्र १०

**प्राणापाननिमेषोन्मेषजीवनमनोगतीन्द्रियान्तरविकारा: सुखदु:खे इच्छाद्वेषौ प्रयत्नाश्चात्मनो लिङ्गानि ॥** वैशेषिक. सूत्र. अ. ३। आ. २। सू. ४४

या दोन्ही सूत्रांमध्ये (इच्छा) पदार्थांच्या प्राप्तीची अभिलाषा, (द्वेष) दु:खादिकांविषयी अनीच्छा, वैर, (प्रयत्न) पुरुषार्थ, बल (सुख) आनंद, (दु:ख) विलाप, अप्रसन्नता, (ज्ञान) विवेक किंवा जाणणे हे गुण समान आहेत. परंतु वैशेषिकामध्ये (प्राण) प्राणवायू बाहेर टाकणे, (अपान) प्राणवायू बाहेरून आत घेणे, (निमेष) डोळे मिटणे, (उन्मेष) डोळे उघडणे, (जीवन) प्राण धारण करणे, (मन) निश्चय, स्मरण व अहंकार करणे, (गति) गती करणे, (इंद्रिय) सर्व इंद्रियांना चालविणे, (अंतर्विकार) क्षुधा, तृषा, हर्ष, शोक आदी भिन्न-भिन्न विकारांनी युक्त होणे, हे जीवात्म्याचे गुण परमेश्वराच्या गुणांहून भिन्न आहेत. या गुणांद्वारे आत्म्याची प्रचीती करावी कारण तो स्थूल नाही.

जोपर्यंत आत्मा देहात असतो तोपर्यंतच हे गुण व्यक्त होत असतात. आत्मा जेव्हा शरीर सोडून जातो तेव्हा हे गुण शरीरात राहत नाहीत. जो असताना जे असते व जो नसताना जे नसते ते त्याचेच गुण असतात. ज्याप्रमाणे दिवा आणि सूर्य आदी नसले तर प्रकाश नसतो आणि ते असले तर प्रकाश असतो. याच प्रमाणे जीव व परमात्मा यांचे विशेष ज्ञान त्यांच्या गुणांद्वारे होत असते.

**(प्रश्न)** परमेश्वर त्रिकालदर्शी आहे. त्यामुळे भविष्यातील गोष्टी त्याला कळतात. तो जसे ठरवील तसेच जीव करणार. यावरून जीव स्वतंत्र नाही. तसेच ईश्वर जीवाला शिक्षाही देऊ शकत नाही. कारण ईश्वराने आपल्या ज्ञानाने ठरविले असेल तेच जीव करतो.

**(उत्तर)** ईश्वराला त्रिकालदर्शी म्हणणे हे मूर्खपणाचे काम आहे. कारण जो होऊन राहत नाही, त्याला भूतकाळ आणि जो सध्या नाही पण नंतर असणार आहे, त्याला भविष्यकाळ असे म्हणतात. काय ईश्वराला झालेले ज्ञान नाहीसे होते आणि आता नसलेले ज्ञान भविष्यकाळी होते ? म्हणून परमेश्वराचे ज्ञान सदैव एकरस, अखंडित व ते वर्तमानकाळाप्रमाणे विद्यमान असते. भूत व भविष्य हे काळ जीवांसाठी आहेत. होय, जीवांच्या कर्मांच्या संदर्भात ईश्वरामध्ये त्रिकालज्ञता असते मात्र स्वयंभावाने नाही ज्याप्रमाणे जीव स्वतंत्रपणे कर्म करतो त्याचप्रमाणे सर्वज्ञतेने ईश्वर सर्व काही जाणतो आणि ईश्वर जसे जाणतो तसे जीव करतो. अर्थात भूत, भविष्य व वर्तमान यांचे ज्ञान व फळ देण्याच्या बाबतीत ईश्वर स्वतंत्र आहे. परंतु जीवाला थोडेसे वर्तमान काळाचे ज्ञान आणि कर्म करण्याचे स्वातंत्र्य असते. ईश्वराचे ज्ञान अनादी असल्यामुळे त्याला जसे कर्माचे ज्ञान आहे, तसेच शिक्षा करण्याचे त्याचे ज्ञानही अनादी असते. त्याचे दोनही ज्ञान सत्य आहेत काय कर्मज्ञान खरे आणि दंडज्ञान खोटे असे कधी असू शकते ? म्हणून यात काहीही दोष येत नाही.

**(प्रश्न)** जीव हा शरीरात वेगळा विभु आहे की परिच्छिन्न ?

**(उत्तर)** जीव हा परिच्छिन्न आहे. तो विभु असता तर जागृती, स्वप्न, सुषुप्ति, मरण, जन्म, संयोग, वियोग, जाणे, येणे हे कधीही होऊ शकले नसते. म्हणून जीवाचे स्वरूप अल्पज्ञ, अल्प म्हणजे सूक्ष्म आहे. ईश्वर हा अत्यंत सूक्ष्मात सूक्ष्मतर आहे. तो अनंत सर्वज्ञ व सर्वव्यापक स्वरूप आहे. म्हणून जीव व परमेश्वर यांचा व्याप्यव्यापक संबंध आहे.

**(प्रश्न)** ज्या जागी एक वस्तू असते त्याच जागी दुसरी वस्तू राहू शकत नाही. म्हणून जीव व ईश्वर यांचा संयोग संबंध असू शकतो. परंतु व्याप्य व्यापक संबंध असू शकत नाही.

**(उत्तर)** हा नियम समान आकाराच्या पदार्थांच्या बाबतीत लागू होतो. असमान आकृतींना मध्ये लागू होत नाही. ज्याप्रमाणे लोखंड स्थूल व अग्नी सूक्ष्म असतो; त्यामुळे लोखंडामध्ये अग्नी व विद्युत व्यापक होऊन एकाच अवकाशात दोघेही राहतात त्याप्रमाणे जीव हा परमेश्वराहून स्थूल व परमेश्वर हा जीवाहून सूक्ष्म असल्याने परमेश्वर व्यापक व जीव हा व्याप्य आहे. जीव आणि ईश्वर यांच्यात हा जसा व्याप्य-व्यापक संबंध आहे तसेच सेव्य-सेवक, आधार-आधेय, स्वामी-भृत्य, राजा-प्रजा, पिता-पुत्र वगैरे संबंध त्यांच्यामध्ये आहेत.

## अद्वैतवादाची समीक्षा

**(प्रश्न)** ब्रह्म आणि जीव हे वेगवेगळे आहेत की एक आहेत ?

**(उत्तर)** वेगवेगळे आहेत.

**(प्रश्न)** ते जर वेगवेगळे असतील तर **प्रज्ञानं ब्रह्म ॥१॥** ऐतरेय. ५।३

**अहं ब्रह्मास्मि ॥२॥** बृहदा. उ. १।४।१० **तत्त्वमसि ॥३॥** छान्दोग्य. प्रपा. ६।खं. ८।व. ७

**अयमात्मा ब्रह्म ॥४॥** माण्डू. ब. २ वेदांतील या महावाक्यांचा अर्थ काय आहे ?

**(उत्तर)** ही वेदवाक्ये नसून ब्राह्मण ग्रंथांतील वचने आहेत आणि सत्यशास्त्रांमध्ये त्यांना कोठेही महावाक्य म्हटलेले नाही. अर्थात ब्रह्म हे प्रकृष्ट ज्ञानस्वरूप आहे. (अहम्) मी (ब्रह्म) म्हणजे ब्रह्मस्थ (अस्मि) आहे. येथे तात्स्थ्योपाधि आहे. उदाहरणार्थ **'मञ्चः क्रोशन्ति'** याचा अर्थ 'मंच ओरडतात' असा करावयाचा नसतो. मंच हे जड पदार्थ असल्याने त्यांच्यामध्ये ओरडण्याचे सामर्थ्य नसते. म्हणून त्या वाक्याचा अर्थ 'मंचकावरील माणसे ओरडतात' तसेच या बाबतीतही समजावे.

कोणी म्हणेल की, ''सर्वच पदार्थ ब्रह्मस्थ आहेत. मग पुनः जीवाला ब्रह्मस्थ म्हणण्यात काय वैशिष्ट्य आहे ?'' याचे उत्तर असे की सर्व पदार्थ ब्रह्मस्थ आहेत परंतु जीव जसा साधर्म्ययुक्त व निकटस्थ आहे तसे अन्य कोणी नाही आणि जीवाला ब्रह्माचे ज्ञान होऊन मुक्तीमध्ये तो ब्रह्माशी साक्षात्संबंधात राहतो. म्हणून जीव हा ब्रह्माशी तात्स्थ्य अथवा तत्सहचारितोपाधि म्हणजे जीव हा ब्रह्माचा सहचारी आहे. म्हणून जीव आणि ब्रह्म हे एक नाहीत.

''मी व हा एक आहोत'' असे जेव्हा कोणी म्हणतो तेव्हा त्याचा अर्थ, ''मी व हा अविरोधी आहोत.'' याचप्रमाणे जो जीव समाधिस्थ होऊन परमेश्वरामध्ये प्रेमबद्ध होऊन निमग्न होतो तो असे म्हणू शकतो की ''मी आणि ब्रह्म एक म्हणजे अविरोधी, एक अवकाशस्थ आहोत.'' जो जीव परमेश्वराच्या गुणकर्मस्वभावानुसार आपले गुणकर्मस्वभाव करतो तोच साधर्म्यामुळे ब्रह्माशी आपली एकता आहे, असे म्हणू शकतो.

**(प्रश्न)** बरे तर. 'तत्त्वमसि' (तत्) ब्रह्म (त्वं) तू जीव (असि) आहेस. म्हणजे हे जीवा, तू ते ब्रह्म आहेस. याचा अर्थ कसा कराल ?

**(उत्तर)** तुम्ही 'तत्' शब्दाचा अर्थ काय करता ?

**(प्रश्न)** ''ब्रह्म.''

(उत्तर) ब्रह्मपदाची अनुवृत्ती कोठून आणली ?

**(प्रश्न) 'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ब्रह्म'** या उपनिषदातील पूर्व वाक्यातून ब्रह्म शब्दाची अनुवृत्ती आली आहे.

**(उत्तर)** तुम्ही हे छांदोग्य उपनिषद पाहिलेच नाही. ते तुम्ही पाहिले असते तर तेथे ब्रह्म शब्द वापरलेलाच नाही. परंतु, मग तुम्ही खोटे का बोलता? परंतु छांदोग्य उपनिषदात **'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम्' ॥** छां. प्रपा. ६। खं. २। व.१ असा पाठ आहे. तेथे ब्रह्म हा शब्दच नाही.

(प्रश्न) तर मग तुम्ही 'तत्' या शब्दाचा अर्थ काय करता ?

**(उत्तर) स य एषोणिमैतदात्म्यमिद ९ सर्वं तत्सत्य ९ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति ॥** छांदोग्य प्रपा. ६। खं. ८। व. ७

तो परमात्मा जाणण्यास योग्य आहे. तो अत्यंत सूक्ष्म आणि साऱ्या जगाचा व जीवाचा आत्मा आहे. तोच सत्यस्वरूप असून स्वत:चा आत्मा स्वत:च आहे. हे श्वेतकेतो, प्रियपुत्रा ! **'तदात्मकस्तदन्तर्यामी त्वमसि'** त्या अंतर्यामी परमेश्वराने तू युक्त आहेस. हाच अर्थ उपनिषदांशी अविरोधी आहे. कारण,

**य आत्मनि तिष्ठन्नात्मनोऽन्तरोयमात्मा न वेद यस्यात्मा शरीरम् । आत्मनोऽन्तरोयमयति स त आत्मान्तर्याम्यमृत: ॥** माध्यन्दिन बृहदा. उप. १४। ६। ७। ३२

हे बृहदारण्यकातील वचन आहे. महर्षी याज्ञवल्क्य आपली पत्नी मैत्रेयीला सांगतात की, ''हे मैत्रेयी, परमेश्वर आत्म्यामध्ये म्हणजे जीवामध्ये स्थित आहे; आणि जीवात्म्याहून भिन्न आहे. पण मूढ जीवात्मा हे जाणत नाही की तो परमात्मा माझ्यामध्येच व्यापक आहे. ज्या परमेश्वराचे शरीर जीवात्मा आहे, म्हणजे ज्याप्रमाणे शरीरात जीव राहतो त्याचप्रमाणे जीवांमध्ये परमेश्वर व्यापक आहे; जीवात्म्यांहून भिन्न राहून जो जीवांच्या पाप पुण्यांचा साक्षीदार होऊन व जीवांना त्यांच्या कर्मानुसार फळे देऊन नियमात ठेवतो तोच अविनाशी परमात्मा तुझाही अन्तर्यामी आत्मा आहे, म्हणजे तुझ्यामध्ये व्यापक आहे. त्याला तू जाण.'' उपनिषदाच्या इत्यादी वचनांचा कुणी अन्यथा अर्थ करू शकतो काय ?

'अयमात्मा ब्रह्म' म्हणजे समाधिदशेत जेव्हा योग्याला परमेश्वराचा साक्षात्कार घडतो तेव्हा तो म्हणतो की, ''हा जो माझ्यामध्ये व्यापक आहे तोच ब्रह्म सर्वत्र व्यापक आहे. म्हणून आजकालचे जे वेदांती जीव व ब्रह्माची एकता करतात त्यांना वेदांतशास्त्र समजलेले नाही.''

**(प्रश्न) अनेन आत्मना जीवेनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि ॥**

छा. प्रपा. ६। खं. ३। व. २

**तत्सष्ट्वा तदेवानुप्राविशत् ॥** तैत्तिरीय. ब्रह्मानं. व. ६

परमेश्वर सांगतो की, ''मी सारे जग आणि शरीर यांची रचना करून जगामध्ये व्यापक आणि जीवरूप होऊन, शरीरामध्ये प्रविष्ट होऊन नाम व रूप यांची व्याख्या करीन.'' ॥१॥ परमेश्वराने ते जगत व शरीर निर्माण करून तोच त्यात प्रविष्ट झाला. ॥२॥ इत्यादी श्रुतींचा दुसरा अर्थ कसा करू शकाल ?

**(उत्तर)** तुम्हाला पद, पदार्थ व वाक्यार्थ यांचे ज्ञान असते तर तुम्ही असा अनर्थ कधीच केला नसता. कारण येथे असे समजावे एक प्रवेश आणि दुसरा अनुप्रवेश अर्थात नंतर केलेला प्रवेश म्हटला जातो. शरीरामध्ये

प्रविष्ट झालेल्या जीवासह अनुप्रविष्टाप्रमाणे होऊन वेदांद्वारे सर्व नामरूपादी विद्येचा प्रकाश करतो. परमेश्वर शरीरामध्ये जीवाचा प्रवेश घडवून आणि जीवामध्ये स्वत: अनुप्रविष्ट होऊन राहतो. 'अनु' या शब्दाचा अर्थ समजला असता तर तुम्ही असा विपरीत अर्थ कधी लावला नसता.

**(प्रश्न) 'सोऽयं देवदत्तो यो उष्णकाले काश्यां दृष्टः स इदानीं प्रावृट्समये मथुरायां दृश्यते'** म्हणजे जो देवदत्त उन्हाळ्यात काशीमध्ये पाहिला होता त्यालाच मी पावसाळ्यात मथुरेमध्ये पाहत आहे. या ठिकाणी काशी देश व उष्णकाल आणि मथुरा देश व वर्षाकाल या गोष्टी सोडून देऊन केवळ शरीराकडे लक्ष दिल्यास देवदत्त लक्षित होत आहे. या भागत्यागलक्षणेद्वारे परमेश्वराच्या परोक्ष देश, काळ, माया या उपाधी आणि जीवाचा हा देश, काळ, अविद्या व अल्पज्ञता या उपाधी सोडून देऊन चैतन्याकडे लक्ष दिले असता दोघांमध्ये एकच ब्रह्मवस्तू लक्षित होते. भागत्यागलक्षणेमध्ये काही भाग ग्रहण करून व काही भाग सोडून देणे असे आहे जसे सर्वज्ञत्वादी वाच्यार्थ ईश्वरामधील आणि अल्पज्ञत्वादी वाच्यार्थ जीवामधील सोडून देऊन (दोहोमधील) चैतन्य मात्र लक्ष्यार्थाचे ग्रहण केले असता अद्वैत सिद्ध होते. यावर काय सांगू शकाल ?

**(उत्तर)** प्रथम तुम्ही असे सांगा की तुम्ही जीव आणि ईश्वर नित्य आहेत असे मानता की अनित्य ?

**(प्रश्न)** हे दोन्ही उपाधिजन्य कल्पित असल्यामुळे ते अनित्य मानतो.

**(उत्तर)** त्या उपाधीला नित्य मानता की अनित्य ?

**(प्रश्न)** आमच्या मते,

**जीवेशौ च विशुद्धाचिद्विभेदस्तु तयोर्द्वयोः ।**
**अविद्या तच्चितोर्योगः षडस्माकमनादयः ॥१॥** सिद्धान्तलेशसंग्रह, पृ.६३
**कार्य्योपाधिरयं जीवः कारणोपाधिरीश्वरः ।**
**कार्य्यकारणतां हित्वा पूर्णबोधोऽवशिष्यते ॥२॥** अनुभूतिप्रकाश अ. १। श्लो. ६१

'संक्षेपशादिक' व 'शारीरिकभाष्यं' यांतील या कारिका आहेत. आम्ही वेदान्ती सहा पदार्थांना अनादी मानतो. ते असे:- एक जीव, दुसरा ईश्वर, तिसरे ब्रह्म, चौथा जीव व ईश्वर यांच्यातील विशेष भेद, पाचवा अविद्या, अज्ञान आणि सहावा अविद्या व चेतन यांचा योग. परंतु त्यातही एक ब्रह्म अनादी-अनंत असून इतर पाच पदार्थ अनादी सांत जसा प्रागभाव होतो तसे आहेत. जोपर्यंत अज्ञान असते तोपर्यंत हे पाच असतात; आणि तोपर्यंत यांच्या प्रारंभीचे ज्ञान होत नसते. म्हणून अनादी असे म्हणतात. पण जेव्हा ज्ञान होते तेव्हा ते नाश होतात. म्हणून सांत म्हणजे नाशवान म्हटले जाते.

**(उत्तर)** हे तुमचे दोन्ही श्लोक अशुद्ध आहेत. कारण अविद्येच्या योगाशिवाय जीव आणि मायेच्या योगाशिवाय ईश्वर तुमच्या मताने सिद्ध होऊ शकत नाही. अविद्या त्यामुळे तश्चितोर्योगः हा जो सहावा पदार्थ तुम्ही गणला तो राहिला नाही कारण तो माया जीव व ईश्वरामध्ये चरितार्थ झाला आणि ब्रह्म तथा माया व अविद्या यांच्या योगाशिवाय ईश्वर बनत नाही. ईश्वराला अविद्या व ब्रह्म यांच्याहून वेगळे समजणे व्यर्थ आहे. म्हणून तुमच्या मतानुसार ब्रह्म व अविद्या हे दोनच पदार्थ सिद्ध होऊ शकतात. सहा पदार्थ सिद्ध होऊ शकत नाहीत.

तसे तुमचे प्रथम कार्योपाधीपासून व कारणोपाधीपासून जीव व ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणे तेव्हाच होऊ शकते की जेव्हा अनंत, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव अशा सर्वव्यापक ब्रह्ममध्ये अज्ञान सिद्ध कराल. जर ब्रह्माच्या एका स्थानामध्ये स्वाश्रय व स्वविषयक अज्ञान अनादी सर्वत्र आहे असे मानाल तर सर्व ब्रह्म शुद्ध होऊ शकणार नाही आणि जेव्हा एका भागात अज्ञान मानाल तर ते परिच्छिन्न झाल्याने इकडून तिकडे येत-जात राहील. ते अज्ञान जेथे-जेथे जाईल तेथील ब्रह्म अज्ञानी बनेल आणि ज्या-ज्या स्थानाला ते ब्रह्माला सोडून जाईल त्या त्या ठिकाणचे ब्रह्म ज्ञानी होत राहील तर काही ठिकाणच्या ब्रह्माला अनादिशुद्ध ज्ञानयुक्त म्हणू शकणार नाहीत आणि अज्ञानाच्या सीमेतील ब्रह्माला अज्ञानाची जाणीव होईल. अशा प्रकारे सज्ञानी ब्रह्म व अज्ञानी ब्रह्म असे आतील व बाहेरील ब्रह्माचे तुकडे होतील.

तुम्ही जर असे म्हणाल की होऊ द्या तुकडे त्याने ब्रह्माची काय हानी होणार ? तर ब्रह्म अखंड नाही आणि ते अखंड आहे असे मानले तर ते अज्ञानी नाही ज्ञानाचा अभाव अथवा विपरीत ज्ञान हाही गुण असल्यामुळे तो कोणत्या तरी द्रव्याशी नित्य संबंद्धित असणार. तसे असेल तर समवाय संबंध असल्याने तो कधी अनित्य होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे शरीराच्या एका भागामध्ये फोड झाला असता त्याचे दु:ख सर्वत्र पसरते त्याप्रमाणे ब्रह्माच्या एका स्थानात अज्ञान, सुख-दु:ख व क्लेश निर्माण झाल्यास सारे ब्रह्म दु:खादिकाच्या अनुभवाने युक्त होईल. मग संपूर्ण ब्रह्म शुद्ध आहे असे तुम्हीच म्हणू शकणार नाही.

याच प्रमाणे कार्योपाधीच्या म्हणजे अंत:करणाच्या उपाधीच्या योगाने ब्रह्माला जीव मानाल तर आम्ही असे विचारतो की ब्रह्म हे व्यापक आहे की परिच्छिन्न ? तुम्ही जर ब्रह्म व्यापक म्हणाल व उपाधी परिच्छिन्न म्हणाल, म्हणजे एकदेशीय व पृथक्-पृथक् आहे तर अंत:करण इकडून-तिकडे जाते-येते की नाही ?

**(उत्तर)** अंत:करण इकडे-तिकडे जात-येत राहते.

**(प्रश्न)** अंत:करणाबरोबर ब्रह्मही फिरते की स्थिर राहते ?

**(उत्तर)** ते स्थिर राहते.

**(प्रश्न)** जेव्हा अंत:करण ज्या-ज्या स्थानाला सोडते तेव्हा त्या-त्या स्थानातील शुद्ध ब्रह्म अज्ञानरहित आणि ज्या स्थानी जाईल त्या त्या ठिकाणेच शुद्ध ब्रह्म अज्ञानी बनत असणार. म्हणजे ब्रह्म हे एका क्षणी ज्ञानी तर दुसऱ्या क्षणी अज्ञानी होत राहणार. यामुळे मोक्ष व बंध हेही क्षणभंगुर बनतील. ज्याप्रमाणे एकाने पाहिलेले दुसऱ्याला आठवण करू शकत नाही त्याप्रमाणे काल पाहिलेल्या अथवा ऐकलेल्या गोष्टीचे वा वस्तूचे ज्ञान आज राहू शकत नाही. कारण ज्यावेळी पाहिले-ऐकले होते तो काळ व ते स्थान दुसरे होते आणि ज्यावेळी त्याचे स्मरण केले जाते तेव्हा तो काळ व ते स्थान दुसरे असते.

तुम्ही म्हणाल की ब्रह्म एक आहे. मग ते सर्वज्ञ का नाही ? तुम्ही म्हणाल की अंत:करणे भिन्न-भिन्न आहेत त्यामुळे ते सुद्धा भिन्न-भिन्न होऊन जात असे. परंतु ते अंत:करण जड (अचेतन) आहे त्यात ज्ञान असू शकत नाही. तुम्ही असे म्हणाल की केवळ ब्रह्माला अथवा केवळ अंत:करणाला ज्ञान होऊ शकत नाही; परंतु अंत:करणस्थ चिदाभासाला ज्ञान होते तरीसुद्धा अंत:करणाद्वारे चैतन्यालाच ज्ञान होते. तर ते नेत्रादिकांद्वारे थोडे थोडे ज्ञान का होते ? म्हणून कारणोपाधी व कार्योपाधी यांच्या योगाने ब्रह्मच जीव व ईश्वर बनू शकणार नाहीत.

म्हणून ईश्वर हे ब्रह्माचे नाव आहे त्या ब्रह्माहून भिन्न असणारा अनादी, अनुत्पन्न व अमृतस्वरूप जो आहे त्याचे नाव जीव आहे.

तुम्ही असे म्हणाल की जीव हे चिदाभासाचे नाव आहे. पण तो क्षणभंगुर असल्याने तो नष्ट होऊन जाईल तेव्हा मग मोक्षाचे सुख कोण उपभोगणार ? म्हणून ब्रह्म हे जीव आणि जीव हा ब्रह्म कधी झाला नव्हता, झालेला नाही व होणार नाही.

**(प्रश्न)** तर मग **'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥'** या छांदोग्य उपनिषदातील वचनाप्रमाणे अद्वैतसिद्धी कशी होणार ? आमच्या मते ब्रह्माहून वेगळे असे सजातीय, विजातीय व स्वगत अवयवादी भेद नसल्यामुळे एक ब्रह्मच सिद्ध होते. जीव हा दुसरा आहे तर मग अद्वैतसिद्धी कशी होऊ शकेल ?

**(उत्तर)** या भ्रमात पडून तुम्ही का घाबरता ? 'विशेष्य-विशेषण' विद्येचे ज्ञान प्राप्त करा. त्याचे फळ काय आहे ? तुम्ही म्हणाल की 'व्यावर्त्तकं विशेषणं भवतीति' म्हणजे विशेषण भेदकारक असते. तर तुम्ही एवढे आणखी मान्य करा की 'प्रवर्त्तकं प्रकाशकमपि विशेषणं भवतीति' म्हणजे विशेषण हे प्रवर्तक व प्रकाशकही असते तेव्हा अद्वैत हे ब्रह्माचे विशेषण आहे हे लक्षात घ्या. यातील व्यावर्तक धर्म हा आहे की अद्वैत वस्तू म्हणजे जे अनेक जीव व तत्त्वे आहेत त्यांच्यापासून तो ब्रह्माला वेगळे करतो आणि विशेषणाचा प्रकाशक धर्म हा आहे की ब्रह्म हे एक असल्याची तो प्रवृत्ति करतो. जसे 'अस्मिन्नगरेऽद्वितीयो धनाढ्यो देवदत्तः। अस्यां सेनायामद्वितीयः शूरवीरो विक्रमसिंहः ॥' एकाने दुसऱ्याला सांगितले की या नगरामध्ये देवदत्त हा अद्वितीय धनाढ्य आहे; आणि या सैन्यात विक्रमसिंह हा अद्वितीय शूर आहे. यावरून काय सिद्ध होते की या नगरात देवदत्तासारखा दुसरा धनाढ्य आणि या सैन्यात विक्रमसिंहासारखा दुसरा शूरवीर कोणी नाही. त्यांच्याहून कमी प्रतीचे तर आहेत. त्याचप्रमाणे पृथ्वी आदि जड पदार्थ, पशु पक्षी वगैरे प्राणी आणि झाडे झुडुपेही आहेत त्यांचा निषेध केलेला नाही. त्याचप्रमाणे जीव अथवा प्रकृती ही ब्रह्मासारखी नाहीत. परंतु ब्रह्माहून ती कमी प्रतीची तर आहेत.

यावरून असे सिद्ध होते की ब्रह्म सदैव एक आहे आणि जीव व प्रकृतिस्थ तत्त्वे अनेक आहेत. त्यांच्याहून वेगळे ब्रह्मच एकत्व सिद्ध करणारे अद्वैत अथवा अद्वितीय हे विशेषण आहे. या विशेषणाने जीव किंवा प्रकृती व कार्यरूपी जगत यांचा अभाव आणि निषेध होऊ शकत नाही. ते सर्व आहेत. परंतु ते ब्रह्माच्या बरोबरीचे नाहीत यावरून अद्वैतसिद्धी आणि नद्वैत सिद्धीला बाधक होत आहे. उगीच गोंधळून जाऊ नका. विचार करा आणि समजून घ्या.

**(प्रश्न)** ब्रह्माचे सत्, चित् व आनंद आणि जीवाचे अस्ति, भाति व प्रियरूपने एकता होत आहे. मग तुम्ही अद्वैताचे खंडन का करता ?

**(उत्तर)** किंचित साधर्म्य मिळाल्याने त्या दोघांमध्ये एकत्व प्रस्थापित होऊ शकत नाही उदाहरणार्थ, पृथ्वी ही जड आणि दृश्य आहे. तसेच जल, अग्नी वगैरेही जड व दृश्य आहेत. एवढ्यानेच त्यांच्यात एकता होत नाही. त्यांच्यात वैधर्म्य म्हणजे भेद करणारे परस्परविरोधी गुणही आहेत. उदाहरणार्थ, पृथ्वीमध्ये गंध, रुक्षता, काठिण्य इत्यादी गुण आहेत. जलामध्ये रस,द्रवत्व, कोमलत्व वगैरे गुण आहेत. तर अग्नीमध्ये रूप,दाहकत्व आदी गुण आहेत. त्यामुळे तीन पदार्थांचे संभवत नाही. त्याचप्रमाणे माणसे व किडे डोळ्यांनी पाहतात, तोंडाने खातात व पायांनी चालतात तथापि माणसाची आकृती त्याला दोन पाय असतात तर किड्यांना अनेक पाय

असतात. त्याचप्रमाणे परमेश्वरामध्ये असणारे अनंत ज्ञान, आनंद, बळ, क्रिया, निर्भ्रांतित्व व सर्वव्यापकत्व हे गुण जीवाच्या अल्पज्ञान, अल्पबल, अल्पस्वरूप, भ्रांतित्व व परिच्छिन्नत्व वगैरे सर्व गुणांहून ब्रह्माचे गुण भिन्न असल्यामुळे जीव व परमेश्वर हे एक नाहीत. शिवाय त्यांची स्वरूपेही भिन्न आहेत. (परमेश्वर अत्यंत सूक्ष्म आहे तर जीव त्याच्याहून थोडा स्थूल आहे.)

**(प्रश्न) अथोदरमन्तरं कुरुते, अथ तस्य भयं भवति।** तै. उप. ब्रह्मा. अनु. ७

**द्वितीया द्वै भयं भवति॥** बृह. उप. १।४।२

हे बृहदारण्यक उपनिषदातील वचन आहे. जो कोणी ब्रह्म आणि जीव यांत थोडाही भेद करतो त्याला भय प्राप्त होते. कारण दुसऱ्यापासूनच भय होते.

**(उत्तर)** याचा अर्थ हा नाही. जो जीव परमेश्वराचे अस्तित्व नाकारतो अथवा परमेश्वर हा एका देश व काल यांमध्ये परिछिन्न आहे असे समजतो, जो परमेश्वरी आज्ञेचे उल्लंघन करतो आणि त्याच्या गुणकर्मस्वभावाविरुद्ध वागतो अथवा दुसऱ्या माणसाशी वैर करतो त्याला भय प्राप्त होते. कारण द्वितीय बुद्धी म्हणजे ईश्वराशी माझा काही संबंध नाही तसेच कुण्या माणसाला म्हणतो की "तुला मी कस्पटासमान समजत नाही, तू माझे काहीही करू शकत नाहीस," असे म्हणून दुसऱ्याचे नुकसान करतो व त्याला दुःख देतो या गोष्टींमुळे माणसाला त्या जीवाला इतरांचे भय वाटू लागते आणि ज्यांच्यामध्ये सर्व प्रकारचा अविरोध असतो तर ते एक आहेत जसे जगात म्हटले जाते की देवदत्त, यज्ञदत्त व विष्णुमित्र हे एक आहेत त्याचा अर्थ त्यांच्यात कसलाही विरोध नाही. विरोध असल्यास दुःख व विरोध नसल्यास सुख प्राप्त होते.

**(प्रश्न)** ब्रह्म व जीवाची एकता किंवा अनेकता असते किंवा कधी दोघे मिळून एक होतात वा नाही, सदैव भिन्न असतात की त्यांच्यामध्ये कधी एकत्वही होते?

**(उत्तर)** थोड्या वेळापूर्वी या प्रश्नाचे काहीसे उत्तर दिले आहे. साधर्म्य आणि अन्वयभावाने ऐक्य होते; उदाहरणार्थ, आकाशापासून मूर्त द्रव्ये जड असल्यामुळे व आकाशापासून ती केव्हाही वेगळी राहत नसल्यामुळे ती भिन्न नाहीत, त्यांच्यात एकत्व आहे; आणि आकाशाचे विभू, सूक्ष्म, अरूप, अनंत आदी गुणांनी युक्त व मूर्त द्रव्ये परिच्छिन्न दृश्यत्व इत्यादि वैधर्म्याने त्यांच्यात भिन्नता येते. अर्थात ज्याप्रमाणे पृथिव्यादी द्रव्ये आकाशाहून कधी वेगळी राहत नाहीत. कारण अन्वय म्हणजे अवकाशाशिवाय मूर्त द्रव्य राहू शकत नाही आणि त्यांच्यात व्यतिरेक, म्हणजे त्यांची स्वरूपे भिन्न आहेत म्हणून त्यांच्यात पृथक्त्व किंवा वेगळेपण आहे. त्याचप्रमाणे ब्रह्म व्यापक असल्यामुळे जीव व पृथिव्यादी द्रव्ये त्याच्या पासून वेगळी राहत नाहीत. परंतु स्वरूपतः ती कधीच एक होत नसतात. ज्याप्रमाणे घर बांधण्यापूर्वी माती, लाकूड व लोखंड वगैरे पदार्थ वेगवेगळ्या ठिकाणी आकाशातच असतात. घर बांधल्यानंतरही ते आकाशातच असतात आणि घर नष्ट झाल्यानंतर म्हणजे घराचे सारे सामान वेगवेगळ्या ठिकाणी जाऊन पडल्यानंतरही ते आकाशातच आहेत. अर्थात तीन्ही काळांत ते आकाशापासून वेगळे होऊ शकत नाहीत आणि स्वरूपतः भिन्न असल्यामुळे ते व आकाश कधी एक नव्हते, नाहीत व नसतील. याचप्रमाणे जीव आणि जगातील सर्व पदार्थ परमेश्वराने व्याप्त असल्यामुळे स्वरूप भिन्न असल्याने ते परमात्म्यापासून तीनही काळी भिन्न आणि कधीही एक होत नाहीत.

आजकालचे वेदांती लोक काण्या (तिरळ्या) माणसांप्रमाणे अन्वयाकडेच जाते आणि सर्व एकच आहे

असे ते समजतात. व्यतिरेक भावातून सुटण्याविरुद्ध झाली आहे. असे एकही द्रव्य नाही की ज्यामध्ये सगुणता व निर्गुणता, अन्वय व व्यतिरेक, साधर्म्य व वैधर्म्य आणि सामान्य व विशेषण हे भाव नाहीत.

## परमेश्वराचे सगुणत्व व निर्गुणत्व

**(प्रश्न)** परमेश्वर सगुण आहे की निर्गुण ?

**(उत्तर)** तो दोनही प्रकारचा आहे.

**(प्रश्न)** एका म्यानात दोन तलवारी राहू शकतात ? एकाच पदार्थामध्ये सगुणत्व व निर्गुणत्व हे दोन्ही गुण कसे राहू शकतात ?

**(उत्तर)** ज्याप्रमाणे जडाचे (अचेतनाचे) रूप आदी गुण आहेत आणि चेतनाचे ज्ञानादी गुण जडा (अचेतना) मध्ये नाहीत त्याप्रमाणे चेतनामध्ये इच्छादी गुण आहेत आणि रूपादी जड (अचेतना) चे गुण त्यात नाहीत. म्हणून 'यद्गुणैस्सह वर्तमानं तत्सगुणम् ।', 'गुणेभ्यो यन्निर्गतं पृथग्भूतं तन्निर्गुण् ।' जो गुणांसहित असतो त्याला सगुण आणि जो गुणरहित असतो त्याला निर्गुण असे म्हणतात. आपापल्या स्वाभाविक गुणांनी युक्त आणि दुसऱ्या विरोधी गुणांनी रहित असल्यामुळे सर्व पदार्थ सगुण व निर्गुण असतात. ज्याच्यामध्ये केवळ निर्गुणत्व अथवा केवळ सगुणत्व आहे असा एकही पदार्थ नाही. परंतु एकातच सगुणता व निर्गुणता सदा विद्यमान असते. याचप्रमाणे परमेश्वर आपल्या अनंत ज्ञान, बल आदी गुणांनी युक्त असल्याने सगुण आणि जड़ाचे रूपादी गुण व जीवाचे द्वेषादी गुण यापासून वेगळा असल्याने तो निर्गुण म्हटला जातो.

**(प्रश्न)** जगामध्ये निराकाराला निर्गुण व साकाराला सगुण म्हणतात. अर्थात परमेश्वर जेव्हा जन्म घेत नाही तेव्हा तो निर्गुण आणि जेव्हा अवतार घेतो तेव्हा तो सगुण म्हटला जातो ?

**(उत्तर)** ही कल्पना केवळ अज्ञानी व अविद्वान लोकांची आहे. ज्यांच्याजवळ विद्या नसते ते लोक पशूप्रमाणे वाटेल ते बरळत असतात. सन्निपात ज्वर झालेला माणूस काहीतरी बरळत असतो. तसेच हे अविद्वानचे म्हणणे किंवा लेखास निरर्थक समजले पाहिजे.

**(प्रश्न)** परमेश्वर आसक्त आहे की विरक्त ?

**(उत्तर)** दोघातही नाही कारण आसक्ती ही आपल्यापासून भिन्न उत्तम पदार्थांविषयी असते. परंतु परमेश्वराहून कोणताही पदार्थ वेगळा किंवा उत्तम नाही असे म्हणून त्याच्यामध्ये आसक्तीचा संभव नाही. जो प्राप्त असलेल्या वस्तूचा त्याग करतो त्याला विरक्त म्हणतात. ईश्वर सर्वव्यापक असल्यामुळे तो कोणत्याही वस्तूला सोडू शकत नाही. म्हणून त्याला विरक्तही म्हणता येत नाही.

**(प्रश्न)** ईश्वराला इच्छा असते की नाही ?

**(उत्तर)** तशी इच्छा नाही कारण अप्राप्त, उत्तम व जिच्या प्राप्तीने विशेष सुख होते अशा वस्तूविषयी इच्छा होत असते. परमेश्वराला कोणताही पदार्थ अप्राप्त नाही. त्याच्याहून कोणीही उत्तम नाही आणि तो पूर्ण सुखयुक्त आहे. म्हणून त्याला सुखाची अभिलाषाही नाही. म्हणून ईश्वरामध्ये इच्छा संभवनीय नाही. मात्र त्याच्यामध्ये ईक्षण म्हणजे सर्व प्रकारच्या विद्यांचे दर्शन आणि साऱ्या सृष्टीची निर्मिती करणे म्हटली जाते. ती ईक्षण होय इत्यादी संक्षिप्त विषयाद्वाराच सज्जन लोक पुष्कळ विस्तार करून घेतील.

# वेदांची उत्पत्ति व त्यांचे नित्यत्व

आता थोडक्यात वेदांचा विषय लिहित आहे.

**यस्मादृचो अपातक्षन् यजुर्यस्मादपाकषन्।**

**सामानि यस्य लोमान्यथर्वाङ्गिरसो मुखं स्कम्भन्तं ब्रूहि कतमः स्विदेव सः ॥** अथर्व. कां. १०। प्रपा. २३। अनु. ४। मं. २०॥; अथर्व. कां. १०। सू. ७। मं. २०

ज्या परमेश्वरापासून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद प्रकाशित झाले तो कोणता देव आहे ? याचे उत्तर असे की जो सर्वांना उत्पन्न करून धारण करीत आहे तो परमात्मा (वेदांचा प्रकाशकर्ता) आहे.

**स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥** यजु. अ. ४०। मं. ८

जो स्वयंभू, सर्वव्यापक, शुद्ध, सनातन, निराकार परमेश्वर आहे तोच सनातन जीवरूपी प्रजेच्या कल्याणासाठी यथावत रीतिपूर्वक वेदांद्वारे सर्व विद्यांचा उपदेश करीत आहे.

**(प्रश्न)** परमेश्वराला तुम्ही निराकार मानता की साकार ?

**(उत्तर)** आम्ही परमेश्वराला निराकार मानतो.

**(प्रश्न)** जर तो निराकार आहे तर विना मुखाने वर्णोच्चार केल्याशिवाय वेदविद्येचा उपदेश कसा झाला असेल ? कारण वर्णांचा उच्चार करण्यासाठी तालू आदी स्थान आणि वाणी आदिचा प्रयत्न अवश्य व्हावा लागतो.

**(उत्तर)** परमेश्वर सर्वशक्तिमान आणि सर्वव्यापक असल्यामुळे जीवांना तो आपल्या व्याप्तीने वेदविद्येचा उपदेश करण्यात त्याला मुखादीची आवश्यकता नाही. कारण आपल्याहून वेगळ्या असलेल्या दुसऱ्या माणसाला बोध करण्यासाठी मुख, जिव्हा आदी द्वारा व वर्णोच्चाराची गरज असते. स्वत:साठी कांही त्यांची गरज नसते. कारण मुख व जीभ यांचा वापर न करताही मनामध्ये अनेक व्यवहारांचे चिंतन व शब्दोच्चारण होत राहत असते. कानांमध्ये बोटे घालून पाहा. मुख, जिव्हा, तालू आदी स्थानाचे कसे-कसे शब्द होत आहेत. याच पद्धतीने जीवांना अंतर्यामी रूपाने उपदेश केला आहे. मात्र केवळ इतरांना समजावून सांगण्यासाठी शब्दांचा उच्चार करण्याची आवश्यकता आहे. परमेश्वर निराकार व सर्वव्यापक आहे. तो आपल्या अखिल वेदविद्येचा उपदेश जीवस्थ स्वरूपाने जीवात्म्यामध्ये व्यक्त करतो. मग तो माणूस आपल्या तोंडाने उच्चार करून इतरांना ऐकवितो. म्हणून ईश्वरामध्ये हा दोष येऊ शकत नाही.

**(प्रश्न)** ईश्वराने कोणाच्या आत्म्यामध्ये केव्हा वेदांचा प्रकाश केला ?

**(उत्तर) अग्ने र्वा ऋग्वेदो र्वा वायोर्यजुर्वेदः सूर्यात्सामवेदः ॥**

शत. प्रपा. ११ ब्रा. ५, कं. ८। व. ३

प्रथमतः सृष्टीच्या प्रारंभी परमेश्वराने अग्नी, वायू, आदित्य व अंगिरा या ऋषींच्या आत्म्यांमध्ये एका-एका वेदाचा प्रकाश केला.

**(प्रश्न) यो वै ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ॥** श्वेताश्व. अ. ६। मं. १८

उपनिषदाच्या या वचनामध्ये ब्रह्माच्या हृदयात वेदांचा उपदेश केला आहे. मग अग्नी आदी ऋषींच्या आत्म्यांमध्ये असे का म्हटले आहे ?

**(उत्तर)** ब्रह्माच्या आत्म्यामध्ये अग्नी आदी ऋषींद्वारे वेदांची स्थापित केला गेला. मनुस्मृतीत काय म्हटले आहे ते पाहा :-

**अग्निवायुरविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनम् ।**
**दुदोह यज्ञसिद्ध्यर्थमृग्यजुःसामलक्षणम् ॥** मनु. अ. १। श्लो. २३

परमेश्वराने आदी सृष्टीमध्ये मनुष्यांना उत्पन्न करून अग्नी आदी चार महर्षींद्वारा चारही वेद ब्रह्मास प्राप्त करविले आणि त्या ब्रह्माने अग्नी, वायू, आदित्य व अंगिरा यांच्याकडून ऋग्, यजुः, साम व अथर्व वेदांचे ग्रहण केले.

**(प्रश्न)** त्या चार ऋषींमध्येच वेदांचा प्रकाश केला. इतरांमध्ये केला नाही. यावरून ईश्वर पक्षपाती होत आहे.

**(उत्तर)** तेच चौघे इतर सर्व जीवांहून अधिक पवित्र आत्मे होते. इतर कोणी त्यांच्यासारखे नव्हते. म्हणून पवित्र विद्येचा प्रकाश त्याच्यातच केला.

**(प्रश्न)** कोणत्याही देशाच्या भाषेत वेदांचा प्रकाश न करता तो संस्कृतमध्येच का केला ?

**(उत्तर)** कोणत्याही देशाच्या भाषेत वेदांचा प्रकाश व्यक्त केला असता तर ईश्वर पक्षपाती ठरला असता. कारण विशिष्ट प्रादेशिक भाषेत वेदांचा प्रकाश केला गेला असता तर वेदांचे अध्ययन व अध्यापन त्या प्रदेशातील लोकांना सोपे गेले असते आणि इतर विदेशातील लोकांना अवघड झाले असते. म्हणून संस्कृतात वेद प्रकाश झाला जी कोणत्याही देशाची भाषा नाही आणि ती वेदभाषा अन्य सर्व भाषांचे मूळ आहे. तिच्यामध्येच वेदांचा प्रकाश केला. ज्याप्रमाणे ईश्वराची पृथ्वी आदी सृष्टी सर्व देश व त्या देशांचे रहिवासी यांच्यासाठी एकसारखीच आहे आणि सर्व शिल्पविद्यांचे कारण आहे त्याप्रमाणे परमेश्वराच्या विद्येची भाषा सुद्धा सारखी असली पाहिजे की त्यायोगे सर्व प्रदेशांतील लोकांना तिचे अध्ययन-अध्यापन करण्यासाठी समान परिश्रम करावे लागते. यावरून परमेश्वर पक्षपाती होत नाही हे सिद्ध होते. शिवाय संस्कृत ही सर्व भाषांचे मूळ आहे.

**(प्रश्न)** वेद ईश्वरकृत आहेत, अन्यकृत नाहीत याचे काय प्रमाण?

**(उत्तर)** जसा ईश्वर पवित्र, सर्व विद्या जाणणारा, शुद्ध गुणकर्मस्वभाव, न्यायी, दयाळू वगैरे गुणांनी युक्त आहे, तसेच ज्या ग्रंथात ईश्वराच्या गुणकर्मस्वभावानुकूल लिखाण असेल तोच ग्रंथ ईश्वरकृत, दुसरा नाही. ज्यामध्ये सृष्टिक्रम, प्रत्यक्षादी प्रमाणे, आप्त पुरुष व पवित्रात्मे यांचे व्यवहाराविरुद्ध काही सांगितलेले नसेल ते ईश्वरोक्त समजावे जसे ईश्वराचे निर्भ्रम ज्ञान असते तसे ज्या ग्रंथात भ्रांतिरहित ज्ञानाचे प्रतिपादन आहे तो ईश्वरप्रणीत आहे. जसा परमेश्वर आहे व त्याने जसा सृष्टिक्रम ठेवला आहे त्याच्या अनुशंगाने ज्या ग्रंथात ईश्वर, सृष्टी, कार्य, कारण आणि जीव यांच्याविषयी प्रतिपादन असेल तो परमेश्वरोक्त ग्रंथ असतो आणि ते प्रतिपादन प्रत्यक्षादी प्रमाण विषयाशी आणि अविरुद्ध शुद्धात्म्याच्या स्वभावाच्या विरुद्ध असता कामा नये. याप्रकारचे वेद ग्रंथ आहेत. दुसरे बायबल, कुराण वगैरे ग्रंथ असे नाहीत. त्याचे स्पष्ट विवेचन बायबल व कुराण यांच्या विषयीच्या प्रकरणांत म्हणजे तेराव्या व चौदाव्या समुल्लासांत करण्यात येईल.

**(प्रश्न)** वेद ईश्वराकडून होण्याची आवश्यकता कांहीही नाही. कारण माणसे हळूहळू आपले ज्ञान वाढवून असे ग्रंथ करून घेतील.

**(उत्तर)** माणसे ते काम कधीच करू शकत नाहीत. कारणाशिवाय कार्याची उत्पत्ती असंभव आहे. उदाहरणार्थ, जंगली माणसे भोवतालची सृष्टी पाहूनसुद्धा विद्वान होत नाहीत. जेव्हा त्यांना कुणी शिक्षक मिळतो तेव्हाच ते विद्वान होतात आणि सध्याही दुसऱ्याकडून शिक्षण घेतल्याशिवाय कोणी विद्वान होत नाही. याचप्रमाणे परमेश्वराने सृष्टीच्या प्रारंभीच्या त्या चार ऋषींना वेदविद्या शिकविली नसती तर सर्व लोक अडाणीच राहिले असते. एखाद्या मुलाला जन्मापासून एकांत प्रदेशात, अडाणी लोकांमध्ये किंवा पशूंच्या संगतीत ठेवले तर तो जशी संगत आहे तसाच होईल. जंगलात राहणारे भिल्ल वगैरे लोक हे याचे उदाहरण आहे.

जोपर्यंत आर्यावर्त देशातून विद्येचा प्रसार झाला नव्हता तो पर्यंत ईजिप्त, ग्रीस व युरोपीय देश यांच्या लोकांमध्ये विद्येचा प्रसार मुळीच झालेला नव्हता. तसेच युरोपातून कोलंबस वगैरे लोक जोपर्यंत अमेरिकेत गेले नव्हते तोपर्यंत तेथील रहिवासी हजारो, लाखो, करोडो वर्षांपासून अडाणी व विद्याहीनच राहिले होते. आता त्यांना उत्तम शिक्षण मिळाल्याने ते विद्वान बनले आहेत. याचप्रमाणे सृष्टीच्या प्रारंभी परमेश्वराकडून विद्या व शिक्षण मिळाल्याने माणसे उत्तरोत्तर काळात विद्वान झाले आहेत.

**स पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्॥** योग. सू. समाधिपादे सू. २६

ज्याप्रमाणे आजकाल आपण अध्यापकांकडून शिक्षणच घेऊन विद्वान बनतो त्याचप्रमाणे सृष्टीच्या प्रारंभी उत्पन्न झालेल्या अग्नी आदी ऋषींचा गुरू म्हणजे शिकविणारा परमेश्वर आहे कारण जसे जीव सुषुप्तीमध्ये व प्रलयामध्ये ज्ञानरहित होतात तसा परमेश्वर होत नाही. त्याचे ज्ञान नित्य आहे. म्हणून निमित्तावाचून नैमित्तिक कार्य कधीच घडत नसते हे निश्चितपणे ओळखले पाहिजे.

**(प्रश्न)** वेद संस्कृत भाषेत प्रकट झाले आणि अग्नी आदी ऋषीलोक तर संस्कृत भाषा जाणत नव्हते. मग त्यांना वेदांचा अर्थ कसा जाणला ?

**(उत्तर)** परमेश्वराने त्यांना तो जाणवून दिला. तसेच धर्मात्मा, योगी, महर्षीलोक हे जेव्हा-जेव्हा ज्याचा ज्याचा अर्थ जाणून घेण्याच्या इच्छेने ध्यानस्थ होऊन परमेश्वराच्या स्वरूपात समाधीस्थ झाले तेव्हा-तेव्हा परमेश्वर त्यांना हव्या असलेल्या मंत्रांचे अर्थ समजावून दिले. अशाप्रकारे जेव्हा अनेकांच्या आत्म्यांमध्ये वेदार्थाचा प्रकाश पडला तेव्हा ऋषीमुनींनी ते अर्थ आणि ऋषीमुनींचे इतिहासपूर्वक ग्रंथ तयार केले. त्यांचे नाव ब्राह्मण म्हणजे ब्रह्म जे वेद त्याच्या व्याख्यानाचे ग्रंथ असल्याने ब्राह्मण नाव झाले. आणि,

**ऋषयो मन्त्रदृष्टयः मन्त्रान्सम्प्रादुः॥** निरु. अ. १। मं. २०

ज्या-ज्या मंत्रार्थाने दर्शन ज्या-ज्या ऋषीला झाले आणि ज्याच्या आधी त्या मंत्राचा अर्थ कोणीच प्रकाशित केला नव्हता, तो अर्थ त्यांनी लावला आणि इतरांनाही शिकविला सुद्धा म्हणून जो कुणी ऋषिंना मंत्र कर्ता संबोधतात त्यांचे म्हणणे मिथ्या समजावे.

**(प्रश्न)** वेद कोणत्या ग्रंथांचे नाव आहे ?

**(उत्तर)** ऋक्, यजुः, साम व अथर्व या चार मंत्रसंहितांचे नाव वेद असे आहे. अन्य ग्रंथांचे नाव वेद नाही.

**(प्रश्न) 'मन्त्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम्' ॥** प्रतिज्ञा-परिशिष्ट १।१॥ इत्यादी कात्यायनादिकृत प्रतिज्ञासूत्रादींचा अर्थ तुम्ही काय कराल ?

**(उत्तर)** पाहा ! मंत्रसंहिता ग्रंथाच्या प्रारंभी आणि अध्यायाच्या शेवटी अनादिकाळापासून वेद हा सनातन शब्द लिहिला जात आला आहे. तसे ब्राह्मण ग्रंथाच्या प्रारंभी अथवा अध्यायाच्या शेवटी कोठेही लिहिलेले नाही. निरुक्तामध्येही,

**इत्यपि निगमो भवति । इति ब्राह्मणम् ॥** नि. अ. ५। खं. ३,४

**छन्दोब्राह्मणानि च तद्विषयाणि ॥** अष्टाध्यायी अ. ४। पा. २। सू. ६६

हे पाणिनीय सूत्र आहे. यावरूनही हे स्पष्ट विदित होते की वेद हा मंत्रभाग असून ब्राह्मण हा व्याख्याभाग आहे. या बाबतीत विशेष जाणून घेण्याची इच्छा असेल तर त्यांनी माझा **'ऋग्वेदादिभाष्यभूमिका'** हा ग्रंथ पाहावा. तेथे मी अनेक प्रमाणांच्या विरुद्ध असल्याने हे कात्यायनाचे वचन होऊ शकत नाही, असेच सिद्ध केले आहे. कारण तसे मानले तर वेद सनातन कधीच ठरू शकत नाहीत. कारण ब्राह्मणग्रंथांमध्ये अनेक ऋषी, महर्षी व राजा इत्यादिकांचे इतिहास दिले आहेत; आणि इतिहास ज्याचा असेल तो त्याच्या जन्मानंतरच लिहिला जातो. म्हणून तो ग्रंथही त्याच्या जन्मानंतर तयार होतो. वेदांमध्ये कोणाचाही इतिहास नाही परंतु विशेष ज्या ज्या शब्दापासून विद्येचा बोध होतो त्या त्या शब्दाचा प्रयोग केला आहे. त्यामध्ये कोणत्याही विशिष्ट माणसाचे नाव, विशेष कथा प्रसंग यांचा उल्लेख वेदात नाही.

**(प्रश्न)** वेदांच्या किती शाखा आहेत ?

**(उत्तर)** एक हजार एकशे सत्तावीस.

**(प्रश्न)** शाखा काय म्हटली जाते ?

**(उत्तर)** व्याख्यानाला शाखा म्हणतात.

**(प्रश्न)** जगात विद्वान लोक वेदांच्या अवयवभूत विभागांना शाखा मानतात.

**(उत्तर)** थोडासा विचार कराल तर बरे. कारण जितक्या शाखा आहेत त्या आश्वलायन आदी ऋषींच्या नावाने प्रसिद्ध आहेत; आणि मंत्रसंहिता परमेश्वराच्या नावाने प्रसिद्ध आहेत. ज्याप्रमाणे चारही वेदांना परमेश्वरकृत मानतात त्याप्रमाणे आश्वलायनी वगैरे शाखांना त्या त्या ऋषीने तयार केलेल्या मानतात; आणि सर्व शाखांमध्ये मंत्रांना प्रतीक समजून त्यांचे निरूपण केले आहे. जसे, तैत्तिरीय शाखेमध्ये **'इषे त्वोर्जे त्वेति'** इत्यादी प्रतीके धरून विवेचन केले आहे. परंतु वेदसंहितांमध्ये अशा प्रकारची प्रतीके ठेवलेली म्हणून परमेश्वरकृत चारही वेद हे मूळवृक्ष आणि आश्वलायन आदी सर्व शाखा ऋषिमुनीकृत आहेत. त्या परमेश्वरकृत नाहीत. ज्यांना या विषयाची अधिक माहिती हवी असेल त्यांनी **'ऋग्वेदादिभाष्यभूमिका'** पाहावी.

ज्याप्रमाणे आई-बाप आपल्या मुलांवर कृपादृष्टी ठेवून त्यांची उन्नति इच्छितात त्याचप्रमाणेच परमेश्वराने सर्व मानवांवर कृपा करून वेदांना प्रकाशित केले आहे त्यामुळे माणसाने अविद्यारूपी अंधकाराच्या भ्रमजाळातून आपली सुटका करून विज्ञानारूप सूर्याला प्राप्त होऊन अत्यंत आनंदात राहावे आणि विद्येची व सुखांची अभिवृद्धी करीत जावे.

**(प्रश्न)** वेद नित्य आहेत की अनित्य ?

**(उत्तर)** वेद नित्य आहेत. कारण परमेश्वर नित्य असल्यामुळे त्याचे ज्ञानादी गुणही नित्य आहेत. नित्य पदार्थांचे गुण, कर्म, स्वभाव नित्य व अनित्य द्रव्यांचे अनित्य होत असतात.

**(प्रश्न)** काय हे पुस्तक देखील नित्य आहे ?

**(उत्तर)** नाही. कारण ग्रंथ हा कागद व शाई यांनी बनलेला असतो. तो नित्य कसा होऊ शकणार ? परंतु जे शब्द, अर्थ व संबंध आहेत ते नित्य आहेत.

**(प्रश्न)** ईश्वराने त्या ऋषींना ज्ञान दिले असेल आणि त्या ज्ञानाच्या आधारे त्या लोकांनी वेद तयार केले असतील ?

**(उत्तर)** ज्ञान हे ज्ञेयावाचून होत नाही. गायत्र्यादी छंद, षड्जादी व उदात्त-अनुदात्त आदी स्वरांचे यांची ज्ञानपूर्वक गायत्र्यादी छंदाच्या निर्माण करण्यात सर्वज्ञ परमेश्वराशिवाय कुणाचे सामर्थ्य नाही की अशा प्रकारचे सर्वज्ञानयुक्त शास्त्र बनवू शकेल. होय, वेदांचे अध्ययन केल्यानंतर व्याकरण, निरुक्त, छंद इत्यादी ग्रंथ ऋषीमुनींनी अनेक विद्यांचा प्रकाश सर्व लोकांना मिळावा यासाठी रचले. जर परमेश्वराने वेदांचा प्रकाश केला नसता तर कोणालाही काहीही करता आले नसते. म्हणून वेद हे परमेश्वरोक्त आहेत. वेदांनुसार सर्व लोकांनी चालले पाहिजे आणि ज्याने कोणी कोणास विचारले की तुमचे मत काय आहे ? तर हेच उत्तर द्यावे की आमचे मत वेद, म्हणजे जे काही वेदात सांगीतले आहे त्यालाच आम्ही मानतो.

आता या पुढील भागात सृष्टिविषयी लिहिणार आहोत. वर संक्षेपाने ईश्वर व वेद विषयाचे व्याख्यान केले आहे.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषित ईश्वरवेदविषये**
**सप्तमः समुल्लासः सम्पूर्णः ॥७॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






# आठवा समुल्लास

# सृष्टि उत्पत्ति

आता सृष्टिची उत्पत्ति, स्थिती व प्रलय यांसंबंधी लिहावयाचे आहे.

**इयं विसृष्टिर्यत आ बभूव यदि वा दधे यदि वा न।**
**यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥१॥** ऋ.मं.१०।सू.१२९।मं.७

हे अङ्ग-मनुष्या! ज्याच्या पासून ही विविध सृष्टी प्रकाशित झाली आहे, जो तिचे धारण करतो व प्रलय करतो, जो या जगाचा स्वामी आहे व ज्या सर्वव्यापकामध्ये हे सारे जग उत्पत्ति, स्थिती व लय यांना प्राप्त होते, तोच परमात्मा आहे. त्याला तू जाण आणि दुसऱ्या कोणालाही सृष्टिकर्ता मानू नको. ॥१॥

**तम आसीत्तमसा गूढमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वमा इदम्।**
**तुच्छयेनाभ्वपिहितं यदासीत्तपसस्तन्महिनाजायतैकम् ॥२॥** ऋ.मं.१०।सू.१२९।मं.३

हे सारे जग सृष्टिच्या पूर्वी अंधकाराने वेष्टीलेले आणि रात्रीरूप जाणण्यास अयोग्य. असे हे अवकाशरूपी सारे जग जसे तुच्छ म्हणजे अनंत परमेश्वरासमोर एका स्थानामध्ये अंधाराने आच्छादलेले होते. नंतर परमेश्वराने आपल्या सामर्थ्याने त्याला कारण रूपांतून कार्यरूप बनविले. ॥२॥

**हिरण्यगर्भः समवर्त्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्।**
**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥३॥** ऋ.मं.१०।सू.१२१।मं.१

हे मनुष्यानो! जो सूर्यादी सर्व तेजस्वी पदार्थांचा आधार आणि या उत्पन्न झालेल्या व पुढे उत्पन्न होणाऱ्या जगाचा एक अद्वितीय स्वामी, तो परमेश्वर या जगाच्या उत्पत्ती पूर्वी विद्यमान होता. ज्याने पृथ्वीपासून सूर्यापर्यंत संपूर्ण जग उत्पन्न केले आहे त्या परमेश्वराची प्रेमाने भक्ती करीत असावे. ॥३॥

**पुरुषऽ एवेद ँ सर्वं यद्भूतं यच्च भाव्यम्।**
**उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥४॥** यजु. अ. ३१।मं. २

हे मनुष्यांनो! जो सर्वांमध्ये पूर्ण व्यापक पुरुष आणि जो नाशरहित कारण व जीवाचा स्वामी आहे, जो पृथिव्यादी जड पदार्थ व जीव यांहून निराळा आहे तोच पुरुष (परमेश्वर) या सर्व भूत, भविष्य व वर्तमान काळातील जगाचा रचयिता आहे. ॥४॥

**यतो वा इमानि भूतानि जायन्ते येत जातानि जीवन्ति।**

**यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद् ब्रह्म ॥५॥** तैत्तिरीयोपनि. भृगु. अनु. १

ज्या परमेश्वराच्या रचनेने ही सारी पृथिव्यादी भूते उत्पन्न होतात, ज्याच्या योगाने ती जगतात व ज्याच्यामुळे लयाला जातात तेच ब्रह्म होय. त्याला जाणण्याची इच्छा करा. ॥५॥

**जन्माद्यस्य यतः ॥** शारीरिक सू. अ. १। पा. १। सू. २

ज्याच्या योगाने या जगाची उत्पत्ती, स्थिती व लय होतात तेच ब्रह्म जाणण्यास योग्य आहे.

**(प्रश्न)** हे जग परमेश्वरापासून उत्पन्न झाले आहे की दुसऱ्यापासून ?

**(उत्तर)** निमित्त कारण परमात्म्यापासून उत्पन्न झाले आहे परंतु याचे उपादान कारण ती प्रकृती आहे.

**(प्रश्न)** काय प्रकृती परमेश्वराने उत्पन्न नाही केली काय ?

**(उत्तर)** नाही ती अनादी आहे.

**(प्रश्न)** अनादी कोणास म्हणतात आणि किती पदार्थ अनादी आहेत ?

**(उत्तर)** ईश्वर, जीव आणि जगाचे कारण या तीन गोष्टी अनादी आहेत.

**(प्रश्न)** या विधानाला काय प्रमाण आहे ?

**(उत्तर) द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥१॥**

ऋ. मं.१। सू.१६४, मं. २०

(द्वा) ब्रह्म आणि जीव हे दोघे (सुपर्णा) चैतन्य व पालनशक्ती आदी गुणांनी सारखे (सयुजा) व्याप्य-व्यापक भावाने संयुक्त. (सखाया) ते एकमेकांचे मित्रतायुक्त, सनातन अनादी आहेत आणि (समानम्) या दोघांप्रमाणेच (वृक्षम्) अनादी मूलरूप कारण व शाखारूप कार्य यांनी युक्त वृक्ष म्हणजे तो स्थूल होऊन प्रलयामध्ये छिन्नभिन्न होऊन जातो. तो तिसरा अनादी पदार्थ आहे. या तिघांचे गुण, कर्म व स्वभावसुद्धा अनादी आहेत. (तयोरन्यः) या जीव व ब्रह्म यांपैकी जो जीव आहे तो या वृक्षरूपी विश्वातील पापपुण्याच्या फळांचा (स्वादु अत्ति) उत्तम भोक्ता आहे मात्र दुसरा परमात्मा आहे (अनश्नन्) कर्मफळांना भोगत नसून चारी बाजूंनी म्हणजे आत व बाहेर सर्वत्र प्रकाशमान होत आहे. जीवाहून ईश्वर व ईश्वराहून जीव आणि त्या दोघांहून प्रकृती भिन्न स्वरूप आहे. हे तीन्ही पदार्थ अनादी आहेत. ॥१॥

**शाश्वतीभ्यः समाभ्यः ॥२॥** यजु. अ. ४०। मं. ८

(शाश्वती) अनादी सनातन जीवरूप प्रजेकरिता वेदांद्वारे परमेश्वराने सर्व विद्यांचा उपदेश केला आहे. ॥२॥

**अजामेकां लोहितशुक्लकृष्णां बह्वीः प्रजाः सृजमानां स्वरूपाः।**

**अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते जहात्येनां भुक्तभोगामजोऽन्यः॥** श्वेताश्व. अ. ४। मं. ५

हे उपनिषदातील वचन आहे. प्रकृती, जीव व परमेश्वर हे तिघेही अज म्हणजे ज्यांचा जन्म कधी होत नाही आणि हे कधी जन्म घेत नाहीत. अर्थात हे तीनही साऱ्या जगाचे कारण आहेत. यांचे कारण कोणी नाही. या अनादी प्रकृतीचा उपभोग अनादी जीव घेताना त्यात गुरफटतो. परंतु परमेश्वर तिच्यात गुरफटत नाही आणि

तिचा उपभोग करीत नाही ईश्वर व जीव यांची लक्षणे पूर्वी ईश्वरविषयात सांगितली आहेत. आता प्रकृतीचे लक्षण लिहित आहे.

**सत्त्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृतिः; प्रकृतेर्महान् महतोऽहङ्कारोऽहङ्कारात् पञ्चतन्मात्राण्युभयमिन्द्रियं पञ्चतन्मात्रेभ्यः स्थूलभूतानि पुरुष इति पञ्चविंशतिर्गणः ॥** सांख्य. सू. अ. १। सू. ६१

(सत्व) शुद्ध आहे (रजः) मध्य व (तमः) जडता या तीन वस्तू मिळून जो एक संघात (समूह) आहे त्याचे नाव प्रकृती आहे. त्यापासून महत्तत्व बुद्धी, तिच्यापासून अहंकार, त्यापासून पाच तन्मात्रा ही सूक्ष्म भूते आणि दहा इंद्रिये व अकरावे मन, पंचतन्मात्रांपासून पृथ्वी आदी पाच भूते हे चोवीस पदार्थ आणि पंचविसावा पुरुष म्हणजे जीव व परमेश्वर आहे. यांपैकी प्रकृति अविकारी आणि महत्तत्त्व, अहंकार व पंच सूक्ष्म भूते हे सर्व मूळ अविकृत प्रकृतीचे कार्य आणि इंद्रिये, मन आणि स्थूल भूत यांचे कारण आहे. पुरुष हा कोणाची प्रकृती-उपादान कारणही नाही अथवा कशाचे कार्यही नाही.

**(प्रश्न) सदेव सोम्येदमग्र आसीत् ॥१॥** छांदो. प्रपा. ६। खं. २। व. १

**असद्वा इदमग्र आसीत् ॥२॥** तैत्ति. ब्रह्मा. अनु. ७

**आत्मा वा इदमग्र आसीत् ॥** बृह. प्रपा. ११। ब्रा. ४। मं. १

**ब्रह्म वा इदमग्र आसीत् ॥** शत. प्रपा. ११। ब्रा. १। कं. ११। व. १

ही उपनिषदांतील वचने आहेत. हे श्वेतकेतो ! हे जग सृष्टीच्या पूर्वी सत्।१। असत्।२। आत्मा।३। आणि ब्रह्मरूप होते ॥४॥ नंतर

**तदैक्षत बहुः स्यां प्रजायेयेति ॥१॥**

**सोऽकामयत बहुः स्यां प्रजायेयेति ॥२॥** तैत्तिरीय. ब्रह्मा. व. ६

हे तैत्तिरीय उपनिषदातील वचन आहे. तोच परमेश्वर आपल्या इच्छेने बहुरूप बनला आहे. ॥१।२॥

**सर्वं खल्विदं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ॥**

हेही उपनिषदातील वचन आहे. जे हे सारे जग आहे ते सर्व निश्चितपणे ब्रह्म आहे. त्यात दुसरे नाना प्रकारचे पदार्थ मुळीच नाहीत. तरी ते सारे ब्रह्मरूप आहे.

(उत्तर) या वचनाचा असा अनर्थ तुम्ही का करता ? कारण त्याच उपनिषदांमध्ये - **(एवमेव खलु) अन्नेन सोम्य शुङ्गेनापो मूलमन्विच्छ, अद्भिस्सोम्य शुङ्गेन तेजोमूलमन्विच्छ, तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ, सन्मूलाः सोम्येमाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ॥** छान्दो. उपनि. प्रपा. ६। खं. ८। व. ४

हे श्वेतकेतो ! तू अन्नरूपी पृथ्वी या कार्यावरून जलरूपी मूळ कारण जाण, कार्यरूपी जलावरून तेजोरूपी मूळ जाण आणि तेजोरूपी कार्यावरून सत्‌रूप कारण जी नित्य प्रकृती आहे तिला तू जाण. हीच सत्यस्वरूप प्रकृती साऱ्या जगाचे मूळ घर आणि त्याच्या स्थितीचे स्थान आहे. हे सारे जग सृष्टी उत्पन्न होण्यापूर्वी असत् सदृश आणि जीवात्मा, ब्रह्म व प्रकृती यांत लीन होऊन विद्यमान होते. त्याचा अभाव नव्हता आणि ते 'सर्व खल्विदं' हे वचन वडाची साल पिंपळाला लावण्यासारख्या खेळाप्रमाणे आहे. कारण,

**सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीत ॥** छान्दोग्य. प्रपा. ३। खं. १४। व. १ आणि **नेह नानास्ति किञ्चन ॥** कठोप. अ.२। वल्ली. ४। श्लो. ११

हे कठवल्लीचे वचन आहे ज्याप्रमाणे शरीराचे अवयव जोपर्यंत शरीराबरोबर असतात तोपर्यंतच ते कामाचे असतात पण शरीराहून वेगळे झाले की निरुपयोगी होतात त्याप्रमाणेच एखाद्या प्रकरणातील वाक्ये घेतली तरच ती सार्थक आणि ती प्रकरणाच्या संदर्भापासून वेगळी काढली किंवा दुसऱ्याच प्रकरणाशी जोडली तर ती निरर्थक बनतात. ऐका, या वचनांचा अर्थ असा आहेः हे जीवा ! तू त्या ब्रह्माची उपासना कर. ज्या ब्रह्मापासून जगाची उत्पत्ति, स्थिती व जीवन होतात, ज्याच्या बनविण्याने व धारण केल्याने हे सारे जग अस्तित्वात आले आहे किंवा जे ब्रह्मापासून सहचरित आहे त्याला सोडून दुसऱ्या कोणाचीही उपासना तू करू नकोस. या चेतनमात्र अखंड एकरस ब्रह्मस्वरूपामध्ये नाना वस्तूंचे मिश्रण झालेले नाही परंतु हे सारे वेगवेगळ्या स्वरूपात परमेश्वराच्या आधाराने टिकून आहे.

**(प्रश्न)** जगाची कारणे किती होतात ?

**(उत्तर)** जगाची तीन कारणे आहेत. १) निमित्त कारण, २) उपादान कारण व ३) साधारण कारण ज्याच्या बनविण्याने काही बनते, बनविले नाही तर काहीच बनत नाही, जे स्वत: बनत नाही पण प्रकारांतराने दुसऱ्याला बनविते त्याला निमित्त कारण असे म्हणतात. ज्याच्यावाचून काही बनत नाही व जे अवस्थांतररूप होऊन बनते व बिघडतेही, त्याला उपादान कारण म्हणतात. पदार्थ बनविण्याचे जे साधन व साधारण निमित्त असते त्याला साधारण कारण असे म्हणतात.

निमित्त कारण दोन प्रकारचे असते. १) सर्व सृष्टीला कारणाद्वारे बनविणारे, धारण करणारे व लय करणारे आणि सर्वांची व्यवस्था ठेवणारे असे मुख्य निमित्त कारण परमेश्वर आहे. २) परमेश्वराच्या सृष्टीतील पदार्थ घेऊन अनेकविध कार्य कार्यांतर बनविणारा साधारण निमित्त कारण जीव आहे.

उपादान कारण :- प्रकृती परमाणू जिला सर्व सृष्टी रचनेची सामुग्री म्हणतात ती जड (अचेतन) असल्यामुळे स्वत: बनू किंवा बिघडू शकत नाही. परंतु दुसऱ्याने बनविल्यास ती बनते आणि बिघडविल्यास बिघडते. कोठे कोठे जड (अचेतन) पदार्थाच्या निमित्ताने जड (अचेतन) सुद्धा बनतो व बिघडतोही. ज्याप्रमाणे परमेश्वराने निर्माण केलेले बीज भूमीत पडले आणि त्याला पाणी मिळाले तर ते वृक्षाचे रूप धारण करते आणि अग्नी आदी जड (अचेतन) पदार्थांच्या संयोगाने ते बिघडूनही जाते. परंतु याचे नियमपूर्वक बनणे अथवा बिघडणे हे परमेश्वर व जीव यांच्या हाती असते.

जेव्हा एखादी वस्तू बनविली जाते तेव्हा ती बनविण्याला जी जी साधने जसे ज्ञान, दर्शन, बळ, हात आणि नाना प्रकारची साधने आणि दिशा, काळ व आकाश त्याला साधारण कारण म्हणतात. उदाहरणार्थ; माठ बनविणारा कुंभार हा निमित्त कारण होय. माती हे उपादान कारण आणि काठी, चाक वगैरे गोष्टी हे सामान्य निमित्त कारण होय. तसेच दिशा, काळ, आकाश, प्रकाश, डोळे, हात, ज्ञान, क्रिया आदी साधारण निमित्ते व निमित्त कारणेही असतात. या तीन कारणांवाचून कोणतीही वस्तू बनू शकत नाही आणि बिघडू शकत नाही.

**(प्रश्न)** आधुनिक वेदांती लोक केवळ परमेश्वरालाच जगाचे अभिन्न निमित्तोपादान कारण मानतात.

**यथोर्णनाभिः सृजते गृहणते च ।** मुण्डक. १। खं. १। मं. ७

हे उपनिषदातील वचन आहे. ज्याप्रमाणे कोळी बाहेरून कोणताही पदार्थ न घेता आपल्याच शरीरातून तंतू काढून त्याचे जाळे विणतो व त्यातच राहून खेळतो त्याप्रमाणे ब्रह्मही आपल्यातूनच जगाची निर्मिती करून, स्वत: जगदाकार बनून आपणच त्यात क्रीडा करीत आहे. अशा प्रकारे 'मी बहुरूप म्हणजे जगदाकार व्हावे' अशी इच्छा व कामना करीत ते ब्रह्म संकल्पमात्रानेच सर्व जगद्रूप बनले. कारण,

**आदावन्ते च यन्नास्ति वर्त्तमानेऽपि तत्तथा ॥** गौडपादीय कारिका श्लोक ३१

ही मांडूक्य उपनिषदावरील कारिका आहे. जे आरंभी नसते व अंतीही राहत नाही ते वर्तमान काळीही नसते. परंतु सृष्टीच्या प्रारंभी जग नव्हते व ब्रह्म होते. प्रलयाच्या अंती जग राहणार नाही. तेव्हा वर्तमानकाळी सर्व जग हेच ब्रह्म आहे, असे का नाही ?

**(उत्तर)** तुमच्या म्हणण्याप्रमाणे ब्रह्म हे जगाचे उपादान कारण असेल तर ते ब्रह्म परिणामी व अवस्थांतर युक्त विकारी होईल आणि उपादान कारणाचे गुण, कर्म, स्वभाव कार्यांमध्येसुद्धा येतात. (म्हणून ब्रह्माचे गुण जगामध्ये आले पाहिजेत.)

**कारणगुणपूर्वकः कार्य्यगुणो दृष्टः ॥** वैशेषिक. सू. अ. २। आ. १। सू. २४

उपादान कारणाचे सदृश गुण कार्यामध्ये येत असतात. तर ब्रह्म हे सच्चिदानंदस्वरूप आहे. परंतु जग हे कार्यरूपामुळे असत्, जड (अचेतन) व आनन्दरहित आहे. ब्रह्म हे अज (न जन्मलेले) आहे पण जग हे उत्पन्न झालेले आहे. ब्रह्म अदृश्य आहे तर जग दृश्य आहे. ब्रह्म हे अखंड तर जग खंडरूप आहे. जर ब्रह्मापासून पृथ्वी आदी कार्य निर्माण झाले तर पृथ्वी आदी कार्याचे जडत्वादी (अचेतनत्वादी) गुण ब्रह्मामध्येही असले पाहिजेत. म्हणजे पृथ्वी आदी पदार्थ जसे जड (अचेतन) आहेत तसेच ब्रह्मही जड (अचेतन) होईल आणि परमेश्वर जसा चेतन आहे तसे पृथ्वी आदी कार्य पदार्थही चेतन असले पाहिजेत. (परंतु तसे नाही. म्हणून ब्रह्म हे सृष्टीचे उपादान कारण नव्हे, हे सिद्ध होते.)

आणि तुम्ही जो कोळ्याचा दृष्टांत दिला आहे तो तुमच्या मताला साधक नसून बाधक आहे. कारण कोळी जडरूप शरीर तंतूला उपादान आणि जीवात्मा हा निमित्त कारण आहे आणि हाही परमेश्वराच्या अद्‌भुत रचनेचा प्रभाव आहे. कारण दुसरा कोणताही प्राणी आपल्या शरीरातून कोळ्याप्रमाणे धागा काढू शकत नाही. याचप्रमाणे व्यापक ब्रह्माने आपल्यातील व्याप्य प्रकृती आणि परमाणु कारणांपासून स्थूल जग बनवून, बाह्य भाग स्थूलरूप करून, स्वत: त्यातच व्यापक होऊन, साक्षीभूत, आनंदमय होऊन राहिला आहे.

आणि परमेश्वराने जी ईक्षण म्हणजे दर्शन, विचार व कामना केली की मी सारे जग निर्माण करून प्रसिद्ध (प्रकट) व्हावे. म्हणजे जेव्हा जग उत्पन्न होते तेव्हाच जीवांचे विचार, ज्ञान, ध्यान, उपदेश, श्रवण यांच्यामध्ये परमेश्वर प्रसिद्ध होतो आणि पुष्कळ स्थूल पदार्थांमुळे तो सहवर्तमान (विद्यमान) होतो. जेव्हा प्रलय होतो तेव्हा परमेश्वर व मुक्त जीव यांच्याखेरीज परमेश्वराला जाणणारा कोणी नसतो.

आणि जी ही कारिका आहे ती भ्रामक आहे. कारण प्रलयामध्ये जग प्रसिद्ध (प्रकट) नव्हते आणि सृष्टिचा अंत म्हणजे प्रलयाच्या आरंभापासून जोपर्यंत पुन: दुसरी सृष्टि उत्पन्न होणार नाही तोपर्यंत देखील जगाचे कारण सूक्ष्म होऊन अप्रसिद्ध (अप्रकट) राहते. कारण,

**तम आसीत्तमसा गूढमग्रे ॥१॥** ऋ. मं. १०। सू. १२९। मं. ३ हा ऋग्वेदाचा मंत्रांश आहे.

**आसीदिदं तमोभूतमप्रज्ञातमलक्षणम् ।**

**अप्रतर्क्यमविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः ॥२॥** मनु. अ. १। श्लो. ५

हे सारे जग सृष्टिच्या आधी प्रलयकाळी अंधाराने वेष्टित आच्छादित होते आणि प्रलयाच्या प्रारंभानंतरही तशीच स्थिती होत असते. त्यावेळी ते कुणीही जाणण्यास योग्य नव्हते न तर्काने ग्रहण करण्यायोग्य आणि प्रसिद्ध चिह्नांनी युक्त नसल्यामुळे इंद्रियांना आकलन होण्यासारखे नव्हते व नसणार. परंतु वर्तमानकाळी ते आकलन होते आणि प्रसिद्ध चिह्नांनी युक्त असल्याने जाणण्यास योग्य असते व यथावत प्रत्ययास येते शिवाय त्या कारिकाकाराने वर्तमानकाळीही जगाचा अभाव असल्याचे म्हटले आहे. ते सर्वथैव निराधार आहे. कारण सिद्धान्ती जे प्रमाणांनी जाणतो व प्राप्त करतो ते अन्यथा कधी होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** जगाच्या निर्मितीमध्ये परमेश्वराचा काय हेतू आहे ?

**(उत्तर)** ते न बनविण्यात त्याचा काय हेतू आहे ?

**(प्रश्न)** त्याने जग बनविले नसते तर तो आनंदात राहिला असता आणि जीवानांही सुख-दु:ख भोगावे लागले नसते.

**(उत्तर)** ही आळशी व दरिद्री लोकांची गोष्ट आहे. पुरुषार्थी माणसाची नाही आणि जीवांना प्रलयामध्ये कसले सुख अथवा दु:ख असणार ? सृष्टितील सुख व दु:ख यांची तुलना केल्यास सुख अनेक पटींनी जास्त असल्याचे आढळून येईल. अनेक-पवित्रात्मे जीव मुक्तीची साधना करून मोक्षाचा आनंदही प्राप्त करतात. ते प्रलयामध्ये सुषुप्तावस्थेप्रमाणे काहीही न करता पडून राहीले असते. परमेश्वराने जग निर्माण केले नसते तर प्रलयाच्या पूर्वी सृष्टितील जीवांना त्यांनी केलेल्या पापपुण्याच्या कर्मांची फळे परमेश्वर त्यांना कसा देऊ शकला असता आणि जीवांना ती फळे कशी भोगता आली असती ?

तुम्हांला कोणी विचारले की, ''डोळे असण्याचे प्रयोजन काय ?'' तर तुम्ही असेच सांगाल की, ''डोळे हे पाहण्यासाठी आहेत.'' त्याचप्रमाणे परमेश्वरामध्ये जगाची रचना करण्याचे विज्ञान, सामर्थ्य व क्रियाशीलता आहे त्याचे प्रयोजन काय ? जगाची उत्पत्ती करण्यांखेरीज दुसरे कोणते प्रयोजन असणार ? याखेरीज तुम्हांला दुसरे काहीच प्रयोजन सांगता येणार नाही. परमेश्वराचे न्याय, धारण, दया आदी गुणही तेव्हाच सार्थक होऊ शकतात जेव्हा जगाची उत्पत्ति होते त्याचे अनंत सामर्थ्य जगाची उत्पत्ति, स्थिती, लय व व्यवस्था करण्यानेच सफल होते. जसा डोळ्यांचा स्वाभाविक गुण पाहणे हा आहे, तसाच परमेश्वराचा स्वाभाविक गुण जगाची उत्पत्ती करून सर्व जीवांना असंख्य पदार्थ देऊन परोपकार करणे हा आहे.

**(प्रश्न)** बीज आधी आहे की वृक्ष ?

**(उत्तर)** बीज. कारण बीज, हेतू, निदान, निमित्त आणि कारण इत्यादी शब्द एकाच अर्थाचे आहेत. कारणाचे नाव बीज असल्याने ते कार्याच्या आधीच असते.

**(प्रश्न)** जर परमेश्वर सर्व शक्तिमान आहे तर तो जीवाला व सृष्टिच्या कारणालाही उत्पन्न करू शकतो. त्याला तसे करता येत नसेल तर तो सर्वशक्तिमान कसा असू शकेल?

**(उत्तर)** सर्वशक्तिमान या शब्दाचा अर्थ आम्ही पूर्वी सांगितला आहे. जो असंभव गोष्टीही करू शकतो त्याला सर्वशक्तिमान म्हणावयाचे काय ? जर तो असंभव गोष्टीही करू शकत असेल, म्हणजे कारणावाचून कार्य करू शकत असेल तर कारणाशिवाय दुसऱ्या ईश्वराला निर्माण करणे, स्वत: मरणे, जड (अचेतन), दु:खी, अन्यायकारी, अपवित्र आणि कुकर्मी होणे सुद्धा होऊ शकतो की नाही ? जो स्वाभाविक नियम म्हणजे जसा अग्नि उष्ण, जल शितल आणि पृथ्वी आणि आदी सर्व जड पदार्थांना त्यांच्या विरुद्ध गुणांचे ईश्वरसुद्धा करू शकत नाही. जसा तो स्वत: जड (चैतन्यरहित) होऊ शकत नाही तसे तो जडाला चेतनही करू शकत नाही. तसेच ईश्वराचे नियम सत्य आणि पूर्ण आहेत. म्हणून तो त्या नियमांमध्ये बदल करू शकत नाही म्हणून सर्वशक्तिमान या शब्दाचा अर्थ एवढाच आहे की परमेश्वर दुसऱ्या कोणाच्याही मदतीशिवाय आपली सर्व कामे पूर्ण करू शकतो.

**(प्रश्न)** ईश्वर साकार आहे की निराकार ? तो जर निराकार आहे तर हात, पाय इत्यादी साधनांशिवाय तो जग निर्माण करू शकणार नाही आणि जर तो साकार आहे तर काही दोष येत नाही.

**(उत्तर)** ईश्वर निराकार आहे. जो साकार म्हणजे शरीरयुक्त आहे तो ईश्वरच नव्हे. कारण तसे असेल तर तो मर्यादित शक्ती असलेला, देश व काळ वस्तुंनी बांधलेला, क्षुधा-तृष्णा, छेदन, भेदन, शीत-उष्ण, ज्वर, पीडा यांनी युक्त असलेला होईल. हे सारे जीवाचे गुण आहेत. ते ईश्वरामध्ये कधीही असू शकत नाहीत. जसे तुम्ही-आम्ही साकार म्हणजे शरीरधारी आहोत; म्हणून त्रसरेणू, अणू, परमाणू आणि प्रकृती यांना आपल्या आधीनस्थ ठेवू शकत नाही आणि त्या सूक्ष्म पदार्थांना पकडून स्थूल बनवू शकत नाही. याचप्रमाणे देखील स्थूल देहधारी परमेश्वरसुद्धा त्या सूक्ष्म पदार्थांपासून स्थूल जग निर्माण करू शकला नसता.

परमेश्वर भौतिक इंद्रियगोलक आणि हात, पाय इत्यादी अवयवरहित आहे. परंतु त्याची शक्ती, बळ व पराक्रमही अनंत आहेत. त्यांनी तो सारी कामे करतो. ही कामे जीव आणि प्रकृती यांच्याकडून कधीच होऊ शकत नाहीत. तो प्रकृतीहूनही सूक्ष्म असून तिच्यामध्ये व्यापक आहे. म्हणूनच तो त्यांना पकडून जगदाकार करून टाकतो; आणि तो सर्वगत असल्याने सर्वांचे धारण व प्रलयही करू शकतो.

**(प्रश्न)** मनुष्यादिकांचे आई-बाप साकार आहेत म्हणून त्यांची संततीही साकार होते. ते निराकार असते तर त्यांची मुलेबाळेही निराकार झाली असती. याचप्रमाणे परमेश्वर निराकार असेल तर त्याने बनविलेले हे जगदेखील निराकार असले पाहिजे.

**(उत्तर)** हा तुमचा प्रश्न पोरकटपणाचा आहे. कारण आम्ही नुकतेच सांगितले आहे की परमेश्वर हे जगाचे उपादान कारण नसून निमित्त कारण आहे. प्रकृती व परमाणू हे स्थूल असून ते जगाचे उपादान कारण आहेत. ते पूर्णपणे निराकार नाहीत परंतु ते परमेश्वराहून स्थूल आणि इतर जड (अचेतन) कार्यापेक्षा सूक्ष्म आकार ठेवतात म्हणून साकारापासून साकार बनले, असे समजावे.

**(प्रश्न)** परमेश्वर कारणावाचून कार्य निर्मिती करू शकत नाही काय ?

**(उत्तर)** नाही. कारण ज्याचा अभाव म्हणजे जे विद्यमान नाही त्याचा भाव व त्याचे अस्तित्त्व असणे सर्वथा असंभव आहे. एखाद्या थापाड्याने असे सांगितले की, 'मी वंध्या स्त्रीचा मुलगा व मुलगी यांचा विवाह पाहिला.

त्यांनी माणसाच्या शिंगाचे धनुष्य घेतले होते व आकाशपुष्पांच्या माळा घातल्या होत्या. ते मृगजळात स्नान करीत होते आणि गंधर्वनगरीत राहत होते. तेथे ढगांशिवाय पाऊस पडत होता आणि जमीन नसताना सर्व धान्यांचे उत्पादन होत होते.' तर या साऱ्या गोष्टी अशक्य आहेत. त्याचप्रमाणे कारणावाचून कार्य होणेही असंभव आहे.

कोणी असे म्हटले की, 'मम मातापितरौ न स्तोऽहमेवमेव जातः। मम मुखे जिह्वा नास्ति वदामि च।' म्हणजे मला आई बाप नव्हते; त्यांच्या शिवाय मी जन्मलो. माझ्या तोंडात जीभ नाही; तरीही मी बोलतो. बिळात साप नव्हता पण तो त्यातून बाहेर आला. मी कोठेही नव्हतो व हेही कोठेही नव्हते. तरीही आम्ही सगळे जण येथे आलो आहोत. अशा असंभव गोष्टी बोलणे म्हणजे उन्मत्त वेड्या लोकांचे बरळणेच होय.

**(प्रश्न)** कारणाशिवाय कार्य होत नाही तर मग कारणाचे कारण कोणते ?

**(उत्तर)** जे केवळ कारणरूप आहे ते कोणाचेही कार्य होत नाही आणि जे कुणाचे कारण आणि कुणाचे कार्य असते ते दुसरे कारण म्हटले जाते. उदाहरणार्थ पृथ्वी (माती) हे घर वगैरेचे कारण आहे. पण तिच पाणी वगैरेच कार्य होते. मात्र जी आदिकारण प्रकृती आहे ती अनादी आहे.

**मूले मूलाभावादमूलं मूलम्॥** सांख्य. सू. अ. १। सू. ६७

मुळाचे मूळ म्हणजे कारणाचे कारण नसते. म्हणून अकारण हेच सर्व कार्याचे कारण असते. कारण कोणत्याही कार्याचा आरंभ होण्यापूर्वी तीन्ही कारणांची आवश्यकता असते. ज्याप्रमाणे कापड बनविण्यापूर्वी विणकर रुईपासून सूत व माग वगैरे आधीच विद्यमान असतील तरच वस्त्र बनेल; त्याप्रमाणे जगाची उत्पत्ती होण्यापूर्वी परमेश्वर, प्रकृती, काल व आकाश आणि जीवांचे अनादित्व या गोष्टी असल्या तरच जगाची उत्पत्ती होते. यांपैकी एकही गोष्ट नसेल तर जगसुद्धा होणार नाही.

**अत्र नास्तिका आहु :- शून्यं तत्त्वं भावोऽपि विनश्यति वस्तुधर्मत्वाद्विनाशस्य॥१॥** सांख्य अ. १। सू. ४४

**(प्रश्न)** येथे नास्तिक लोक असे म्हणतात की, 'शून्य हाच एक पदार्थ आहे. सृष्टीच्या पूर्वी शून्य होते आणि अखेरीस शून्यच राहिल. कारण जो भाव म्हणजे वर्तमान पदार्थ आहे त्याचा अभाव होऊन शून्यच होईल.'

**(उत्तर)** आकाश, अदृश्य, अवकाश व बिंदू यांनाही शून्य असे म्हणतात. शून्य हा जड (अचेतन) पदार्थ आहे. या शून्यामध्ये सर्व पदार्थ अदृश्य असतात. ज्याप्रमाणे एका बिंदूपासून रेखा बनते, रेखांमुळे वर्तुळादी आकार बनतात. त्यातून ईश्वराद्वारे भूमी, पर्वत आदी ईश्वरीय रचना बनतात. शून्याला जाणणारा शून्य होत नाही. ॥१॥

**अभावात् भावोत्पत्तिर्नानुपमृद्य प्रादुर्भावात्॥२॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. १४

**(प्रश्न)** दुसरा नास्तिक म्हणतो, 'अभावातून भावाची उत्पत्ति होते. बीजाचे मर्दन केल्याशिवाय अंकुर फुटत नाही. परंतु बीज फोडून पाहिले तर त्यात अंकुराचा अभाव दिसतो. म्हणजे प्रथम अंकुर दिसत नव्हता तो अभावातून उत्पन्न झाला.'

**(उत्तर)** अंकुर फुटण्यापूर्वी जो बीजाचे उपमर्दन करतो तो आधीपासूनच बीजामध्ये होता. तो नसता तर अंकुर कधीच उत्पन्न झाला नसता. ॥२॥

**ईश्वरः कारणं पुरुषकर्माफल्यदर्शनात् ॥३॥** न्याय. अ. ५। आ. १। सू. २१

**(प्रश्न)** तिसरा नास्तिक म्हणतो, 'कर्मांचे फळ पुरुषाने कर्म केल्याने प्राप्त होत नाही. कित्येक कर्मे निष्फळ झालेली आढळतात. यावरून असे अनुमान केले जाते की, कर्मांचे फळ मिळणे हे ईश्वराच्या हाती आहे. ईश्वर ज्या कर्माचे फळ देऊ इच्छित असेल त्याचे फळ देतो. ज्या कर्माचे फळ तो देऊ इच्छित नाही त्याचे फळ तो देत नाही. यावरून कर्मफळ हे ईश्वराधीन आहे.'

**(उत्तर)** कर्माचे फळ देणे हे ईश्वराधीन असेल तर तो कर्माशिवाय फळ का देत नाही ? म्हणून मनुष्य जसे कर्म करतो तसेच फळ ईश्वर त्याला देतो, यावरून ईश्वर आपल्या लहरीप्रमाणे कर्मांचे फळ देऊ शकत नाही परंतु जीव जसे कर्म करतो तसेच फळ ईश्वर त्याला देतो. ॥३॥

**अनिमित्ततो भावोत्पत्तिः कण्टकतैक्ष्ण्यादिदर्शनात् ॥४॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. २२

**(प्रश्न)** चौथा नास्तिक म्हणतो, 'निमित्तावाचून पदार्थांची उत्पत्ती होते. बाभळीसारख्या झाडांना अणकुचीदार काटे असलेले दिसतात.' यावरून असे जाणले जाते की जेव्हा जेव्हा सृष्टिचा आरंभ होतो तेव्हा तेव्हा शरीरादी पदार्थ निमित्तावाचून उत्पन्न होतात.

**(उत्तर)** ज्यापासून जो पदार्थ उत्पन्न होतो तेच त्याचे निमित्त असते. काटेरी झाडांखेरीज इतरांना काटे का फुटत नाहीत ? ॥४॥

**सर्वमनित्यमुत्पत्तिविनाशधर्मकत्वात् ॥५॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. २५

**(प्रश्न)** पाचवा नास्तिक म्हणतो, 'सर्व पदार्थ उत्पत्ति व विनाशी आहेत म्हणून ते सर्व अनित्य आहेत.'

**श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रन्थकोटिभिः ।**
**ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ॥**

हा कोणत्यातरी ग्रंथातील श्लोक आहे. आधुनिक वेदांती लोक हे या पाचव्या नास्तिकाच्या कोटीतील आहेत. कारण ते असे म्हणतात की, 'कोट्यवधी ग्रंथांचा हा सिद्धांत आहे की, ब्रह्म सत्य आहे, जग मिथ्या आहे आणि जीव हा ब्रह्मापासून भिन्न नाही.'

**(उत्तर)** जर सर्वांची नित्यता नित्य आहे तर सर्व अनित्य होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** सर्वांची नित्यताही अनित्यच आहे. उदाहरणार्थ, अग्नी काष्ठांना जाळून टाकतो व स्वतःही नष्ट होऊन जातो.

**(उत्तर)** यथावत उपलब्ध होते त्याचे विद्यमानतेत अनित्यत्व आणि परमसूक्ष्म कारणालाही अनित्य म्हणणे कधीच होऊ शकत नाही.

वेदांती लोक ब्रह्मापासून जगाची उत्पत्ती झाली असे मानतात; आणि ब्रह्म हे सत्य असल्याने त्याचे जगदुत्पत्तीचे कार्य कधीही असत्य होऊ शकत नाही. जे स्वप्न किंवा दोरीमध्ये होणाऱ्या सर्पाच्या भासाप्रमाणे काल्पनिकही म्हटले तरी देखील कारण कल्पना हा गुण आहे. गुणापासून द्रव्य व द्रव्यापासून गुण हे वेगळे राहू

शकत नाहीत. जर कल्पनेचा कर्ता नित्य असेल तर त्याची कल्पनाही नित्यच असली पाहिजे नाहीतर त्याला सुद्धा अनित्य माना.

न पाहिलेल्या व न ऐकलेल्या गोष्टींविषयी कधी स्वप्न पडत नाही. जागृत अवस्थेमध्ये म्हणजे वर्तमान काळात जे सत्य पदार्थ आहेत त्यांच्या साक्षात संबंधाने प्रत्यक्षादी ज्ञान झाल्यावर संस्कार म्हणजे त्यांचे वासनारूप ज्ञान आत्म्यामध्ये स्थित होते त्याचेच प्रत्यक्ष दर्शन स्वप्नामध्ये घडते. ज्याप्रमाणे सुषुप्तीच्या अवस्थेत (गाढ झोपेत) बाह्य पदार्थांच्या ज्ञानाचा अभाव असला तरी बाह्य पदार्थ विद्यमान असतातच, त्याप्रमाणे प्रलयकाळीही कारणद्रव्य विद्यमान असतात. जर संस्काराशिवाय स्वप्न पडत असेल तर जन्मांधालाही रूपाचे स्वप्न पडले असते. (पण तसे घडत नाही.) म्हणून तेथे त्यांचे फक्त ज्ञान असते; आणि बाहेर सर्व पदार्थ विद्यमान असतात.

**(प्रश्न)** ज्याप्रमाणे जागृतीतील पदार्थ स्वप्नामध्ये आणि या दोन्ही स्थितीतील पदार्थ सुषुप्तीमध्ये अनित्य होतात, त्याप्रमाणे जागृतीतील पदार्थांनाही स्वप्नवत मानले पाहिजे.

**(उत्तर)** तसे कधी मानू शकत नाही. कारण स्वप्न व सुषुप्ती यांमध्ये बाह्य-पदार्थांचे अज्ञान मात्र असते, अभाव होत नाही. उदाहरणार्थ एखाद्याच्या पाठीमागे असणारे पुष्कळसे पदार्थ अदृष्ट असतात; पण त्यांचा अभाव नसतो. तीच गोष्ट स्वप्न व सुषुप्ती यांच्यासंबंधी समजावी. म्हणून, पूर्वी आम्ही सांगितल्याप्रमाणे ब्रह्म, जीव व जगाचे कारण असलेली प्रकृती हे तीन पदार्थ अनादी व नित्य आहेत, हेच खरे आहे. ॥५॥

**सर्वं नित्यं पञ्चभूतनित्यत्वात् ॥६॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. २९

**(प्रश्न)** सहावा नास्तिक म्हणतो की, 'पंच महाभूते (पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश) नित्य असल्यामुळे जगही नित्य आहे.'

**(उत्तर)** ही गोष्ट खरी नाही. कारण ज्या पदार्थांच्या उत्पत्तीचे व विनाशाचे कारण दृष्टीस पडते ते सर्व जर नित्य असतील तर सारे स्थूल जग, शरीर आणि घटपटादी जे पदार्थ उत्पन्न व नष्ट होत असलेले दिसतात त्यांनाही नित्य म्हणावे लागेल. म्हणून कार्याला नित्य मानणे शक्य नाही. ॥६॥

**सर्वं पृथग् भावलक्षण पृथक्त्वात् ॥७॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. ३४

**(प्रश्न)** सातवा नास्तिक म्हणतो की, 'सर्व पदार्थ पृथक-पृथक आहेत. कोणताही एक पदार्थ नाही. जो जो पदार्थ आपण पाहतो त्यामध्ये दुसरा कोणताही पदार्थ दिसत नाही.'

**(उत्तर)** अवयवांमध्ये अवयवी, वर्तमान काळ, आकाश, परमात्मा व जाती या गोष्टी वेगवेगळ्या पदार्थांच्या समूहांमध्ये एक-एक आहेत. त्यांच्यापासून कोणताच पदार्थ वेगळा होऊ शकत नाही. यामुळे सारे पदार्थ एकमेकांपासून पृथक नाहीत; परंतु स्वरूपतः वेगवेगळे आहेत; आणि या वेगवेगळ्या पदार्थांमध्ये एक समान पदार्थ किंवा ऐक्यही आहे. ॥७॥

**सर्वमभावो भावेष्वितरेतराभावसिद्धेः ॥८॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. ३७

**(प्रश्न)** आठवा नास्तिक म्हणतो, 'सर्व पदार्थांमध्ये इतरेतर (एकमेकांचा एकमेकांमध्ये) अभाव सिद्ध होत असल्यामुळे सर्वच अभावरूप आहेत. जसे, 'अनश्वो गौः। अगौरश्वः' म्हणजे गाय घोडा नाही व घोडा गाय नाही. म्हणून सर्वांना अभावरूप मानले पाहिजे.

**(उत्तर)** सर्व पदार्थांमध्ये इतरेतर अभावाचा योग असला तरी 'गवि गौरश्वेऽश्वो भावरूपो वर्तत एव' म्हणजे गायीत गायपणा आणि घोड्यात घोडेपणाचा भावही आहे. त्याचा कधीच अभाव होऊ शकत नाही. जर पदार्थांचा भाव नसेल तर इतरेतर अभाव तरी कसा म्हटला जाईल ? ॥८॥

**न स्वभावसिद्धिरापेक्षिकत्वात् ॥९॥** न्याय. अ. ४। आ. १। सू. ३१

**(प्रश्न)** नववा नास्तिक म्हणतो की, 'स्वभावाने जगाची उत्पत्ति होते. पाणी व अन्न एकत्र येऊन कुजू लागले की त्यात किडे उत्पन्न होतात. तर बीज, पृथ्वी (माती) व पाणी यांच्या संयोगाने गवत, झाडे, दगडधोंडे वगैरे उत्पन्न होतात. समुद्रावर वाऱ्यामुळे लाटा उठतात; आणि लाटांमुळे फेस उत्पन्न होतो. हळद, चुना व लिंबाचा रस यांच्या मिश्रणाने कुंकू तयार होते. त्याचप्रमाणे सर्व जगतत्त्वांच्या स्वभावगुणांमुळेच उत्पन्न झाले आहे. त्याला बनविणारा कोणीही नाही.'

**(उत्तर)** जर स्वभावामुळे जगाची उत्पत्ति होत असेल तर त्याचा विनाश कधीच होणार नाही; आणि विनाशही स्वभावानेच मानला तर उत्पत्ति होणार नाही आणि जर उत्पत्ति व विनाश हे दोन्ही स्वभाव सर्व द्रव्यात एकाच वेळी मानाल तर उत्पत्ति व विनाश यांची व्यवस्था कधीही होणार नाही. जर निमित्ताने उत्पत्ति व नाश मानाल तर हे निमित्त उत्पत्ति व विनाश होणाऱ्या द्रव्यांहून वेगळे मानावे लागेल. स्वभावानेच उत्पत्ति व विनाश होत असते तर एकाच वेळी उत्पत्ति व विनाश होणे कसे संभव नाही ? जर स्वभावामुळेच सर्व उत्पन्न का होत असते तर या भूगोलाजवळ दुसरा भूगोल, चंद्र, सूर्य इत्यादी का उत्पन्न होत नाहीत ?

ज्याच्या ज्याच्या संयोगाने जे-जे उत्पन्न होते ते-ते ईश्वराने उत्पन्न केलेले बीज, अन्न, जलादी, पृथ्वी इत्यादींच्या संयोगाने गवत, झाडे, किडे वगैरे उत्पन्न होतात. त्यांच्याशिवाय ही निर्मिती होऊ शकत नाही. हळद, चुना व लिंबाचा रस निरनिराळ्या ठिकाणांहून येऊन आपोआप एकत्र मिसळत नाही. कोणालातरी त्यांचे मिश्रण करावे लागते. ते ही योग्य प्रमाणात मिसळले तरच कुंकू तयार होते. त्यांचे प्रमाण कमी जास्त झाल्यास कुंकू तयार होत नाही. त्याचप्रमाणे प्रकृती व परमाणू यांना ज्ञान व युक्तीने परमेश्वराने त्यांचे मिश्रण केल्याशिवाय जड (अचेतन) पदार्थ स्वत: कोणत्याही कार्यसिद्धीसाठी विशेष पदार्थ बनवू शकत नाहीत. म्हणून स्वभावादिकांनी सृष्टि होत नाही परमेश्वराच्या रचनेने ती निर्माण होते. ॥९॥

**(प्रश्न)** या जगाचा कोणी कर्ता नव्हता, नाही व नसणार. परंतु अनादी काळापासून ते तर जसेच्या तसे राहिले आहे. त्याची कधी उत्पत्ति झाली नाही आणि त्याचा कधी विनाश होणार नाही.

**(उत्तर)** कर्त्यावाचून कोणतीही क्रिया अथवा क्रियाजन्य पदार्थ बनू शकत नाही. पृथ्वी आदी ज्या पदार्थांमध्ये संयोगाने विशेष रचना झालेली दिसते ते पदार्थ अनादी कधी होऊ शकत नाहीत; आणि जे संयोगाने बनते ते संयोगाच्या आधी नसते आणि वियोगानंतर राहत नाही. जर तुम्ही हे मानले नाही तर (प्रत्यक्ष अनुभव घेऊन पाहा.) अत्यंत कठिण पाषाण, हिरा आणि पोलाद यांना तोडून बारीक तुकडे करा, ते वितळवा किंवा त्यांचे भस्म करा. तुम्हाला असे आढळून येईल की या पदार्थात वेगवेगळे बारीक परमाणू एकत्र होऊन ते बनले आहेत. ते जर एकत्र झाले आहेत तर प्रसंग पडल्यास ते वेगवेगळेही अवश्य होतात. ॥१०॥

**(प्रश्न)** अनादी ईश्वर कोणी नाही. परंतु योगाभ्यासाने अणिमादि ऐश्वर्य प्राप्त करून सर्वज्ञत्वादी गुणांनी युक्त केवल ज्ञानी बनतो त्या जीवालाच परमेश्वर असे म्हणतात.

**(उत्तर)** जर अनादी ईश्वर जगाचा स्त्रष्टा (निर्माता) नसेल तर साधनांनी सिद्ध होणाऱ्या जीवांचा आधार, जीवनरूप जग, शरीर आणि इंद्रियांचे गोलक कसे बनले असते ? त्यांच्यावाचून जीव आपले साधन तयार करू शकत नाही. जर ही साधने नसती तर तो कसा सिद्ध झाला असता ?

जीव हवे ते साधन तयार करून सिद्ध झाला तरी ईश्वराची जी स्वयं सनातन अनादी सिद्धी आहे, तिच्यामध्ये अनंत सिद्धींचा समावेश आहे, तिची बरोबरी कोणताही जीव करू शकत नाही. कारण जीवाचे ज्ञान परमावधीपर्यंत वाढले तरी त्याचे ज्ञान व सामर्थ्य मर्यादितच राहते. तो अनंत ज्ञान व सामर्थ्य असणारा कधीच होऊ शकत नाही.

पाहा ! आजपर्यंत ईश्वरकृत सृष्टिक्रम बदलणारा कोणीही झालेला नाही व होणार नाही. अनादी सिद्ध परमेश्वराने डोळ्याने पाहण्याचा व कानांनी ऐकण्याचा जो नियम बनविला आहे तो कोणताही योगी बदलू शकत नाही. जीव हा कधीही ईश्वर होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** कल्पकल्पांतरी ईश्वर विलक्षण विलक्षण सृष्टि बनवितो की एकसारखी?

**(उत्तर)** सृष्टि जशी आज आहे तशीच ती पूर्वीच्या कल्पांत होती व पुढील कल्पांतही ती तशीच राहील. तो तिच्यात फरक करीत नाही.

**सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।**
**दिवंश्च पृथिवींचान्तरिक्षमथो स्वः ॥१॥** ऋ. मं. १०। सू. १९०। मं. ३

(धाता) परमेश्वराने जसे पूर्वीच्या कल्पांत सूर्य, चंद्र, विद्युत, पृथ्वी, अंतरिक्ष इत्यादी बनविले होते तसेच आताही बनविले आहेत आणि पुढेही तसेच बनवील. ॥१॥ परमेश्वराची कामे त्रुटिरहित असल्यामुळे नेहमी एकसारखीच होत असतात. तो अल्पज्ञ असतो आणि ज्याच्या ज्ञानामध्ये वृद्धी व क्षय होत असतात त्याच्याच कामात चूकभूल होते. ईश्वराच्या कामात कधी चूक होत नाही.

**(प्रश्न)** सृष्टिच्या विषयासंबंधी वेदादी शास्त्रांचा परस्पर विरोध आहे की अविरोध ?

**(उत्तर)** अविरोध आहे.

**(प्रश्न)** जर अविरोध आहे तर...

**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधिभ्योऽन्नम् । अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः । स वा एष पुरुषोऽन्नरसमयः ॥** तैत्तिरीय. ब्रह्मा. अनु. १

हे तैत्तिरीय उपनिषदातील वचन आहे. परमेश्वर व प्रकृती यांच्यापासून आकाश किंवा अवकाश हे निर्माण झाले. अर्थात जे कारणरूप द्रव्य सर्वत्र पसरलेले होते ते एकत्र केले असता अवकाश उत्पन्न होतो. वस्तुतः आकाशाची उत्पत्ती होत नसते. कारण आकाशाशिवाय प्रकृती व परमाणू कोठे राहणार ?

आकाशानंतर वायु, वायुनंतर अग्नी, अग्नीनंतर पाणी, पाण्यानंतर पृथ्वी, पृथ्वीपासून ओषधी, औषधींपासून अन्न, अन्नापासून वीर्य, वीर्यापासून पुरुष म्हणजे शरीर उत्पन्न होते. याठिकाणी आकाशादी क्रमाने आणि छांदोग्यामध्ये अग्नी आदी क्रमाने, तर ऐतरेयामध्ये जलादी क्रमाने सृष्टिची उत्पत्ति झाल्याचे

सांगितले आहे. वेदांमध्ये कोठे पुरुषापासून, कोठे हिरण्यगर्भादींपासून, मीमांसेमध्ये कर्मापासून, वैशेषिकामध्ये काळापासून, न्यायामध्ये परमाणूंपासून, योगामध्ये पुरुषार्थापासून, सांख्यामध्ये प्रकृतीपासून आणि वेदांतामध्ये ब्रह्मापासून सृष्टिची उत्पत्ति झाली, असे मानले आहे. आता यापैकी कोणाला खरे व कोणाला खोटे मानावे ?

**(उत्तर)** यामध्ये सर्वच खरे आहेत. कोणी खोटा नाही. जो यात विरोध विपरीत समजतो तोच खोटा आहे. कारण परमेश्वर हा जगाचे निमित्त कारण असून प्रकृती ही जगाची उपादान कारण आहे. जेव्हा महाप्रलय होतो तेव्हा ती सृष्टि आकाशादी क्रमाने म्हणजे जेव्हा आकाश व वायू यांचा प्रलय होत नाही व अग्न्यादिकांचा होतो तेव्हा अग्नी आदी क्रमाने आणि विद्युत व अग्नी यांचाही नाश होत नाही तेव्हा जलाच्या क्रमाने सृष्टिची उत्पत्ति होते. अर्थात, ज्या-ज्या प्रलयामध्ये जेथपर्यंत प्रलय होतो तेथून पुढे सृष्टिची उत्पत्ति होते.

आता पुरुष आणि हिरण्यगर्भ इत्यादिकांपासून सृष्टी झाली असे आम्ही प्रथम समुल्लासात सांगितले आहे. त्यात काहीच विसंगती नाही. कारण ती सारी परमेश्वराचीच नावे आहेत. (सहा शास्त्रांमध्ये विरोध आहे असे तुम्ही म्हणता ते बरोबर नाही.) कारण एकाच कार्यात एकाच विषयासंबंधी परस्परविरोधी विधाने असतील तर त्याला विरोध असे म्हणतात. सहा शास्त्रांमध्ये अविरोध या प्रकारे आहे पहा :-

मीमांसेमध्ये असे सांगितले आहे की, 'कर्म, चेष्टा केल्याशिवाय जगात कोणतेही कार्य होत नाही.' वैशेषिक सांगतो, 'वेळ खर्च केल्यावाचून काही घडतच नाही.' न्याय म्हणतो, 'उपादान कारण नसेल तर काहीही होऊ शकत नाही.' योग सांगतो, 'विद्या, ज्ञान व विचार न केल्यास काहीच घडू शकत नाही.' सांख्य सांगतो की, 'तत्त्वांचा मेळ झाला नाही तर काही बनू शकत नाही,' आणि वेदांतात असे सांगितले आहे की, 'बनविणाऱ्याने बनविला नाही तर कोणताही पदार्थ बनू शकत नाही.' अशा प्रकारे या सहा कारणांनी सृष्टि बनते. त्यांच्यापैकी एकेका कारणाची व्याख्या एकेका शास्त्रात केली आहे. त्यामुळे त्यांच्यात विरोध मुळीच नाही.

सहा पुरुषांनी मिळून एक छप्पर उचलून भिंतीवर ठेवावे त्याप्रमाणे सृष्टिरूप कार्याची व्याख्या सहा शास्त्रकारांनी मिळून पूर्ण केली आहे. पाच आंधळे आणि एक मंददृष्टीवाला यांना कोणीतरी हत्तीचा एकेक भाग दाखविला आणि त्यांना विचारले की हत्ती कसा आहे. तेव्हा त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, 'खांबासारखा', दुसरा म्हणाला, 'सुपासारखा', तिसरा म्हणाला, 'मुसळासारखा,' चौथा म्हणला, 'केरसुणी सारखा' पाचव्याने सांगितले, 'चबुतऱ्यासारखा' आणि सहावा म्हणाला, तो काळा-काळा, चार खांबावर काहीसा, रेड्याच्या आकाराचा आहे.

या आंधळ्यांसारखी आजकाल स्थिती आहे. ते नवीन अनार्ष ग्रंथ वाचतात, प्राकृत भाषेमध्ये शिक्षण घेणारे हे लोक ऋषिप्रणीत ग्रंथांचे अध्ययन करीत नाहीत, नवीन क्षुद्रबुद्धिकल्पित संस्कृतचे व इतर भाषांचे ग्रंथ वाचून ते एकमेकांची निंदानालस्ती करीत असतात. त्यांनीच हा निराधार वितंडवाद माजविला आहे. त्यांचे म्हणणे बुद्धिमंतांनी किंवा इतरांनी मानण्याच्या योग्यतेचे नाही. कारण आंधळ्यांच्या मागून आंधळे चालत राहिले तर त्यांना दुःख होणारच. त्याचप्रमाणे आजकालच्या अल्पविद्यायुक्त, स्वार्थी, इंद्रियासक्त पुरुषांची लीला जगाचा नाश करणारी आहे.

**(प्रश्न)** कारणावाचून कार्य होत नाही तर त्या कारणाचे कारण का नाही ?

**(उत्तर)** अरे भोळ्या माणसांनो ! तुम्ही आपल्या बुद्धीचा थोडा वापर का करीत नाही ? पाहा. या विश्वामध्ये दोनच पदार्थ आहेत. एक कारण व दुसरे कार्य. जे कारण असते ते कार्य नसते; आणि ज्यावेळी जे कार्य असते ते त्याच वेळी कारण नसते. जोपर्यंत मनुष्य सृष्टीला यथावत जाणत नाही तोपर्यंत त्याला यथावत् ज्ञान प्राप्त होत नाही.

**नित्यायाः सत्वरजस्तमसां साम्यावस्थायाः प्रकृतेरुत्पन्नानां परमसूक्ष्माणां पृथक् पृथग्वर्त्तमानानां तत्त्व परमाणूनां प्रथमः संयोगारम्भः संयोगविशेषादवस्थान्तरस्य स्थूलाकारप्राप्तिः सृष्टिरुच्यते ।**

अनादी नित्यस्वरूप सत्त्व, रज, तम या तीन गुणांच्या एकावस्थास्वरूप प्रकृतीपासून उत्पन्न झालेले जे परमसूक्ष्म पृथक-पृथक तत्त्वावयव विद्यमान आहेत, त्यांचा प्रथमच जो संयोगारंभ आहे, त्या संयोगविशेषाच्या योगाने अवस्थांतर होत-होत दुसऱ्या अवस्थेत सूक्ष्मातून स्थूल-स्थूल बनत-बनवीत ही सृष्टि विचित्र रूप बनली आहे. यापासूनच हा मेळ झाल्यामुळेच तिला सृष्टि असे म्हणतात. जो प्रथम संयोगामध्ये मिसळणारा व मिसळविणारा पदार्थ आहे, जो संयोगाचा आदी आणि वियोगाचा अंत म्हणजे ज्याचे विभाजन होऊ शकत नाही त्याला कारण असे म्हणतात. जे संयोगानंतर बनते आणि वियोगानंतर तसेच राहत नाही त्याला कार्य म्हणतात. त्या कारणाचे कारण, कर्त्याचा कर्ता, साधनाचे साधन व साध्याचे साध्य म्हटल्या जाते हा वितंडवाद जो घालतो तो पाहत असून आंधळा, ऐकत असून बहिरा आणि जाणत असून मूढ आहे, डोळ्याचा डोळा, दिव्याचा दिवा आणि सूर्याचा सूर्य कधी असू शकतो काय ? जे ज्याच्यापासून उत्पन्न होते ते कारण आणि जे उत्पन्न होते ते कार्य होय आणि कारणाला कार्यरूप बनविणारा आहे तो कर्ता म्हणविला जातो.

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्त स्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥** भगवद्गीता। अ. श्लो. २। १६

कधी असताच भाव (जे कारणरूपात नाही ते कार्यरूपात येणे) म्हणजे वर्तमानता आणि सताचा अभाव (जे कार्यरूपात आहे ते कारणरूपात नसणे) म्हणजे अवर्तमानता होत नाही. या दोहोचा निर्णय तत्त्वदर्शी लोकांनी जाणला आहे. ही गोष्ट इतर पक्षपाती, आग्रही, मलिनात्मा, अविद्वान लोकांना सहजासहजी कशी कळणार ? कारण जो माणूस विद्वान नाही, सत्संग करीत नाही व पूर्ण विचार करीत नाही तो सदैव भ्रमामध्येच अडकलेला राहतो. जे पुरुष सर्व विद्यांचे सिद्धांत जाणतात व जाणण्यासाठी तप करतात आणि इतरांना स्वच्छ मनाने समजावून देतात ते धन्य होत. म्हणून जे कोणी कारणावाचून सृष्टि उत्पन्न झाली असे मानतात त्यांना काहीच कळत नाही.

जेव्हा सृष्टिच्या उत्पत्तिची वेळ येते तेव्हा परमेश्वर त्या परमसूक्ष्म पदार्थांना एकत्र करतो. त्या प्रथम अवस्थेत जे परमसूक्ष्म प्रकृतिरूप कारणाने काहीसे स्थूल बनते त्याचे नाव महत्तत्व आहे. त्यानंतर त्यापेक्षा आणखी थोडे स्थूल होते. त्याचे नाव अहंकार. या अहंकारापासून भिन्न-भिन्न पाच सूक्ष्म भूते, श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, घ्राण ही पाच ज्ञानेंद्रिये, वाक्, हस्त, पाद, उपस्थ व गुदा ही पाच कर्मेंद्रिये आणि अकरावे मन ही

काहीशी स्थूल अशी उत्पन्न होतात. नंतर त्या पंचतन्मात्रांपासून अनेक स्थूल अवस्थांना प्राप्त होत होत क्रमाने पाच स्थूल भूते (पंच महाभूते) उत्पन्न होतात. ती आपल्याला प्रत्यक्ष दिसतात. त्यांच्यापासून नाना प्रकारच्या औषधी, वृक्ष आदी निर्माण होतात. त्यांच्यापासून अन्न, अन्नापासून वीर्य व वीर्यापासून शरीर उत्पन्न होते. परंतु आदी सृष्टि ही मैथुनातून निर्माण झालेली नसते. कारण जेव्हा परमेश्वर स्त्रीपुरुषांची शरीरे उत्पन्न करून त्यांमध्ये जीवांचा संयोग घडवून आणतो तेव्हापासून मैथुनी सृष्टि चालू होते.

पाहा! या शरीरामध्ये कशाप्रकारे ज्ञानपूर्वकसृष्टि रचना केली आहे की, जी पाहून विद्वान लोक आश्चर्यचकित होतात. शरीरात हाडांचे सांधे, नाड्यांची (शिरांची) बांधणी, त्यावर मांसाचे लेपन, चामडीचे झाकण, प्लीहा, यकृत्, फुफ्फुसे, पंख्याची कलापूर्ण योजना, रक्ताचे शुद्धीकरण व प्रचालन, विद्युत (ऊर्जा) निर्मिती, जीवाचे संयोजन, डोक्यातील मेंदूची अद्‌भुत रचना, अंगावरील केस व नखे यांची उत्पत्ति, डोळ्यातील अत्यंत सूक्ष्म रक्तवाहिन्यांची तारांसारखी केलेली गुंफण, इंद्रियांच्या मार्गाचे प्रकाशन, जीवाच्या जागृत, स्वप्न व सुषुप्ती या अवस्था आणि त्यांच्या भोगण्यासाठी विशिष्ट स्थानांची निर्मिती, सर्व धातूंचे वर्गीकरण, कला कौशल्याची स्थापना इत्यादीं अद्‌भुत सृष्टिला परमेश्वराखेरीज कोण बनवू शकतो?

याशिवाय नाना प्रकारची रत्ने व धातू यांनी विभूषित भूमी, विविध प्रकारच्या वटवृक्षादिकांच्या बीजामधील अत्यंत सूक्ष्म रचना, असंख्य हरित, श्वेत, पीत, कृष्ण, चित्र मध्यरूप युक्त चित्रविचित्र पाने, पुष्पे, फळे, मुळे यांची निर्मिती; गोड, खारट, तिखट, कडू, आंबट, तुरट वगैरे विविध रस; सुगंधी पाने फुले, फळे, अन्न, कंदमुळे इत्यादींची रचना, अनेकानेक कोट्यवधी भूगोल, सूर्य, चंद्र इत्यादी लोकांचे निर्माण, धारण भ्रमण, त्यांना नियमात ठेवणे या साऱ्या गोष्टी परमेश्वराखेरीज कोणीही करू शकत नाही.

जेव्हा कोणी एखादा पदार्थ पाहतो तेव्हा त्याला दोन प्रकारचे ज्ञान उत्पन्न होते. एक तो पदार्थ जसा आहे तसे त्याचे ज्ञान होणे आणि दुसरा प्रकार म्हणजे तो पदार्थातील रचना पाहून तो निर्माण करणाऱ्याचे ज्ञान होणे. उदाहरणार्थ, एखाद्या माणसाला जंगलात पडलेला एक सुंदर दागिना सापडला. त्याच्याकडे पाहिल्यानंतर तो सोन्याचा आहे आणि तो कोणीतरी कुशल कारागिराने बनविला आहे, याचप्रमाणे या नाना प्रकारच्या सृष्टिमध्ये असणारी विविध प्रकारची रचना पाहिल्यानंतर ती निर्माण करणाऱ्या परमेश्वराला सिद्ध करते.

**(प्रश्न)** मनुष्य सृष्टि प्रथम झाली की पृथ्वी आदिची?

**(उत्तर)** आधी पृथ्वी आदी निर्माण झाली. कारण पृथ्वी आदिकाशिवाय मनुष्याची स्थिती व पालन होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** सृष्टिच्या प्रारंभी एकच मनुष्य किंवा अनेक माणसे उत्पन्न केली होती किंवा काय/कसे?

**(उत्तर)** अनेक माणसे उत्पन्न केली होती. कारण ज्या जीवांची कर्मे ईश्वरी सृष्टीमध्ये उत्पन्न होण्यासारखी होती त्यांनाच ईश्वर सृष्टिच्या आरंभी जन्माला घालतो. **'मनुष्या ऋषयश्च ये। ततो मनुष्या अजायन्त'॥** (शत. १४।४।२।५) असे यजुर्वेदात म्हटले आहे. या प्रमाणावरून सृष्टिच्या प्रारंभी अनेक म्हणजे शेकडो-हजारो माणसे उत्पन्न झाली होती हे निश्चित होते. तसेच सृष्टि रचनेकडे पाहिल्यानंतरही निश्चित होते की माणसे ही अनेक आईबापांची संतति आहेत.

**(प्रश्न)** आदी सृष्टिमध्ये मनुष्यादिकांची जी उत्पत्ति झाली ती बाल्य, युवा (तरुण) व वृद्ध यांपैकी कोणत्या अवस्थेत झाली ? की तीन्ही अवस्थांमध्ये ?

**(उत्तर)** युवावस्थेमध्ये. परमेश्वराने प्रथम बालके निर्माण केली असती तर त्यांचे पालन करण्यासाठी इतर माणसांची गरज भासली असती; आणि त्याने वृद्धावस्थेतील माणसांची निर्मिती प्रथम केली असती तर मैथुनी सृष्टि झाली नसती म्हणून त्याने युवावस्थेमध्ये सृष्टि केली आहे.

**(प्रश्न)** सृष्टिचा प्रारंभ केव्हा तरी झाला आहे की नाही ?

**(उत्तर)** नाही. ज्याप्रमाणे दिवसापूर्वी रात्र आणि रात्रीपूर्वी दिवस, तसेच दिवसांनतर रात्र व रात्री नंतर दिवस हे चक्र चालू असते. त्याचप्रमाणे सृष्टीपूर्वी प्रलय आणि प्रलयापूर्वी सृष्टि, तसेच सृष्टिनंतर प्रलय व प्रलयानंतर सृष्टी हे चक्र अनादी काळा पासून चालत आले आहे. त्याला आदी किंवा अंत नाही. परंतु जसा दिवसाचा किंवा रात्रीचा आरंभ व अंत पाहायला मिळतो तसाच सृष्टि आणि प्रलय यांचा आदी व अंत होत राहतो. कारण जसे परमेश्वर, जीव, जगाचे कारण हे तीन पदार्थ स्वरूपत: अनादी आहेत, तसे जगाची उत्पत्ति, स्थिती व लय हेही प्रवाह रूपाने अनादी आहेत. नदीचा प्रवाह डोळ्यांना दिसतो, कधी तो सुकून जातो, कधी दिसतच नाही. तो पावसाळ्यात पुन: दिसू लागतो व उन्हाळ्यात दिसेनासा होतो. अशा या व्यवहाराला प्रवाहरूप समजावे. जसे परमेश्वराचे गुण, कर्म, स्वभाव अनादी आहेत, तसेच त्यांच्या जगाची उत्पत्ति, स्थिती व लय घडून येणे हेही अनादी आहे. ज्याप्रमाणे ईश्वराचे गुण, कर्म व स्वभाव यांचा आरंभ व अंत नाही त्याचप्रमाणे त्याच्या कर्तव्यकर्माचाही प्रारंभ आणि अंत नाही.

**(प्रश्न)** ईश्वराने काही जीवांना माणसाचा जन्म, काहींना वाघसिंहासारखा हिंस्र प्राण्यांचा, काहींना हरिण, गाय यांसारख्या पशूंचा, काहींना वृक्षादी, काहींना कृमी, कीटपतंगादी यांचा जन्म दिला आहे. यावरून परमेश्वर हा पक्षपाती असल्याचे दिसून येते.

**(उत्तर)** ईश्वर पक्षपाती नाही. कारण त्या जीवांना आधीच्या सृष्टिमध्ये केलेल्या कर्मांनुसार व्यवस्था केल्याने ते जन्म दिले गेले. कर्मावाचून जन्म दिले गेले असते तर पक्षपात झाला असता.

## मानव उत्पत्ति स्थान

**(प्रश्न)** मनुष्याची पूर्व सृष्टि कोणत्या ठिकाणी झाली ?

**(उत्तर)** आजकाल ज्याला तिबेट (तिब्बत) असे म्हणतात त्या त्रिविष्टप देशात झाली.

**(प्रश्न)** आदी सृष्टिच्या वेळी माणसाची एकच जात होती की अनेक ?

**(उत्तर)** एकच मानव जात होती. त्यानंतर **'विर्जानी॒ह्यार्या॒न्ये च॒ दस्य॑वः ।'** (ऋ. मं. १। सू. ५१। मं. ८।) या ऋग्वेदवचनात सांगितल्याप्रमाणे श्रेष्ठांचे नाव आर्य, विद्वान, देव असे पडले आणि जे मूर्ख, चोर, डाकू होते त्यांना दस्यु असे म्हणू लागले. अशा प्रकारे आर्य व दस्यु ही दोन नावे प्रचारात आली. **'उ॒त शू॒द्रे उ॒तार्ये'** या ऋग्वेदातील वचनात सांगितल्याप्रमाणे आर्यांमध्ये ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र असे (गुणकर्मस्वभावानुसार) चार भेद झाले. द्विज विद्वानांचे नाव आर्य आणि मूर्खांचे नाव शुद्र अनार्य म्हणजे अडाणी झाले.

**(प्रश्न)** मग ते येथे कसे आले ?

**(उत्तर)** जेव्हा आर्य व दस्यु म्हणजे देव (विद्वान) व असुर (अविद्वान) यांच्यामध्ये वारंवार झगडे होऊ लागले, खूपच उपद्रव होऊ लागला तेव्हा आर्य लोक सर्व पृथ्वीतलावर ही भूमी उत्तम आहे हे ओळखून येथे येऊन वसले. त्यामुळे या देशाचे आर्यावर्त्त असे नाव पडले.

**(प्रश्न)** आर्यावर्त्ताच्या सीमा कोठपर्यंत आहेत ?

**(उत्तर) आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात्।**
**तयोरेवान्तरं गिर्योरार्य्यावर्त्तं विदुर्बुधाः ॥**
**सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम्।**
**तं देवनिर्मितं देशमार्यावर्त्तं प्रचक्ष ते ॥** मनु. अ. २। श्लो. २२,१७

उत्तरेला हिमालय, दक्षिणेला विंध्याचल, पूर्वेला आणि पश्चिमेला समुद्र ॥१॥ तसेच पश्चिमेला सरस्वती (अटक) नदी व पूर्वेला दृषद्वती नदी. ही दृषद्वती नेपाळच्या पूर्व भागातील डोंगरांमधून उगम पावून बंगाल व आसामच्या पूर्व बाजूने व ब्रह्मदेशाच्या पश्चिमबाजूने वाहत जाऊन दक्षिणेस समुद्राला मिळाली आहे. तिला ब्रह्मपुत्रा असे म्हणतात. जी उत्तरेकडील पर्वतांमध्ये उगम पावून दक्षिणेतील सागराच्या खाडीला जाऊन मिळते ती अटक नदी होय. हिमालयाच्या असणारी दक्षिणमध्य रेषेपासून बाजूच्या पर्वतापासून रामेश्वरापर्यंत जाते. तिच्या कक्षेत जेवढा प्रदेश येतो त्याला आर्यावर्त्त असे म्हणतात. कारण हा प्रदेश देवांनी म्हणजे विद्वानांनी वसविला आहे; आणि हेच आर्यांनी निवास केल्यामुळे त्याला आर्यावर्त्त असे म्हटले आहे.

## आर्य म्लेंच्छ शब्दांची व्याख्या

**(प्रश्न)** प्रथम या देशाचे नाव काय होते आणि येथे कोण राहत होते ?

**(उत्तर)** आर्यांच्या पूर्वी येथे कोणी राहत नव्हते. त्यामुळे या देशाला कोणतेही नाव नव्हते. कारण की आर्य लोक मनुष्य सृष्टिनंतर सृष्टिच्या उत्पत्तिनंतर काही काळाने तिबेटमधून थेट याच देशात येऊन वसले.

**(प्रश्न)** कोणी म्हणतात की हे लोक इराणातून आले म्हणूनच त्यांचे नाव आर्य असे झाले. ते तेथे येण्यापूर्वी येथे जंगली लोक राहत असत. त्यांना असुर व राक्षस असे म्हणत होते. आर्य लोक स्वतःला देव म्हणवीत होते व त्यांचा जेव्हा संघर्ष झाला तेव्हा त्याला देवासुरसंग्राम कथामध्ये सांगितले आहे.

**(उत्तर)** हे सर्वथा साफ खोटे आहे कारण,

**विजानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रन्धया शासदव्रतान् ॥** ऋ.मं.१। सू.५१। मं.८

**उत शूद्रे उतार्ये ॥** अथर्व. कां. १९। सू. ६२ मं. १ हे ही वेदांचे प्रमाण आहे.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे जे लोक धार्मिक, विद्वान व आप्त पुरुष होते त्यांचे नाव आर्य होते. तर या विपरीत लोकांचे नाव दस्यु अर्थात चोर, दुष्ट, अविद्वान व अधार्मिक आहेत. तसेच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या द्विजांचे नाव आर्य आणि शूद्रांचे नाव अनार्य अर्थात अडाणी आहे.

जेथे वेदामध्ये असे सांगितले आहे तर इतर विदेशी लोकांच्या कपोलकल्पित गोष्टींना बुद्धिमान लोक कधीच मानू शकत नाहीत. देवासुर संग्रामामध्ये अर्जुन व महाराजा दशरथ आणि आर्यावर्त्तातील इतर लोक

असुरांचा संहार करण्याच्या कामी आर्यांना मदत करण्यास जात असत. हिमालय पर्वतावर आर्य आणि दस्यु व म्लेंच्छ असुरांचे जे युद्ध झाले होते, त्यामध्ये देवांचे म्हणजे आर्यांचे रक्षण व असुरांचा पराभव करण्याच्या कामी त्यांची मदत झाली होती. यावरून हेच सिद्ध होते की, आर्यावर्त्ताच्या बाहेर चोहोंबाजूला हिमालयाच्या पूर्व, आग्नेय, दक्षिण, नैऋत्य, पश्चिम, वायव्य, उत्तर, ईशान्य देशांमध्ये जे लोक राहत असत, त्यांचेच नाव असुर असे सिद्ध होते. कारण जेव्हा हे असुर हिमालयातील प्रदेशांमध्ये राहणाऱ्या आर्यांवर स्वारी करत तेव्हा आर्यावर्त्तातील राजे-महाराजे त्या उत्तरादी देशात आर्यांच्या मदतीला जात. दक्षिणेकडे श्रीरामचंद्रांचे जे युद्ध झाले त्याचे नाव देवासुरसंग्राम नाही. त्याला राम-रावण युद्ध किंवा आर्य-राक्षस युद्ध असे म्हणतात.

आर्य लोक इराणातून आले आणि येथील जंगली लोकांशी लढून विजयी होऊन त्यांना या देशातून हाकलून देऊन या देशाचे राजे बनले, असे कोणत्याही संस्कृत ग्रंथात किंवा इतिहासात लिहिलेले नाही. अशा पुनश्च स्थितीत विदेशी लोकांचे लिखाण मान्य कसे होऊ शकते ? शिवाय,

**आर्यवाचो म्लेच्छवाचश्चार्यवाचः सर्वे ते दस्यवः स्मृताः ॥१॥** मनु. अ. १०।श्लो.४५

**म्लेच्छदेशस्त्वतः परः ॥२॥** मनु. अ. २। श्लो. २३

आर्यावर्त्ताहून वेगळे असे जे देश आहेत, त्यांना दस्युदेश व म्लेच्छदेश म्हटले जाते. यावरूनही हेच सिद्ध होते की, आर्यावर्त्ताच्या बाहेर पूर्वेकडील देशापासून इराणपर्यंत, उत्तर, वायव्य आणि पश्चिम या देशांत राहणाऱ्यांचे नाव दस्यु , म्लेच्छ व असुर आहे आणि नैऋत्य, दक्षिण व आग्नेय दिशांतील आर्यावर्त्ताच्या बाहेरील देशांमध्ये राहणाऱ्या माणसांचे नाव राक्षस आहे.

आजही पाहा. हबशी लोकांचे स्वरूप भयंकर राक्षसांच्या वर्णनासारखे दिसून येते आणि आर्यावर्त्ताच्या थेट खालच्या बाजूस राहणाऱ्या लोकांचे नाव नाग आणि त्यांच्या देशाला पाताळ यासाठी की आर्यावर्त्तीय लोकांच्या पादतली (पायतळी) जो देश आहे. तेथे नाग नावाच्या पुरुषाच्या वंशातील राजे राज्य करीत असत. त्यांना नागवंशी म्हणत अर्थात त्यांच्यापैकी एका राजाच्या उलूपी नामक राजकन्येचा अर्जुनाशी विवाह झाला होता. अर्थात इक्ष्वाकू राजापासून कौरव-पांडवांपर्यंत साऱ्या पृथ्वीवर आर्यांचे राज्य होते आणि वेदांचा थोडा थोडा प्रचार प्रसार आर्यावर्त्ताबाहेरील देशांमध्येही होता.

याला पुरावा असा की, ब्रह्माचा पुत्र विराट, विराटाचा मनू आणि मनूचे मरीची आदी दहा पुत्र आणि त्यांच्यापासून स्वायंभुवादी सात राजे व त्यांची संतति इक्ष्वाकू आदी राजा जो आर्यावर्त्ताचा पहिला राजा होय. त्यानेच आर्यावर्त्त वसविला आहे.

आता दुर्दैवाने आर्यांमधील आळस, प्रमाद व आपसातील यादवी यामुळे इतर देशांवर राज्य करण्याची गोष्ट तर दूरच राहिली; पण खुद्द आर्यावर्त्तातही आर्यांचे अखंड, स्वतंत्र, स्वाधीन, निर्भय राज्य यावेळी राहिले नाही. जे काही उरले आहे तेही विदेशी लोकांकडून पादाक्रांत केले जात आहे. काही थोडे राजे स्वतंत्र आहेत. जेव्हा वाईट दिवस येतात तेव्हा देशवासियांना अनेक प्रकारची दुःखे भोगावी लागतात. **कोणी कितीही म्हटले तरी जे स्वदेशी राज्य असते ते सर्वोपरि उत्तम असते. मतमतांतराच्या दूराग्रहापासून अलिप्त, आपले व परके यांच्या बाबतीत पक्षपात न करणारे, प्रजेवर मातापित्यांप्रमाणे कृपा, न्याय व दया करणारे देखील**

**परकीय लोकांचे राज्यसुद्धा पूर्णपणे सुखदायक होत नाही.** परंतु वेगवेगळ्या भाषा, भिन्न प्रकारचे शिक्षण आणि भिन्न व्यवहार यांच्यामुळे निर्माण होणारा विरोध नाहीसा होणे अत्यंत कठिण आहे. तो नाहीसा झाल्याखेरीज परस्परांचा पूर्ण उपकार आणि हित साधणे कठिण आहे म्हणून वेदादी शास्त्रांमध्ये जी काही व्यवस्था किंवा इतिहास लिहिला आहे तो मान्य करणे हे सज्जनांचे काम आहे.

**(प्रश्न)** जगाची उत्पत्ती होऊन किती वर्षे झाली ?

**(उत्तर)** एक अब्ज, सत्याण्णव कोटी, काही लाख व अनेक हजार वर्षे जगाची उत्पत्ति व वेदांचा प्रकाश होण्यात झाली आहेत याचे सविस्तर विवेचन **'ऋग्वेदादिभाष्यभूमिका'** या माझ्या ग्रंथांत लिहिले आहे ते पाहावे. इत्यादी प्रकार सृष्टि उत्पत्तित व बनण्यात झाली आहेत शिवाय असे आहे की ही सृष्टी परमाणूंपासून बनली आहे. ज्याचे विभाजन होऊ शकत नाही ते परमाणू आहे. साठ परमाणूंचा एक अणू बनतो. दोन अणूंचा एक द्व्यणुक बनतो. जो स्थूलवायू आहे. तीन द्व्यणुकांचा त्रसरेणू बनतो. यालाच अग्नी म्हणतात. चार द्व्यणुकाचे जल, पाच द्व्यणुकाची पृथ्वी बनते म्हणजे तीन द्व्यणुकांचा त्रसरेणू व त्याची दुप्पट झाल्याने पृथ्वी आदी दृश्य पदार्थ होत आहेत. अशा प्रकारे मिश्रण करून परमेश्वराने हे भूगोल आदी बनविले आहेत.

## जगाचा धारणकर्ता ईश्वर

**(प्रश्न)** या भूगोलाचे धारण कोण करतो ? कोणी म्हणतो की शेषाच्या म्हणजे सहस्रफणा असलेल्या नागाच्या मस्तकावर पृथ्वी आहे. दुसरा कोणी म्हणतो की ती बैलाच्या शिंगांवर आहे. तिसरा म्हणतो की ती कशाहीवर नाही. चौथा म्हणतो की तिला वायूचा आधार आहे. पाचवा म्हणतो की सूर्याच्या आकर्षणाने खेचली गेल्यामुळे ती आपल्या जागी वसलेली आहे. सहावा म्हणतो की पृथ्वी वजनदार भारी असल्यामुळे ती खाली-खाली अवकाशात चालली आहे. यांपैकी कोणाचे म्हणणे खरे मानावे?

**(उत्तर)** जे लोक असे म्हणतात की सापाच्या डोक्यावर आणि बैलाच्या शिंगांवर पृथ्वी आधारलेली आहे, त्यांना असे विचारले पाहिजे की साप आणि बैल यांच्या आईबापांच्या जन्माच्या वेळी ती कशावर टिकून होती ? आणि साप व बैल कोणाच्या आधाराने राहिले आहेत ? बैलाच्या शिंगांवर पृथ्वी आधारलेली आहे असे म्हणणारे मुसलमान हा प्रश्न ऐकून निरुत्तर मात्र होतील. परंतु सर्पवाले म्हणतील की सर्प कूर्मावर, कूर्म जलावर, जल अग्नीवर, अग्नी वायूवर आणि वायू अवकाशात स्थिर आहे. त्यांना असे विचारले पाहिजे की हे सारे कशावर टिकून आहे ? तर ते अवश्य सांगतील की ते परमेश्वरावर आधारलेले आहेत. त्यांना जर विचारले की शेष आणि बैल ही कुणाची मुले आहेत ? तर ते सांगतील की कश्यप हा कद्रूचा व बैल हा गायीचा मुलगा आहे. मरीचीचा पुत्र कश्यप, मनूचा पुत्र मरीची, विराटाचा मनू व ब्रह्म्याचा विराट आणि ब्रह्मा आदी सृष्टिचा होता अशी वंशपरंपरा आहे. म्हणजे असे की शेषाचा जन्म होईपर्यंत पाच पिढ्या होऊन गेल्या होत्या. तेव्हा पृथ्वी कोणी धारण केली होती ? हा प्रश्न म्हणजे कश्यपाचे जन्माचे वेळी पृथ्वी कशावर होती ? विचारल्यावर 'तेरी भी चुप मेरी भी चुप' होऊन ते भांडू लागतील.

याचा खरा अभिप्राय हा आहे की जे बाकी उरते त्याला शेष असे म्हणतात. म्हणून कोणातरी कवीने

**'शेषाधारा पृथिवीत्युक्तम्'** असे म्हटले की शेषाचा आधार पृथ्वी आहे त्याचा अर्थ न समजता सर्पाची मिथ्या कल्पना केली. वस्तुतः परमेश्वर हा उत्पत्ति व प्रलय यांतून बाकी म्हणजे वेगळा राहतो. म्हणूनच त्याला **'शेष'** असे म्हणतात. त्याचाच आधार पृथ्वी आहे.

**सत्येनोत्तभिता भूमिः ॥** ऋ. मं. १०।सू. ८५।मं. १

(सत्य) तो त्रिकालाबाधित आहे, ज्याचा कधी नाश होत नाही, त्या परमेश्वराने भूमी, आदित्य आणि सर्व लोकांचे धारण केले आहे.

**उक्षा दाधार पृथिवीमुत द्याम् ॥** ऋ. मं. १०।सू. ३१।मं. ८, अथर्व. कां. ४।सू. ११।मं. १

(उक्षा) हा उक्षा शब्द पाहून बैलाची कल्पना कोणी तरी केली असावी. कारण उक्षा हे बैलाचेही नाव आहे. परंतु त्या मूढाला हे समजले नाही की एवढ्या प्रचंड पृथ्वीला उचलून धरण्याचे सामर्थ्य बैलामध्ये कसे असणार ? कोठून येणार ? उक्षा=वर्षा द्वारा भूगोलावर जलसिंचन करणाऱ्या सूर्याचे नाव आहे. त्याने आपल्या आकर्षणाने पृथ्वीला धारण केले आहे परंतु सूर्य वगैरेना धारण करणारा परमेश्वराखेरीज दुसरा कोणीही नाही.

**(प्रश्न)** एवढ्या मोठ्या भूगोलांना परमेश्वर कसा धारण करू शकत असेल ?

**(उत्तर)** ज्याप्रमाणे अनंत आकाशापुढे मोठेमोठे भूगोल काहीच नाहीत किंवा समुद्रापुढे पाण्याच्या एका कणासारखा म्हणजे काहीच नाही. त्याप्रमाणे त्या अनंत परमेश्वरासमोर हे असंख्य लोक (गोल) एका परमाणू सारखे सुद्धा म्हटले जाऊ शकत नाहीत. तो आत व बाहेर सर्वत्र व्यापक आहे. **'विभुः प्रजासु'** हे यजुर्वेदात वर्णन आहे. म्हणजे तो परमेश्वर प्रजामध्ये व्यापक होऊन सर्वांचे धारण करीत आहे. जर तो ख्रिस्ती, मुसलमान व पौराणिक लोकांच्या म्हणण्याप्रमाणे विभू म्हणजे सर्वव्यापक नसता तर तो या सृष्टिला कधीही धारण करू शकला नसता. कारण मिळाल्याशिवाय कुणी कुणाला धारण करू शकत नाही.

यावर कोणी म्हणेल की हे सारे लोक परस्पर आकर्षणाने धारित स्थित असतील मग पुन्हा त्यांना परमेश्वराने धारण करण्याची काय अपेक्षा आहे ? याचे उत्तर असे दिले की ही सृष्टि अनंत आहे की सांत ? जर ती अनंत आहे असे म्हणत असाल तर साकार वस्तू अनन्त असू शकत नाही आणि जर ती सांत आहे असे तुमचे म्हणणे असेल तर ती जेथे संपली त्याच्या पलीकडे दुसरा कोणताच लोक नाही. मग कोणाच्या आकर्षणाने तिचे धारण होणार ? जशी समष्टी व व्यष्टी सर्वसमुदायाचे नाव वन ठेवतात म्हणून ती समष्टी आणि एक-एक वृक्ष स्वतंत्रपणे पाहिला तर ती व्यष्टी होय. त्याप्रमाणे सर्व भूगोलांची एक समष्टी समजून त्याला जग असे म्हटले तर साऱ्या जगाचे धारण व आकर्षण करणारा परमेश्वरावाचून दुसरा कोणीही नाही. म्हणून तो साऱ्या जगाची रचना करतो तोच-

**स दाधार पृथिवीमुत द्याम् ॥** यजु. अ. १३।मं. ४

पृथ्वी आदी प्रकाशरहित लोकलोकांतर, पदार्थ तथा सूर्य आदी प्रकाशसहित लोक व इतर पदार्थ यांची रचना व धारण परमेश्वर करतो. तोच सर्वत्र व्यापक झाला आहे तोच साऱ्या जगाचा कर्ता व धर्ता (धारण करणारा) आहे.

**(प्रश्न)** पृथ्वी आदी लोक फिरत आहेत की स्थिर आहेत ?

**(उत्तर)** ते फिरत आहेत.

**(प्रश्न)** कित्येक लोक असे म्हणतात की सूर्य फिरतो व पृथ्वी फिरत नाही. तर दुसरे काही लोक असे म्हणतात की सूर्य फिरत नसून पृथ्वी फिरत असते. यातील खरे कोणते?

**(उत्तर)** ही दोन्ही मते अर्ध सत्य आहेत. कारण वेदामध्ये असे लिहिले आहे की

**'आयं गौः पृश्निरक्रमीदसदन्मातरं पुरः । पितरं च प्रयन्त्स्वः ।।'** यजु. अ.३। मं.६

म्हणजे हा भूगोल जलासहित सूर्याच्या भोवती फिरतो म्हणून भूमी फिरत असते.

**आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च ।**
**हिरण्ययेन सविता रथेन देवो याति भुवनानि पश्यन् ।।** यजु. अ. ३३। मं. ४३

जो सविता म्हणजे सूर्य वर्षा आदी करणारा आहे. प्रकाशस्वरूप तेजोमय, रमणीयस्वरूपासह विद्यमान आहे, सर्व प्राणी व अप्राणी यांच्यामध्ये अमृतरूप वृष्टी अथवा किरणे यांच्याद्वारे अमृताचा प्रवेश करून, सर्व मूर्तिमान द्रव्ये दाखवित आहे, सर्व लोकांबरोबर आकर्षण गुणासह वर्तमान आहे, आपल्या परिधीमध्ये फिरत राहतो. परंतु तो कोणत्याही गोलाच्या भोवती फिरत नाही. त्याचप्रमाणे एकेका ब्रह्मांडात (सूर्यमालिकेत) एक सूर्य प्रकाश देणारा असतो व इतर सर्व लोक त्याच्या प्रकाशाने प्रकाशित होणारे आहेत. जसे-

**दिवि सोमो अधि श्रितः ।।** अथर्व. का. १४। अनु. १। मं. १

जसा हा चंद्रलोक सूर्याच्या प्रकाशाने प्रकाशित होतो, तसेच पृथ्वी आदी लोकही सूर्याच्या प्रकाशाने प्रकाशित होतात. मात्र दिवस व रात्र हे चक्र सदैव चालत असते. कारण पृथ्वी आदी लोक फिरत असताना जो भाग सूर्यासमोर येतो तेथे दिवस व जो भाग मागच्या बाजूस येतो तेथे रात्र असते. अर्थात जे उदय, अस्त, संध्या, मध्याह्न, मध्यरात्र वगैरे कालावयव आहेत, ते देशदेशांतरामध्ये सदैव विद्यमान असतात. म्हणजे जेव्हा आर्यावर्त्तात सूर्योदय होतो तेव्हा पाताळात म्हणजे 'अमेरिकेत' अस्त होतो आणि जेव्हा आर्यावर्त्तात सूर्यास्त होतो तेव्हा पाताळ देशात सूर्योदय होतो. जेव्हा आर्यावर्त्तात मध्याह्न किंवा मध्यरात्र असते त्यावेळी पाताळ देशात मध्यरात्र आणि मध्याह्न असते.

जे लोक असे म्हणतात की सूर्य फिरतो व पृथ्वी फिरत नाही, ते सर्व अज्ञानी आहेत. कारण तसे असते तर हजारो वर्षाचा दिवस व तेवढीच दीर्घ रात्र झाली असती. कारण सूर्य पृथ्वीच्या लाखोपट मोठा असून तो पृथ्वीपासून कोट्यावधी मैल दूर आहे. म्हणूनच सूर्याला वेदांमध्ये ब्रध्न: नाव आहे. ज्याप्रमाणे मोहरीसमोर पर्वत फिरू लागला तर त्याला खूप वेळ लागेल; आणि मोहरीला फिरायला फार वेळ लागणार नाही, त्याप्रमाणेच पृथ्वी (स्वत: भोवती) फिरत असल्यामुळे यथायोग्य दिवस व रात्री होतात; सूर्याच्या फिरण्यामुळे नव्हे.

जे लोक सूर्य स्थिर आहे असे म्हणतात, तेसुद्धा ज्योतिर्विद्याविद नाहीत. कारण सूर्य फिरत नसता तर एका राशिस्थानातून दुसऱ्या राशीत अर्थात दुसऱ्या जागेला तो प्राप्त झाला नसता शिवाय गुरू (मोठा) पदार्थ फिरल्यावाचून आकाशात नियत स्थानावर केव्हाही राहू शकला नसता.

जैन लोक म्हणतात की पृथ्वी फिरत नसून ती खाली-खाली जात आहे; आणि फक्त जंबुद्वीपामध्ये दोन सूर्य व दोन चंद्र आहेत. ते जणू भांगेच्या नशेत धुंद आहेत. असे का? जर पृथ्वी खाली-खाली जात असती तर

चारी बाजूच्या वायुचे चक्र न झाल्याने ती छिन्न भिन्न झाली असती. खालच्या वायुला राहण्यायोग्य वायूचा स्पर्श झाला असता खालच्या लोकांना अधिक स्पर्श झाला असता आणि वायूची गती एकाच प्रकारची झाली असती. दोन सूर्य व दोन चंद्र असते तर रात्र व कृष्णपक्ष यांचे अस्तित्व उरले नसते. म्हणून एका भूमीजवळ एक चंद्र असतो आणि अनेक भूमीसाठी अनेक चंद्र असतो व त्या सर्वांमध्ये एकच सूर्य असतो.

**(प्रश्न)** सूर्य, चंद्र व तारे या काय वस्तू आहेत ? त्यांच्यावर मनुष्यादी सृष्टी आहे का नाही ?

**(उत्तर)** हे सर्व भूगोल लोक आहेत व त्यांमध्ये मनुष्यादी प्रजाही राहते. कारण-

**एतेषु हीद ॅ सर्वं वसुहितमेते हीद ॅ सर्वं वासयन्ते, तद्यदिद ॅ सर्वं वासयन्ते तस्माद्वसव इति ॥** शत. प्रपा. १४ ब्रा. ६। कं. ५। व. ४

पृथ्वी, जल, अग्नी, वायु, आकाश, चंद्र, नक्षत्रे आणि सूर्य यांचे नाव वसू यासाठी आहे की यांच्यामध्येच सर्व पदार्थ व प्रजा वास करतात; आणि हेच सर्वांना वसवितात. ज्याअर्थी हे निवासाची घरे आहेत त्याअर्थी त्यांना वसू नाव आहे. पृथ्वीप्रमाणेच सूर्य, चंद्र व नक्षत्रे वसू आहेत. त्यामुळे त्यांच्यावरही याप्रकारे माणसे असणार यात काय संदेह ? शिवाय परमेश्वराचा पृथ्वी हा एक लहानसा गोल मनुष्यादी सृष्टिने भरलेला आहे. तर काय इतर सारे लोक शून्य रिकामे असतील ? परमेश्वराचे कोणतेही कार्य निष्प्रयोजन होत नाही. मग इतक्या असंख्य गोलांवर मनुष्यादी सृष्टि नसेल तर ईश्वराचे प्रयोजन कसे सफळ होऊ शकणार ? म्हणून सर्वत्र मनुष्यादी सृष्टि आहे.

**(प्रश्न)** या पृथ्वीवरील मनुष्यादी सृष्टिची जी आकृति व अवयव आहेत, तसेच इतर गोलांवर असतील की वेगळे असतील ?

**(उत्तर)** आकारांमध्ये थोडाफार फरक असण्याची शक्यता आहे. या जगात चिनी, हबशी व आर्यावर्त्त, यूरोप वगैरे देशांतील लोकांचे अवयव व रंगरूप आणि आकृतिचा थोडा-थोडा फरक आहे, तसाच वेगवेगळ्या ग्रहांवरील लोकांमध्ये भेद असतात. परंतु ज्या जातीची जशी सृष्टि या जगात आहे, तशाच प्रकारची सृष्टि अन्य लोकातही आहे. म्हणजे या जगातील लोकांच्या शरीराच्या ज्या-ज्या जागी डोळे वगैरे इंद्रिये असतात त्याच जागी इतर गोलांवरील लोकांच्या शरीरातही तशाच प्रकारचे अवयव सुद्धा तसेच असतात. कारण-

**सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।**
**दिवंच पृथिवीं चान्तरिक्षमथो स्वः ॥** ऋ. मं. १०।सू. १९. मं. ३

(धाता) परमेश्वराने ज्याप्रमाणे सूर्य, चंद्र, द्यौ, भूमी, अंतरिक्ष व तत्रस्थ विशिष्ट सुखदायक पदार्थ पूर्वीच्या कल्पामध्ये रचले होते, तसेच ते या कल्पात म्हणजे या सृष्टित रचले आहेत; आणि सर्व लोकलोकांतरमध्येही ते तसेच बनविले आहेत. त्यांत किंचित मात्र फरक नाही.

**(प्रश्न)** ज्या वेदांचा या जगात प्रकाश आहे त्यांचाच प्रकाश त्या लोकांमध्ये आहे किंवा नाही ?

**(उत्तर)** होय ! त्यांचाच प्रकाश तेथेही आहे. ज्याप्रमाणे एका राजाची राज्यव्यवस्था नीति त्याच्या राज्यात सर्वत्र सारखी असते त्याप्रमाणे राजराजेश्वर परमेश्वराची वेदोक्त नीती त्याच्या सृष्टिरूपी संपूर्ण राज्यात सारखीच आहे.

**(प्रश्न)** जर हे जीव आणि प्रकृतिस्थ तत्त्वें अनादी आहेत व ती ईश्वराने बनविलेली नाहीत तर ती स्वतंत्र असल्यामुळे त्यांच्यावर ईश्वराचा अधिकारही असता कामा नये.

**(उत्तर)** ज्याप्रमाणे राजा व प्रजा हे समकालीन असतात आणि प्रजा राजाच्या आधीन असते त्याचप्रमाणे जीव व जड (अचेतन) पदार्थ परमेश्वराच्या आधीन आहेत तर परमेश्वर सारी सृष्टि बनविणारा, जीवांना त्यांच्या कर्मांची यथायोग्य फळे देणारा, सर्वांचे यथावत रक्षण करणारा आणि अनंत सामर्थ्ययुक्त आहे तर अल्प सामर्थ्यवान आणि जड (अचेतन) पदार्थ त्याच्या आधीन का नसावेत ? म्हणून जीव हा कर्म करण्यास स्वतंत्र परंतु केलेल्या कर्मांची फळे भोगण्यात ईश्वराच्या व्यवस्थेमुळे परतंत्र आहे. याउलट परमेश्वर हा सर्वशक्तिमान विश्वाची निर्मिती, संहार व पालन सर्व जगाचे करणारा आहे.

हा आठवा समुल्लास पूर्ण झाला. पुढील समुल्लासात विद्या, अविद्या, बंध व मोक्ष यांविषयी लिहिण्यात येईल.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते सृष्ट्युत्पत्तिस्थितिप्रलयविषये**
**अष्टमः समुल्लासः सम्पूर्णः ॥८॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






# नववा समुल्लास

# विद्या व अविद्या विवेचन

**विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयं ँ सह।**
**अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥** यजु. अ. ४०। मं. १४

जो मनुष्य विद्या व अविद्या यांच्या स्वरूपांना एकाच वेळी जाणतो तो अविद्येच्या म्हणजे कर्मोपासनेच्या योगाने मृत्यूला जिंकून विद्येने म्हणजे यथार्थ ज्ञानाने मोक्षाला प्राप्त होतो.

## अविद्येचे लक्षण

**अनित्याशुचिदुःखानात्मसुनित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥** पातं.।सा.पा.।सू.५

हे योगसूत्रातील वचन आहे. हे जग व देहादी भौतिक पदार्थ अनित्य असताही ते नित्य आहेत असे वाटणे, जे कार्यरूप जग दिसते व ऐकू येते, ते पूर्वीपासून सदैव असेच राहिले आहे व पुढेही राहणार आहे, योगबळाच्या योगाने देवांचे हेच शरीर सदैव राहते, अशी विपरीत बुद्धी होणे हा अविद्येचा प्रथम भाग आहे.

अशुचि म्हणजे मलयुक्त पदार्थांना आणि कामवासना, मिथ्याभाषण, चोरी इत्यादी अपवित्रात पवित्र बुद्धि ठेवणे हा दुसरा भाग आहे. अत्यंत विषयसेवनरूपी दुःखामध्ये सुख बुद्धि हा तिसरा भाग आहे. अनात्म पदार्थांमध्ये आत्मबुद्धी करणे हा अविद्येचा चौथा भाग आहे. या चार प्रकारच्या विपरीत ज्ञानाला अविद्या असे म्हणतात. याहून जी विपरीत म्हणजे अनित्याला अनित्य, नित्याला नित्य, अपवित्राला अपवित्र, पवित्राला पवित्र, दुःखाला दुःख, सुखाला सुख, अनात्म्याला अनात्मा आणि आत्म्याला आत्मा असे ज्ञान होणे हीच विद्या होय. अर्थात

वेत्ति यथावत् तत्त्वं पदार्थस्वरूपं यया सा विद्या। यया तत्त्वस्वरूपं न जानाति भ्रमादन्यस्मिन्नन्यन्निश्चिनोति यया साऽविद्या॥

जिच्या योगाने पदार्थांच्या यथार्थ स्वरूपाचा बोध होतो ती विद्या आणि जिच्या योगाने तत्त्वस्वरूप जाणले जात नाही, एकात दुसऱ्याची बुद्धि होते, तिला अविद्या असे म्हणतात. तसेच कर्म व उपासना यांना अविद्या यासाठी म्हणतात. ती बाह्य व आंतरिक क्रियाविशेषणाचे नाव आहे, ज्ञानविशेषाचे नाही. म्हणूनच वरील मंत्रात सांगितले आहे की शुद्ध कर्म व परमेश्वराची उपासना यांखेरीज मृत्यू व दुःख यातून कुणीही पार

होऊ शकत नाही. अर्थात पवित्र कर्म, पवित्र उपासना आणि पवित्र ज्ञानानेच मुक्ती मिळते; आणि अपवित्र कर्म, मिथ्याभाषण आदी पाषाणमूर्ती आदींची उपासना आणि मिथ्याज्ञान यांच्यामुळे बंधन होते.

कोणीही माणूस एक क्षणदेखील कर्म, उपासना व ज्ञान यांनी रहित होत नाही. म्हणून धर्मयुक्त सत्यभाषणादी कर्मे करणे आणि मिथ्या भाषणादी अधर्माचा त्याग करणे. हेच मुक्तीचे साधन आहे.

## बंधमोक्षाची नित्यनैमित्तिकता

**(प्रश्न)** मुक्ती कोणाला प्राप्त होत नाही ?

**(उत्तर)** जो बद्ध आहे त्याला मुक्ती मिळत नाही.

**(प्रश्न)** बद्ध कोण आहे ?

**(उत्तर)** जो अधर्म व अज्ञान यात अडकलेला जीव आहे.

**(प्रश्न)** बंध व मोक्ष हे स्वाभाविक आहेत की नैमित्तिक ?

**(उत्तर)** नैमित्तिकापासून कारण ते स्वाभाविक असते तर बंध आणि मुक्तीची निवृत्ती कधी झालीच नसती.

**(प्रश्न) न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः ।**
**न मुमुक्षुर्न वै मुक्तइत्येषा परमार्थता ।।** गौडपादीय कारिका प्र. २। कां. ३२

ही मांडूक्य उपनिषदावरील कारिका आहे. जीव व ब्रह्म असल्यामुळे वस्तुतः जीवाचा विरोध म्हणजे तो कधी अज्ञानाच्या आवरणात येत नाही, जन्म घेत नाही, बंधामध्ये पडत नाही, तो साधक नाही व काही साधनाही करीत नाही. तो कधी मुक्त होण्याची इच्छा करीत नाही आणि त्याची कधी मुक्ती होत नाही कारण परमार्थाने तो (तत्त्वतः) बंधच झाला नाही तर मुक्ती कसली ?

**(उत्तर)** आधुनिक वेदांती लोकांचे हे म्हणणे खरे नाही. कारण जीवाचे स्वरूप अल्प असल्याने तो आवरणात येतो. तो शरीरासहित प्रकट रूपाने जन्म घेतो. पापरूप कर्मांची फळे भोगण्यासाठी भोगरूप बंधात अडकतो, त्या बंधातून सुटण्याचे उपाय करतो. दुःखातून सुटण्याची इच्छा बाळगतो; आणि दुःखातून मुक्त होऊन परमानंद परमेश्वराची प्राप्ती करून घेऊन मुक्तीचाही उपभोग घेतो.

**(प्रश्न)** हे सारे धर्म देहाचे व अंता करणाचे आहेत, जीवाचे नव्हेत. कारण जीव तर पापपुण्यरहित साक्षीमात्र आहे. शीत, उष्ण आदी शरीरादिकांचे धर्म आहेत. आत्मा हा निर्लेप आहे.

**(उत्तर)** देह आणि अंतःकरण हे जड (अचेतन) आहेत. त्यांना शीतोष्णाची प्राप्ती व भोग असत नाहीत. ज्याप्रमाणे दगडाला शीत व उष्णता यांची जाणीव अथवा भोग नसतो जे मनुष्यादी चेतन प्राणी त्याला स्पर्श करतात त्यांनाच शीतोष्णांची जाणीव होते व ते त्याचा उपभोग घेतात. त्याचप्रमाणे प्राणही जड (अचेतन) आहेत. त्यांना भूक व तहान लागत नाही. परंतु ते प्राण असणाऱ्या जीवाला तहान-भूक लागते. याचप्रमाणे मनही जड (अचेतन) आहे. त्याला नहर्ष-नाशोक होत नाही. पण मनाद्वारे जीव हा हर्ष-शोक, सुख-दुख यांचा उपभोग घेतो. ज्याप्रमाणे बहिष्करण (बाह्य) श्रोत्रादी इंद्रियांद्वारे बऱ्यावाईट शब्दादी विषयांचे ग्रहण करून जीव सुखी किंवा दुःखी होतो, त्याचप्रमाणे अंतःकरणाच्या म्हणजे मन, बुद्धी, चित्त व अहंकार यांमुळे संकल्प, विकल्प, निश्चय, स्मरण व अभिमान करणारा जीव शिक्षेस व मोठेपणास पात्र ठरतो.

ज्याप्रमाणे तलवारीने मारणारा दंडनीय होतो शिक्षेस पात्र असतो पण तलवार शिक्षेला पात्र नसते त्याचप्रमाणे देहेंद्रिये, अंत:करण व प्राण या साधनांनी बरी-वाईट कृत्ये करणारा जीव सुख-दु:खाचा भोक्ता असतो. जीव हा कर्मांचा साक्षीदार नसून कर्ता व भोक्ता आहे. कर्माचा साक्षीदार तर एक, अद्वितीय परमात्मा आहे. जो कर्मे करणारा जीव आहे, तोच कर्मामध्ये लिप्त होतो. तो (ईश्वरही नव्हे अथवा) ईश्वर साक्षीही नाही.

**(प्रश्न)** जीव हे ब्रह्माचे प्रतिबिंब आहे. ज्याप्रमाणे आरसा फुटल्याने बिंबाची काही हानी होत नाही, त्याचप्रमाणे जोपर्यंत अंत:करणामध्ये ब्रह्माचे प्रतिबिंब असणारा जीव तोपर्यंत आहे की जोपर्यंत तो अंत:करणाची उपाधी असतो जेव्हा अत:करण नाश पावते तेव्हा जीव मुक्त होतो.

**(उत्तर)** हे बोलणे पोरकटपणाचे आहे. कारण प्रतिबिंब हे साकाराचे साकारात होते जसे मुख व दर्पण हे आकारयुक्त आहेत आणि पृथकही आहेत. जर पृथक नसतील तर त्याचे प्रतिबिंब पडू शकत नाही. ब्रह्म हे निराकार व सर्व व्यापक असल्यामुळे त्याचे प्रतिबिंब सुद्धा होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** पाहा ! खोल, स्थिर व स्वच्छ पाण्यामध्ये निराकार व व्यापक आकाशाचे (प्रतिबिंब) आभास होतो. त्याचप्रमाणे निर्मळ अंत:करणात परमेश्वराचा आभास असतो म्हणजे प्रतिबिंब पडते. त्याला चिदाभास म्हणतात.

**(उत्तर)** ही सारी बालबुद्धीची निरर्थक बडबड आहे. कारण आकाश हे दृश्य नाही तर त्याला डोळ्यांनी कोणीही का म्हणून पाहू शकतो ?

**(प्रश्न)** हे जे वर निळे व अंधुक असे दिसते ते आकाश निळे दिसते की नाही ?

**(उत्तर)** नाही.

**(प्रश्न)** तर मग ते काय आहे ?

**(उत्तर)** पृथ्वी, जल व अग्नी यांचे वेगवेगळे त्रसरेणू दिसतात. त्याच्यामध्ये जो निळेपणा दिसतो तो जास्त पाणी जे पावसाच्या रूपाने पडते त्यामुळे ते निळे आहे आणि जो धुरकटपणा दिसतो, ती पृथ्वीवरून उडालेली धूळ वातावरणात फिरत असल्याची दिसते. तिचेच प्रतिबिंब पाण्यात किंवा आरशात पडलेले दिसते. ते आकाशाचे प्रतिबिंब कधीही नसते.

**(प्रश्न)** जसे आकाशाचे घटाकाश, मठाकाश, मेघाकाश, व महदाकाश असे भेद व्यवहारात होतात तसेच ब्रह्माचेही ब्रह्मांड व अंत:करण या दोन उपाधीं भेदाने ईश्वर व जीव नावे आहेत. जेव्हा घटादी पदार्थ नष्ट होतात तेव्हा महदाकाशच म्हटले जाते.

**(उत्तर)** ही गोष्ट अडाणी लोकांची आहे. कारण आकाश कधी छिन्न-भिन्न होत नाही. व्यवहारामध्ये 'घट (माठ) आणा' इत्यादी व्यवहार होतात. 'माठातील आकाश (घटाकाश) आणा' असे कोणी म्हणत नाही. म्हणून तुमची ही गोष्ट बरोबर नाही.

**(प्रश्न)** ज्याप्रमाणे समुद्रात मासे व इतर कीटक फिरतात आणि आकाशात पक्षी वगैरे उडतात, त्याचप्रमाणे चिदाकाश ब्रह्मामध्ये सारी अंत:करणे फिरत असतात. ती स्वत: जड (अचेतन) आहेत; परंतु सर्वव्यापक परमेश्वराच्या सत्तेने जसे अग्नीच्या सान्निध्याने लोखंड गरम होते तसे अंत:करणे चैतन्ययुक्त होत असतात. ते जसे चालते आणि आकाश तसेच ब्रह्म हे स्थिर आहेत, त्याप्रमाणे जीवाला ब्रह्म मानण्यात काही दोष येत नाही.

**(उत्तर)** तुमचा हा दृष्टांतही सत्य नाही. कारण जर सर्वव्यापक ब्रह्म अंत:करणामध्ये प्रकाशमान होऊन जीव बनते तर त्याच्यामध्ये सर्वज्ञत्व आदी गुण येतात की नाही ? आवरण असल्यामुळे त्यात सर्वज्ञता वगैरे गुण येत नाहीत असे तुम्ही म्हणत असाल तर मग असे सांगा की ब्रह्म आवृत्त व खंडित आहे की अखंडित ? ब्रह्म हे अखंडित आहे असे तुमचे म्हणणे असेल तर त्याच्यामध्ये कोणीही पडदा टाकू शकत नाही. जर पडदा नाही तर सर्वज्ञता का नाही ? ते आपल्या स्वरूपाला विसरून अंत:करणासह चालणाऱ्या सारखा आहे. परंतु स्वरूपत: ते काय हालचाल करीत नाही ! जेव्हा स्वत: चालत नाही तर अंत:करण जितके जितके आपले पूर्वीचे प्राप्त स्थान सोडते आणि पुढेपुढे सरकत जाईल तेथे त्या त्या ठिकाणचे ब्रह्म भ्रांत, अज्ञानी होईल आणि जितके जितके अंत:करण सुटत जाईल तेथील ब्रह्म ज्ञानी, पवित्र व मुक्त होत जाईल असे म्हणावे लागेल. कारण सृष्टि निर्मितीच्या ब्रह्म्याला अंत:करण बिघडवीत जाईल आणि बंध व मुक्ति देखील क्षणोक्षणी होत राहील. तुम्ही म्हणता तसे जर झाले तर कोणत्याही जीवाला पूर्वी पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टीचे स्मरण राहिले नसते. कारण ज्या ब्रह्माने (अंत:करणासह जे) पाहिले व ऐकले ते राहिले नाही म्हणून बह्म जीव व जीव ब्रह्म हे एक कधीच होत नाहीत. ते नेहमीच वेगवेगळे असतात.

**(प्रश्न)** हा सारा केवळ अध्यारोप आहे म्हणजे एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा आरोप स्थापणे याला अध्यारोप असे म्हणतात. येथे ब्रह्म या वस्तूमध्ये साऱ्या जगाचा व त्याच्या व्यवहाराचा अध्यारोप करून जिज्ञासूला बोध करविला जातो वस्तुत: सर्व ब्रह्मच आहे.

**(प्रश्न)** अध्यारोप करणारा कोण आहे ?

**(उत्तर)** जीव.

**(प्रश्न)** जीव कोणाला म्हणतात ?

**(उत्तर)** अंत:करणावच्छिन्न चेतनाला जीव असे म्हणतात.

**(प्रश्न)** अंत:करणावच्छिन्न चेतन हे दुसरे आहे की तेच ब्रह्म आहे ?

**(उत्तर)** तेच ब्रह्म आहे.

**(प्रश्न)** मग ब्रह्मानेच आपल्यामध्ये जगाची खोटी कल्पना केली काय ?

**(उत्तर)** होय. त्यामुळे ब्रह्माची काय हानी होणार ?

**(प्रश्न)** जो मिथ्या कल्पना करतो तो खोटा होत नाही काय ?

**(उत्तर)** नाही. कारण जे मन व वाणी यांनी कल्पित अथवा कथित असते ते सारे खोटे असते.

**(प्रश्न)** तर मग मनाने व वाणीने खोट्या कल्पना करणारे व खोट बोलणारे ब्रह्म कल्पित व मिथ्यावादी झाले की नाही ?

**(उत्तर)** होय. हा आरोप आम्हाला इष्टापत्ति आहे. वाह रे ! मिथ्या वेदांतवादी लोकानो ! तुम्ही सत्यस्वरूप, सत्यसंकल्प, सत्यकाम परमेश्वराला मिथ्याचारी करून टाकले काय हेच तुमच्या दुर्दशेचे कारण नाही आहे ? कोणत्या उपनिषदात, सूत्रात अथवा वेदात लिहिले आहे की परमेश्वर हा मिथ्यासंकल्प व मिथ्यावादी आहे ? चोराच्या उलट्या बोंबा किंवा चोर तो चोर, वर शिरजोर या लोकोपचारासारखी तुमची गत दिसते. कोतवालाने

चोराला शिक्षा करणे हे योग्य आहे. पण चोरानेच कोतवालाला शिक्षा करणे ही उलटीच गोष्ट झाली. त्याचप्रमाणे तुम्ही स्वत: मिथ्यासंकल्पी व मिथ्यावादी होऊन आपला तो दोष निष्कारण ब्रह्माला लावीत आहात.

ब्रह्म जर मिथ्याज्ञानी, मिथ्यावादी, मिथ्याकारी असते तर सर्व अनंत ब्रह्म तसेच झाले असते. परंतु ब्रह्म तर एकरस, सत्यस्वरूप, सत्यमानी, सत्यवादी व सत्यकारी आहे हे सर्व दोष तुमचे आहेत ते ब्रह्माचे नाहीत.

जिला तुम्ही विद्या म्हणता ती तर अविद्या आहे; आणि तुमचा अध्यारोपही खोटा आहे. कारण आपण ब्रह्म नसताना स्वत:ला ब्रह्म व ब्रह्माला जीव समजणे हे मिथ्याज्ञान (अज्ञान) नाही तर काय आहे ? जो सर्वज्ञ व सर्वव्यापक आहे तो परिच्छिन्न अज्ञानात व बंधनात कधी पडत नाही. कारण अज्ञान, परिच्छिन्न, एकदेशी, अल्प व अल्पज्ञ जीवास होत असतो. सर्वज्ञ, सर्वव्यापी ब्रह्मामध्ये ते नाहीत.

## मुक्ती व बंध यांचे वर्णन

**(प्रश्न)** मुक्ती कशाला म्हणतात ?

**(उत्तर)** **'मुञ्चन्ति पृथग्भवन्ति जना यस्यां सा मुक्तिः'** जिच्यामुळे सुटका होते तिला मुक्ती असे म्हणतात.

**(प्रश्न)** कशापासून, कोणापासून सुटणे ?

**(उत्तर)** ज्याच्यापासून सुटावे अशी इच्छा सर्व जीव करतात.

**(प्रश्न)** कशापासून सुटण्याची इच्छा जीव करतात ?

**(उत्तर)** दु:खापासून सुटावे अशी इच्छा सर्व जीव ठेवतात.

**(प्रश्न)** कशापासून सुटू इच्छितात ?

**(उत्तर)** दु:खापासून.

**(प्रश्न)** दु:खापासून सुटून जीव कशाला प्राप्त करतात व ते कोठे राहतात ?

**(उत्तर)** ते सुख प्राप्त करतात व ब्रह्मात राहतात.

**(प्रश्न)** मुक्ती व बंध कोणकोणत्या गोष्टीपासून होतात ?

**(उत्तर)** परमेश्वराच्या आज्ञेचे पालन न करणे, अधर्म, अविद्या, कुसंग, कुसंस्कार, वाईट व्यसने यांच्यापासून दूर राहणे आणि सत्य भाषण, परोपकार, विद्या, पक्षपातरहित न्याय व धर्म यांची वृद्धी करणे, पूर्वोक्त प्रकाराने परमेश्वराची स्तुती, प्रार्थना व उपासना म्हणजे योगाभ्यास करणे; विद्या शिकणे व शिकवणे; धर्माने पुरुषार्थ करून ज्ञानाची उन्नती करणे; सर्वात उत्तम साधनांचा वापर करणे; आणि जे काही करावयाचे ते सर्व पक्षपातरहित न्यायधर्मानुसारच करणे इत्यादी साधनांनी मुक्ती मिळते आणि याहून विपरीत ईश्वराची आज्ञा भंग करणे वगैरे कामानी बंध होतो.

**(प्रश्न)** मुक्तीमध्ये जीवाचा लय होतो की तो विद्यमान राहतो ?

**(उत्तर)** तो विद्यमान राहतो.

**(प्रश्न)** तो कोठे राहतो ?

**(उत्तर)** तो ब्रह्मामध्ये राहतो.

**(प्रश्न)** ब्रह्म कोठे आहे ? तो मुक्त जीव एके ठिकाणी राहतो की स्वेच्छेने सर्वत्र संचार करतो ?

**(उत्तर)** जे ब्रह्म सर्वत्र पूर्ण आहे त्याच्यातच मुक्त जीव अव्याहतगती म्हणजे त्याला कसलाही अडथळा नाही, विज्ञान आनंदपूर्वक स्वतंत्रपणे संचार करतो.

**(प्रश्न)** मुक्त जीवाला स्थूल शरीर असते की नाही ?

**(उत्तर)** नाही.

**(प्रश्न)** मग तो सुखाचा व आनंदाचा उपभोग कसा घेतो ?

**(उत्तर)** त्याचे सत्य संकल्पादी स्वाभाविक गुण व सामर्थ्य ही सर्व टिकून राहतात. मात्र त्याचा भौतिक (शरीराशी) संबंध राहत नाही. जसे,

**शृण्वन् श्रोत्रं भवति, स्पर्शयन् त्वग्भवति, पश्यन् चक्षुर्भवति, रसयन् रसना भवति, जिघ्रन् घ्राणं भवति, मन्वानो मनो भवति, बोधयन् बुद्धिर्भवति, चेतयंश्चित्तम्भ वत्यहङ्कुर्वाणोऽहङ्कारो भवति ॥** शतपथ. कां. १४

मोक्षामध्ये भौतिक शरीर अथवा इंद्रियांचे गोलक जीवात्म्याबरोबर राहात नाहीत. परंतु त्याचे स्वाभाविक शुद्ध गुण राहतात. जेव्हा तो ऐकण्याची इच्छा करतो तेव्हा कान, स्पर्श करू इच्छितो तेव्हा त्वचा, पाहण्याची इच्छा बाळगतो तेव्हा डोळे, स्वादासाठी जीभ, वास घेण्यासाठी नाक, संकल्प-विकल्प करण्याच्या वेळी मन, निश्चय करण्यासाठी बुद्धी, स्मरण करण्यासाठी चित्त व अहंकारासाठी अहंकाररूप स्वशक्ती योगाने जीवात्मा मुक्तावस्थेत जातो आणि मुक्तीमध्ये त्याचे संकल्पमात्र शरीर असते. ज्याप्रमाणे शरीराच्या आधाराने इंद्रियांच्या गोलकांद्वारे जीव आपले कार्य करतो, त्याप्रमाणे (हे शरीर नसताना) मुक्तीमध्ये आपल्या शक्तीने तो सर्व आनंदाचा उपभोग घेतो.

**(प्रश्न)** त्याची शक्ती किती प्रकारची व केवढी आहे ?

**(उत्तर)** मुख्य शक्ती एकाच प्रकारची आहे. परंतु बळ, पराक्रम, आकर्षण, प्रेरणा, गती, भीषण, विवेचन, क्रिया, उत्साह, स्मरण, निश्चय, इच्छा, प्रेम, द्वेष, संयोग, विभाग, संयोजक, विभाजक, श्रवण, दर्शन, स्पर्शन, स्वादन आणि गंधग्रहण व ज्ञान या चोवीस प्रकारच्या सामर्थ्यांनी युक्त असा जीव आहे. यांच्या योगानेच तो मुक्तीमध्येही आनंदाची प्राप्ती व त्याचा उपभोग करतो.

मुक्तीमध्ये जीवाचा विलय झाला तर मुक्तीचे सुख कोणी उपभोगीले असते ? जे लोक जीवाच्या नाशालाच मुक्ती समजतात ते महामूर्ख आहेत. कारण सर्व दुःखापासून मुक्त होऊन आनंदस्वरूप, सर्वव्यापक, अनंत परमेश्वरामध्ये जीवांचे आनंदात राहणे, हीच जीवाची मुक्ती होय. वेदान्त शारीरिक सूत्रांमध्ये म्हटले आहे की,

**अभावं बादरिराह ह्येवम् ॥** वेदान्त द. अ. ४। पा. ४। सू. १०

बादरी हा व्यासाचा पिता होय. ते मुक्तीमध्ये जीवाचा त्याच्याबरोबर मनाचा भाव असतो असे तो मानतो. अर्थात जीव आणि मन (यांचा मुक्तीमध्ये) लय होतो असे पराशर मुनी मानीत नाहीत तसेच,

**भावं जैमिनिर्विकल्पामननात् ॥** वेदान्त द. अ. ४। पा. ४। सू. ११

आचार्य जैमिनी मुक्त पुरुषाबरोबर मनासारखे सूक्ष्म शरीर, इंद्रिय, प्राण वगैरेही विद्यमान असतात असे मानतात. त्यांचा अभाव मानीत नाहीत.

**द्वादशाहवदुभयविधं बादरायणोऽतः ॥** वेदान्त द. अ. ४। पा. ४। सू. १२

व्यासमुनी मुक्तीमध्ये पूर्वोक्त साधनांचा भाव व अभाव हे दोन्ही असतात असे मानतात. अर्थात शुद्ध सामर्थ्ययुक्त जीव मुक्तीमध्ये विद्यमान असतो; आणि अपवित्रता, पापाचरण, दुःख, अज्ञान आदीचा अभाव ते मानतात.

**यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ।**

**बुद्धिश्च न विचेष्टते तामाहुः परमां गतिम् ॥** कठो. अ. २। व. ६। मं. १०

हे उपनिषदाचे वचन आहे जेव्हा शुद्ध मन युक्त पाच ज्ञानेंद्रिये जीवाबरोबर राहतात आणि बुद्धिचा निश्चय स्थिर असतो तेव्हा त्या स्थितीला परमगती म्हणजे मोक्ष असे म्हणतात.

**य आत्मा अपहतपात्मा विजरो विमृत्युर्विशोकोऽविजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसङ्कल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः सर्वांश्च लोकोनाप्नोति सर्वांश्च कामान् यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ॥** छान्दो. प्रपा. ८। खं. ७। मं. १ **स वा एष एतेन दैवेन चक्षुषा मनसैतान् कामान् पश्यन् रमते ॥ य एते ब्रह्मलोके तं वा एतं देवा आत्मानमुपासते तस्मात्तेषां सर्वे च लोका आत्ताःसर्वेच कामाःस सर्वां‌ँश्च लोकानाप्नोति सर्वां‌ँश्च कामान्यस्तमात्मा-नमनुविद्य विजानातीति ॥** छान्दो. प्रपा. ८। खं. १२। मं. ५,६ **नमघवन्मर्त्यं वा इद‌ँ शरीरमात्तं मृत्युना तदस्याऽमृतस्याशरीरस्यात्म-नोऽधिष्ठानमात्तो वै सशरीरः प्रियाप्रियाभ्यां न वै सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोर-पहतिरस्त्यशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः ॥** छान्दो. प्रपा. ८। खं. १२। मं. १

जो परमेश्वर अपहतपात्मा सर्व पापे, जरा, मृत्यू, शोक, क्षुधा व पिपासा यांनी रहित, सत्यकाम व सत्यसंकल्प आहे, त्याचा शोध ; व त्यालाच जाणण्याची इच्छा बाळगावी परमेश्वराच्या संपर्कामुळे जो मुक्त जीव सर्व लोकांना व सर्व कामांना प्राप्त होतो, जो परमेश्वराला जाणून घेऊन मोक्षाचे साधन व स्वतःला शुद्ध करणे जाणतो तो मुक्ती प्राप्त जीव शुद्ध दिव्य नेत्र आणि शुद्ध मन यांच्या योगाने कार्याला पाहतो व त्या प्राप्त करून त्यांमध्ये रममाण होतो.

जे या ब्रह्मलोकामध्ये म्हणजे दर्शनीय परमेश्वरामध्ये स्थित होऊन मुक्त जीव मोक्ष सुखाचा उपभोग घेतात आणि सर्वांचा अंतर्यामी आत्मा असलेल्या याच परमेश्वराची उपासना मुक्तीची प्राप्ती करणारे विद्वान लोक करतात. यामुळे त्यांना सर्व लोक सर्व कामना प्राप्त होतात. म्हणजे (ते उपासक) जे-जे संकल्प करतात ते-ते पूर्ण होऊन त्यांना ते-ते लोक व ते-ते काम प्राप्त होतात आणि ते मुक्त जीव स्थूल शरीर सोडून संकल्पमय शरीराने आकाशामध्ये, परमेश्वरामध्ये संचार करतात कारण जे शरीर युक्त असतात ते ऐहिक दुःखरहित होऊ शकत नाहीत.

जसे प्रजापतीने इंद्राला सांगितले की, "हे परमपूज्य धनयुक्त पुरुषा ! हे स्थूल शरीर मरणधर्मी आहे आणि सिंहाच्या जबड्यात बकरी सापडलेली असावी त्याप्रमाणे हे शरीर मृत्यूच्या जबड्यात सापडलेले आहे. ते हे शरीर मरणाचे व शरीररहित जीवात्म्याचे निवासस्थान आहे."

म्हणूनच हा जीव सुख आणि दुःख यांनी सदा ग्रस्त राहत असतो. कारण शरीरासहित जीवाची ऐहिक प्रसन्नतेची निवृत्ती होतच असते; आणि जो शरीररहित मुक्त जीवात्मा ब्रह्ममध्ये राहतो त्याला ऐहिक सुखदुःखाचा स्पर्शही होत नाही तथापि तो सदा आनंदातच राहतो.

## मुक्तीतून पुनरावृत्ती

**(प्रश्न)** जीवाला मुक्ती मिळाल्यानंतर तो पुनः कधी जन्ममरणरूपी दुःखामध्ये येतो की नाही? कारण

**न च पुनरावर्त्तते न च पुनरावर्त्तते इति ॥** छान्दो. प्रपा. ८। खं. १५

**अनावृत्तिः शब्दादनावृत्तिः शब्दात् ।** वेदान्त द. अ. ४। पा. ४। सू. ३३

**यद् गत्वा न निवर्त्तन्ते तद्धाम परमं मम ॥** गीता. अ. १५। श्लो. ६

इत्यादी वचनांवरून लक्षात येते की मुक्ती तीच आहे जी संसार दुःखापासून निवृत्त होऊन जीवाला एकदा मुक्ती मिळाल्यानंतर ती सोडून तो पुनः या जगात कधी येत नाही.

**(उत्तर)** हे म्हणणे बरोबर नाही. कारण वेदामध्ये याचे खंडन केले आहे.

**कस्य नूनं कतमस्यामृतानां मनामहे चारु देवस्य नाम ।**

**को नो मह्या अदितये पुनर्दात् पितरं च दृशेयं मातरं च ॥१॥** ऋ.मं.१।सू.२४।मं.१

**(प्रश्न)** कोणाचे नाव पवित्र आहे असे आम्ही समजावे? कोण नाशरहित पदार्थांमध्ये असणारा देव सदा प्रकाशस्वरूप आहे? कोण आम्हाला मुक्तीच्या सुखाचा उपभोग करवून पुनः या जगात जन्माला घालतो आणि आईवडिलांचे दर्शन करवितो?॥१॥

**अग्नेर्वयं प्रथमस्यामृतानां मनामहे चारु देवस्य नाम ।**

**स नो मह्या अदितये पुनर्दात् पितरं च दृशेयं मातरं च ॥२॥** ऋ.मं.१।सू.२४।मं.२

**(उत्तर)** या स्वप्रकाशस्वरूप, (ज्ञानस्वरूप) अनादी, सदामुक्त परमेश्वराचे नाव पवित्र आहे असे आम्ही जाणवे. जो आम्हाला मुक्तीमध्ये आनंदाचा उपभोग करवून पुनः पृथ्वीवर आईवडिलांच्या संबंधाने जन्म देऊन त्यांचेदर्शन घडवितो तोच परमेश्वर मुक्तीची व्यवस्था करतो. तोच सर्वांचा स्वामी आहे. ॥२॥

**इदानीमिव सर्वत्र नात्यन्तोच्छेदः ॥३॥** सांख्य. अ. १। सू. १५९

ज्याप्रमाणे सध्या काही जीव बद्ध व काही मुक्त आहेत, तसेच ते सर्वदा राहतात. बंध व मुक्ती यांचा पूर्णपणे विच्छेद कधी होत नाही. तरीपण बंध व मुक्ती ही कायमची नसतात. ॥३॥

**(प्रश्न) तदत्यन्तविमोक्षोऽपवर्गः ॥** न्याय. अ. १। आ. १। सू. २२

**दुःखजन्मप्रवृत्तिदोषमिथ्याज्ञानानामुत्तरोत्तरापाये तदनन्तरापायादपवर्गः ॥**

न्याय अ. १। आ. १। सू. २

जो दुःखाचा अत्यंत म्हणजे पूर्ण विच्छेद होतो तीच मुक्ती म्हणवीली जाते. कारण जेव्हा मिथ्या ज्ञान, अविद्या, लोभादी दोष, विषयवासनेसारख्या दुर्व्यसनांमध्ये प्रवृत्ती, जन्म व दुःख ही उत्तरोत्तर नाहीशी होण्यापूर्वी पूर्वीच्या गोष्टीपासून निवृत्त झाल्यानेच मोक्ष प्राप्त होतो व तो सदैव राहत असतो.

**(उत्तर)** अत्यंत या शब्दाचा अर्थ अत्यंताभाव असा घेण्याची गरज नाही. जसे, **'अत्यन्तं**

**दुःखमत्यन्तं सुखं चास्य वर्त्तते'** या वाक्यात या माणसाला फार दु:ख व फार सुख आहे असा अर्थ आहे. यावरून असे दिसून येते की त्याला पुष्कळ सुख किंवा दु:ख आहे. त्याचप्रमाणे येथेही अत्यंत शब्दाचा अर्थ समजला पाहिजे.

**(प्रश्न)** मुक्तीतून जीव परत येत असेल तर तो मुक्तावस्थेत किती काळ राहतो ?

**(उत्तर) ते ब्रह्मलोके ह परान्तकाले परामृतात् परिमुच्यन्ति सर्वे।** मुण्डक ३। खं. २। मं.६

ते मुक्त जीव मुक्ती प्राप्त करून ब्रह्मामध्ये आनंद, तोपर्यंत उपभोगून महाकल्पानंतर मुक्तीचे सुख सोडून पुन: जगात येतात. याची कालगणना अशी आहे: त्रेचाळीस लाख वीस हजार वर्षांची एक चतुर्युगी, दोन हजार चतुर्युगींची एक अहोरात्र, तीस अहोरात्रींचा एक महिना, बारा महिन्यांचे एक वर्ष, अशा शंभर वर्षांचा एक परांतकाल होतो. याप्रमाणे गणित करून मुक्तीचे सुख भोगण्याचा काळ किती असतो ते जाणून घ्यावे.

**(प्रश्न)** परंतु इतर ग्रंथकारांचे आणि जगातील सर्वांचे असेच मत आहे की ज्यामुळे पुन: जन्ममरणाच्या फेऱ्यात न येणे हीच मुक्ती किंवा मोक्ष होय.

**(उत्तर)** असे कधीच होणे शक्य नाही. कारण एक तर जीवाचे सामर्थ्य, शरीरादी पदार्थ आणि साधने परिमित आहेत. मग त्यांचे फळ अनंत कसे असू शकेल ? अनंत आनंद उपभोगण्याचे अमर्याद सामर्थ्य, कर्मे व साधने असणाऱ्या जीवांमध्ये नाहीत. म्हणून ते अनंत सुखाचा उपभोग घेऊ शकत नाहीत. ज्यांची साधने अनित्य आहेत त्यांचे फळ नित्य कधीही असू शकत नाही. शिवाय मुक्तीमधून कोणताही जीव या संसारात परत येत नसता तर जगाचा उच्छेद म्हणजे जीव नि:शेष झाले असते.

**(प्रश्न)** जितके जीव मुक्त होतात तितके पुन: ईश्वर नवीन उत्पन्न करून; आणि त्यांना जगात पाठवितो. त्यामुळे जीव संपून जाणार नाहीत.

**(उत्तर)** असे असेल तर जीव अनित्य होतील. कारण ज्याची उत्पत्ति होते त्याचा नाश अवश्य होतो. म्हणजे तुमच्या मताप्रमाणे मुक्ती मिळाल्यावरही जीव नष्ट होऊन जातील. त्यामुळे मुक्ती अनित्य होईल आणि मुक्तीच्या ठिकाणी भयंकर गर्दी होईल. कारण तेथे आगमन जास्त होईल आणि (त्यांच्यापैकी कोणीच) तेथून बाहेर जाणार नसल्याने तेथील वाढीला काही सुमारच राहणार नाही आणि दु:खाच्या अनुभवाशिवायसुख काहीही होऊ शकत नाही.

कडू नसेल तर मधुर रसाला आणि मिष्ट नसेल तर कडू रसाला काय अर्थ उरतो ? कारण दोन वेगवेगळ्या रसांचा स्वाद घेतल्याने त्यांची परीक्षा होते. एखादा माणूस केवळ गोडच खात-पीत राहिला तर त्याला तसे सुख होत नाही जसे सर्व प्रकारच्या रसांचा स्वाद घेणाऱ्याला सुख मिळते.

शिवाय परमेश्वर अंत असणाऱ्या (सीमित) कर्माचे अनंत फळ देईल तर त्याचा न्याय नष्ट होईल. जो जितके ओझे उचलू शकेल तेवढेच त्याच्यावर लादणे हे शहाणपणाचे काम असते. जसे एका मणाचे ओझेउचलू शकणाऱ्या शिरावर दहा मणाचे ओझे लादल्यास ते लादणाऱ्याची निंदा नालस्ती होते. तसेच अल्पज्ञ अल्प सामर्थ्य असणाऱ्या जीवावर अनंत सुखाचा भार घालणे ईश्वरासाठी उचित होत नाही.

आणि जर परमेश्वर नवे जीव उत्पन्न करतो तर ज्या कारणापासून जीव उत्पन्न होतात ते पदार्थ संपून

जातील. कारण खजिना कितीही मोठा असला तरी त्यात भर न पडता नुसताच खर्च होत राहिला तर कधी ना कधी तो रिकामा होतोच. म्हणून मुक्तावस्थेत जाणे व तेथून परत येणे चांगले आहे यासाठी अशी अवस्था असणेचे योग्य होय. काही दिवस कारागृहात काढण्यापेक्षा जन्मठेप, काळे पाणी किंवा फाशीला कोणी चांगले मानतो काय ? मुक्तीतून परत यायचेच नसेल तर ह्या जन्मठेपेच्या कैदेत इतकेच अंतर आहे की तेथे मजुरी करावी लागत नाही आणि ब्रह्यामध्ये विलीन होणे हे समुद्रात बुडून मरण्यासारखेच आहे.

**(प्रश्न)** जसा परमेश्वर नित्य मुक्त व पूर्ण सुखी आहे तसाच जीवही नित्य मुक्त व सुखी राहील तर त्यात काही दोष येणार नाही.

**(उत्तर)** परमेश्वर अनंतस्वरूप, सामर्थ्य, गुण, कर्म व स्वभाव युक्त आहे. त्यामुळे तो कधी अविद्या आणि दु:ख व बंधन यांत पडू शकत नाही. जीव मुक्त होऊनही शुद्ध स्वरूप, अल्पज्ञ आणि परिमित गुण-कर्म-स्वभावयुक्त राहतो. तो परमेश्वरासारखा कधी होत नाही.

**(प्रश्न)** जर मुक्ती देखील अशी जन्म-मरणासारखीच आहे तर तिच्यासाठी श्रम करणे व्यर्थ आहे ?

**(उत्तर)** मुक्ती ही जन्म-मरणासारखी नाही. कारण छत्तीस हजार वेळा सृष्टिची उत्पत्ति व लय होण्यास जेवढा वेळ लागतो तेवढ्या वेळेपर्यंत जीवांना मुक्तीच्या आनंदात राहणे, दु:ख न होणे तर ती काय लहान गोष्ट आहे ? आज खाणे-पिणे केले तरी उद्या भूक लागणारच असते. मग यासाठी उपाय कशाला करता ? क्षुधा, तृष्णा, क्षुद्र, धन, राज्य, प्रतिष्ठा, पत्नी, मुलेबाळे यांच्यासाठी उपाय करणे जर आवश्यक आहे तर मग मुक्तीसाठी प्रयत्न का करू नये ? ज्याप्रमाणे मरणे हे अटळ असले तरी आपल्या जगण्याचा उपाय केला जातो त्याचप्रमाणे मुक्तीनंतर पुन्हा परत येऊन जन्म घेण्यासारखे असले तरीसुद्धा मुक्तीसाठी प्रयत्न करणे अत्यावश्यक आहे.

## मुक्तीची साधने

**(प्रश्न)** मुक्ती मिळविण्याची काय साधने आहेत ?

**(उत्तर)** मुक्तीची काही साधने पूर्वी सांगितली आहेत. तरीपण विशेष उपाय हे आहेत. ज्याला मुक्ती हवी असेल त्याने प्रथम याच जन्मात जीवनमुक्त बनले पाहिजे. म्हणजे असे की ज्या मिथ्याभाषणादी पापकर्मांचे फळ दु:ख आहे. त्यांचा त्याग आणि सुखरूपी फळ देणाऱ्या सत्यभाषणादी धर्माचरण अवश्य करावे. ज्या कोणाला दु:खापासून सुटका व सुखाच्या प्राप्तीची इच्छा असेल त्याने अधर्म सोडून धर्माचे पालन केले पाहिजे. कारण दु:खाचे मूळ कारण पापाचरण आणि सुखाचे मूळ कारण धर्माचरण आहे.

सत्पुरुषांच्या संगतीने **विवेक** म्हणजे सत्यासत्य, धर्माधर्म, कर्तव्याकर्तव्याचा निश्चय अवश्य करावा यांविषयी त्यातील भेद जाणून घ्यावा; आणि शरीर अर्थात जीवाच्या पंचकोशाच्या संबंधी विचार करावा. (हे **पंचकोश** असे आहेत) :- एक **'अन्नमय'** कोश. हा त्वचेपासून हाडांपर्यंतचा समुदाय पृथ्वीमय आहे. दुसरा **'प्राणमय'** कोश. ज्यात 'प्राण' म्हणजे आतून बाहेर जातो तो 'अपान' म्हणजे बाहेरून आत येणारा वायु, 'समान' म्हणजे नाभीमध्ये राहून साऱ्या शरीरात रस पोहचवितो तो वायु, 'उदान' म्हणजे कंठामध्ये राहून अन्न पाणी ओढतो आणि बलपराक्रम वाढवितो तो वायु आणि 'व्यान' म्हणजे जीव ज्याच्यापासून शरीराच्या साऱ्या

हालचाली करतो तो वायु. तिसरा '**मनोमय**' कोश. याच्यामध्ये मनासह अहंकार, वाणी, पाय, हात, गुदा व जननेंद्रिय ही पाच कर्मेंद्रिये आहेत. चौथा '**विज्ञानमय**' कोश. यामध्ये बुद्धी, चित्त आणि कान, त्वचा, डोळे, जीभ व नाक ही पाच ज्ञानेंद्रिये ज्यांच्या योगाने जीव ज्ञानविषयक व्यवहार करतो. पाचवा '**आनंदमय**' कोश. यामध्ये प्रीती, प्रसन्नता, अल्प आनंद, भरपूर आनंद, आनंद आणि याचा आधार कारणरूप प्रकृती आहे. या पाच कोशांच्या योगाने जीव सर्व प्रकारची कर्मोपासना व ज्ञानादी व्यवहार करतो.

**तीन अवस्था :-** जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्था आहेत.

**तीन शरीरे :-** जे आपल्याला दिसते ते '**स्थूल शरीर**' होय. पाच प्राण, पाच ज्ञानेंद्रिये, पाच सूक्ष्म भूते, मन आणि बुद्धी या सतरा तत्त्वांच्या समुदायाला '**सूक्ष्म शरीर**' म्हणतात. हे सूक्ष्म शरीर जन्ममरणादी अवस्थांमध्ये ही जीवाबरोबर राहते. याचे दोन भेद आहेत. एक भौतिक व दुसरे स्वाभाविक, भौतिक जे सूक्ष्मशरीर सूक्ष्मभूतांच्या अंशांनी बनलेले आहे. स्वाभाविक सूक्ष्मशरीर जे जीवाचे स्वाभाविक गुणरूप आहे. हे दुसरे अभौतिक (सूक्ष्मशरीर) मुक्तीमध्येही जीवाबरोबर राहते. त्याच्या योगानेच जीव मुक्तावस्थेत सुखाचा उपभोग घेतो. तिसरे '**कारण शरीर**' होय. त्यामध्ये सुषुप्तीचा म्हणजे गाढ निद्राच असते. ते मूळ प्रकृतीरूप असल्यामुळे सर्वत्र विभु व सर्व जीवांसाठी एक (सारखे) आहे. चौथे '**तुरीय शरीर**' या शरीरामध्ये जीव समाधिस्थ होऊन परमेश्वराच्या आनंदस्वरूपात मग्न होतात. या समाधी संस्कारजन्य शुद्ध शरीराचा पराक्रम मुक्तीमध्येही यथावत सहायक होत राहतो.

हे सारे कोष व अवस्था यांहून जीव पृथक आहे. कारण अवस्थांहून जीव वेगळा आहे हे सर्वांना माही आहे. जेव्हा माणूस मरतो तेव्हा सगळेजण म्हणतात की जीव निघून गेला. हाच जीव सर्वांचा प्रेरक, धर्ता, साी कर्ता व भोक्ता आहे. जर कोणी असे म्हणेल की जीव हा कर्ता व भोक्ता नाही, तर तो अज्ञानी अविवेकी अहे, असे समजावे. कारण जीवविरहित जे सारे जड पदार्थ आहेत, त्यांना सुख-दुःखांचा उपभोग किंवा पापपुण्याचे कर्तृत्व कधीही होऊ शकत नाही. होय! त्यांच्या साह्याने जीव हा पाप-पुण्यांचा कर्ता व सुख-दुःखांचा भक्ता (असतो) जेव्हा इंद्रिये विषयांमध्ये, मन इंद्रियांमध्ये आणि आत्मा मनाशी संयुक्त होऊन, प्राणांना प्रेरणा ऊन चांगली किंवा वाईट कृत्ये करावयास लावतो, तेव्हाच तो बहिर्मुख होत असतो. त्याच वेळी आतून अंद, उत्साह, निर्भयता आणि वाईट कृत्य करण्यात भय, शंका व लज्जा उत्पन्न होते. ती अंतर्यामी परमेश्वची शिकवण आहे. जो प्राणी या शिकवणीप्रमाणे वागतो, त्यालाच मुक्तिजन्य सुखे प्राप्त होतात; आणि जो वणी त्याच्या विरुद्ध वर्तन करतो, तो बंधजन्य दुःखे भोगत असतो.

दुसरे साधन '**वैराग्य**' हे आहे. विवेकाद्वारे सत्यासत्य जाणले असेल, त्यातील सत्याचरणाचे ग्रण व असत्याचरणाचा त्याग करणे हा विवेक होय. पृथ्वीपासून परमेश्वरापर्यंत सर्व पदार्थांचे गुण, कर्म, स्भाव जाणून परमेश्वराच्या आज्ञेचे पालन आणि त्याच्या उपासनेत तत्पर राहणे, त्याविरुद्ध आचरण न करणे, सृष्टिपासून उपकार करून घेणे, हा **विवेक** म्हटला जातो.

यानंतर तिसरे साधन '**षट्क सम्पत्ति**' हे आहे. म्हणजे सहा प्रकारची कर्मे करणे. ती अशी:- (१) **शम'** ज्यात आपल्या आत्म्याला व अंतःकरणाला अधर्माचरणापासून परावृत्त करून धर्माचरणात सदैव प्रवृत्त वणे.

(२) **'दम'** ज्यात श्रोत्रादी इंद्रिये आणि शरीर यांना व्यभिचारादी दुष्कृत्यांपासून दूर ठेवून जितेंद्रियत्वादी शुभ कर्मांमध्ये प्रवृत्त करणे. (३) **'उपरति'** दुष्कृत्ये करणाऱ्या माणसापासून सदैव दूर राहणे. (४) **'तितिक्षा'** कितीही निंदा, स्तुती, हानी, लाभ झाला तरी हर्ष-शोक सोडून मुक्तीच्या साधनांमध्ये सदैव संलग्न होणे. (५) **'श्रद्धा'** वेदादी सत्यशास्त्र आणि त्यातील ज्ञानाने प्रबुद्ध विद्वान, आप्त सत्योपदेशक, महानुभावाच्या रचनावर विश्वास ठेवणे. (६) **'समाधान'** चित्ताची एकाग्रता ही षटकसंपत्ती मिळून मुक्तीचे तिसरे साधन म्हटले जाते.

**'मुमुक्षुत्व'** हे चौथे साधन होय. ज्याप्रमाणे भूक व तहान यांनी व्याकुळ झालेल्या माणसाला अन्न व पाणी यांशिवाय दुसरे काही सुचत नाही त्याप्रमाणे मुक्ती व मुक्तीची साधने यांखेरीज दुसऱ्या कशातही प्रेम न वाटणे.

मोक्षप्राप्तीची ही चार साधने आहेत व चार अनुबंध म्हणजे साधनांच्या नंतर ही कर्मे करावयाची असतात त्यांना अनुबंध असे म्हणतात. यातील जो :-

(१) **अधिकारी -** या चार साधनांनी युक्त असणारा पुरुषच मोक्षाचा **'अधिकारी'** होतो.

(२) **संबंध -** ब्रह्मप्राप्तिस्वरूप मुक्ती हा प्रतिपाद्य विषय आणि वेदादी शास्त्रे ही प्रतिपादकाला यथायोग्य समजून अन्वय करणे याला **'संबंध'** म्हणतात.

(३) **विषयी -** सर्व शास्त्रांचा प्रतिपाद्य विषय जे ब्रह्म, त्याचा प्राप्तिरूपी विषय असणाऱ्या पुरुषाचे नाव **'विषयी'** आहे.

(४) **प्रयोजन -** सर्व दु:खांची निवृत्ती आणि परमानंदाची प्राप्ती होऊन मुक्तीचे सुख मिळणे हे **'प्रयोजन'** आहे. अशा प्रकारे अधिकारी, संबंध, विषयी व प्रयोजन यांना **'अनुबंध चतुष्टय'** असे म्हणतात.

यानंतर **'श्रवणचतुष्टय'**

(१) **श्रवण -** जेव्हा कोणी विद्वान उपदेश करतो; तेव्हा तो शांतपणे, ध्यान देऊन ऐकणे, विशेषत: ब्रह्मविद्येचा उपदेश एकाग्रचित्ताने ऐकला पाहिजे. ही सर्व विद्यांमध्ये सर्वात अधिक सूक्ष्म विद्या आहे. याला **'श्रवण'** असे म्हणतात.

(२) **मनन -** ऐकल्यानंतर एकान्त स्थानी बसून ऐकलेल्यावर विचार करणे. ज्या गोष्टीविषयी शंका असेल ती पुन: विचारणे आणि ऐकत असतानाही वक्ता व श्रोता यांची हरकत नसल्यास पुन: विचारणे व आपले समाधान करून घेणे, याला **'मनन'** असे म्हणतात.

(३) **निदिध्यासन -** श्रवण व मनन केल्यानंतर सर्व संदेह दूर होतो तेव्हा समाधीस्थ होऊन जी गोष्ट ऐकली होती व जिच्याविषयी विचार केला होता ती तशीच आहे की नाही हे ध्यानयोगाने पाहणे म्हणजे **'निदिध्यासन'** होय.

(४) **साक्षात्कार -** पदार्थांचे जे काही स्वरूप, गुण व स्वभाव असेल ते जसेच्या तसे जाणणे म्हणजे **'साक्षात्कार'** होय. या चारांना 'श्रवणचतुष्टय' म्हटले जाते.

नेहमी क्रोध, मलिनता, आळस, प्रमाद आदी तमोगुण ईर्ष्या, द्वेष, काम, अभिमान, विक्षेप आदी रजोगुण यांचा त्याग करून सत्य अर्थात शांत प्रकृति, पवित्रता, विद्या, विचार इत्यादी सत्त्वगुणांना धारण करावे.

(मैत्री) सुखी जनांशी मित्रता, (करूणा) दुःखी जनांवर दया, (मुदिता) पुण्यात्म्यांकडून आनंदित होणे आणि (उपेक्षा) दुष्ट लोकांशी प्रेम अथवा वैर न करणे ही उपेक्षा होय.

मुमुक्षूने दररोज नियमाने कमीत कमी दोन तास अवश्य ध्यानधारणा करावी. ज्यामुळे आंतरिक मन आदी पदार्थाचा साक्षात्कार व्हावा.

पाहा! आपण चेतनस्वरूप आहोत, म्हणूनच ज्ञानस्वरूप व मनाचे साक्षी आहोत. कारण जेव्हा मन शांत, चंचल, आनंदित किंवा विषादयुक्त होते तेव्हा त्याला यथायोग्य जाणले जाते तसेच इंद्रिये, प्राण इत्यादींचा ज्ञाता, पूर्वी पाहिलेल्या गोष्टींचा स्मरणकर्ता आणि एकाच वेळी अनेक पदार्थांना जाणणारा, धारण व आकर्षण करणारा आणि सर्वांहून वेगळा (आत्मा) आहे. तो असा वेगळा नसता तर तो स्वतंत्र कर्ता यांचा प्रेरक व अधिष्ठाता कधीही होऊ शकला नसता.

**अविद्याऽस्मितारागद्वेषाभिनिवेशाः पञ्च क्लेशाः ॥** योगशास्त्रे पादे २। सू. ३

अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश या पाच क्लेशांपैकी अविद्येविषयी यापूर्वी सांगितले आहे. दुसरे असे की बुद्धीस आत्म्याहून भिन्न न समजणे याला अस्मिता, सुख देणाऱ्या पदार्थावर प्रेम करणे याला राग, दुःखाचा तिरस्कार म्हणजे 'द्वेष' आणि सर्व प्राणीमात्रांची नेहमी अशी इच्छा असते की ''मी याच शरीरात सदैव राहावे; कधी मरू नये.'' मृत्यूच्या दुःखाचा हा जो त्रास तो 'अभिनिवेश' आहे. या पाच क्लेशांना योगाभ्यास विज्ञानाने त्यागून ब्रह्माची प्राप्ती करून मुक्तीच्या परमानंदाचा उपभोग घेतला पाहिजे.

**(प्रश्न)** जशी मुक्ती तुम्ही मानता तशी इतर कोणी मानीत नाहीत. पाहा! जैन लोक शिवपुरीत जाऊन तेथील मोक्षशिळेवर मौन धारण करून बसल्यास मोक्ष मिळतो. ख्रिस्ती लोकांच्या मते चौथ्या स्वर्गात (आकाशात) प्रवेश मिळवून गाणे-बजावणे, विवाह व लढाई करणे आणि उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करून आनंद उपभोगणे याचप्रमाणे मुसलमान लोक सातव्या आकाशात, वाममार्गी लोक श्रीपुर, शैव कैलास, वैष्णव वैकुंठ, गोकुळ गोसावी गोलोक इत्यादी ठिकाणी जाऊन तेथे सुंदर स्त्रिया, खाणे-पिणे, वस्त्र व निवासस्थान मिळवून आनंदात राहण्यास मुक्ती समजतात. पौराणिक लोक (सालोक्य) ईश्वराच्या लोकात निवास, (सानुज्य) लहान भावाप्रमाणे ईश्वराजवळ राहणे, (सारूप्य) उपास्य दैवताच्या आकृति प्रमाणे आपण बनणे, (सामीप्य) सेवकाप्रमाणे ईश्वराच्या सान्निध्यात राहणे आणि (सायुज्य) ईश्वराशी संयुक्त होणे, असे मुक्तीचे चार प्रकार मानतात. वेदांती लोक ब्रह्मामध्ये लय (विलीन) होण्याला मोक्ष समजतात. (यात काय सत्य आहे?)

**(उत्तर)** जैन, ख्रिस्ती व मुसलमान यांच्या मोक्षविषय आम्ही अनुक्रमे बाराव्या, तेराव्या व चौदाव्या समुल्लासात विस्ताराने लिहिणार आहोत. वाममार्गी लोक श्रीपूरला जाऊन तेथे लक्ष्मीसारख्या स्त्रियांचा उपभोग घेणे, मद्यमांसादी खाणे-पिणे आणि भोग विलास करणे याला मुक्ती समजतात. परंतु त्यात इहलोकातील जीवनापेक्षा वेगळे असे काहीं विशेष नाही तसेच महादेव व विष्णु प्रमाणे स्वतःची रूपे करणे शैव व वैष्णव लोक कैलासाला व वैकुंठाला जाऊन आणि पार्वती व लक्ष्मी यांसारख्या स्त्रियांच्या संगतीत आनंद उपभोगणे, याला मोक्ष असे समजतात. त्यांच्या या कल्पनेत येथील धनाढ्य राजापेक्षा लोक एवढेच अधिक आहे की तेथे रोग

नसतील व तारुण्य चिरकाल टिकून राहील. त्यांचा हा समज अगदी खोटा आहे. कारण जेथे भोग तेथे रोग व जेथे रोग तेथे वृद्धावस्था अवश्य होईल.

पौराणिकांना विचारले पाहिजे की तुम्ही जिला चार प्रकारची (चतुर्विध) मुक्ती असे म्हणता, तशी तर कृमी, कीटक, पतंग, पशू, पक्षी इत्यादिकांना ती स्वत:सिद्ध प्राप्त आहे. कारण हे जितके लोक आहेत ते सर्व ईश्वराचे आहेत यातच सर्व लोक राहतात म्हणून त्यांना सालोक्य मुक्ती अनायास प्राप्त होते. ईश्वर सर्वत्र व्यापक असल्यामुळे सारे जीव त्याच्या जवळच असतात. त्यामुळे 'सामीप्य' मुक्ती ही स्वत:सिद्ध आहे. जीव हा ईश्वराहून सर्व प्रकारे लहान व चेतन असल्यामुळे स्वत: तो ईश्वराचा धाकटा भाऊच आहे. म्हणून 'सानुज्य' मुक्तीही विनासायास सिद्ध आहे आणि सारे जीव सर्वव्यापक परमेश्वरामध्ये व्याप्य असल्यामुळे ते त्याच्याशी संयुक्त आहेत. म्हणजे 'सायुज्य' मुक्तीही स्वत:सिद्ध आहे.

आणि जे इतर सर्वसामान्य नास्तिक लोकांच्या मताने की मनुष्य मेल्यानंतर त्याचे शरीर पंचतत्त्वामध्ये विलीन होते, तीच परममुक्ती मानतात. ती तर कुत्री व गाढवे यांनाही प्राप्त होते. ह्या मुक्ती नसून ते एक प्रकारचे बंधन आहे. कारण हे लोक शिवपुरी, मोक्ष शिला, चौथे आकाश, सातवे आकाश, श्रीपूर, कैलास, वैकुंठ, गोलोक ही विशिष्ट प्रदेशातील स्थाने आहेत असे मानतात. या स्थानांपासून ते दूर गेले तर त्यांची मुक्ती निसटून जाते. म्हणजे जसे १२ (बारा) दगडात दृष्टिबंध होतो त्यासारख्याच बंधनात असतील. मुक्तीमध्ये जीवाला त्याच्या इच्छेप्रमाणे कोठेही संचार करता आला पाहिजे. कोठेही आडकाठी असता कामा नये. त्याला न भय, न शंका, न दु:ख होत नाही. आत्म्याचे शरीराशी मीलन झाले की त्याला जन्म किंवा उत्पत्ति म्हणतात; आणि त्याला मरण किंवा प्रलय म्हणतात. मुक्त झालेले आत्मे योग्य वेळी पुन:जन्म घेतात.

## पुर्नजन्म

**(प्रश्न)** जन्म एक आहे की अनेक ?

**(उत्तर)** अनेक.

**(प्रश्न)** जर अनेक जन्म असतील तर पूर्वजन्म आणि मृत्यूच्या गोष्टीचे स्मरण माणसाला का नाही ?

**(उत्तर)** जीव हा अल्पज्ञ आहे. तो त्रिकालदर्शी नाही. त्यामुळे त्याला स्मरण राहत नाही. शिवाय ज्या मनाने त्याला ज्ञान प्राप्त होते ते मन एका वेळी दोन गोष्टींचे ज्ञान ग्रहण करू शकत नाही. पूर्वजन्माची गोष्ट तर दूरच राहू द्या, पण याच जन्मात जीव जेव्हा गर्भामध्ये होता त्याचे शरीर बनले नंतर जन्मला तेव्हा प्रथम पाच वर्षापर्यंतच्या काळात घडलेल्या गोष्टींचे स्मरण तो का करू शकत नाही ? तसेच जागृती व स्वप्न या दोन अवस्थांमध्ये झालेल्या अनेक व्यवहार प्रत्यक्ष करूनही त्याचे स्मरण सुषुप्तीमध्ये म्हणजे गाढ झोपेत असताना जागृत अवस्थेतील व्यवहाराचे स्मरण त्याला का होत नाही ? तुम्हाला जर कोणी विचारले की, ''बारा वर्षापूर्वी तेराव्या वर्षाच्या, पाचव्या महिन्याच्या नवव्या दिवशी दहा वाजून एक मिनिटानी तुम्ही काय केले होते ? तुमचे तोंड, हात, कान, डोळे, शरीर कोणत्या बाजूला व कोणत्या अवस्थेत होते ? आणि मनात कोणता विचार होता ?'' याच जन्मात अशी स्थिती आहे तर मागील जन्मातील गोष्टींच्या स्मरणाबाबत शंका करणे केवळ पोरकटपणाची गोष्ट आहे.

आणि मागच्या जन्मातील गोष्टींचे स्मरण राहत नाही म्हणूनच जीव सुखी आहे. नाहीतर सर्व जन्मांतील दुःखांच्या आठवणीने तो भयंकर दुःखी होऊन मरून गेला असता. आपल्या पूर्वीच्या व नंतरच्या जन्मातील हकीगत जाणण्याची इच्छा केली तरीसुद्धा तो जाणू शकत नाही. कारण जीवाचे ज्ञान व स्वरूप अल्प आहे. ही गोष्ट ईश्वराच्या जाणण्याची आहे. जीवांसाठी योग्य नाही.

**(प्रश्न)** जर जीवाला पूर्वजन्माचे ज्ञान नाही आणि ईश्वराने त्याला दिलेल्या शिक्षेने त्याची सुधारणा कशी होणार? कारण आपण अमुक एक कर्म केले होते व त्याचेच फळ आपल्याला भोगावे लागत आहे हे त्याला समजले तरच तो पापकर्मापासून परावृत्त राहील ना?

**(उत्तर)** तुम्ही ज्ञान किती प्रकारचे मानता?

**(प्रश्न)** प्रत्यक्षादी प्रमाणांद्वारे ज्ञान आठ प्रकारचे असते.

**(उत्तर)** तर जेव्हा या जन्मापासून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या राज्य, धन, बुद्धि, विद्या, दारिद्र्य, निर्बुद्धता, मूर्खता आदी सुख, दुःख जगात पाहून पूर्वजन्माचे ज्ञान तुम्ही का करीत नाही? उदाहरणार्थ, एक अवैद्य व एक वैद्य यांना एखादा रोग झाला असता त्याचे निदान म्हणजे कारण वैद्याला समजते. अवैद्य जाणू शकत नाही. कारण वैद्याने वैद्यकशास्त्राचे अध्ययन केलेले असते. तसे ते अवैद्याने केलेले नसते. परंतु ज्वरासारखा एखादा आजार झाल्यास अवैद्यालाही एवढे समजते की आपल्याकडून काहीतरी कुपथ्य झाले, म्हणून मला हा आजार झाला आहे. याचप्रमाणे जगातील विचित्र सुख-दुःखाची वाढ व घट पाहून तुम्ही पूर्वजन्माचे अनुमान का जाणू शकत नाही? आणि तुम्ही पूर्वजन्म मान्य केला नाही तर परमेश्वर पक्षपाती होऊन जाईल. कारण पाप केल्याशिवाय दारिद्र्यादी दुःख आणि पूर्वसंचित पुण्याशिवाय राज्य, संपत्ती, बुद्धिमत्ता त्याला का दिली? पूर्वजन्मी केलेल्या पापपुण्यानुसार परमेश्वर जीवाला सुखदुःख देतो. त्यामुळे तो न्यायकारी योग्य प्रकारे राहतो.

**(प्रश्न)** एकच जन्म मानला तरी परमेश्वर न्यायी होऊ शकतो. जसे सर्वोच्च राजा जे करतो तोच न्याय समजला जातो. माळी आपल्या बागेत लहान व मोठी झाडे लावतो, काहींना कापून किंवा उपटून टाकतो, तर काहींचे रक्षण करून ती वाढवतो. ज्याची जी वस्तू असेल त्याने ती वाटेल तशी ठेवावी. ज्याअर्थी ईश्वरच साऱ्या सृष्टीत मोठा आहे, त्याचा न्यायनिवाडा करणारा, त्याच्यावरचा असा दुसरा कोणीही नाही. त्याला कोणीच शिक्षा करू शकत नाही. म्हणून ईश्वरास कोणाचेही भय नाही. तो जे करतो तेच न्याय आहे असे समजले पाहिजे.

**(उत्तर)** परमेश्वर ज्याचेसाठी न्याय इच्छितो व करतो तो कधीच अन्याय करीत नाही. म्हणूनच तो पूज्य व श्रेष्ठ आहे. जर तो अन्याय करील तर तो ईश्वरच नव्हे. जर एखादा माळी अविचाराने मार्गात अथवा अस्थानी वृक्ष लावील, जी झाडे कापावयाची नाहीत ती कापून टाकील, अयोग्य झाडांची वाढ करील व योग्य झाडे उपटून टाकील तर दोषी समजला जातो. याचप्रमाणे ईश्वर जर एखादी गोष्ट कारणाशिवाय करील तर तोही दोष ईश्वरास लागेल. परमेश्वर स्वभावतःच पवित्र व न्यायी असल्यामुळे न्याययुक्त काम करणे त्याला आवश्यक असते. तो वेड्यासारखा काम करू लागला तर तो या जगातील श्रेष्ठ न्यायाधीशाहूनही न्यून व अश्रेष्ठ समजला जाईल या जगात विना योग्यतेशिवाय उत्तम कर्म करणाराची प्रतिष्ठा आणि दुष्कर्म केल्याशिवाय शिक्षा देणारा निंदनीय व अप्रतिष्ठित समजला जात नाही काय? म्हणून ईश्वर अन्याय करीत नाही व म्हणूनच तो कोणाला भीत नाही.

**(प्रश्न)** परमेश्वराने आधीपासूनच ज्याला जेवढे द्यावयाचे ठरविले असेल तेवढे त्याला देतो आणि जेवढे काम करावयाचे असेल तेवढे करतो.

**(उत्तर)** त्याचा निर्णय जीवांच्या कर्मानुसार होतो अन्यथा नाही. तो जर अन्यथा करील तर तो अपराधी व अन्याय करणारा ठरेल.

**(प्रश्न)** लहानमोठ्यांना सारखेच दु:ख भोगावे लागते. मोठ्यांची काळजी मोठी तर लहानांची काळजी लहान. जसे, एखाद्या सावकाराचा लाख रुपयांचा खटला कचेरीत चालू असेल आणि तो उन्हाळ्यामध्ये आपल्या घरून पालखीत बसून कचेरीत म्हणजे न्यायालयात जात असेल तर, तो बाजारपेठेतून जात असताना त्याला पाहून अज्ञानी लोक म्हणतात, "हे पाहा! पापपुण्याचे फळ. एकजण मजेत पालखीमध्ये बसला आहे तर दुसरे अनवाणी तळपत्या उन्हात घामाघूम होत खांद्यावर पालखी घेऊन चालले आहेत." परंतु कारण शहाण्या लोकांना माहीत असते की जसजशी कचेरी जवळ येत जाते तसतशी सावकाराची काळजी, संदेह वाढत जातो आणि मुक्कामाचे ठिकाण जवळ येत असल्याचे पाहून भोयांना आनंद होतो. कचेरीत पोचल्यानंतर शेटजी इकडेतिकडे पाहून आपण वकिलाकडे जावे की शिरस्तेदाराकडे जावे याचा विचार करू लागतात. आज आपण जिंकणार की हरणार? कोण जाणतो काय होईल! इकडे भोई लोक तंबाखू ओढत, एकमेकांशी गप्पागोष्टी करीत, मजेत, निश्चिंतपणे ताणून देतात. सावकाराने खटला जिंकला तर त्याला सुख होते; आणि तो हरला तर तो दु:खसागरात बुडून जातो. उलट भोई मात्र पूर्वी जसे होते तसेच राहतात.

याचप्रमाणे राजा सुंदर, मऊ, गुबगुबीत बिछान्यावर झोपतो, तरी त्याला लवकर झोप येत नाही आणि कामगार खडखडीत, उंचसखल जमिनीवर झोपतो तेव्हा जमिनीला पाठ टेकताच त्याला झोप लागते. हीच गोष्ट सर्वत्र जाणावी.

**(उत्तर)** असे मानणे अज्ञानी लोकांचे आहे. भोयाला सुखाने झोप लागते म्हणून एखाद्या सावकाराला तू भोई बनून जा असे सांगितले तर तो भोई बनेल काय? मात्र भोई लोक सावकार बनण्याची इच्छा ठेवतील. जर सुखदु:ख समान असते तर आपापली स्थिती सोडून नीच व श्रेष्ठ बनणे ही दोघांची इच्छा नसती.

असे पाहा! एक जीव विद्वान, पुण्यात्मा, श्रीमान, राजाच्या राणीच्या पोटी जन्म घेतो आणि दुसरा महादरिद्री मोलकरणीच्या पोटी जन्माला येतो. एकाला गर्भावस्थेपासून सर्व प्रकारचे सुख मिळते आणि दुसऱ्याला सर्वप्रकारचे दु:ख मिळते. पहिला जन्माला येतो तेव्हा त्याची नाळ काळजीपूर्वक कापली जाते आणि सुंदर सुगंधित पाण्याने त्याला न्हाऊ घालण्यात येते. त्याला दुग्धपान वगैरे गोष्टी यथायोग्य मिळतात. त्याला दूध पिण्याची इच्छा होते तेव्हा साखर वगैरे घातलेले दूध भरपूर प्रमाणात त्याला मिळते. त्याला आनंदित ठेवण्यासाठी नोकर-चाकर खेळणी, उत्तम स्थानी जाण्यासाठी वाहन व्यवस्था या लाडाने तो त्याचा आनंद होतो. याउलट दुसऱ्याचा जन्म जंगलात होतो. त्याला आंघोळीसाठी पाणी देखील मिळत नाही. जेव्हा तो दूध मागतो तेव्हा त्याला दुधाऐवजी चापटांचा मार बसतो. तो कळवळून रडू लागला तरी त्याला कोणी विचारीत नाही. अशा प्रकारे जीवांना पापपुण्याचा विचार न करता सुख-दु:खे भोगावी लागली तर त्याचा दोष परमेश्वराकडे जातो.

शिवाय जर कर्माविना सुख दु:ख मिळते तर भविष्यात स्वर्ग नरकसुद्धा असावयास नको. कारण जसे

परमेश्वराने बऱ्या-वाईट कर्मांचा विचार न करता इहलोकी सुख किंवा दु:ख दिले आहे तसेच मृत्यूनंतरसुद्धा तो त्याच्या मनास येईल त्याप्रमाणे कोणाला स्वर्गात पाठवील तर कोणाला नरकात ढकलेल. अशा स्थितीत सारे जीव अधर्माचरण करू लागतील. त्यांनी धर्माचरण का करावे ? कारण धर्माचरणाचे फळ मिळण्यात संदेह निर्माण होईल. सारे काही परमेश्वराच्या हातात आहे, त्याची जशी मर्जी असेल तसे तो करील, त्यामुळे पापकर्मांची भीती न राहता जगात पापाची वृद्धी व धर्माचा क्षय होईल. म्हणून पूर्व जन्मातील पापपुण्यानुसार वर्तमान जन्म मिळतो आणि या जन्मात तथा मागील जन्मात केलेल्या कर्मानुसार पुढील जन्म होईल.

**(प्रश्न)** माणूस आणि अन्य पशुपक्षी वगैरे यांच्या शरीरात एकाच प्रकारचा जीव असतो की वेगवेगळ्या प्रकारचे जीव असतात ?

**(उत्तर)** जीव एकाच प्रकारचे आहेत. परंतु त्यांच्या पापपुण्यानुसार ते मलिन किंवा पवित्र असतात.

**(प्रश्न)** मनुष्याच्या शरीरातील जीव पशुपक्ष्यांच्या शरीरात आणि पशुपक्ष्यांच्या शरीरातील जीव माणसाच्या शरीरात, तसेच पुरुषाचा जीव स्त्रीच्या शरीरात व स्त्रीचा जीव पुरुषाच्या शरीरात जातो-येतो की नाही ?

**(उत्तर)** होय, येतो जातो. कारण जेव्हा पाप वाढते व पुण्य कमी होते तेव्हा माणसाचा जीव पशुपक्ष्यांच्या नीच शरीरात जातो आणि जेव्हा धर्म अधिक व अधर्म कमी होतो तेव्हा जीवाला देवाचे म्हणजे विद्वानांचे शरीर मिळते आणि जेव्हा पापपुण्य समान असते तेव्हा जीवाला सामान्य माणसाचा जन्म मिळतो. यातही पापपुण्य जसे उत्तम, मध्यम व निकृष्ट असेल तसे मनुष्यादिकांचे उत्तम, मध्यम व निकृष्ट शरीरादि सामुग्री मिळते. जेव्हा अधिक पापाचे फळ पशुपक्ष्यांच्या शरीरात राहून भोगल्यानंतर पापपुण्य समान होते त्यामुळे पुन: जीव मनुष्याच्या शरीरात येतो आणि पुण्याचे फळ भोगून तो सामान्य मनुष्याच्या शरीरात प्रवेश करतो.

जेव्हा जीवाचा किंवा आत्म्याचा शरीराशी संयोग म्हणजे 'जन्म' आणि जेव्हा तो शरीरातून बाहेर पडतो तेव्हा त्याचे नाव 'मृत्यू' होय. जेव्हा तो शरीराचा त्याग करतो तेव्हा तो यमालयात म्हणजे आकाशस्थ वायूमध्ये राहतो कारण 'यमेन वायुना' म्हणजे वायूचे नाव यम आहे असे वेदात लिहिले आहे. हा गरूडपुराणातील कल्पित यम नव्हे. या मुद्याचे विशेष खंडन-मंडन अकराव्या समुल्लासात लिहिले जाईल.

नंतर धर्मराज म्हणजे परमेश्वर त्या जीवाला त्याच्या पापपुण्यानुसार जन्म देतो. तो वायु, अन्न, जल अथवा शरीरातील छिद्र यांच्या द्वारा दुसऱ्याच्या शरीरात ईश्वराच्या प्रेरणेने प्रविष्ट होतो. शरीरात प्रविष्ट झाल्यानंतर क्रमाने वीर्यात जाऊन गर्भात स्थित होतो व शरीर धारण करून बाहेर येतो. जर त्याची कर्मे स्त्रीचे शरीर धारण करण्यास योग्य असतील तर स्त्रीचे आणि पुरुषाचे शरीर धारण करण्यास योग्य असतील तर पुरुषाच्या शरीरात प्रवेश करतो. नपुंसक गर्भाचेवेळी स्त्री-पुरुषांच्या शरीर संबंधात रज व वीर्य समान असतात.

अशाप्रकारे जोपर्यंत उत्तम कर्मे, उपासना व ज्ञान यांच्या द्वारे जीव मुक्ती मिळवीत नाही तोपर्यंत तो नाना प्रकारच्या जन्ममरणाच्या फेऱ्यात अडकून पडतो. कारण उत्तम कर्मे आदी केल्याने जीवाला मनुष्यांमध्ये उत्तम जन्म मिळतो आणि मुक्तीमध्ये महाकल्पापर्यंत जन्म-मरणाच्या दु:खापासून मुक्त होऊन तो आनंदात राहतो.

**(प्रश्न)** मुक्ती एकाच जन्मात मिळते की अनेक जन्मांत ?

**(उत्तर)** अनेक जन्मात कारण,

**भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ।**

**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे पराऽवरे ॥** मुंडक। खं. २। मं. ८

जेव्हा या जीवाच्या हृदयातील अविद्या व अज्ञानरूपी गाठ तुटून जाते, सर्व संशय नष्ट होतात आणि दुष्ट कर्मांचा क्षय होतो तेव्हाच आत्म्याच्या आत व बाहेर व्यापून राहिलेल्या परमेश्वरामध्ये जीव निवास करतो.

**(प्रश्न)** मुक्तीमध्ये परमेश्वरात जीव विलीन होतो की वेगळा राहतो ?

**(उत्तर)** वेगळा राहतो. कारण जर तो परमेश्वरामध्ये विलीन झाला तर मुक्तीचे सुख कोण भोगणार ? आणि मुक्तीची सारी साधने निरर्थक ठरतील. ती मुक्ती म्हणता येणार नाही. तो जीवाचा प्रलय जाणला पाहिजे जेव्हा जीव परमेश्वराच्या आज्ञेचे पालन, उत्तम कर्मे, सत्संग, योगाभ्यास आणि पूर्वी सांगितलेली सारी साधना करतो तेव्हाच तो मुक्ती मिळवितो.

**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन् ।**

**सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चितेति ॥** तैत्तेरी.। आनंद व अनु. १। खं. १

जो जीवात्मा आपली बुद्धी व आत्मा यांमध्ये असणाऱ्या सत्य, ज्ञान व अनंत आनंदस्वरूप परमेश्वराला जाणतो, तो त्या सर्वव्यापक ब्रह्मामध्ये स्थित होऊन त्या विपश्चित् म्हणजे अनंत विद्यायुक्त ब्रह्मासह सर्व कामनांना प्राप्त करून घेतो. अर्थात ज्या-ज्या आनंदाची अभिलाषा तो बाळगतो तो तो आनंद त्याला प्राप्त होतो. यालाच मुक्ती म्हटली जाते.

**(प्रश्न)** ज्याप्रमाणे जीवाला शरीरावाचून ऐहिक सुखे भोगता येत नाहीत, त्याप्रमाणे मुक्तीमध्ये शरीरावाचून तो आनंद कसा उपभोगू शकेल ?

**(उत्तर)** याचे उत्तर यापूर्वी दिले आहे आणि थोडे अधिक ऐकावे. ज्याप्रमाणे जीव शरीराच्या आधाराने ऐहिक सुखे भोगतो त्याप्रमाणे परमेश्वराच्या आधाराने जीवात्मा मुक्तीचा आनंद उपभोगतो. तो मुक्त जीव अनंत व्यापक ब्रह्मामध्ये स्वच्छंद विहार करतो, शुद्ध ज्ञानाने सारी सृष्टि पाहतो, इतर मुक्त जीवांना भेटतो, सृष्टि विद्येतील एकेका क्रमाने चमत्कार पाहून सर्व लोकलोकांतरामध्ये अर्थात जे लोक (गोल) दिसतात व जे दिसत नाहीत तेथेही भ्रमण करतो तो सर्व पदार्थांना जे त्याच्या ज्ञान कक्षेत आहेत त्या सर्वांना पाहतो. ज्ञान जेवढे अधिक होते तेवढा त्याचा आनंदही अधिक होतो. मुक्तीमध्ये जीवात्मा निर्मळ होत असल्याने तो पूर्ण ज्ञानी होऊन त्याला सन्निहित सर्व पदार्थांची जाणीव योग्य प्रकारे होते.

हाच सुखविशेष स्वर्ग आणि विषयतृष्णेमध्ये रूतून दुःख विशेष भोगणे म्हणजे नरक होय. 'स्वः' हे सुखाचे नाव आहे. **'स्वः सुखं गच्छति यस्मिन् स स्वर्गः ।', 'अतो विपरीतो दुःखभोगो नरक इति ।'** ऐहिक सुखाला सामान्य स्वर्ग असे म्हणतात आणि परमेश्वराच्या प्राप्तीने मिळणारा आनंद विशेष स्वर्ग म्हटला जातो.

सगळे जीव स्वभावतः सुखप्राप्तीची इच्छा आणि दुःखाचा त्याग करू इच्छितात. परंतु जोपर्यंत धर्माचरण करीत नाहीत व पापाचरण सोडत नाहीत तोपर्यंत त्यांना सुख मिळत नाही व त्यांचे दुःख दूर होत नाही. कारण ज्या वस्तूचे कारण म्हणजे मूळ विद्यमान असते ती कधी नष्ट होत नाही. जसे

**छिन्ने मूले वृक्षो नश्यति तथा पापे क्षीणे दुःखं नश्यति।**

ज्याप्रमाणे मूळ कापले गेल्याने वृक्ष नष्ट होतो त्याप्रमाणे पापाचा त्याग केल्याने दुःख नष्ट होते. मनुस्मृतिमध्ये पाप आणि पुण्याचे अनेक प्रकारे विवेचन करण्यात आले आहे. ते असे :-

## पाप व शिक्षा

**मानसं मनसैवायमुपभुङ्क्ते शुभाऽशुभम्।**
**वाचा वाचा कृतं कर्म कायेनैव च कायिकम् ॥१॥** मनु. अ. १२ श्लो. ८

अशाप्रकारे मनुष्याने आपला श्रेष्ठ, मध्यम व निकृष्ट स्वभाव जाणून उत्तम स्वभावाचे ग्रहण आणि मध्यम व निकृष्ट स्वभावाचा त्याग करावा. त्याने हेही निश्चयपूर्वक जाणावे की हा जीव मनाने जे शुभाशुभ कर्म करतो त्याने मनाने, वाणीने केलेल्या कर्मांचे वाणीने आणि शरीराने केलेल्या कर्मांचे शरीराने फळ म्हणजे सुख दुःख भोगतो. ॥१॥

**शरीरजैः कर्मदोषैर्याति स्थावरतां नरः।**
**वाचिकैः पक्षिमृगतां मानसैरन्त्यजातिताम् ॥२॥** मनु. अ. १२ श्लो. ९

जो मनुष्य शरीराने चोरी, परस्त्रीगमन, श्रेष्ठांना मारणे इत्यादी दुष्ट कृत्ये करतो त्याला वृक्षादी स्थावराचा जन्म; वाणीने केलेल्या पापांबद्दल पशुपक्ष्यांचे आणि मनाने केलेल्या दुष्कृत्यांबद्दल चांडाळा इत्यादींचे शरीर त्याला मिळते. ॥२॥

**यो यदैषां गुणो देहे साकल्येनातिरिच्यते।**
**स तदा तद्गुणप्रायं तं करोति शरीरिणम् ॥३॥** मनु. अ. १२ श्लो. २५

या जीवांच्या देहांमध्ये जो गुण अधिक प्रमाणात असतो तो गुण त्या-त्या जीवाला आपल्यासारखा करून देतो. ॥३॥

**सत्त्वं ज्ञानं तमोऽज्ञानं रागद्वेषौ रजःस्मृतम्।**
**एतद् व्याप्तिमदेतेषां सर्वभूताश्रितं वपुः ॥४॥** मनु. अ. १२ श्लो. २६

जेव्हा आत्म्यामध्ये ज्ञान असते तेव्हा सत्त्वगुण, अज्ञान असते तेव्हा तमोगुण आणि जेव्हा राग, (मोह) द्वेषात आत्मा असतो तेव्हा त्या जीवामध्ये रजोगुण आहे हे जाणावे. प्रकृतीचे हे तीन गुण सर्व भौतिक पदार्थांमध्ये व्याप्त होऊन राहतात. ॥४॥

**तत्र यत्प्रीतिसंयुक्तं किञ्चिदात्मनि लक्षयेत्।**
**प्रशान्तमिव शुद्धाभं सत्त्वं तदुपधारयेत् ॥५॥** मनु. अ. १२ श्लो. २७

ह्याची ओळख या प्रकारे केली पाहिजे की :- जेव्हा आत्म्यामध्ये प्रसन्नता आणि मन प्रसन्न, प्रशांत, शुद्ध भावनायुक्त असते तेव्हा सत्त्वगुण प्रमुख बनला असून रजोगुण व तमोगुण गौण बनले आहेत असे समजावे. ॥५॥

**यत्तु दुःखसमायुक्तमप्रीतिकरमात्मनः।**
**तद्रजोऽप्रतिपं विद्यात्सततं हारि देहिनाम् ॥६॥** मनु. अ. १२ श्लो. २८

जेव्हा आत्मा व मन हे दु:खयुक्त, अप्रसन्न बनून विषयवासनांमध्ये इकडे तिकडे जाणे येणे करतात तेव्हा रजोगुण प्रमुख बनला असून सत्त्वगुण व तमोगुण गौण बनले आहेत असे समजावे. ॥६॥

**यत्तु स्यान्मोहसंयुक्तमव्यक्तं विषयात्मकम् ।**
**अप्रतर्क्यमविज्ञेयं तमस्तदुपधारयेत् ॥७॥** मनु. अ. १२ श्लो. २९

जेव्हा आत्मा व मन हे मोहात म्हणजे ऐहिक गोष्टीत रममाण झालेले असतात, जेव्हा आत्म्यात व मनात काही विवेक असत नाही आणि ते विषयासक्त होतात, तर्कवितर्क जाणण्यायोग्य असत नाही तेव्हा नक्की समजावे की यावेळी माझ्यात तमोगुण प्रधान आणि सत्त्वगुण व रजोगुण अप्रधान झाले आहेत. ॥७॥

**त्रयाणामपि चैतेषां गुणानां यः फलोदयः ।**
**अग्र्यो मध्यो जघन्यश्च तं प्रवक्ष्याम्यशेषतः ॥८॥** मनु. अ. १२ श्लो. ३०

आता या तीन गुणांमुळे जे उत्तम, मध्यम व कनिष्ठ फळ निर्मित होते त्याचे विस्ताराने विवेचन करतो. ॥८॥

**वेदाभ्यासस्तपो ज्ञानं शौचमिन्द्रियनिग्रहः ।**
**धर्मक्रियात्मचिन्ता च सात्त्विकं गुणलक्षणम् ॥९॥** मनु. अ. १२ श्लो. ३१

वेदांचा अभ्यास, धर्मानुष्ठान, ज्ञानाची वृद्धी, पावित्र्याची इच्छा, इंद्रियनिग्रह, धर्मकृत्ये व आत्मचिंतन करण्याची प्रवृत्ती हेच सत्त्वगुणाचे लक्षण आहे. ॥९॥

**आरम्भरुचिताऽधैर्य्यमसत्कार्यपरिग्रहः ।**
**विषयोपसेवा चाजस्रं राजसं गुणलक्षणम् ॥१०॥** मनु. अ. १२ श्लो. ३२

जेव्हा रजोगुणाचा उदय होतो आणि सत्त्व व तमोगुण यांचा अंतर्भाव होतो तेव्हा आरंभशूरत्व, धैर्य-त्याग, असत् कर्मांचे ग्रहण आणि निरंतर विषयसेवनामध्ये रुची असते. त्यावेळी आपल्यामध्ये रजोगुणाचे प्राधान्य झाले आहे, हे ओळखावे. ॥१०॥

**लोभः स्वप्नोऽधृतिः क्रौर्यं नास्तिक्यं भिन्नवृत्तिता ।**
**याचिष्णुता प्रमादश्च तामसं गुणलक्षणम् ॥११॥** मनु. अ. १२ श्लो. ३३

जेव्हा तमोगुणाचा उदय होतो आणि इतर दोन गुणांचा अंतर्धान होतो तेव्हा अत्यंत लोभ म्हणजे सर्व पापांचे मूळ वाढते, अत्यंत आळस, निद्रा, धैर्याचा नाश, क्रौर्य, नास्तिकता म्हणजे वेद व ईश्वर यांच्यावर श्रद्धा नसणे, अंत:करणाच्या वेगवेगळ्या वृत्ती प्रभावशाली बनणे आणि मनाच्या एकाग्रतेचा अभाव नाहीसा होणे, भेटेल त्याच्याकडे याचना करणे, प्रमाद म्हणजे मद्यपानादी वाईट व्यसनांधीन होणे इत्यादी गुण असतील. अशा वेळी आपल्यामध्ये तमोगुण वाढला आहे, हे ओळखावे. ॥११॥

**यत्कर्मकृत्वा कुर्वंश्च करिष्यंश्चैव लज्जति ।**
**तज्ज्ञेयं विदुषा सर्वं तामसं गुणलक्षणम् ॥१२॥** मनु. अ. १२ श्लो. ३५

अशी तमोगुणाची लक्षणे विद्वानांनी जाणण्यायोग्य आहेत तसेच जेव्हा आपला आत्मा ज्यामध्ये लज्जा, शंका व भयाने ग्रस्त होतो तेव्हा आपल्यामध्ये तमोगुणाची मात्रा खूपच वाढली आहे हे त्याने ओळखावे. ॥१२॥

**येनास्मिन्कर्मणा लोके ख्यातिमिच्छति पुष्कलाम् ।**

**न च शोचत्यसम्पत्तौ तद्विज्ञेयं तु राजसम् ॥१३॥** मनु. अ. १२ श्लो. ३६

ज्या एखाद्या कर्माच्या योगाने आपल्याला इहलोकी पुष्कळ प्रसिद्धी मिळावी असे जीवात्मा इच्छितो आणि दारिद्र्य आले असताही तोंडपुजे भाट, चारण वगैरे लोकांना धन देणे सोडत नाही तेव्हा समजावे की आपल्यामध्ये ते रजोगुण प्रबळ झाले आहेत. ॥१३॥

**यत्सर्वेणेच्छति ज्ञातुं यन्न लज्जति चाचरन् ।**

**येन तुष्यति चात्मास्य तत्सत्त्वगुणलक्षणम् ॥१४॥** मनु. अ. १२ श्लो. ३७

जेव्हा माणसाचा आत्मा सर्वांकडून जाणणे इच्छितो, गुण ग्रहण करीत जातो, सत्कर्म करण्यात लाजत नाही आणि जे कर्म केल्याने आत्मा प्रसन्न होतो, म्हणजे जेव्हा धर्माचरणातच इच्छा राहते तेव्हा आपल्यामध्ये सत्त्वगुण प्रबळ झाला आहे असे समजावे. ॥१४॥

**तमसो लक्षणं कामो रजसस्त्वर्थ उच्यते ।**

**सत्त्वस्य लक्षणं धर्मः श्रेष्ठ्यमेषां यथोत्तरम् ॥१५॥** मनु. अ. १२ श्लो. ३८

तमोगुणाचे लक्षण कामवासना, रजोगुणाचे लक्षण धनलिप्सा आणि सत्त्वगुणाचे लक्षण धर्मसेवा होय. परंतु तमोगुणापेक्षा रजोगुण व रजोगुणापेक्षा सत्त्वगुण श्रेष्ठ आहे. ॥१५॥

## गुणानुसार शरीरप्राप्ती

आता ज्या ज्या गुणामुळे जीव ज्या-ज्या गतीला प्राप्त होतो त्यांचे विवरण खाली लिहित आहे:-

**देवत्त्वं सात्त्विका यान्ति मनुष्यत्वंच राजसाः ।**

**तिर्यक्त्वं तामसा नित्यमित्येषा त्रिविधा गतिः ॥१॥** मनु. अ. १२ श्लो. ४०

जो मनुष्य सात्त्विक आहे तो देव म्हणजे विद्वान. जो रजोगुणी माणसांना असतो ते मध्यम श्रेणीचे मनुष्य आणि जे तमोगुणयुक्त असतील ते नीच गतीला प्राप्त होतात. ॥१॥

**स्थावराः कृमिकीटाश्च मत्स्याः सर्पाश्चः कच्छपाः ।**

**पशवश्च मृगाश्चैव जघन्या तामसी गतिः ॥२॥** मनु. अ. १२ श्लो. ४२

जे अत्यंत तमोगुणी असतात त्यांना स्थावर वृक्षादी स्थावरांचा, कृमी, कीटक, मत्स्य, सर्प, कासव, पशु व मृग यांचा जन्म मिळतो. ॥२॥

**हस्तिनश्च तुरङ्गाश्च शूद्रा म्लेंच्छाश्च गर्हिताः ।**

**सिंहा व्याघ्रा वराहाश्च मध्यमा तामसी गतिः ॥३॥** मनु. अ. १२ श्लो. ४३

जे मध्यम तमोगुणी असतात त्यांना हत्ती, घोडे, शूद्र, म्लेच्छ, निंदित कामे करणारे, सिंह, वाघ, रानडुक्कर याचा त्यांना जन्म प्राप्त होतो. ॥१३॥

**चारणाश्च सुपर्णाश्च पुरुषाश्चैव दाम्भिकाः ।**

**रक्षांसि च पिशाचाश्च तामसीषूत्तमा गतिः ॥४॥** मनु. अ. १२ श्लो. ४४

जे उत्तम तमोगुणी असतात त्यांना कवने रचून लोकांची स्तुती करणारे भाट, चारण, सुंदर पक्षी,

आपल्याच तोंडाने स्वत:ची प्रशंसा करणारे दांभिक पुरुष, हिंसा करणारे राक्षस, मद्यादी प्राशन करणारे, गलिच्छ राहणारे, अनाचारी पिशाच यांचा जन्म म्हणजे उत्तम तमोगुणी कर्मांचे फळ होय. ॥४॥

**भल्ला मल्ला नटाश्चैव पुरुषाः शस्त्रवृत्तयः ।**

**द्यूतपानप्रसक्ताश्च जघन्या राजसी गतिः ॥५॥** मनु. अ. १२ श्लो. ४५

जे अत्यंत रजोगुणी असतात ते भल्ल म्हणजे भाला, तलवार वगैरे हत्यारांनी मारणारे अथवा कुदळ इत्यादींनी खणणारे मल्लाह म्हणजे, नौका वगैरे वल्हवणारे, दोरीवर किंवा बांबूवर कसरतीचे खेळ करणारे डोंबारी, शस्त्रधारी नोकर आणि मद्यपानात आसक्त असतात असे जन्म हेनीच रजोगुणाचे फळ होय. ॥५॥

**राजानः क्षत्रियाश्चैव राज्ञां चैव पुरोहिताः ।**

**वादयुद्धप्रधानाश्च मध्यमा राजसी गतिः ॥६॥** मनु. अ. १२ श्लो. ४६

जे मध्यम रजोगुणी असतात ते राजे क्षत्रिय वर्णाच्या राजांचे पुरोहित, शास्त्रार्थ करणारे, राजदूत, प्राड्विवाक (वकील, बॅरिस्टर), युद्ध विभागाचे अध्यक्ष यांचा जन्म प्राप्त करतात. ॥६॥

**गन्धर्वा गुह्यका यक्षा विबुधानुचराश्च ये ।**

**तथैवाप्सरसः सर्वा राजसीषूत्तमा गतिः ॥७॥** मनु. अ. १२ श्लो. ४७

जे उत्तम रजोगुणी असतात त्यांना गंधर्व (गाणारे), गुह्यक (वादक), यक्ष (धनाढ्य), विद्वानांचे सेवक आणि अप्सरा म्हणजे सुस्वरूप स्त्रिया यांचा जन्म प्राप्त होतो. ॥७॥

**तापसा यतयो विप्रा ये च वैमानिका गुणाः ।**

**नक्षत्राणि च दैत्याश्च प्रथमा सात्त्विकी गतिः ॥८॥** मनु. अ. १२ श्लो. ४८

जे तपस्वी, यती, संन्यासी, वेदपाठी, विमानचालक, ज्योतिषी आणि दैत्य म्हणजे देहपोषक मनुष्य असतात त्यांचे कनिष्ठ सत्त्वगुणाचे ते फळ जाणावे. ॥८॥

**यज्वान ऋषयो देवा वेदा ज्योतींषि वत्सराः ।**

**पितरश्चैव साध्याश्च द्वितीया सात्त्विकी गतिः ॥९॥** मनु. अ. १२ श्लो. ४९

जे जीव मध्यम सत्त्वगुणयुक्त होऊन कर्म करतात ते यज्ञ करणारे, वेदांचा अर्थ जाणणारे, विद्वान, वेदज्ञ, विद्युत विद्या, कालविद्या जाणकार, रक्षक, ज्ञानी व (साध्याः) कार्यसिद्धीसाठी सेवा करण्यायोग्य असे अध्यापक यांचा जन्म प्राप्त करतात. ॥९॥

**ब्रह्मा विश्वसृजो धर्म्मो महानव्यक्तमेव च ।**

**उत्तमां सात्त्विकीमेतां गतिमाहुर्मनीषिणः ॥१०॥** मनु. अ. १२ श्लो. ५०

जे उत्तम सत्त्वगुणांनी युक्त असून उत्तम कर्म करतात ते (ब्रह्मा) सर्व वेद जाणणारे, (विश्वसृज्) सारी सृष्टिक्रम विद्या जाणून विविध विमानादि याने बनविणारे, धार्मिक, सर्वोत्तम बुद्धियुक्त आणि अव्यक्ताचा जन्म व प्रकृतिवशित्व यांची सिद्धी प्राप्त करतात. ॥१०॥

**इन्द्रियाणां प्रसङ्गेन धर्मस्यासेवनेन च**

**पापान्संयान्ति संसारानविद्वांसो नराधमाः ॥११॥** मनु. अ. १२ श्लो. ५२

जे इंद्रियांच्या आधीन होऊन विषयासक्त, धर्माचा त्याग करून अधर्म करणारे अविद्वान असतात ते मनुष्यांमधील नीच योनीत वाईट वाईट दुःखरूप जन्म प्राप्त करतात. ॥११॥

अशा प्रकारे सत्त्व, रज व तम या तीन गुणांनी युक्त होऊन जीव ज्या प्रकारची कर्मे करतो त्याला त्याच त्याचप्रकारची फळे प्राप्त होतात.

जे मुक्त होतात त्यांनी गुणातीत म्हणजे सर्व गुणाच्या स्वभावामध्ये गुंतून न राहता महायोगी बनून, मुक्तीची साधना करावी. कारण,

**योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥१॥**

**तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् ॥२॥** योग. पा. १ सू. २-३

ही पातंजल योगशास्त्रातील सूत्रे आहेत. मनुष्याने रजोगुण व तमोगुण यांनी युक्त असलेल्या कर्मांपासून मनाला परावृत्त करून, शुद्ध सत्त्वगुणयुक्त कर्मांपासूनही मनाला दूर ठेवून केवळ शुद्ध सत्त्वगुणयुक्त बनावे. नंतर त्याचाही निरोध करून एकाग्र म्हणजे एक परमेश्वर व धर्मयुक्त कर्म यांच्या अग्रभागावर मनाला स्थिर करून त्याला निरुद्ध म्हणजे सर्व बाजूंनी मनाच्या वृत्तीला रोखून धरावे. ॥१॥

जेव्हा चित्त एकाग्र व निरुद्ध होते तेव्हा सर्वांचा द्रष्टा असणाऱ्या ईश्वराच्या स्वरूपात जीवात्म्याची स्थिती होते. इत्यादी साधने मुक्तीसाठी आचरावीत. आणि,

**अथ त्रिविधदुःखात्यन्तनिवृत्तिरत्यन्तपुरुषार्थः ॥** सांख्य. अ. १। सू. १

(आध्यात्मिक) शारीरिक दुःखे, (आधिभौतिक) इतर प्राण्यांपासून दुःखित व (आधिदैविक) अतिवृष्टी, अत्यंत उन्हाळा, अत्यंत थंडी, अनावृष्टी, मन व इंद्रिये यांच्या चंचलतेने दुःखे होतात, या त्रिविध दुःखांपासून सुटका करून घेऊन मुक्ती मिळविणे हा अत्यंत पुरुषार्थ आहे.

पुढील प्रकरणात आचार, अनाचार व भक्ष्याभक्ष्याविषयी लिहू.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते विद्याऽविद्याबन्धमोक्षविषये**
**नवमः समुल्लासः सम्पूर्णः ॥९॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की,
मी अनेक वेळा '**सत्यार्थ प्रकाश**' या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.
म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






दहावा समुल्लास

# आचार, अनाचार व भक्ष्याभक्ष्य विवेचन

## आचार व अनाचार

धर्मयुक्त कर्मांचे आचरण, सुशीलता, सत्पुरुषांचा सत्संग आणि सद्‌विद्येचे ग्रहण करण्यात आवड इत्यादी गोष्टींना आचार आणि या विपरीत जे आहे त्याला अनाचार असे म्हणतात. या संबंधी लिहिले आहे.

**विद्वद्भिः सेवितः सद्भिर्नित्यमद्वेषरागिभिः ।**
**हृदयेनाभ्यनुज्ञातो यो धर्मस्तन्निबोधत ॥१॥** मनु. अ. २ श्लो. १

माणसांनी सदैव ही गोष्ट ध्यानात ठेवावी की ज्याचे सेवन (आचरण) रागद्वेषरहित विद्वान लोक नित्य करतात, हृदयाने म्हणजे आत्म्याने जे सत्य कर्तव्य जाणतात तोच धर्म माननीय व आचरणीय आहे. ॥१॥

**कामात्मता न प्रशस्ता न चैवेहास्त्यकामता ।**
**काम्यो हि वेदाधिगमः कर्मयोगश्च वैदिकः ॥२॥** मनु. अ. २ श्लो. २

कारण या जगात अत्यंत कामात्मता व अत्यंत निष्कामता श्रेष्ठ गोष्ट नाहीत. वेदार्थज्ञान व वेदोक्त कर्मांनी ह्या सर्व कामना देखील कामनेनेच सिद्ध होतात. ॥२॥

**संकल्पमूलः कामो वै यज्ञाः सङ्कल्पसम्भवाः ।**
**व्रतानि यमधर्माश्च सर्वे सङ्कल्पजाः स्मृताः ॥३॥** मनु. अ. २ श्लो. ३

"मी निरिच्छ व निष्काम आहे किंवा होईन." असे कोणी म्हणत असेल तो कधी होऊ शकत नाही कारण सर्व कर्म म्हणजे यज्ञ, सत्यभाषणादी व्रते, यमनियमरूपी धर्म आदी गोष्टी संकल्पानेच होत असतात. ॥३॥

**अकामस्य क्रिया काचिद् दृश्यते नेह कर्हिचित् ।**
**यद्यद्धि कुरुते किञ्चित् तत्तत्कामस्य चेष्टितम् ॥४॥** मनु. अ. २ श्लो. ४

कारण हात, पाय, डोळे, मन इत्यादिकांच्या ज्या हालचाली होतात त्या इच्छेनेच केल्या जातात. इच्छा नसेल तर डोळे उघडणे व मिटणे ही गोष्टही घडू शकत नाही. ॥४॥

**वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम् ।**
**आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च ॥५॥** मनु. अ. २ श्लो. ६

म्हणून संपूर्ण वेद, मनुस्मृती तसेच ऋषिप्रणीत शास्त्रे, सत्पुरुषांचा आचार आणि जी कर्मे केल्याने आपला आत्मा प्रसन्न राहतो, म्हणजे भय, शंका, लज्जा वाटत नाही ती कर्मे करणे उचित आहे. पाहा! जेव्हा कोणी मिथ्या भाषण अथवा चोरी वगैरेची इच्छा करतो तेव्हा त्याच्या आत्म्यात भय, शंका, लज्जा ही अवश्य उत्पन्न होतात. म्हणून अशी कर्मे करू नयेत. ॥५॥

**सर्वन्तु समवेक्ष्येदं निखिलं ज्ञानचक्षुषा ।**

**श्रुतिप्रामाण्यतो विद्वान् स्वधर्मे निविशेत वै ॥६॥** मनु. अ. २ श्लो. ८

माणसाने सर्व शास्त्रे, वेद, सत्पुरुषांचा आचार, आपल्या आत्म्याच्या विरुद्ध नसलेल्या गोष्टी यांचा उत्तम प्रकारे विचार करून, ज्ञानरूपी नेत्रांचा वापर करून, श्रुतींच्या प्रमाणाने मानून, आपल्या आत्म्याला अनुकूल धर्माचे आचरण करावे. ॥६॥

**श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन् हि मानवः ।**

**इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम ॥७॥** मनु. अ. २ श्लो. ९

कारण जो माणूस वेदोक्त धर्म आणि वेद विरुद्ध नसलेल्या स्मृत्युक्त धर्म यांचे अनुष्ठान करतो त्याला इहलोकी कीर्ती आणि मरणानंतर सर्वोत्तम सुख प्राप्त होते. ॥७॥

**योऽव मन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयाद् द्विजः ।**

**स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेदनिन्दकः ॥८॥** मनु. अ. २ श्लो. ११

श्रुती ही वेद व स्मृतीला धर्मशास्त्र म्हणतात. त्यांच्या साह्याने सर्व कर्तव्याकर्तव्याचा निर्णय केला पाहिजे. जो कोणी मनुष्य वेद व वेदानुकूल आप्तग्रंथांचा अपमान करील त्याला श्रेष्ठ लोकांनी म्हणजे जातीतून बहिष्कृत करावे. कारण जो वेदांची निंदा करतो तो नास्तिक म्हटला जातो. ॥८॥

## धर्माचे लक्षण

**वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।**

**एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥९॥** मनु. अ. २ श्लो. १२

म्हणून वेद, स्मृती, सत्पुरुषांचे आचरण आणि स्वतःच्या आत्म्याच्या ज्ञानाशी अविरोधी प्रियाचरण ही चार धर्माची लक्षणे म्हणजे यांच्यानेच धर्मलक्षित होतो.. ॥९॥

**अर्थकामेष्वसक्तानां धर्मज्ञानं विधीयते ।**

**धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः ॥१०॥** मनु. अ. २ श्लो. १३

परंतु जो द्रव्यलोभ आणि कामवासना म्हणजे विषयसेवन यांत गुरफटलेला नसतो त्यालाच धर्माचे ज्ञान प्राप्त होते. जे धर्माला जाणण्याची इच्छा बाळगतात त्यांच्यासाठी वेद हेच परम प्रमाण आहे. ॥१०॥

**वैदिकैः कर्मभिः पुण्यैर्निषेकादिर्द्विजन्मनाम् ।**

**कार्य्यः शरीरसंस्कारः पावन प्रेत्य चेह च ॥११॥** मनु. अ.२ श्लो. २६

म्हणून सर्व द्विज लोकांनी म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनी वेदोक्त पुण्यरूप कर्मांद्वारे आपल्या मुलांचे निषेक (गर्भाधान) आदी संस्कार करावेत. ज्यामुळे हा जन्म व परजन्म पवित्र होतो. ॥११॥

**केशान्तः षोडशे वर्षे ब्राह्मणस्य विधीयते ।**
**राजन्यबन्धोर्द्वाविंशे वैश्यस्य द्व्यधिके ततः ॥१२॥** मनु. अ. २ श्लो. ६५

ब्राह्मणाचे सोळाव्या वर्षी, क्षत्रियाचे बाविसाव्या वर्षी आणि वैश्याचे चोविसाव्या वर्षी केशांत कर्म म्हणजे क्षौर किंवा मुंडन झाले पाहिजे. या विधीनंतर केवळ शेंडी ठेवून दाढी-मिशा व डोकीचे केस नेहमी काढले पाहिजेत म्हणजे हे केस पुनः ठेवता कामा नयेत. अत्यंत थंड प्रदेशात राहणाऱ्या लोकांनी त्यांच्या इच्छेप्रमाणे केस ठेवावेत आणि अत्यंत उष्ण प्रदेशात राहणाऱ्यांनी शेंडीसह डोकीवरील केस काढून टाकावेत. कारण डोकीवर केस राहिल्यास उष्णता अधिक होते आणि त्यामुळे बुद्धी कमी होऊन जाते. दाढी-मिशा वाढविल्यास खाणे-पिणे नीट होत नाही आणि केसांत उच्छिष्ट ही अडकते. ॥१२॥

## आत्मसंयमन

**इन्द्रियाणां विचरतां विषयेष्वपहारिषु ।**
**संयमे यत्नमातिष्ठेद्विद्वान् यन्तेव वाजिनाम् ॥१॥** मनु. अ. २ श्लो. ८८

जी इंद्रिये चित्त विचलित करणाऱ्या विषयवासनेत प्रवृत्त करवितात त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न करावा. हाच माणसाचा मुख्य आचार आहे. ज्याप्रमाणे सारथी घोड्यांना ताब्यात ठेवून सरळ मार्गाने चालवितो त्याप्रमाणे इंद्रियांवर ताबा मिळवून त्यांना अधर्ममार्गापासून परावृत्त करून आणि सदैव धर्ममार्गाने चालवावे. ॥१॥

**इन्द्रियाणां प्रसङ्गेन दोषमृच्छत्यसंशयम् ।**
**सन्नियम्य तु तान्येव ततःसिद्धिं नियच्छति ॥२॥** मनु. अ. २ श्लो. ९३

कारण इंद्रियांना विषयासक्ती व अधर्माने चालविण्याने माणसाला नक्कीच दोष लागतो; आणि जेव्हा त्यांना जिंकून तो धर्ममार्गाने नेतो तेव्हाच त्याला अभीष्ट सिद्धी मिळते. ॥२॥

**न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्द्धते ॥३॥** मनु. अ. २ श्लो. ९४

ज्याप्रमाणे अग्नीमध्ये इंधन व तूप टाकल्याने तो वाढत जातो त्याप्रमाणे कामाच्या उपभोगाने कामवासना कधी शांत होत नाही, उलट ती वाढतच जाते, यात मुळीच शंका नाही. म्हणून माणसाने कधी विषयासक्त होऊ नये. ॥३॥

**वेदास्त्यागाश्च यज्ञाश्च नियमाश्च तपांसि च ।**
**न विप्रदुष्टभावस्य सिद्धिं गच्छन्ति कर्हिचित् ॥४॥** मनु. अ. २ श्लो. ९७

जो पुरुष जितेंद्रिय नसतो त्याला 'विप्रदुष्ट' असे म्हणतात. अशा माणसाला वेदज्ञान, त्याग, यज्ञ, नियम आणि धर्माचरण सिद्धि प्राप्त होत नाही. परंतु हे सर्व जितेन्द्रिय धार्मिक माणसास प्राप्त होतात. ॥४॥

**वशे कृत्वेन्द्रियग्रामं संयम्य च मनस्तथा ।**
**सर्वान् संसाधयेदर्थानक्षिण्वन् योगतस्तनुम् ॥५॥** मनु. अ. २ श्लो. ९८

म्हणून पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये व अकरावे मन यांना ताब्यात ठेवून युक्ताहारविहाराच्या योगे शरीराचे रक्षण करीत सर्व पुरुषार्थांची प्राप्ती करावी. ॥५॥

**श्रुत्वा स्पृष्ट्वा च दृष्ट्वा च भुक्त्वा घ्रात्वा च यो नरः ।**
**न हृष्यति ग्लायति वा स विज्ञेयो जितेन्द्रियः ॥६॥** मनु. अ. २ श्लो. १००

ज्याला स्तुतीने हर्ष आणि निंदेने शोक होत नाही, चांगल्या स्पर्शाने सुख व वाईट स्पर्शाने दुःख होत नाही, जो सुंदर रूप पाहून प्रसन्न व कुरूपता पाहून अप्रसन्न होत नाही, जो उत्तम भोजनाने आनंदित व निकृष्ट भोजनाने दुःखी होत नाही, जो सुगंध वा दुर्गंध याविषयी प्रेम किंवा घृणा बाळगत नाही, अशा माणसाला जितेंद्रिय म्हणतात. ॥६॥

**नापृष्टः कस्यचिद् ब्रूयान्न चान्यायेन पृच्छतः ।**
**जानन्नपि हि मेधावी जडवल्लोक आचरेत् ॥७॥** मनु. अ. २ श्लो. ११०

जे कोणी विचारले नसता किंवा कपटाने अथवा अन्यायाने विचारले असता त्याला कधीही उत्तर देऊ नाही. अशा कपटी माणसांसमोर बुद्धिवंतांनी जड म्हणजे स्तब्ध, मौन राहवे. मात्र जे निष्कपटी व जिज्ञासू असतील त्यांनी विचारले नसताही त्यांना उपदेश करावा. ॥७॥

## श्रेष्ठतेचे निकष

**वित्तं बन्धुर्वयः कर्म विद्या भवति पञ्चमी ।**
**एतानि मान्यस्थानानि गरीयो यद्यदुत्तरम् ॥८॥** मनु. अ. २। श्लो. १३६

एक धन, दुसरे उत्तम बंधु परिवार कुळ, तिसरे वय, चौथे उत्तम कर्म आणि पाचवे श्रेष्ठ विद्या या पाच गोष्टी मान्यतेची स्थाने आहेत. परंतु धनापेक्षा उत्तम बंधु परिवार , बंधुहून वय, वयाहून श्रेष्ठ कर्म आणि कर्माहून पवित्र विद्या असणारे उत्तरोत्तर अधिक माननीय आहेत. ॥८॥

**अज्ञो भवति वै बालः पिता भवति मन्त्रदः ।**
**अज्ञं हि बालमित्याहुः पितेत्येव तु मन्त्रदम् ॥९॥** मनु. अ. २। श्लो. १५३

कारण शंभर वर्षांचा म्हातारा विद्याविज्ञानरहित असेल तर तो बालक; आणि विद्या व विज्ञान देणारा आहे त्या बालकास देखील वृद्ध असेच मानले पाहिजे. कारण सर्व शास्त्रे आप्त विद्वान, अज्ञानींना बालक व ज्ञानी माणसाला पिता म्हणतात. ॥९॥

**न हायनैर्न पलितैर्न वित्तेन न बन्धुभिः ।**
**ऋषयश्चक्रिरे धर्मं योऽनूचानः स नो महान् ॥१०॥** मनु. अ. २। श्लो. १५४

वय अधिक वाढल्याने, केस पिकल्याने, अधिक धन असल्याने आणि मोठे कुटुंब असल्याने मनुष्य वृद्ध ठरत नाही. परंतु आमच्यातील विद्या विज्ञानात श्रेष्ठ आहेत तोच वृद्ध पुरुष म्हटला जातो. ऋषी व महात्मे यांचे ठाम मत आहे. ॥१०॥ की जे

**विप्राणां ज्ञानतो ज्यैष्ठ्यं क्षत्रियाणां तु वीर्यतः ।**
**वैश्यानां धान्यधनतः शूद्राणामेव जन्मतः ॥११॥** मनु. अ. २। श्लो. १५५

ब्राह्मण ज्ञानाने, क्षत्रिय बळाने, वैश्य धनधान्याने व शूद्र जन्माने म्हणजे अधिक वयाने वृद्ध समजला जातो. ॥११॥

**न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः ।**
**यो वै युवाप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥१२॥** मनु. अ. २ श्लो. १५६

अंगावरील केस पांढरे झाल्याने माणूस वृद्ध (श्रेष्ठ) होत नाही. परंतु जो युवक विद्या शिकलेला असेल त्यालाच विद्वान लोक मोठा मानतात. ॥१२॥

**यथा काष्ठमयो हस्ती यथा चर्ममयो मृगः ।**
**यश्च विप्रोऽनधीयानस्त्रयस्ते नाम बिभ्रति ॥१३॥** मनु. अ. २ श्लो. १५७

ज्याने विद्याध्ययन केले नाही तो जणू लाकडाचा हत्ती किंवा कातड्याचा मृग असतो. त्याप्रमाणे अविद्वान मनुष्य हा जगात नाममात्र माणूस म्हटला जातो. ॥१३॥

**अहिंसयैव भूतानां कार्यं श्रेयोऽनुशासनम् ।**
**वाक् चैव मधुरा श्लक्ष्णा प्रयोज्या धर्ममिच्छता ॥१४॥** मनु. अ. २ श्लो. १५९

म्हणून माणसाने विद्या शिकून विद्वान धर्मात्मा होऊन निर्वैर वृत्तीने सर्व प्राण्यांच्या कल्याणाचा उपदेश करावा आणि उपदेश करताना त्याने मधुर व कोमल वाणीचा वापर करावा. जे पुरुष सत्योपदेशाने धर्माची वृद्धी व अधर्माचा नाश करतात ते धन्य होत. ॥१४॥

नित्य स्नान, वस्त्र, अन्न, पान, स्थान वगैरे सर्व शुद्ध (स्वच्छ) ठेवावे. कारण हे सर्व पदार्थ शुद्ध झाल्याने चित्तशुद्धी आणि आरोग्य प्राप्त होऊन पुरुषार्थ वाढतो. शुचिता तेवढी करणे योग्य आहे की, ज्यायोगे घाण व दुर्गंधी नाहीशी होईल एवढी स्वच्छता सर्वत्र ठेवावी.

**आचारः परमो धर्मः श्रुत्युक्तः स्मार्त एव च ॥** मनु. अ. १ श्लो. १०८

जे सत्यभाषणादी कर्मांचे आचरण करणे हाच वेद व स्मृती यांत सांगितलेला आचार होय.

**मा नो वधीः पितरं मोत मातरम् ॥** यजु. अ. १६ मं. १५

**आचार्य उपनयमानो ब्रह्मचारिणमिच्छते ॥** अथर्व. कां. ११सू. ५ मं. ३

**मातृदेवो भव ! पितृदेवो भव ! आचार्य देवो भव ! अतिथि देवो भव !** तैत्तिरी ७/११

माता, पिता, आचार्य व अतिथी यांची सेवा करणे हीच देवपूजा होय. ज्या-ज्या कर्मांनी जगावर उपकार होतो ते-ते कर्म करणे आणि हानिकारक कर्म सोडून देणेच माणसाचे मुख्य कर्तव्य कर्म आहे. नास्तिक, लंपट, विश्वासघातकी, चोर, असत्यवादी,स्वार्थी, कपटी, धोकेबाज इत्यादी दुष्ट लोकांची संगत करू नये. आप्त जे सत्यवादी, धर्मात्मा, परोपकार प्रिय लोक आहेत त्यांचा नेहमी सत्संग करण्याचेच नाव श्रेष्ठाचार आहे.

## विदेशगमन

**(प्रश्न)** आर्यावर्त्त देशवासी आर्यावर्त्त देशातून वेगवेगळ्या देशात जाण्याने आचार भ्रष्ट होतो किंवा नाही?

**(उत्तर)** हे साफ खोटे आहे. कारण आंतरिक व बाह्य पावित्र्य ठेवणे, सत्यभाषण वगैरे आचरण करणे,

आहे हे कोठेही करील तरी आचारभ्रष्ट व धर्मभ्रष्ट होणार नाही. जर कोणी आर्यावर्त्तात राहून दुराचार करील तर तोच धर्मभ्रष्ट व आचारभ्रष्ट समजला जाईल. जर असेच झाले असते तर

**मेरोहरेश्च द्वे वर्षे वर्षं हैमवतं ततः।**

**क्रमणैव व्यतिक्रम्य भारतं वर्षमासदत् ॥१॥**

**स देशान्विविधान्पश्यंश्चीनहूणनिषेवितान् ॥२॥** महा.शान्ति.प.अ.३२५। श्लो.१४,१५

हे श्लोक महाभारताच्या शांतिपर्वातील मोक्षधर्मामध्ये व्यास-शुक संवादात आले आहेत. एकदा व्यास महर्षी आपला मुलगा शुक आणि शिष्य यांच्यासह पाताळ म्हणजे ज्या देशाला सध्या अमेरिका म्हणतात तेथे राहत होते. त्यावेळी शुकाचार्यांनी आपल्या वडिलांना एक प्रश्न विचारला की, ''आत्मविद्या एवढीच आहे की याहून अधिक आहे?'' व्यासजींनी मुद्दामच त्या प्रश्नाचे उत्तर दिले नाही. कारण त्यांनी त्या विषयाचा उपदेश पूर्वी केला होता. आता त्याला दुसऱ्याच्या साक्षीसाठी त्यांनी आपल्या मुलाला सांगितले, ''हे पुत्रा, तू मिथिलापुरीला जाऊन हाच प्रश्न जनकराजाला विचार. ते याचे यथायोग्य उत्तर देतील.'' पित्याचे बोलणे ऐकून शुकाचार्य पाताळ देशातून मिथिलापुरीला निघाले. ते प्रथम मेरू म्हणजे हिमालयाच्या ईशान्येस, उत्तरेला व वायव्येस जे देश आहेत त्यांचे नाव त्यावेळी हरिवर्ष असे होते. वानरांना हरी असे म्हणतात. त्या प्रदेशातील माणसे आजही लाल तोंडाची व पिंगट डोळ्यांची वानरासारखी आहेत. ज्या देशांना आज युरोप असे म्हणतात त्यालाच संस्कृतमध्ये हरिवर्ष असे म्हणत असत. तेथील देश आणि ज्यांना हूण, यहुदी असे म्हणतात. ते देश पाहून शुकाचार्य चीनला पोचले. तेथून ते हिमालयात आले आणि हिमालयातून मिथिलापुरीला आले.

तसेच जिला अग्नियान नौका म्हणजे आगबोट असे म्हणतात त्या अश्वतरी जलयानातून श्रीकृष्ण व अर्जुन पाताळात जाऊन आणि तेथून महाराजा युधिष्ठिराच्या यज्ञासाठी उद्दालक ऋषींना घेऊन आले होते. धृतराष्ट्राचा विवाह गंधार म्हणतात, तेथील राजकन्येशी झाला होता. पांडू राजाची पत्नी माद्री 'इराण' च्या राजाची कन्या होती आणि अर्जुनाचा विवाह, ज्याला आजकाल अमेरिका म्हणतात त्या पाताळ देशाची राजकन्या उलूपी हिच्याशी झाला होता. जर लोक देशदेशांतरी व द्वीपद्वीपांतरी जात-येत नसते तर या सगळ्या गोष्टी कशा घडल्या असत्या ? मनुस्मृतीमध्ये समुद्रावर जाणाऱ्या नौकांवर कर घ्यावा असे सांगितले आहे. ते सुद्धा आर्यावर्त्तातील द्विपांतरात गेल्या कारणाने आहे आणि जेव्हा महाराजा युधिष्ठिरांनी राजसूय यज्ञ केला होता तेव्हा साऱ्या जगातील लोकांना निमंत्रण देण्यासाठी भीम, अर्जुन, नकुल व सहदेव चारही दिशांना गेले होते. जर परदेशगमनात दोष मानला असता तर ते कधीही गेले नसते. सारांश, प्राचीन काळचे आर्यावर्त्तातील लोक व्यापार, राजकार्य आणि पर्यटन यांसाठी जगभर जात असत आणि जो आजकाल शिवाशीव आणि परदेशगमनाने धर्म भ्रष्ट होतो ही कल्पना, या गोष्टी मूर्ख लोक वात्रट वागल्याने व अज्ञान वाढल्याने झाल्या आहेत.

जे लोक देशदेशांतरी व द्वीपद्वीपांतरी जाण्यायेण्यात मुळीच संकोच करीत नाही ते वेगवेगळ्या देशांतील नाना प्रकारच्या लोकांच्या संपर्कात येतात, त्यांच्या रीतीभाती पाहतात, आपले राज्य व व्यापार वाढवितात, निर्भय, शूरवीर बनतात आणि सद्व्यवहाराचे ग्रहण व वाईट गोष्टींचा त्याग करण्यास तत्पर होऊन विपुल ऐश्वर्य प्राप्त करून घेतात. जे लोक महाभ्रष्ट म्लेच्छकुलोत्पन्न वेश्यांशी समागम केल्याने आचारभ्रष्ट व धर्मभ्रष्ट बनत

नाहीत परंतु देशोदेशीच्या उत्तम पुरुषांच्या संपर्कात मात्र त्यांना शिवाशीव व दोष दिसतो हा निव्वळ मूर्खपणाच नव्हे तर काय ? होय, पण एक कारण तर आहे की जे लोक मांसभक्षण व मद्यपान करतात त्यांचे शरीर व वीर्यादी धातूंसुद्धा दुर्गन्धाने दूषित होतात म्हणून अशा लोकांशी संगत केल्यास आर्यांनाही ते दोष लागतील परंतु त्यांच्याशी इतर व्यवहार करण्यात व त्यांचे चांगले गुण घेण्यात काहीच दोष अथवा पाप नाही. त्यांच्यातील मद्यपानादी दोषांपासून दूर राहून ज्ञानादी सद्गुणांचे ग्रहण करण्यात काहीच हानी नाही. जर अशा लोकांना स्पर्श करण्यात आणि त्यांच्याकडे पाहण्यातही पाप आहे असे मूर्ख लोक समजतात. म्हणूनच ते त्यांच्याशी युद्धही करू शकत नाहीत. कारण युद्धामध्ये त्यांना पाहणे व स्पर्श करणे अपरिहार्यच असते.

सर्व सज्जनांनी राग (मोह), द्वेष, अन्याय, मिथ्या भाषण इत्यादी दोषांचा त्याग करून निर्वैरता, प्रीती, परोपकार, सज्जनता इत्यादी गुणांचे धारण करणे हाच उत्तम आचार आहे. आणि तसेच हेही समजून घ्यावे की धर्म हा आपला आत्मा व कर्तव्यात निहित आहे. जेव्हा आपण सत्कृत्ये करीत असतो तेव्हा आपल्याला देशदेशान्तरी आणि द्विप-द्विपान्तरी जाण्यात कोणताही दोष किंवा पाप लागू शकत नाही. दोष तर पापी कामे करण्यात लागतात.

होय, इतके अवश्य ध्यानात ठेवले पाहिजे की, वेदोक्त धर्माची संपूर्ण माहिती घेऊन आणि पाखंडमताचे खंडन करणे अवश्य शिकून घेतले पाहिजे. त्यामुळे आपल्याला कोणीही खोटे ठरवू शकणार नाही. देशदेशांतरी व द्वीपद्वीपान्तरी राज्य व व्यापार केल्याखेरीज आपल्या देशाची उन्नती कधी तरी शक्य आहे काय ? जेव्हा स्वदेशी लोक आपल्याच देशात व्यापार करतात आणि परदेशी लोक येथे येऊन व्यापार व राज्य करतात तेव्हा दारिद्र्य व दु:ख यांच्याखेरीज दुसरे काहीही होऊ शकत नाही.

पाखंडी लोक असे समजतात की जर आम्ही यांना विद्या शिकविली आणि परदेशगमनाची परवानगी दिली तर हे शहाणे होतील आणि आमच्या पाखंडाच्या जाळ्यात अडकणार नाहीत. तसे झाल्यास आमची प्रतिष्ठा व पोटापाण्याची साधने ही नाहीशी होतील. म्हणून खाण्यापिण्याच्या बाबतीत शिवाशिवीचे निर्बंध घालतात ज्यामुळे ते दुसऱ्या देशात जाऊ शकणार नाहीत.

## स्पर्शास्पर्श

परंतु एवढे अवश्य पाहिजे की कोणत्याही परिस्थितीत चुकूनही मद्यमासांचे सेवन करू नये. सर्व बुद्धिमानांनी हेच निश्चय नाही केले की राजपुरुषांच्या युद्धांच्या वेळीही स्वत:चा स्वयंपाक स्वत:च करून खाण्याने नक्कीच पराभवाचे कारण होते, वस्तुत: क्षत्रियांनी युद्धाच्या वेळी एका हाताने भाकरी खात व पाणी पीत जावे व दुसऱ्या हाताने शत्रूवर चढाई करणे आणि घोड्यावर किंवा हत्तीवर बसून अथवा पादतळी होऊन कापाकापी करीत विजयी होणे हाच त्यांचा आचार आहे व पराजित होणे हा अनाचार होय. अशा मूर्खपणाने या लोकांनी वेगवेगळ्या चुली मांडून व विरोध दर्शवून सगळे स्वातंत्र्य, आनंद, धन, राज्य, विद्या व पुरुषार्थ यांचेवर फटकारा मारून, डोक्याला हात लावून बसले आहेत आणि इच्छा करतात की काही पदार्थ मिळाले तर ते शिजवून खावेत, परंतु असे झाल्याने समजावे की स्पृश्यास्पृशतेने आर्यावर्त देशाला सर्व प्रकारे नष्ट करून टाकले आहे.

अर्थात स्वयंपाकाची जागा स्वच्छ असलीच पाहिजे. त्यासाठी ती झाडून, सारवून, केरकचरा काढून टाकून निर्मळ करण्याचे प्रयत्न अवश्य केला पाहिजे असे मात्र नाही की, मुसलमान किंवा ख्रिस्ती लोकांसारखी स्वयंपाकघरे घाणेरडी ठेवावीत.

**(प्रश्न)** सखरी (कच्ची रसोई) व निखरी (पक्की रसोई) हे काय आहे ?

**(उत्तर)** जे अन्न पाण्यात शिजविले जाते त्याला सखरी किंवा कच्ची रसोई आणि जे दुधात शिजवून तयार केले जाते त्याला निखरी, चोखी किंवा पक्की रसोई हणतात. हा सुद्धा या धूर्तांनी सुरू केलेला पाखंड आहे. कारण ज्या पदार्थांत दूध-तूप जास्त वापरले जाते ते खायला स्वादिष्ट व पोटात स्निग्ध पदार्थ जावेत त्यासाठी त्यांनी ही सारी लबाडी केली आहे. वस्तुत: जो पदार्थ अग्नीवर शिजविलेला किंवा योग्य काळानुसार पिकलेला असतो तो पक्व आणि जो न शिजलेला अथवा अपरिपक्व असेल तो कच्चा होय. शिवाय पक्व पदार्थ खावयाचे व कच्चे खावयाचे नाहीत, हा नियमदेखील सर्वत्र ठीक पाळला जात नाही. कारण चणे वगैरे कच्चेही खाल्ले जातात.

**(प्रश्न)** द्विजांनी स्वत:च्या हातांनी अन्न शिजवून खावे की शूद्रांच्या हातचे अन्न खावे ?

**(उत्तर)** शूद्रांनी शिजविलेले अन्न द्विजांनी खावे. कारण ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य वर्णांच्या स्त्रीपुरुषांनी विद्या अध्ययन-अध्यापन, राज्यकारभार आणि पशुपालन, शेती व व्यापार ह्या कामात तत्पर राहवे. मात्र शूद्राच्या भांड्यांत किंवा त्याच्या घरी शिजविलेले अन्न आपत्काळ खेरीज द्विजांनी खाऊ नये. यासाठी प्रमाण हे आहे:-

**आर्याधिष्ठिता वा शूद्राः संस्कर्त्तारः स्युः ।** आप. धर्म. प्रपा. २, पटल २, खं. ४, सूत्र ४

हे आपस्तम्बातील सूत्र आहे. आर्यांच्या घरी शूद्रांनी म्हणजे अज्ञानी स्त्रीपुरुषांनी स्वयंपाक पाणी करावे. मात्र त्यांनी आपली शरीरे व वस्त्रेही पवित्र म्हणजे निर्मळ राखावीत. आर्यांच्या घरी स्वयंपाक करताना शूद्रांनी कपड्याने तोंड बांधून करावा. कारण त्याच्या तोंडातील उष्टे वगैरे आणि त्याचा नि:श्वास अन्नावर पडता कामा नये. दर आठव्या दिवशी त्याने डोकीचे केस कापावेत आणि नखे कापून घ्यावीत. त्याने स्नान करून स्वयंपाक करावा आणि आर्यांना जेवू घातल्यावर स्वत: जेवावे.

**(प्रश्न)** शिजविलेल्या अन्नाला शूद्राचा स्पर्श झाल्यास ते अन्न दूषित झाले असे लोक समजतात. मग त्याच्या हातानी तयार केलेले अन्न कसे खाऊ शकतील ?

**(उत्तर)** ही गोष्ट कपोलकल्पित, खोटी आहे. कारण ज्यांनी गूळ, साखर, तूप, दूध, दळण, भाजी, फळे, धान्य, कंदमूल हे पदार्थ ज्याने खाल्ले त्याने जणू साऱ्या जगाच्या हाताने तयार केलेले आणि उच्छिष्ट खाल्ले असे ठरते. कारण जेव्हा शूद्र, चांभार, भंगी, मुसलमान, ख्रिश्चन वगैरे लोक शेतातील ऊस कापतात, सोलतात, तो पिळून रस काढतात तेव्हा मलमूत्रविसर्जनाच्या वेळी वापरलेले हात न धुता त्याच हातांनी स्पर्श करतात, उचलतात, ठेवतात अर्धा ऊस चोखून अर्धा त्यातच टाकतात. रस शिजत असताना त्यात आपल्या भाकरी टाकून त्या शिजवून खातात. जेव्हा साखर तयार करतात तेव्हा पायातल्या जोड्यांसकट ती तुडवितात. त्या जोड्यांच्या तळाला विष्ठा, मूत्र, शेण, धूळ वगैरे सर्व काही चिकटलेले असते त्याच जोड्यांनी रगडतात. ते सारे

त्या साखरेत मिसळते. दुधामध्ये आपल्या घरातील उष्ट्या भांड्याचे पाणी मिसळतात. उष्ट्या भांड्यात तूप ठेवतात आणि पीठ दळताना उष्ट्या हातांनीच ते गोळा करतात आणि त्या पिठात त्यांचा घामही गळत असतो. फळे व कंदमुळे यांच्या बाबतीतही हा सारा खेळ होत असतो असे हे पदार्थ खाल्ले तर समजावे की सर्वांच्या हातचे खाल्ल्यासारखेच होते.

**(प्रश्न)** फळे, कंदमुळे आणि रस, वगैरे बाबतीत अदृष्टात दोष मानीत नाही काय ?

**(उत्तर)** मग भंग्याने अथवा मुसलमानाने स्वत:च्या हाताने इतर ठिकाणी बनविलेले पदार्थ आणून दिले तर ते तुम्ही खाल की नाही ? जर नाही म्हणाल तर तो अदृष्टातही दोष आहे.

खरे म्हटले तर मुसलमान, ख्रिस्ती इत्यादी मद्य मांसाहारीच्या हातचे खाल्ल्याने आर्यांनाही मद्यमांस खाण्याचे पिण्याचे दोष लागतात. परंतु आर्यांनी आपसात एकत्र भोजन करण्यामध्ये कसलाच दोष दिसत नाही. जोपर्यंत आर्य लोकांत एकमत, परस्परांचे लाभहानी व सुखदु:खे परस्परांचे मानणार नाहीत, तोपर्यंत त्यांची उन्नती होणे फार कठीण आहे. परंतु केवळ खाणे-पिणे एक झाल्याने सुधारणा होऊ शकत नाही. जोपर्यंत वाईट गोष्टी सोडत नाही व चांगल्या गोष्टी करीत नाहीत तोपर्यंत उन्नतीऐवजी अवनतीच होत असते.

आपसातील दुही, मतभेद, ब्रह्मचर्याचा अभाव, विद्या न शिकणे न शिकविणे, बालविवाह, अस्वयंवर विवाहपद्धती, विषयासक्ती, मिथ्याभाषण आदी कुलक्षणे, वेदविद्येचा अप्रचार आदी कुकर्मे या कारणांमुळे आर्यावर्त्तावर विदेशी लोकांचे राज्य झाले. तेव्हा भाऊ-भाऊ आपसात भांडतात तेव्हाच तिसरा विदेशी पंच बनून बसतो.

पाच हजार वर्षांपूर्वी घडलेल्या महाभारतातल्या गोष्टी तुम्ही विसरलात काय ? पाहा ! महाभारतीय युद्धात लढणारे सारे वीर आपापल्या वाहनांवरच खाणेपिणे करीत असत. आपसातील यादवीमुळेच कौरव, पांडव व यादव यांचा सत्यानाश झाला. जे झाले ते झाले परंतु तोच अजूनपर्यंत तोच रोग भारतीयांच्या मागे लागला आहे. हा भयंकर राक्षस कधी सुटेल की आर्यांना साऱ्या सुखांपासून वंचित करून दु:खसागरात बुडवून टाकील ? आपल्या गोत्राची हत्या करणाऱ्या, स्वदेशाचा विनाश करणाऱ्या, नीच व दुष्ट दुर्योधनाच्या दुष्ट मार्गाने आर्य लोक आजपर्यंतसुद्धा चालले असून आपल्या दु:खात भर घालीत आहेत. परमेश्वराने कृपा करावी की हा राजरोग आम्हा आर्यांतून नष्ट व्हावा.

## भक्ष्य व अभक्ष्य विवेचन

भक्ष्याभक्ष्य दोन प्रकारचे असते. एक धर्मशास्त्रोक्त व दुसरा वैद्यशास्त्रोक्त, धर्मशास्त्राप्रमाणे -

**अभक्ष्याणि द्विजातीनाममेध्यप्रभवाणि च ॥** मनु. अ. ५। श्लो. ५

द्विजांनी म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आणि शूद्रांनी मलमूत्राच्या संसर्गातून उत्पन्न झालेला भाजीपाला, फळे व कंदमुळे खायला नको.

**वर्जयेन्मधुमांसं च ॥** मनु. अ. २। श्लो. १७७

जसे अनेक प्रकारची मद्ये, मांस, गांजा, भांग, अफू इत्यादी.

**बुद्धिं लुम्पति यद् द्रव्यं मदकारि तदुच्यते ॥** शार्ङ्गधर अ. ४। श्लो. २१

बुद्धीचा नाश करणारे जे-जे पदार्थ आहेत त्यांचे सेवन कधीही करू नयेआणि सडलेले, नासलेले, दुर्गंध दुषित, योग्य प्रकारे तयार करण्यात न आलेले अन्न आणि ज्यांची शरीरे मद्य मांसाच्या परमाणूंनी भरलेली आहेत अशा मद्यमांसाहारी म्लेच्छांच्या हातचे अन्न खाऊ नये.

## उपकारी प्राण्यांचे रक्षण

उपकारक प्राण्यांची हिंसा जसे एका गायीपासून दूध, तूप, बैल व गायी यांच्या उत्पत्तीने तिच्या एका पिढीत चार लाख पंचाहत्तर हजार सहाशे माणसांना सुख प्राप्त होते. अशा पशूंना आपण मारू नये व इतरांना मारू देऊ नये. एखादी गाय वीस शेर दूध देते तर दुसरी एखादी दररोज दोन शेर दूध देते. याचा अर्थ असा की प्रत्येक गायीकडून सरासरीने दररोज अकरा शेर दूध मिळते. एखादी गाय अठरा महिने दूध देते तर दुसरी एखादी सहा महिने दूध देते. याचा मध्यभाग म्हणजे सरासरीने बारा महिने झाले. या हिशोबाने प्रत्येक गायीच्या जन्मभराचे जे दूध २४,९६० (चोवीस हजार नऊशे साठ) माणसे एका वेळी तृप्त होऊ शकतात. तिला एकूण बारा वासरे होतात त्यांतील दोन मेली तरी दहा वासरे जिवंत राहतात. त्यातील पाच कालवडीच्या जन्मभराचे दूध धरले तर त्याने १,२४,८०० (एक लाख चोवीस हजार आठशे) लोक तृप्त होतात. आता पाच खोंडांचे बैल उभ्या जन्मात ५,००० (पाच हजार) मण धान्याचे उत्पादन करू शकतात. या धान्याने दर माणसी पाऊण शेर या हिशोबाने अडीच लाख माणसांची तृप्ति होते. दूध व धान्य मिळून ३,७४,८०० (तीन लाख चौऱ्याहत्तर हजार आठशे) माणसे तृप्त होतात. एका गायीच्या एका पिढीमध्ये दूध व धान्य मिळून ४,७५,६०० (चार लाख पंचाहत्तर हजार सहाशे) माणसांचे एका वेळी पोषण होते; आणि पिढ्यान् पिढ्यांचा हिशेब केला तर असंख्य माणसांचे पालनपोषण होते. या खेरीज गाडी ओढणे, ओझे वाहणे वगैरे कामातही बैल माणसाला खूप उपकारक होतात. तसेच गाय ही दुधाच्या दृष्टीने अधिक उपकारक आहे. गायी व बैल यांच्या प्रमाणेच म्हैस ही उपकारक पशू आहे. परंतु गायीच्या दुधातुपाने जितका बुद्धि वृद्धि पासून लाभ होतो, तितका लाभ म्हशीच्या दुधातुपाने होत नाही. म्हणून आर्यांनी गायीला अत्यंत उपकारी मानले आहे आणि जे कुणी इतर विद्वान असतील तेसुद्धा याचप्रमाणे समजतील.

शेळीच्या दुधाने २५,९२० (पंचवीस हजार नऊशे वीस) माणसांचे एका वेळी पालन होऊ शकते. याचप्रमाणे हत्ती, घोडे, उंट, मेंढ्या, गाढवे वगैरे पशूही खूप उपकारी आहेत. या पशूंना मारणारा साऱ्या माणसांचीच हत्या करतो असे जाणले पाहिजे.

पहा! जेव्हा आर्यांचे राज्य होते तेव्हा गायींसारखे अत्यंत उपयुक्त पशू मारले जात नव्हते. म्हणूनच आर्यावर्त्तात आणि जगातील इतर देशात मनुष्यादी प्राणी आनंदात राहत होते. कारण दुध, तूप व बैल यांची विपुलता असल्याने धनधान्य व दूधदुभते भरपूर मिळत असे. पण जेव्हा विदेशी मांसाहारी लोक या देशात आले आणि गायी वगैरे उपयुक्त पशूंना मारून मांसाहारी व मद्यपान करणारे राज्याधिकारी झाले तेव्हापासून उत्तरोत्तर आर्यांच्या दुःखाची वाढ होत गेली. कारण

**नष्टे मूले नैव फलं न पुष्पम्।** वृद्धचाणक्य अ. १०।१२

झाडाची मुळेच कापून टाकली तर फुले व फळे कोठून येणार ?

**(प्रश्न)** सर्वच माणसे अहिंसक बनली तर वाघ, सिंह वगैरे हिंस्त्र पशू इतके वाढतील की ते गायी वगैरे प्राण्यांना मारून खातील; आणि (त्यांना वाचविण्याचे) तुमचे सारे प्रयत्न निष्फळ ठरतील.

**(उत्तर)** जे पशू किंवा माणसे हानिकारक असतील त्यांना शिक्षा करणे आणि वेळप्रसंगी मारूनही टाकणे हे राजपुरुषांचे काम आहे.

**(प्रश्न)** मग काय मारलेल्या प्राण्यांचे मांस फेकून द्यावे ?

**(उत्तर)** फेकून द्यावे किंवा कुत्र्यांसारख्या मांसाहारी प्राण्यांना खाऊ घालावे किंवा जाळून टाकावे किंवा कोणी मांसाहारी माणूस ते खात असेल तर त्याने जगाचे काही नुकसान होणार नाही. मात्र (जो माणूस मांस खातो) त्याचा स्वभाव हिंसक व क्रूर बनू शकतो.

हिंसा, चोरी, विश्वासघात, छल, कपट, यांमार्गाने जे पदार्थ प्राप्त होतात त्याचा उपभोग घेणे हे अभक्ष्य (खाण्यास अयोग्य); आणि अहिंसा धर्माचे पालन करून प्राप्त होणारे आहार भोजन हे भक्ष्य (खाण्यास योग्य) होय. ज्या पदार्थांपासून स्वास्थ्य, रोगनाश, बुद्धि-बळ-पराक्रमादिकांची वृद्धी, आयुर्वृद्धी होते अशा तांदूळ, गहू, फळे, कंदमुळे, दूध, तूप, मिष्ठान्ने वगैरे पदार्थांचे सेवन, योग्य प्रकारे स्वयंपाक करून योग्यवेळी मिताहार, भोजन करणे उचित होय. या पदार्थांना भक्ष्य म्हटले जाते. याउलट जे पदार्थ प्रकृतीमध्ये विकार निर्माण करतात आणि जे जे पदार्थ वैद्यकशास्त्राने वर्ज्य ठरविले आहेत त्यांचा पूर्णपणे त्याग करावा आणि जे जे ज्याला हे पदार्थ ज्याच्यासाठी विहित (नेमून दिलेले) असतील त्यांचे ग्रहण करणे हेही भक्ष्य होय.

**(प्रश्न)** एका पात्रात सहभोजनात काही दोष आहे किंवा नाही ?

**(उत्तर)** होय, दोष आहे ! कारण एका बरोबर दुसऱ्या माणसांचे स्वभाव व प्रकृती यांचा मेळ नसतो. कुष्ठ वगैरे रोग झालेल्या माणसाबरोबर एका पानात जेवण केल्यास निरोगी माणसाचेही रक्त दूषित होते. याचप्रमाणे इतरांचे उष्टे खाण्याने काही नुकसानच होते. त्यात लाभ नसतो. म्हणून

## उच्छिष्टान्न भक्षण निषेध

**नोच्छिष्टं कस्यचित् दद्यान्नाद्याच्चैव तथान्तरा ।**
**न चैवात्यशनं कुर्यान्न चोच्छिष्टः क्वचिद् व्रजेत् ॥** मनु. अ. २। श्लो. ५६

आपला उष्टा पदार्थ कोणाला देऊ नये; अथवा कोणाच्या ताटात जेवण करू नये. वाजवीपेक्षा जास्त खाऊ नये आणि जेवल्यानंतर हात व तोंड धुतल्याशिवाय इकडे-तिकडे जाऊ नये.

**(प्रश्न) 'गुरोरुच्छिष्टभोजनम्'** या वाक्याचा काय अर्थ होईल ?

**(उत्तर)** याचा अर्थ असा की गुरूने भोजन केल्यानंतर जे अन्न वेगळे व शुद्ध स्थितीत शिल्लक असेल ते भक्षण करावे. म्हणजे असे की आधी गुरूला जेवू घालावे मागावून शिष्याने भोजन केले पाहिजे.

**(प्रश्न)** सारे उच्छिष्ट निषिद्ध असेल तर मधमाशांचा उष्टे मध व वासराने उष्टे केलेले दूध आणि आपण एक घास खाल्ल्यानंतर इतर अन्न आपलेच उष्टे होते मग त्याचेही सेवन करावयास नको.

**(उत्तर)** मध हा नाममात्रच उष्टा असतो परंतु ते तर अनेक औषधींचे सार ग्राह्य असते. वासरे आपल्या मातेच्या स्तनातून बाहेर येणारे दूध पितात ती स्तनांच्या आतील दूध पिऊ शकत नाहीत. म्हणून ते दूध उष्टे होत नाही. मात्र वासराचे दूध पिऊन झाल्यावर पाण्याने स्तने स्वच्छ धुवून धार काढावी तसेच आपले उच्छिष्ट आपल्याला अपायकारक होत नाही. ही गोष्ट सिद्ध आहे की स्वाभाविकपणे कोणी कोणाचे उष्टे खाऊ नये. जसे आपले स्वतःचे तोंड, नाक, कान, डोळे, जननेंद्रिये व गुदद्वारातील मलमूत्राला स्पर्श करण्यात आपल्याला किळस वाटत नाही. परंतु दुसऱ्याच्या मलमूत्राला स्पर्श करणे किळसवाणे वाटते, यावरून हेच सिद्ध होते की असे करणे सृष्टिक्रमाच्या विरुद्ध नाही. म्हणून माणसांना योग्य आहे की कुणाचे उच्छिष्ट म्हणजे उष्टे खाऊ नये.

**(प्रश्न)** पतिपत्नींनीही एकमेकांचे उष्टे खाऊ नये काय ?

**(उत्तर)** मुळीच खाऊ नये. कारण त्यांच्या शरीराचे स्वभावही भिन्न भिन्न आहेत.

**(प्रश्न)** अहो महाराज ! कोणत्याही माणसाने तयार केलेले अन्न खाण्यात काय दोष आहे ? कारण ब्राह्मणापासून चांडाळांपर्यंत माणसांची शरीरे हाड, मांस व चामडे यांनी बनलेली आहेत आणि जसे रक्त ब्राह्मणाच्या शरीरात आहे तसेच ते चांडाळाचे आहे. तर मग सर्व माणसाच्या हातचे अन्न खाण्यात काय दोष आहे ?

**(उत्तर)** दोष आहे. कारण उत्तम, सात्त्विक पदार्थ खाण्या-पिण्याने ब्राह्मण व ब्राह्मणी यांच्या शरीरात दुर्गंधादी दोषांपासून रहित रज व वीर्य उत्पन्न हाते. तसे ते चांडाळ चांडाळणीच्या शरीरात उत्पन्न होत नाही. कारण चांडाळाचे शरीर दुर्गंधाच्या परमाणू दुर्गंधाने भरलेले असते. तसे ब्राह्मणादी वर्णाचे नसते म्हणून ब्राह्मणादी व्यक्तींच्या हातचे अन्न खावे आणि चांडाळादी नीच भंगी, चांभार इत्यादिंच्या हातचे खाऊ नये. आई, सासू, बहीण, मुलगी, सून यांचे शरीर जसे हाडामांसाचे व चामड्याचे असते तसेच आपल्या पत्नीचेही असते. म्हणून काय आयाबहिणींशी पत्नीप्रमाणे वर्तन करावयाचे असते ? असा प्रश्न कोणी विचारला तर तुम्हाला संकोचाने गप्पच बसावे लागेल. उत्तम अन्न जसे हाताने व तोंडाने खाल्ले जाते तशी घाणही खाल्ली जाऊ शकते. म्हणून काय तुम्ही विष्ठा खाल ? काय असेही कोठे होऊ शकते ?

**(प्रश्न)** गायीच्या शेणाने तुम्ही स्वयंपाकघर सारवता. मग स्वतःच्या विष्ठेने का सारवीत नाही ? आणि गाईच्या शेणाने सारविलेल्या स्वयंपाकघरात जाण्याने ते अपवित्र का होत नाही ?

**(उत्तर)** माणसाच्या विष्ठेची जशी घाण येते तशी गायीच्या शेणाला असत नाही. ते चिकट असल्याने जमीन लवकर उकरत नाही. कपडा मळत नाही अथवा खराब होत नाही. जशी मातीने धूळ बसते तशी वाळलेल्या शेणाने होत नाही. शिवाय माती व शेण यांनी सारवलेली जागा दिसायला खूप सुंदर असते. शिवाय जेथे स्वयंपाक केला जातो आणि जेवणखाण केले जाते तेथे दूध, तूप, मिष्टान्न, उष्टे-खरकटे सांडते. त्यामुळे माशा, किडे वगैरे गलिच्छ ठिकाणी राहणारे जीवजंतू तेथे येतात. म्हणून ती जागा रोजच्या रोज झाडून सारवून शुद्ध ठेवली नाही तर तिला शेतखान्यासारखी (उकिरड्याची)अवकळा येत जाते. म्हणून दररोज शेणमातीने झाडून-सारवून सर्व प्रकारे स्वच्छ ठेवावे. खाली फरशी किंवा पक्के घर असले तर ती पाण्याने धुवून निर्मळ

ठेवली पाहिजे. म्हणजे वर सांगितलेल्या दोषाची निवृत्ती होऊन जाते. मुसलमानांच्या स्वयंपाकघरात कोठे कोळसा, कोठे राख, कोठे लाकडे, कोठे फुटकी भांडी, कोठे उष्ट्या थाळ्या, तर कोठे हाडे पडलेली असतात आणि माशा तर काय सांगावे ! ती जागा इतकी घाणेरडी असते की एखादा चांगला माणूस तेथे जाऊन बसला तर त्याला उलटी होण्याची संभावना आहे आणि त्या दुर्गंधी जागेसारखीच ती जागा दिसते. जर शेणाने स्वयंपाकघर सारवणे दोषपूर्ण आहे असे तुम्ही म्हणत असाल तर तुम्ही चुलीत गोवऱ्या का जाळता ? शेणकुटाचा निखारा गुडगुडीवर ठेवून तुम्ही धूम्रपान का करता ? घराच्या भिंती शेणाने का सारवता ? या साऱ्या गोष्टींमुळे मुसलमानांचे स्वयंपाकघर भ्रष्ट होत असणार यात काय शंका !

**(प्रश्न)** स्वयंपाकघरात बसून जेवण करावे की बाहेर बसून ?

**(उत्तर)** जी जागा स्वच्छ व रमणीय सुंदर असेल तेथे बसून जेवावे. परंतु आवश्यक युद्धासारख्या आपत्काळी घोड्यावर किंवा इतर वाहनात बसून अथवा उभ्या उभ्या खाने पिणे अत्यंत उचित आहे.

**(प्रश्न)** काय आपल्या हातचे अन्न खावे आणि इतरांच्या हातचे खाऊ नये ?

**(उत्तर)** जे आर्य लोकांच्या शुद्ध रीतीने तयार केलेले अन्न आहे ते सर्व आर्यांबरोबर खाण्यास काहीच हरकत नाही. कारण ब्राह्मणादी तीन वर्णांचे स्त्रीपुरुष स्वयंपाकपाणी करण्यात, सारवण करण्यात आणि भांडी घासण्यात अडकून पडले तर विद्यादी शुभगुणांची वृद्धि कधीच होणार नाही.

पाहा ! युधिष्ठिर महाराजांच्या राजसूय यज्ञासाठी साऱ्या जगातून राजे, महाराजे, ऋषी, महर्षी आले होते. ते सगळे एकाच पाकशाळेचे अन्न खात होते. जेव्हापासून ख्रिस्ती मुसलमानादिंचे मतमतांतर सुरू झाले, आपसात वैर सुरू झाले, त्यांनी मद्यपान आणि गोमांसभक्षण करणे ग्राह्य केले तेव्हापासून खाण्यापिण्यातील शिवाशीव सुरू झाली.

पाहा ! काबुल, कंधार, इराण, अमेरिका, युरोप वगैरे देशांच्या राजांच्या कन्या गांधारी, माद्री, उलूपी यांचेशी आर्यावर्त्ततील राजे विवाहादी व्यवहार करीत होते. शकुनी वगैरे कौरव-पांडवांबरोबर खाणे-पिणे करीत होते. त्यात काहीही विरोध करीत नव्हते कारण त्यावेळी सर्व भूमंडळावर एकच वैदिक मत होते. त्यावरच सर्वांची निष्ठा होती आणि सगळे लोक एकमेकांचे सुखदु:खात व हानीलाभात सहभागी जसे आपलेच आहे असे समजत होते म्हणून सर्व जगात सुख होते. आता अनेक मते झाल्यामुळे पुष्कळशे दु:ख व विरोध वाढला आहे. त्यांचे निवारण करणे हे बुद्धिमंतांचे काम आहे.

परमेश्वराने सर्वांच्या अंत:करणात सत्य मताचे असे बीजारोपण करावे की ज्यायोगे मिथ्या मतमतांतरे लवकरच नाहीशी व्हावीत. याबाबतीत सर्व विद्वान मंडळींनी विचारविनिमय करून विरोधभाव सोडून अविरुद्ध मताचा स्वीकार करून सर्व मानव मिळून सर्वांचा आनंद वाढवावा.

अशा प्रकारे आचार-अनाचार व भक्ष्याभक्ष्य यांचे थोडक्यात विवरन लिहिले आहे.

या ग्रंथाचा पूर्वार्ध हा या दहाव्या समुल्लासाबरोबर पूर्ण झाला. या समुल्लासांमध्ये आम्ही विशेष खंडन-मंडन यासाठी केलेले नाही की जोपर्यंत माणसांमध्ये सत्यासत्याचा विचार करण्याचे थोडेसेही सामर्थ्य निर्माण

होत नाही तोपर्यंत स्थूल व सूक्ष्म खंडनाचा अर्थ ते समजू शकत नाही. म्हणून आधी प्रथम सर्वांना सत्य (धर्माचा) शिकवणीचा उपदेश करून, आता उत्तरार्धातील चार समुल्लासांमध्ये विशेष खंडन-मंडन आम्ही करणार आहोत. यांपैकी अकराव्या समुल्लासात आर्यावर्त्ततील मतमतांतरांचे, बाराव्या समुल्लासात चार्वाक, बौद्ध व जैन यांच्या उपदेशांचे, तेराव्या समुल्लासात ख्रिस्ती पंथाचे व चौदाव्या समुल्लासात इस्लामचे खंडन-मंडन आम्ही करणार आहोत. ग्रंथाच्या शेवटी आम्ही आमचे मन्तव्यही दिले जाईल. ज्या कोणाला विशेष खंडन-मंडन जाणून घ्यावयाचे असेल त्यांनी हे चार समुल्लास पाहावेत. तरीपण सामान्यत: कोठे कोठे या दहा समुल्लासांमध्येही थोडेफार खंडन-मंडन केले आहे.

जो कोणी नि:पक्षपातीपणे व न्यायदृष्टीने चौदा समुल्लासांचे परिशीलन करील त्याच्या आत्म्यामध्ये सत्य अर्थाचा प्रकाश पडून त्याला आनंद होईल. जो कोणी हठवादाने, दुराग्रहाने आणि ईर्षेने पाहील व ऐकेल त्याला या ग्रंथाचा यथार्थ अभिप्राय समजणे फार कठिण आहे. म्हणून जो कोणी या ग्रंथातील विवेचनाचा यथायोग्य विचार करणार नाही त्याला या ग्रंथाचा खरा अभिप्राय न कळल्याने तो बुचकळ्या खात राहील. सत्यासत्याचा निर्णय करून सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करून परम आनंदित होणे हेच तर विद्वानांचे काम आहे तेच खरे गुणग्राहक लोक विद्वान बनून धर्म, अर्थ, काम व मोक्षरूपी फळे प्राप्त करून आनंदात राहतात.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषित आचाराऽनाचारभक्ष्याभक्ष्यविषये**
**दशमः समुल्लासः सम्पूर्णः ॥१०॥**
**समाप्तोऽयं पूर्वार्द्धः ॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






## उत्तरार्द्ध

# अनुभूमिका (१)

पाच हजार वर्षापूर्वी वैदिक धर्माशिवाय दुसरा कोणताही धर्म नव्हता, ही गोष्ट सिद्ध झालेली आहे. कारण वेदात्त सर्व गोष्टी विद्येने सिद्ध आहेत. वेदांच्या उपदेशाकडे दुर्लक्ष केल्यामुळे महाभारत युद्ध झाले. वेदांकडे पाठ फिरविल्यामुळे जगात अविद्यारूपी अंधकार पसरला; आणि माणसांची बुद्धी भ्रमिष्ट बनली. ज्याच्या मनात जे आले त्याचाच त्याने पंथ बनविला. या सर्व पंथांमध्ये चार पंथ प्रमुख असून त्यांतून इतर पंथांचा उगम झाला आहे. ते पंथ म्हणजे वेद विरुद्ध असलेले पौराणिक मत, जैन, ख्रिस्ती व इस्लामी मत हे होत. हे चार पंथ याच क्रमाने जगात प्रचलित झाले आहेत. या पंथांच्या शाखांची संख्या एक हजाराहून कमी नाही. यास सर्व पंथांचे अनुयायी, त्यांचे चेले व इतर सर्व लोक यांना परस्पर सत्यासत्याचा विचार करण्याच्या बाबतीत अधिक कष्ट पडू नयेत म्हणून, हा ग्रंथ तयार करण्यात आला आहे. यामध्ये सत्य वैदिक धर्माचे मंडन व असत्याचे खंडन आम्ही स्पष्ट केले आहे. ते सर्वांना कळावे, त्यांनी सत्यासत्याचा विचार करता यावा याकरिता हा ग्रंथ आहे. बुद्धिप्रमाणे व विद्येच्या आधारे या चार मतांचे मूलग्रंथ पाहून मला जे काही समजले ते सर्वांसमोर मांडणे हे उत्तम कार्य मी समजतो कारण या मतांच्या प्रचारामुळे विज्ञान वेदांचे ज्ञान पूर्णत: नाहीसे झाले तर ते पुन: सहजासहजी मिळणार नाही. पक्षपात सोडून या ग्रंथाचे वाचन लोकांनी केले तर त्यांना सत्य काय व असत्य काय ते सहज समजेल. त्यानंतर सर्वांना आपापल्या समजुतीप्रमाणे सत्य मताचे ग्रहण करणे व असत्य मताचा त्याग करणे सोपे होईल. यापैकी पुराणादी ग्रंथांतून विविध शाखांच्या रूपाने अनेक पंथ आर्यावर्त्तात प्रचलित झाले आहेत. त्यांचे गुणदोष संक्षेपाने अकराव्या समुल्लासात वर्णन केले आहेत.

माझे हे काम उपकारक नाही, असे जरी कोणाला वाटले तरी त्यांनी त्याला विरोधही करू नये. कारण माझा हेतू कोणाचे नुकसान करावे अथवा कोणाला विरोध करावा हा नसून सत्यासत्याचा निर्णय करणे व करविणे हा आहे. याचप्रमाणे सर्व लोकांनी न्यायाने वागणे हे अत्यंत उचित आहे. मनुष्याचा जन्म वादविवाद हा

विरोध करण्यासाठी नसून सत्यासत्याचा निर्णय करण्यासाठी व करविण्यासाठी आहे. या मतमतांतराच्या वितंडवादाने जगामध्ये ज्या अनिष्ट गोष्टी घडल्या, घडत आहेत व घडतील, त्यांची कल्पना नि:पक्षपाती विद्वज्जन करू शकतात.

जोपर्यंत मानवजातीमध्ये प्रचलित एकमेकांविरुद्धचा मिथ्या मतमतांतराचा विरोध संपणार नाही तोपर्यंत सर्वांना आनंद प्राप्त होणार नाही. जर आपण सर्व माणसे व विशेषत: विद्वान लोक ईर्ष्या व द्वेष सोडून देऊन सत्यासत्याचा निर्णय करून सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करतील व करवतील तर ही गोष्ट असाध्य नाही.

हे निश्चित आहे की या विद्वानांमधील विरोधामुळेच सर्व लोक विरोधाच्या जाळ्यात अडकले आहेत. जर हे लोक आपल्याच स्वार्थाचा विचार न करता सर्वांच्या हिताचा विचार करतील तर तात्काळ एकमत होईल. हे एकमत साधण्याचा उपाय या ग्रंथाच्या शेवटी सांगितला आहे. सर्वशक्तिमान परमात्मा एकाच सत्यमताच्या स्वीकृतीसाठी सर्वांना उत्साहित करून प्रवृत्त करो हा उत्साह सर्व मानवांच्या आत्म्यात प्रकाशित करो.

**अलमतिविस्तरेण विपश्चिद्वरशिरोमणिषु।**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






# अकरावा समुल्लास

# आर्यावर्त्तीय मतांचे खंडन मंडन

## आर्यावर्त्तीयांची महत्ता

आता आर्यावर्त्त देशात राहणाऱ्या आर्य लोकांच्या मतांचे आम्ही खंडन-मंडन करणार आहोत. या आर्यावर्त्तासारखा दुसरा देश या भूमंडळावर कोणताही नाही. म्हणूनच या भूमीला सुवर्णभूमी असे म्हणतात. कारण ही भूमी सुवर्णादी रत्नांची खाण आहे. म्हणूनच सृष्टिच्या प्रारंभी आर्य लोक याच देशात येऊन राहिले. सृष्टिविषय नावाच्या समुल्लासात आम्ही सांगितलेच आहे की, आर्य हे उत्तम पुरुषांचे नाव असून आर्येतर मानवांचे नाव दस्यु आहे. जगाच्या पाठीवर जितके देश आहेत ते सारे याच देशाची प्रशंसा करतात ज्यांनी पारसमणि दगडाबद्दल जे ऐकले आहे ते तर खोटे आहे. वस्तुतः आर्यावर्त्त देश हाच खरा परीस आहे. ज्याच्या स्पर्शाने दरिद्री परदेशी लोकांच्या रूपाने जे लोखंड त्याचे तात्काळ सोने बनवितो आणि ते श्रीमंत बनतात.

**एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।**
**स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ।** मनु. अ. २। श्लो. २०

"या आर्यावर्त्त देशात उत्पन्न झालेल्या ब्राह्मणापासून म्हणजे विद्वानांपासून या पृथ्वीवर राहणाऱ्या सर्व लोकांनी म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, दस्यु, म्लेंच्छ वगैरे सर्वांनी आपापल्या योग्यतेप्रमाणे विद्या, ज्ञान व चारित्र्य यांचे शिक्षण घ्यावे." मनुस्मृतीतील या श्लोकाप्रमाणे सृष्टिच्या प्रारंभापासून पाच हजार वर्षापूर्वीपर्यंत साऱ्या भूमंडळावर आर्यांचेच एकमात्र सार्वभौम चक्रवर्ति राज्य होते. इतर देशांत लहान-लहान मांडलिक राजे राज्य करीत होते. कौरव-पांडवांच्या काळापर्यंत येथील राजांच्या शासनानुसार जगातील सगळे मांडलिक राजे व प्रजाजन वागत होते. सृष्टिच्या प्रारंभी रचल्या गेलेल्या मनुस्मृतीत या गोष्टीचा पुरावा आहे. महाभारत युद्धाचा शेवट झाल्यानंतर विजयी महाराजा युधिष्ठिरांनी राजसूय यज्ञ केला होता. त्यावेळेपर्यंत जगातील सारी राज्ये येथील महाराजांच्या आधीन होती.

पाहा ! चीनचा भगदत्त, अमेरिकेचा बभ्रुवाहन, युरोपचा बिडालाक्ष, यूनान (ग्रीस) चे यवन आणि इराणचा शल्य वगैरे सगळे राजे सम्राटाच्या आज्ञेप्रमाणे महाभारत युद्धात व राजसूय यज्ञात सहभागी होण्यासाठी येथे आले होते. ज्यावेळी येथे रघुकुलातील राजे राज्य करीत होते. त्यावेळी लंकेचा रावणही त्यांचा मांडलिक

होता. श्रीरामचंद्रांच्या वेळी रावण विरुद्ध झाला तेव्हा रामचंद्रांनी त्यास दण्डित करून राज्य हिसकावून त्याचे भावाला म्हणजे बिभीषणाला दिले होते.

स्वायंभुव राजापासून पांडवांपर्यंत या भूमंडळावर आर्यांचे चक्रवर्ती राज्य होते. त्यानंतर येथील राजे आपसातील विरोधामुळे एकमेकांशी लढून नष्ट झाले. परमेश्वराच्या या सृष्टीमध्ये अहंकारी, अन्यायी, अविद्वान लोकांचे राज्य फार काळ टिकत नसते या जगाची ही स्वाभाविक प्रवृत्ती आहे की, जेव्हा एखाद्या लोकसमूहात किंवा देशात लोकांच्या गरजेपेक्षा जास्त धन जमा होते तेव्हा आळस, पुरुषार्थहीनता, ईर्ष्या, द्वेष, विषयासक्ती आणि प्रमाद वाढू लागतात. त्यामुळे देशात विद्या व सुशिक्षण ही नष्ट होऊन दुर्गुण व दुष्टव्यसन, मद्यमांस-सेवन, बाल्यावस्थेत विवाह, स्वैराचार वगैरे सारखे दुर्गुण व व्यसने वाढतात आणि जेव्हा युद्धविभाग, युद्धविद्याकौशल्य आणि सैन्य इतके प्रचंड वाढते की, त्याच्यासमोर जगातील कोणताही देश टिकाव धरू शकत नाही, तेव्हा त्या सामर्थ्यशाली देशाच्या लोकांमध्ये पक्षपात, अभिमान यामुळे अन्याय वाढतो. हे दोष वाढले की, त्यांच्यात यादवी सुरू होऊन त्यांचा नाश होतो तेव्हा एखाद्या लहानशा गटातून एक अत्यंत समर्थ पुरुष उदयाला येतो आणि तो त्यांचा पराभव करतो. उदाहरणार्थ, मुसलमान बादशहांच्या सत्तेविरुद्ध शिवाजी व गुरू गोविंदसिंह यांनी मुसलमानी सत्ता छिन्न भिन्न केली.

**अथ किमेतैर्वा परेऽन्ये महाधनुर्धराश्चक्रवर्तिनः केचित् सुद्युम्नभूरिद्युम्नेन्द्र द्युम्नकुवलयाश्व-यौवनाश्ववद्ध्र्यश्वाश्वपतिशशबिन्दुहरिश्चन्द्राऽम्बरीष ननक्तु-शर्यातिययात्यनरण्याक्षसेनादयः । अथ मरुत्तभरतप्रभृतयो राजानः ॥**

मैत्रायण्युपनि. अ. १। व. ४

"सुद्युम्न, भूरिद्युम्न, इंद्रद्युम्न, कुवलयाश्व, यौवनाश्व, वद्ध्र्यश्व, अश्वपती, शशबिंदु, हरिश्चंद्र, अंबरीष, ननक्तू, सर्याती, ययाती, अनरण्य, अक्षसेन, मरुत्त आणि भरत ही या जगातील सुप्रसिद्ध सार्वभौम व चक्रवर्ती राजांची नावे आहेत." या पुराव्यांवरून हे सिद्ध होते की, सृष्टीच्या प्रारंभापासून महाभारतापर्यंत चक्रवर्ती व सार्वभौम राजे आर्यकुलांतच झाले होते. आता त्यांच्या वंशजांचे भाग्य फिरल्यामुळे ते राज्यभ्रष्ट होऊन परकीयांकडून पादाक्रांत केले जात आहेत. तसे पाहिल्यास स्वायंभुवांपासून पांडवांपर्यंतच्या चक्रवर्ती राजांची नावे मनुस्मृती, महाभारत इत्यादी ग्रंथात नमूद आहेत. ते सारे खोटे आहे असे म्हणणे हे अज्ञानी व पक्षपाती लोकांचे काम आहे.

## मंत्रसिद्धी निराकरण

**(प्रश्न)** या देशात आग्नेयास्त्रादिक विद्या होत्या, ते खरे की खोटे ? त्या काळी तोफा व बंदुका होत्या की नाही ?

**(उत्तर)** त्या सगळ्या गोष्टी खऱ्या आहेत. शस्त्रे होती. कारण पदार्थविज्ञानाने ही शस्त्रास्त्रे तयार करणे शक्य आहे.

**(प्रश्न)** ही शस्त्रास्त्रे देवांकडील मंत्रांच्या साह्याने तयार केली जात होती काय ?

**(उत्तर)** नाही. नुसता मंत्रांचा जप केल्याने शस्त्रे तयार होत नाहीत. मंत्र म्हणजे विचार. पदार्थविज्ञानाचा

विचार करून ती शस्त्रे तयार केली जात व चालविली जात. वस्तुत: मंत्र हा शब्दमय असतो. त्याच्यापासून कोणतेही द्रव्य उत्पन्न होत नसते. जर कोणी म्हणत असेल की, मंत्राने अग्नी उत्पन्न होतो तर त्या मंत्राचा जप करणाऱ्याचे हृदय व जीभही जळून भस्म झाली पाहिजे. म्हणजे शत्रूला मारायला निघाला आणि स्वत:च मरून गेला असे व्हायचे. मंत्र म्हणजे वस्तुत: विचार होय. उदाहरणार्थ, राजमंत्री म्हणजे राज्यकारभाराचा विचार करणारा. याचप्रमाणे मंत्राने म्हणजे विचाराने साऱ्या सृष्टीतील पदार्थांचे प्रथम ज्ञान प्राप्त होते आणि मग क्रिया केल्याने अनेक प्रकारचे पदार्थ व क्रियाकोशल्ये निर्माण होतात.

लोखंडाचा एखादा बाण किंवा गोळा बनवून त्यामध्ये असे काही पदार्थ भरावयाचे की, ज्यांना अग्नीचा स्पर्श होताच हवेत धूर पसरेल आणि सूर्याच्या किरणाने अथवा वायूच्या स्पर्शाने आगीचा भडका उडेल. या अस्त्राला 'आग्नेयास्त्र' नाव आहे. या अस्त्राचे निवारण करण्यासाठी प्रतिपक्षाकडून त्यावर 'वारुणास्त्र' सोडले जाई. जर शत्रूकडून आपल्या सैन्यावर आग्नेयास्त्रांचा मारा केला गेला तर आपल्या सैन्याच्या रक्षणासाठी सेनापती त्यावर वारुणास्त्र सोडून ते आग्नेयास्त्रापासून निवारण करीत असे. या वारुणास्त्रामध्ये अशी द्रव्ये भरलेली असत की, त्यांच्या धुराचा वायूशी संपर्क घडताच त्याने ढगात रूपांतर होऊन पाऊस पडू लागे आणि अग्नी विझून जाई. असेच एक 'नागपाश' होते. ते शत्रूवर सोडले असता आपल्या पाशांनी शत्रूचे शरीर आवळून टाकी. असेच एक 'मोहनास्त्र' होते. त्यात गुंगी आणणारी द्रव्ये भरलेली असत. त्याच्या धूराने शत्रूसैन्याचे सारे सैनिक निद्रास्थ किंवा मूर्च्छित होऊन पडत. अशाच प्रकारची इतरही अनेक शस्त्रास्त्रे होती. 'पाशुपतास्त्र' त्यामध्ये तार, काच किंवा अन्य एखादा पदार्थ यांचा असा काही वापर केला जाई की, त्यातून वीज निर्माण होई आणि ती शत्रुसैनिकांवर पडून त्यांचा नाश करी. ते सुद्धा आग्नेयास्त्र म्हटले जात होते.

'तोफ' व 'बंदूक' हे शब्द परकीय भाषेतील आहेत. त्यांची संस्कृत व आर्य भाषेतील नाहीत. विदेशी भाषेच्या या शब्दाला संस्कृतमध्ये व आर्य भाषेत तोफेला शतघ्नी व बंदुकीला भुशुंडी असे म्हणतात. ज्यांना संस्कृत भाषेचा गंध नाही ते लोक भ्रमात पडून काही तरी लिहितात व बकतात. त्यांचे ते लिहिणे व बोलणे सुज्ञ लोक प्रमाण मानीत नाही. आज जगामध्ये ज्या विद्या पसरल्या आहेत त्या सर्व आर्यावर्त्तातूनच तिकडे गेल्या आहेत. आर्यावर्त्तातून मिश्र तेथून यूनान, ग्रीसमधून तुर्कस्तानात तेथून युरोपखंडात आणि तेथून अमेरिका वगैरे देशांत आर्यविद्येचा प्रसार झाला. आजही संस्कृत विद्येचा जेवढा प्रचार आर्यावर्त्तात आहे, तेवढा इतर कोणत्याही देशात नाही. काही लोक म्हणतात की, जर्मनीमध्ये संस्कृत विद्येचा खूप प्रचार असून मोक्षमूलर (मॅक्समूलर) साहेबांनी संस्कृतचा जेवढा अभ्यास केला आहे, तेवढा इतर कोणीच केलेला नाही. पण या साऱ्या बोलायच्या गोष्टी आहेत. **'यस्मिन्देशे द्रुमो नास्ति तत्रैरण्डो द्रुमायते ।'** म्हणजे ज्या ठिकाणी मोठा वृक्ष नसतो तेथे एरंडाचे झाड हाच मोठा वृक्ष समजला जातो, या म्हणीप्रमाणे युरोप खंडात संस्कृत विद्येचा प्रचार झालेला नसल्यामुळे जर्मन लोकांनी व मोक्षमूलर साहेबांनी संस्कृतचे जे थोडेफार अध्ययन केले तेच त्यांना फार वाटले. परंतु आर्यावर्त्ताशी तुलना केल्यास त्यांचे संस्कृतचे ज्ञान अगदीच सामान्य म्हणावे लागेल. मी जर्मनीतील एका प्रिन्सिपॉलशी पत्रव्यवहार केला असता मला समजले की, त्या देशात संस्कृमध्ये लिहिलेल्या पत्राचा अर्थ समजणारे लोक फारच थोडे आहेत. मोक्षमूलर साहेबांचे संस्कृत साहित्य व त्यांनी केलेली वेदांची

थोडीशी व्याख्या पाहून माझ्या लक्षात आले की, त्यांनी आर्यावर्त्तातील लोकांची लिहिलेली टीका वाचून काहीतरी थातुरमातुर लिखाण केले आहे. उदाहरणार्थ,

**'युञ्जन्ति ब्रध्नमरुषं चरन्तं परि तस्थुषः। रोचन्ते रोचना दिवि।'**

ऋ.मं.१।सू.६।मं.१

या मंत्रातील 'ब्रघ्न' या शब्दाचा अर्थ त्यांनी 'घोडा' असा केला आहे. यापेक्षा सायणाचार्यांनी केलेला 'सूर्य' हा अर्थ जास्त चांगला आहे. परंतु त्याचा खरा अर्थ 'परमात्मा' असा आहे. माझ्या 'ऋग्वेदादि-भाष्यभूमिका' या ग्रंथात यथायोग्य अर्थ पाहून घ्यावा. त्यावरून जर्मनी देशातील आणि मोक्षमूलर साहेब यांचे संस्कृत विद्येतील पांडित्य किती आहे हे जाणावे.

जगामध्ये जेवढ्या विद्या व मत प्रचलित आहेत, त्या सर्वांचे मूळ आर्यावर्त्तातूनच तिकडे गेले आहे. पाहा! फ्रान्स देशातील पॅरिस शहरी राहणारे जॅकोलियट साहेब आपल्या 'बायबल इन इंडिया' या ग्रंथात लिहितात की, ''आर्यावर्त्त हा देश सर्व विद्यांचे माहेरघर आणि चांगल्या गोष्टींचे भांडार आहे. येथूनच सर्व विद्या व मत पसरले आहेत.'' ते परमेश्वरास अशी प्रार्थना करतात की, ''हे परमेश्वरा! पूर्वी आर्यावर्त्त देशाची जशी उन्नती होती तशी तू आमच्या देशाची कर.'' हे एका फ्रेंच पंडिताचे लिखाण त्या ग्रंथात पाहावे.

याचप्रमाणे दाराशिकोह या राजपुत्राने असेच मत ठामपणे व्यक्त केले होते की, संस्कृत भाषेत जेवढी विद्या आहे तेवढी दुसऱ्या कोणत्याही भाषेत नाही त्याने उपनिषदाचे फारसीमध्ये भाषांतर केले आहे. त्या ग्रंथात तो लिहितो की, ''मी अरबी वगैरे अनेक भाषा शिकलो. परंतु माझ्या मनातील संदेह दूर झाला नाही व मला आनंद मिळाला नाही. परंतु जेव्हा मी संस्कृत भाषा शिकलो आणि संस्कृत विद्येचे श्रवण केले तेव्हा मी निःशंक होऊन आनंदित झालो.

काशीच्या मानमंदिरातील (वेधशाळेतील) शिशुमारचक्र (राशिचक्र किंवा सूर्यमंडळ) पाहा. त्याचे नीट रक्षण केले जात नाही. तरीही ते किती उत्तम स्थितीत आहे. त्यावरून आजही खगोलाची कितीतरी माहिती मिळते. त्याचे मोडतोड झालेले भाग दुरूस्त करून त्याची योग्य देखभाल ठेवण्याची व्यवस्था जयपूरचे सवाई महाराज करतील तर फार चांगले होईल. परंतु अशा या शिरोमणी देशाला महाभारत युद्धाने असा जोरदार धक्का दिला की तो अजूनही सावरून पूर्वस्थितीला आला नाही. कारण जेव्हा भाऊच भावाच्या जिवावर उठतो तेव्हा नाश होण्यास काय संदेह?

## पाखंडी लोकांचे प्रस्थ

**विनाशकाले विपरीतबुद्धिः।** चाणक्यनीति दर्पण अ. १६। श्लो. ५

हे कुण्या कवीचे वचन आहे. जेव्हा विनाश होण्याचा काळ जवळ येतो तेव्हा बुद्धि फिरते; आणि विपरीत कामे करतात. कोणी त्यांना नीट समजावून सांगू लागला तर ते त्याचा उलटाच अर्थ घेतात आणि कोणी उलट सांगू लागला तर त्यांना तो सरळ वाटतो. महाभारत युद्धात मोठमोठे विद्वान, राजे, महाराजे, ऋषी, महर्षी मारले गेले व पुष्कळसे मेले, तेव्हा विद्या व वेदोक्त धर्म यांचा प्रचार थांबला. लोक ईर्ष्या, द्वेष व अभिमान एकमेकांत करू लागले. जो बलवान होता, त्याने राज्य ताब्यात करून तो राजा बनला. त्यामुळे आर्यावर्त्त देशाचे खंड खंड

होऊन लहान लहान राज्ये झाली. तेव्हा द्विपांतरातील राज्यांची व्यवस्था कोण पाहणार ? जेव्हा ब्राह्मणच विद्याविहीन बनले, तेव्हा क्षत्रिय, वैश्य व शूद्र अविद्वान बनले असल्यास काय आश्चर्य ? वेदादी शास्त्रांचे अर्थासह पठनपाठन करण्याची परंपराही खंडित झाली. केवळ पोट भरण्यासाठी ब्राह्मण लोक वेदांचे पठन करीत राहिले. त्यांनी क्षत्रियादिकांना शिकविली नाही. कारण जेव्हा अविद्वान लोक गुरू बनले तेव्हा त्यांच्यात छल कपट आणि अधर्म वाढीस लागला. ब्राह्मणांनी आपल्या पोटापाण्याची काहीतरी व्यवस्था करावी हा विचार केला. म्हणून त्यांनी संगनमत करून ठरविले त्याप्रमाणे ते क्षत्रियांदिकांना असा उपदेश करू लागले की, "आम्हीच तुमचे पूजनीय देव आहोत. आमची सेवा केल्याखेरीज तुम्हाला स्वर्ग किंवा मुक्ती मिळणार नाही. जर तुम्ही आमची सेवा न कराल तर घोर नरकात पडाल." वैदिक ऋषीमुनींनी लिहिलेल्या वेदांमध्ये आहे की, जे ज्ञानी, धार्मिक व पवित्र असतात त्यांचे नाव ब्राह्मण. परंतु येथे जर मूर्ख, विषयासक्त, कपटी, लंपट व अधार्मिक लोक स्वत:ला ब्राह्मण समजून घेऊ लागले. परंतु सात्त्विक, सत्यवादी वृत्तीच्या, विद्वान व सत्यप्रिय आप्तांची लक्षणे या लोकांमध्ये थोडीच आढळणार ? जेव्हा क्षत्रियादी यजमान संस्कृत विद्येला पारखे झाले तेव्हा या ब्राह्मणांनी ज्या काही थापा त्यांचेसमोर मारल्या त्या साऱ्या त्या बिचाऱ्यांनी मानून घेतल्या. त्यामुळे या नामधारी ब्राह्मणांचे चांगलेच फावले. त्यांनी आपल्या वाक्‌जालात सर्वांना अडकवून आपल्या आधीन करून घेतले; आणि ते लोकांना सांगू लागले की, **'ब्रह्मवाक्यं जनार्दन:'**

म्हणजे ब्राह्मणांच्या मुखातून जे काही वचन निघते, ते जणू साक्षात परमेश्वराच्या मुखातूनच निघाले आहे असे समजावे. जेव्हा ज्ञानाच्या बाबतीत आंधळे (अडाणी) आणि पैशाने खूप श्रीमंत असलेले क्षत्रियादी वर्णांचे लोक ब्राह्मणांचे चेले बनले तेव्हा ब्राह्मण हे नाव व्यर्थ धारण करणाऱ्यांना विषयरूप उपवनच मिळाले. या जगामध्ये जे काही उत्तमोत्तम आहे ते सारे ब्राह्मणांसाठी आहे, असेही त्यांनी जाहीर करून टाकले. त्यासाठी गुण-कर्म-स्वभावावर आधारलेली वर्णव्यवस्था मोडून काढून त्यांनी ती जनमाधिष्ठित बनविली आणि मृतका संबंधीचे दान यजमानांकडून घेऊ लागले. जसे मनाला येईल तसे ते वागू लागले. येथपर्यंत मजल मारली की, "आम्ही भूदेव आहोत. आमची सेवा केल्याखेरीज देवलोक (स्वर्ग) मिळू शकत नाही." त्यांना असे विचारले पाहिजे की, "तुम्ही स्वत: कोणत्या लोकात जाणार आहात ? तुमची कृत्ये तर घोर नरक भोगणारी आहेत. तुम्ही तर किडे, कीटाणू पतंगादी बनाल तेव्हा ते क्रुद्ध होऊन म्हणतात, "आम्ही तुम्हाला शाप दिला तर तुमचा नाश होईल. कारण लिहिले आहे की, 'ब्रह्मद्रोही विनश्यति' म्हणजे जो कोणी ब्राह्मणांचा द्रोह करतो त्याचा नाश होतो." परंतु हे खरे आहे की, पूर्ण वेद विद्या व परमात्मा यांना जाणणारे धर्मात्मे साऱ्या जगाचे उपकारकर्ते अशा पुरुषांचा जो कोणी द्वेष करील तो अवश्य नष्ट होईल. परंतु जो ब्राह्मण विद्वान नाही, तो ब्राह्मण नाही. त्याला ब्राह्मण नाव नाही व त्याची सेवाही करू नये.

**(प्रश्न)** तर मग आम्ही कोण आहोत ? **(उत्तर)** तुम्ही पोप आहात.

**(प्रश्न)** पोप कुणाला म्हणतात ?

**(उत्तर)** पोप हा मूळ रोम भाषेतील शब्द असून त्याचा अर्थ उत्तम श्रेष्ठ पिता असा आहे. पण आता लबाडी करून इतरांना फसविणारा व आपला स्वार्थ साधणारा इसम पोप म्हटला जातो.

**(प्रश्न)** आम्ही तर ब्राह्मण व साधू आहोत. कारण आमचे आईबाप ब्राह्मण होते आणि आम्ही अमक्या साधूचे चेले आहोत.

**(उत्तर)** तुम्ही म्हणता ते खरे आहे. परंतु ऐका. केवळ आईबाप ब्राह्मण असल्याने आणि एखाद्या साधूचे शिष्यत्व पत्करल्याने कोणीही ब्राह्मण अथवा साधू होऊ शकत नाही. ब्राह्मण आणि साधू हे आपल्या गुण, कर्म, स्वभावामुळे व परोपकारी वृत्तीमुळे असतात. असे की, रोमचे पोप आपल्या अनुयायांना ऐकवित आहे की ''तुम्ही तुमची पापे आमच्यासमोर प्रकट केलीत तर आम्ही तुम्हांला क्षमा करू. आमची सेवा केल्याशिवाय आणि आमच्या आज्ञेशिवाय कोणीही स्वर्गात जाऊ शकत नाही. तुम्हांला स्वर्गात जाणे असेल तर जितके रुपये तुम्ही आमचेजवळ जमा कराल तितक्या रुपयाची सामग्री तुम्हाला स्वर्गात मिळेल.'' त्यांचे हे बोलणे ऐकून अक्कलखाती शून्य आणि भरपूर पैसा अडका असणारे लोक स्वर्गात जाण्याची इच्छा बाळगून पोप महाशयांकडे जाऊन त्यांना भरपूर पैसा देत. तेव्हा पोप त्यांना येशू व मेरी यांच्या मूर्ती समोर उभे करून या प्रकारची हुंडी लिहून देत असे की, ''हे खुदावंत येशू ! ही चिठ्ठी घेऊन येणाऱ्या इसमाने स्वर्गात येण्यासाठी तुझ्या नावाने आमच्याकडे लाख रुपये जमा केले आहेत. जेव्हा हा गृहस्थ स्वर्गात येईल तेव्हा तू आपल्या बापाच्या स्वर्गातील राज्यामध्ये याला पंचवीस हजार रुपये घरे व बागबगीचे यांसाठी, पंचवीस हजार रुपये नोकरचाकर, वाहने व शिकार यांसाठी, पंचवीस हजार रुपये खाणे-पिणे, कपडालत्ता यांसाठी आणि बाकीचे पंचवीस हजार रुपये याचे जे कोणी इष्ट मित्र, नातेवाईक वगैरे तेथे असतील त्यांच्या सरबराईसाठी द्यावेत.'' मग त्या हुंडीखाली आपली सही करून पोप महाराज ती त्या इसमाच्या हातात देत व त्याला सांगत, ''तू मरताना ही हुंडी कबरीमध्ये तुझ्या उशाशी ठेवण्यास तुझ्या कुटुंबियांना सांगून ठेव. मग तुला नेण्यासाठी जेव्हा देवदूत येतील तेव्हा तुझ्याबरोबर ही हुंडी स्वर्गात घेऊन जातील; आणि यात नमूद केल्याप्रमाणे साऱ्या गोष्टी तुला मिळवून देतील.''

म्हणजे पाहा ! जणू स्वर्गाचा ठेकाच पोप महाशयांनीच घेतला आहे. जोपर्यंत युरोपात मूर्खता होती तोपर्यंत तेथे पोप महाराजांची ही लीला चालत राहिली. आता तेथे ज्ञानाचा प्रसार झाल्यामुळे पोपची ही खोटी लीला चालत नाही. मात्र अजून ती समूळ नाहीशी झालेली नाही.

अशाच प्रकारे आर्यावर्त्ततही जणू पोप महाशयांनी लाखो अवतार धारण करून ती लीला चालविली आहे. राजाला व प्रजेला विद्या शिकू न देणे, सत्पुरुषांचा सत्संग घडू न देणे, रात्रंदिवस भ्रमात ठेवणे यांखेरीज दुसरे कोणतेच काम येथील पोप म्हणजे ब्राह्मण व साधू करीत नाहीत. मात्र येथे ही गोष्ट लक्षात ठेवावी की जे लोक छल कपटादी लबाडी व फसवाफसवीचा व्यवहार करतात, त्यांनाच पोप म्हटले आहे. त्यांच्यापैकी जे कोणी धर्मनिष्ठ, विद्वान व परोपकारी आहेत ते खरे ब्राह्मण व साधू आहेत.

म्हणून लोकांना फसवून आपला स्वार्थ साधणाऱ्या लबाड व कपटी लोकांनाच पोप असे संबोधणे आणि उत्तम पुरुषांचा ब्राह्मण व साधू म्हणून स्वीकार करणे हेच उचित होय. पाहा ! जर या देशात उत्तम ब्राह्मण व साधू नसते तर वेदादी सत्यशास्त्रांच्या ग्रंथांचे स्वरांसह पठन-पाठन करून त्यांचे रक्षण कोणी केले असते ? आणि जैन, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे लोकांच्या जाळ्यात अडकण्यापासून आर्यांचा बचाव करून वेदादी सत्यशास्त्राविषयी प्रेम बाळगणाऱ्या लोकांना वर्णाश्रम व्यवस्थेद्वारे कायम ठेवण्याचे काम ब्राह्मण आणि

साधूशिवाय कोणी केले असते. **'विषादप्यमृतं ग्राह्यम्'** (मनु. २/२३९) म्हणजे विषामधूनही अमृत ग्रहण करावे, त्याप्रमाणे येथील ब्राह्मणांच्या व साधूंच्या या पोपगिरीमुळे का होईना, आर्यलोक जैन वगैरे पंथांपासून दूर राहिले. जणू ते विषातून निघालेले अमृतच होते.

जेव्हा यजमान विद्याविहीन बनले तेव्हा थातुरमातुर मंत्रपाठ करणारे घमेंडखोर बनले. अशा साऱ्या लोकांनी आपसात संगनमत करून राजा वगैरे वरिष्ठ लोकांना सांगितले की, '' ब्राह्मण व साधू हे अदण्ड्य आहेत **'ब्राह्मणो न हन्तव्यः' 'साधुर्न हन्तव्यः'** यासारखी जी वचने खऱ्या ब्राह्मण व खऱ्या साधूसाठी होती परंतु पोपगिरी करणारांनी हे वचन आपल्यासाठीच आहे असे म्हटले. अशीच खोटी वचने असणारे ग्रंथ या लोकांनी ऋषिमुनींच्या नावांनी रचले, ऋषिच्या नावाने ऐकवित राहिले. त्या प्रतिष्ठित ऋषी-महर्षींची नावे वापरून आपल्यावरील शिक्षा हटविली आणि मग ते स्वैराचार करू लागले. त्यांनी असे काही कडक नियम बनविले की, या पोपांच्या आज्ञेशिवाय लोकांना झोपणे, उठणे, बसणे, जाणे, येणे, खाणे, पिणे इत्यादी गोष्टीही करणे कठीण झाले. राजे लोकांच्या मनात या भारतीय पोपांनी असे ठसविले की, ब्राह्मण व साधू यांनी वाटेल ते केले तरी त्यांना शिक्षा होऊ नये; एवढेच नव्हे तर त्यांना शिक्षा करण्याचा विचारही मनात आणता कामा नये.

जेव्हा लोक असे मूर्ख बनले तेव्हा हे पोप मनास येतील त्या गोष्टी करू लागले व इतरांकडून करवून घेऊ लागले. हा परिस्थितीत झालेला बिघाड महाभारत युद्धाच्या आधी एक हजार वर्षापासून झाला होता. कारण त्या काळी चांगले ऋषी-मुनी होते. तरी पण आळस, प्रमाद, ईर्ष्या, द्वेष यांचे थोडे फार अंकुरही फुटू लागले होते ते वाढत वाढत मोठे झाले. जेव्हा सदुपदेश कमी होत गेला तसतसे आर्यावर्त्तात अज्ञान पसरू लागले आणि लोक आपसात भांडू-लढू लागले. कारण,

**उपदेश्योपदेष्टृत्वात् तत्सिद्धिः । इतरथान्धपरम्परा ॥** सांख्य. अ. ३। सू. ७०,७१

जेव्हा उत्तमोत्तम उपदेशक विद्यमान असतात तेव्हा धर्म, अर्थ, काम व मोक्ष सिद्ध होतात. परंतु जेव्हा चांगले उपदेशक व श्रोते नसतात तेव्हा अंध परंपरा चालू होते. परंतु जेव्हा सत्पुरुष उत्पन्न होऊन सद्धर्माचा उपदेश करतात, तेव्हा अंध परंपरा नष्ट होऊन सत्याचा प्रकाश होतो.

## वाममार्ग समीक्षा

पुनः ते पोप लोक आपली व आपल्या चरणांची पूजा करवून घेऊ लागले आणि सांगू लागले की, ''यातच तुमचे कल्याण आहे.'' जेव्हा लोक मनाने त्यांचे गुलाम बनले तेव्हा पोप विषयसेवनात दंग झाले ते जणू धनगर, मेंढपाळाप्रमाणे होऊन खोटे गुरू बनले आणि लोक चेले बनले. लोकांमधून विद्या, बळ, बुद्धी, पराक्रम, शौर्य, वीरता इत्यादी सद्‌गुण नष्ट होऊ लागले. नंतर विषयासक्त होऊन लपून छपून मांसाशन व मद्यपान करू लागले. मग त्यातूनच एक वाममार्ग उत्पन्न झाला. 'शिव उवाच', 'पार्वत्युवाच', 'भैरव उवाच' यांसारखे मंत्र तयार करून त्याचे नाव तंत्र ठेवले. त्या ग्रंथामध्ये अशा विचित्र गोष्टी लिहिलेल्या आढळतात त्या याप्रमाणे :-

**मद्यं मांसं च मीनं च मुद्रा मैथुनमेव च ।**
**एते पञ्चमकाराः स्युर्मोक्षदा हि युगे युगे ॥१॥**

**प्रवृत्ते भैरवीचक्रे सर्वे वर्णा द्विजातय:।**
**निवृत्ते भैरवीचक्रे सर्वे वर्णा: पृथक् पृथक् ॥२॥** कालातन्त्रादि
**पीत्वा पीत्वा पुन: पीत्वा यावतत्पतति भूतले।**
**पुनरुत्थाय वै पीत्वा पुनर्जन्म न विद्यते॥३॥** कुलार्णव तन्त्र अ. ८। श्लो. ९६
**मातृयोनीं परित्यज्य विहरेत् सर्वयोनिषु॥४॥** कुलार्णव तन्त्र अ. ७। श्लो. १००
**वेदशास्त्रपुराणानि सामान्यगणिका इव।**
**एकैव शाम्भवी मुद्रा गुप्ता कुलवधूरिव॥५॥** ज्ञान संकलनी तन्त्र

या घमेंडखोर पोपांची ही लीला पाहिली. या वाममार्गी लोकांनी वेदांविरुद्ध व महान अधार्मिक गोष्टींनाच श्रेष्ठ ठरविले आहे. मद्य, मांस, मासळी, मुद्रा पुऱ्या, कचोऱ्या सेवन व पाचवे मैथुन म्हणजे सर्व पुरुष शिव व सर्व स्त्रिया पार्वती असे मानून आणि **'अहं भैरवस्त्वं भैरवी ह्यावयोरस्तु सङ्गम:'।** कुलार्णव तन्त्र उल्लास ८-१७,१०२

मी भैरव असून तू भैरवी आहेस. आपणा दोघांचा संगम होवो. हा असंबद्ध मंत्र म्हणून कोणत्याही पुरुषाने कोणत्याही स्त्रीशी समागम केला असता त्यात काही दोष नाही, असे हे वाममार्गी समजतात. ज्या स्त्रिया मासिक पाळी वगैरे कारणांनी अस्पर्श समजल्या जातात त्यांना हे वाममार्गी लोक अत्यंत पवित्र मानतात. शास्त्रांनी रजस्वला वगैरे स्त्रियांना स्पर्श करणे निषिद्ध ठरविले आहे. परंतु त्यांना या वाममार्गी लोकांनी अत्यंत पवित्र मानले आहे. ऐका त्यांचा अंटसंट श्लोक :-

**रजस्वला पुष्करं तीर्थं, चाण्डाली तु स्वयं काशी।**
**चर्मकारी प्रयाग: स्याद्रजकी मथुरा मता॥**
**अयोध्या पुक्कसी प्रोक्ता॥** रुद्रयामल तंत्र इत्यादी.

याचा अर्थ असा :- रजस्वला स्त्रीशी समागम करण्याने जणू पुष्करतीर्थातील स्नान, चांडालीशी समागम केल्याने काशी यात्रा, चांभारणीशी संभोग केल्याने प्रयागस्नान, धोबीणीशी संग केल्याने मथुरेची यात्रा आणि वेश्येशी समागम केल्याने अयोध्येची यात्रा केली. दारूला 'तीर्थ', मांसाला 'शुद्धी' आणि 'पुष्प', मासळीला 'तृतीया' किंवा 'जलभोपळा', मुद्रेला 'चतुर्थी' आणि मैथुनाला 'पंचमी' अशी नावे ठेवली आहेत. इतरांना कळू नये म्हणून त्यांनी ही अशी नावे ठेवलीत. त्यांची आपली नावे-कौल (कमळ), आर्द्र (दयाळू), वीर, शांभव (शंभूचे उपासक), गण वगैरे ठेवली आहेत आणि जे वाममार्गी मतात नाहीत त्यांना ते 'कंटक', 'विमुख', 'शुष्कपशू' (मरतुकडी जनावरे) इत्यादी नावे देतात. ते म्हणतात की ''जेव्हा भैरवीचक्र सुरू होते तेव्हा त्यामध्ये ब्राह्मणांपासून चांडाळांपर्यंत सारेच द्विज होतात; आणि जेव्हा ते भैरवीचक्रातून वेगळे होतात तेव्हा आपापल्या मूळ वर्णाचे होतात.''

वाममार्गी लोक जमिनीवर किंवा पाट्यावर बिंदू, त्रिकोण, चतुष्कोण किंवा वर्तुळ काढून भैरवीचक्रात त्यावर दारूने भरलेली घागर ठेवून तिची पूजा करतात. मग ते असा मंत्र म्हणतात, ''ब्रह्मशापं विमोचय!'' हे मद्या! तू ब्रह्मा आदींच्या शापापासून रहित हो. वाममार्गी स्त्रीपुरुष एखाद्या गुप्त ठिकाणी जमतात. तेथे ते वाममार्गी लोकांशिवाय इतर कोणाला येऊ देत नाहीत. मग एका स्त्रीला नागवी करून तिची पूजा करतात व

एका पुरुषाला नग्न करून स्त्रिया त्याची पूजा करतात. त्यानंतर स्त्री त्याची स्वतःची माता अथवा दुसऱ्याची पत्नी, कन्या, आई, बहीण, सून यांपैकी कोणी का असेना येतात. त्यानंतर एका भांड्यात दारू आणि एका परातीत मांसाचे तुकडे, वडे ठेवतात. मग त्यांचा आचार्य ते मद्यपात्र हातात घेऊन 'भैरवोऽहम्' 'शिवोऽहम्' --मी भैरव आहे, मी शिव आहे असे म्हणतो आणि मद्यपान करतो. त्यानंतर त्या उष्ट्या पात्राने सगळेजण पितात. त्यानंतर एखाद्या स्त्रीला किंवा वेश्येला किंवा पुरुषाला नग्न करून त्याच्या हातात तलवार देतात मग स्त्रीला देवी व पुरुषाला महादेव असे समजतात. मग त्यांच्या जननेंद्रियांची पूजा करून त्या देवीला किंवा शिवाला मद्य पाजतात आणि त्याच उष्ट्या पात्रातून सर्वजण एकेक पेलाभर दारू पितात. याच क्रमाने वारंवार मद्यप्राशन करून ते पुरे झिंगतात मग ती कुणाचीही बहीण, मुलगी किंवा आई असली तरी आणि मनास येईल त्या स्त्रीशी कुकर्म करतात. कधी-कधी त्या नशेत ते एकमेकांशी जोड्यांनी, लाथा-बुक्यांनी मारामारी करतात व एकमेकांच्या झिंज्या उपटतात. काही जणांना तेथेच वांत्या होतात. त्यांच्यापैकी जो मोठ्या पदाला पोचलेला अघोरी म्हणजे सिद्ध पुरुष असतो तो पडलेली उल्टी खातो. अशी त्यांच्या त्या सर्वात मोठ्या सिद्धाची गोष्ट आहे.

**हालां पिबति दीक्षितस्य मन्दिरे सुप्तो निशायां गणिकागृहेषु।**
**विराजते कौलवचक्रवर्ती॥**

जो दीक्षिताच्या म्हणजे कलालाच्या घरी जाऊन बाटल्यांवर बाटल्या दारू ढोसतो. वेश्येच्या घरी जाऊन तिच्याशी संभोग करून झोपतो आणि ही सारी दुष्कृत्ये करण्यामध्ये निर्लज्ज, निःशंक असतो तोच वाममार्गी लोकांमध्ये चक्रवर्ती राजाप्रमाणे सर्वश्रेष्ठ समजला जातो. अर्थात त्यांच्यात जो अत्यंत दुराचारी असेल तोच सर्व श्रेष्ठ आणि जो वाईट कामांना भितो तो लहान असतो. कारण,

**पाशबद्धो भवेज्जीवः पाशमुक्तः सदा शिवः॥** ज्ञानसंकलनी तंत्र। श्लो. ४३

त्यांच्या तंत्रामध्ये असे आहे की, लोकलज्जा, कुललज्जा, देशलज्जा इत्यादी पाशांनी जो बांधलेला असतो तो जीव आणि जो निर्लज्ज बनून दुराचार करतो तोच सदाशिव आहे.

उड्डीस तंत्र इत्यादींमध्ये एक प्रयोग नमूद केलेला आहे. की :- एका घरामध्ये चारही बाजूंना खोल्या असाव्यात. त्या खोल्यांमध्ये मद्याच्या बाटल्या भरून ठेवाव्यात. एका खोलीत जाऊन दारूची बाटली प्यावी. तेथून दुसऱ्या खोलीत जाऊन तेथील एक बाटली प्यावी. मग तिसऱ्या खोलीत जाऊन तेथील एक बाटली प्यावी चौथ्या खोलीत जावे. अशा प्रकारे उभ्या उभ्या दारू पीत जावे. एखाद्या काठीप्रमाणे जमिनीवर कोसळेपर्यंत एका मागून एका खोलीत जाऊन दारू प्यावी. नशा उतरल्यावर पुनः असेच धराशायी होईपर्यंत मद्यपान करावे. तिसऱ्यांदा असे मद्यपान करून जो उठतो त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाही. खरी गोष्ट अशी आहे की, अशा माणसांना पुनः मनुष्य जन्म मिळणेच कठिण आहे. त्यांना मेल्यानंतर एखाद्या नीच योनीत दीर्घ काळपर्यंत खितपत पडावे लागेल.

वाममार्गी लोकांच्या तंत्रग्रंथामध्ये असा नियम आहे की, एक आई सोडून कोणतीही स्त्रीला वर्ज्य समजू नये. मग ती, स्वतःची मुलगी अथवा बहीण का असेना तरी तिच्याशी संभोग केला पाहिजे. या वाममार्गी लोकांच्या दहा महाविद्या प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी एक मातंगी विद्यावाला म्हणतो की **'मातरमपि न**

**त्यजेत्।'** म्हणजे आईलाही समागम केल्याशिवाय सोडू नये आणि स्त्री पुरुष समागमाच्या वेळी 'आम्हाला सिद्धी प्राप्त होवो' असा मंत्र जपतात. असे वेडे व महामूर्ख माणसे जगामध्ये फारच कमी असतील !! जो माणूस असत्याचरण करू इच्छितो तो सत्याची निंदा अवश्य करणारच. वाममार्गी काय म्हणतात पाहा ! वेद, शास्त्रे व पुराणे ही सारी सामान्य वेश्यांसारखी आहेत. परंतु ही शांभवी वाममार्गी मुद्रा मात्र गुप्त कुळाच्या स्त्री सारखी आहे. अशा या लोकांनी वेद विरुद्ध आपले मत स्थापन केले. कालांतराने त्यांचे हे मत खूप प्रसिद्ध झाले. तेव्हा त्यांनी धूर्तपणे वेदांच्या नावाखालीही आपले वाममार्गी तत्त्वज्ञानाची थोडी थोडी लीला चालविली. अर्थात-

**सौत्रामण्यां सुरां पिबेत। प्रोक्षितं भक्षयेन्मांसम्॥** मनु. अ. ५। श्लो. २७

**वैदिकी हिंसा हिंसा न भवति॥१॥** मनु. अ. ५। श्लो. ५६

''सौत्रामणी यज्ञात मद्य प्राशन करावे.'' याचा अर्थ तर असा आहे की, सौत्रामणी यज्ञामध्ये सोमरस म्हणजे सोमवल्लीचा रस प्यावा. ''प्रोक्षित म्हणजे यज्ञात मांसाचे भक्षण करण्यात दोष नाही.'' अशा नीचपणाच्या गोष्टी या वाममार्गीयांनी चालविल्या आहेत. त्यांना असे विचारले पाहिजे की, वैदिकी (यज्ञातील) हिंसा ही जर हिंसा नसेल तर तुम्हांला व तुमच्या कुटुंबाला मारून होम केला तर काय हरकत आहे ? ॥१॥

**न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने।**

**प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला॥२॥** मनु. अ. ५। श्लो. ५६

''मांस भक्षण करणे, दारू पिणे, परस्त्री गमन करणे यात मुळीच दोष नाही,'' असे म्हणणे हा निव्वळ पोरकटपणा आहे. कारण प्राण्यांना दुःख दिल्याशिवाय मांस प्राप्त होत नाही; आणि कसलाही अपराध नसताना एखाद्याला दुःख देणे हे धर्माचे काम नाही. मद्यपान हे तर सर्वथा निषिद्ध आहे. कारण वाममार्गी लोकांच्या ग्रंथांखेरीज इतर कोणत्याही ग्रंथात मद्यपान नाही. परंतु त्याचा सर्वत्र निषेध केलेला आहे. तसेच विवाहापूर्व समागम करण्यात दोष आहे पण याला निर्दोष समजणारा दोषी आहे. ॥२॥

अशा प्रकारची वचने ऋषींच्या ग्रंथांमध्ये घुसडून कितीतरी ऋषी-मुनींच्या नावाने ग्रंथ रचून गोमेध, अश्वमेध नावांचे यज्ञही करविले जाऊ लागले. या पशूंना मारून त्यांची आहुती होमामध्ये दिल्यास यजमान व पशू यांना स्वर्ग मिळतो असे या लोकांनी जाहीर केले. वस्तुतः ब्राह्मणग्रंथांमध्ये अश्वमेध, गोमेध, नरमेध इत्यादी जे शब्द येतात त्यांचा खरा अर्थच त्यांना समजलेला नाही. त्यांना तो समजला असता तर त्यांनी असा अर्थाचा अनर्थ कशाला केला असता ?

(प्रश्न) अश्वमेध, गोमेध, नरमेध वगैरे शब्दांचा अर्थ काय आहे ?

(उत्तर) त्यांचा अर्थ असा आहे की,

**राष्ट्रं वा अश्वमेधः।** शत. प्रपा. १३। ब्रा. १। कं. ६। व. ३

**अन्न ऽहि गौः।** शत. प्रपा. ४। ब्रा. ३। कं. १। व. २५

**अग्निर्वा अश्वः।** शत. प्रपा. ३। ब्रा. ६। कं. २। व. ५

**आज्यं मेधः।** शत. प्रपा. १३। ब्रा. ३। कं. ६। व. २

घोडा, गाय वगैरे पशूंना अथवा माणसाला मारून त्यांचा होम करावा असे कोठेही लिहिलेले नाही. केवळ वाममार्गी लोकांच्या ग्रंथामध्ये असा अनर्थ लिहिला आहे. परंतु ही गोष्टही वाममार्गीयांनी सुरू केली. आपली

ही मते वैदिक ग्रंथांमध्ये घुसडून दिली आहेत. असे पाहा! शतपथ ब्राह्मण या ग्रंथांत असे सांगितले आहे की, "राजाने न्यायाने व धर्माने प्रजेचे पालन करणे, विद्याचे दान करणारा यजमान आणि अग्निमध्ये तूपाने होम करणे हा अश्वमेध यज्ञ आहे. अन्न, इंद्रिये, किरण, पृथ्वी इत्यादी पवित्र ठेवणे हा गोमेध यज्ञ होय. मनुष्य मेल्यानंतर त्याच्या शरीराचे विधिपूर्वक दहन करणे याला नरमेध यज्ञ म्हटला जातो."

**(प्रश्न)** यज्ञ करणारे असे म्हणतात की, यज्ञ केल्याने यजमान व पशू स्वर्गाला जातात. होम केल्यानंतर मृत पशूला पुन: जिवंत करीत असत, हे सारे खरे आहे काय?

**(उत्तर)** नाही. यज्ञ करणारा यजमान व यज्ञात बळी दिला जाणारा पशू हे स्वर्गाला जातात असे म्हणणाऱ्यास मारून, होमामध्ये त्याची आहुती देऊन त्याला स्वर्गात पाठविले पाहिजे किंवा त्याचे प्रिय माता-पिता, पत्नी, पुत्र इत्यादिकांना मारून होमामध्ये त्यांची आहुती देऊन त्यांना स्वर्गाला का पाठवीत नाहीत? किंवा होमकुंडातून पुन: जिवंत का करीत नाहीत?

**(प्रश्न)** जेव्हा लोक यज्ञ करतात तेव्हा वेदांतील मंत्र म्हणतात. ते मंत्र वेदांमध्ये नसते तर यज्ञामध्ये त्यांनी ते कसे म्हटले असते?

**(उत्तर)** मंत्र म्हणण्यापासून कोणी कोणाला अडवू शकत नाही. कारण मंत्र हा एक शब्द आहे. परंतु त्याचा अर्थ असा नव्हे की पशूला मारून हवन करावे. **'अग्नये स्वाहा'** इत्यादी मंत्राचा अर्थ असा की, अग्नीमध्ये तूप वगैरे पौष्टिक पदार्थांचे हवन केल्याने वायु, वृष्टि, जल यांची शुद्धी होऊन जगाला उपकारक होतात. परंतु हा सत्य अर्थ त्या मूढांना कसा कळणार? कारण जे स्वार्थ बुद्धि लोक त्यांच्या स्वार्थाखेरीज दुसरे काही जाणत नाही व मान्य करीत नाहीत.

जेव्हा लोकांनी या पोपांचा हा अनाचार पाहिला आणि मृत व्यक्तीचे श्राद्ध, तर्पण वगैरे गोष्टी पाहिल्या तेव्हा वेदादी शास्त्रांचे निंदक असे महाभयंकर जैन व बौद्ध पंथ उदयाला आले. असे ऐकले की, आपल्या देशात गोरखपूरचा एक राजा होता. त्याच्याकडून या पोपांनी एक यज्ञ करविला. त्याच्या प्रिय राणीचा घोड्याशी समागम करविल्याने ती मेली. यामुळे राजाला वैराग्य प्राप्त झाले; आणि तो आपल्या मुलाला राज्यावर बसवून स्वत: साधू बनला आणि या पोपांचे बिंग फोडू लागला. याचा परिणाम होऊन जैन किंवा बौद्ध पंथाच्या शाखा चार्वाक व आभाणक या नावांनी प्रचलित झाल्या. त्यांनी अशा प्रकारचे श्लोक बनविले आहेत:-

**पशुश्चेन्निहत: स्वर्गं ज्योतिष्टोमे गमिष्यति।**
**स्वपिता यजमानेन तत्र कथं न हिंस्यते ॥१॥** सर्वदर्शनसंग्रह, चार्वाकमत-प्रकरण

पशूला मारून अग्नीमध्ये त्याचे हवन केल्याने तो पशू स्वर्गाला जात असेल तर यजमान आपल्या बापाला वगैरे मारून त्यांना स्वर्गात का पाठवीत नाहीत? ॥१॥

**मृतानामपि जन्तूनां श्राद्धं चेत्तृप्तिकारणम्।**
**गच्छतामिह जन्तूनां व्यर्थं पाथेयकल्पनम् ॥२॥** सर्वदर्शनसंग्रह, चार्वाकमत-प्रकरण

श्राद्ध व तर्पण केल्याने मेलेल्या माणसांची तृप्ती होत असेल तर परदेशी जाणाऱ्या माणसांनी वाटखर्च व खाण्यापिण्यासाठी बरोबर पैसे त्यांना देणे निरर्थकच आहे. ॥२॥

कारण जर मेलेल्या माणसाला श्राद्ध व तर्पण केल्याने अन्न-पाणी मिळते तर परदेशी जाणाऱ्या अथवा

रस्त्याने जाणाऱ्या माणसाला त्याच्या घरच्या लोकांनी त्याच्या नावाने जेवणाचे पान वाढून ठेवले व लोटा भरून पाणी ठेवले तर, ते त्याला का मिळत नाही ? परदेशी राहणाऱ्या किंवा दहा हातावर दूर बसलेल्या माणसाला त्याच्या नावाने दिलेले पोहचत नाही तर मेलेल्या व्यक्तीपर्यंत ते कोणत्याही प्रकारे पोहचू शकत नाही. अशा प्रकारचा चार्वाकाचा युक्तीयुक्त उपदेश ऐकून लोक मानू लागले आणि त्यांचे मत वाढू लागले.

जेव्हा पुष्कळसे राजे व जमीनदार या पंथांचे अनुयायी बनले, तेव्हा यथाकथित पोप सुद्धा घबाड प्राप्तिसाठीही तिकडे वळले. ते झटकन जैन बनले. जैनांमध्येही वेगळ्या प्रकारच्या पोपलीला खूप आहेत. त्या बाराव्या समुल्लासात विस्ताराने लिहिणार आहोत. अनेकांनी त्या पंथाचा स्वीकार केला. परंतु डोंगराळ प्रदेशांतील, काशी, कनोज पश्चिम व दक्षिण भारतातील लोकांनी जैन पंथाचा स्वीकार केला नाही. त्या जैनांना वेदांचा अर्थ कळला नसून ते बाहेरच्या पोप लीलांच्या भ्रांत गोष्टी वेदसमंत समजून वेदांची निंदा करू लागले. त्यामुळे वेदांचे अध्ययन-अध्यापन, यज्ञोपवीतादी संस्कार व ब्रह्मचर्यादी नियम यांचा ऱ्हास होऊ लागला. त्यांनी वेदादिकांचे जेथे जेवढे ग्रंथ मिळाले ते नष्ट केले. त्यांनी आर्यांवर राजसत्ता चालवून त्यांना दुःख दिले. जेव्हा त्यांना भय उरले नाही तेव्हा त्यांनी आपल्या पंथातील गृहस्थ व साधू यांची प्रतिष्ठा व वेदमार्गी लोकांचा अपमान करण्यास सुरुवात केली व छळही करीत राहिले आणि जैन लोक स्वतः मात्र सुखात चैनीत अभिमानाने फुलून राहू लागले. ऋषभदेवापासून महावीरापर्यंत आपल्या तीर्थंकरांच्या मोठमोठ्या पाषाणाच्या मूर्ती बनवून ते त्यांची पूजा करू लागले. अर्थात पाषाणादी मूर्तिपूजेची मूळ प्रथा जैनांपासून सुरू झाली. परमेश्वराला मानणे गौण झाले आणि मूर्तीपूजेमध्ये लागले. असे हे जैनांचे राज्य आर्यावर्त्तात तीनशे वर्षे चालले. या काळात वेदार्थज्ञानापासून लोक शून्य झाले. ह्या गोष्टीस अनुमानाने अडीच हजार वर्षे झाले असावेत.

## श्री शंकराचार्यांचे कार्य

सुमारे २,२०० वर्षापूर्वी द्रविड देशातील एका ब्राह्मण कुलोत्पन्न एक शंकराचार्य ब्रह्मचर्यव्रताचे पालन करून व्याकरणादी सर्व शास्त्राचे अध्ययन करून विचार करू लागले की, 'अरेरे ! सत्य, आस्तिक वेदमत सुटणे आणि जैन नास्तिक मत प्रचलत होणे ही अत्यंत हानिकारक गोष्ट आहे. कसेही करून हे हटविले पाहिजे.' शंकराचार्यांनी शास्त्राचे अध्ययन तर केलेले होतेच; परंतु जैनपंथाच्या ग्रंथांचाही अभ्यास केला होता आणि त्यांचा युक्तिवादही प्रबळ होता. त्यांनी विचार केला की जैनपंथाला कशारीतीने हटवावे ? उपदेश व शास्त्रार्थ यांमुळे हे हटविले जाईल असा विचार करून ते उज्जयिनी नगरीत आले. त्यावेळी तेथे सुधन्वा नावाचा राजा होता. ज्याने जैनांचे ग्रंथ आणि थोडेफार संस्कृत ग्रंथही वाचले होते तेथे जाऊन शंकराचार्य वेदांचा उपदेश करू लागले. राजाला भेटून ते त्याला म्हणाले, 'आपण संस्कृतचे आणि जैनांचेही ग्रंथ वाचले आहेत; आणि स्वतः जैनपंथाचा स्वीकार करता आहात म्हणून मी आपल्याला सांगतो आहे की, आपण माझा जैन पंडितांशी शास्त्रार्थ घडवून आणा. त्यामध्ये अशी अट राहील की, जो शास्त्रार्थात पराभूत होईल त्याने जिंकणाऱ्याच्या मताचा स्वीकार करावा. एवढेच नव्हेतर तुम्ही सुद्धा स्वतःही विजयी मताचा स्वीकार करावा.'

सुधन्वा राजा जैन मतात होते तथापि त्यांनी संस्कृत ग्रंथ वाचलेले असल्याने त्याच्या बुद्धीमध्ये थोडा फार ज्ञानाचा प्रकाश होता. त्यामुळे त्याच्या मनात पराकोटीचे पशुत्व भरलेले नव्हते. कारण जो विद्वान असतो तो

सत्यासत्याची पारख करून सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करतो. सुधन्वा राजाला जोपर्यंत कोणी मोठा विद्वान उपदेशक भेटला नव्हता तोपर्यंत ते संदेहात होते की वैदिक धर्म व जैन मतांपैकी कोणते खरे व कोणते खोटे आहे ? शंकराचार्यांचे हे बोलणे ऐकून त्याला खूप आनंद झाला; आणि तो म्हणाला, 'शास्त्रार्थ घडवून आणून आम्ही सत्यासत्याचा निर्णय अवश्य करून घेऊ.' त्याप्रमाणे जैन पंडितांना दूरवरून बोलावून आणण्यात आले आणि शास्त्रार्थाची सभा केली.

त्या वादविवादामध्ये शंकराचार्य वैदिकमत व जैन विद्वान वेदांविरुद्ध मतांचे होते. अर्थात शंकराचार्यांचा पक्ष वैदिक-मताचे मंडन व जैनमताचे खंडन करणारा व जैन पंडित आपल्या मताचे मंडन व वेदांचे खंडन करणार होते. हा शास्त्रार्थ कित्येक दिवस चालला. जैनांचे असे मत होते की, सृष्टीचा कर्ता अनादी ईश्वर वगैरे कोणीही नाही. हे जग व जीव अनादी आहेत. या दोघांची उत्पत्ति आणि नाश कधीच होत नाही. याउलट शंकराचार्यांचे असे मत होते की, अनादी सिद्ध परमात्मा हाच जगाचा कर्ता आहे. हे जग व जीव मिथ्या आहेत. कारण त्या परमेश्वराने आपल्या मायेने हे विश्व बनविले आहे. तोच त्याचे धारण करतो व प्रलय करतो आणि हे जीव व जग हे स्वप्नवत आहे. परमेश्वर स्वतः च सर्वरूप बनून लीला करीत आहे.

हा शास्त्रार्थ बरेच दिवस चालत राहिला. परंतु अखेर युक्तिवाद व पुरावे यामुळे जैनमत टिकाव धरू शकले नाही व शंकराचार्यांचे मत अखंडीत राहिले. तेव्हा त्या जैन पंडितांनी व सुधन्वा राजाने वैदिक-मताचा स्वीकार केला व जैन मत सोडले यामुळे खूप खळबळ माजली. तेव्हा सुधन्वा राजाने आपल्या अनेक इष्टमित्र राजांना कळवून जागोजागी शंकराचार्यांशी शास्त्रार्थ घडवून आणला. परंतु जैनमताचा पराजय सतत होत गेला.

यानंतर सुधन्वादी राजांनी शंकराचार्यांना साऱ्या आर्यावर्त्तात भ्रमण करता यावे अशी व्यवस्था केली आणि त्यांच्या रक्षणासाठी नोकरचाकरही दिले. त्या वेळेपासून आर्यावर्त्तात सर्वांचे यज्ञोपवीत संस्कार होऊ लागले आणि वेदांचे अध्ययन-अध्यापन सुरू झाले. शंकराचार्यांनी दहा वर्षांपर्यंत आर्यावर्त्तात सर्वत्र फिरून जैनमताचे खंडन व वेदांचे मंडन केले. ज्या भग्न जैन मूर्ती आज प्राप्त होतात त्या शंकराचार्यांच्या काळी जैनपंथाचा त्याग करणाऱ्या लोकांनी ध्वंसित केल्या होत्या. शंकराचार्यांच्या वेळी ज्या भग्न केल्या होत्या व ज्या अखंडीत मूर्ति होत्या त्यांना जैनांनी भूमित गाडून टाकल्या होत्या कारण त्यांचा नाश केला जाऊ नये. त्या आजही भूमितून निघत आहेत ज्याच्यामध्ये काही अखंडित मूर्तीही सापडतात.

शंकराचार्यांपूर्वी शैवमताचाही थोडासा प्रचार होता. त्याचे सुद्धा खंडन शंकराचार्यांनी केले. वाममार्गीचेही खंडन केले. त्या काळी या देशात विपुल धन होते व देशभक्तीही होती. जैनांची मंदिरे शंकराचार्य व सुधन्वा राजा यांनी उध्वस्त केली नव्हती. कारण त्या ठिकाणी वेदादिशास्त्रांच्या पाठशाळा स्थापन करण्याची त्यांची इच्छा होती. अशा प्रकारे वैदिकमताची पुनः स्थापना झाली आणि वेदविद्येचा प्रचार करण्याचा विचार चालू झाला. इतक्यात दोन कपटी जैन मुनि शंकराचार्यांजवळ आले. ते आतून कट्टर जैन होते. परंतु ते कपटी मुनि होते. शंकराचार्य त्यांच्यावर अत्यंत प्रसन्न होते. त्या दोघांनी संधी साधून कपटाने शंकराचार्यांना अशी एक विषारी वस्तू खाऊ घातली की, तिच्यामुळे आचार्यांची भूक मंदावली आणि त्यांच्या अंगावर फोड उठले. सहा महिन्यांच्या आत आचार्यांचे देहावसान झाले आणि सारे आर्य निरुत्साहित झाले. त्यामुळे वेदविद्येचा जो प्रचार होणार होता तो होऊ शकला नाही.

शंकराचार्यांनी शारीरभाष्य आदी जैनमताचे खंडन करणारे जे ग्रंथ लिहून ठेवले होते, त्यांचा प्रचार आचार्यांचे शिष्य करू लागले. जैन मताच्या खंडनासाठी आचार्यांनी ब्रह्म सत्य, जग मिथ्या आणि जीव ब्रह्म यांची एकता कथन केली होती त्यालाच वेदमत समजून त्याचा उपदेश करू लागले. आचार्यांनी दक्षिणेस शृंगेरी, पूर्वेस भूगोवर्धन, उत्तरेस जोशीमठ व पश्चिमेस द्वारकेला शारदा मठ, स्थापना करून त्यांचे शिष्य या मठांचे महंत बनून श्रीमंत झाले व चैन करू लागले. कारण शंकराचार्यांनंतर त्यांच्या शिष्यांना खूप मान मान्यता होत होती.

येथे हे विचारले पाहिजे की, जीव व ब्रह्म यांचे ऐक्य आणि जग मिथ्या हे जे शंकराचार्यांचे वैयक्तिक मत होते तर ते बरोबर नव्हते. परंतु जैनमताच्या खंडनासाठी त्यांनी हे मत मांडले असेल तर काही अंशी का होईना ते चांगले झाले.

नवीन वेदान्ती लोकांचे मत असे आहे :-

## अद्वैतवाद समीक्षा

**(प्रश्न)** जग स्वप्नवत आहे. जसा दोरीमध्ये सापाचा, शिंपल्यामध्ये चांदीचा, मृगजळामध्ये पाण्याचा भास होतो तसे किंवा गंधर्वनगर आणि इंद्रजाल याप्रमाणे हे विश्व मिथ्या असून एक ब्रह्म हेच सत्य आहे.

**(सिद्धान्ती)** तुम्ही मिथ्या कशाला म्हणता ?

**(नवीन वेदान्ती)** जी वस्तू नसते, नाही मात्र प्रतीत होते तिला आम्ही मिथ्या असे म्हणतो.

**(सिद्धान्ती)** जी वस्तू अस्तित्वातच नाही, तिची प्रतीती कशी होऊ शकते ?

**(नवीन.)** अध्यारोपाने.

**(सिद्धान्ती)** अध्यारोप म्हणजे काय ?

**(नवीन.)** **'वस्तुन्यवस्त्वारोपणमध्यासः'** ॥ वेदान्तसार खण्ड ६

**'अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपञ्चं प्रपञ्च्यते ॥'** अनुभूतिप्रकाश १। १८॥ एका पदार्थावर पदार्थ काही दुसरा असतो पण त्यावर अन्य वस्तूंचा आरोप करणे म्हणजे याला अध्यास किंवा अध्यारोप असे म्हणतात. या अध्यारोपाचे निराकरण करणे, याला अपवाद असे म्हणतात. अध्यारोप व अपवाद यांच्या योगाने प्रपंचरहित ब्रह्मामध्ये प्रपंचरूप जगाचा विस्तार होतो.

**(सिद्धान्ती)** तुम्ही दोरीला वस्तू आणि सापाला अवस्तू समजून या भ्रमामध्ये पडले आहात. साप ही वस्तू नाही काय ? तुम्ही असे म्हणाल की, साप या वस्तूचा संस्कार मात्र हृदयात आहे परंतु ती इतरत्र कोठेतरी आहे. मग तो सर्पसुद्धा अवस्तू राहिला नाही. याचप्रमाणे वाळलेल्या झाडाच्या खोडामध्ये माणसाचा व शिंपल्यामध्ये चांदीचा वगैरे भास समजून घ्यावा परंतु स्वप्नामध्येही अशाच गोष्टी दिसतात ज्या कोठेतरी अस्तित्वात असतात. त्यांचे संस्कार त्याच्या आत्म्यामध्येही आहेत. म्हणून ते स्वप्नही वस्तूमध्ये अवस्तूचे आरोपण करण्यासारखे नाही.

**(नवीन.)** कधीही न पाहिलेल्या व न ऐकलेल्या जसे, आपले डोके छाटले आहे, आपण रडत आहोत, पाण्याचा प्रवाह वर चालला आहे, यांसारख्या कधीही न घडलेल्या गोष्टी पाहिल्या जातात. त्या कशा सत्य होऊ शकतात ?

**(सिद्धान्ती)** हाही दृष्टांत तुमचे म्हणणे सिद्ध करीत नाही. कारण जे पाहिलेले किंवा ऐकलेले नसते त्याचा

संस्कार होत नाही. संस्काराखेरीज स्मृती व स्मृती खेरीज साक्षात अनुभव होत नाही. एखाद्याचे डोके युद्धात कापलेले कोणीतरी पाहिले किंवा ऐकले आणि त्याचा भाऊ, बाप वगैरेना रडताना प्रत्यक्ष पाहिले, कारंजाचे पाणी वर उडताना पाहिले किंवा ऐकले तर त्याचे संस्कार त्याच्या अंत:करणामध्ये जमा होतात. जेव्हा तो माणूस जागृतीच्या अवस्थेपासून वेगळा होऊन पाहतो तेव्हा त्याने ज्या गोष्टी जागृतावस्थेत पाहिलेल्या अथवा ऐकलेल्या असतात त्यांचे दर्शन त्याला आत्म्यात घडते. आपले डोके कापले आहे, आपण रडत आहोत आणि पाण्याचा प्रवाह ऊर्ध्व दिशेला वाहत आहे असे वाटते हे काही वस्तूवर अवस्तूचे आरोपण सदृश नाही. तर ज्याप्रमाणे चित्र काढणारी व्यक्ती, पूर्वी पाहिलेल्या, ऐकलेल्या किंवा केलेल्या गोष्टी आत्म्यामधून काढून कागदावर उतरविते किंवा प्रतिबिंब काढणारा माणूस बिंबाला पाहून त्याचे स्वरूप आत्म्यात साठवतो स्वप्नात जसे की आपल्या शिक्षकाला पाहतो किंवा बहुत वेळी पाहून व ऐकून अतीत जाणून साक्षात्कार करतो. कधी-कधी पडणारे स्वप्न स्मरणजन्य असते. अशा वेळी पूर्वी आपण जे पाहिले, ऐकले अथवा केले होते तेच त्यालाच ऐकतो, पाहतो व करतो. जागृतावस्थेत जसे स्मरण होते तसे ते स्वप्नामध्ये होत नसते. म्हणून तुमची अध्यास व आरोप यांची लक्षणे खोटी आहेत. तसेच वेदान्ती जो विवर्तवाद प्रतिपादितात म्हणजे दोरीमध्ये सर्पाचा भास किंवा ब्रह्ममध्ये जगाचा भास होण्याचा जो दृष्टांत देतात, तोही ठीक नाही.

**(नवीन.)** अधिष्ठानाखेरीज अध्यस्त (आरोपित) वस्तूची प्रतीती होत नाही. दोरी नसेल तर सापाचा भासही होत नाही. शिवाय दोरीमध्ये तीन्ही काळी सर्प असत नाही. फक्त अंधुक प्रकाशात अचानक दोरी दृष्टीस पडली तर सापाचा भास होऊन माणूस घाबरतो. परंतु दिव्याने तो पाहतो तेव्हा त्याचा भ्रम दूर होतो आणि भीती नाहीशी होते. तसे ब्रह्मात जी जगाची मिथ्या प्रतीती झाली आहे ती ब्रह्माच्या साक्षात्काराने त्या जगाची निवृत्ति आणि ब्रह्माची प्रतीती होते. जशी सर्पाची निवृत्ति आणि दोरीची प्रतीती होत असते.

**(सिद्धान्ती)** ब्रह्ममध्ये जगाचा भास कोणाला झाला ?

**(नवीन.)** जीवाला.

**(सिद्धान्ती)** जीव कोठून आला ?

**(नवीन.)** अज्ञानातून.

**(सिद्धान्ती)** अज्ञान कोठून आले व ते कोठे राहते ?

**(नवीन.)** अज्ञान हे अनादी असून ते ब्रह्ममध्ये राहते.

**(सिद्धान्ती)** ब्रह्ममध्ये ब्रह्मसंबंधी अज्ञान झाले की, दुसऱ्याच्या बाबतीत झाले ? आणि ते अज्ञान कोणाला झाले ?

**(नवीन.)** चिदाभासाला.

**(सिद्धान्ती)** चिदाभासाचे स्वरूप काय आहे ?

**(नवीन.)** ब्रह्म हेच चिदाभासाचे स्वरूप आहे. जेव्हा ब्रह्माला ब्रह्मसंबंधी अज्ञान होते तेव्हा त्याला आपल्या स्वरूपाचा विसर पडतो.

**(सिद्धान्ती)** स्वरूपाचे विस्मरण होण्याचे कारण कोणते ?

**(नवीन.)** अविद्या.

**(सिद्धान्ती)** अविद्या हा सर्वव्यापी सर्वज्ञाचा गुण आहे की अल्पज्ञाचा ?

**(नवीन.)** अल्पज्ञाचा.

**(सिद्धान्ती)** तुमच्या मते एका अनंत चेतनाखेरीज दुसरे एखादे चेतन आहे किंवा नाही ? आणि हा अल्पज्ञ कोठून आला ? अर्थात हे अल्पज्ञ चेतन ब्रह्माहून वेगळे आहे असे तुम्ही मानीत असाल तर ते ठीक आहे. एका ठिकाणी ब्रह्माला स्वत:च्या स्वरूपाचे अज्ञान असेल तर ते अज्ञान सर्वत्र पसरणार. ज्याप्रमाणे शरीराच्या एका भागावर फोड झाल्यास त्याची वेदना संपूर्ण शरीरात पसरून सर्व अवयवांना निरुपयोगी बनविते, त्याचप्रमाणे ब्रह्माचा एक भाग अज्ञानी व क्लेशयुक्त बनला तर संपूर्ण ब्रह्मही अज्ञानी व पीडा अनभवयुक्त होत जाईल.

**(नवीन.)** हा सारा उपाधीचा धर्म आहे. तो ब्रह्माचा धर्म नाही.

**(सिद्धान्ती)** उपाधी जड आहे की चेतन ? सत्य आहे की असत्य ?

**(नवीन.)** ती अनिर्वचनीय आहे. म्हणजे तिला जड अथवा चेतन, सत्य अथवा असत्य म्हणू शकत नाही.

**(सिद्धान्ती)** तुमचे हे बोलणे **'वदतो व्याघातः'** म्हणजे स्पष्टत: विसंगत आहे. कारण आधी 'ही अविद्या आहे' असे तुम्ही म्हणता आणि त्याच वेळी ती जड चेतन, सत किंवा असत नाही म्हणता. ज्या सोन्यामध्ये पितळ मिसळलेले आहे ते सोनाराकडे नेऊन ते सोने आहे की पितळ याची पारख करवावी आणि याला आम्ही सोनेही म्हणू शकत नाही किंवा पितळही म्हणू शकत नाही. कारण यात दोन्ही धातू मिसळलेले आहेत, असे म्हणण्यासारखेच तुमचे बोलणे आहे.

**(नवीन.)** असे पाहा ! घटाकाश, मठाकाश, मेघाकाश या उपाधींमुळे एकच महदाकाश (माठ, घर व मेघ यामुळे त्यांच्यांतील आकाश) वेगवेगळे प्रतीत होते. वस्तुतः त्या सर्वांमध्ये महदाकाशच असते. याचप्रमाणे माया, अविद्या, समष्टी, व्यष्टी व अंत:करण या उपाधींमुळे अज्ञानी लोकांना ब्रह्म वेगवेगळे भासते. वस्तुतः ते एकच आहे. यासंबंधी एक प्राचीन पुरावा असा आहे :-

**अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।**
**एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥** कठो. वल्ली ५। मं. ९

ज्याप्रमाणे अग्नी हा लांब, रुंद, गोल, लहान, मोठ्या अशा अनेक आकारांच्या वस्तूंमध्ये व्याप्त होऊन तदाकार झालेला दिसतो. परंतु तो त्या वस्तूंहून वेगळा असतो, त्याप्रमाणे सर्व व्यापक परमात्मा अंत:करणामध्ये व्याप्त होऊन अंत:करणाचा आकार धारण केल्यासारखा वाटतो, परंतु तो त्या अंत:करणांपासून वेगळा असतो.

**(सिद्धान्ती)** तुमचे हेही म्हणणे निरर्थक आहे. कारण ज्याप्रमाणे तुम्ही घट, मठ, मेघ व आकाश यांना भिन्न मानता त्याप्रमाणे कारणकार्यरूप जग व जीव यांना ब्रह्माहून व ब्रह्माला जीव व जग यांच्याहून भिन्न का मानीत नाही ?

**(नवीन.)** ज्याप्रमाणे अग्नी सर्व पदार्थांमध्ये प्रविष्ट होतो तेव्हा तो पाहणाऱ्यांना तदाकार झाल्यासारखा दिसतो. त्याचप्रमाणे परमात्मा हा जड व जीव यांमध्ये व्याप्त असल्याने अज्ञानी लोकांना तो आकारयुक्त भासतो. वस्तुतः ब्रह्म हे जड (अचेतन) ही नाही अथवा जीवही नाही. पाण्याने भरलेल्या हजारो भांड्यांमध्ये

सूर्याची हजारो प्रतिबिंब दिसतात. परंतु वस्तुतः सूर्य एकच असतो. ती भांडी नाहीशी झाल्याने किंवा त्यांतील पाणी पसरल्याने अथवा वाहून गेल्याने सूर्य नष्ट होत नाही, पसरत नाही अथवा वाहून जात नाही. याचप्रमाणे अंतःकरणांमध्ये ब्रह्माचे जे प्रतिबिंब पडते म्हणजे त्याचा जो आभास होतो त्याला चिदाभास असे म्हणतात. जोपर्यंत अंतःकरण असते तोपर्यंतच जीव असतो. जेव्हा अंतःकरणाचे ज्ञानाने नाहीसे होते तेव्हा जीव ब्रह्मस्वरूप बनतो. या चिदाभासाला आपल्या ब्रह्मस्वरूपाविषयी अज्ञान होते आणि आपण कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी, पापी, पुण्यात्मा, जन्म-मरणयुक्त आहोत असे आपल्यात आरोपित करीत आहे. त्याचे हे अज्ञान जोपर्यंत कायम असते तोपर्यंत तो या जगाच्या बंधनांतून मुक्त होत नाही.

**(सिद्धान्ती)** तुमचा हा दृष्टांत व्यर्थ नाही. कारण सूर्याला आकार आहे आणि पाण्याच्या भांड्यांनाही आकार आहे. सूर्य आणि पाण्याची भांडी एकमेकांहून भिन्न, वेगवेगळी आहेत. म्हणूनच सूर्याचे प्रतिबिंब त्या भांड्यांत पडते. सूर्य आणि जलपात्रे निराकार असती आणि ती एकमेकांहून वेगळी नसती तर सूर्याचे प्रतिबिंब कधीही पडले नसते. परमेश्वर निराकार असल्यामुळे त्याचे प्रतिबिंब कधीही पडू शकत नाही; आणि तो आकाशाप्रमाणे सर्वव्यापक असल्यामुळे त्याचे प्रतिबिंब ज्यात पडू शकेल अशी दुसरी वस्तूच अस्तित्वात नाही. ब्रह्मापासून कोणताही पदार्थ अथवा पदार्थांहून ब्रह्म वेगळे होऊ शकत नाही. त्यांच्यातील व्याप्यव्यापक संबंधामुळे ते एकही होऊ शकत नाहीत. अन्वयव्यतिरेकभावाच्या दृष्टीने पाहिले असता व्याप्य व व्यापक हे एकमेकांशी संयुक्त असले तरी सदैव वेगळे असतात. ते जर एक असतील तर त्यांच्यात व्याप्यव्यापकभाव संबंध असू शकत नाही. म्हणून बृहदारण्यकातील अंतर्यामी ब्राह्मण ग्रंथांमध्ये असे स्पष्ट सांगितले आहे की, ब्रह्माचा आभास (प्रतिबिंब) पडू शकत नाही. कारण आकार नसेल तर त्याचे प्रतिबिंब कसे पडणार ? अंतःकरण उपाधीमुळे तुम्ही ब्रह्मच जीव होतो असे जे तुम्ही मानता तोही तुमचा पोरकटपणा आहे. कारण अंतःकरण चलायमान (चंचल) व खंड-खंड झालेले असते तर ब्रह्म हे अचल व अखंड आहे. जर तुम्ही ब्रह्म व जीव हे वेगवेगळे नसून एकच आहेत असे मानीत असाल तर या प्रश्नाचे उत्तर द्या की, जेथे-जेथे अंतःकरण जाईल तेथे-तेथे असणाऱ्या ब्रह्माला ते अज्ञानी व जेथून ते निघून जाते तेथील ब्रह्माला ते ज्ञानी करील की नाही ? ज्याप्रमाणे प्रकाशामध्ये छत्री जेथे-जेथे जाते तेथील प्रकाशाला ती झाकून टाकते आणि जेथून ती निघून जाते तेथील प्रकाशाला आवरणरहित बनविते. त्याचप्रमाणे अंतःकरण हे ब्रह्माला क्षणोक्षणी ज्ञानी, अज्ञानी, बद्ध व मुक्त करीत जाईल. अखंड ब्रह्माच्या एका स्थानातील आवरणाचा प्रभाव सर्वत्र झाल्याने संपूर्ण ब्रह्म अज्ञानी होईल. कारण ते चेतन आहे. मथुरेमध्ये ज्या अंतःकरणस्थ ब्रह्माने जी वस्तू पाहिली त्याच अंतःकरणस्थ ब्रह्माला त्या वस्तूचे स्मरण काशीला गेल्यावर होणार नाही. कारण **'अन्यदृष्टमन्यो न स्मरतीति न्यायात्'** म्हणजे एकाने पाहिलेले दुसऱ्याला आठवत नाही, असा न्याय आहे. ज्या न्यायाने ज्या चिदाभासाने मथुरेमध्ये एक गोष्ट पाहिली तोच चिदाभास काशीमध्ये नसल्यामुळे त्याला तेथे ती गोष्ट आठवणार नाही. तसेच, मथुरेतील चिदाभासाला प्रकाशमान बनविणारे ब्रह्म हे काशीत असणारे ब्रह्म नसते. जर ब्रह्म हाच जीव असेल, वेगळे नसेल तर जीव सर्वज्ञ असला पाहिजे, पण तसा तो नाही. जर ब्रह्माचे प्रतिबिंब वेगळे असेल, तर त्याच्या ठिकाणी प्रत्यभिज्ञा असणार नाही. म्हणजे पूर्वी पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टीचे ज्ञान त्याला होऊ शकणार

नाही. जर तुम्ही असे म्हणत असाल की, ब्रह्म एक असल्यामुळे त्याला स्मरण होते, तर ब्रह्माच्या एके ठिकाणी अज्ञान अथवा दु:ख झाल्याने संपूर्ण ब्रह्माला अज्ञान अथवा दु:ख झाले पाहिजे. अशा प्रकारचे दृष्टांत देऊन तुम्ही नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावयुक्त ब्रह्माला अनित्य, अशुद्ध, अज्ञानी, बद्ध वगैरे करून टाकता आणि जे ब्रह्म अखंड आहे त्याला तुम्ही खंडित करता.

**(नवीन.)** निराकाराचाही आभास जाणवतो. जसा आरशात किंवा पाण्यात आकाशाचा आभास जाणवतो. तो आभास निळा किंवा करडा गडद असतो. तसाच ब्रह्माचाही सर्व अंत:करणांत आभास जाणवतो.

**(सिद्धान्ती)** जेव्हा आकाश हे निराकार असल्यामुळे ते कोणालाही डोळ्यांनी दिसत नाही. जो पदार्थ दिसतच नाही तो आरशात किंवा पाण्यात कसा दिसणार ? जी वस्तू साकार असते तीच गडद किंवा फिकट दिसते. निराकार वस्तू दिसत नाही.

**(नवीन.)** तर मग वर जे निळसर दिसते आणि त्याचे प्रतिबिंब आरशात किंवा पाण्यात पडते तो काय पदार्थ आहे?

**(सिद्धान्ती)** पृथ्वीवरून उडून अवकाशात पसरलेले ते माती, पाणी व अग्नी यांचे त्रसरेणू (कण) असतात. जेथून पाऊस पडतो तेथे पाणी नसेल तर पाऊस कोठून पडणार ? म्हणून आभाळात तंबूसारखे जे दिसते जलचक्र किंवा घनीभूत झालेली वाफ असते. ज्याप्रमाणे धुके दुरून तंबूसारखे खूप दाट असल्याचा भास होतो परंतु जवळ गेल्यावर ते विरळ असल्याचे आढळून येते, त्याप्रमाणे आकाशात गेलेली पाण्याची वाफ दुरून तंबू सारखी दिसते.

**(नवीन.)** आम्ही पूर्वी जे रज्जू (दोरी), सर्प, स्वप्न वगैरेचे दृष्टांत दिले ते मिथ्या आहेत काय ?

**(सिद्धान्ती)** नाही. ते चूक नाहीत परंतु तुमची समजूत चुकीची आहे. ते विवेचन आम्ही यापूर्वी केलेच आहे. बरे, आता हे सांगा की प्रथम अज्ञान कोणाला होते ?

**(नवीन.)** ब्रह्माला.

**(सिद्धान्ती)** ब्रह्म अल्पज्ञ आहे की सर्वज्ञ ?

**(नवीन.)** ब्रह्म सर्वज्ञही नाही अथवा अल्पज्ञही नाही. कारण सर्वज्ञता किंवा अल्पज्ञता ही उपाधिसहित असणाऱ्यांमध्ये असते.

**(सिद्धान्ती)** उपाधिसहित कोण आहे ?

**(नवीन.)** ब्रह्म.

**(सिद्धान्ती)** तर मग ब्रह्मच सर्वज्ञ व अल्पज्ञ झाले. मग तुम्ही ब्रह्म हे सर्वज्ञ व अल्पज्ञ आहे या विधानाला का आक्षेप घेतला ? उपाधी हीच कल्पित म्हणजे मिथ्या आहे असे तुमचे म्हणणे असेल तर कल्पक म्हणजे कल्पना करणारा कोण आहे ?

**(नवीन.)** जीव आणि ब्रह्म हे एकच आहेत की वेगवेगळे ?

**(सिद्धान्ती)** ते वेगवेगळे आहेत. कारण ते एकच असते तर ब्रह्मापासून मिथ्या कल्पना उत्पन्न झाली नसती. ज्याची कल्पना मिथ्या आहे ते सत्य कसे होऊ शकेल ?

**(नवीन.)** सत्य व असत्य हे दोन्ही मिथ्या आहेत असे आम्ही मानतो. वाणीने बोलणेही मिथ्याच आहे.

**(सिद्धान्ती)** जर तुम्ही सत्य, असत्य व वाणी मिथ्या समजत असाल तर तुम्ही स्वत:च मिथ्या नाही कशावरून ?

**(नवीन.)** ते जाऊ द्या. खरे आणि खोटे या आमच्याच कल्पना असून आम्ही त्या दोहोंच साक्षी व अधिष्ठान आहोत.

**(सिद्धान्ती)** जर तुम्ही खरे व खोटे यांचे अधिष्ठान म्हणजे आधार असाल तर तुम्ही सज्जन आणि चोर यांच्या सारखे झालात. त्यामुळे तुम्ही अप्रामाणिकही ठरता. कारण जो प्रामाणिक असतो तो सदैव सत्य मानतो, सत्य बोलतो, सत्य करतो, असत्य मानीत नाही, असत्य बोलत नाही, असत्य कार्य करत नाही. तुम्ही आपलेच म्हणणे खोटे आहे असे म्हणता त्या अर्थी तुम्ही अनाप्त व मिथ्यावादी आहात.

**(नवीन.)** अनादी माया ब्रह्माच्या आश्रयाने राहते आणि ती ब्रह्मावर आवरण घालते. तिला तुम्ही मानता की नाही ?

**(सिद्धान्ती)** नाही. कारण जी वस्तू प्रत्यक्षात नाही, पण असल्यासारखी भासते ती माया, असा अर्थ तुम्ही करता. ज्याच्या अंतरीचा डोळा फुटला आहे असा अविवेकी माणूसच तुमचे हे म्हणणे मान्य करील. कारण जी वस्तू अस्तित्वात नाही तिचा भास होणे हे पूर्णपणे अशक्य आहे. वंध्या स्त्रीच्या पुत्राचे प्रतिबिंब असू शकत नाही. तसेच हे आहे. तसेच, **'सन्मूला: सोम्येमा: प्रजा:'** यांसारख्या छांदोग्य उपनिषदांतील वचनांविरुद्ध तुमचे हे मत आहे.

**(नवीन.)** तुम्ही वसिष्ठ, शंकराचार्य यांच्यापासून निश्चलदासापर्यंतच्या पंडितांहून स्वत:ला शहाणे समजता काय ? त्यांनी जे काही सांगितले आहे त्याचे तुम्ही खंडन कसे काय करता ? आम्हाला तर वसिष्ठ, शंकराचार्य व निश्चलदास यांचेच सिद्धांत बरोबर वाटतात.

**(सिद्धान्ती)** तुम्ही विद्वान आहात की अविद्वान ?

**(नवीन.)** आम्ही देखील काही विद्वान आहोत.

**(सिद्धान्ती)** ठीक आहे. तर मग तुम्ही वसिष्ठ, शंकराचार्य व निश्चलदास यांचा पक्ष आमच्यासमोर मांडा, आम्ही त्याचे खंडन करतो. ज्याचा पक्ष बरोबर ठरेल तो मोठा ठरेल. त्यांचे व तुमचे म्हणणे खोडून काढता येण्यासारखे नसेल तर तुम्ही त्यांच्या युक्तिवादाच्या साह्याने आमच्या युक्तियुक्तमताचे खंडन का करीत नाही ? तसे तुम्ही केले तर तुमचे व त्यांचे मत ग्राह्य समजले जाईल.

आमचे असे अनुमान आहे की, शंकराचार्यांसारख्या विद्वानांनी जैन मताचे खंडन करण्यासाठीच हे मत स्वीकारले होते. कारण देशकालानुरूप आपला पक्ष सिद्ध करण्यासाठी अनेक स्वार्थी विद्वान स्वत:ला मान्य नसलेल्या मतांचा स्वीकार करून प्रतिपक्षाचे खंडन करतात. जीव आणि ईश्वर हे एकच असून जग हे मिथ्या आदी व्यवहार खराच मानीत होते असे शंकराचार्यांचे खरोखरीच मत असेल तर ते चूक होते असे म्हणणे भाग आहे.

निश्चलदासांचे पांडित्य पाहा. त्यांनी वृत्तिप्रभाकर ग्रंथात अनुमान लिहिले आहे. **'जीवो ब्रह्माऽभिन्नश्चेतनत्वात्'** म्हणजे जीव हा चेतन असल्यामुळे तो ब्रह्मापासून अभिन्न आहे. अगदीच कमी बुद्धी असणारी व्यक्तीच असे विधान करील. कारण केवळ साधर्म्यामुळे दोन वस्तू एकच आहेत असे ठरत नाही.

तेथे वैधर्म्य भेदक होते. 'पृथिवी जलाऽभिन्ना जड़त्वात' पृथ्वी आणि पाणी हे दोन पदार्थ जड (अचेतन) असल्यामुळे ते अभिन्न म्हणजे एकच आहेत, असे कोणी म्हणेल तर ते बरोबर होणार नाही. तसेच निश्चलदासांचे मतही निरर्थक आहे. कारण जीवामध्ये अल्पत्व, अल्पज्ञता व भ्रांतिमत्व वगैरे जे धर्म आहेत ते ब्रह्माच्या धर्माहून वेगळे आहेत आणि सर्वगामित्व, सर्वज्ञता व निर्भ्रान्तित्व वगैरे जे गुण ब्रह्मामध्ये आहेत ते जीवाच्या गुणांविरुद्ध आहेत. त्याचे कारण त्या दोघांमधील वैधर्म्य हे आहे. म्हणून ब्रह्म व जीव हे भिन्न-भिन्न आहेत. ज्याप्रमाणे गंधत्व, कठिणत्व वगैरे भूमीचे धर्म; रसवत्व, द्रवत्व वगैरे पाण्याच्या धर्माहून वेगळे असल्यामुळे पृथ्वी व पाणी एक नाहीत, त्याप्रमाणे जीव व ब्रह्म यांच्यामध्ये वैधर्म्य असल्यामुळे जीव व ब्रह्म पूर्वी कधी एक नव्हते, आज एक नाहीत व पुढे कधी एक होणार नाहीत.

यावरून निश्चलदासादिकांच्या पांडित्याला समजून जावे. ज्याने योगवसिष्ठ रचले तो कोणीतरी आधुनिक वेदान्ती असावा. वाल्मीकी, वसिष्ठ किंवा रामचंद्र यांनी ते रचलेले नाही. कारण ते सगळे वेदानुयायी होते. ते वेदांविरुद्ध काहीही लिहू, बोलू व ऐकू शकत नव्हते.

**(प्रश्न)** व्यासांनी शारीरिक सूत्रे रचली आहेत. त्यामध्येही जीव व ब्रह्म यांचे ऐक्य प्रतिपादिले आहे. ते काय म्हणतात पाहा:-

**सम्पद्याऽऽविर्भावः स्वेन शब्दात् ॥१॥**
**ब्राह्मेण जैमिनिरूपन्यासादिभ्यः ॥२॥**
**चितितन्मात्रेण तदात्मकत्वादित्यौडुलौमि ॥३॥**
**एवमप्युपन्यासात् पूर्वभावादविरोधं बादरायणः ॥४॥**
**अत एव चानन्याधिपतिः ॥५॥** वेदान्त. अ. ४ पा. ४ सू. १,५-७,९

अर्थ :- जो जीव पूर्वी ब्रह्मस्वरूप होता तोच स्वस्वरूप होऊन प्रकट होतो. कारण 'स्व' शब्दाने आपल्या ब्रह्मस्वरूपाचे ग्रहण केले जाते. ॥१॥ 'अयमात्मा अपहतपाप्मा' इत्यादी कथनांवरून ईश्वर प्राप्ती पर्यंतच्या हेतूंनी ब्रह्मस्वरूपाने जीव स्थित होतो असे जैमिनी आचार्यांचे मत आहे. ॥२॥ औडुलोमी आचार्यांचे असे मत आहे की, तदात्मकस्वरूप निरूपणादी बृहदारण्यकातील वचनांवरून चैतन्यमात्र स्वरूपाने जीव मुक्तीमध्ये स्थित राहतो. ॥३॥ व्यास महर्षी पूर्वोक्त उपन्यास आदी ऐश्वर्यप्राप्तिरूप हेतूंनी जीवाच्या ब्रह्मस्वरूप होण्यामध्ये अविरोध मानतात. ॥४॥ योगी सर्व ऐश्वर्यासह आपल्या ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होऊन अन्य अधिपतींनी रहित होतो. म्हणजे आपणच स्वतः आपला व सर्वांचा अधिपती बनतो आणि ब्रह्मस्वरूपाने मुक्तीमध्ये स्थित राहतो. ॥५॥

**(उत्तर)** या सूत्रांचा अर्थ तुम्ही म्हणता तसा नाही. त्यांचा खरा अर्थ असा आहे :- जोपर्यंत जीव आपल्या स्वकीय शुद्ध स्वरूपाला प्राप्त होऊन, सर्व मलांनी रहित होऊन पवित्र होत नाही, तोपर्यंत त्याला योगाची सर्व ऐश्वर्ये प्राप्त होणार नाहीत आणि आपल्या अंतर्यामी असणाऱ्या ब्रह्माला प्राप्त होऊन तो आनंदात स्थित होऊ शकणार नाही. ॥१॥ याचप्रमाणे जेव्हा योगी पापरहित व ऐश्वर्ययुक्त बनतो तेव्हा तो ब्रह्मासह मुक्तीचा आनंद उपभोगू शकतो, असे जैमिनी आचार्यांचे मत आहे. ॥२॥ जेव्हा अविद्यादि दोषांपासून मुक्त होऊन शुद्ध चैतन्यमात्र स्वरूपाने जीव स्थिर राहतो तेव्हाच त्याला 'तदात्मकत्व' म्हणजे ब्रह्म स्वरूपाशी संबंध प्राप्त होतो,

असे औडुलोमी आचार्यांचे मत आहे. ॥३॥ व्यास मुनींचे म्हणणे असे आहे की जेव्हा जीव शरीरात असतानाच योगाचे ऐश्वर्य व शुद्ध विज्ञान प्राप्त करून जीवन्मुक्त होतो व ब्रह्माशी संबद्ध होतो तेव्हा त्याला त्याचे मूळचे निर्मळ स्वरूप प्राप्त होते आणि तो आनंदित होतो. ॥४॥ जेव्हा योगी सत्यसंकल्प बनतो तेव्हा त्याला खुद्द परमेश्वराची प्राप्ती होऊन मुक्तीचे सुख मिळते. तेथे तो स्वाधीन व स्वतंत्र राहतो. जगामध्ये एकजण प्रमुख व दुसरा गौण असतो. तसे मुक्ती मध्ये नसते. सारे मुक्त जीव एकसमान पातळीवरचे असतात. ॥५॥

वरील सूत्रांचा आम्ही जो अर्थ लावला आहे तो बरोबर नसेल तर पुढील सूत्रांशी विरोध उत्पन्न होईल :-

**नेतरोऽनुपपत्तेः ॥१॥** वेदान्त द. अ. १। पा. १। सू. १६

अर्थ :- ब्रह्माखेरीज इतर कोणताही जीव सृष्टिकर्ता नाही. कारण अल्पज्ञ व अल्प सामर्थ्यसंपन्न जीवामध्ये सृष्टिकर्तृत्व असू शकत नाही. म्हणून जीव व ब्रह्म एक नाहीत. ॥१॥

**भेदव्यपदेशाच्च ॥२॥** वेदान्त द. अ. १। पा. १। सू. १७

**'रसं ह्येवायं लब्ध्वानन्दी भवति।'** हे उपनिषदातील वचन आहे. जीव व ब्रह्म भिन्न आहेत. त्यांच्यातील भेदाचे प्रतिपादन येथे केले आहे. तसे नसते तर आनंस्वरूप ब्रह्माची प्राप्ती करून घेऊन जीव आनंदस्वरूप होतो आणि ब्रह्म हा प्राप्तीचा विषय आहे व जीव हा ब्रह्माची प्राप्ती करून घेणारा आहे, हे विधान निराधार ठरले असते. म्हणून जीव व ब्रह्म हे एक नाहीत. ॥२॥

**विशेषणभेदव्यपदेशाभ्यां च नेतरौ ॥३॥** वेदान्त द. अ. १। पा. २। सू. २२

**दिव्यो ह्यमूर्त्तः पुरुषः स बाह्याभ्यन्तरो ह्यजः।**

**अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात् परतः परः ॥** मुण्ड. अ. २। खं. १। श्लो. २

दिव्य, शुद्ध, मूर्तिमत्त्वरहित (अमूर्त, निराकार), सर्वत्र भरलेला, आत व बाहेर निरंतर व्याप्त, अजन्मा, जन्म-मरण व शरीर धारणा आदींनी रहित, श्वासोच्छ्वास, शरीर व मन यांच्या संबंधांनी रहित, प्रकाशस्वरूप इत्यादी विशेषणें परमेश्वराची आहेत. तो अक्षर व नाशरहित असून प्रकृतीच्या पलीकडे असणारा आहे. जीव सूक्ष्म आहे परंतु परमेश्वर त्याही पलीकडचा आहे. म्हणजे ब्रह्म हे जीवाहूनही अत्यंत सूक्ष्म आहे. भेद प्रतिपादक हेतूद्वारे प्रकृती व जीव यांहून ब्रह्म हे भिन्न आहे. ॥३॥

**अस्मिन्नस्य च तद्योगं शास्ति ॥४॥** वेदान्त द. अ. १। पा. १। सू. १९

याच सर्वव्यापक ब्रह्मामध्ये जीवाचा किंवा जीवामध्ये ब्रह्माचा संयोग करावा असे प्रतिपादन केले जाते. यावरून जीव व ब्रह्म हे भिन्न आहे असे सिद्ध होते. कारण भिन्न पदार्थांचाच संयोग होत असतो. ॥४॥

**अन्तस्तद्धर्मोपदेशात् ॥५॥** वेदान्त द. अ. १। पा. १। सू. २०

या ब्रह्माचे 'अंतर्यामी' वगैरे गुण धर्म सांगितले आहेत आणि जीवामध्ये ब्रह्म व्यापक असल्यामुळे व्याप्य जीव हा व्यापक ब्रह्माहून वेगळा असल्याचे सिद्ध होते. कारण व्याप्य-व्यापक संबंधसुद्धा भेदात संघटित होत असतो. ॥५॥

**भेदव्यपदेशाच्चान्यः ॥६॥** वेदान्त द. अ. १। पा. १। सू. २१

परमात्मा जसा जीवाहून भिन्न आहे तसाच तो इंद्रिये, अंतःकरण, पंच महाभूते, दिशा, वायू, सूर्यादी दिव्य गुणांच्या योगाने देवता वाच्य विद्वानापेक्षा भिन्न आहे. ॥६॥

**गुहां प्रविष्टावात्मानौ हि तद्दर्शनात् ॥७॥** वेदान्त द. अ. १।पा. २।सू. ११

**'गुहां प्रविष्टौ सुकृतस्य लोके'** इत्यादी उपनिषदांतील वचनांनुसार जीव व परमात्मा हे भिन्न आहेत. अशी भेददर्शक वचने उपनिषदांमध्ये अनेक ठिकाणी आली आहेत.॥७॥

**अनुपपत्तेस्तु न शारीरः ॥८॥** वेदान्त द. अ. १।पा. २।सू. ३

'शरीरे भवः शारीरः' शरीरधारी जीव हा ब्रह्म नव्हे. कारण ब्रह्माचे गुण, कर्म, स्वभाव जीवामध्ये नसतात. ॥८॥

**अन्तर्याम्यधिदैवादिषु तद्धर्मव्यपदेशात् ॥९॥** वेदान्त द. अ. १।पा. २।सू. १८

(अधिदैव) सर्व दिव्य पदार्थ म्हणजे मन वगैरे इंद्रिये, (अधिभूत) पृथ्वी वगैरे भूते, (अध्यात्म) सर्व जीवांमध्ये-परमात्मा अंतर्यामी रूपाने स्थित आहे. कारण त्याच परमात्म्याचे व्यापकत्व आदी धर्म सर्वत्र उपनिषदांमध्ये वर्णिलेले आहेत. ॥९॥

**शारीरश्चोभयेऽपि हि भेदेनैनमधीयते ॥१०॥** वेदान्त द. अ. १।पा. २।सू. २०

शरीरधारी जीव हा ब्रह्म नव्हे कारण ब्रह्म व जीव यांच्यातील भेद स्वरूपतः सिद्ध आहे. ॥१०॥

अशा प्रकारच्या शारीरिक सूत्रांवरूनही ब्रह्म व जीव हे स्वरूपतः भिन्न आहेत असे सिद्ध होते.

याचप्रमाणे वेदांती लोकांचा उपक्रम व उपसंहारही लागू होत नाही. कारण 'उपक्रम' म्हणजे सृष्टिचा प्रारंभ व 'उपसंहार' म्हणजे सृष्टिचा विलय या दोन्ही गोष्टी ब्रह्मामध्येच आहेत असे समजतात. जेव्हा ब्रह्माशिवाय दुसरी वस्तूच नाही, तेव्हा उत्पत्ति व प्रलय हे दोन्ही ब्रह्माचेच धर्म होतात. उत्पत्तिविनाशरहित ब्रह्माचे प्रतिपादन वेदादी शास्त्रांमध्ये केले आहे. नवीन वेदान्ती लोकांवर तो प्रहार होईल. कारण निर्विकार, अपरिणामी, शुद्ध, सनातन, निर्भ्रान्त आदी विशेषणांनी युक्त ब्रह्मामध्ये विकार, उत्पत्ति व अज्ञान वगैरे कोणत्याही प्रकारे शक्य नाही. तसेच उपसंहार (प्रलय) झाल्यानंतरही ब्रह्म, कारणात्मक जड आणि जीव हे विद्यमान राहतात. म्हणून उपक्रम व उपसंहार ही वेदान्ती लोकांची कल्पना खोटी आहे. अशा इतर अनेक गोष्टी आहेत की त्या शास्त्रांच्या व प्रत्यक्षादी प्रमाणांच्या विरुद्ध आहेत.

यानंतर जैन व शंकराचार्यांचे अनुयायी यांच्या उपदेशाचा थोडाफार संस्कार आर्यावर्त्तमध्ये प्रसृत होता. त्यांचे आपसात खंडन-मंडनही चालत असे. शंकराचार्यानंतर तीनशे वर्षांनी उज्जयिनी नगरीमध्ये विक्रमादित्य नावाचा प्रतापी राजा होऊन गेला. त्याने साऱ्या राजांमध्ये चालू असलेल्या लढाया थांबवून शांतता स्थापन केली. त्यानंतर भर्तृहरी नावाचा राजा काव्यादी शास्त्रांमध्ये थोडाफार विद्वान होता. त्याला वैराग्य प्राप्त झाले आणि त्याने राज्य त्याग केला. विक्रमादित्यानंतर पाचशे वर्षांनी भोज राजा झाला. त्याने आपल्या राज्यामध्ये व्याकरण, काव्य व अलंकार इत्यादींचा इतका प्रचार केला की, मेंढ्या राखणारा कालिदासही रघुवंशासारखे काव्य करणारा झाला. भोज राजाकडे जो कोणी चांगला श्लोक रचून घेऊन जाई त्याला राजा पुष्कळ धन देई व त्याची प्रतिष्ठा होत होती. त्यानंतर राजांनी व श्रीमंत लोकांनी विद्याध्ययन करणेच सोडून दिले.

## शैव-मत समीक्षा

शंकराचार्यपूर्वी वाममार्गी लोकांनंतर शैव वगैरे संप्रदाय प्रचलित झालेले होते. परंतु त्यांचा जोर फारसा नव्हता. महाराजा विक्रमादित्यांच्या वेळेपासून शैवांचा जोर वाढू लागला. वाममार्गी शाक्तांमध्ये जशा दशमहाविद्या

इत्यादी शाखा आहेत तशा शैवांमध्ये पाशुपत वगैरे अनेक शाखा होत्या. या लोकांनी शंकराचार्यांना शिवाचे अवतार मानले. त्यांचे अनुयायी संन्यासीही शैवपंथी बनले आणि त्यांनी वाममार्गी लोकांशीही संबंध ठेवले. शैव हे शिवाचे म्हणजे महादेवाचे उपासक आहेत; आणि शिवाची पत्नी देवी (पार्वती) हिचे उपासक वाममार्गी झालेत. या दोन्ही पंथांचे अनुयायी रुद्राक्ष धारण करतात व अंगाला भस्म लावतात. मात्र वाममार्गी जसे वेदविरोधी आहेत तसे शैव नाहीत.

**धिक् धिक् कपालं भस्मरुद्राक्षविहीनम् ॥१॥**
**रुद्राक्षान् कण्ठदेशे दशनपरिमितान्मस्तके विंशती द्वे,**
**षट् षट् कर्णप्रदेशे करयुगलगतान् द्वादशान् द्वादशैव।**
**बाह्वोरिन्दोः कलाभिः पृथगिति गदितमेकमेवं शिखायाम्,**
**वक्षस्यष्टाऽधिकं यः कलयति शतकं स स्वयं नीलकण्ठः ॥२॥**

रुद्राक्ष जाबाल उपनिषद अ. १। श्लो. १५,१६

अशा प्रकारचे अनेक श्लोक शैव लोकांनी बनविले; आणि 'ज्यांच्या कपाळाला भस्म आणि गळ्यात रुद्राक्ष नाही त्याचा धिक्कार असो', असे म्हणू लागले. तसेच **'तं त्यजेदन्त्यजं यथा'** अशा भस्मरुद्राक्षविहीन माणसाला चांडाळ समजून त्याचा त्याग केला पाहिजे. ॥१॥ जो गळ्यात ३२, डोक्यावर ४०, प्रत्येक कानात ६-६, प्रत्येक हातात १२-१२, प्रत्येक दंडावर १६-१६, शेंडीत १ आणि हृदयावर १०८ रुद्राक्ष धारण करतो तो साक्षात महादेवासारखा असतो. ॥२॥ असे शाक्तसुद्धा मानतात.

नंतर वाममार्गी व शैवानी संगनमताने योनिर्लिंगाची स्थापना केली ज्यास जलाधारी व उपस्थ म्हणतात. आणि त्यांची पूजा करू लागले. त्या बेशर्मांना थोडीही लाज वाटली नाही की हे दुष्कर्म आपण का करीत आहोत. एका कवीने म्हटले आहे की, **'स्वार्थी दोषं न पश्यति'** स्वार्थी माणसे आपला स्वार्थ साधण्यासाठी दुष्कर्त्यांनाही उत्तम समजतो. त्याच पाषाणादिकांच्या भग व लिंग यांच्या पूजेने धर्म, अर्थ, काम व मोक्षाची प्राप्ती मानू लागले. राजा भोजाच्या पश्चात जैन लोक आपल्या मंदिरात मूर्तीची स्थापना करून मूर्तीच्या दर्शन-स्पर्शनासाठी तेथे जाऊ लागले. तेव्हा पोपांचे चेलेही जैन मंदिरात जाऊ लागले. तिकडे याच पश्चिम भागात अन्य पंथांचे यवन आर्यावर्त्तात येऊ लागले. तेव्हा पोपांनी हा श्लोक तयार केला :-

**न वदेत् यावनीं भाषां प्राणैः कण्ठगतैरपि।**
**हस्तिना ताड्यमानोऽपि न गच्छेज्जैनमंदिरम् ॥** भ. पु. प्रतिसर्ग पर्व ३। अ. २८। श्लो. ५३

कितीही दुःख होऊ दे आणि प्राण कंठाशी आले व मृत्यु समय आला तरी यावनी (म्लेच्छ) भाषा बोलू नये; आणि उन्मत्त हत्ती अंगावर चालून आला व जैन मंदिरात गेल्याने प्राण वाचणार असले तरी जैनांच्या मंदिरात जाऊ नये. जैन मंदिरात प्रवेश करून जीव वाचविण्यापेक्षा हत्तीच्या पायांखाली चिरडून मरणे जास्त चांगले. असा असा उपदेश ते आपल्या चेल्यांना करू लागले. जेव्हा कोणी त्यांना विचारी की, ''तुमच्या या मताला एखाद्या प्रतिष्ठित ग्रंथाचे प्रमाण आहे काय ?'' तेव्हा ते म्हणत, ''होय, आहे.'' जेव्हा त्यांना म्हटले की, ''दाखवा पाहू आधार ?'' तेव्हा मार्कंडेय पुराणादी ग्रंथांतील वचने ते वाचून दाखवीत व ऐकवित जसे दुर्गापाठात देवी वर्णन आले आहे.

राजा भोजाच्या राज्यात व्यासांच्या नावाने मार्कंडेय पुराण व शिवपुराण यांची कोणीतरी रचना केली. ही गोष्ट भोजराजाला समजताच त्याने त्या पंडिताचे हात तोडून टाकण्याची शिक्षा फर्मावली आणि असे जाहीर केले की, जो कोणी काव्यादी रचना करील तर त्याने ती आपल्या स्वतःच्या नावाने करावी. ऋषी-मुनींच्या नावावर नव्हे. ही गोष्ट राजा भोजाने लिहिलेल्या 'संजीवनी' नावाच्या इतिहासात नमूद आहे. जो, ग्वाल्हेर संस्थानातील भिंड नावाच्या नगरात तिवाडी ब्राह्मणांच्या घरी पाहावयास मिळते. लखुनाचे रावसाहेब आणि त्यांचे गुमास्ते रामदयाल चौबे यांनी ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहे. या ग्रंथात असे स्पष्ट लिहिले आहे की, व्यासांनी चार हजार चारशे आणि त्यांच्या शिष्यांनी त्यात पाच हजार सहाशे श्लोकांची भर घालून एकूण दहा हजार श्लोकांचे प्रमाण 'भारत' तयार केले. महाराजा भोज लिहितो की, हे 'भारत' महाराजा विक्रमादित्याच्या काळात वीस हजार श्लोकांचे माझ्या वडिलांच्या कारकिर्दीत ते पंचवीस हजार श्लोकांचे आणि मी मध्यम वयाचा होईपर्यंत महाभारतातील श्लोकांची संख्या तीस हजार झाली आहे. महाभारताची श्लोकसंख्या अशीच वाढत राहिली तर हा ग्रंथ म्हणजे एका उंटाचे ओझे होईल. ऋषीमुनींच्या नावांनी असेच पुराणादी ग्रंथ रचले जाऊ लागले तर आर्यावर्त्तातील लोक भ्रमजाळात पडून वैदिक-धर्मविहीन होऊन भ्रष्ट होतील. यावरून असे माहित होते की, भोजराजावर वेदांचा थोडाफार संस्कार होता. त्याच्या 'भोजप्रबंध' या ग्रंथात असे म्हटले आहे की,

**घट्यैकया क्रोशदशैकमश्वः सुकृत्रिमो गच्छति चारुगत्या ।**
**वायुं ददाति व्यजनं सुपुष्कलं विना मनुष्येण चलत्यजस्त्रम् ॥**

राजा भोजाच्या राज्यात व आसपास असे असे शिल्पकार होते की, त्यांनी घोड्याच्या आकाराचे यांत्रिक यान यंत्रकला युक्त बनविले होते. ते यान एका घटकेला अकरा कोस आणि एका तासाला साडे सत्तावीस कोस जात असे. ते भूमीवरून आणि अंतरिक्षातूनही चालत असे. दुसरा असा एक पंखा असा बनविला होता की, जो माणसाशिवाय केवळ कला यंत्राचे बळाने तो सारखा फिरत राही आणि पुष्कळ वारा देई. या दोन वस्तू आजपर्यंत टिकून राहिल्या असत्या तर युरोपीय लोक इतक्या अभिमानात शेफारले नसते.

या पोपांनी आपल्या शिष्यांना जैन मंदिरात जाण्यापासून खूप परावृत्त केले. परंतु त्यांचे जाणे थांबले नाही. त्यांची कथा प्रवचने ऐकत. जैनांचे पोप या पौराणिक पोपांच्या अनुयायांना बहकाऊ लागले; तेव्हा पौराणिकांनी विचार केला की, यावर काहीतरी उपाय केला पाहिजे; नाहीतर आपले चेले जैन बनतील. त्यानंतर या पुराणिकांनी अशी सम्मती केली की, जैनांप्रमाणे आपणही अवतार, मंदिरे, मूर्ती बनवाव्यात आणि कथेचे ग्रंथ लिहावे त्याप्रमाणे त्यांनी जैनांच्या चोवीस तीर्थंकरांसारखे चोवीस अवतार, मंदिरे व मूर्ती बनविल्या आणि जैनांच्या आदिपुराण, उत्तरपुराण आहेत, यांसारखी अठरा पुराणे रचली.

## वैष्णव मत समीक्षा

राजा भोजानंतर दीडशे वर्षांनी वैष्णव मताचा प्रारंभ झाला. कंजर कुळात शठकोप नावाचा एक इसम जन्मास आला. त्याने हा पंथ थोडाफार चालविला. त्याच्यानंतर भंगी कुळातील मुनिवाहन आणि तिसरा यावनाचार्य यवन कुलोत्पन्न आचार्य बनला. चौथा आचार्य ब्राह्मणकुलोत्पन्न रामानुज झाला. त्याने आपला पंथ प्रसारीत केला. शैवांनी शिवपुराणादी, शाक्तांनी देवी भागवत आदी आणि वैष्णवांनी विष्णुपुराण आदी

ग्रंथ निर्माण केले. या पुराणांवर लेखकांनी आपली नावे घातली नाहीत; कारण आपली नावे घातली तर कोणीही ते ग्रंथ प्रमाण मानणार नाहीत; म्हणून त्या पुराणांचे लेखक व्यास वगैरे ऋषी-मुनींची नावे ठेवलीत वास्तविक यांची नावे नवीन ठेवली पाहिजे होती. जसा एखादा दरिद्री माणूस आपल्या मुलाचे नाव महाराजाधिराज असे ठेवतो किंवा आधुनिक पदार्थाचे नाव सनातन ठेवतो. त्यासारखेच हे आहे, त्यात काय आश्चर्य ? त्या पंथांचे आपसात ज्याप्रकारचे कलह होते त्याचप्रकारचे त्यांच्या या पुराणांमध्येही आले आहेत.

पहा ! देवी भागवतामध्ये 'श्री' नावाची देवी जी श्रीपूरची स्वामिनी असून तिनेच सारे जग रचले असून ब्रह्मा, विष्णू व महेश यांनाही तिनेच निर्माण केले, असे लिहिले आहे. जेव्हा त्या देवीला इच्छा झाली तेव्हा तिने आपला हात घासला. त्याबरोबर तिच्या हातावर एक फोड आला. त्यातून ब्रह्मा उत्पन्न झाला. त्याला ती देवी म्हणाली की, ''तू माझ्याशी लग्न कर.'' ब्रह्मा म्हणाला, ''तू तर माझी माता आहेस मी तुझ्याशी लग्न करू शकत नाही.'' हे ऐकताच मातेला भयंकर राग आला आणि तिने क्रोधाग्नीने ब्रह्माला म्हणजे आपल्या मुलाला जाळून भस्म केले. मग तिने पुन: हात घासला आणि त्याचप्रकारे दुसरा मुलगा उत्पन्न केला. त्याचे नाव विष्णू असे ठेवले. त्यालाही तिने तसेच लग्न करण्यास म्हटले. त्याने ते मान्य केले नाही. म्हणून तिने त्यालाही भस्म करून टाकले. मग तिने त्याच पद्धतीने तिसरा मुलगा निर्माण केला. त्याचे नाव महादेव असे ठेवले. त्याला तिने सांगितले की, ''तू माझ्याशी लग्न कर.'' महादेव म्हणाला, ''मी तुझ्याशी लग्न करू शकत नाही, तू दुसऱ्या स्त्रीचे शरीर धारण कर.'' त्याप्रमाणे देवीने तसेच केले. तेव्हा महादेवाने तिला विचारले, ''हे दोन राखेचे ढीग कसे पडले आहेत ?'' देवीने सांगितले, ''ते तुझे दोन भाऊ आहेत. त्यांनी माझी आज्ञा मानली नाही म्हणून मी त्यांना भस्म करून टाकले.'' महादेवाने तिला म्हटले की, ''मी एकटा कसा राहू ? तू त्यांना जीवंत करून आणखी दोन स्त्रिया उत्पन्न कर. म्हणजे आम्हा तिघांची लग्ने तीन स्त्रियांशी होतील.'' त्याप्रमाणे देवीने केले आणि तिघांचे विवाह तिघींशी झाले.

वाहवा ! त्यांनी आईशी लग्न केले नाही पण बहिणीशी केले. हे सारे उचित समजायचे काय ? त्यानंतर देवीने इंद्रादी यांना उत्पन्न केले; ब्रह्मा, विष्णू, रुद्र व इंद्र यांना पालखी उचलणारे भोई बनविले. अशाच स्वरूपाच्या लंब्या-चौड्या गप्पा-थापा मनात येईल तसे पुराणांमध्ये आहेत.

या लोकांना विचारले पाहिजे की, बाबांनो, देवीचे शरीर व श्रीपुर निर्माण करणारा कोण होता ? देवीचे आई-बाप कोण होते ? जर ते म्हणतील की, देवी अनादी आहे तर त्यावर उत्तर असे आहे की, जी वस्तू संयोगजन्य असते ती कधीही अनादी असू शकत नाही. आईचा मुलाशी विवाह हे जर पाप असेल तर भावाबहिणीचे लग्न हे काय पुण्यप्रद समजायचे ? ज्याप्रमाणे देवी भागवतात ब्रह्मा, विष्णू, महादेव इत्यादिकांची क्षुद्रता आणि देवीची महत्ता लिहिली आहे, त्याचप्रमाणे शिवपुराणात देवीचे क्षुद्रत्व लिहिले आहे. अर्थात इतर सगळे महादेवाचे दास असून महादेव सर्वांचा ईश्वर आहे. रुद्राक्ष हे एका झाडाचे फळ आहे. ते शरीरावर जर धारण केले आणि अंगावर भस्म फासले की, मुक्ती मिळत असेल तर राखेत लोळणारी गाढवे व इतर पशू आणि गुंजांच्या किंवा इतर जंगली फळांच्या माळा धारण करणारे भिल्ल, कंजर वगैरे लोक सहजासहजी मुक्त होऊन जातील आणि डुकरे, कुत्री, गाढवे वगैरे राखेत लोळणाऱ्या प्राण्यांना मुक्ती का मिळत नाही ?

**(प्रश्न)** कालाग्निरुद्रोपनिषदामध्ये भस्मलेपन करावे असे सांगितले आहे. ते काय खोटे आहे ?

**'त्र्यायुषं जमदग्ने.'** यजु. अ. ३। मं. ६२ हे यजुर्वेदातील वचन आहे. त्यासारख्या वेदांतील मंत्रांमध्ये भस्म लावावे असे आहे. पुराणांमध्ये असे लिहिले आहे की, "रुद्राच्या डोळ्यांतून जो अश्रुपात झाला त्यातून जो वृक्ष निर्माण झाला त्याचे नाव रुद्राक्ष आहे. म्हणून रुद्राक्ष धारण करण्यात पुण्य आहे. एक जरी रुद्राक्ष धारण केला तरी सर्व पापांतून मुक्त होऊन मनुष्य स्वर्गाला जातो. त्याला यमाची किंवा नरकाची भीती उरत नाही."

**(उत्तर)** 'कालाग्निरुद्रोपनिषद्' कुणा गोसाव्याने म्हणजे अंगाला राख फासणाऱ्याने रचले आहे. कारण त्यातील 'यास्य प्रथमा रेखा सा भूर्लोकः' इत्यादी वचने निरर्थक आहेत. कारण जी रेखा कपाळावर दररोज हाताने काढली जाते ती भूलोकाची प्रतीक कशी होऊ शकते ? तसेच **'त्र्यायुषं जमदग्नेः'** इत्यादी जे मंत्र आहेत ते भस्म किंवा त्रिपुंड्र धारण करा असे सांगणारे नाहीत. **'चक्षुर्वै जमदग्निः'** शतपथ "हे परमेश्वरा ! माझ्या नेत्रांची ज्योती (त्र्यायुषं) त्रिगुणित होवो म्हणजे तीनशे वर्षेपर्यंत राहो; आणि मीही अशी धर्मकृत्ये करावी की ज्यायोगे माझा दृष्टी नाश होऊ नये."

डोळ्यांतील अश्रू त्यापासून वृक्ष उत्पन्न होऊ शकतो, हा केवढा मूर्खपणा आहे ! परमेश्वराच्या सृष्टिक्रमाविरुद्ध कोणी काही करू शकतो काय ? परमात्म्याने ज्या वृक्षाचे बीज जसे निर्माण केले त्यापासून तसाच वृक्ष उत्पन्न होऊ शकतो दूसरा नाही. म्हणून त्या पुराणांमध्ये रुद्राक्ष, भस्म, तुळशी, कमलाक्ष, दर्भ, चंदन वगैरे गळ्यात धारण करण्यासंबंधी जे काही लिहिले आहे ते सर्व जंगली पशुवत माणसाचे काम आहे. असे हे वाममार्गी व शैवपंथी लोक अत्यंत मिथ्याचारी, विरोधी आणि आपली कर्तव्य कर्मे त्यागणारे होतात. त्यांच्यामध्ये जो कोणी चांगला मनुष्य असतो तो या गोष्टीवर विश्वास न ठेवता सत्कर्मे करतो. रुद्राक्ष व भस्म धारण केल्याने यमराजाचे दूत घाबरत असतील तर पोलिस शिपाईही घाबरत असतील. जर भस्म व रुद्राक्ष धारण करणाऱ्यांना कुत्रे, सिंह, साप, विंचू, माशी, डास हेही भीत नाहीत. तर न्यायाधीशाचे म्हणजे यमाचे दूत का घाबरतील ?

**(प्रश्न)** वाममार्गी व शैव तर चांगले नाहीत; पण वैष्णव तर चांगले आहेत ?

**(उत्तर)** तेही वेदविरोधी असल्याने त्यांच्याहून अधिक वाईट आहेत.

**(प्रश्न) नमस्ते रुद्र मन्यवे।** यजु. अ. १६। मं. १ **शिवाय च शिवतराय च।** यजु. अ. १६। मं. ४१ **वैष्णवमसि।** जु. अ. ५। मं. २१ **वामनाय च।** यजु. अ. १६। मं. ३० **गणानां त्वा गणपतिं हवामहे।** यजु. अ. २३। मं. १९ **भगवती (हि) भूयाः।** अथर्व. कां. ९। सू. १०। मं. २० **सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च।** यजु. अ. १३। मं. ४६ इत्यादी वेदप्रमाणांनी आधारे शैवादी मते सिद्ध होतात. मग त्यांचे तुम्ही खंडन का करता ?

**(उत्तर)** या वचनांवरून शैवादी संप्रदाय सिद्ध होत नाहीत. कारण त्यातील 'रुद्र' 'परमेश्वर, प्राणादी वायू, जीव, अग्नी इत्यादीचे नाव आहे. ('नम' शब्दाचा अर्थ नमस्कार व 'अन्न' असाही आहे. **(नम इति अन्न नाम.** निघं. २।७)) परमात्मा हा दुष्टावर क्रोध करून त्यांना रडविणारा म्हणजे रुद्र आहे. त्याला नमस्कार करावा. प्राण आणि जठराग्नी यांना अन्न द्यावे. जो मंगलकारी परमेश्वर जगाचे अत्यंत कल्याण करणारा आहे त्याला नमस्कार केला पाहिजे. **'शिवस्य परमेश्वरस्यायं भक्तः शैवः'। 'विष्णोः परमात्मनोऽयं भक्तो वैष्णवः'। 'गणपतेः सकलजगत्स्वामिनोऽयं सेवको गाणपतः'। 'भगवत्या वाण्या अयं सेवको भागवतः'। 'सूर्यस्य चराचरात्मनोऽयं**

**सेवक; सौर:**' रुद्र, शिव, विष्णू, गणपती, सूर्य वगैरे ही परमेश्वराची नावे आहेत. भगवती सत्यभाषणयुक्त वाणीचे नाव आहे. असे अज्ञानाने समजून या लोकांनी निष्कारण असे भांडण माजविले. जसे-

कोण्या एका बैराग्याचे दोन चेले होते. ते दररोज आपल्या गुरूचे पाय दाबीत. एकाने उजव्या पायाची आणि दुसऱ्याने डाव्या पायाची सेवा करावी असे वाटून घेतले होते. एके दिवशी असे झाले की, एक चेला बाजार करायला गेला; आणि दुसरा आपल्या वाटणीच्या पायाची सेवा करीत होता. इतक्यात गुरूजी दुसऱ्या कुशीवर वळले, त्याबरोबर त्या शिष्याच्या पायावर दुसऱ्या शिष्याचा वाटणीचा पाय पडला त्याने दांडके घेऊन त्या पायाला ठोकले. गुरू म्हणाले, ''अरे दुष्टा! काय केलेस तू हे ?'' चेला उत्तरला, ''माझ्या वाट्याच्या पायावर हा पाय का येऊन पडला ?'' इतक्यात बाजार करायला गेलेला शिष्य परत आला; आणि तो आपल्या वाट्याच्या पायाची सेवा करू लागला. पाहिले तर तो पाय सुजला होता त्याने बैराग्याला विचारले, ''गुरूजी! माझ्या वाटणीच्या या पायाला काय झाले ?'' गुरूने सारी हकीगत त्याला सांगितली. तेव्हा त्या मूर्ख चेल्याने काहीही न बोलता दांडके घेऊन गुरूच्या दुसऱ्या पायावर मारले. बिचारा गुरू जोर जोरात ओरडू लागला. त्याबरोबर त्या दोघांनी गुरूच्या पायांना काठीने मारू लागले. तेव्हा मोठा कोलाहल झाला ते ऐकून लोक धावून आले आणि विचारू लागले की, ''साधू महाराज! काय झाले ?'' त्यांच्यातील एका शहाण्या माणसाने आधी त्या मूर्ख शिष्यांच्या तावडीतून गुरूची सुटका केली; आणि मग त्यांना असा उपदेश केला की, ''पहा! हे दोन्ही पाय तुमच्या गुरूचे आहेत. त्यांची सेवा केल्याने गुरूला सुख मिळते आणि त्यांना दुःख दिल्याने गुरूलाच दुःख होते.''

जसे एका गुरुच्या सेवेत शिष्यांनी खेळखंडोबा केला त्याचप्रमाणे जो एक अखंड, सच्चिदानंद, अनंत स्वरूप परमात्म्याची विष्णू, रुद्र इत्यादी अनेक नावे आहेत. त्या नावांच्या अर्थासंबंधी आम्ही प्रथम समुल्लासात विवेचन केले आहे. तो सत्यार्थ समजून न घेता शैव, शाक्त, वैष्णव आदी संप्रदायाचे लोक परस्परांच्या नावाची निंदा करतात. हे मठ्ठ लोक आपल्या बुद्धीचा थोडाफार वापर करून असा विचार करीत नाहीत की, ही सारी विष्णू, रुद्र, शिव इत्यादी नावे एका अद्वितीय, सर्वनियंता, सर्वांतर्यामी, जगदीश्वराचे अनेक गुण, कर्म व स्वभाव युक्त असल्यामुळे ती त्याचेच वाचक आहेत. अशा लोकांवर ईश्वराचा कोप होत नसेल काय ?

## चक्रांकित वैष्णव

(आता चक्रांकित वैष्णवांची अद्‌भुत माया पाहा :-)

**तापः पुण्ड्रं तथा नाम माला मन्त्रस्तथैव च।**
**अमी हि पञ्च संस्काराः परमैकान्तहेतवः ॥१॥** रामानुजपटलपद्धति, पृठ ७
**अतप्ततनूर्न तदामो अश्नुते। इति श्रुतेः ॥** ऋ. मं. ९। सू. ८३। मं. १

अर्थ :- (तापः) शंख, चक्र, गदा व पद्म ही चिह्ने असणाऱ्या मुद्रा अग्नीमध्ये तापवून वैष्णव लोक आपल्या दंडाच्या मूळावर डाग देतात आणि मग त्या मुद्रा दुध पात्रात बुडवून थंड करतात आणि काही लोक ते दूध पितातही. आता पाहा. अशा प्रकारे प्रत्यक्ष माणसांच्या मांसाचाही स्वाद त्या दुधात उतरत असणार. असल्या कृत्यांनी परमेश्वराला प्राप्त करण्याची आशा वैष्णव लोक बाळगतात आणि म्हणतात की, ''शंखचक्रादी तप्त मुद्रा शरीरावर मारून घेतल्याशिवाय जीवाला परमेश्वराची प्राप्ती होत नाही. कारण तोपर्यंत तो (आमः)

कच्चा आहे आणि सरकारी बिल्ला (चापरास) लावल्यानंतर तो माणूस सरकारी नोकर आहे हे ओळखून सर्व लोक त्याला घाबरतात त्याप्रमाणेच विष्णूच्या शंखचक्रादी आयुधांची चिह्ने माणसाच्या अंगावर पाहून यमराज व त्याचे दूत भितात आणि असे म्हणतात की,''

**दोहा :- बाना बड़ा दयाल का, तिलक छाप और माल ।**

**यम डरपै कालू कहे, भय माने भूपाल ॥** भक्तमाल, निष्ठा ६

अर्थ :- ईश्वराचा वेष असणारा टिळा, मुद्रा व माळ धारण करणे हे फार मोठे आहे. याला यमराज व राजाही भीतो. (पुण्ड्रम्) त्रिशूलासारखे कपाळावर चित्र काढणे, (नाम) नारायणदास, विष्णुदास यांसारखी दास शब्दांत नावे ठेवणे, (माला) कमळाच्या बियांची माळ बाळगणे आणि पाचवा मंत्र **'ओं नमो नारायणाय'** या गोष्टी त्यांनी सामान्य लोकांसाठी मंत्र ठरवून दिल्या आहेत. तसेच,

**श्रीमन्नारायणचरणं शरणं प्रपद्ये ॥१॥ श्रीमते नारायणाय नमः ॥२॥ श्रीमते रामानुजाय नमः ॥३॥** इत्यादी मंत्र श्रीमंत व प्रतिष्ठित लोकांसाठी बनविले आहेत. पहा ! हीही एक दुकानदारीच झाली. जसा चेहरा तसा टिळा. या पाच संस्कारांना ते चक्रांकित मुक्तीचा हेतू समजतात. या मंत्रांचा अर्थ :- मी नारायणाला नमस्कार करतो. मी लक्ष्मीयुक्त नारायणाच्या चरणांना शरण जातो. ॥१॥ मी श्रीमान नारायणाला नमस्कार करतो अर्थात जो शोभायुक्त नारायण आहे त्याला माझा नमस्कार असो. ॥२॥ श्रीमान रामानुजांना मी नमस्कार करतो. ॥३॥ जसे वाममार्गी लोक पंचमकार मानतात तसे वैष्णव चक्रांकित पाच संस्कार मानतात. शंख, चक्र, वगैरे डागण्यासाठी हे लोक जो वेदमंत्र प्रमाण सांगतात त्यांचा पाठ व अर्थ असा आहे :-

**पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि पर्येषि विश्वतः ।**

**अतप्ततनूर्न तदामो अश्नुते शृतास इद्वहन्तस्तत्समाशत ॥१॥**

**तपोष्पवित्रं विततं दिवस्पदे ॥२॥** ऋ. मं. ९। सू. ८३। मं. १, २

अर्थ :- हे ब्रह्मांडाचे व वेदांचे पालन करणाऱ्या प्रभु सर्वसामर्थ्ययुक्त, सर्व शक्तिमान ! तू आपल्या व्यापकतेने जगाचे सर्व अवयव व्याप्त करून ठेवले आहेस. तुझे स्वरूप जे व्यापक व पवित्र आहे. जो ब्रह्मचर्य, सत्य भाषण, शम, दम, योगाभ्यास, जितेंद्रियत्व, सत्संग इत्यादी तपश्चर्या रहित जो अपरिपक्व अंतःकरणयुक्त आहे, तो तुझ्या त्या स्वरूपाला प्राप्त होत नाही. पण जे लोक पूर्वोक्त तप करून शुद्ध आहेत तेच त्या तपाचे आचरण करून तुझ्या त्या शुद्ध स्वरूपाला उत्तम प्रकारे प्राप्त होतात. ॥१॥

जे प्रकाशस्वरूप परमेश्वराच्या सृष्टीमध्ये विस्तृत पवित्राचरणरूपी तप करतात ते परमेश्वराच्या प्राप्तीसाठी योग्य असतात. ॥२॥

आता विचार करावा की, रामानुजीयादी लोक या मंत्राने चक्रांकित होणे कसे सिद्ध करतात ? खरेच हे सांगणारे लोक विद्वान होते की अविद्वान ? ते विद्वान होते तर ते असा असंभवनीय अर्थ कसा, का करतात ? कारण या मंत्रात 'अतप्ततनूः' असा शब्द आहे, 'अतप्तभुजैकदेशः' असा शब्द नाही. पुनः 'अतप्ततनूः हा अर्थ 'ज्यांचे शरीर नखशिखान्तपर्यंत समुदाय असा होतो. हे प्रमाण मानून चक्रांकित लोक अग्नीने शरीर तापवावे

असा स्वीकार करतील तर त्यांनी आपले सारे शरीर भट्टीत टाकून जाळून घ्यावे तरी ते या मंत्राच्या अर्था विरुद्धच होईल. कारण या मंत्रामध्ये सत्यभाषणादी पवित्र कर्म करणे हे तप असे घेतले आहे.

**ऋतं तप: सत्यं तपो दमस्तप: स्वाध्यायस्तप: ।।** तैत्तिरीय. व. १०। अ. ८

अर्थ :- (ऋतं तप:) यथार्थ शुद्ध भाव, सत्य मानने, सत्य बोलणे, सत्य करणे, मनाला अधर्माकडे जाऊ न देणे, बाह्य इंद्रियांना अन्यायचरणापासून परावृत्त करणे म्हणजे शरीर, इंद्रियें, व मन यांनी शुभकर्माचरण करणे, वेदादी सत्यविद्यांचे अध्ययन-अध्यापन करणे, वेदानुसार आचरण करणे इत्यादी उत्तम धर्म युक्त कर्माचे नाव तप आहे. धातूचे छाप तापवून चामडी जाळणे म्हणजे तप म्हणणे नव्हे.

पाहा ! तप्त मुद्राधारी लोक स्वत:ला मोठे वैष्णव समजतात. परंतु आपली परंपरा आणि कुकर्मे यांच्याकडे लक्ष देत नाहीत. वैष्णव पंथाचा मूळ पुरुष 'शठकोप' झाला. चक्रांकित लोकांच्या 'भक्तमाल' जो ग्रंथ नाभाडूमाने रचला त्यात लिहिले आहे की, **'विक्रीय शूर्प विचचार योगी'** इत्यादी वचन चक्रांकितांच्या ग्रंथात लिहले आहे.

शठकोप योगी सुपे तयार करून विकत असे आणि सर्वत्र संचार करीत असे. म्हणजे तो कुंजर जातिमध्ये जन्मला होता. जेव्हा तो ब्राह्मणांकडून शास्त्रे शिकू किंवा ऐकू इच्छित असेल; तेव्हा ब्राह्मणांनी त्याचा तिरस्कार केला असावा. म्हणून त्याने ब्राह्मणांविरुद्ध एक नवीन संप्रदाय तिलक चक्रांकित आदी शास्त्र विरुद्ध मनमाने सुरू केला असावा. त्याचा शिष्य 'मुनिवाहन' जो चांडाळ कुळात जन्मलेला होता. त्याचा चेला 'यावनाचार्य' हा यवन कुलोत्पन्न होता. त्याच्या नावात बदल करून काही लोक त्याला 'यामुनाचार्य' असेही म्हणतात. त्याच्या नंतर ब्राह्मण कुळात जन्मलेला 'रामानुज' हा चक्रांकित (तप्तमुद्राधारी) झाला. त्याच्या पूर्वी काही ग्रंथ लिहिले गेले होते. रामानुजाने थोडीशी संस्कृत शिकून संस्कृतमध्ये श्लोकबद्ध ग्रंथ आणि शारीरिक सूत्रे व उपनिषदांची टिका जी शंकराचार्यांच्या टीकेविरुद्ध लिहली होती. त्याने शंकराचार्यांची यथेच्छ निंदाही केली.

जसे शंकराचार्यांचे मत आहे की, जीव व ब्रह्म हे एकच आहेत. दुसरी कोणतीच गोष्ट वास्तविक नाही. जगाचा हा सर्व विस्तार मिथ्या, मायारूप व अनित्य आहे. याउलट रामानुजाचे असे मत आहे की, जीव, ब्रह्म व माया ही तीन्ही नित्य आहेत. येथे शंकराचार्यानी ब्रह्माखेरीज जीव आणि कारण वस्तूला न मानणे हे ठीक नाही. तसेच रामानुजांच्या मते जीव व माया यांच्यासह परमेश्वर एक आहे, हे बरोबर नाही. जे की विशिष्ट अद्वैत म्हणजे जीव ईश्वर व माया या तीन्ही वस्तूंना नित्य मानणे आणि तीनही एकच आहेत हे म्हणणे हेही चूक आहे. कंठी, तिलक, माला, मूर्तिपूजा इत्यादी पाखंडी गोष्टी प्रचलित मानणे ह्या वाईट गोष्टी चक्रांकितमध्येही आहेत. जसे चक्रांकित संप्रदाय जसा वेदविरोधी आहे तसे शंकराचार्यांच्या मताचे लोक नाहीत.

## मूर्तिपूजा समीक्षा

**(प्रश्न)** मूर्तिपूजा कोठून सुरू झाली ?

**(उत्तर)** जैन लोकांपासून.

**(प्रश्न)** जैनांनी ती कोठून घेतली ?

**(उत्तर)** आपल्या मूर्खपणातून.

**(प्रश्न)** जैन लोक म्हणतात की, शांत ध्यानावस्थेत बसलेली मूर्ती पाहून आपल्या जीवावरही तसाच शुभ परिणाम होतो.

**(उत्तर)** जीव चेतन व मूर्ती जड (अचेतन) आहे. मूर्तीप्रमाणे जीवही जड (अचेतन) होईल काय ? ही मूर्तीपूजा केवळ पाखंड मत आहे. ती जैनांनी सुरू केली आहे. यासाठी याचे खंडन जैनमताचे बाराव्या समुल्लासात करणार आहोत.

**(प्रश्न)** शाक्त, इत्यादिकांनी मूर्तीच्या बाबतीत जैनांचे अनुकरण केलेले नाही. कारण जैनांच्या मूर्तीसारख्या वैष्णवादिकांच्या मूर्ती नाहीत.

**(उत्तर)** होय. ते बरोबर आहे. जर त्यांनी जैनांसारख्याच आपल्या मूर्ती बनविल्या असत्या तर तेही जैनच झाले असते. म्हणून त्यांनी आपल्या मूर्ती जैनांच्या मूर्तीच्या विरुद्ध प्रकारच्या बनविल्या. कारण जैनांना विरोध करणे हे त्याचे काम होते व त्यांना विरोध करणे हे जैनांचे मुख्य काम होते. जसे जैनांच्या मूर्ती नग्न, ध्यानावस्थित आणि विरक्त माणसासारख्या बनविल्या आहेत. तर त्यांच्या उलट वैष्णवादिकांच्या मूर्ती भरपूर शृंगारलेल्या, स्त्रीसहित, रंग-राग-भोग आणि विषयासक्ती दर्शविणाऱ्या, उभ्या किंवा बसलेल्या बनविल्या आहेत. जैन लोक शंख, घंटा, झांजा वगैरे वाद्ये वाजवित नाही; तर (वैष्णवादिक लोक) अनेक वाद्यांचा फारच गोंगाट करतात. त्यांच्या या युक्तीमुळे वैष्णवादी संप्रदायी पुरोहितांचे चेले जैनांच्या जाळ्यात न अडकता त्या पोपांच्या जाळ्यात अडकले; आणि त्यांच्यापैकी अनेकांनी व्यासादी महर्षीच्या नावांवर कपोलकल्पित असंभवनीय कथांचे गाथायुक्त ग्रंथ रचले. त्यांनी 'पुराण' असे नाव त्यांना दिले आणि कथा देखील ऐकवू लागले आणि मग पाषाणाच्या मूर्ती बनवून त्या गुप्तपणे डोंगरात किंवा जंगलात ठेवून येत किंवा जमिनीत पुरून ठेवीत. मग आपल्या चेल्याकडून सगळीकडे अशी बातमी पसरवीत की, मला रात्री स्वप्नामध्ये महादेव, पार्वती, राधा, कृष्ण, सीता, राम, लक्ष्मी, नारायण, भैरव, हनुमान यांच्यापैकी कोणी येऊन सांगितले की, ''मी अमुक ठिकाणी आहे, मला तेथून घेऊन ये आणि मंदिरामध्ये माझी स्थापना कर, तूच माझा पुजारी हो. म्हणजे मी तुला मनोवांछित फळ देईन.''

अज्ञानी लोकांनी त्या पोपांची लीला ऐकली आणि ते खरे आहे असे मानले मग त्या पोपांना विचारीत, ''महाराज, अशी मूर्ती कोठे आहे ?'' तेव्हा तो भोंदू त्यांना सांगे, ''अमुक डोंगरात किंवा जंगलात ती मूर्ती आहे. तुम्ही माझ्याबरोबर चला. मी ती तुम्हाला दाखवितो.'' मग ते आंधळे त्या लबाड इसमाच्या बरोबर तेथे जाऊन पाहत आणि आश्चर्यचकित होत आणि त्या पुरोहिताच्या पायावर लोळण घेऊन म्हणत, ''महाराज ! तुमच्यावर या देवाची फारच कृपा आहे. तुम्ही ही मूर्ती घेऊन चला. आम्ही तिच्यासाठी मंदिर बांधून देऊ. त्यामध्ये या देवाची स्थापना करून तुम्हीच त्याची पूजा करा. मग आम्हीही या प्रतापी देवाचे दर्शनस्पर्शन करून मनोवांछित फळ मिळवू.'' अशी चलाखी एकाने केलेली पाहून सगळ्या पोपांनी आपले पोट भरण्यासाठी छल कपट करून मूर्ती स्थापन केल्या.

**(प्रश्न)** परमेश्वर निराकार आहे. त्याचे ध्यान करता येत नाही. म्हणून ध्यानासाठी मूर्तीच असली पाहिजे. अगदी काहीच न करण्यापेक्षा मूर्तीसमोर जाऊन, हात जोडून जे लोक परमेश्वराचे स्मरण करतात व नामजप करतात, त्यात काय नुकसान आहे ?

**(उत्तर)** ज्याअर्थी परमेश्वर निराकार, सर्वव्यापक आहे त्याअर्थी त्याची मूर्ती बनूच शकत नाही आणि जर केवळ मूर्तीच्या दर्शनाने परमेश्वराचे स्मरण होत असेल तर परमेश्वराने निर्माण केलेली पृथ्वी, पाणी, अग्नी, वायू, वनस्पती वगैरे वस्तूंच्या अद्‌भुत रचना पाहून ईश्वराचे स्मरण होणार नाही काय ? अशा परमेश्वर रचित पृथ्वी पर्वतादि महा मूर्ति की ज्या पर्वतापासून मनुष्यकृत मूर्ति बनतात त्या रचनांना पाहून परमेश्वराचे स्मरण होऊ शकत नाही काय ? शिवाय मूर्ती पाहिल्यानंतर परमेश्वराचे स्मरण होते असे जे तुम्ही म्हणता ते पूर्णपणे खोटे आहे. कारण जेव्हा मूर्ती समोर नसेल तेव्हा परमेश्वराचे स्मरण न झाल्याने माणूस एकान्त मिळताच चोरी, जारी वगैरे दुष्कृत्ये करण्यास प्रवृत्त होऊ शकतो. कारण तो समजतो की आपल्याला कोणी यावेळी व या ठिकाणी पाहत नाही म्हणून तो ते कुकर्म केल्याशिवाय चुकणार नाही. अशा प्रकारे पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा करण्यात अनेक दोष आहेत असे सिद्ध होते.

आता असे पाहा ! जो कोणी पाषाणादिकांच्या मूर्तींना न मानून सर्वदा सर्वव्यापक, सर्वांतर्यामी, न्यायकारी परमात्मा सर्वत्र आहे असे जाणतो व मानतो तो हे ओळखतो की, परमेश्वर सगळ्यांची बरी-वाईट कृत्ये सदैव पाहत असतो; आणि एक क्षणही आपण परमात्म्यापासून वेगळे राहू शकत नाही. म्हणून कुकर्म करण्याची गोष्ट तर दूरच राहिली, तसे काही करण्याचा वाईट विचारही तो मनात आणू शकत नाही. त्याला हे माहीत असते की, जर मी मनाने अथवा वाणीनेही काही वाईट कृत्य करीन तर त्या सर्वांतर्यामी परमेश्वराच्या न्यायानुसार मला शिक्षा झाल्याखेरीज राहणार नाही. शिवाय केवळ नामस्मरणाने काहीही फळ मिळत नसते. नुसते तोंडाने साखर, साखर असे म्हटल्याने तोंड गोड होत नाही किंवा कडुलिंबाचा जप केल्याने तोंड कडू होत नाही. प्रत्यक्ष जिभेने चाखल्यावरच गोडवा किंवा कडूपणा लक्षात येतो.

## नामस्मरण

**(प्रश्न)** देवाचे नाव घेणे पूर्णपणे मिथ्या आहे काय ? सर्व पुराणांमध्ये तर नामस्मरणाचे खूपच माहात्म्य वर्णिले आहे.

**(उत्तर)** नामस्मरण करण्याची तुमची रीत चांगली नाही. ज्याप्रकारे तुम्ही नामस्मरण करता ती रीत चुकीची आहे.

**(प्रश्न)** आमची रीत चुकीची का आहे ?

**(उत्तर)** कारण ती वेदविरुद्ध आहे.

**(प्रश्न)** तर मग वेदोक्त नामस्मरणाची रीत तुम्ही आम्हांला सांगावी !

**(उत्तर)** वैदिक पद्धतीने नामस्मरण अशा प्रकारे केले पाहिजे. 'न्यायकारी' हे ईश्वराचे एक नाव आहे. त्याचा अर्थ असा की, परमात्मा पक्षपातरहित होऊन सर्वांचा यथायोग्य न्याय करतो. हा अर्थ लक्षात ठेवून न्याययुक्त व्यवहार करावा. कधीही अन्याय करू नये. अशा प्रकारे परमेश्वराच्या एका नावानेदेखील आचरण केल्यास एका माणसाचे कल्याण होऊ शकते.

**(प्रश्न)** परमेश्वर निराकार आहे, हे आम्हालाही माहीत आहे. परंतु त्याने शिव, विष्णू, गणेश, सूर्य, देवी इत्यादिकांची शरीरे धारण करून राम, कृष्ण वगैरे अवतार घेतले. म्हणून त्याच्या मूर्ती बनतात. तेही चूक आहे काय ?

**(उत्तर)** होय. तेही चूक आहे. कारण **'अज एकपात्' 'अकायम्'** इत्यादी विशेषणांचा वापर करून परमेश्वर हा जन्ममरणरहित व शरीररहित असल्याचे वेदात सांगितले आहे. तसेच युक्तिवादानेही परमेश्वर कधी अवतार घेत नाही. कारण जो आकाशासारखा सर्वत्र व्यापक, अनंत आणि सुखदु:ख इत्यादी गुणरहित तो एका लहानशा वीर्यात, गर्भाशयात किंवा शरीरात कसा सामावू शकेल ? जो एकदेशीय असतो त्याचेच येणे व जाणे होत असते. जो अचल, अदृश्य व अणुरेणूत भरून राहिलेला आहे त्याचा अवतार होतो असे म्हणणे म्हणजे वंध्यापुत्राचा विवाह होऊन त्याच्या पौत्राचे दर्शन करण्याची गोष्ट आहे.

**(प्रश्न)** ज्याअर्थी परमेश्वर सर्वव्यापक आहे तर तो मूर्तीतही आहे. मग त्याची भावना कोणत्याही पदार्थात करून पूजा करण्यास काय हरकत आहे ? पाहा :-

**न काष्ठे विद्यते देवो न पाषाणे न मृण्मये ।**
**भावे हि विद्यते देवस्तस्माद्भावो हि कारणम् ॥** गरुड पुराण. प्रेत खं. अ. ३०। श्लो. १३

देव हा लाकूड, दगड व माती यांनी बनविलेल्या पदार्थात नसतो; तर तो भावनेत असतो. जेथे भाव करावा तेथे परमेश्वर सिद्ध होतो. (भाव तसा देव)

**(उत्तर)** परमेश्वर सर्वत्र व्यापक असताना एखाद्या विशिष्ट वस्तूच्या ठिकाणीच तो आहे आणि इतरत्र नाही, अशी भावना बाळगणे म्हणजे चक्रवर्ती राजाला संपूर्ण राज्याचा सत्ताधीश न मानता एखादा लहानशा झोपडीचा मालक समजण्यासारखे आहे. पहा ! हा त्याचा केवढा मोठा अपमान आहे तसेच तुम्ही त्याचाही अपमान करण्यासारखे आहे. परमेश्वर सर्वव्यापक आहे तर मग बागेतली पानेफुले तोडून ती मूर्तीवर का वाहता ? चंदन उगाळून का लावता ? उदबत्ती कशाला जाळता ? घंटा, झांज, टाळ, पखवाज काठीने कशाला बडवता ? तो तुमच्या हातांत परमेश्वर आहे. मग हात कशाला जोडता ? मस्तकात आहे मग ते कशाला नमवता ? अन्नपाण्यात आहे. मग त्याचा नैवेद्य कशाला दाखवता ? पाण्यात ईश्वर आहे मग देवाला आंघोळ कशाला घालता ? कारण की तो परमेश्वर या सर्व पदार्थात व्यापक आहे.

आणि तुम्ही व्यापकाची पूजा करता की, व्याप्याची ? जर तुम्ही व्यापकाची पूजा करीत असाल तर दगड, लाकूड इत्यादींवर गंधफुले का वाहता ? आणि जर तुम्ही व्याप्याची पूजा करत आहात तर आम्ही परमेश्वराची पूजा करतो असे खोटे का बोलता ? आम्ही ईश्वराचे नव्हे तर पाषाणादिकांचे पुजारी आहोत असे खरे का नाही सांगत ?

आता असे सांगा की, 'भाव' खरा आहे की खोटा ? तो खरा आहे तर तुमच्या भावनेच्या आधीन बनून परमेश्वर बद्ध होऊन जाईल आणि तुम्ही मातीमध्ये सोने, चांदी इत्यादी; दगडामध्ये हिरा, पन्ना इत्यादी; समुद्राच्या फेसामध्ये मोती; पाण्यामध्ये दूध, तूप, दही इत्यादी; आणि धुळीमध्ये मैदा, साखर इत्यादीची भावना बाळगून त्यांना तसे का बनवीत नाही ! तुम्ही दु:खाची भावना कधी करीत नाही; मग ते का होते ? आणि सदैव सुखाची भावना करता; मग ते का मिळत नाही ? आंधळा माणूस नेत्रांची भावना करून का पाहू शकत नाही ? मरण्याची भावना करीत नाही; मग का मरता ? म्हणून तुमची भावना खरी नाही. कारण जो जसा असेल तसाच तो मानणे ही खरी भावना होय जसे अग्नीमध्ये अग्नी, पाण्यामध्ये पाणी समजणे ही भावना आणि पाण्यामध्ये

अग्नी व अग्नीमध्ये पाणी आहे असे समजणे ही अभावना होय. कारण जे जसे आहे त्याला तसे जाणणे हे ज्ञान आहे आणि त्याच्या विपरीत जाणणे हे अज्ञान होय. म्हणून तुम्ही अभावनेला भावना व भावनेला अभावना म्हणता.

**(प्रश्न)** अहो! जोपर्यंत वेदमंत्रांनी आवाहन केले जात नाही तोपर्यंत देवाचे आगमन होत नाही. आवाहन केले की, परमेश्वर झटकन येतो आणि विसर्जन केले की तो निघून जातो.

**(उत्तर)** जर मंत्रोच्चाराने आवाहन केल्याने मूर्तीमध्ये देव येत असेल तर ती मूर्ती सचेतन का होत नाही? आणि विसर्जन केल्याने तो निघून जात असेल तर तो कोठून येतो आणि कोठे जातो?

बंधूंनो ऐका! पूर्णब्रह्म परमात्मा येतही नाही अथवा जातही नाही. जर तुम्ही मंत्रबळाने परमेश्वराला बोलावू शकता, तर त्या मंत्रांनी आपल्या मेलेल्या पुत्राच्या शरीरात जीवाला का बोलावित नाही? आणि शत्रूच्या शरीरातील जीवात्म्याचे विसर्जन करून त्याला ठार का मारू शकत नाही?

भोळ्या भावड्या बंधूंनो, ऐका! हे पोप तुम्हाला फसवून आपला स्वार्थ साधतात. वेदांमध्ये पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा आणि परमेश्वराच्या आवाहन-विसर्जनाशी संबंधित एक अक्षरही त्यात नाही.

**(प्रश्न) प्राणा इहागच्छन्तु सुखं चिरं तिष्ठन्तु स्वाहा।**
**आत्मेहागच्छतु सुखं चिरं तिष्ठतु स्वाहा।**
**इन्द्रियाणीहागच्छन्तु सुखं चिरं तिष्ठन्तु स्वाहा॥** प्रतिष्ठामयूख आदि ग्रन्थ

इत्यादी प्राणप्रतिष्ठापनेचे वेदमंत्र विद्यमान असताना ते नाहीत असे तुम्ही कसे म्हणता?

**(उत्तर)** अरे बाबा! आपली बुद्धी थोडी तरी वापर की, ही सारी वेदवचने नसून वाममार्गी लोकांनी वेदविरुद्ध लिहिलेल्या तंत्रग्रंथातील पोपरचित पंक्ती आहेत.

**(प्रश्न)** तंत्र ग्रंथ खोटे आहेत काय?

**(उत्तर)** होय! ते पूर्णपणे खोटे आहेत. ज्याप्रमाणे पाषाणादी मूर्तीशी संबंधित एकही मंत्र वेदात नाही त्याचप्रमाणे 'स्नानं समर्पयामि' यांसारखी वचनेही त्यांत नाहीत. **'पाषाणादिमूर्तिं रचयित्वा मन्दिरेषु संस्थाप्य गन्धादिभिरर्चयेत्'** म्हणजे पाषाणादींची मूर्ती बनवून तिची स्थापना मंदिरात करावी आणि गंधाक्षतांनी तिची पूजा करावी, असे वेदांमध्ये मुळीच सांगितलेले नाही.

**(प्रश्न)** वेदांमध्ये तशी विधि नाही तर खंडनही नाही आणि जरी खंडन केले आहे तरी **'प्राप्तौ सत्यां निषेधः'** म्हणजे मूर्ती अस्तित्वात असल्यानेच त्याचा निषेध होऊ शकतो.

**(उत्तर)** विधि तर नाही याउलट परमेश्वराच्या ठिकाणी अन्य कोणत्याही पदार्थाला पूजनीय मानू नये असे स्पष्ट सांगितले आहे व तसे करणे सर्वथैव निषिद्ध ठरविले आहे. काय अपूर्वविधी होत नाही? हे ऐका!

**अन्धन्तमः प्रविशन्ति येऽसम्भूतिमुपासते।**
**ततो भूयऽइव ते तमो यऽउ सम्भूत्याᳪ रताः॥१॥** यजु. अ. ४०। मं. ९

अर्थ :- जे लोक 'असंभूति' म्हणजे अनुत्पन्न अनादी प्रकृतिरूप कारणाची ब्रह्माच्या ठिकाणी उपासना करतात ते अंधकारात प्रवेश करतात आणि जे लोक 'संभूति' म्हणजे मूळ प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या

कार्यरूप पृथ्वी आदी भूतांना, पाषाण, वृक्ष इत्यादीकांच्या अवयवांना व मनुष्यादिकांच्या शरीरांना ब्रह्म समजून त्यांची उपासना करतात, ते त्याहूनही जास्त गडद अंधःकारात पडतात. अर्थात ते महामूर्ख लोक घोर दुःखरूपी नरकात पडून दीर्घकाळ महाक्लेश भोगतात.॥१॥

**न तस्य॑ प्रति॒मा॑ऽअस्ति ॥२॥** यजु. अ. ३२। मं. ३

जो परमात्मा सर्व जगात व्यापक आहे, त्या निराकार परमेश्वराची भौतिक प्रतिमा, परिमाण सादृश्य किंवा मूर्ती नाही. ॥२॥

**यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते।**
**तदेवत ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥१॥** केनोपनि. खं. १। मं. ४

जो परमेश्वर वाणीचा विषय नाही; म्हणजे 'हे पाणी आहे. घ्या,' असा तो विषय नाही आणि ज्याच्या धारणेने व सत्तेने वाणीची प्रवृत्ती असते तेच ब्रह्म आहे हे तू जाण व त्याची उपासना कर. त्याच्या खेरीज अन्य जे काही आहे ते उपासनीय नाही. ॥१॥

**यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम्।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥२॥** केनोपनि. खं. १। मं. ५

जो परमेश्वर मनाने 'इयत्ता' तुकडी करून मनात आणला जात नाही, जो मनाला जाणतो तेच ब्रह्म आहे हे तू जाण आणि त्याचीच उपासना कर. याच्याहून भिन्न असा जो जीव व अंतःकरण आहे त्याची उपासना ब्रह्माच्या स्थानी करू नकोस. ॥२॥

**यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यन्ति।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥३॥** केनोपनि. खं. १। मं. ६

जो परमात्मा डोळ्यांना दिसत नाही, परंतु ज्याच्यामुळे डोळे पाहतात तेच ब्रह्म आहे हे तू जाण आणि त्याचीच उपासना कर. त्याच्याहून भिन्न सूर्य, विद्युत व अग्नी वगैरे जे जड पदार्थ आहेत, त्यांची उपासना करू नकोस. ॥३॥

**यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतम्।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥४॥** केनोपनि. खं. १। मं. ७

ज्या परमेश्वराचे ग्रहण कानांनी होऊ शकत नाही, परंतु ज्याच्यामुळे कान ऐकतात त्यालाच तू ब्रह्म जाण आणि त्याचीच उपासना कर. त्याच्याहून वेगळे असे जे शब्दादी विषय आहेत त्यांची उपासना तू ब्रह्माच्या ठिकाणी करू नकोस. ॥४॥

**यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्रणीयते।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥५॥** केनोपनि. खं. १। मं. ८

जो परमेश्वर प्राणांच्या योगाने गतिमान होत नाही, परंतु ज्याच्यामुळे प्राण गमनशील होतात तेच ब्रह्म आहे हे तू जाण आणि त्याचीच उपासना कर. त्याच्याहून भिन्न असे वायू वगैरे जे पदार्थ आहेत त्यांची उपासना तू करू नकोस. ॥५॥

अशा प्रकारे अनेक निषेध आहे. निषेध हा प्राप्ताचा व अप्राप्ताचाही होतो. एके ठिकाणी बसलेल्या

माणसाला तेथून उठविणे हा 'प्राप्ता' चा निषेध होय. ''हे पुत्रा ! तू कधी चोरी करू नकोस. विहिरीत पडू नकोस. दुष्टांची संगत धरू नकोस. विद्याहीन राहू नकोस.'' हा 'अप्राप्ता' चा निषेध होय. म्हणून मनुष्याच्या ज्ञानामध्ये अप्राप्ताचा आणि परमेश्वराच्या ज्ञानामध्ये प्राप्ताचा निषेध केला आहे. म्हणून पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा अत्यंत निषिद्ध आहे.

**(प्रश्न)** मूर्तिपूजेमध्ये जर पुण्य नाही तसे पापही नाही.

**(उत्तर)** कर्मे दोन प्रकारची असतात. विहित व निषिद्ध. सत्य भाषण करावे इत्यादी जी कर्तव्ये वेदांत सांगितली आहेत ती विहित कर्मे होत. असत्य भाषण करू नये, यांसारखी जी अकर्तव्ये वेदांत सांगितली आहेत ती निषिद्ध कर्मे होत. विहित कर्मांचे अनुष्ठान करणे हा धर्म असून ती न करणे हा अधर्म आहे. याचप्रमाणे निषिद्ध कर्मे करणे हा अधर्म असून ती न करणे हा धर्म आहे. ज्याअर्थी वेदांनी निषिद्ध ठरविलेली मूर्तिपूजा वगैरे कर्मे तुम्ही करता त्याअर्थी तुम्ही पापी ठरत नाही काय ?

**(प्रश्न)** असे पाहा ! वेद अनादी आहेत. त्या काळी मूर्तीची काय आवश्यकता होती ? कारण पूर्वी देव प्रत्यक्ष होते. ही मूर्तिपूजा कालांतराने तंत्रमार्गी ग्रंथ व पुराणे यांच्यापासून निर्माण झाली. जेव्हा माणसाचे ज्ञान व सामर्थ्य कमी झाले तेव्हा निराकार परमेश्वराचे ध्यान करू शकले नाही. मात्र मूर्तीचे ध्यान करणे त्यांना शक्य होते. म्हणून अज्ञानी लोकांसाठी मूर्तिपूजा आहे. घराची एकेक पायरी चढतच वर जाता येते. पहिली पायरी सोडून वर जाणे शक्य होत नाही म्हणून मूर्तिपूजा ही पहिली पायरी आहे. ती करता-करता जेव्हा ज्ञान प्राप्त होते व अंतःकरण पवित्र बनते तेव्हा माणूस परमात्म्याचे ध्यान करू शकेल. ज्याप्रमाणे लक्ष्यवेध करणारा प्रथम स्थूल लक्ष्यावर गोळी किंवा गोळा मारतो आणि मग हळूहळू सूक्ष्म लक्ष्यवेध करू शकतो. जशा मुली बाहुल्याचा खेळतोपर्यंत खेळतात जोपर्यंत त्यांना खरा पती प्राप्त होत नाही. अशाप्रकारे मूर्तिपूजा करणे वाईट गोष्ट नाही.

**(उत्तर)** ज्याअर्थी वेदविहित धर्म आणि वेदविरुद्ध आचरण करणे हा अधर्म आहे त्याअर्थी तुमच्या म्हणण्याप्रमाणेही मूर्तिपूजा करणे हा अधर्म ठरतो. जे ग्रंथ वेदविरुद्ध आहेत त्यांना प्रमाण मानणे म्हणजे जणू नास्तिक बनणेच होय. पाहा :-

**नास्तिको वेदनिन्दकः ॥१॥** मनु. अ. २। श्लो. ११

मनु महाराज असे सांगतात की, ''जो वेदांची निंदा म्हणजे अपमान, त्याग, वेदांविरुद्ध आचरण करतो तो नास्तिक आहे.'' ॥१॥

**या वेदबाह्याः स्मृतयो याश्च काश्च कुदृष्टयः ।**
**सर्वास्ता निष्फलाः प्रेत्य तमोनिष्ठा हि ताः स्मृताः ॥२॥** मनु. अ. १२। श्लो. ९५

जे ग्रंथ वेदबाह्य कुत्सित पुरुषांनी बनविले आहेत, ते जगाला दुःखसागरात बुडविणारे आहेत. ते सर्व निष्फळ, असत्य, अंधःकाररूप आणि इहलोकी व परलोकी दुःख देणारे आहेत. ॥२॥

**उत्पद्यन्ते च्यवन्ते च यान्यतोऽन्यानि कानिचित् ।**
**तान्यर्वाक्कालिकतया निष्फलान्यनृतानि च ॥३॥** मनु. अ. १२। श्लो. ९६

वेदांचा विरोध करणारे जे ग्रंथ तयार होतात ते आधुनिक असल्यामुळे लवकर नष्ट होतात. त्यांना मानणे निष्फळ व चुकीचे आहे. ॥३॥

याचप्रमाणे ब्रह्मदेवापासून जैमिनी महर्षीपर्यंतच्या विद्वानांचे मत आहे की जे काही वेदांविरुद्ध असेल ते मान्य न करणे आणि जे वेदानुकूल असेल त्याचे आचरण करणे हा धर्म होय. का ? कारण वेद हा सत्य अर्थाचा प्रतिपादक आहे. याविरुद्ध जे तंत्रग्रंथ व पुराणग्रंथ वेदविरुद्ध आहेत ते खोटे आहेत. त्यामध्ये सांगितलेली मूर्तिपूजाही अधर्मरूप आहे. माणसांचे ज्ञान जडाची पूजा केल्याने वाढत नाही. किंबहुना जे काही ज्ञान असते तेही जड पूजनाने नष्ट होऊन जाते. ज्ञानी लोकांची सेवा व सत्संग केल्याने ज्ञान वाढते. पाषाणादिकांच्या मूर्तीची सेवा करून ते वाढत नाही. मूर्तिपूजेने परमेश्वराचे ध्यान करणे सुलभ होते काय ? मुळीच नाही. मूर्तिपूजा ही पायरी नसून एक मोठी दरी आहे. माणूस त्यात पडला की, त्याचा चक्काचूर होतो. तो त्यातून बाहेर पडू शकत नाही, त्यातच मरून जातो. लहान धार्मिक पंडितांपासून मोठ्या विद्वान योग्यापर्यंत लोकांच्या सत्संगाने सद्‌विद्या व सत्यभाषण इत्यादी परमेश्वर प्राप्तीच्या पायऱ्या आहेत. जशा घराच्या वरच्या मजल्यावर जाण्यासाठी शिडीचा उपयोग होतो (तसा या पायऱ्यांचा ज्ञान मिळविण्यास माणसाला उपयोग होतो.) परंतु मूर्तिपूजा करता करता कोणी ज्ञानी तर झाला नाही. परंतु सारे मूर्तिपूजक अज्ञानी राहून, मनुष्यजन्म व्यर्थ घालवून मरून गेले आणि जे उरले आहेत व यापुढे असतील तेही मनुष्यजन्म फुकट घालवून धर्म, अर्थ, काम व मोक्षच्या प्राप्तीपासून मिळणाऱ्या फळांना मुकतील व निष्कारण नष्ट होतील. मूर्तिपूजा ही ब्रह्माच्या प्राप्तीतील स्थूल लक्ष्यासारखी नाही. परंतु धार्मिक विद्वान व सृष्टिविद्या या गोष्टी आहेत. त्यामुळे ज्ञान वाढवीत वाढवीत माणूस ब्रह्माला जाणू शकतो. मूर्तिपूजा ही बाहुल्यांच्या खेळासारखी नाही. त्याऐवजी प्रथम अक्षरओळख करून घेऊन मग चांगला विद्याभ्यास करणे हे बाहुल्यांच्या खेळासारखे ब्रह्माच्या प्राप्तीचे साधन आहे. लक्षात ठेवा. जो कोणी उत्तम विद्या व शिक्षण मिळवील त्याला खरा स्वामी परमात्माही प्राप्त होईल.

## मूर्तिपूजेचे १६ दोष

**(प्रश्न)** सकारावर मन स्थिर होते तसे ते निराकावर स्थिर होणे कठिण आहे. म्हणून मूर्तिपूजा आवश्यक आहे.

**(उत्तर)** (१) साकारावर मन कधीही स्थिर होऊ शकत नाही. कारण मन मूर्तीचे ग्रहण चटकन करते आणि मग तिच्या एकेका अवयवावर ते फिरत राहते आणि निराकार अनंत परमात्म्याचे ग्रहण करताना मन त्याच्या सामर्थ्यानुसार खूप धावपळ करते परंतु त्याला त्याचा अंत लागत नाही. निरवयव असल्यामुळे मन चंचल राहत नाही. उलट परमेश्वराच्या गुण, कर्म, स्वभावाचा विचार करता करता ते आनंदात मग्न होऊन स्थिर होते आणि जर साकारावर मन स्थिर होऊ शकले असते तर जगातील सगळ्या माणसांची मने स्थिर झाली असती. कारण या जगात माणूस आपली पत्नी, मुलगा, धन, मित्र इत्यादी साकारांमध्ये सदैव गुंतलेला असतो. परंतु कोणाचेही मन स्थिर होत नाही जोपर्यंत निराकारामध्ये मन गुंतविले जात नाही. म्हणून मूर्तिपूजा करणे हा अधर्म आहे.

(२) मंदिर बांधण्यात कोट्यवधी रुपये खर्च करून माणसे दरिद्री बनतात. शिवाय त्यात अनेक घोटाळेही होतात.

(३) देवळांमध्ये स्त्री पुरुषांची गर्दी होत असल्याने तेथे व्यभिचार, भांडणतंटे व रोगराई वगैरे वाईट गोष्टी घडतात.

(४) मूर्तिपूजा हेच धर्म, अर्थ, काम व मुक्ती यांचे साधन आहे असे मानल्यामुळे माणूस पुरुषार्थहीन बनतो आणि मनुष्यजन्म वाया घालवितो.

(५) मूर्तिपूजेमुळे नाना प्रकारची नावे व चरित्रे असणाऱ्या मूर्ती परस्परविरोधी प्रचारात येतात आणि त्यांच्या पुजाऱ्यांमधील एकमत नाहीसे होऊन त्यांच्यात वैमनस्य निर्माण होते. आपसातील या फाटाफुटीमुळे देशाचा नाश होतो.

(६) मूर्तिपूजक लोक मूर्तीच्या भरवशावर शत्रूचा पराजय व आपला जय होईल असे समजून स्वस्थ बसतात. म्हणून त्यांचा पराजय होऊन त्यांचे राज्य, स्वातंत्र्य, धनाचे सुख शत्रूच्या ताब्यात जाते. मग ते पराधीन होऊन भटारखान्याच्या तट्टाप्रमाणे किंवा कुंभाराच्या गाढवाप्रमाणे शत्रूंचे गुलाम बनून नाना प्रकारची दुःखे भोगतात.

(७) जर कोणी एखाद्याला असे म्हटले की, ''तुझ्या बसण्याच्या जागी किंवा नावावर मी दगड ठेवतो.'' तर तो माणूस क्रुद्ध होऊन त्याला मारील किंवा शिव्या देईल. त्याचप्रमाणे परमेश्वराच्या उपासनेचे स्थान असणारे हृदय व त्याचे नावावर यांच्या जागी पाषाणादिकांच्या मूर्ती स्थापन केल्या तर त्या दुष्टबुद्धीच्या लोकांचा सत्यानाश परमेश्वराने का करू नये ?

(८) भ्रामक कल्पनांच्या आहारी जाऊन मूर्तिपूजक लोक वेगवेगळ्या देवळांना भेटी देण्यासाठी देशदेशांतरी हिंडत फिरतात; आणि दुःख भोगतात. धर्म, संसार, व परमार्थाचे काम नष्ट करतात. त्यांना चोर-दरोडेखोर आणि लबाड लोक फसवून लुबाडतात.

(९) मूर्तिपूजक लोक दुष्ट पुजाऱ्यांना जे धन देतात त्याचा उपयोग ते पुजारी, वेश्यागमन, परस्त्रीगमन, मद्यपान, मांसाहार, तंटेबखेडे यात खर्च करतात. त्यामुळे धन देणाऱ्याचे सुख मूळ नाहीसे होऊन त्याला दुःख होते.

(१०) हे लोक माता, पिता वगैरे आदरणीय व्यक्तींचा अपमान करून पाषाणादिकांच्या मूर्तीचा सन्मान करतात. अशा प्रकारे ते कृतघ्न होतात.

(११) जेव्हा कोणी त्यांच्या मूर्ती फोडतात किंवा चोरून नेतात तेव्हा ते हाय हाय करीत रडत बसतात.

(१२) पुजारी परस्त्रीगमन आणि पुजारिणी परपुरुषगमन करतात. त्यामुळे दोघेही स्त्रीपुरुषांच्या वैवाहिक प्रेमाच्या आनंदाला मुकतात.

(१३) स्वामीच्या आज्ञेचे पालन सेवक यथावत करीत नाहीत. त्यामुळे त्यांच्यात विरोधभाव निर्माण होऊन नष्ट भ्रष्ट होतात.

(१४) जडाचे ध्यान करणाऱ्याचा आत्माही जड बुद्धीचा होतो. कारण ध्येयाचा जडत्व हा धर्म अंतःकरणाद्वारे आत्म्यामध्ये नक्कीच येतो.

(१५) परमेश्वराने सुगंधी फुले वगैरे गोष्टी हवा व पाणी यांचा दुर्गंध नाहीसा होऊन वातावरण आरोग्य संपन्न व्हावे यासाठी निर्माण केल्या आहेत. त्या फुलांचा सुगंध वातावरणात पसरून दीर्घ काळपर्यंत हवा व पाणी शुद्ध करतो. ती फुले झाडांवर राहिली तर त्यांचा संपूर्ण सुगंध अनेक दिवस दरवळत राहतो. परंतु पुजारी

लोक ही फुले मध्येच तोडून त्यांचा नाश करतात. फुले गाऱ्यात पडून सडतात व दुर्गंध उत्पन्न करतात. काय परमेश्वराने दगडांवर वाहण्यासाठी फुलांसारख्या सुगंधी गोष्टी निर्माण केल्या आहेत?

(१६) दगडावर वाहिलेली फुले, गंध, अक्षता वगैरे पाण्यात व मातीत पडून, मोरीत अथवा कुंडात राहिल्याने कुजतात. त्यांचा तो दुर्गंध वातावरणात पसरतो तो माणसाच्या विष्ठेच्या घाणीसारखा असतो आणि त्यात हजारो किडे पडतात व मरतात.

अशा प्रकारे मूर्तिपूजा करण्यात अनेक दोष येतात. म्हणून पाषाणादिंच्या मूर्तींची पूजा सज्जनांना त्याज्य आहे. ज्या लोकांनी पाषाणमय मूर्तींची पूजा केली, जे करीत आहेत आणि पुढे करतील ते वर सांगितलेल्या दोषांपासून वाचले नाहीत, वाचत नाहीत व वाचणार नाहीत.

## पंचायतन पूजा समीक्षा

**(प्रश्न)** कोणत्याही प्रकारची मूर्तीपूजा करू नये अथवा करवू नये. परंतु आपल्या आर्यावर्त्तात प्राचीन काळापासून पंचदेवपूजा हा शब्द परंपरेने चालत आलेला आहे. या पंचायतनामध्ये शिव, विष्णू, अंबिका, गणेश व सूर्य यांच्या मूर्ती पूजिल्या जातात. ही पंचायतन पूजा आहे की नाही?

**(उत्तर)** कोणत्याही प्रकारची मूर्तिपूजा करू नये. परंतु जे सजीव आहेत त्यांची पूजा, सत्कार करणे. पंचदेवपूजा किंवा पंचायतनपूजा हा या शब्द चांगल्या अर्थाचा आहे. परंतु विद्याविहीन निर्बुद्ध लोकांनी त्याचा उत्कृष्ट अर्थ सोडून निकृष्ट अर्थ ग्रहण केला आहे. आजकाल शिव वगैरे पाच मूर्तींची जी पूजा केली जाते तिचे खंडन आम्ही वर केलेच आहे. परंतु जी खरी वेदोक्त व वेदानुकूल अशी पंचायतनाची देवपूजा व मूर्तिपूजा आहे ती ऐका :

**मा नो॑ वधीः पि॒तरं॒ मोत मा॒तर॑म् ॥१॥** यजु. अ. १६ मं. १५

**आ॒चा॒र्यऽउप॒नय॑मानो ब्र॒ह्म॒चा॒रिण॑मिच्छते ॥२॥** अथर्व. कां. ११ सू. ५ मं. १७

**अति॑थिर्गृ॒हानु॒पग॑च्छेत् ॥३॥** अथर्व. कां. १३ सू. ५ मं. ११

**अर्च॑त॒ प्रार्च॑त॒ प्रिय॑मेधासो अर्च॑त ॥४॥** ऋ. मं. ८ सू. ६९ मं. ९

**त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥५॥** तैत्ति. व. १ अनु. १

**कतम एको देव इति स ब्रह्म त्यदित्याचक्षते ॥६॥** शतपथ. प्रपा. ५ ब्रा. ७ कं. १०

**मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव, अतिथिदेवो भव ॥७॥** तैत्तिरीयोप. व. १ अनु. १

**पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा।**
**पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः ॥८॥** मनु. अ. ३ श्लो. ५५

**पूज्यो (हि) देववत्पतिः ॥९॥** मनु. अ. ५ श्लो. १४४

पहिली मूर्तिमती, पूजनीया देवता माता आहे. सर्व मुला-मुलींनी तन-मन-धनाने मातेची सेवा करून तिला प्रसन्न ठेवावे. दुसरा देव पिता आहे. मातेप्रमाणे त्याचीही सेवा करावी. ॥१॥ तिसरा देव आचार्य विद्यादाता आहे. त्याची तन-मन-धनाने सेवा करावी. ॥२॥ चौथा देव अतिथी. जो विद्वान, धार्मिक, निष्कपटी, सर्वांचे कल्याण इच्छिणारा, जगभर भ्रमण करणारा, सत्याच्या उपदेशाने सर्वांना सुखी करणाऱ्या अतिथींची सेवा करावी. ॥३॥ पाचवा देव पत्नीसाठी पती व पतीसाठी पत्नी पूजनीय होय. ॥४॥ हेच ते पाच मूर्तीमान देव

ज्यांच्या संगाने मनुष्यदेहाची उत्पत्ति, पालन, सत्य शिक्षण, विद्या व सत्योपदेश यांची प्राप्ती होते. याच परमेश्वर प्राप्तीच्या पायऱ्या आहेत. या दैवतांची सेवा न करता जे लोक पाषाणदिकांच्या मूर्तीची पूजा करतात ते अत्यंत वेदविरोधी आहेत.

## मूर्तिपूजेचे अंधविश्वास

**(प्रश्न)** माता, पिता इत्यादींची सेवा करून मूर्तिपूजाही केली तर त्यात काही दोष नाही ना ?

**(उत्तर)** पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा पूर्णपणे सोडणे व माता, पिता इत्यादी मूर्तिमंत देवांची सेवा करणे यातच कल्याण आहे. माता, पिता वगैरे प्रत्यक्ष सुख देणाऱ्या देवांना सोडून पाषाणादी अदेवांसमोर लोक डोके आपटतात ही केवढी अनर्थकारक गोष्ट आहे ! माता, पिता इत्यादी देवांसमोर नैवेद्य ठेवला तर ते तो स्वत: खाऊन टाकतील आणि भेटवस्तू, पूजा वगैरे ग्रहण करतील; मग आपल्या तोंडात किंवा हातात काहीच पडणार नाही, म्हणून पाषाणादिकांच्या मूर्ती बनविल्या, त्यांच्यासमोर नैवेद्य ठेवून ठण ठण घंटानाद करावा, पूं पूं असा शंख वाजवावा, सावळा गोंधळ माजवावा, देवाला अंगठा दाखवून 'त्वं अंगुष्ठं गृहाण, भोजन पदार्थं वा अहं ग्रहीष्यामि' असे म्हणून एखाद्याला फसवावे किंवा चिडवावे की, 'तू घंटा घे' आणि त्याला अंगठा दाखवून त्याच्या समोरचे सगळे पदार्थ आपणच उपभोगावेत तशीच ही पूजा नावाच्या सत्कर्माच्या शत्रूंची म्हणजे पुजाऱ्यांचा खेळ आहे. हे ठग लोक मूर्तीला भपकेबाज कपडे व झगमगीत दागिने घालून सजवितात आणि बिचाऱ्या निर्बुद्ध व भोळ्याभाबड्या लोकांना लुटून त्यांच्या पैशावर स्वत: चैन करतात. एखादा धार्मिक राजा असता तर त्याने या पाषाणप्रिय लोकांना दगड फोडणे, घरे बांधणे यांसारखी कामे करायला लावून त्यांच्या उदरनिर्वाहाची सोय केली असती.

**(प्रश्न)** ज्याप्रमाणे स्त्रीची पाषाणदिकांची मूर्ती पाहून मनात कामविकार उत्पन्न होतात त्याप्रमाणे वीतराग, शांत भाव असलेली मूर्ती पाहून मनात वैराग्याची भावना निर्माण होऊन शांती का मिळणार नाही ?

**(उत्तर)** नाही ! तसे होऊ शकत नाही. कारण त्या मूर्तीचा जडत्व धर्म आत्म्यामध्ये आल्याने विचारशक्ती कमी होऊ लागते. विवेकावाचून वैराग्य नाही, वैराग्यावाचून विज्ञान नाही आणि विज्ञानावाचून शांती नाही. शिवाय जो काही लाभ मिळतो तो विद्वानांचा सत्संग, उपदेश व त्यांच्या इतिहासाचे ज्ञान यांपासून मिळत असतो. कारण एखाद्या व्यक्तीचे गुण अथवा दोष माहीत नसताना केवळ तिची मूर्ती पाहून तिच्याविषयी प्रेम निर्माण होत नसते. प्रेम निर्माण होण्याचे कारण सद्गुण ज्ञान आहे.

मूर्तीपूजेसारख्या वाईट गोष्टीमुळेच या आर्यावर्त्तात निकामी पुजारी, आळशी भिक्षुक आणि कोट्यावधी पुरुषार्थहीन लोक निर्माण झाले आहेत. यांनीच जगामध्ये मूढता पसरविली, असत्य व फसवाफसवी यांचा विस्तार झाला आहे.

**(प्रश्न)** पाहा ! काशीमध्ये औरंगजेब बादशहाला लाटभैरव (काळभैरव) वगैरे देवांनी मोठमोठे चमत्कार करून दाखविले. जेव्हा मुसलमानांनी मंदिर उद्ध्वस्त करण्यासाठी त्यावर तोफा डागल्या. तेव्हा मोठमोठ्या गांधील माशांनी हजारोंच्या संख्येने सैन्यावर हल्ला केला व त्याला पळवून लावले.

**(उत्तर)** हा काही दगडाच्या मूर्तीचा चमत्कार नव्हता. तेथे गांधील माशांची पोळी असणार. या माशा

भयंकर क्रूर असतात. जेव्हा त्यांना कोणी त्रास देतात तेव्हा त्या त्यांच्यावर हल्ला करून कडकडून चावतात. मूर्तीतून दुधाची धारा निघाल्याचा जो चमत्कार सांगितला जातो तीही पुजाऱ्याची हातचलाखी होती.

**(प्रश्न)** पाहा! म्लेच्छांच्या दृष्टीस पडावयाचे नाही म्हणून महादेव ज्ञानवापीत दडून बसले आणि वेणीमाधव एका ब्राह्मणाच्या घरात जाऊन लपले. हाही चमत्कार नाही काय?

**(उत्तर)** महादेवाजवळ कालभैरव, लाटभैरव यासारखी भूतप्रेते कोटपाल होती, गरुडासारखे गण होते. त्यांनी मुसलमानांशी लढून त्यांना का परतवून लावले नाही? महादेव आणि विष्णू यांनी त्रिपुरासुरासारख्या मोठ्या व भयंकर दुष्टांना जाळून भस्म केले अशा कथा पुराणात आहेत, मग त्यांनी मुसलमानांना का भस्म करून टाकले नाही? यावरून हेच सिद्ध होते की बिचाऱ्या दगडांमध्ये लढणे, लढविण्याचे सामर्थ्य नसते. जेव्हा मुसलमान मंदिरांचा व मूर्तींचा विध्वंस करीत काशीजवळ आले तेव्हा पुजाऱ्यांनी विश्वनाथाचे पाषाण लिंग विहिरीत टाकून दिले आणि वेणीमाधवला एका ब्राह्मणाच्या घरात लपवून ठेवले. जर काशीमध्ये कालभैरवाच्या भीतीने यमदूत येत नाहीत व प्रलयाच्यावेळी देखील कालभैरव काशीचा नाश होऊ देत नाही, ही गोष्ट खरी असेल तर मग त्याने म्लेच्छांच्या दूतांना भयभीत करून पळवून का लावले नाही? आणि त्याने आपल्या राजाच्या मंदिराचा नाश का होऊ दिला? ही सारी पोपमाया लीला आहे.

## गया श्राद्ध समीक्षा

**(प्रश्न)** गयेला जाऊन श्राद्ध केल्याने पितरांचे पाप नष्ट होते आणि तेथील श्राद्धाच्या पुण्यप्रभावाने पितर स्वर्गाला जातात, तसेच पितर आपला हात बाहेर काढून पिंड घेतात. ही गोष्टही खोटी आहे काय?

**(उत्तर)** पूर्णपणे खोटी आहे! तेथे पिंड देण्याचा एवढा प्रभाव पडत असेल तर ज्या पंड्यांना पितरांच्या सुखासाठी लोक जे लाखो रुपये देतात ते पैसे हे गयाचे राहणारे पंडे लोक वेश्यागमनादी पापात खर्च करतात. ही त्यांची पापे का नष्ट होत नाहीत? पितरांचे हात बाहेर येत असलेले आजकाल दिसत नाहीत. केवळ पंड्यांचेच हात दिसतात. कधीतरी एखाद्या लबाड इसमाने जमिनीत खड्डा खणून त्यात एका माणसाला बसविले असावे. त्याच्या डोकीवर काही तरी पांघरून घालून तेथे पिंड ठेवला असावा आणि त्या धूर्त माणसाने तो पिंड उचलून घेतला असावा. निर्बुद्ध माणसांना पंड्यांनी याप्रकारे फसविले असल्यास आश्चर्य ते कसले? याचप्रमाणे रावणाने वैजनाथ शिवलिंग आणल्याची कथाही साफ खोटी आहे.

**(प्रश्न)** अहो! कलकत्याची काली, कामाक्षा वगैरे देवींना लाखो लोक भजतात. हा चमत्कार नाही काय?

**(उत्तर)** मुळीच नाही. ते ज्ञानांध लोक मेंढराप्रमाणे एका मागून दुसरा असे जातात. हे लोक अखेर खड्ड्यात पडतात. ते स्वतःला वाचवू शकत नाहीत. त्याचप्रमाणे एका मूर्खाच्या मागून दुसरा जातो आणि मूर्तिपूजारूपी खड्ड्यात पडून दुःख भोगतात.

## जगन्नाथ तीर्थाची समीक्षा

**(प्रश्न)** बरे, हे तर जाऊ द्या. परंतु जगन्नाथाच्या मंदिरात तर प्रत्यक्षात चमत्कार आहे. जेव्हा जगन्नाथाचे शरीर बदलण्याची वेळ येते तेव्हा चंदनाचा मोठा ओंडका समुद्रातून आपोआप वाहत येतो. मंदिरातील चुलीवर एकावर एक असे सात हंडे ठेवले जातात. त्यापैकी वरच्या हंड्यातील भात आधी शिजतो. तसेच तेथे जर कोणी

जगन्नाथाचा प्रसाद खाल्ला नाही तर त्याला महारोग होतो, जगन्नाथाचा रथ आपोआप चालतो, आणि पापी लोकांना तो दर्शन देत नाही. इंद्रदमनाच्या कारकीर्दीत देवांनी ते मंदिर बांधले आहे. देवाचे शरीर (कलेवर) बदलण्याच्या वेळी एक राजा, एक पंडा व एक सुतार मरतो. हे सारे चमत्कार तुम्ही खोटे सिद्ध करू शकणार नाही?

**(उत्तर)** ज्याने बारा वर्षे जगन्नाथाची पूजा केली होती असा एक माणूस विरक्त होऊन मथुरेला आला होता, तो मला भेटला होता, मी त्याला विचारले होते. तेव्हा त्याने ते सगळे खोटे असल्याचे मला सांगितले होते. परंतु विचारांती हा निर्णय आहे की, जेव्हा कलेवर बदलण्याची वेळ येते तेव्हा चंदनाचा ओंडका नौकेत घालून तो समुद्रात टाकला जातो. तो समुद्राच्या लाटांवरून वाहत वाहत किनाऱ्याला लागतो. त्याला घेऊन सुतार मूर्ती बनवितात. जेव्हा प्रसादाचे अन्न शिजविले जाते तेव्हा सगळी दारे बंद करून घेतात आणि आचाऱ्यांखेरीज इतर कोणाला तेथे जाऊ देत नाहीत किंवा पाहू देत नाहीत. जमिनीवर चारी बाजूंना सहा व मधोमध एक अशा चक्राकार चुली बनवितात. त्या हंड्यांच्या बुडाला तूप, माती व राख लावून व आत तांदूळ घालून शिजवितात. मग ते चुलीवरून उतरून त्यांची बुडे स्वच्छ करतात. त्याच वेळी मधल्या चुलीवरील भांड्यात तांदूळ घालतात. सभोवतालच्या सहा चुलींवर लोखंडाचे मोठे तवे ठेवून त्यांची तोंडे बंद करतात. नंतर इतर सहा हंडे मध्यभागी असलेल्या चुलीवरील हंड्यावर रचून ठेवतात आणि श्रीमंत भक्तांना तो चमत्कार पाहण्यासाठी आत बोलावतात. सर्वात खालच्या हंड्यामध्ये नुकतेच टाकलेले तांदूळ कच्चे असतात. तर वरच्या हंड्यांतील तांदूळ शिजून त्यांचा भात झालेला असतो. ती गोष्ट चमत्कार म्हणून लोकांना दाखविली जाते आणि त्यांना असे सांगितले जाते की या हंड्यांसमोर काही ठेवा. तो चमत्कार पाहून मठ्ठ बुद्धीचे श्रीमंत लोक तेथे रुपये किंवा मोहरा ठेवतात आणि काही लोक दरमहा अमुक रक्कम देण्याचे कबूल करतात.

शूद्र नीच लोक मंदिरात नैवेद्य घेऊन जातात. नैवेद्य दाखविल्यानंतर ते त्यातील थोडासा भाग काढून खातात. अशा प्रकारे उरलेला उष्टा नैवेद्य जो कोणी पैसे देईल त्याच्या घरी ती हंडी नेऊन पोचवितात. नंतर दीन-दरिद्र गृहस्थ व साधुसंतांपासून शूद्र व अंत्यजांपर्यंत एका पंगतीत बसून उष्टे एकमेकांनी केलेले अन्न ते खातात. एक पंगत जेवून उठली की त्याच उष्ट्या पानांवर इतरांना जेवायला वाढतात. असा महा अनाचार तेथे चालतो. पुष्कळ लोक तेथे जाऊन आपल्या स्वतःच्या हातांनी शिजविलेले अन्न खातात. तरीही त्यांना कुष्ठरोग वगैरे आजार होत नाहीत. तसेच खुद्द जगन्नाथपुरीतही असंख्य लोक देवाचा प्रसाद खात नाहीत. त्यांनाही महारोग वगैरे होत नाहीत. याउलट त्याच जगन्नाथपुरीत अनेक महारोगी आहेत. ते दररोज उष्टा प्रसाद खातात. तरीही त्यांचा रोग नाहीसा होत नाही.

या जगन्नाथाच्या मंदिरात वाममार्गी लोकांनी भैरवी चक्र बनविले आहे. वस्तुतः सुभद्रा ही श्रीकृष्ण व बलराम यांची बहीण आहे. परंतु तिला त्यांनी दोन भावांच्या मध्ये पत्नीच्या व मातेच्या जागी स्थापिले आहे. शाक्तांचे भैरवीचक्र नसते तर हा अभद्र प्रकार झाला नसता.

(चौथ्या चमत्काराच्या बाबतीत सांगायचे तर) जगन्नाथाच्या रथाच्या चाकामध्ये एक विशिष्ट प्रकारची कळ (यंत्र) बसविली असते. ती कळ सुलटी फिरविली की रथ चालू लागतो. जेव्हा तो जमावाच्या मध्यभागी जाऊन पोचतो तेव्हा कळ उलटी फिरविली की तो उभा राहतो. जागचा हालत नाही. मग पुजारी ओरडून

सांगतात की, ''भक्त जनानो! दान द्या. पुण्य करा. त्याने जगन्नाथ प्रसन्न होऊन आपला रथ चालू करील, आपल्या धर्माचे रक्षण होईल.'' लोकांकडून दक्षिणा मिळत राहते तोपर्यंत ते असाच पुकारा करीत राहतात. भरपूर पैसा गोळा झाल्यानंतर एक व्रजवासी पुजारी अंगावर उत्तम कपडे घालून व शाल पांघरून रथासमोर उभा राहतो आणि हात जोडून प्रार्थना करतो की, ''हे जगन्नाथ स्वामी ! कृपा करून रथ पुढे जाऊ द्या आणि आमच्या धर्माचे रक्षण करा.'' अशा प्रकारची प्रार्थना करून तो साष्टांग नमस्कार घालतो व रथावर चढतो. मग पुजारी ती कळ सुलटी फिरवितात आणि जगन्नाथाचा जयजयकार करीत हजारो माणसे रथाचा दोर ओढतात. रथ चालू लागतो.

जगन्नाथाचे देऊळ इतके मोठे आहे की, त्याच्या आतील भागात दिवसा देखील अंधार असतो. त्यामुळे दिवे लावावे लागतात. मूर्तीसमोर दोन्ही बाजूंना ओढून सरकणारे पडदे असतात. पंडे, पुजारी पडद्यांच्या आत उभे असतात. ते चटकन एका बाजूचा पडदा ओढतात. त्याबरोबर मूर्ती दिसेनाशी होते. तेव्हा सारे पंडे मोठ्याने ओरडतात की, ''देवासमोर दान-दक्षिणा ठेवा म्हणजे तुमची पापे नष्ट होतील आणि तुम्हाला देवाचे दर्शन होईल. त्वरा करा.'' बिचारे भोळे भक्त त्या लबाड पुजाऱ्यांकडून लुटले जातात. त्याबरोबर पुजारी दुसरा पडदा बाजूला सारतात आणि मग देवाचे दर्शन होते. तेव्हा जगन्नाथाचा प्रसन्नतेने जयजयकार करीत धक्के खात, तिरस्कृत होऊन बाहेर पडतात.

ज्या इंद्रदमन राजाचा उल्लेख तुम्ही केला त्याचे वंशज आजही कलकत्त्यात राहतात. तो राजा धनाढ्य व देवीचा उपासक होता. त्याने लक्षावधी रुपये खर्चून हे देऊळ यासाठी बांधले की या पद्धतीने आर्यावर्तातील भोजन समस्या सुटावी आणि कुणीही शिवाशिवी मानू नये. परंतु मूर्ख लोक हे केव्हा सोडतील ? ज्या कारागिरांनी व शिल्पकारांनी हे मंदिर उभारले त्यांनाच देव मानावे.

देवाचे कलेवर बदलण्याच्या वेळी राजा, पंडा व सुतार मरत नाहीत. उलट त्यावेळी ते तीघेही प्रमुख हजर असतात. ते खालच्या लोकांना फार त्रास देत असावेत आणि त्यांच्या छळाला ते कंटाळले असावेत. खालच्या लोकांनी कलेवर बदलण्याच्या वेळी विचार सम्मत करून ते तिघे या समारंभाच्या वेळी प्रत्यक्ष हजर राहत त्यावेळी मूर्तीचे हृदय पोकळ ठेवण्यात आले. त्यामध्ये सोन्याच्या गिलाव्याचा एक शाळिग्राम ठेवला. त्यास धुवून चरणामृत तयार करतात. रात्रीच्या शयन आरतीच्या वेळी खालच्या लोकांनी त्या शाळिग्रामाला विषाचे तेजाब फासून ठेवले असेल आणि सकाळी शालीग्रामास आंघोळ घालून त्याचे चरणोदक त्या तिघांना प्यायला दिले असेल. ते पिऊन ते तिघे मेले असतील. मग त्या भोजन भाऊंनी असे प्रसिद्ध केले असावे की जगन्नाथ आपले शरीर बदलण्याच्या वेळी आपल्या त्या तीन भक्तांना आपल्या बरोबर घेऊन गेला !

दुसऱ्यांचे धन लुबाडण्यासाठी अशा अफवा नेहमीच पसरविल्या जातात.

## रामेश्वर समीक्षा

**(प्रश्न)** गंगोत्रीचे पाणी रामेश्वरावर घातल्यावर ते लिंग वाढते, ही गोष्टही खोटी आहे काय ?

**(उत्तर)** होय ! साफ खोटी आहे. कारण त्या मंदिरातही दिवसा अंधार असतो. त्यामुळे रात्रंदिवस तेथे दिवे जळत असतात. जेव्हा त्या शिवलिंगावर पाण्याची धार धरतात तेव्हा त्या पाण्यात विजेसारखे दिव्याचे प्रतिबिंब

चमकते एवढेच, इतर काही घडत नाही. पाषाण हा वाढतही नाही अथवा घटतही नाही. जेवढा असतो तेवढाच राहतो. अशी लीला करून पुजारी लोक मात्र अडाणी भक्तांना लुबाडतात.

**(प्रश्न)** श्रीरामचंद्राने रामेश्वराची स्थापना केली. मूर्तिपूजा वेदविरुद्ध असती तर रामाने शिवलिंगाची स्थापना कशाला केली असती? आणि वाल्मीक ऋषींनी रामायणात कशाला लिहिले असते ?

**(उत्तर)** श्रीरामचंद्राच्या काळी रामेश्वराचे लिंग अथवा त्यावरील देऊळ यांचे नावनिशाणही नव्हते. परंतु हे खरे की दक्षिणेतील राम नावाच्या एका राजाने तेथे शिवमंदिर बांधले आणि त्या शिवलिंगाचे नाव रामेश्वर ठेवले. जेव्हा श्रीरामचंद्र सीतेला घेऊन हनुमानादिसह श्रीलंकेहून आकाशमार्गाने अयोध्येला यायला निघाले तेव्हा विमानामध्ये ते सीतेला म्हणाले,

**अत्र पूर्वं महादेव:प्रसादमकरोद्विभुः । सेतुबन्ध इति विख्यातम् ।।**

वाल्मीकी रा. लंका कां. (सर्ग १२३ श्लो. २२,२१)

"हे सीते ! तुझ्या वियोगाने व्याकूळ होऊन मी भटकत असता याच ठिकाणी चातुर्मास केला होता. त्यावेळी मी परमेश्वराचे ध्यान व उपासना करीत असे. जो सर्वत्र विभू. (व्यापक), देवांचा देव, महादेव, परमात्मा आहे त्या परमेश्वराच्या कृपेने आम्हाला या ठिकाणी सर्व सामग्री प्राप्त झाली आणि तो सेतू पाहा. तो आम्ही बांधून लंकेत प्रवेश केला आणि रावणाचा वध करून तुला परत आणले." याखेरीज वाल्मीकींनी तेथे दुसरे काहीही लिहिले नाही.

## कालियाकन्त सोमनाथ समीक्षा

**(प्रश्न) रङ्ग है कालियाकन्तको । जिसने हुक्का पिलाया सन्त को ।**

दक्षिण भारतात कालियाकंताची एक मूर्ती आहे. ती अजूनही हुक्का पीत असते. मूर्तिपूजा खोटी असेल तर हा चमत्कारही खोटा होईल.

**(उत्तर)** तो साफ खोटा आहे. ती सारी पुजाऱ्यांची पापलीला आहे. कारण की प्रत्यक्षात त्या मूर्तीचे तोंड पोकळ असणार. त्या तोंडात एक नळी बसवून मूर्तीच्या मागे असणाऱ्या भिंतीला छिद्र पाडून ती दुसऱ्या खोलीत नेलेली असणार. जेव्हा पुजारी हुक्का भरून, त्याला नळी जोडून तेथे बसलेला इसम नळी तोंडात धरून हुक्का ओढीत असणार. त्याबरोबर हुक्क्यातून गुडगुड असा आवाज येत असणार. दुसरे छिद्र नाक व मुखाबरोबर लावले असेल त्यामुळे मागे बसलेला माणूस हुक्का ओढू लागला की, नाका-तोंडातून धूर बाहेर येत असणार. तो चमत्कार दाखवून मूर्ख भक्तांकडून पुजारी पैसे उकळत असणार व त्यांना धनरहित करीत असणार.

**(प्रश्न)** बरे ! द्वारकेतील डाकोरजीची (कृष्णाची) मूर्ती भक्ताबरोबर तेथपर्यंत चालत गेली. कित्येक मणाची ती मूर्ती एक-सव्वा रत्ती सोन्याच्या बरोबर तोलली गेली. हाही चमत्कार नाही काय ?

**(उत्तर)** मुळीच नाही. त्या भक्ताने ती मूर्ती चोरून आणली असणार. त्या मूर्तीची सव्वा रत्ती सोन्याने तुला करण्याची थाप भांग पिणाऱ्या माणसाने ठोकली असेल.

**(प्रश्न)** बरे सोमनाथ अधांतरी राहत असे, हा तरी चमत्कार होता की नाही? का तीही गोष्ट खोटी आहे?

**(उत्तर)** होय ! ती गोष्टही खोटीच आहे. त्या मूर्तीच्या वर-खाली लोहचुंबक पाषाण लावून ठेवला होता.

त्यामुळे ती मूर्ती आकर्षणाने अधांतरी राही. जेव्हा गझनीच्या मुहम्मदाने येऊन मंदिरावर हल्ला केला तेव्हा मात्र चमत्कार घडला. तो असा की, मुहम्मदाने मंदिर फोडून त्याचा विध्वंस केला आणि पुजाऱ्यांची दुर्दशा झाली. दहा हजार मुस्लिम सैनिकांनी हिंदूच्या लाखो सैनिकांचा धुव्वा उडविला. त्यावेळी सोमनाथाचे पुजारी पूजा, पुरश्चरण स्तुती करून अशी प्रार्थना करीत होते की, ''हे महादेवा ! तू या म्लेंच्छांना मारून आमचे रक्षण कर.'' आणि ते आपले चेले असणाऱ्या राजांना समजावीत होते की, ''महाराज, तुम्ही निश्चिंत राहा. महादेव भैरवाला अथवा वीरभद्राला पाठवून देईल. ते साऱ्या म्लेंच्छांना मारून टाकतील किंवा आंधळे करून टाकतील.'' किंवा ते असे सांगत असतील की, ''आता इतक्यात आमचा देव प्रकट होईल. हनुमान, दुर्गा व भैरव यांनी आम्हांला स्वप्नात येऊन असे सांगितले आहे की, ''आम्ही तुमचे सारे काम करून टाकू.'' बिचारे भोळे राजे आणि क्षत्रिय लोक पुजाऱ्यांच्या या फसव्या आश्वासनावर विश्वास ठेवून गाफील राहिले. कित्येक ज्योतिषांनीही राजांना सांगितले की, ''आता शत्रूवर चढाई करण्याचे मुहूर्त नाही.'' एकाने चंद्र आठवा आहे असे सांगितले तर दुसऱ्याने योगिनी ग्रह समोर उभी असल्याचे सांगीतले. अशा प्रकारे बहकविण्यात ते राहिले. त्यामुळे जेव्हा म्लेंच्छांच्या फौजेने येऊन वेढा घातला तेव्हा पळत सुटले. अनेक पुजारी व त्यांचे चेले पकडले गेले. पुजाऱ्यांनी म्लेंच्छांना हात जोडून म्हटले की, ''तुम्ही तीन कोटी रुपये घ्या मात्र तुम्ही आमचे देऊळ आणि मूर्ती फोडू नका'' मुसलमान म्हणाले की, ''आम्ही बुतपरस्त म्हणजे मूर्तिपूजक नसून बुतशिकन म्हणजे मूर्तिभंजक आहोत.'' त्यांनी तावडतोब मंदिर उद्ध्वस्त करून टाकले. जेव्हा त्यांनी वरचे छत तोडले तेव्हा वरचा लोहचुंबक दूर झाला. त्याबरोबर मूर्ती खाली पडली. म्लेंच्छांनी ती मूर्ती फोडली तेव्हा तिच्यातून अठरा कोटी रुपयांची रत्ने बाहेर पडली असे ऐकले आहे.'' पुजाऱ्यांना फटके मारले ते रडू लागले मग म्लेंच्छांनी कोष खजिना दाखवा असे म्हटले.'' असे म्हणून म्लेंच्छांनी ती सारी संपत्ती लुटली आणि पुजारी व त्यांचे चेले यांना भरपूर मारहाण केली. एवढेच नव्हे तर म्लेंच्छांनी त्यांना गुलाम बनवून त्यांच्याकडून वेठबिगारी करवून घेतली. त्यांना धान्य दळावयास लावले, चारा कापायला लावला, मलमूत्र साफ करायला लावले आणि चणे खायला घातले. अरेरे ! दगडाची पूजा करून असा आपला सत्यानाश का बरे करून घेतला ? त्यांनी परमेश्वराची भक्ती का केली नाही? त्यांनी खऱ्या ईश्वराची भक्ती केली असती तर म्लेंच्छांचा धुव्वा उडवून ते विजयी झाले असते. मूर्तीची पूजा करण्याऐवजी त्यांनी शूर वीरांची पूजा केली असती तर त्यांचे नक्कीच रक्षण झाले असते. पुजाऱ्यांनी या दगडांची इतकी भक्ती केली परंतु त्या मूर्तींपैकी एकही मूर्ती शत्रूच्या मस्तकावर जाऊन आदळली नाही. त्यांनी एखाद्या शूर वीर पुरुषाची मूर्तिसारखी सेवा केली असती तर त्या पुरुषाने आपल्या सेवकांना यथाशक्ती वाचविले असते आणि शत्रूंना मारले असते.

## द्वारका ज्वालामुखी समीक्षा

**(प्रश्न)** द्वारकेच्या रणछोडजीने नरसी मेहताला हुंडी दिली आणि त्याचे कर्ज फेडले, ही गोष्टही खोटीच काय?

**(उत्तर)** एखाद्या सावकाराने रुपये दिले असतील आणि मग कोणी तरी अशी अफवा उठविली असेल की, ते पैसे श्रीकृष्णाने पाठविले होते. जेव्हा संवत् १९१४ (इ.स. १८५७) मध्ये इंग्रजांनी तोफा डागून मंदिरे

व मूर्ती उडवून दिल्या, तेव्हा त्या मूर्ती कुठे गेल्या होत्या ? याउलट बाबेर लोकांनी जेवढे शौर्य दाखविले आणि शत्रूंशी लढून त्यांना ठार मारले किंबहुना त्या मूर्तींना एका माशीचीही तंगडी मोडता आली नाही. तेथे श्रीकृष्णासारखा कोणी असता तर त्याने शत्रूचा धुव्वा उडविला असता आणि ते सैरावैरा पळाले असते. खरी गोष्ट अशी आहे की, ज्यांचा रक्षकच मार खातो त्याला शरण जाणारे का पिटले जाणार नाहीत?

**(प्रश्न)** ज्वालामुखी देवी ही तर प्रत्यक्ष देवता आहे. ती सर्वांना खाऊन टाकते. तिला नैवेद्य दाखविला तर ती त्यातला अर्धा खाते आणि अर्धा ठेवून देते. मुसलमान बादशहांनी तिच्यावर पाण्याचा पाट नेऊन सोडला आणि तिच्या तोंडावर लोखंडाचे तवे ठोकले तरीही ती ज्वाळा विझली नाही, की थांबली नाही. याचप्रमाणे हिंगलाज देवीही मध्यरात्री घोड्यावर बसून डोंगरावरून जाताना दिसते. तिच्यामुळे डोंगराला गर्जना करावयास लावते. तसेच चंद्रकूप ही विहीर बोलते; आणि योनियंत्रातून बाहेर आल्यास पुनर्जन्म घ्यावा लागत नाही. ठुमरा बांधल्यास पूर्ण महापुरुष म्हटला जातो. जोपर्यंत हिंगलाजची यात्रा घडत नाही तोपर्यंत माणूस अर्धा महापुरुषच समजला जातो. या सगळ्या गोष्टी विश्वसनीय नाहीत काय?

**(उत्तर)** मुळीच नाहीत. कारण त्या ज्वालामुखी पर्वतातून आग बाहेर पडते. त्यात पुजाऱ्यांनी विचित्र चलाखी केली आहे. ज्याप्रमाणे फोडणी देण्यासाठी तापविलेल्या पळीत थोडेसे तूप टाकताच त्या पळीतून ज्वाळा निघतात, ती पळी आगीपासून दूर केली किंवा तिच्यावर फुंकर मारली की ती ज्वाळा विझते व तिच्या पळीतील थोडेसे तूप खाऊन टाकते पण बाकीचे शिल्लक उरते. त्याचप्रमाणे तेथेही घडते. जसे चुलीच्या ज्वाळेत जे काही टाकावे ते सारे जळून भस्म होते. जंगलाला किंवा घराला आग लागली असता ती सारे काही जाळून टाकते. याहून वेगळे असे तेथे काय आहे ? हिंगलाजमध्ये एक देऊळ एक कुंड व इकडे-तिकडे काही नळ याखेरीज काहीही नाही. तेथे कोणतीही देवता घोड्यावर बसून येत नाही. तेथे चमत्कार म्हणून जे काही दाखविले जाते ती सारी पुजाऱ्यांची लबाडी असते. दुसरे काही नाही त्यांनी दलदलीमध्ये पाण्याचे एक कुंड बनविले आहे. त्याच्या तळातून बुडबुडे वर येतात. ते पाहून आपली यात्रा सफळ झाली असे मूर्ख लोक समजतात. पुजाऱ्यांनी तेथे जे योनियंत्र बनविले आहे तेही लोकांकडून पैसे उकळण्यासाठीच आहे. ठुमरे बांधण्याचा प्रकार हीही अशीच पुजाऱ्यांची लीला आहे. ठुमरे बांधल्याने जर सामान्य माणसाचा महापुरुष होत असेल तर पशूवर ठुमऱ्याचे ओझे लादल्यास तो महापुरुष बनेल काय ? वस्तुत: महापुरुष तर उत्तम धर्मयुक्त पुरुषार्थाने होतो.

**(प्रश्न)** अमृतसरच्या तलावाचे पाणी अमृतासारखे मधुर आहे. मुरेठी नावाच्या झाडाचे फळ अर्धे गोड व अर्धे कडू असते. गुरुदासपूरला एक भिंत आहे. ती हलविली असता वाकते, परंतु कोसळून पडत नाही. रेवालसर या सरोवरात दगड पाण्यावर तरंगतात. अमरनाथला आपोआप लिंग तयार होते. तेथे हिमालयातून कबुतरांच्या जोड्या येतात आणि सर्वांना दर्शन देऊन परत जातात. या साऱ्या गोष्टी विश्वास ठेवण्यासारख्या नाहीत काय ?

**(उत्तर)** मुळीच नाहीत. त्या तलावाचे केवळ नाव अमृतसर आहे. त्या जागी जेव्हा कधी जंगल असेल तेव्हा त्या तळ्याचे पाणी चांगले असेल. त्यामुळे त्याचे नाव अमृतसर असे ठेवले असावे. ते जर खरोखरीच अमृत असते तर पुराणिकांच्या सांगण्यामध्ये ते पाणी पिणारे सगळेच अमर झाले असते; जी भिंत पडत नाही

असे तुम्ही म्हणता ती अशा युक्तीने बांधलेली असणार की वाकावी पण पडू नये. मुरेठीच्या फळाचा अर्धा भाग गोड व अर्धा भाग कडू असण्याचे कारण त्यावर गोड फळाच्या झाडाचे कलम केलेले असावे; किंवा ती नुसतीच थाप असेल. रेवालसरामध्ये दगड तरतात यामध्ये काहीतरी कल्पक कारागिरी असावी. अमरनाथाला बर्फाचे डोंगर बनतात. तेव्हा तेथे पाणी गोठून लहान लिंग बनत असल्यास त्यात कसले आश्चर्य ? कबुतरांच्या जोड्या पाळलेल्या असून ती डोंगराच्या आडून कोणीतरी सोडत असतील आणि लोकांना तो चमत्कार दाखवून पैसे उकळत असतील.

## हरिद्वार बद्रीनारायण समीक्षा

**(प्रश्न)** हरद्वार हे स्वर्गाचे दार आहे. तेथील हर की पैडी या गंगेच्या घाटावर स्नान केल्यास सारी पापे नष्ट होतात. तेथील तपोवनात राहिल्यास माणूस तपस्वी बनतो. देवप्रयाग, गंगोत्तरीतील गोमुख, उत्तर काशीतील गुप्तकाशी, येथे त्रियुगी नारायणाचे दर्शन होते. केदारनाथ व बद्रीनारायण यांची पूजा सहा महिने माणसे करतात व सहा महिने देव करतात. महादेवाचे मुख नेपाळात पशुपतीच्या रूपात, कुल्ले केदारनाथाच्या रूपात, गुडघे तुंगनाथामध्ये आणि पाय अमरनाथामध्ये आहेत. त्यांचे दर्शन, स्पर्शन व स्नान केल्याने मुक्ती मिळते. केदारनाथ व बद्रीनाथ येथून सरळ स्वर्गात जाता येते. या सगळ्या गोष्टींविषयी तुमचे काय म्हणणे आहे?

**(उत्तर)** हरद्वार हे स्थान हिमालयात जाण्याच्या एका मार्गाचा प्रारंभ आहे. गंगेच्या पात्रात असणाऱ्या कुंडामध्ये स्नान करण्यास जाण्यासाठी ज्या पायऱ्या बांधलेल्या आहेत त्यांना हरकी पैडी असे म्हणतात. खरे म्हणजे त्याचे नाव 'हाडपैडी' असे आहे. कारण देशोदेशीच्या मृत व्यक्तींच्या अस्थी त्या कुंडात आणून टाकल्या जातात. पाप हे कधी असल्या स्नानांनी नष्ट होत नसते. पापांची फळे भोगल्याखेरीज ती नाहीशी होत नाहीत. 'तपोवन' हे कधी काळी तपस्वी लोकांचे निवासस्थान असेलही. परंतु सध्यातरी ते 'भिक्षुकवन' आहे. तपोवनात गेल्याने किंवा तेथे राहिल्याने तप होत नाही. तप हे प्रत्यक्ष केल्यानेच होते. त्या तपोवनातील अनेक दुकानदार खोटे बोलणारेही आहेत.

**'हिमवत: प्रभवति गङ्गा'** गंगा हिमालयातून उगम पावते. गंगोत्री या ठिकाणी डोंगरावरून पाणी खाली पडते. तेथे भक्तांकडून पैसे उकळण्यासाठी पुजाऱ्यांनी गोमुखाचा आकार बनविला असावा, हिमालय हाच पोपांचा स्वर्ग आहे. तेथील उत्तरकाशी वगैरे ठिकाणे ध्यान-धारणा करणाऱ्यांसाठी चांगली आहेत. परंतु दुकानदारांची दुकानदारी तेथेही चालूच असते. देवप्रयाग वगैरे पुराणिकांच्या गप्पा आहेत. अर्थात जेथे अलकनंदा व गंगा यांचा संगम झालेला आहे तेथे देवता निवास करतात अशा अफवा पसरविल्या नाहीत तर तेथे कोण जाईल ? आणि पैसे कोण देईल ? गुप्त काशी ही गुप्त नसून ती तर प्रसिद्ध काशी आहे. तेथे जी धुनी पेटलेली असते ती तीन युगांपासून जळत असल्यासारखी मुळीच दिसत नाही. पुरोहितांच्या दहा-वीस पिढ्यांपासून ती तेथे जळत असावी. गोसाव्यांची धुनी आणि पारशांची अग्यारी जशी सदैव पेटलेली असते तशी ही धुनी जळत असते. तप्तकुंड हे इतर ठिकाणच्या उन्हाळ्यासारखेच आहे. डोंगराच्या पोटात असलेल्या उष्णतेने या कुंडातील पाणी गरम होऊन बाहेर पडते. त्याच्या शेजारी असलेल्या कुंडातील पाणी मात्र थंड आहे. त्याचे पाणी ज्या वाटेने ते येते तेथे उष्णता नाही. केदारनाथाचे स्थान अत्यंत सुंदर व आरोग्यदायक आहे. परंतु तेथेही पुजाऱ्यांनी अथवा त्यांच्या चेल्यांनी एका भक्कम शिळेवर मंदिर उभारले आहे. तेथील पंडे पुजारी श्रीमंत परंतु मद्र लोकांना

फसवून पैसे उकळतात आणि मजेत विलासी जीवन घालवितात. याचप्रमाणे बद्रीनारायणातही लबाड पंड्यांनी आपला अड्डा कायम केला आहे. तेथील मुख्य पुजाऱ्याला 'रावलजी' असे म्हणतात. त्याने एकच नव्हे तर अनेक स्त्रिया ठेवल्या आहेत. या लोकांनी या मंदिराला पशुपतीचे मंदिर आणि मूर्तीला पंचमुखी असे नाव दिले आहे. जेव्हा कोणी जाब विचारणारा नसतो तेव्हाच असा भ्रष्टाचार बळावतो. मात्र मैदानी प्रदेशातील तीर्थक्षेत्रांमध्ये राहणारे लोक जसे लबाड व लुटारू असतात तसे येथील पहाडी लोक नाहीत. हा डोंगरी प्रदेश अत्यंत रमणीय व पवित्र आहे.

**(प्रश्न)** विंध्याचलामध्ये विंध्येश्वरी, काली व अष्टभुजा हे तर प्रत्यक्ष सत्य आहे. ही विंध्येश्वरी तीन वेळेस आपले तीन रूप बदलते. तिच्या देवळाच्या आवारात एकही माशी नसते. प्रयाग हे तीर्थराज आहे. तेथे मुंडन करून घेतले असता सिद्धी प्राप्त होते. गंगायमुनेच्या संगमात स्नान केल्यास इच्छापूर्ती होते. तसेच अयोध्या साऱ्या वस्तीसह उडून एकदा स्वर्गात गेली. मथुरा ही सर्व तीर्थस्थानांहून श्रेष्ठ आहे. वृंदावन हे श्रीकृष्णाचे लीलास्थान आहे. गोवर्धन व्रजयात्रा मोठ्या भाग्यानेच घडते. सूर्यग्रहणाच्या वेळी कुरुक्षेत्रामध्ये जत्रा भरते. त्या जत्रेत लाखो लोक सहभागी होतात. या सगळ्याच गोष्टी खोट्या आहेत काय ?

**(उत्तर)** वस्तुतः विंध्याचलामध्ये तीन वेगवेगळ्या मूर्ती डोळ्यांनाच दिसतात. त्या दगडाच्या मूर्ती आहेत. दिवसातून तीन वेळा पुजारी त्या मूर्तींना वेगवेगळी वस्त्रे नेसवितात व दागिने घालतात. त्यामुळे एकच देवी तीन वेळा तीन रूपे धारण करते असा भास होतो. माशांविषयी तुम्ही जे सांगता ते तर साफ खोटे आहे. मी स्वतः आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे, तेथे हजारो लाखो माशा असतात. प्रयागला एखाद्या न्हाव्याने आपला धंदा चालावा म्हणून त्या अर्थाचा श्लोक तयार केला असावा अथवा पुजाऱ्याला पैसे देऊन त्याच्या कडून मुंडन माहात्म्य लिहवून घेतले असावे. प्रयागात स्नान केल्याने माणसे स्वर्गाला गेली असती तर कोणीच घरी परतला नसता. परंतु संगमावर स्नान करणारे सगळे लोक घरी परत आलेले दिसतात. किंबहुना तेथे जर कोणी बुडून मेला तर त्याचा जीवही आकाशात वायूबरोबर भ्रमण करून पुनः जन्म घेत असणार. प्रयागला तीर्थराज हे नावही पैसे उकळणाऱ्या लोकांनीच दिलेले आहे. वस्तुतः जड (अचेतन) पदार्थामध्ये राजा-प्रजा भाव असूच शकत नाही. सारी लोकवस्ती, कुत्री, गाढवे, भंगी, चांभार, शौचकूप यांच्यासह अयोध्यानगरी तीन वेळा स्वर्गात गेली असेल, ही अगदीच अशक्य गोष्ट आहे. ती मुळीच स्वर्गात गेली नाही. जेथे होती तेथेच आहे. परंतु पुजाऱ्यांनी रचलेल्या कपोलकल्पित कथांमध्ये मात्र अयोध्या उडून स्वर्गात गेली. ही कथा एकाच्या तोंडून दुसऱ्याकडे अवश्य उडत गेली असणार. नैमिषारण्यासंबंधी या पुजाऱ्यांनी पसरविलेल्या अफवाही अशाच निरर्थक आहेत.

मथुरा ही तीन लोकांहून निराळी मुळीच नाही. मात्र तेथे अत्यंत तापदायक असे तीन प्राणी अवश्य आहेत. त्यांच्यामुळे जळी, स्थळी व आकाशी कुणालाही सुखाने जगणे कठिण होऊन बसले आहे. त्यातला एक प्राणी म्हणजे तिथला चौबे नावाचा पंडा हा होय. जो कोणी स्नान करायला जातो त्याच्याकडून आपला कर वसूल करण्यासाठी तो उभा असतो. तो सारखा बडबडत असतो की, ''यजमान ! द्या दक्षिणा ! भांग, मिरची (चमचमीत पदार्थ) आणि लाडू मला द्या. ते मी खाऊन पिऊन तुमचा जयजयकार करीन.'' दुसरा प्राणी आहे कासव. यमुना नदीत इतकी कासवे आहेत की स्नानासाठी पाण्यात उतरताच ती अंगाला कडकडून चावतात.

त्यामुळे घाटावर स्नान करणेही अशक्य होऊन जाते. तिसरा प्राणी आकाशात राहतो तो म्हणजे माकड. लाल तोंडाच्या माकडांचा मथुरेत असा काही सुळसुळाट आहे की नाकी नऊ येतात. पगडी, टोपी, दागिनेच नव्हे तर पादत्राणेही ती पळवितात. एवढेच नव्हे तर ती माणसांना चावतात, धक्का देऊन खाली पाडतात व कधी कधी मारूनही टाकतात. हे तीन्ही प्राणी पोप व त्यांचे चेले यांना पूजनीय वाटतात. शेकडो मण चणे वगैरे खाद्यपदार्थ कासवांना खायला घातले जातात. माकडांना चणे गूळ यांसारखे पदार्थ खाऊ घालतात आणि चौब्यांना दक्षिणा देऊन व लाडू खायला घालून त्यांचे सेवक त्यांची सेवा करतात. वृंदावन कधी काळी तीर्थक्षेत्र राहिले असेलही. परंतु सध्या मात्र तो वेश्याव्यवसायाचा अड्डाच बनला आहे. मूर्ख स्त्रीपुरुष आणि बुवाबाजी करणारे गुरू व त्यांच्या शिष्य-शिष्यिणी यांच्या मर्कटलीला तेथे चालू असतात. याचप्रमाणे गोवर्धनची दीपमालिका जत्रा आणि व्रजयात्रा यांसारख्या प्रसंगीही पुरोहित मंडळींचे चांगलेच फावते. कुरुक्षेत्रातही पोटभरू पुजाऱ्यांचे असेच प्रताप चालू असतात. जो कोणी खरा खुरा धार्मिक व परोपकारी वृत्तीचा असेल तो या साऱ्या प्रकारापासून दूर राहतो.

**(प्रश्न)** मूर्तिपूजा व तीर्थयात्रा या गोष्टी सनातन काळापासून चालत आलेल्या आहेत. त्या खोट्या कशा असणार ?

**(उत्तर)** तुम्ही सनातन कशाला म्हणता ? जी गोष्ट अनादी काळापासून चालत आलेली असते तिला सनातन असे म्हणतात. जर या गोष्टी सनातन असत्या तर वेदांमध्ये आणि ब्राह्मण वगैरे ऋषिमुनिकृत ग्रंथांमध्ये त्यांचा उल्लेख आला असता की नाही ? तसा तो आढळत नाही. याचे कारण काय ? याचे कारण असे की, मूर्तिपूजा ही अडीच तीन हजार वर्षांपूर्वी वाममार्गी व जैन लोकांनी सुरु केली आहे. त्याआधी ती आर्यावर्त्तामध्ये अस्तित्वात नव्हती. त्यावेळी ही तीर्थक्षेत्रेही नव्हती. जेव्हा जैनांनी गिरनार, पालिताणा, सम्मेत शिखर, शत्रुंजय, आबू वगैरे तीर्थक्षेत्रे निर्माण केली तेव्हा पुराणिकांनीही त्यांच्यासारखीच आपलीही तीर्थक्षेत्रे तयार केली. या बाबतीत कोणाला खात्री करून घ्यावयाची असल्यास त्याने पंड्याकडे असलेल्या जुन्या वह्या, ताम्रपत्र वगैरे पाहावेत. त्यावरून त्याच्या लक्षात येईल की, ही सारी तीर्थक्षेत्रे गेल्या हजार-पाचशे वर्षांच्या आतलीच आहेत. एक हजार वर्षाहून अधिक जुनी नोंद कोणाजवळही नाही. यावरून ही तीर्थक्षेत्रे आधुनिक असल्याचे सिद्ध होते.

## तीर्थ व नामस्मरण-समीक्षा

**(प्रश्न)** तीर्थ माहात्म्य व नाममाहात्म्य यांना काही महत्त्वच नाही काय ? 'अन्यक्षेत्रे कृतं पापं काशीक्षेत्रे विनश्यति' यासारखी जी वचने उद्धृत केली जातात ती खरी आहेत की नाही ?

**(उत्तर)** नाही. कारण या मार्गाने पापे नष्ट झाली असती तर दरिद्री माणसाला संपत्ती व आंधळ्याला डोळे मिळाले असते. कुष्ठरोग्यांचा तो रोग नाहीसा झाला असता. परंतु प्रत्यक्षात तसे होत नाही. म्हणून असल्या गोष्टींनी कुणाचेही पाप किंवा पुण्य नाहीसे होत नाही.

**(प्रश्न) गङ्गा गङ्गेति यो ब्रूयाद् योजनाना शतैरपि ।**
**मुच्यते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति ॥१॥**
**हरिर्हरति पापानि हरिरित्यक्षरद्वयम् ॥२॥** ब्रह्मपुराण अ. १७५, श्लो. ८२

**प्रातःकाले शिवं दृष्ट्वा निशि पापं विनश्यति ।**
**आजन्मकृतं मध्याह्ने सायाह्ने सप्तजन्मनाम् ॥३॥** पद्म. पुराण खं.३, अ.२२, श्लो. ३४

इत्यादी श्लोक पुराणांमध्ये आहेत. एखाद्याने शेकडो, हजारो कोसांवरून नुसते तोंडाने 'गंगा, गंगा' असे म्हटले तरी त्याची सारी पापे नष्ट होऊन तो विष्णुलोकाला म्हणजे वैकुंठाला जातो. ॥१॥ 'हरी' या दोन अक्षरांचा उच्चार म्हणजे नामोच्चारण सारी पापे नाहीसे करते. असेच माहात्म्य राम, कृष्ण, शिव, भगवती इत्यादी नावांचे आहे. ॥२॥ जो माणूस सकाळी शिवाचे म्हणजे त्याच्या लिंगाचे किंवा मूर्तीचे दर्शन घेतो त्याने रात्री केलेले पाप नाहीसे होते. हेच दर्शन दुपारी घेतल्यास जन्मभर केलेले पाप नष्ट होते आणि संध्याकाळी दर्शन घेतल्यास सात जन्माची पापे नाहीशी होतात. असे हे दर्शन माहात्म्य आहे. ॥३॥ हे सारे काय खोटे आहे ?

**(उत्तर)** त्यात काय शंका ? गंगा, हरी, राम, कृष्ण, नारायण, शिव, भगवती यांच्या नामस्मरणाने कधीही पाप नाहीसे होत नसते. तसे झाले असते तर जगात कोणीच दुःखी राहिला नसता, आणि पाप करायलाही कुणी भ्याला नसता. आजकाल पुरोहितांच्या लबाडीमुळे याच कारणाने पाप वाढत चालले आहे. मूढ लोकांची अशी खात्री असते की, आपण नामस्मरण अथवा तीर्थयात्रा केली की, सगळी पापे आपोआप नाहीशी होतील. या खात्रीमुळे ते पापे करून इहलोकीच्या व परलोकीच्या सुखाला पारखे होतात. परंतु केलेल्या पापाची फळे भोगावीच लागतात.

## तीर्थ शब्दाचा अर्थ

**(प्रश्न)** तर मग एखादे तीर्थ व नामस्मरण हे खरे आहे की नाही ?

**(उत्तर)** होय, आहे. सत्य शास्त्रांचे अध्ययन-अध्यापन, धर्मनिष्ठ विद्वानांचा सत्संग, परोपकार, धर्मानुष्ठान, योगाभ्यास, निर्वैरत्व, निष्कपटत्व, सत्यभाषण, सत्य मानणे, सत्य करणे, ब्रह्मचर्य, आचार्य, अतिथी, माता व पिता यांची सेवा, परमेश्वराची स्तुती व प्रार्थना, उपासना, शांती, जितेंद्रियता, सुशीलता, धर्मयुक्त पुरुषार्थ, ज्ञान-विज्ञान इत्यादी शुभ गुणकर्म दुःखातून तारणारे असल्यामुळे ती वेदांनुसार तीर्थेच आहेत. जल व स्थल यांनी युक्त असणारी ठिकाणे ही कधी तीर्थे असू शकत नाहीत. कारण ''जना यैस्तरन्ति तानि तीर्थानि'' म्हणजे ज्यांच्या योगाने माणूस दुःखांतून मुक्त होतो त्यांना तीर्थ असे म्हणतात. जल-स्थलयुक्त ठिकाण ही तारणारी नसून बुडवून मारणारी असतात. त्यापेक्षा नौका वगैरेना तीर्थ म्हणणे अधिक सयुक्तिक होय. कारण त्यांच्या साह्याने माणसे समुद्र वगैरे तरून जातात.

**समानतीर्थे वासी ॥१॥** अष्टा. अ. ४, पा. ४, सू. १०७

**नमस्तीर्थ्याय च ॥२॥** यजु. अ. १६ मं. ४२

जे ब्रह्मचारी (विद्यार्थी) एका आचार्याजवळ एक शास्त्र एकमेकांबरोबर शिकत असतात त्यांना सतीर्थ्य म्हणजे समानतीर्थसेवी असे म्हणतात. जे वेदादी शास्त्रे शिकले आहेत आणि सत्यभाषणादी धर्मलक्षणांनी युक्त असे साधू आहेत त्यांना अन्नादी पदार्थ देणे आणि त्यांच्याकडून विद्या ग्रहण करणे यालाही तीर्थ म्हणतात. नामस्मरण याला म्हणतात - **यस्य नाम महद्यशः ॥** यजु. अ. ३२, मं. ३

धर्मयुक्त काम करणे हेच मोठे यश असून तेच परमेश्वराचे नामस्मरण होय. ब्रह्म, परमेश्वर, ईश्वर, न्यायकारी, दयाळू, सर्वशक्तिमान वगैरे नावे परमेश्वराच्या गुणकर्मस्वभावानुसार आहेत. जसे - सर्वांहून मोठा म्हणून ब्रह्म,

ईश्वरांचा ईश्वर म्हणून परमेश्वर, तो सामर्थ्यवान आहे म्हणून ईश्वर, जो कधीही अन्याय करीत नाही, सदैव न्यायच करतो तो न्यायकारी, सर्वांवर कृपादृष्टी ठेवतो म्हणून दयाळू, आपल्या स्वतःच्या सामर्थ्याने साऱ्या जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करतो, त्यासाठी कोणाचीही मदत घेत नाही, म्हणून सर्वशक्तिमान, जगातील विविध पदार्थांची निर्मिती करणारा म्हणून ब्रह्मा, सर्वांमध्ये व्याप्त होऊन सर्वांचे रक्षण करतो म्हणून विष्णू, सर्व देवांचा देव म्हणून महादेव, प्रलय करतो म्हणून रुद्र, असा अर्थ व्यक्त करणारी नावे परमेश्वराची आहेत. परमेश्वराचे हे गुण स्वतःमध्ये आणण्याचा माणसाने प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे मोठी कामे करून त्याने मोठे बनावे. त्याने समर्थाहून समर्थ बनावे, आपले सामर्थ्य सतत वाढवावे, कधीही अधर्माचरण करू नये. सर्वांवर दया करावी. सर्व प्रकारची साधने परिपूर्ण बनवावीत. तंत्रज्ञानाचा विकास करून नाना प्रकारची उपकरणे तयार करावीत. साऱ्या जगातील जीवांना आपल्या आत्म्याप्रमाणेच सुख-दुःख होत असते हे ओळखावे. सर्वांचे रक्षण करावे. विद्वानांमध्ये विद्वान बनावे. दुष्कृत्ये करणाऱ्या दुष्टांना शिक्षा करावी आणि सज्जनांचे रक्षण करावे. अशा प्रकारे परमेश्वराच्या नावांचे अर्थ जाणून घेऊन परमेश्वराच्या गुणकर्मस्वभावानुसार आपले गुणकर्मस्वभाव बनविण्याचा प्रयत्न करणे हेच परमेश्वराचे नामस्मरण होय.

## गुरू माहात्म्य समीक्षा

**(प्रश्न) गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ।**
**गुरुरेव परं ब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥** गुरु-गीता गुरुमाहात्म्य १६.

इत्यादी गुरुमाहात्म्य तर खरे आहे ना ? गुरूचे चरणामृत प्राशन करावे, त्याच्या आज्ञेचे पालन करावे, लोभी असल्यास त्याला वामनाप्रमाणे, क्रोधी असल्यास नरसिंहाप्रमाणे, मोही असल्यास रामाप्रमाणे, कामी असल्यास कृष्णासमान मानावे. गुरू कितीही पापी असला तरी त्याच्याविषयी अश्रद्धा बाळगू नये. संत अथवा गुरू यांच्या दर्शनाला जाताना पावलोपावली अश्वमेध यज्ञ केल्याचे पुण्य मिळते. ही गोष्ट बरोबर आहे की नाही?

**(उत्तर)** मुळीच बरोबर नाही. ब्रह्मा, विष्णू, महेश्वर आणि परब्रह्म ही परमेश्वराची नावे आहेत. त्याची बरोबरी गुरू कधीच करू शकणार नाही. ज्या गुरुगीतेमध्ये हे गुरुमाहात्म्य वर्णिलेले आहे. ती कुणा पुजाऱ्यानेच रचलेली पोपलीलाच आहे. माता, पिता, आचार्य व अतिथी हेच खरे गुरू होत. त्यांची सेवा करणे व त्यांच्याकडून ज्ञान ग्रहण करणे हे शिष्याचे कर्तव्य असून विद्या देणे हे गुरूचे काम आहे. परंतु गुरू लोभी, क्रोधी, मोही व कामी असेल तर त्याचा त्याग करावा. तेवढ्याने भागले नाही तर त्याला शारीरिक शिक्षा करावी. किंबहुना अशा माणसाला ठार मारण्यातही काही दोष नाही. जो विद्यादी सद्गुणांच्या बाबतीत श्रेष्ठ नसेल, बाह्यतः माळ, टिळा, टोपी वगैरे करून वेदांविरुद्ध मंत्रोपदेश करीत असेल तो गुरू नसून, जणू धनगरच आहे असे समजावे. ज्याप्रमाणे धनगर आपल्या शेळ्या-मेंढ्यांकडून दूध, लोकर वगैरे मिळवून आपला स्वार्थ साधतात त्याप्रमाणे ढोंगी गुरू आपले शिष्य व शिष्यिणी यांचे धन लुबाडून आपला स्वार्थ साधतात.

**दोहा : गुरु लोभी चेला लालची, दोनों खेले दाव।**
**भवसागर में डूबते, बैठ पत्थर की नाव॥**

लोभी गुरू व लालची चेला हे दोघेही एकमेकांवर डाव करीत असतात. ते जणू दगडी नावेत बसून भवसागरात बुडून जातात. गुरू समजतो की आपले शिष्य व शिष्यिणी आपल्याला काही ना काही अवश्य

देतील, आणि शिष्याला वाटते की खोटी शपथ घेण्यासाठी व पापमुक्त होण्यासाठी गुरूचा उपदेश झाला तरी पुष्कळ आहे. अशा प्रकारे दोघेही भवसागरूपी दु:खात बुडून जातात. असे गुरू व चेले यांच्या तोंडात राख पडो. अशा माणसांच्या वाऱ्यालाही उभे राहू नये. जो कोणी त्याच्या जवळ जाईल तो दु:खसागरात पडेल. पुजारी, पुराणिक वगैरे लोकांनी जशी लबाडी चालविली तशीच या धनगरी वृत्तीच्या गुरूंनी चालविली आहे, हे सारे स्वार्थी लोकांचे काम आहे. जे लोक परमार्थी असतात ते स्वत:ला दु:ख भोगावे लागले तरी जगावर उपकार करणे सोडीत नाहीत. गुरूमाहात्म्य, गुरुगीता वगैरे ग्रंथ याच लोभी, कुकर्मी गुरूंनी रचले आहेत.

## अठरा पुराणांची समीक्षा

**(प्रश्न) अष्टादशपुराणानां कर्त्ता सत्यवतीसुत: ॥१॥**
**इतिहासपुराणाभ्यां वेदार्थमुपबृंहयेत् ॥२॥** महाभारत आदिपर्व अ. ३। श्लो. २६७
**पुराणानि खिलानि च ॥३॥** मनु. अ.३। श्लो. २३२
**इतिहासपुराण: पञ्चमो वेदानां वेद: ॥४॥** छान्दोग्य प्रपा. ३। खं. ७। व. १
**दशमेऽहनि किंचितत्पुराणमाचक्षीत ॥५॥** शत. प्रपा. १३। ब्रा. ४। कं. ३। व. १३
**पुराणविद्या वेद: ॥६॥** सूत्रम्

अठरा पुराणांचे कर्ते व्यास आहेत. व्यासवचन अवश्य प्रमाण मानले पाहिजे ॥१॥ इतिहास, महाभारत, अठरा पुराणे यांतून वेदांचा अर्थ शिकावा व शिकवावा. कारण इतिहास व पुराणे वेदांच्या अर्थाला अनुकूल आहेत. ॥२॥ पितरांचे क्रियाकर्म करताना पुराणे व हरिवंश यातील कथा श्रवण कराव्यात. ॥३॥ इतिहास व पुराणे यांना पाचवा वेद असे म्हणतात. ॥४॥ अश्वमेध यज्ञाच्या समाप्तीच्या दहाव्या दिवशी थोडेसे पुराण श्रवण करावे. ॥५॥ पुराणांमध्ये जे काही सांगितले आहे ते वेदार्थाशी जुळणारे आहे. त्यामुळे पुराणविद्या हा वेदच आहे. ॥६॥ इत्यादी पुराव्यावरून पुराणेही प्रमाण आहेत असे ठरते आणि पुराणांमध्ये मूर्तिपूजा व तीर्थयात्रा करावी असे सांगितले आहे म्हणून मूर्तिपूजा व तीर्थयात्रा या गोष्टी पुण्यप्रद ठरत नाहीत काय ?

**(उत्तर)** अठरा पुराणे व्यासांनी रचली असती तर त्यात असल्या गप्पा व भाकडकथा आल्या नसत्या. कारण शारीरिक सूत्र, योगशास्त्रावरील भाष्य वगैरे व्यासोक्त ग्रंथ नजरेखालून घातल्यानंतर लक्षात येते की व्यास हे फार मोठे विद्वान, सत्यवादी, धार्मिक व योगी होते. त्यांनी अशा भाकडकथा कधीच लिहिल्या नाहीत. यावरून हे सिद्ध होते की ज्या परस्पर विरोधी संप्रदायांच्या लोकांनी भागवतादी नवीन कपोलकल्पित ग्रंथांची रचना केली आहे, त्यांच्यामध्ये व्यासांच्या गुणांचा लवलेशही नव्हता. तसेच वेदशास्त्रांविरुद्ध असत्यवादी लिखाण करणे हे व्यासांसारख्या विद्वानांचे काम असू शकत नाही. वेदविरोधी, स्वार्थी व विद्वान लोकांचे ते काम आहे. इतिहास व पुराण या शब्दांचा खरा अर्थ शिवपुराणादी ग्रंथांना लागू होत नाही कारण,

**ब्राह्मणानीतिहासान् पुराणानि कल्पान् गाथानाराशंसीरिति ॥**

हे ब्राह्मण व सूत्रे यांतील वचन आहे. ऐतरेय, शतपथ, साम आणि गोपथ या ब्राह्मण ग्रंथाचीच इतिहास, पुराण, कल्प, गाथा व नाराशंसी ही पाच नावे आहेत. (इतिहास) जनक व याज्ञवल्क्य यांचा संवाद हा इतिहास आहे. (पुराण) ब्राह्मण ग्रंथांतील जगदुत्पत्ती वगैरेचे वर्णन म्हणजे पुराण होय. (कल्प) वेदांतील शब्दांच्या सामर्थ्याचे वर्णन व निरूपण करणे हे कल्प होय. (गाथा) दृष्टांत आणि दृष्टांताद्वारे स्पष्टीकरण करणाऱ्या कथा

व प्रसंग यांना गाथा असे म्हणतात. (नाराशंसी) मनुष्यांच्या प्रशंसनीय अथवा अप्रशंसनीय कृत्यांचे कथन करणे म्हणजे नाराशंसी होय. यांतूनच वेदार्थाचा बोध होतो.

पितृकर्म म्हणजे ज्ञानी लोकांची प्रशंसा श्रवण करणे. अश्वमेधाच्या शेवटीही ब्राह्मण ग्रंथातील विद्वत् स्तुतीचा भाग ऐकावा असे सांगितले आहे. व्यासकृत जे ग्रंथ आहेत ते ऐकणे व ऐकविणे ही गोष्ट व्यासांच्या जन्मानंतरच घडू शकते, त्याच्या आधी नाही. जेव्हा व्यासांचा जन्मही झालेला नव्हता तेव्हा वेदार्थ शिकणे-शिकविणे व ऐकणे-ऐकविणे चालू होते. म्हणून सर्वात प्राचीन ब्राह्मण ग्रंथांनाच पुराण असे म्हणणे शक्य आहे. अलीकडच्या काळातील कपोलकल्पित श्रीमद्‌भागवत, शिवपुराण इत्यादी मिथ्या किंवा दूषित ग्रंथांना पुराण ही संज्ञा दिली जाऊ शकत नाही.

व्यासांनी वेदांचे अध्ययन व अध्यापन करून वेदार्थाचा प्रसार केला. म्हणून त्यांचे नाव वेदव्यास असे पडले. वर्तुळाच्या केंद्रबिंदूतून आरपार जाणाऱ्या रेषेला व्यास असे म्हणतात. व्यासांनी ऋग्वेदापासून अथर्ववेदापर्यंत चारही वेदांचे अध्ययन केले होते व ते त्यात पारंगत झाले होते. शुकदेव व जैमिनी वगैरे शिष्यांना त्यांनी वेद शिकविले होते. म्हणून त्यांचे जन्म नाव कृष्णद्वैपायन असे असले तरी ते वेदव्यास (वेदपारंगत) या टोपण नावानेच प्रख्यात झाले. काही लोक असे म्हणतात की व्यासांनी वेदांचे संकलन केले म्हणून त्यांना वेदव्यास हे नाव प्राप्त झाले. परंतु ते खोटे आहे. कारण व्यासांचे पिता, पितामह, प्रपितामह, पराशर, शक्ती, वसिष्ट, ब्रह्मा इत्यादिकांनीही चारही वेदांचे अध्ययन केले होते. म्हणून व्यासांनी वेदांचे संकलन केले ही गोष्ट खरी नाही.

## पुराण-समीक्षा

**(प्रश्न)** पुराणातील सगळ्याच गोष्टी खोट्या आहेत की त्यांतल्या काही खऱ्याही आहेत ?

**(उत्तर)** बहुतेक गोष्टी खोट्या आहेत. परंतु घुणाक्षरन्यायाने एखादी गोष्ट खरीही आहे. जी एखादी गोष्ट खरी आहे ती वेदादी सत्याशास्त्रांतून घेतलेली आहे; आणि ज्या गोष्टी खोट्या आहेत त्या भटाभिक्षुकांनी रचलेल्या आहेत. जसे, शिवपुराणामध्ये शैवांनी शिवाला परमेश्वर मानून विष्णू, ब्रह्मा, इंद्र, गणेश, सूर्य इत्यादिकांना शिवाचे दास ठरविले आहे. वैष्णवांनी आपल्या विष्णुपुराणात विष्णूला परमात्मा मानून शिवादिकांना विष्णूचे सेवक बनविले. देवी भागवतात देवीला परमेश्वरी आणि शिव, विष्णू वगैरेंना तिचे नोकर बनविण्यात आले. गणेश पुराणात गणपतीला ईश्वर व इतर सर्वांना त्याचे दास बनविले गेले. या साऱ्या गोष्टी या सांप्रदायिकांनी नव्हे तर कोणी केल्या ? ही सारी पुराणे एकाच माणसाने रचली असती तर त्यांत अशा परस्परविरोधी गोष्टी आल्या नसत्या. ती विद्वानांनी लिहिली असती तर अशा विचित्र गोष्टी त्यात मुळीच आल्या नसत्या. यांपैकी एका पुराणातील गोष्ट खरी मानावी तर दुसऱ्या पुराणातील गोष्ट खोटी ठरते, दुसऱ्या पुराणातील गोष्ट खरी मानावी तर तिसऱ्या पुराणातील गोष्ट खोटी ठरते आणि तिसऱ्या पुराणातील गोष्ट खरी मानावी तर इतर सगळ्या पुराणांतल्या गोष्टी खोट्या ठरतात.

## शिवपुराण समीक्षा

शिवपुराणकारांनी शिवाला, विष्णुपुराणकारांनी विष्णूला, देवीपुराणकारांनी देवीला, गणेशपुराणकारांनी गणपतीला, सूर्यपुराणकारांनी सूर्याला व वायुपुराणकारांनी वायूला सृष्टीची उत्पत्ती व प्रलय करणारा ठरविले

असून त्यांच्यापैकी प्रत्येकजण जन्माला आल्याची कथाही लिहिली आहे. त्यांना असे विचारले पाहिजे की, जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारा स्वत: कसा उत्पन्न होईल ? आणि जो स्वत: उत्पन्न होतो तो सृष्टी कशी निर्माण करू शकेल ? या प्रश्नांना त्यांच्याजवळ काहीच उत्तर नसल्यामुळे त्यांना गप्प बसण्याखेरीज गत्यंतर नाही. त्या सर्वांच्या शरीरांची उत्पत्ती सृष्टीतील पदार्थांनीच झाली असली पाहिजे. अशा स्थितीत ते स्वत: सृष्ट पदार्थ व परिच्छिन्न (परिमित) असताना जगाची उत्पत्ती कशी काय करू शकतील ? शिवाय या पुराणांमध्ये सृष्टीची उत्पत्ती निरनिराळ्या विलक्षण प्रकारांनी झाल्याचे सांगितले आहे. ते प्रकार तर अगदी अशक्य कोटीतले आहेत. जसे,

शिवपुराणानुसार शिवाने अशी इच्छा केली की, आपण आता सृष्टी निर्माण करावी. म्हणून त्याने एक नारायण जलाशय निर्माण केला. त्या नारायणाच्या बेंबीतून एक कमळ बाहेर आले आणि त्या कमळातून ब्रह्मा उत्पन्न झाला. त्याने पाहिले की, सर्वत्र पाणी पसरलेले आहे. त्याने आपल्या ओंजळीत पाणी घेऊन ते जलाशयाच्या पाण्यात टाकले. त्याबरोबर त्या पाण्यातून एक बुडबुडा वर आला, त्या बुडबुड्यातून एक पुरुष उत्पन्न झाला. त्याने ब्रह्माला सांगितले की, ''हे पुत्रा, तू सृष्टी उत्पन्न कर.'' ब्रह्माने त्याला सांगितले की, ''मी तुझा पुत्र नसून तू माझा पुत्र आहेस.'' यावरून त्यांच्यात विवाद सुरू झाला आणि ते दोघे (दिव्य) देवांची हजार वर्षे एकमेकांशी जलावर लढत राहिले. तेव्हा महादेवाने असा विचार केला की, ज्यांना मी सृष्टी उत्पन्न करण्यासाठी पाठविले ते दोघे आपसात भांडत-लढत बसले आहेत. तेव्हा त्या दोघांच्या मधून एक तेजोमय लिंग उत्पन्न झाले आणि ते बघता बघता आकाशापर्यंत वाढले. ते पाहून दोघेही आश्चर्यचकित झाले. त्यांनी असा विचार केला की, या लिंगाचा आदि-अंत शोधून काढला पाहिजे. त्यांनी असे ठरविले की, आपल्या दोघांपैकी जो कोणी या लिंगाचा आदि-अंत शोधून काढून आधी परत येईल तो पिता आणि जो नंतर किंवा शोध न लावताच परत येईल तो पुत्र असे समजावयाचे.

विष्णूने कासवाचे रूप धारण केले व तो पाताळाच्या दिशेने जाऊ लागला आणि ब्रह्मा हंसाचे रूप धारण करून आकाशातून उडाला. दोघेही मनाच्या वेगाने निघाले. दिव्य सहस्त्र वर्षापर्यंत दोघेही जात राहिले. परंतु कोणालाच त्याचे टोक सापडले नाही. तेव्हा विष्णू खालून वर आणि ब्रह्मा वरून खाली जाऊ लागला. ब्रह्माने मनात विचार केला की, विष्णू टोकाचा शोध घेऊन आला तर मला त्याचा मुलगा बनावा लागेल. तो असा विचार करीत असतानाच एक गाय आणि एक केतकीचे झाड वरून खाली आले. त्यांना ब्रह्माने विचारले की, ''तुम्ही कोठून आलात?'' त्यांनी सांगितले की, ''आम्ही हजार वर्षापासून या लिंगाच्या आधाराने चालत येत आहोत.'' ब्रह्माने विचारले, ''या लिंगाचा शेवट कोठे तरी आहे की नाही?'' त्यांनी सांगितले, ''नाही!'' ब्रह्माने त्यांना सांगितले की, ''तुम्ही माझ्याबरोबर चला आणि मी सांगतो तशी साक्ष द्या. गाईने सांगावे की, ''मी या लिंगाच्या मस्तकावर दुधाच्या धारेचा वर्षाव करीत होते.'' आणि झाडाने असे सांगावे की, ''मी या लिंगावर पुष्पवृष्टी करीत होते.'' तुम्ही अशी साक्ष द्याल तर मी तुम्हाला तुमच्या ठिकाणावर घेऊन जाईन.'' ते म्हणाले, ''आम्ही खोटी साक्ष देणार नाही.'' हे ऐकताच ब्रह्मा क्रुद्ध होऊन म्हणाला, ''मी सांगतो तशी साक्ष तुम्ही देणार नसाल तर मी तुम्हाला आताच्या आता भस्म करून टाकतो.'' तेव्हा ते दोघे घाबरून म्हणाले, ''तू सांगतोस तशी साक्ष आम्ही देतो.'' मग ते तिघे खाली उतरू लागले.

हे तिथे पोचण्यापूर्वीच विष्णू तेथे आला होता. ब्रह्मा तेथे जाऊन पोचल्यावर विष्णूला त्याने विचारले, ''तुला थांग लागला की नाही?'' विष्णू म्हणाला, ''मला काही याचा थांग लागला नाही.'' ब्रह्माने सांगितले की, ''मी याचे टोक पाहून आलो आहे.'' तेव्हा विष्णू म्हणाला की, ''तुझ्या या म्हणण्याला साक्षीदार कोण आहे?'' तेव्हा गाय व केतकीचे झाड यांनी पुढे येऊन अशी साक्ष दिली की, ''आम्ही दोघे या लिंगाच्या मस्तकावर होतो तेव्हा हा ब्रह्मा तेथे आला होता.'' त्याबरोबर लिंगातून शापवाणी बाहेर पडली. त्याने झाडाला असा शाप दिला की, ''ज्याअर्थी तू खोटे बोलला आहेस त्या अर्थी तुझे फूल माझ्यावर अथवा जगातील कोणत्याही देवावर वाहिले जाणार नाही आणि जो कोणी ते देवावर वाहील त्याचा सत्यानाश होईल.'' त्याने गाईला असा शाप दिला की, ''ज्या तोंडाने तू खोटे बोललीस त्याच तोंडाने तू विष्ठा खाशील. तुझ्या मुखाची पूजा कोणी करणार नाही. मात्र तुझ्या शेपटीची पूजा लोक करतील.'' आणि त्याने ब्रह्माला असा शाप दिला की, ''तू खोटे बोललास. म्हणून जगात कोणीही तुझी पूजा करणार नाही.'' त्याने विष्णूला असा वर दिला की, ''तू खरे बोललास म्हणून तुझी पूजा सर्वत्र केली जाईल.''

यानंतर ब्रह्मा व विष्णू यांनी लिंगाची स्तुती केली. त्यामुळे ते लिंग प्रसन्न झाले व त्यातून एक जटाजूटधारी मूर्ती बाहेर आली; आणि म्हणाली, ''मी तुम्हाला सृष्टीची उत्पत्ती करण्यासाठी पाठविले असता ते न करता तुम्ही आपसात का भांडत राहिलात?'' तेव्हा ब्रह्मा व विष्णू यांनी विचारले, ''आमच्या जवळ कसलीच सामग्री नसताना आम्ही सृष्टी कशी निर्माण करणार ?'' यावर महादेवाने आपल्या जटेतून एक भस्माचा एक गोळा काढून दिला आणि म्हटले, ''जा यातूनच तुम्ही सृष्टी निर्माण करा.'' वगैरे.

आता ही पुराणे रचणाऱ्यांना असे विचारले पाहिजे की, जेव्हा सृष्टी-तत्व आणि पंचमहाभूते ही अस्तित्वात नव्हती, तेव्हा ब्रह्मा, विष्णू, महेश यांची शरीरे, जल, कमळ, लिंग, गाय आणि केतकीचे झाड व भस्माचा गोळा ही काय तुमच्या बापाच्या घरातून येऊन पडली?

## भागवत पुराण समीक्षा

याचप्रमाणे भागवतात असे सांगितले आहे की, विष्णूच्या नाभीतून कमळ, कमळातून ब्रह्मा, ब्रह्माच्या उजव्या पायाच्या अंगठ्यापासून स्वायंभुव व डाव्या पायाच्या अंगठ्यापासून शतरूपा राणी, ललाटापासून रुद्र, मरीची आदी दहा पुत्र उत्पन्न झाले. त्यांच्यापासून दहा प्रजापती झाले. त्यांच्या तेरा मुलींचा विवाह कश्यपाबरोबर झाला. त्यांच्यापैकी दितीपासून दैत्य, दनूपासून दानव, अदितीपासून आदित्य, विनतेपासून पक्षी, कद्रूपासून सर्प, सरमेपासून कुत्रे, कोल्हे आणि इतर स्त्रियांपासून हत्ती घोडे, उंट, गाढव, रेडा, गवत, पालापाचोळा व बाभळीसारखे काटेरी वृक्ष उत्पन्न झाले.

वा:! वा:! भागवत रचणाऱ्याची अक्कल काय वर्णावी ? भल्या माणसा, असल्या भाकडकथा लिहिताना थोडी देखील तुला शरम वाटली नाही ? तू तर ठार आंधळा बनलास की ? स्त्री पुरुषांच्या रजोवीर्याच्या संयोगाने माणसेच जन्माला येतात; परमेश्वराच्या सृष्टिक्रमाविरुद्ध पशू, पक्षी, साप वगैरे कधीही उत्पन्न होऊ शकत नाहीत. हत्ती, उंट, सिंह, कुत्रे, गाढव, वृक्ष वगैरे प्राणी व वनस्पती स्त्रीच्या गर्भाशयात राहू तरी शकतील काय? आणि सिंहासारख्या हिंस्त्र पशूंनी उत्पन्न झाल्यावर आईबापांनाच कसे खाऊन टाकले नाही? शिवाय मानवी शरीरातून पशुपक्षी, वृक्ष वगैरे उत्पन्न होणे शक्य तरी आहे काय?

या लोकांनी रचलेल्या अत्यंत असंभव अशा भाकडकथांवर अजून काही लोकांचा विश्वास बसतो, ही दुःखाची गोष्ट आहे. या साफ खोट्या गोष्टी आंधळे पुरोहित आणि आतले व बाहेरचे डोळे फुटलेले त्यांचे चेले ऐकतात व त्यांवर विश्वास ठेवतात. ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे ! ही माणसे आहेत की इतर कोणी ? ही भागवतादी पुराणे रचणारे गर्भातच किंवा जन्मताच का नष्ट झाले नाहीत? किंवा जन्मास येतानाच का मेले नाहीत? तसे झाले असते तर आम्ही या पापापासून वाचलो असतो आणि आर्यावर्त देशाचे अनेक दुःखे टळली असती.

**(प्रश्न)** या गोष्टींच्या बाबतीत विरोध असण्याचे कारण नाही. म्हणतात ना, 'ज्याचे लग्न त्याचीच गाणी.' जेव्हा विष्णूची स्तुती करू लागतात तेव्हा ते विष्णूला परमेश्वर आणि इतर देवांना त्याचे दास ठरवितात. शिवाचे गुणगान करू लागले की शिवाला परमात्मा आणि इतरांना त्याचे किंकर बनवितात. बाकी परमेश्वराच्या मायेने सारे काही घडू शकते म्हणा ! परमेश्वर माणसापासून पशुपक्ष्यांची आणि पशुपक्ष्यांपासून माणसांची उत्पत्ती करू शकतो. नाहीतरी त्याने काही कारण नसतांना आपल्या मायेने सारी सृष्टी निर्माण केलीच आहे की ! त्याला काय अशक्य आहे? त्याला जे हवे असेल ते सारे तो करू शकतो.

**(उत्तर)** अरे भोळ्या माणसांनो ! लग्नामध्ये ज्याचे गुणगान केले जाते त्याला सर्वात श्रेष्ठ आणि इतरांना त्याच्याहून तुच्छ ठरवीत नाहीत अथवा त्यांची निंदानालस्ती करीत नाहीत. निदान त्याला सर्वांचा बाप तर ठरवीत नाहीत ना? बोला पुरोहितजी ! इतरांची खुशामत करणाऱ्या भाट चारणांहूनही तुम्ही जास्त थापाडे आहात की नाही? ज्याच्या मागून जावयाचे त्याला सर्वांत श्रेष्ठ ठरवावयाचे आणि ज्याला विरोध करावयाचा त्याला सर्वांत तुच्छ ठरवावयाचे हा कुठला न्याय? अर्थात तुम्हाला सत्य व धर्म यांच्याशी काय कर्तव्य आहे म्हणा ! तुमचा स्वतःचा स्वार्थ साधला की झाले !

माया ही माणसामध्ये असू शकते. जो कोणी कपटी, फसव्या असतो त्याला मायावी असे म्हणतात. परमेश्वरामध्ये कपट, फसवेगिरी वगैरे दोष नसल्यामुळे त्याला मायावी म्हणता येत नाही. जर सृष्टीच्या प्रारंभी कश्यप व त्याच्या बायका यांच्यापासून पशु-पक्षी, साप, झाडे वगैरे उत्पन्न झाली असतील तर आजकालही तशी ती का होत नाहीत? सृष्टीक्रमाच्या बाबतीत आम्ही यापूर्वी जे लिहिले आहे तेच बरोबर आहे. पण पुरोहित मंडळी फसली आणि त्यांनी शास्त्रवचनातून वेगळेच अर्थ काढले. शतपथ ब्रह्मणात असे म्हटले आहे की,

**तस्मात काश्यप्य इमाः प्रजाः ॥** शतपथ. प्रपा.७। ब्रा. ५। कं. १। व. ५

म्हणजे ही सारी सृष्टी कश्यपाने बनविली आहे.

**कश्यपः कस्मात् पश्यको भवतीति ॥** निरुक्त अ. २। खं. २

सृष्टीकर्त्या परमेश्वराचे नाव कश्यप असे आहे. कारण तो पश्यक (द्रष्टा) आहे. 'पश्यतीति पश्यः, पश्य एव पश्यकः' म्हणजे जो निर्भ्रम होऊन चराचर जगताला, सर्व जीवांना व त्यांच्या कर्मांना, साऱ्या विद्यांना यथावत पाहातो तो पश्यक होय. तोच कश्यप व तोच परमेश्वर होय. **'आद्यन्तविपर्ययश्च'** या महाभाष्याच्या वचनानुसार पहिले अक्षर व अंत्याक्षर यांचा विपर्यास होऊन म्हणजे पहिले अक्षर शेवटी व शेवटचे अक्षर प्रथम येऊन 'पश्यक' या शब्दापासून 'कश्यप' हा शब्द बनला आहे. या शब्दाचा हा वैदिक अर्थ समजून न घेता भांग ढोसून सृष्टिक्रमाविरुद्ध भाकडकथा रचण्यात पुराणिकांनी आपला जन्म वाया घालविला.

मार्कंडेय पुराणातील दुर्गापाठामध्ये असे लिहिले आहे की, देवांच्या शरीरांतून तेज बाहेर पडून त्याची एक देवी बनली. तिने महिषासुराला ठार मारले. त्याचेच दुसरे नाव रक्तबीज असे होते. त्या रक्तबीजाच्या शरीरातून एक जरी रक्तबिंदू जमिनीवर पडला तरी त्या बिंदूपासून तसाच रक्तबीज राक्षस तयार होत असे. त्यामुळे सारे जग रक्तबीजांनी भरून गेले. रक्ताच्या नद्या वाहू लागल्या, वगैरे पुष्कळशा भाकडकथा त्यात आहेत. जर रक्तबीजांनी सारे जग भरून गेले होते तर देवी, तिचा सिंह आणि तिचे सैन्य कोठे राहत होते? हे रक्तबीज राक्षस देवीपासून दूर राहत होते असे तुम्ही म्हणत असाल तर त्यांनी सारे जग व्यापून टाकले होते या म्हणण्यात काही अर्थ उरत नाही. जर खरोखरीच सबंध जग रक्तबीजांनी भरून गेले असेल तर पशुपक्षी, मनुष्यादी प्राणी, पाण्यात राहणारे मासे, कासवे, सुसरी, मगरी वगैरे जलचर, झाडे-झुडपे, वृक्ष वगैरे कोठे राहिले असतील? बहुधा ते सारे दुर्गापाठ रचणाऱ्या पुरोहिताच्या घरात पळून जाऊन राहिले असतील !! पाहा, या लोकांनी भांगेच्या तारेत कसल्या भाकडकथा लिहून ठेवल्या आहेत. त्यांचा काही ठिकाणा नाही.

आता ज्याला 'श्रीमद्‌भागवत' असे म्हणतात, त्यात किती चमत्कारिक गोष्टी सांगितलेल्या आहेत ते पाहा. ब्रह्माला नारायणाने चतुःश्लोकी भागवताचा जो उपदेश केला आहे त्यात तो म्हणतो,

**ज्ञानं परम गुह्यं मे यद्विज्ञानसमन्वितम् ।**

**सरहस्यं तदङ्गञ्च गृहाण गदितं मया ।।** भागवत। स्कं. २। अ. ९ श्लो. ३०

अर्थ : हे ब्रह्मदेवा ! विज्ञान व रहस्य यांनी युक्त असलेले आणि धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचे अंग असलेले माझे परमगुह्य ज्ञान तू माझ्याकडून ग्रहण कर. विज्ञानयुक्त ज्ञान म्हटल्यानंतर पुनः परम हे विशेषण लावण्याचे काय कारण? आणि एकदा गुह्य असे म्हटल्यानंतर पुनः रहस्ययुक्त म्हणून द्विरुक्ती करण्याची काय आवश्यकता? अशा प्रकारे आधारभूत असणारे मूळ श्लोकच निरर्थक असतील तर सारा ग्रंथच निरर्थक असणार हे उघड आहे. भागवताचे मूळच असे खोटे असल्याने त्यावरचा वृक्षही खोटाच असणार नाही काय? नारायणाने ब्रह्मदेवाला असा वर दिला आहे की,

**भवान् कल्पविकल्पेषु न विमुह्यति कर्हिचित् ।।** भाग. स्कं. २। अ. ९। श्लो. ३६

"तुला कल्प म्हणजे सृष्टी व विकल्प म्हणजे प्रलय यांमध्ये कधीही मोह होणार नाही." हा वर मिळाला असताही त्याने दशमस्कंधात मोहित होऊन वत्सहरण केले. यापैकी एक गोष्ट खरी व दुसरी खोटी असणार म्हणून दोन्ही गोष्टी खोट्या ठरतात. जर वैकुंठामध्ये (राग) मोह, द्वेष, क्रोध, ईर्ष्या, दुःख वगैरे गोष्टी नाहीत असे म्हणतात, तर मग सनकादिकांना वैकुंठाच्या दारात क्रोध का आला? जर क्रोध आला असेल तर तो स्वर्गच नाही. तेथे जय-विजय हे द्वारपाल होते. स्वामीची आज्ञा पाळणे हे त्यांचे कर्तव्य होते. त्यांनी सनकादिकांना अडविले, हा काय त्यांचा अपराध झाला? त्यांचा अपराध नसताना त्यांना शाप तरी का लागावा? परंतु त्यांना तर "पृथ्वीवर जाऊन पडाल." हा सनकादिकांनी दिलेला शाप लागला. यावरून असे सिद्ध होते की, तेथे पृथ्वी नव्हती. तेथे आकाश, वायू, अग्नी आणि जल ही चारच तत्वे असणार. तर मग वैकुंठाचे दार, मंदिर, आणि पाणी हे कोणाच्या आधाराने राहिले होते? त्यानंतर जेव्हा जयविजयांनी सनकादिकांची स्तुती करून विचारले की, "महाराज, आम्ही पुनः वैकुंठात केव्हा येऊ?" यावर त्यांनी सांगितले की, "जर तुम्ही नारायणाची सप्रेम भक्ती कराल तर सातव्या जन्मात आणि विरोध भक्ती कराल तर तिसऱ्या जन्मात वैकुंठाला परत याल."

येथे विचार करण्यासारखी एक गोष्ट आहे. ती अशी की, जयविजय हे नारायणाचे नोकर होते. त्यांचे रक्षण करणे, त्यांना साह्य करणे हे नारायणाचे कर्तव्य होते. जर कोणी एखाद्याच्या नोकरांना अपराधाशिवाय दु:ख देऊ लागला तर त्या नोकरांच्या मालकाने त्या इसमाला जरब बसविली पाहिजे. तसे तो न करील तर त्याच्या नोकरांची कोणीही दुर्दशा करील. खरे म्हणजे नारायणाने जयविजयांचा सन्मान करून सनकादिकांना चांगली शिक्षा द्यायला हवी होती. कारण त्यांनी आत जाण्याचा हट्ट का धरला? आणि नोकराशी भांडून त्यांना शाप का दिला? जयविजयांच्या ऐवजी सनकादिकांना पृथ्वीवर ढकलून दिले असते तर तो नारायणाचा खरा न्याय झाला असता. नारायणाच्या घरातच एवढा अंधार म्हणजे अन्याय असेल तर जे वैष्णव स्वत:ला त्याचे सेवक समजतात त्यांची जेवढी दुर्दशा होईल तेवढी थोडीच! त्यानंतर विरोधभक्ती करण्याच्या इच्छेने ते दोघे हिरण्याक्ष व हिरण्यकश्यप यांच्या रूपाने जन्मास आले. त्यांच्या पैकी हिरण्याक्षाला वराहाने मारले. ती कथा अशी दिली आहे :-

हिरण्याक्ष पृथ्वीला चटईप्रमाणे गुंडाळून उशाला घेऊन झोपी गेला. विष्णूने वराहाचे म्हणजे रानडुकराचे रूप धारण करून त्याच्या डोक्याखाली असलेल्या पृथ्वीला आपल्या तोंडात पकडले. त्याबरोबर हिरण्याक्ष जागा झाला. मग त्या दोघांचे युद्ध जुंपले. त्यात वराहाने हिरण्याक्षाला मारून टाकले.

येथे असा प्रश्न उपस्थित होतो की, पृथ्वी गोल आहे की चटईसारखी सपाट? या प्रश्नाचे उत्तर पुराणिक लोक देऊ शकणार नाहीत. कारण ते भूगोल विद्येचे शत्रू आहेत. हिरण्याक्षाने पृथ्वीला चटईप्रमाणे गुंडाळून उशाशी घेतले, तर तो स्वत: कशावर झोपला? आणि वराह तरी कशावर पाय देऊन धावत आला? त्याने पृथ्वीला तोंडात धरून ठेवले होते. मग ते दोघे कशावर उभे राहून लढले? तेथे उभे राहता येईल अशी दुसरी जागाच नव्हती. बहुधा भागवतातील पुराणे रचणाऱ्या पुराणकारांच्या छातीवर उभे राहून त्यांनी युद्ध केले असावे आणि खुद्द पुराणकार कशावर झोपला असेल? हे म्हणजे थापाड्यांच्या घरी जमून इतर थापाड्यांनी एकमेकांना लोणकढ्या थापा माराव्यात तशातलेच आहे. अशा मेळाव्यात थापांना काय तोटा?

आता हिरण्यकश्यपूची कथा ऐका. त्याचा प्रल्हाद नावाचा मुलगा पक्का ईश्वर भक्त होता. त्याचा बाप त्याला शिकण्यासाठी शाळेत पाठवीत असे. तेथे प्रल्हाद आपल्या शिक्षकांना सांगत असे की, ''माझ्या पाटीवर 'राम राम' असे लिहून द्या'' त्याच्या बापाला हे कळताच तो प्रल्हादला म्हणाला, ''तू माझ्या शत्रूचे भजन का करतोस?'' परंतु त्याचे म्हणणे प्रल्हादाने ऐकले नाही. तेव्हा हिरण्यकश्यपूने त्याचे हात पाय बांधून त्याला डोंगरावरून खाली फेकून दिले आणि विहिरीत ढकलून दिले. परंतु त्याला काहीही झाले नाही. तेव्हा त्याने एक लोखंडाचा खांब अग्नीमध्ये लाल होईपर्यंत तापविला आणि प्रल्हादाला सांगितले, ''तुझा इष्ट देव राम जर खरा असेल तर तू या खांबाला मिठी मारलीस तरी तुझे अंग भाजणार नाही. प्रल्हाद त्या खांबाला मिठी मारण्यास तयार झाला. परंतु त्याच्या मनात शंका उत्पन्न झाली की, या खांबाला मिठी मारल्यास मी होरपळून जाणार नाही ना? त्याच वेळी नारायणाने त्याला एक चमत्कार दाखविला. त्या तापलेल्या खांबावरून मुंग्यांची एक रांग चालत असलेली त्याला दिसली. ते पाहताच त्याचा निश्चय पक्का झाला आणि त्याने चटकन पुढे होऊन त्या खांबाला मिठी मारली. त्याबरोबर तो खांब दुभंगला. त्यातून नृसिंह प्रकट झाला आणि त्याने हिरण्यकश्यपूचे पोट फाडून त्याला ठार मारले. मग तो प्रल्हादाचे अंग प्रेमाणे चाटू लागला. त्याने प्रल्हादाला वर मागण्यास

सांगितले तेव्हा प्रल्हादाने आपल्या पित्याला सद्‌गती मिळावी, असा वर मागितला. नृसिंहाने त्याला वर दिला की, ''तुझे एकवीस पूर्वज (पिढ्या) सद्‌गतीला जातील.''

आता पहा ! हीही तसलीच भाकडकथा आहे. भागवत वाचणाऱ्या किंवा ऐकणाऱ्या एखाद्या भक्ताला पकडून डोंगरावरून खाली फेकून दिले तर काय होईल? तो जिवंत राहणार नाही. कोणीही नारायण त्याला वाचवायला येणार नाही. तो चक्काचूर होऊन मरून जाईल. प्रल्हादाचा बाप त्याला शिकण्यासाठी शाळेत पाठवीत होता. यात त्याने काय वाईट केले ? आणि तो प्रल्हाद असा मूर्ख की विद्या शिकायची सोडून बैरागी होऊ इच्छित होता. जळत्या खांबावरून मुंग्या चालत होत्या आणि त्याला स्पर्श केल्यानंतरही प्रल्हाद भाजला नाही, ही गोष्ट जो कोणी खरी मानीत असेल त्यालाही जळत्या खांबाला बांधून टाकले पाहिजे. तो जर भाजला नाही तर प्रल्हादाचे अंग पोळले नाही, असे समजता येईल. शिवाय जळत्या खांबात राहिलेला नृसिंह कसा जळून गेला नाही ?

सनकादिकांनी तिसऱ्या जन्मात पुन: वैकुंठाला येण्याचा वर जयविजयांना दिला होता. त्याचा विसर तुमच्या नारायणाला पडला काय ? भागवतात सांगितल्याप्रमाणे ब्रह्मा, प्रजापती, कश्यप, हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपू या चारच पिढ्या झाल्या असताना नृसिंहाने कुठल्या एकवीस पिढ्यांचा उद्धार केला ? खुद्द प्रल्हादाची पिढी ही पाचवी पिढी होय. मग एकवीस पिढ्यांना सद्‌गती मिळेल असे सांगणे खुळेपणच नव्हे काय? पुढे तेच हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपू हे रावण कुंभकर्ण, शिशुपाल, दंतवक्र (वक्रदंत) झाले असे सांगितले आहे. मग नृसिंहाचा वर कोठे गेला ? अशा मूर्खपणाच्या गोष्टी मूर्ख लोकच सांगतात, ऐकतात व मानतात. विद्वान लोक तसे करत नाहीत.

पूतना व अक्रूर यांच्याविषयी भागवतात अशाच गप्पा आहेत.

**रथेन वायुवेगेन ।** भाग. स्कं. १० अ. ३९ श्लो. ३८

**जगाम गोकुलं प्रति ।।** भाग. स्कं. १० अ. ३८ श्लो. २४

कंसाच्या सांगण्यावरून वायुवेगाने धावणाऱ्या घोड्याच्या रथात बसून अक्रूर सूर्योदय होत असतांना निघाला आणि चार मैल दूर असलेल्या गोकुळात सूर्यास्ताच्या वेळी पोचला. बहुधा ते घोडे भागवत लिहिणाऱ्या भोवती प्रदक्षिणा घालीत राहिले असावेत किंवा वाट चुकून भागवतकाराच्या घरी जाऊन घोडे हाकणारे सारथी व अक्रूर झोपले असावेत. पुतनेचे शरीर सहा कोस रूंद व त्याहून लांब होते असे भागवतात लिहिले आहे. श्रीकृष्णाने तिला मारून मथुरा व गोकुळ यांच्यामध्ये टाकले म्हणे. जर खरोखरीच तिचे शरीर एवढे अवाढव्या असते तर मथुरा व गोकुळ ही दोन्ही गावे त्या शरीराखाली दबली गेली असती आणि त्यात पुराणकाराचे घरही सापडून चक्काचूर झाले असते. अजामिळाची कथाही अशीच विसंगत आहे. त्याने नारदाच्या सांगण्यावरून आपल्या मुलाचे नाव 'नारायण' असे ठेवले होते. मरणाच्या वेळी त्याने आपल्या मुलाला हाक मारली. ती ऐकून नारायण म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वर धावून आला. नारायणाला अजामिळाच्या अंत:करणातील भावना कळली नाही काय ? अजामीळ त्याच्या मुलाला हाक मारीत आहे, आपल्याला नव्हे. एवढेही परमेश्वराला समजले नाही काय ? नामाचे माहात्म्य एवढे मोठे असेल तर आजकालही नारायणाचे स्मरण करणाऱ्यांची दु:खे दूर करण्यासाठी परमेश्वर का धावून येत नाही ? ही गोष्ट खरी असली तर कैदी लोक नारायण नारायण असा जप करून तुरूंगातून का सुटून जात नाहीत ?

अशाच प्रकारे ज्योतिषशास्त्राच्या विरुद्ध सुमेरू पर्वताचे परिमाण लिहिले आहे. तसेच, प्रियव्रत राजाच्या रथाच्या चाकोरीतून समुद्र निर्माण झाले, एकूण एकोणपन्नास कोटी योजन पृथ्वी आहे वगैरे असंख्य भाकडकथा भागवतात आहेत. त्याची मोजदादही करता येणार नाही.

हे भागवत बोबदेवाने (बोपदेवाने) रचले आहे. त्याचा भाऊ जयदेव याने 'गीतगोविंद' लिहिले आहे. 'हिमाद्री' नावाचा एक ग्रंथ त्याने रचला आहे. त्यात तो लिहितो की, 'श्रीमद्भागवत पुराण मी रचले आहे. तशा अर्थाचे श्लोक त्या ग्रंथात आहेत. त्या पुस्तकाची (पोथीची) तीन पाने आमच्याजवळ होती. त्यांतील एक पान आता हरवले आहे. त्या पानामध्ये त्याने जे काही लिहिले होते त्याचा सारांश सांगणारे दोन श्लोक आम्ही बनविले आहेत. ते पुढे देत आहोत. ज्यांना मूळ मजकूर पाहावयाचा असेल त्यांनी 'हिमाद्री' ग्रंथाचे अवलोकन करावे.' आम्ही रचलेले श्लोक असे आहेत,

**हिमाद्रेः सचिवस्यार्थे सूचना क्रियतेऽधुना।**
**स्कन्धाऽध्यायकथानां च यत्प्रमाणं समासतः ॥१॥**
**श्रीमद्भागवतं नाम पुराणं च मयेरितम्।**
**विदुषा बोबदेवेन श्रीकृष्णस्य यशोन्वितम् ॥२॥**

त्या हरवलेल्या पानात अशाच प्रकारचे श्लोक होते. राजाचा सचिव हिमाद्री याने बोबदेव पंडिताला सांगितले की, ''तू रचलेल्या श्रीमद्भागवताचे संपूर्ण श्रवण करण्यास मला सवड नाही. म्हणून तू संक्षिप्तपणे श्लोकबद्ध सूचीपत्र तयार कर. ते पाहून श्रीमद्भागवताची कथा मला थोडक्यात समजाऊन घेता येईल.'' म्हणून बोबदेवाने एक सूचीपत्र तयार केले. त्यातील हरवलेल्या एका पानात दहा श्लोक म्हणून अकराव्या श्लोकापासून पुढचे श्लोक खाली उद्‌धृत करीत आहोत. हे खाली लिहिलेले सर्व श्लोक बोबदेवाने रचले आहेत :-

**बोधयन्तीति हि प्राहुः श्रीमद्‌भागवतं पुनः।**
**पञ्च प्रश्नाः शौनकस्य सूतस्यात्रोत्तरं त्रिषु ॥११॥**
**प्रश्नावतारयोश्चैव व्यासस्यानिर्वृतिः कृतात्।**
**नारदस्यात्र हेतूक्तिः प्रतीत्यर्थं स्वजन्म च ॥१२॥**
**सुप्तघ्नं द्रोण्यभिभवस्तदस्त्रात्पाण्डवा वनम्।**
**भीष्मस्य स्वपदप्राप्तिः कृष्णस्य द्वारकागमः ॥१३॥**
**श्रोतुः परीक्षितो जन्म धृतराष्ट्रस्य निर्गमः।**
**कृष्णमर्त्यत्यागसूचा ततः पार्थमहापथः ॥१४॥**
**इत्यष्टादशभिः पादैरध्यायार्थः क्रमात् स्मृतः।**
**स्वपरप्रतिबन्धोनं स्फीतं राज्यं जहौ नृपः ॥१५॥**
**इति वै राज्ञो दार्ढ्योक्तौ प्रोक्ता द्रौणिजयादयः ॥१६॥**
**इति प्रथम स्कन्धः ॥१॥**

याप्रमाणे बारा स्कंधांचे सूचिपत्र बोबदेव पंडिताने तयार करून हेमाद्रीच्या सचिवाला दिले. कोणाला ते

सविस्तर पाहावयाचे असेल तर त्याने बोबदेवकृत हिमाद्री नामक ग्रंथात ते पाहावे. अशाच प्रकारे इतर पुराणांमध्येही भाकडकथा भरलेल्या आहेत. एकाहून एक पोरकट चमत्कार त्यात आहेत.

श्रीकृष्णाचा जो इतिहास महाभारतात दिलेला आहे तो अत्यंत उत्तम आहे. त्यांचे गुण, कर्म, स्वभाव व चारित्र्य ही महापुरुषाला शोभावीत अशी आहेत. त्यामध्ये श्रीकृष्णाने जन्मापासून मरणापर्यंत कसलेही अधर्माचरण केले नाही, अथवा कोणतेही दुष्कृत्य त्याच्या हातून घडले नाही, असे लिहिले आहे. परंतु या भागवतकाराने वाटेल ते अनुचित दोष कृष्णाच्या माथी मारले आहेत. दूध, दही, लोणी इत्यादींची चोरी, कुब्जादासीशी समागम, परस्त्रियांशी रासक्रीडा इत्यादी खोटेच दोष श्रीकृष्णावर लादले आहेत. ते सारे वाचून व इतरांना वाचून दाखवून, स्वतः ऐकून व इतरांना ऐकवून इतर पंथाच्या लोकांनी श्रीकृष्णाची बदनामी चालविली आहे. भागवत नसते तर श्रीकृष्णासारख्या महात्म्यांची खोटी निंदा मुळीच झाली नसती. शिवपुराणामध्ये बारा ज्योतिर्लिंगाची कथा आहे. ती कथा सर्वथैव अशक्य कोटीतील आहे. नाव ठेवले आहे ज्योतिर्लिंग. परंतु त्यात प्रकाशाचा लवलेश नाही. रात्रीच्या अंधारात दिव्याचा उजेड नसेल तर ते लिंग दिसत नाही. त्या साऱ्या पुराणकारांच्या थापा आहेत.

## सूर्यादी ग्रहपूजा समीक्षा

**(प्रश्न)** जेव्हा वेदाध्ययन करण्याची क्षमता माणसांमध्ये राहिली नाही तेव्हा स्मृतींची रचना केली गेली. जेव्हा स्मृतींचे अध्ययन करण्याएवढी बुद्धी राहिली नाही तेव्हा शास्त्रे लिहिली गेली. जेव्हा शास्त्राध्ययन करण्याचे सामर्थ्यही नाहीसे झाले तेव्हा पुराणे रचली गेली. स्त्रिया आणि शूद्र यांना वेद वाचण्याचा किंवा ऐकण्याचा अधिकार नसल्यामुळे केवळ त्यांच्यासाठीच पुराणे रचण्यात आली.

**(उत्तर)** तुमचे हे म्हणणे चुकीचे आहे. कारण सामर्थ्य हे अध्ययन-अध्यापनानेच प्राप्त होत असते आणि वेद वाचण्याचा व ऐकण्याचा अधिकार सर्वांना आहे. प्राचीन काळी गार्गी वगैरे स्त्रियांनी वेदाध्ययन केले होते; आणि छांदोग्यमध्ये जानश्रुती नावाच्या शूद्रानेही रैक्यमुनींकडे वेदाध्ययन केले होते. यजुर्वेदाच्या २६व्या अध्यायातील दुसऱ्या मंत्रात असे स्पष्ट सांगितले आहे की वेदपठन व वेदश्रवण करण्याचा अधिकार मनुष्यमात्राला आहे. अशा स्थितीत ज्यांनी पुराणासारखे असत्य ग्रंथ लिहिले आणि लोकांना सत्यग्रंथापासून विमुख करून आपल्या स्वार्थाच्या जाळ्यात अडकविले, त्यांना महापापी म्हणावयास नको काय? पाहा! या पुराणिकांनी नवग्रहांचे भ्रमाचे जाळे पसरून निर्माण करून विद्याहीन लोकांना कसे जखडून टाकले आहे :-

**'आ कृष्णेन रर्जसा.' ॥१॥** सूर्याचा मंत्र यजु. अ. ३३। मं. ४३

**'इमं देवाऽअसपत्न९ सुवध्वम्.' ॥२॥** चंद्राचा मंत्र यजु. अ. ९। मं. ४०

**'अग्निर्मूर्द्धा दिवः ककुत्पतिः.' ॥३॥** मंगळाचा मंत्र यजु. अ. ३। मं. १२

**'उद्बुध्यस्वाग्ने.' ॥४॥** बुधाचा मंत्र यजु. अ. १५। मं. ५४

**'बृहस्पते अति यदर्यो.' ॥५॥** बृहस्पतिचा मंत्र यजु. अ. ६। मं. ३

**'शुक्रमन्धसः.' ॥६॥** शुक्राचा मंत्र यजु. अ. १९। मं. ७५

**'शन्नो देवीरभिष्टय.' ॥७॥** शनीचा मंत्र यजु. अ. २७ मं. १२

**'कर्या नश्चित आ भुव.'** ॥८॥ राहूचा मंत्र यजु. अ. २७। मं. ३९

**'केतुं कृण्वन्नकेतवे.'** ॥९॥ यास केतूची कण्डिका म्हणतात. यजु. अ. २९। मं. ३७

(आ. कृष्णेन.) सूर्य आणि भूमीचे आकर्षण. ॥१॥ हा मंत्र चंद्रासाठी आहे असे समजतात. त्यात राजगुणाचे विधान आहे. ॥२॥ मंगळासाठी याचा जप करतात. यात अग्नीचे वर्णन आहे. ॥३॥ हा मंत्र बुधासाठी आहे असे समजातात. यात यजमान वर्णन आहे. ॥४॥ गुरूसाठी या मंत्राचा जप केला जातो. यात विद्वानांचे गुण वर्णिले आहेत. ॥५॥ हा मंत्र शुक्रासाठी जपतात. त्यात अन्न व वीर्य यांची चर्चा आहे. ॥६॥ हा मंत्र शनीसाठी आहे असे समजतात. यात जल, प्राण व परमेश्वर यांचे वर्णन आहे. ॥७॥ हा मंत्र राहूसाठी आहे अशी समजूत आहे. यात मित्रविषयक चर्चा आहे. ॥८॥ हा मंत्र केतूसाठी आहे असे मानले जाते. परंतु त्यात ज्ञानग्रहणासंबंधी विवेचन आहे. सारांश, या मंत्राचा ग्रहांशी काहीही संबंध नाही. परंतु त्यांचा अर्थ न समजल्यामुळे पुराणिक भ्रमात वावरत आहेत.

**(प्रश्न)** ग्रहांचा काही परिणाम माणसांवर होतो की नाही?

**(उत्तर)** हे भटभिक्षुक जसे सांगतात तसा परिणाम मुळीच होत नाही. परंतु नैसर्गिक परिणाम होत असतात. उदाहरणार्थ, सूर्याच्या किरणांपासून उष्णता व चंद्राच्या किरणांपासून शीतलता प्राप्त होते. तसेच ऋतुचक्रानुसार हवामानात जे बदल घडून येत असतात त्यांच्यामुळे उष्णता व थंडी निर्माण होऊन माणसाच्या प्रकृतीच्या अनुकूल-प्रतिकूल परिणाम होऊन त्याला सुख किंवा दुःख होत असते. पण जोशीबुवा लोकांना फसविण्यासाठी सांगतात, ''महाराज! शेटजी! यजमान! आज तुमच्या पत्रिकेतील चंद्र, सूर्य इत्यादी क्रूर ग्रह अष्टमस्थानी आले आहेत. शनीची साडेसाती सुरू झाली असून त्याची वक्रदृष्टी तुमच्या पायावर पडली आहे. त्यामुळे तुम्हाला अडीच वर्षे फारच त्रास होणार आहे. तो तुम्हाला घरदार सोडायला लावून देशोधडीला लावील. मात्र तुम्ही दान, जप, पूजा, पाठ वगैरे करून ग्रहांची शांती कराल तर साऱ्या दुःखापासून तुमचा बचाव होईल.''

या लोकांना सांगितले पाहिजे की, ''अहो भटजीबुवा! तुमचा आणि ग्रहाचा काय संबंध? ग्रह ही काय चीज आहे?''

**(जोशीबुवा) - दैवाधीनं जगत्सर्वं मन्त्राधीनाश्च देवताः।**
**ते मन्त्रा ब्राह्मणाधीनास्तस्माद् ब्राह्मणदैवतम्॥**

पाहा! केवढा मोठा पुरावा आहे! सारे जग देवांच्या आधीन आहे. सगळे देव मंत्रांच्या आधीन आहेत आणि ते मंत्र ब्राह्मणांच्या आधीन आहेत. म्हणून ब्राह्मणांना देव असे म्हणतात. वाटेल त्या देवाला मंत्र सामर्थ्याने बोलावून, प्रसन्न करून घेऊन आपले काम त्यांच्याकडून करवून घेण्याचा अधिकार आम्हालाच आहे. आमच्याजवळ मंत्रसामर्थ्य नसते तर तुमच्या सारख्या नास्तिकांनी आम्हाला या जगात राहूच दिले नसते.

**(सत्यवादी)** चोर, दरोडेखोर, दुष्कृत्ये करणारे हे सारेही तुमच्या देवांच्या आधीन असतील ना? मग देवच त्यांच्याकडून दुष्कृत्ये करवून घेत असतील नाही? तसे असेल तर तुमचे देव आणि राक्षस यांच्यामध्ये काय फरक? मंत्र तुमच्या कह्यात असतील तर तुम्ही त्यांच्याकडून वाटेल ती कामे करवून घेऊ शकत असणार. मग त्या मंत्रांच्या साह्याने देवांना वश करून घेऊन तुम्ही राजे लोकांचे खजिने आणून आपल्या घरात ते का

भरून ठेवीत नाही ? आणि स्वस्थ बसून आनंद का उपभोगीत नाही ? असे घरोघरी जाऊन शनीसाठी तेलाचे छायादान मागण्यासाठी तुम्ही दारोदार भीक कशाला मागता ? ज्याला तुम्ही धनदेवता समजता त्याला आपल्या मंत्राने वश करून घेऊन भरपूर धन मिळवा की ! बिचाऱ्या गरिबांना का लुटता ?

तुम्हाला दान दिल्याने ग्रह प्रसन्न होतात आणि न दिल्याने रुष्ट होतात असे तुम्ही म्हणता. तर मग सूर्य वगैरे ग्रहांची प्रसन्नता व अप्रसन्नता कशी असते ते आम्हाला प्रत्यक्ष दाखवा. सूर्य, चंद्र वगैरे ग्रह ज्याच्या अष्टम स्थानी (म्हणजे अनुकूल) आहेत असा एक माणूस आणि हे ग्रह ज्याच्या तृतीय स्थानी (म्हणजे प्रतिकूल) आहेत असा दुसरा माणूस घ्या. त्या दोघांना ऐन ज्येष्ठाच्या भर दुपारच्या उन्हात तापलेल्या जमिनीवरून अनवाणी चालायला लावा. आता सूर्य ज्याला अनुकूल आहे त्याचे शरीर व पाय होरपळता कामा नयेत; आणि तो ज्याला प्रतिकूल आहे त्याचे पाय होरपळले पाहिजेत. तसेच पौष महिन्यात पौर्णिमेच्या रात्री त्या दोघांना रात्रभर उघड्या अंगाने उभे केले आणि त्यापैकी एकाला थंडी वाजली व दुसऱ्याला वाजली नाही तर ग्रह हे क्रूर अथवा सौम्य दृष्टीचे असतात हे तुमचे म्हणणे आम्ही मान्य करू.

ग्रह तुमचे नातेवाईक किंवा इष्टमित्र आहेत काय ? तुमचे टपाल किंवा तार त्यांच्याकडे जाते आणि त्यांच्याकडून तुम्हाला पत्र, तार वगैरे येते काय ? किंवा तुम्ही त्यांच्याकडे जाता अथवा ते तुमच्याकडे येतात ? तुमच्याजवळ मंत्रसामर्थ्य असेल तर तुम्ही स्वत: राजा किंवा धनाढ्य का होत नाही? किंवा शत्रूंना मंत्रसामर्थ्याने आपल्या आधीन का करीत नाही ?

वेद व ईश्वराच्या आज्ञेविरुद्ध फलज्योतिषाच्या अशा प्रकारच्या पोपलीला चालवणारे नास्तिकच होत. ज्याला ग्रहदशा प्राप्त झालेली आहे त्याने तुम्हाला दानधर्म करण्याऐवजी स्वत:च त्या दानाचा उपभोग घेतल्यास काय हरकत ? ''आम्हालाच दान दिले तर ग्रह प्रसन्न होतात, इतरांना दिल्यास ते प्रसन्न होत नाहीत,'' असे तुमचे म्हणणे असेल तर काय तुम्ही ग्रहांचा मक्ता घेतला आहे ? जर तुम्ही तसा मक्ता घेतला असेल तर सूर्य वगैरे ग्रहांना तुम्ही आपल्या घरी बोलावून घ्या आणि जळून मरा.

खरी गोष्ट अशी आहे की, सूर्यादी लोक चेतन नसून जड (अचेतन) आहेत. ते कोणालाही सुख अथवा दु:ख देण्याचा प्रयत्न करू शकत नाहीत. परंतु ग्रहदानावर पोट भरणारे तुम्ही लोक मात्र इतरांना छळणारे मूर्तिमंत ग्रह आहात. ग्रह या शब्दाचा अर्थही तुम्हाला लागू पडतो. 'ये गृहणन्ति ते ग्रहा:' म्हणजे जे (दान) ग्रहण करतात त्यांना ग्रह असे म्हणतात. जोपर्यंत तुमचे पाय राजे, श्रीमंत, शेट, सावकार व गरीब लोकांपर्यंत जाऊन पोचत नाहीत तोपर्यंत कुणालाही नवग्रहांची आठवण देखील होत नाही. जेव्हा तुमही साक्षात सूर्य, शनी वगैरे ग्रहांचे मूर्तिमंत क्रूर रूप धारण करून त्यांच्या राशीला जाऊन बसता तेव्हा दान घेतल्याखेरीज त्यांना मुळीच सोडीत नाही. जे लोक तुमच्या कचाट्यात सापडत नाहीत त्यांना तुम्ही नास्तिक म्हणून त्यांची निंदा करीत फिरता.

**(जोशीबुवा)** ज्योतिषाचे प्रत्यक्ष फळ तुम्हीच पाहा ना ! आकाशात राहणारे सूर्य, चंद्र, राहू, केतू यांच्या संयोगामुळे जे ग्रहण घडून येते त्यासंबंधी आम्ही आधीच सांगू शकतो. जसे ते ग्रहण आम्ही वर्तविल्याप्रमाणे ठराविक वेळी दिसते तसे ग्रहांचे फळही प्रत्यक्ष दिसते. ग्रहांमुळेच माणसे श्रीमंत, गरीब, राजा, रंक, सुखी किंवा दु:खी होतात.

**(सत्यवादी)** ग्रहणरूपी जे प्रत्यक्ष फळ दिसते ते गणितविद्येचे फळ आहे, फलज्योतिषाचे नव्हे. गणितविद्या ही खरी आहे. परंतु फलज्योतिष विद्या स्वाभाविक संबंधजन्य गोष्टी बगळता साफ खोटी आहे. अनुलोम किंवा प्रतिलोम गतीने फिरणारे पृथ्वी व चंद्र हे ग्रह अमुक वेळी कोठे असतील ते गणिताच्या साह्याने माहीत होते. त्यावरून अमक्या वेळी अमक्या देशात खग्रास किंवा खंडग्रास सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण दिसेल असे खूप आधी सांगता येते. जसे,

**छादयत्यर्कमिन्दुर्विधुं भूमिभाः ॥** ग्रहलाघव अ. ५। व. ४

हे सिद्धान्त शिरोमणीचे वचन आहे. सूर्यसिद्धान्त वगैरे ग्रंथांमध्येही असेच सांगितले आहे. त्याचा अर्थ असा की, "जेव्हा सूर्य व भूमी (पृथ्वी) यांच्यामध्ये चंद्र येतो तेव्हा सूर्यग्रहण होते आणि जेव्हा सूर्य व चंद्र यांच्यामध्ये पृथ्वी येते तेव्हा चंद्रग्रहण होते." म्हणजे असे की, चंद्राची छाया (सावली) पृथ्वीवर पडली की सूर्यग्रहण आणि पृथ्वीची सावली चंद्रावर पडली की चंद्रग्रहण होते. सूर्य स्वतःच प्रकाशरूप असल्यामुळे त्याच्यावर कोणाची छाया पडू शकत नाही. परंतु ज्याप्रमाणे दिवा व आपण यांच्यामध्ये एखादी वस्तू धरल्यास दिवा तिच्या आडोश्याला जातो व तो आपल्याला दिसत नाही. त्याचप्रमाणे सूर्यग्रहणामध्ये पृथ्वी व सूर्य यांच्यामध्ये चंद्र आल्याने सूर्य दिसेनासा होतो व आपल्या बाजूला सावली पडते त्यालाच सूर्यग्रहण म्हणतात. चंद्रग्रहणाच्या वेळी पृथ्वीमुळे अशीच स्थिती घडून येते.

माणसे श्रीमंत, गरीब, प्रजा, राजा, रंक वगैरे बनतात ती त्यांच्या कर्मांमुळे बनतात. ग्रहांमुळे नव्हे. अनेक ज्योतिषी आपल्या मुला-मुलींची लग्ने ग्रहांचे गणित मांडून, शुभ मुहूर्तावर करतात. तरीही त्यापैकी काही लग्ने पतिपत्नींमधील बेबनावामुळे अयशस्वी होतात. काही मुली विधवा होतात तर काही पुरुष विधुर होतात. फलज्योतिष खरे असते तर असे का झाले असते ? म्हणून कर्माची गती खरी असून ग्रहांची गती सुखदुःखाला कारणीभूत नसते असेच म्हणावे लागते.

खरे म्हणजे ग्रह आणि पृथ्वी ही दोन्ही अवकाशाच्या पोकळीत एकमेकांपासून इतकी दूर आहेत की कर्त्ता व कर्म या नात्याने त्यांचा परस्परांशी कसलाही साक्षात संबंध असू शकत नाही. कर्म करणारा व त्या कर्माचे फळ भोगणारा जीव आहे आणि कर्मांची (सुख-दुःखरूप) फळे भोगावयास लावणारा परमात्मा आहे.

ग्रहांची फळे माणसाला भोगावी लागतात असे तुम्ही मानीत असाल तर या प्रश्नाचे उत्तर द्या की, ज्या क्षणी एका माणसाचा जन्म होतो, त्या क्षणाला तुम्ही 'ध्रुवात्रुटी' समजून त्याची जन्मकुंडली मांडता त्याच क्षणी या पृथ्वीच्या पाठीवर दुसऱ्या एखाद्या माणसाचा जन्म होतो की नाही ? होत नाही असे म्हणणे असेल तर ते साफ खोटे आहे आणि जर होतो असे तुम्ही म्हणत असाल तर एका चक्रवर्ती राजाच्या जन्मक्षणी जगामध्ये अन्यत्र जन्माला येणारा दुसरा माणूस चक्रवर्ती राजा का होत नाही ? आता तुम्ही जर म्हणत असाल की, सारी पोट भरण्यासाठी आम्ही चालविलेली तिकडम बाजी आहे, तर मात्र तुमचे म्हणणे कोणीही मान्य करील.

## मृतक-श्राद्ध समीक्षा

**(प्रश्न)** गरुडपुराणही खोटे आहे काय ? **(उत्तर)** होय. ते साफ खोटे आहे.

**(प्रश्न)** मग मेलेल्या जीवाची काय गती होते ?

**(उत्तर)** त्याने जशी कर्मे केली असतील तशी त्याची गती होणार.

**(प्रश्न)** गरुड पुराणात असे लिहिले आहे की, यमपुरीचा राजा यम असून चित्रगुप्त हा त्याचा मंत्री आहे. काजळाच्या डोंगरासारखे प्रचंड व भयंकर असे त्याचे दूत शरीरधारी जीवाला पकडून घेऊन जातात; आणि त्यांच्या पापपुण्यांनुसार त्यांना नरकात किंवा स्वर्गात टाकतात. म्हणून मृतात्म्यासाठी दान, पुण्य, श्राद्ध, तर्पण वगैरे करतात आणि वैतरणी नदी तरून जाण्यासाठी गोदान केले जाते या सगळ्याच गोष्टी खोट्या कशा असतील ?

**(उत्तर)** या सगळ्या भाकडकथा भटाभिक्षुकांनी रचलेल्या आहेत. इतरत्र जीव यमलोकी जातात आणि धर्मराज (यम) व चित्रगुप्त वगैरे त्यांचा न्यायनिवाडा करतात. मग जे जीव यमलोकात राहतात आणि पापे करतात त्यांचा न्यायनिवाडा करणारा दुसरा एखादा यमलोक असला पाहिजे असे मानावे लागेल. तसेच यमदूतांची शरीरे पर्वतप्राय असतील तर ती दिसत का नाहीत ? आणि मरणाऱ्या जीवांना नेण्यासाठी ते त्यांच्या घरात कसे जातात? त्यांच्या दारातून त्यांचे बोट देखील आत शिरणार नाही आणि लहान गल्लीबोळातून जाताना ते अडकून कसे बसत नाहीत ? तुम्ही असे म्हणाल की, ते सूक्ष्मदेह धारण करतात. मग त्यांच्या मूळच्या पर्वतमय शरीरातली अवाढव्य हाडे भटजीबुवा आपल्या घराखेरीज दुसरीकडे कोठे ठेवणार ?

जेव्हा अरण्यात आग लागते तेव्हा किडे, मुंग्या वगैरे क्षुद्र जीव मोठ्या संख्येने मरतात. त्यांना यमलोकी घेऊन जाण्यासाठी असंख्य यमदूतांना तेथे जावे लागत असणार. डोंगराएवढे प्रचंड यमदूत तेथे एकदम गेल्याने सर्वत्र अंधार पसरत असणार. त्या अंधारात आपापल्या वाट्याच्या जीवांना पकडण्यासाठी ते धावपळ करीत असताना त्यांची एकमेकांशी टक्कर होत असणार. पर्वतांची मोठमोठी शिखरे मोडून पृथ्वीवर पडतात तसे या यमदूतांचे अवयव गरुडपुराण वाचणाऱ्या व ऐकणाऱ्या लोकांच्या अंगणात पडतील तर त्यांच्याखाली दबून हे लोक मरून जातील किंवा ते अवयव त्यांच्या घराच्या दारात अथवा रस्त्यात पडले तर वाटच बंद होऊन जाईल. मग ते घरातून कसे बाहेर पडतील अथवा रस्त्याने कसे चालतील ?

श्राद्ध, तर्पण, पिंडदान वगैरे त्या मृत जीवांपर्यंत जाऊन मुळीच पोचत नाही. मात्र मृत जीवांचे प्रतिनिधी बनलेल्या भोजनभाऊ भटांच्या घरी, पोटात व हातात जाऊन ते पोचते. वैतरणी नदी तरून जाण्यासाठी दान केलेली गाय भटजीबुवांच्या घरी किंवा कसायाच्या खाटिकखाण्यात जाऊन पोचते. ती गाय वैतरणीच्या काठी न जाता येथेच राहते. मग कुणाची शेपटी पकडून तुम्ही वैतरणी पार करणार ? शिवाय ज्या हाताने तिची शेपटी पकडायची तो हात तर येथेच जाळून किंवा पुरून टाकलेला असतो. मग गाईची शेपटी कशी पकडणार ?

हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी एक गोष्ट मी सांगतो. एक जाट (शेतकरी) होता. त्याच्या घरी एक उत्कृष्ट गाय होती. ती रोज वीस शेर दूध देत असे. तिचे दूध अत्यंत स्वादिष्ट होते. कधीकधी ते भटजी महाराजांनाही प्यायला मिळत असे. तो पुरोहित मनात म्हणे, "या जाटाचा म्हातारा बाप जेव्हा मरायला टेकेल तेव्हा याच गाईचे दान करायला मी त्याला सांगेन." थोड्याच दिवसात दैवयोगाने त्या जाटाचा म्हातारा बाप मरायला टेकला. त्याची वाचा बंद झाली आणि त्याला खाटेवरून काढून जमिनीवर झोपविण्यात आले. याचा अर्थ असा की, त्याचा अंतराळ जवळ आला होता. जाटाचे नातेवाईक व इष्टमित्र गोळा झाले होते. त्यावेळी पुरोहित मोठ्याने ओरडून म्हणाला, "अहो यजमान ! आता तुम्ही याच्या हातून गोदान करवा." जाटाने १० रुपये काढून बापाच्या हातावर ठेवले आणि पुरोहिताला सांगितले, "म्हणा आता गोदानाचा संकल्प !" पुरोहित म्हणाला, "वाहवा!

बाप काय वारंवार मरतो ? तुम्ही यावेळी एक खरीखुरी गाय आणा. ती दूध देणारी असावी, म्हातारी नसावी. ती सर्व दृष्टींनी उत्तम असली पाहिजे. अशाच गाईचे दान करावयाचे असते.''

**(जाट)** आमच्या जवळ तर एकच गाय आहे. तिच्याशिवाय आमच्या मुलाबाळांचा सांभाळ होणार नाही. म्हणून मी ती गाय देणार नाही. तरीपण तुमचेही राहू द्या आणि आमचेही राहू द्या. हे २० रुपये घ्या आणि संकल्प सांगा. या वीस रुपयांची दुसरी दुभती गाय तुम्ही विकत घ्या.

**(पुरोहित)** वा ! वा ! तुम्ही तुमच्या बापापेक्षा गाईचे महत्त्व जास्त समजता काय ? आपल्या बापाने वैतरणी नदीत बुडून दुःख भोगावे, अशी तुमची इच्छा आहे काय ? चांगले सुपुत्र आहात की तुम्ही !

हे ऐकताच त्या जाटाचे नातेवाईक पुरोहिताच्या बाजूने बोलू लागले. कारण त्याने त्यांना आधीच शिकवून ठेवले होते. त्याने खूण करताच ते त्याच्यासारखे बोलू लागले आणि तीच गाय पुरोहितास द्यायला लावली. त्यावेळी जाट काही बोलला नाही. थोड्या वेळाने त्याचा बाप मेला. मग त्या पुरोहिताने ती गाय, तिचे वासरू व दूध काढण्याची कासंडी ताब्यात घेतली आणि तो घरी गेला. तेथे त्याने गायीला बांधले आणि कासंडी घरात ठेवून तो पुन: जाटाच्या घरी आला. तेथून तो प्रेताबरोबर स्मशानात गेला आणि त्याने त्याचा दहनविधी करविला. तेथेही त्याने थापा मारून दक्षिणा उकळली. त्यानंतर दश गात्र, सपिंडी (पिंडदान) वगैरे अंत्यसंस्काराच्या नावाखालीही पुरोहिताने जाटाला खूप लुबाडले. महाब्राह्मणांनीही धर्माच्या नावावर त्याला लुटले आणि खादाड व भिकारी यांनी भरपूर गोडधोड खाऊन घेतले. हे सारे चालू असताना जाटाने इकडून-तिकडून दूध मागून आणून कसेबसे भागविले. सगळे अंत्यसंस्कार पूर्ण झाल्यावर चौदाव्या दिवशी सकाळी जाट पुराहिताच्या घरी गेला. त्यावेळी गाईची धार काढून, कासंडी भरून पुरोहित ते दुध घरात नेत होता. इतक्यात जाट तेथे जाऊन पोचला. त्याला पाहून पुरोहित म्हणाला, 'या यजमान ! बसा !'

**(जाट)** भटजीबुवा ! तुम्ही ही जरा इकडे या. **(पुरोहित)** हे दूध घरात ठेवून येतो.

**(जाट)** छे ! छे ! ती दुधाची कासंडी घेऊनच इकडे या.

यावर पुरोहिताने 'ठीक आहे' असे म्हणून तो जाटाजवळ बसला. त्याने दुधाची कासंडी जाटासमोर ठेवली.

**(जाट)** भटजीबुवा ! तुम्ही मोठेच खोटारडे आहात.

**(पुरोहित)** मी काय खोटेपणा केला ?

**(जाट)** तुम्ही मला असे सांगा की, तुम्ही माझी गाय कशासाठी घेतली होती ?

**(पुरोहित)** तुमच्या वडिलांना वैतरणी नदी तरून जाता यावी म्हणून.

**(जाट)** तर मग तुम्ही ती गाय वैतरणीच्या काठी का पोचविली नाही ? आम्ही तुमच्या भरवशावर राहिलो आणि तुम्ही तर ती गाय आपल्या घरी आणून बांधली. माझ्या बापाला वैतरणी पार करताना किती त्रास झाला असेल कोण जाणे.

**(पुरोहित)** छे: ! छे: ! तुम्ही केलेल्या दान-पुण्याच्या प्रभावाने दुसरी एक गाय तेथे गेली असणार आणि तिने तुमच्या वडिलांना पैलतीराला नेऊन पोचविले असणार.

**(जाट)** वैतरणी नदी येथून किती दूर आणि कोणत्या बाजूला आहे ?

**(पुरोहित)** वैतरणी येथून सुमारे तीस कोटी कोस दूर आहे. कारण पृथ्वी एकूण एकोणपन्नास कोटी योजने आहे; आणि तिच्या दक्षिण नैऋत्येला वैतरणी नदी आहे.

**(जाट)** इतक्या अंतरावरून तुमच्याशी पत्रव्यवहार चालत असेल, नाही ? पत्र किंवा तार पाठवून गोदान झाल्याचे तुम्ही कळविले असेल आणि तिकडून त्या पुण्याची गाय बनली आणि तिने अमक्याच्या बापाला पैलतीराला नेऊन पोचविले असे उत्तर आले असेल. ते उत्तर मला दाखवा बघू ?

**(पुरोहित)** आमच्या जवळ गरुड पुराणातील लिखाणाखेरीज दुसरा कसलाच पुरावा नाही. पत्र किंवा तार आलेली नाही.

**(जाट)** गरुड पुराणात जे काही लिहिले आहे ते खरे आहे ते आम्ही खरे कसे मानावे ?

**(पुरोहित)** जसे इतर सर्व लोक मानतात तसे.

**(जाट)** तो ग्रंथ तुमच्या पूर्वजांनी तुम्हाला पोट भरता यावे म्हणून रचला आहे. कारण पित्याला आपल्या पुत्राखेरीज दुसरे कोणीही प्रिय नसते. जेव्हा माझे बाबा पत्राने किंवा तारेने गाय घेऊन यायला कळवितील तेव्हा मी गाईला घेऊन वैतरणी नदीच्या काठी जाईन आणि त्यांना पैलतीराला पोचवून गाईला परत घेऊन येईन. मग मी माझ्या मुलाबाळांसह तिचे दुध पिईन. आणा ती कासंडी इकडे.

असे म्हणून तो जाट दुधाने भरलेली कासंडी, गाय व तिचे वासरू घेऊन आपल्या घरी जायला निघाला.

**(पुरोहित)** अहो महाराज ! तुम्ही दिलेले दान परत घेता ? तुमचा सत्यानाश होईल.

**(जाट)** गप्प बसा ! नाहीतर तेरा दिवस दुधाशिवाय आम्हाला जे हाल सोसावे लागले त्याचे उट्टे काढीन.

ती धमकी ऐकताच भटजीबुवा गप्प बसले आणि जाट दुधाची भरलेली कासंडी, गाय व वासरू घेऊन घरी परतला.

अशा या जाटासारखे लोक मोठ्या संख्येने तयार होतील तर या पुरोहितांच्या लीला जगात चालणार नाहीत. हे भटजी लोक असे सांगतात की, माणसाच्या मृत्यूनंतर दहा-बारा दिवस पिंडदान वगैरे जी उत्तरकार्ये केली जातात. त्यांच्या योगाने मृत व्यक्तीच्या शरीराच्या दहा भागांना ते पिंड मिळतात. त्यातून शरीराचे दहा भाग तयार होतात. बाराव्या दिवशी केल्या जाणाऱ्या सपिंडी या श्राद्धामुळे या दहा भागांनी बनणाऱ्या शरीरामध्ये आत्मा प्रवेश करतो आणि मग तो अंगुष्ठमात्र शरीरधारी जीव यमलोकी जातो. आता ही गोष्ट खरी असेल तर मरण काळी माणसाला घेऊन जाण्यासाठी यमदूत येतात असे म्हणणे निरर्थक ठरते. त्यांना यावयाचेच असेल तर त्यांनी तेरा दिवसांची क्रियाकर्मे झाल्यानंतर यावयास पाहिजे आणि जर ते मृत व्यक्तीला मेल्यावर घेऊन जात असतील तर त्यानंतर केलेल्या क्रियाकर्मांचा काय उपयोग ! शिवाय, दहा दिवसांनी अंगठ्या एवढे शरीर तयार होत असेल तर मृत माणूस आपली पत्नी, मुले आणि इष्ट मित्र यांच्या मोहाने परत का येत नाही ?

**(प्रश्न)** स्वर्गात जाणाऱ्या माणसाला तेथे काही मिळत नाही. त्याच्या नावाने जो दानधर्म केला जातो तोच त्याला तेथे मिळतो. म्हणून सगळ्या वस्तू दान केल्या पाहिजेत.

**(उत्तर)** तुमच्या म्हणण्याप्रमाणे स्वर्गात काहीच मिळत नसेल तर स्वर्गापेक्षा हा लोकच चांगला. कारण येथे धर्मशाळा आहेत. लोक गरजू माणसांना दान किंवा भिक्षा देतात. इष्टमित्र व नातेवाईक एकमेकांना

चमचमीत मेजवान्या देतात. उत्तमोत्तम वस्त्रे मिळतात. स्वर्गात यापैकी काहीच मिळत नसेल तर त्या निर्दय, कृपण व भिकारड्या स्वर्गात स्वत: भटाभिक्षुकांनीच जावे आणि हालात दिवस काढावेत. भल्या माणसांनी तेथे कशाला जावे ?

**(प्रश्न)** तुमचे म्हणणे असे की यम, यमलोक वगैरे काही नाही. तर मग माणूस मेल्यावर त्याचा जीव कोठे जातो? आणि त्याचा न्यायनिवाडा कोण करतो ?

**(उत्तर)** तुमच्या गरुड पुराणात जे काही लिहीले आहे ते साफ खोटे आहे. त्याला काहीच आधार नाही. वेदांमध्ये जे काही सांगितले आहे ते असे :-

**यमेन.** - ऋ.मं.१०।सू. १४।मं.८ **वायुना.** - अथर्व. कां. २०।सू. १४१।मं. २

**सत्यराजन.**- यजु. अ. २०।मं. ४

इत्यादी वेदवचनांवरून असे स्पष्ट दिसून येते की 'यम' हे वायूचे एक नाव आहे. शरीरत्याग केल्यानंतर जीव अंतरिक्षात वायूच्या आधाराने राहतात आणि जो सत्यकर्ता, नि:पक्षपाती परमात्मा आहे तोच 'धर्मराज' सर्वांचा न्यायनिवाडा करतो.

**(प्रश्न)** तुमच्या म्हणण्याप्रमाणे गोप्रदान वगैरे काही करू नये आणि काहीही दानधर्म करू नये, असे ठरते.

**(उत्तर)** तुमचे हे म्हणणे साफ चूक आहे. सत्पात्री दान अवश्य करावे. परोपकारी लोकांना परोपकारासाठी सोने, चांदी, हिरे, मोती, माणके, अन्न, पाणी, जमीन, वस्त्रे, गायी वगैरे गोष्टींचे दान करणे उचितच आहे. मात्र कुपात्री दान कधीही करू नये.

## कुपात्र-सुपात्र-लक्षण

**(प्रश्न)** कुपात्र व सुपात्र यांची लक्षणे कोणती ?

**(उत्तर)** जो कोणी लबाड, कपटी, स्वार्थी, विषयांध, कामी, क्रोधी, लोभी, मोही, इतरांचे नुकसान करणारा, लंपट, मिथ्यावादी, अविद्वान, कुसंगी, आळशी असेल तो, दात्याकडे जाऊन वारंवार याचना करणे, धरणे धरून बसणे, नाही म्हणून सांगितले तरी निलाजरेपणाने मागतच राहणे, कितीही मिळाले तरी समाधान न होणे, जो कोणी देणार नाही त्याची निंदानालस्ती करणे, त्याला शिव्या व शाप देणे, ज्याने अनेकदा साह्य केले असताना एखाद्या वेळी त्याच्याकडून साह्य न झाल्यास त्याच्याशी शत्रुत्व करणे, वरून साधूचा वेष धारण करून लोकांना फसवणे, आपल्याजवळ एखादा पदार्थ असतांना काहीही नाही म्हणून सांगणे, सर्वांना फसवून आपला स्वार्थ साधणे, रात्रं-दिवस भिक मागत राहणे, भोजणाचे निमंत्रण मिळाल्यावर भांग वगैरे मादक द्रव्ये खाऊन पिऊन तेथे जाणे आणि फुकटच्या खाद्य पदार्थांवर ताव मारणे, मादक द्रव्यांच्या नशेत भलते सलते चाळे करणे, सत्य मार्गाला विरोध करून आपल्या स्वार्थासाठी असत्य मार्गाचा अवलंब करणे, आपल्या चेल्यांनी फक्त आपलीच सेवा करावी, इतरांची करू नये असा उपदेश त्यांना करणे, सद्‌विद्या वगैरे प्रवृत्तींचा विरोध करणे, स्त्री-पुरुष, माता, पिता, मुले, राजा, प्रजा, इष्टमित्र यांच्यामध्ये अप्रीती निर्माण करणे, जगातील हे सारे व्यवहार म्हणजे माया असून जगही मिथ्या आहे असा खोटा उपदेश करणे ही सारी कुपात्रांची लक्षणे आहेत.

जे लोक ब्रह्मचारी, जितेंद्रिय, वेदादी विद्यांचे अध्ययन-अध्यापन करणारे, सुशील, सत्यवादी, परोपकारप्रिय, पुरुषार्थी, उदार, विद्या व धर्म यांची निरंतर उन्नती करणारे धर्मात्मा, शांत, निंदा-स्तुतीने दुःखी किंवा आनंदी न होणारे, निर्भय, उत्साही, योगी, ज्ञानी, सृष्टिक्रम, वेदाज्ञा व ईश्वराचे गुण-कर्म-स्वभाव यांना अनुसरून वर्तन करणारे, न्यायी, नि:पक्षपाती, सत्योपदेश व सत्यशास्त्रे यांचे अध्ययन-अध्यापन करणाऱ्यांचे परीक्षक, कोणापुढेही लांगूलचालन न करणारे, प्रश्नांची यथार्थ उत्तरे देणारे, आपल्याप्रमाणेच इतरांचेही सुख-दुःख, हानि-लाभ समजून घेणारे, अविद्यादी क्लेश, हट्ट, दुराग्रह, दुराभिमान यांपासून मुक्त, अपमान हा अमृतासमान आणि सन्मान हा विषासमान मानणारे, संतोषी, जे कोणी प्रेमाने व जेवढे काही देतील त्यातच समाधान मानणारे, आपत्काळी एकदाच मागणारे आणि दिले नाही तरी दुःखी न होणारे व न देणाऱ्याविषयी अपशब्द न उच्चारता तेथून चटकन निघून जाणारे, त्यांची निंदानालस्ती न करणारे, सुखी पुरुषांशी मैत्री व दुःखितांवर करुणा करणारे, पुण्यात्म्यांच्या संगतीने आनंदित होणारे आणि पापी लोकांच्या बाबतीत उपेक्षावृत्ती बाळगणारे म्हणजे त्यांच्याविषयी राग (मोह) द्वेषादी भावना न बाळगणारे, सत्याला मानणारे, सत्यवादी, सत्यकर्मे करणारे, निष्कपट, ईर्ष्याद्वेषरहित, गंभीर वृत्तीचे, सत्पुरुष, धार्मिक वृत्तीचे, सर्व प्रकारच्या दुराचारांपासून दूर राहणारे, आपले तन-मन-धन परोपकारात वेचणारे, इतरांच्या सुखाखातर आपले प्राणही अर्पण करणारे, इत्यादी शुभ लक्षणांनी जे युक्त असतात ते सुपात्र होत. मात्र दुष्काळासारख्या आपत्काळी अन्न, पाणी, वस्त्र, औषधे, स्थान वगैरे गरजेच्या गोष्टी सर्वांना द्याव्यात. कारण अशा वेळी सर्व लोक वरील गोष्टी मिळविण्यास पात्र असतात.

**(प्रश्न)** दाते किती प्रकारचे असतात ?

**(उत्तर)** दाते तीन प्रकारचे असतात :- उत्तम, मध्यम व निकृष्ट. जो देश, काळ व पात्रता यांचा विचार करून दान देतो आणि त्याचे हे ज्ञान सत्यविद्या, धर्म व लोककल्याण यांच्या उन्नतीसाठी असते तो उत्तम दाता होय. कीर्ती किंवा स्वार्थ यांसाठी जो दान देतो तो मध्यम प्रकारचा दाता होय. जो आपल्या अथवा इतरांच्या हिताचा विचार न करता वेश्या, खुशामतखोर, भाटचारण इत्यादिकांना दान देण्यात पैशाची उधळपट्टी करतो, दान देताना तिरस्कार व अपमान करतो, पात्रापात्रतेचा विचार न करता सब घोडे बारा टक्के या न्यायाने सगळ्यांनाच देत सुटतो, देताना भांडणतंटे करतो, इतर धर्मात्म्यांना दुःख देऊन स्वत: सुखी होण्यासाठी जो दान करतो तो अधम दाता होय. थोडक्यात सांगावयाचे तर जो माणसांची पारख करून अथवा न करता केवळ आपली प्रशंसा इतरांनी करावी म्हणून दान देतो तो मध्यम दाता आणि जो कसलीही पारख न करता अंधाधुंदपणे निरर्थक दान करतो तो निकृष्ट दाता होय.

**(प्रश्न)** दानाची फळे इहलोकी मिळतात की परलोकी ?

**(उत्तर)** ती सर्वत्र मिळतात.

**(प्रश्न)** ती फळे आपोआप मिळतात की ती देणारा कोणी आहे ?

**(उत्तर)** फळे देणारा परमेश्वर आहे. ज्याप्रमाणे चोर, दरोडेखोर आपण होऊन तुरुंगात जाऊ इच्छित नाही, पण राजा त्याला तुरुंगात टाकतोच. धार्मिकांच्या सुखाचे रक्षण करतो व त्यांना सुख उपभोगण्याची संधी देतो.

चोरां-डाकूंपासून रक्षण करून सर्वांना सुखात ठेवतो. त्याचप्रमाणे परमेश्वर सर्वांना पाप-पुण्याच्या सुख-दुःखरूपी फळांचा अनुभव करविते.

## एकादशी वगैरे व्रतांची समीक्षा

**(प्रश्न)** गरुड पुराणादी जे ग्रंथ आहेत ते वेदार्थाचे किंवा वेदांचे समर्थन करणारे, त्यांना पुष्टी देणारे आहेत की नाहीत ?

**(उत्तर)** मुळीच नाहीत. उलट ते वेद विरोधी असून वेदांनी सांगितलेल्या मार्गाच्या उलट्या दिशेने जाणारे आहेत. ज्याप्रमाणे एखादा माणूस एकाचा मित्र व साऱ्या जगाचा शत्रू असतो त्याप्रमाणे पुराण आणि तंत्रग्रंथ यांवर श्रद्धा ठेवणारा माणूस असतो. कारण हे ग्रंथ एकमेकांचा विरोध करणारे आहेत. या ग्रंथाविषयी श्रद्धा बाळगणे हे कोणाही विद्वानाचे काम नसून ते अडाणीपणाचे लक्षण आहे.

असे पाहा ! शिवपुराणात त्रयोदशी व सोमवार यांना महत्व आहे; तर आदित्य पुराणात रवीचे माहात्म्य वर्णिले आहे. चंद्रखंडामध्ये सोमग्रह, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनि, राहू, केतू यांना तर विष्णुपुराणानुसार वैष्णवाची एकादशी, वामनाची द्वादशी, नृसिंहाची किंवा अनंताची चतुर्दशी, चंद्राची पौर्णिमा, दिक्पालांची दशमी, दुर्गेची नवमी, वसूंची अष्टमी, मुनींची सप्तमी, कार्तिक स्वामीची षष्ठी, नागाची पंचमी, गणेशाची चतुर्थी, गौरीची तृतीया, अश्विनीकुमारांची द्वितीया, आद्या देवीची प्रतिपदा व पितरांची अमावस्या, असे वेगवेगळे दिवस पुराणांनुसार उपवास करण्याचे आहेत. पुराणांमध्ये सर्वत्र असे लिहिले आहे की, जो कोणी या वारी व तिथींना खाणे पिणे करील तो नरकात जाईल.

तेव्हा भटजीबुवा व त्यांचे चेले यांनी कोणत्याही वारी अथवा कोणत्याही तिथीला भोजन करू नये. कारण खाणे-पिणे केल्यास ते नरकात जातील. 'निर्णयसिन्धु', 'धर्मसिन्धु', 'व्रतार्क' वगैरे जे ग्रंथ प्रमादी लोकांनी तयार केले आहेत त्यांमध्ये या साऱ्या व्रतांची अगदी दुर्दशा करून टाकण्यात आली आहे. जसे, एकादशीला शैव, एक दशमीविद्धा तर दुसरी शैवांची, कोणी एकादशीला उपवास करतो तर कोणी द्वादशीला. भटजीबुवांची लीला अगाध आहे. उपाशी केव्हा राहावयाचे याविषयी ते वादविवादच करतात. त्यांनी एकादशीचे जे व्रत सुरू केले आहे त्यात कोणाविषयी दयाबुद्धी नसून त्यांचा स्वतःचा स्वार्थच आहे. ते म्हणतात,

**एकादश्यामन्ने पापनि वसन्ति ॥**

सारी पापे एकादशीच्या दिवशी अन्नामध्ये निवास करतात. आता या भटजीबुवांना विचारले पाहिजे की, कोणाची पापे अन्नामध्ये वसतात ? तुझी की तुझ्या बापाजाद्यांची ? जर सगळीच्या सगळी पापे एकादशीच्या दिवशी अन्नात जाऊन राहत असतील तर त्या दिवशी कोणालाही दुःख होता कामा नये. तसे काही घडत नाही. उलट उपवास करणारे भुकेने तडफडतात. दुःख हे पापाचे फळ आहे. म्हणून उपाशी राहणे हे पाप आहे. या उपवासाचे भलतेच माहात्म्य किंवा स्तोम माजविण्यात आले आहे. त्याच्या कथा वाचून पुष्कळ लोक फसतात. त्यांपैकी एक कथा अशी आहे :-

ब्रह्मलोकामध्ये एक वेश्या होती. तिने काही अपराध केल्यामुळे तिला असा शाप मिळाला की, 'तू पृथ्वीवर जाऊन पडशील.' तिने देवांची स्तुती करून विचारले की, मी पुनः स्वर्गात कशी येऊ शकेन ? देवांनी

सांगितले, 'जेव्हा कोणी एकादशीच्या व्रताचे फळ तुला देईल तेव्हाच तू पुन: स्वर्गात येशील.' ती स्त्री विमानासहित एका नगरात येऊन पडली. तेथील राजाने तिला विचारले की, 'तू कोण आहेस ?' तेव्हा तिने सगळी हकीकत त्याला सांगितली; आणि म्हणाली, 'जर कोणी मला एकादशीचे पुण्य अर्पण करील तर मी पुन: स्वर्गात जाऊ शकेन.'

राजाने नगरामध्ये शोध घेतला. परंतु एकादशीचे व्रत करणारा कोणीही आढळला नाही. परंतु एके दिवशी एका शूद्र पतिपत्नीमध्ये भांडण झाले होते. त्यात रागावून शूद्र स्त्री एक दिवस आणि एक रात्र उपाशी राहिली होती. दैवयोगाने त्या दिवशीच एकादशी होती. राजदूतांना तिने सांगितले की, 'मी काही जाणूनबुजून एकादशी केली नव्हती. पण अजाणता मी त्या दिवशी उपाशी राहिले होते.' तिचे बोलणे ऐकून ते तिला राजासमोर घेऊन गेले. राजाने तिला सांगितले की, 'तू या विमानाला स्पर्श कर.' त्याप्रमाणे तिने विमानाला स्पर्श केला. त्याबरोबर विमान वर उडून स्वर्गात गेले. हे तर अजाणता घडलेल्या एकादशी व्रताचे फळ आहे. तेव्हा जाणीवपूर्वक एकादशीचे व्रत केल्याने केवढे अपरंपार पुण्य मिळेल !!!

वाहवा ! हे आंधळ्या लोकांनो ! हे सारे खरे असेल तर एक गोष्ट करा. हा पानांचा विडा स्वर्गात असत नाही. त्याला आम्ही स्वर्गात पाठवू इच्छितो. तेव्हा एकादशीचे व्रत करणाऱ्या सर्व लोकांनी आपापल्या पुण्याचे फळ वापरून हा विडा स्वर्गात पाठवावा, तो स्वर्गात गेला तर आपण लाखो विडे स्वर्गात पाठवू. मग आम्हीही एकादशी करू; आणि जर तसे घडले नाही तर तुमचा उपासमारीपासून आपोआप बचाव होईल.

वर्षातील चोवीस एकादशींची वेगवेगळी नावे ठेवलेली आहेत. एकीचे नाव 'धनदा' तर दुसरीचे 'कामदा' तिसरी 'पुत्रदा' तर चौथी 'निर्जला'. अनेक दरिद्री गरजू व संततिहीन लोक एकादशीचे व्रत करता करता म्हातारे झाले व मरूनही गेले. परंतु कोणालाही धनप्राप्ती झाली नाही, कोणाचीही इच्छा पूर्ण झाली नाही अथवा कोणालाही मूल झाले नाही. ऐन वैशाखाच्या शुक्ल पक्षात थोडा वेळ जरी पाणी मिळाले नाही तर प्राण कंठाशी येतात. अशा वेळी एकादशीचे व्रत करणाऱ्यांना अतिशय दु:ख भोगावे लागते. विशेषत: बंगालमध्ये एकादशीच्या दिवशी विधवा स्त्रियांचे भयंकर हाल होतात. अशा प्रकारची एकादशी करावयास सांगणाऱ्या निर्दयी कसायांच्या मनात तसे लिहिताना थोडीही दया कशी निर्माण झाली नाही ? त्याने 'निर्जला' ऐवजी तिचे नाव 'सजला' असे ठेवले असते आणि पौष महिन्याच्या शुक्लपक्षातील एकादशीचे नाव 'निर्जला' असे ठेवले असते तर थोडेफार चांगले झाले असते. परंतु या भिक्षुकांना दयेशी काय कर्तव्य ? 'कोणी जगो अथवा मरो. भटाला मात्र पोट पूर्ण भरो !'

गर्भवती किंवा नवपरिणीता स्त्रीने, लहान मुलांनी व तरुणांनी कधीही उपवास करता कामा नये. परंतु कोणाला उपवास करायचा असेल तर त्याने ज्या दिवशी त्याला अजीर्ण झाले असेल व भूक लागली नसेल त्यादिवशी दूध किंवा शरबत पिऊन राहावे. जे लोक भूक लागली असता खात नाहीत आणि भूक लागली नसताना अन्न खातात ते दोघेही रोग सागरात गटांगळ्या खातात व दु:ख भोगतात. म्हणून या मूर्ख माणसांच्या बोलण्यावर व लिहिण्यावर कोणीही विश्वास ठेवू नये.

आता गुरुशिष्यांचा मंत्रोपदेश आणि विविध मतमतांतराच्या चरित्रांचे विवेचन करतो.

मूर्तिपूजेच्या संप्रदायांचे अनुयायी असे म्हणतात की, वेद अनन्त आहेत 'ऋग्वेदाच्या २१, यजुर्वेदाच्या

१०१, सामवेदाच्या १००० व अथर्ववेदाच्या ९ शाखा आहेत. त्यापैकी काही थोड्याच शाखा उपलब्ध आहेत. इतर शाखा लुप्त झाल्या आहेत. त्या लुप्त शाखांमध्येच मूर्तिपूजा व तीर्थमाहात्म्य वगैरे गोष्टी असाव्यात. त्या वेदांमध्ये नसत्या तर पुराणात कोठून आल्या असत्या ? कार्यावरून कारणाचे अनुमान काढता येते. त्याप्रमाणे पुराणांनां पाहून मूर्तिपूजेविषयी काय शंका आहे ?

**(उत्तर)** वृक्षाची जी फांदी असते ती त्या वृक्षासारखीच असते. त्याच्या विरुद्ध नाही. शाखा लहान अथवा मोठी कशीही असली तरी त्यांच्यात मूलभूत विरोध नसतो. याचप्रमाणे वेदांच्या जेवढ्या शाखा सध्या उपलब्ध आहेत त्यामध्ये पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा करावी आणि विशिष्ट जल-स्थलांना तीर्थक्षेत्र समजून पवित्र मानावे असे सांगितल्याचे कोठे आढळत नाही. यावरून लुप्त शाखांमध्येही या गोष्टी नसल्या पाहिजेत असे सिद्ध होते. शिवाय चार वेद संपूर्ण स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यांमध्ये जो उपदेश आहे त्याच्या विरुद्ध विचार प्रतिपादन करणाऱ्या शाखा असू शकत नाहीत; आणि ज्या शाखा वेदविरुद्ध विचार मांडतात त्या वेदांच्या शाखा आहेत असे कोणीही सिद्ध करू शकत नाही. म्हणून पुराणे ह्या वेदांच्या शाखा नसून सांप्रदायिक लोकांनी परस्पर विरोधी ग्रंथ बनविले आहेत.

वेद हे परमेश्वरकृत आहेत असे तुम्ही मानता की मनुष्यकृत ? परमेश्वरकृत ! जर ते परमेश्वराने निर्माण केले आहेत तर आश्वलायनादी ऋषिमुनींच्या नावांनी प्रसिद्ध असलेल्या ग्रंथांना तुम्ही वेद का मानता ? ज्याप्रमाणे झाडाची फांदी व पाने पाहिली की त्यावरून ते झाड पिंपळाचे, वडाचे, आंब्याचे वगैरे असल्याचे लक्षात येते. त्याचप्रमाणे ऋषि-मुनींनी लिहिलेली वेदांगे, चारही ब्राह्मण ग्रंथ, अंगे, उपांगे, उपवेद इत्यादी ग्रंथांच्या साह्याने वेदांचा अर्थ समजून घेता येतो. म्हणून या ग्रंथांना वेदांच्या शाखा असे म्हटलेले आहे.

वेदांविरुद्ध असणाऱ्या ग्रंथांचे प्रमाण त्याचप्रमाणे वेदांना अनुकूल असणारे ग्रंथ अप्रमाणित असू शकत नाहीत. लुप्त झालेल्या शाखांमध्ये मूर्तिपूजा वगैरे गोष्टींना मान्यता देण्यात आलेली होती. असे असेल तर इतर कोणी असेही म्हणू शकेल की, लुप्त शाखांमध्ये सगळ्याच गोष्टी उलट्या लिहिलेल्या होत्या. उदाहरणार्थ, वर्णव्यवस्था उलटी म्हणजे अत्यंज आणि शूद्राचे नाव ब्राह्मणादी, ब्राह्मणादिकांना शूद्र, अंत्यज यांच्यासारखे खालचे स्थान दिलेले होते. अगम्यां स्त्रीशी गमन करणे, अकर्तव्य हे कर्तव्य, मिथ्या भाषणादी गोष्टी हा धर्म आहे व सत्य भाषणादिला अधर्म असे त्या लुप्त शाखांमध्ये सांगण्यात आले होते. असे म्हणणाऱ्याला, तुम्ही तेच उत्तर द्यावे, जे उत्तर आम्ही तुम्हाला दिले. आमच्या उत्तराचा मथितार्थ असा की, वेदांमध्ये आणि त्यांच्या उपलब्ध शाखांमध्ये वर्णव्यवस्थेत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांची जी स्थाने आहेत तीच लुप्त शाखांमध्ये असली पाहिजेत, असे मानले पाहिजे. नाहीतर वर्णाश्रम व्यवस्था वगैरे सगळी अन्य प्रकारची होईल.

जैमिनी, व्यास व पतंजली यांच्या वेळेपर्यंत तरी सगळ्या शाखा विद्यमान होत्या की नाही ? जर त्या असतील तर त्यांनी केलेल्या विधानाचे खंडन तुम्ही करू शकणार नाही; आणि जर त्या नसतील तर त्या शाखा अस्तित्वात होत्या याला काय पुरावा ? तुम्हीच पाहा ! जैमिनीने आपल्या पूर्वमीमांसा या ग्रंथात कर्मकांड, पतंजली मुनीचे योगशास्त्रामध्ये सारे उपासनाकांड आणि व्यासमुनीने शारीरिक सूत्रांमध्ये वर्णिलेले सारे ज्ञानकांड ही सर्व वेदानुकूल आहेत. त्यांमध्ये पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा अथवा प्रयागादी तीर्थांचे नाव देखील आढळत नाही. ते कोठून लिहितील ? वेदांमध्ये त्या गोष्टी असत्या तर ते लिहिल्याशिवाय सोडले नसते तेव्हा

लुप्त शाखांमध्ये देखील मूर्तिपूजा यांचे प्रमाण नव्हते तसेच, हे शाखा ग्रंथ वेद नव्हेत. त्यांमध्ये ईश्वरकृत वेदांतील मंत्ररूपी प्रतीके घेऊन त्यांचे निरूपण करण्यात आले आहे; आणि जगातील स्त्रीपुरुषांचे इतिहास आदी नमूद केलेले आहेत. यासाठी त्या गोष्टी मूळ वेदांमध्ये असूच शकत नाहीत. वेदांमध्ये फक्त मनुष्यांसाठी विद्येचा उपदेश केला आहे. त्यांत कोणाही माणसाचे नाव देखील नाही. म्हणून त्यांत मूर्तिपूजेचे पूर्णपणे खंडन आहे.

## मूर्तिपूजेमुळे महापुरुषांची निंदा

असे पाहा! मूर्तिपूजेमुळे श्रीरामचंद्र, श्रीकृष्ण, नारायण, शिव इत्यादींचा उपहास होत आहे. सर्वजण जाणतात की ते मोठे महाराजाधिराज होते आणि त्यांच्या पत्नी सीता, रुक्मिणी, लक्ष्मी, पार्वती वगैरे महाराण्या होत्या. परंतु मंदिरादिकांमध्ये त्यांच्या मूर्ती ठेवून पुजारी लोक त्यांच्या नावाने भीक मागतात तेव्हा जणू ते त्यांना भिकारीच बनवितात. हे पुजारी म्हणत असतात की, ''या महाराज, या राजेसाहेब! या शेटजी! या सावकार! देवाचे दर्शन घ्या. चरणामृत घ्या आणि देवाला काही भेट अर्पण करा. महाराज! राम-सीता, कृष्ण-रुक्मिणी किंवा राधा-कृष्ण, लक्ष्मी-नारायण आणि शिव-पार्वती यांना तीन दिवस झाले, कोणीही त्यांना बालभोग, राजभोगच नव्हे तर साधे जलपान किंवा खाणे पिणेही मिळालेले नाही. आज त्यांच्याजवळ काहीही नाही. राणीजी, शेठाणीजी, सीता आदी यांच्यासाठी तुम्ही नथ बनवून द्या. खाद्य पदार्थ पाठवा; म्हणजे आम्ही राम-कृष्णादिकांना नैवेद्य दाखवू. देवांची वस्त्रे फाटली आहेत. देऊळ मोडकळीस आले असून कानाकोपऱ्याची पडझड झालेली आहे. वरून पोतेरा मारला आहे आणि दुष्ट चोरांनी सारे काही लुटून नेले. देवाचे कपडे उंदरांनी कुरतडून टाकले. अहो, एके दिवशी तर उंदरांनी कहरच केला. मूर्तीचा डोळाच घेऊन पळाले. त्याच्या जागी नवा चांदीचा डोळा बसवणे आम्ही करू शकलो नाही. म्हणून तेथे कवडी बसवली आहे.''

हे लोक रामलीला व रासमंडळही घडवून आणतात. सीता-राम आणि राधा-कृष्ण नाच करतात आणि राजा, महंत वगैरे त्यांचे सेवक मजेत बसले आहेत. देवळात राम, सीता वगैरे देव उभे असतात. तर पुजारी अथवा महंत आसनावर किंवा गादीवर लोडाला टेकून आरामात बसतात. भयंकर उकाडा होत असतो तेव्हाही देवांना आत बंद करतात आणि आपण स्वत: मात्र मोकळ्या हवेत पलंगावर आरामात झोपतात. पुष्कळ पुजारी आपल्या नारायणाला डबीत बंद करून तिच्यावर कापड गुंडाळतात व ती डबी आपल्या गळ्यात अडकवितात. जशी माकडीण आपल्या पिलाला गळ्यात लटकविते तसे हे पुजारी देवाला गळ्यात लटकवितात. जेव्हा कोणी मूर्ती फोडतो तेव्हा हाय, हाय करीत ते ऊर बडवतात आणि असा आक्रोश करतात की, ''या दुष्टांनी सीता-राम, राधा-कृष्ण आणि शिव-पार्वती यांची मूर्ती फोडून टाकली. आता चांगल्या कारागिराने बनविलेली दुसरी संगमरवरी मूर्ती आणून तिची प्राणप्रतिष्ठा आणि पूजा-अर्चा केली पाहिजे.''

''नारायणाला तुपाशिवाय नैवेद्य चालत नाही. तेव्हा फार नसले तरी थोडे बहुत तूप अवश्य पाठवून द्या.'' अशी मागणी हे लोक करतात. रासमंडल किंवा रामलीला झाल्यावर सीता-राम व राधा-कृष्ण यांची सोंगे घेणाऱ्यांना ते भीक मागायला लावतात. जेथे जत्रा वगैरे भरते तेथे लहान मुलांना मुकुट घालून आणि सजवून कन्हैया बनवितात आणि त्या कन्हैयाला रस्त्याच्या कडेला बसवून त्याला भीक मागायला लावतात.

ही किती दु:खाची व शरमेची गोष्ट आहे, याचा तुम्हीच विचार करा. तुम्हीच सांगा, सीताराम वगैरे असे दरिद्री व भिकारी होते काय? हा त्यांचा उपहास व निंदा नाही तर दुसरे काय आहे? आपल्या आदरणीय

पूर्वजांची याहून अधिक निंदा कोणती असू शकेल? रामकृष्णादिकांच्या काळात सीता, रुक्मिणी, लक्ष्मी व पार्वती यांना रस्त्याच्या कडेला किंवा एखाद्या घरात उभे करून पुजारी म्हणाले असते की, ''लोकहो! इकडे या आणि यांचे दर्शन घेऊन त्यांच्यासमोर भेटवस्तू व दक्षिणा ठेवा'' तर राम, सीता वगैरे देवांनी या मूर्खांच्या सांगण्यावरून असे उभे राहण्यास मुळीच मान्यता दिली नसती आणि त्यांना तसे काहीही करू दिले नसते. किंबहुना त्यांचा असा उपहास करणाऱ्यांना त्यांनी शिक्षा दिल्याशिवाय कधी सोडले नसते. अर्थात खुद्द देवांनी जरी पुजाऱ्यांना शिक्षा केली नसती तरी अनेक मूर्तिपूजेच्या विरोधकांनी त्यांना चांगलीच अद्दल घडविली असती आणि अजूनही त्या कुकर्माची शिक्षा त्यांना मिळत आहेत. जोपर्यंत ते हे मूर्तिपूजेचे कुकर्म सोडणार नाहीत तोपर्यंत त्यांना ही शिक्षा भोगत राहावे लागेल.

## मारण मोहनोच्चाटन-वाममार्ग समीक्षा

आर्यावर्त्तामध्ये पाषाणादिकांच्या मूर्तींची पूजा करणाऱ्यांचा जो सतत पराजय होत आला आणि आजही त्यांना जी मानहानी दररोज सहन करावी लागत आहे त्याचे कारण मूर्तिपूजा हेच आहे, कारण मूर्तिपूजा हे पाप आहे आणि पापाचे फळ दुःख आहे. पाषाणादिकांच्या मूर्तींवर विश्वास ठेवल्याने आपले फार नुकसान झाले आहे; आणि आपण मूर्तिपूजेचा त्याग केला नाही तर दिवसेदिवस अधिकाधिक नुकसान होत राहील. मूर्तिपूजेच्या या प्रकरणात वाममार्गी लोक फार मोठे अपराधी आहेत. जेव्हा ते एखाद्याला आपला चेला बनवितात तेव्हा तो सामान्य माणूस असल्यास त्याला

**दं दुर्गायै: नम: । भं भैरवाय: नम: । ऐं ह्रीं क्लीं चामुण्डायै विच्चै ॥**

इत्यादी मंत्रांचा उपदेश करतात. बंगालमध्ये विशेषत: एकाक्षरी मंत्राचा उपदेश करतात; जसे ह्रां ह्रीं क्लीं आणि धनाढ्यांना ते पूर्णाभिषेक करतात. म्हणजे त्यांना संपूर्ण मंत्राची दीक्षा देतात.

दहा महाविद्यांचे मंत्र असे असतात :-

**ह्रां ह्रीं ह्रूं वगलामुख्यै फट् स्वाहा ॥** किंवा **ह्रूं फट् स्वाहा**

हे लोक जारण, मारण, उच्चाटन, मोहन, विद्वेषण, वशीकरण इत्यादी प्रयोग करतात. वस्तुत: त्यांच्या या मंत्रांनी काहीच होत नसते. परंतु ते हातचलाखीने जे काही करतात ते मंत्रांनी झाले असे लोकांना सांगतात. जेव्हा ते एखाद्याला मारण्याचा प्रयोग करतात तेव्हा ज्याच्यासाठी हा प्रयोग करावयाचा असेल त्याच्याकडून भरपूर द्रव्य घेऊन ज्याला मारावयाचे त्याची कणकेची किंवा मातीची मूर्ती तयार करतात; आणि त्या बाहुल्याच्या छातीत, बेंबीत, गळ्यात सुरे भोसकतात आणि डोळे, हात, पाय यांमध्ये खिळे ठोकतात. त्याच्यावर भैरवाची किंवा दुर्गेची मूर्ती बसवितात आणि तिच्या हातात त्रिशूल देऊन तो त्या बाहुल्याच्या छातीत खुपसतात. एक वेदी तयार करून मांसादिने होम करतात आणि तिकडे मारेकऱ्याला पाठवून ज्याला मारावयाचे असेल त्याला विषप्रयोगादि उपायांनी ठार मारण्याची व्यवस्था करतात. हे पुरश्चरण चालू असताना तो माणूस मारला गेला तर तो आपल्या मंत्रसामर्थ्याने मेला आणि आपल्याला भैरवाची किवा देवीची सिद्धी प्राप्त आहे असे ते लोकांना सांगतात.

यावेळी ते **''भैरवो भूतनाथश्च''** इत्यादी मंत्रांचा पाठ करतात. **मारय-मारय, उच्चाटय-उच्चाटय, विद्वेषय-विद्वेषय, छिन्धि-छिन्धि, भिन्धि-भिन्धि, वशीकुरु-**

**वशीकुरु, खादय-खादय, भक्षय-भक्षय, त्रोटय-त्रोटय, नाशय-नाशय, मम शत्रून् वशीकुरु-वशीकुरु, हुं फट् स्वाहा ॥** कामरत्न. उच्चाटन प्रक. म. ५-७

इत्यादी मंत्र ते झपाट्याने म्हणतात. मनसोक्त मद्य पितात व मांस खातात. दोन भिवयांच्या मधोमध शेंदुराची रेखा काढतात. कधी-कधी हे लोक काली वगैरे देवतांच्या नावाने एखाद्या माणसाला ठार मारून होमामध्ये त्याची आहुती देतात आणि स्वत:ही त्याचे थोडेसे मांस खातात. जेव्हा एखादा माणूस त्यांच्या भैरवी चक्रात जातो आणि मद्य, मांस प्राशन-भक्षण करण्यास तयार होत नाही तेव्हा ते त्याला ठार मारून त्याची आहुती देतात. त्यांच्यातील जो अघोरी माणूस असतो तो मृत मनुष्याचे मांसही खातो. अजरी बजरी करणारे लोक तर विष्ठाही खातात व मूत्रही पितात !

वाममार्गी लोकांमध्ये चोळी मार्गी आणि बीजमार्गी असे दोन भेद आहेत. चोळी मार्गी लोक एखाद्या गुप्त ठिकाणी किंवा जमिनीत एक स्थान बनवितात तेथे बायका, पुरुष, मुले, मुली, बहिणी, आया, सुना वगैरे सर्वजण एकत्र बसून मांस खातात, दारू पितात. एका स्त्रीला नागवी करून सगळे पुरुष तिच्या जननेंद्रियाची पूजा करतात. तिचे नाव दुर्गादेवी असे ठेवतात. मग एका पुरुषाला नग्न करून त्याच्या जननेंद्रियाची पूजा सर्व स्त्रिया करतात. दारू पिऊन-पिऊन झिंगल्यानंतर सर्व स्त्रियांच्या चोळ्या मातीच्या एका मोठ्या नांदेत किंवा गंगाळामध्ये टाकून त्या एकत्र मिसळतात. त्यानंतर एकेक पुरुष पुढे येऊन त्या डेऱ्यात हात घालून एकेक चोळी बाहेर काढतो. ज्या पुरुषाच्या हाताला ज्या स्त्रीची चोळी लागेल ती त्याची आई, बहीण, मुलगी किंवा सून कोणीही असली तरी त्याची बायको होते; अशा प्रकारे कुकर्म केल्याने व खूप नशा चढल्याने त्यांची आपसात भांडणे व जोडपट्टीही होते. तेव्हा पहाटेच्या अंधुक प्रकाशात ते लोक आपापल्या घरी परत जातात तेव्हा आई ही पूर्ववत आई, मुलगी ही मुलगी, बहीण ही बहीण आणि सून ही सून बनते आणि बीजमार्गी स्त्रीपुरुष समागम करून वीर्य पाण्यात मिसळून पितात. हे अधम लोक असल्या गोष्टींनाच मुक्तीचे साधन मानतात. ते विद्या, विवेक व सज्जनता रहित होत असतात.

## शैव पंथाची समीक्षा

**(प्रश्न)** शैव पंथाचे लोक तर चांगले असतात ना ?

**(उत्तर)** कसले चांगले असणार ? 'जसा प्रेतनाथ तसाच भूतनाथ !' ज्याप्रमाणे वाममार्गी लोक मंत्रोपदेश वगैरेद्वारे द्रव्याचे अपहरण करतात त्याप्रमाणे शैवही **'ओं नमः शिवाय'** यांसारख्या पंचाक्षरी मंत्राचा उपदेश करतात. रुद्राक्ष व भस्म धारण करतात, मातीची आणि पाषाणादिकांची लिंगे बनवून त्यांची पूजा करतात आणि हरहर बं बं असे आवाज तोंडातून काढतात आणि बड, बड, बड असे बकरी सारखे शब्द उच्चारतात. त्याचे कारण ते असे सांगतात की, टाळी वाजविल्याने व बं बं असे म्हटल्याने पार्वती प्रसन्न होते आणि शंकर नाराज होतो. कारण जेव्हा भस्मासुराला घाबरून शंकर पळाला होता तेव्हा त्याची थट्टा करण्यासाठी बं बं असा आवाज काढून टाळ्या पिटल्या होत्या. याउलट गालात बोटे घालून, बड, बड, बड असा आवाज केल्याने पार्वती अप्रसन्न होते व शंकर खुष होतो. कारण की, पार्वतीचा बाप दक्ष प्रजापती याचे शिर टाकून त्याच्या धडावर बकऱ्याचे मुंडके बसविले होते. त्या बकऱ्याच्या आवाजाची नक्कल बड, बड, बड अशी गालात बोटे घालून केली जाते, असे ते मानतात. शिवरात्र व प्रदोष वगैरे व्रते करतात त्यामुळे मुक्ती मिळते असे

मानतात. म्हणून जसे वाममार्गी भ्रांत आहेत तसे शैवही आहेत. शैवांमध्ये कानफाटे, नाथ, गिरी, पुरी, वन, अरण्य, पर्वत, सागर असे भेद असून गृहस्थाश्रमीही शैव असतात. काही लोक एकाच वेळी दोन घोड्यांवर स्वार होतात. अर्थात ते वाममार्गी व शैव या दोन्ही पंथांना मानतात. पुष्कळ लोक वैष्णवही असतात. त्यांच्या संबंधी तंत्रग्रंथात पुढील श्लोक आहे :-

**अन्तः शाक्ता बहिश्शैवा सभामध्ये च वैष्णवाः ।**

**नानारूपधराः कौला विचरन्तीह महीतले ।।** कौलोपनिषद, कुलार्णव तंत्र उल्लास ११

हा तंत्राचा श्लोक आहे. आतून शाक्त म्हणजे वाममार्गी, बाहेरून शैव म्हणजे रुद्राक्ष व भस्म धारण करणारे हे लोक सभेमध्ये स्वत:ला वैष्णव म्हणवितात की आम्ही विष्णूचे उपासक आहोत अशा नानाप्रकाराचे रूप धारण करून वाममार्गी पृथ्वीतलावर विचरण करीत असतात.

## वैष्णवमत-समीक्षा

**(प्रश्न)** वैष्णव तरी चांगले आहेत ना ?

**(उत्तर)** कसले दगडाचे चांगले ! जसे ते तसे हे. वैष्णवांच्या लीला पाहून घ्या ! ते स्वत:ला विष्णूचा दास मानतात. त्यांच्यामध्ये श्रीवैष्णव जे चक्रांकित असतात. ते स्वत:ला सर्वांत श्रेष्ठ समजतात. पण तसे काही नाही.

**(प्रश्न)** का बरे ? तथ्य कसे नाही ? सर्व काही आहे. पाहा ना ! कपाळावर नारायणाच्या चरणकमळासारखा टिळा आणि त्याच्या मधोमध पिवळी रेखा श्री असते. म्हणून आम्हाला श्रीवैष्णव असे म्हणतात. एका नारायणाशिवाय दुसऱ्या कोणालाही आम्ही मानत नाही. महादेवाच्या लिंगाचे दर्शनही आम्ही करीत नाही. कारण आमच्या कपाळावर जी श्री विराजमान आहे ती लज्जित होते. आलमंदार आदी स्तोत्रांचा पाठ आम्ही करतो. मांस खात नाही व मद्यपान करीत नाही. मग आम्ही चांगले का नाही ?

**(उत्तर)** या तुमच्या टिळ्याला हरिपदाची आकृती व पिवळ्या रेघेला श्री मानणे हे निरर्थक आहे. कारण ती तर तुमच्या हाताची कारागिरी व जसे कपाळाचे चित्र आहे. हत्तीच्या कपाळावर जशा चित्रविचित्र आकृत्या काढतात. तुमच्या कपाळावर विष्णूचे पदचिह्न कोठून आले? काय कोणी वैकुंठात जाऊन विष्णूच्या पावलाचा छाप आपल्या कपाळावर मारून आणला आहे ?

**(विवेकी)** आणि तुमची ती खरी श्री जड आहे की चेतन ?

**(वैष्णव)** ती चेतन आहे.

**(विवेकी)** तर मग तुमच्या कपाळावरची ही रेखा जड असल्यामुळे ती खरी श्री नाही. आम्ही असे विचारतो की, श्री ही बनविलेली आहे की न बनविलेली आहे ? जर ती न बनविलेली असेल तर ती श्री असू शकत नाही. कारण ती तर तुम्ही स्वत:च्या हातांनी दररोज रेखाटत असता. म्हणून ती खरी श्री असू शकत नाही. जर तुमच्या कपाळावर श्री आहे तर कित्येक वैष्णवांचे वाईट चेहरे असे श्रीहीन, शोभारहित का दिसतात? ललाटावर श्री असताना तुम्ही असे दारोदार भीक मागून का हिंडता ? आणि अन्नछत्रात जेवून पोट का भरता? ही गोष्ट विपरीत आहे की कपाळावर तर श्री पण काम मात्र महादरिद्र्याचे. ही म्हणजे दुराग्रहाची व निर्लज्जपणाची कमालच झाली !

पूर्वी परिकाल नावाचा एक वैष्णव भक्त होता. तो चोऱ्या करून, दरोडे घालून, लोकांना फसवून खूप द्रव्य गोळा करी आणि ते वैष्णवांजवळ ठेऊन प्रसन्न राहत असे. एकदा त्याला चोरीमध्ये लुटून नेता येईल असे काहीच मिळाले नाही. त्यामुळे तो व्याकुळ होऊन फिरत होता. नारायणाने समजले की आपला भक्त दु:खी आहे. म्हणून तो एका सावकाराचे रूप धारण करून, अंगठ्या घालून रथात बसून समोर आला. त्याला पाहताच परिकाल रथाजवळ गेला आणि त्या सावकाराला म्हणाला, "अंगावरचे सगळे दागिने ताबडतोब उतारा, नाहीतर मी तुम्हाला मारून टाकीन." दागिने काढीत काढीत बोटातील अंगठी काढण्यास थोडा वेळ लागला. त्याबरोबर परिकालाने नारायणाचे बोट छाटून अंगठी काढून घेतली. नारायण प्रसन्न झाला आणि त्याने चतुर्भुज होऊन परिकालाला दर्शन दिले. नारायण त्याला म्हणाला, "तू माझा अत्यंत लाडका भक्त आहेस. कारण तू लूट-मार करून लुटलेली सारी संपत्ती वैष्णवांना अर्पण करून त्यांची सेवा करतोस. तू खरोखर धन्य आहेस." त्यानंतर परिकालाने ते सारे दागिने वैष्णवांना नेऊन दिले.

एकदा एक व्यापारी परिकालाला आपला नोकर म्हणून बरोबर घेऊन जहाजातून परदेशी गेला. तेथे त्याने जहाजात सुपारी भरली. परिकालाने एक सुपारी फोडून तिचा अर्धा भाग व्यापाराकडे सावकाराकडे दिला व त्याला म्हणाला, "ही माझी अर्धी सुपारी जहाजावर ठेवा, आणि मला असे लिहून द्या की, जहाजावरची अर्धी सुपारी परिकालाची आहे." व्यापारी म्हणाला, "अरे, तुला हव्या असतील तर हजार सुपाऱ्या घे." परिकाल म्हणाला, "छे: छे:! मी अधर्मी नाही की मी खोटे घेऊ मला फक्त माझी अर्धी सुपारी हवी." व्यापारी बिचारा भोळा भाबडा होता. त्याने परिकालाने सांगितल्याप्रमाणे त्याला लिहून दिले. काही दिवसांनी जहाज़ स्वदेशी परतले व बंदराला लागले. जेव्हा सुपारी उतरून घेण्याची तयारी सुरु झाली तेव्हा परिकाल व्यापाराला म्हणाला, "माझी अर्धी सुपारी मला द्या." व्यापारी परिकालाने दिलेली अर्धी सुपारी त्याला देऊ लागला. यावर परिकाल भांडू लागला, म्हणाला "या जहाजावरची निम्मी सुपारी माझी आहे. अर्धा वाटा घेईन अखेर तो तंटा न्यायालयात गेला. परिकालाने व्यापाऱ्याकडून लिहून घेतलेले न्यायाधीशाला दाखविले. त्यात जहाजावरची अर्धी सुपारी परिकालाची असल्याचे व्यापाऱ्याने लिहून दिले होते. व्यापाऱ्याने आपली बाजू मांडण्याचा खूप प्रयत्न केला. पण परिकालाने ऐकले नाही. जहाजातील अर्धी सुपारी परिकालाने ताब्यात घेतली आणि ती वैष्णवांना अर्पण केली. ते पाहून वैष्णव अत्यंत खुष झाले. तेव्हापासून आजपर्यंत त्या चोर-डाकू परिकालाची मूर्ती वैष्णवांच्या मंदिरात ठेवतात. ही कथा 'भक्तमाल' या ग्रंथात लिहिलेली आहे. आता बुद्धिवंतांनीच हे ठरवावे की वैष्णव, त्यांचे सेवक आणि नारायण हे तिघेही चोर आहेत की नाहीत ?

जरी वेगवेगळ्या संप्रदायांमध्ये काही थोडे चांगले असते. तथापि त्या विशिष्ट संप्रदायात राहून कोणतीही व्यक्ती सर्वथैव चांगली होऊ शकत नाही. आता तर वैष्णवांमध्ये फाटाफूट होऊन त्यांनी वेगवेगळी टिळा कंठी धारण केली. रामानंदी पंथाचे लोक दोन्ही बाजूना गोपीचंदनाचा टिळा लावून मधोमध लाल रेघ काढतात. निमावत पंथाचे लोक दोन बारीक रेषांमध्ये काळा ठिपका काढतात. माधव पंथाचे लोक फक्त काळी रेखा काढतात तर गौड बंगाली कट्यारीच्या आकाराचे आणि रामप्रसादी दोन चंद्रकोरी रेखाटून त्यांच्या मधोमध शुभ्र गंधाचा टिळा लावतात. रामानंदी लोक लाल रेघेला लक्ष्मीचे प्रतिक मानतात आणि ती नारायणाच्या हृदयात बसलेली आहे, असे समजतात. तर इतर लोक त्या रेघेला राधेचे प्रतिक मानून ती श्रीकृष्णाच्या हृदयामध्ये विराजमान आहे असे समजतात.

भक्तमाल या ग्रंथात एक कथा आहे. कोणी एक माणूस एका झाडाखाली झोपला होता. तो झोपेतच मेला. वरून एका कावळ्याने विष्ठा केली. ती त्या माणसाच्या कपाळावर पडून टिळकाकार झाली. ह्या माणसाच्या जीवाला घेऊन जाण्यासाठी यमदूत तेथे आले. इतक्यात विष्णूचे दूतही तेथे येऊन पोहोचले. त्या दूतांमध्ये वाद सुरू झाला. यमदूत म्हणाले, ''आमच्या मालकाने या माणसाला घेऊन येण्याची आज्ञा आम्हाला केली आहे. म्हणून आम्ही त्याला यमलोकात घेऊन जाणार. ''विष्णूचे दूत म्हणाले'', या इसमाला वैकुंठात घेऊन येण्याची आज्ञा आमच्या स्वामींने केली आहे. हा पाहा. या माणसाच्या कपाळावर वैष्णवी टिळा आहे. तुम्ही याला कसे घेऊन जाणार?'' हे ऐकताच यमदूत निमूटपणे परत गेले. विष्णूचे दूत त्याला आरामात वैकुंठात घेऊन गेले. नारायणाने त्याला वैकुंठात ठेवून घेतले.

पाहा! कपाळावर योगायोगाने टिळ्याचा आकार तयार होण्याचे जर एवढे महात्म्य आहे तर जे लोक आस्थेने स्वतःच्या हाताने टिळा लावून घेतात ते नरकाऐवजी सरळ वैकुंठात जात असतील तर त्यात काय आश्चर्य?

आम्ही असे विचारतो की, लहानसा टिळा कपाळावर लावल्याने जर माणूस वैकुंठात जात असेल तर संपूर्ण चेहऱ्यावर गंधाचा लेप लावल्याने किंवा सारे तोंड काळे केल्याने अथवा अंगभर गंध लावल्याने माणूस वैकुंठाच्याही पलीकडे जात असेल की नाही? म्हणून या साऱ्या गोष्टी व्यर्थ आहेत. आता या वैष्णवांपैकी खाकी लोक अंगाला धूळ व राख लावणारे गोसावी लंगोटी लावून, जटा वाढवून, साधूचा वेश धारण करतात. ते बगळ्यासारखे ध्यान लावतात. भांग पितात आणि गांजा चरस ओढतात. त्यामुळे त्यांचे डोळे लाल भडक होतात. ते थोडे थोडे अन्न, पीठ, पैसे, कवडी यांची भीक लोकांकडे मागतात आणि गृहस्थांच्या मुलांना भुलवून आपले चेले बनवितात. त्यांच्यामध्ये बहुधा मजूरच असतात. कोणी विद्या शिकत असेल तर ते त्याला शिकू देत नाहीत. ते म्हणतात,

**पठितव्यं तदपि मर्त्तव्यं दन्तकटाकटेति किं कर्त्तव्यम् ॥**

संतांना विद्या शिकण्याची काय गरज? विद्याध्ययन करणारेही मरतात. मग दातांच्या कण्या करण्याची काय गरज? साधूंनी चार धामांची यात्रा करावी, संतांची सेवा करावी आणि रामाचे भजन करावे.

जर कोणाला मूर्तिमंत अविद्या व मूर्ख माणूस पाहावयाचा असेल तर त्याने या खाक्यांना पाहवे. त्यांच्याकडे जे कोणी जातात त्यांना ते बच्चा, बच्ची म्हणतात. मग ते लोक या त्याच्या आईबापासारखे का असेनात. हे खाकी आहेत असेच रूँखड, सूँखड, गोदडिये (गोधडीवाले), जमाती सुतरेसाई, अकाली, कानफाटे, जोगी, औघड वगैरे आहेत. सारे एकाच माळेचे मणी आहेत.

एका खाकी साधूचा चेला 'श्रीगणेशाय नमः' घोकत घोकत पाणी भरण्यासाठी विहिरीवर गेला. तेथे एक पंडित बसलेला होता. तो चेला तोंडाने 'स्रीगने साजनमें' असे म्हणत असल्याचे पाहून तो पंडित त्याला म्हणला, ''अरे साधू! तू अशुद्ध घोकतो आहेस. नीट 'श्री गणेशाय नमः' असे म्हण. ते ऐकताच चेल्याने चटकन् लोटा भरून घेतला आणि आपल्या गुरूकडे जाऊन तो म्हणाला, ''हा बम्मन् माझ्या घोकण्याला 'असूद्ध' म्हणतोय.'' हे ऐकताच खाकी झटकन उठला आणि विहिरीवर जाऊन त्या पंडिताला म्हणाला, ''तू माझ्या चेल्याला बहकावतोस काय? तू काय गुरूचे उपस्थ शिकला. हे बघ, तुला एकाच प्रकारचा पाठ

माहीत आहे. आम्हाला तीन प्रकारचे पाठ माहित आहेत. 'स्त्रीगनेसाजन्नमें', 'स्त्रीगनेसा यन्नमें' आणि 'श्रीगनेसाय नमें'.''

**(पंडित)** साधू महाराज, ऐका! विद्या ही फार अवघड गोष्ट आहे. ती शिकल्याशिवाय येत नाही.

**(खाकी)** अरे जा रे! आम्ही सगळे विद्वान रगडले आहेत. भांगेच्या घोटात साऱ्या पंडितांना आम्ही पोटात रिचवले आहे. संतांचे घर (सामर्थ्य) फार मोठे असते. तुला बापड्याला ते काय कळणार?

**(पंडित)** हे बघ! तू शिकला असतास तर असे अपशब्द वापरले नसतेस. कसे वागावे याचे तुला सारे ज्ञान प्राप्त झाले असते.

**(खाकी)** अरे, तू आमचा गुरू बनतोस? तुझा उपदेश आम्ही ऐकणार नाही.

**(पंडित)** कसा ऐकशील? तुझ्याजवळ तेवढी बुद्धीच नाही. उपदेश ऐकून तो समजण्यासाठी विद्या शिकावी लागते.

**(खाकी)** जो सारे वेद व शास्त्रे शिकून आमच्या सारख्या संतांना मान देत नाही त्याचे ते शिक्षण व्यर्थ होय.

**(पंडित)** हो! आम्ही संतांची सेवा अवश्य करतो. परंतु तुझ्या सारख्या हुल्लडबाजाची नाही. कारण सज्जन, विद्वान, धार्मिक, परोपकारी पुरुषांनाच संत असे म्हणतात.

**(खाकी)** हे बघ आम्ही अहोरात्र नागवे राहतो. धुनी पेटवितो. गांजा व चरस यांचे सारखे झुरके मारतो. तीन-तीन लोटे भांग पितो. गांजा, भांग, धोत्रा यांच्या पानांची भाजी बनवून खातो. अफू आणि सोमल विषही गिळंकृत करतो. रात्रंदिवस नशेत राहतो. त्यामुळे सगळ्या दु:खाचा आम्हाला विसर पडतो. जगाला आम्ही काही समजत नाही. भीक मागून मिळालेल्या पिठाचे रोट बनवून खातो. रात्रभर आम्ही इतके जोराजोरात खोकत असतो की जवळपास झोपलेल्यांना मुळीच झोप येत नाही. अशा प्रकारच्या अनेक सिद्धी आणि साधूपण आमच्यात आहे. तर मग तू आमची निंदा का करतोस? याद राख, अरे बापुड्या! तू आम्हाला त्रास देशील तर आम्ही तुला जाळून भस्म करून टाकू.

**(पंडित)** ही सारी लक्षणे असभ्य, मूर्ख व घमेंडखोराची आहेत. ती साधूची लक्षणे नव्हेत. ऐक! **'साध्नोति पराणि धर्मकार्याणि स साधुः'** जो धर्मयुक्त उत्तम कामे करतो, सदैव परोपकारात प्रवृत्त असतो, ज्याच्यामध्ये कोणताही दुर्गुण नसतो, जो विद्वान असतो, सत्योपदेश करून सर्वांवर उपकार करतो त्याला साधू असे म्हणतात.

**(खाकी)** अरे जा रे! तुला साधूचे मर्म काय कळणार? संतांचे घर (सामर्थ्य) फार मोठे असते. कुणा संताच्या वाटेला जाऊ नकोस. नाहीतर तो आपला चिमटा तुला मारील आणि तुझे कपाळ फोडून टाकीन.

**(पंडित)** ठीक आहे गोसावीबुवा. आपल्या आसनावर बसा. आमच्यावर रागाने असे बेभान होऊ नका. आजकाल कोणते राज्य चालू आहे माहीत आहे ना? कुणाला माराल तर पकडले जाल आणि तुरुंगात पडाल. फटके खाल किंवा तुम्हालाच कोणीतरी बदडून काढील. मग काय कराल? हे साधूचे लक्षण नव्हे.

**(खाकी)** चल रे चेल्या? कुणा राक्षसाचे तोंड पाहायला लावलेस तू.

**(पंडित)** तू कधी एखाद्या महात्म्याच्या संगतीत राहिलेला नाहीस. नाहीतर तू असा जड-मुर्ख राहिला नसतास.

**(खाकी)** आम्ही स्वतःच महातमा आहोत. आम्हाला इतर कोणाची गरज नाही.

**(पंडित)** जे फुटक्या नशिबाचे असतात त्यांची बुद्धी तुझ्यासारखी असते आणि ते तुझ्यासारखेच घमेंडखोर असतात.

अशी बाचाबाची झाल्यावर खाकी आपल्या आसनावर जाऊन बसला आणि पंडित महाशय घरी गेले. संध्याकाळी आरती झाल्यावर त्या खाकीला मोठा समजून अनेक तरुण खाकी त्याला 'डंडोत, उंडोत' (दंडवत) असे म्हणून साष्टांग नमस्कार करून त्याच्याभोवती बसले. तेव्हा त्या खाकीने विचारले, ''अरे रामदाशा! तू किती शिकला आहेस?''

**(रामदास)** महाराज! मी 'बेस्नुसहसरनाम' शिकलो आहे.

**(खाकी)** अरे गोविंददाशा! तू काय शिकला आहेस?

**(गोविंददास)** मी अमुक खाकी महाराजांकडे 'रामसतबराज' वाचले आहे.

**(रामदास)** महाराज आपण काय शिकला आहात?

**(खाकी)** आम्ही गीता वाचली आहे.

**(रामदास)** कोणाजवळ?

**(खाकी)** चल बे छोकरे! आम्ही कोणालाही गुरू करीत नाही. हे बघ. आम्ही 'परागराज' (प्रयागराज) मध्ये राहत होतो. आम्हाला एकही 'अक्खर' (अक्षर) येत नव्हते. जेव्हा एखादा लांब-रूंद धोतर नेसलेला पंडित मला दिसे तेव्हा त्याच्याकडे जाऊन, गीतेचे पुस्तक त्याच्यासमोर धरून त्याला विचारी, ''या कलगीवाल्या अक्खराचे नाव काय आहे?'' असे विचारीत विचारीत अठरा अध्यायांची गीता भरडून काढली. एकही गुरू केला नाही.

आता तुम्हीच विचार करा, अशा विद्येच्या शत्रूंच्या घरी अविद्या मुक्काम ठोकणार नाही तर ती कोठे जाणार? हे लोक नशापाणी, आळस, भांडणतंटा करणे, खाणे, पिणे, झोपणे, झांजा बडविणे, घंटा वाजविणे, शंख फुंकणे, धुनी पेटविणे, अंघोळ करणे, कपडे धुणे आणि चोहोकडे व्यर्थ भटकणे यांखेरीज दुसरे कोणतेही चांगले काम करीत नाहीत. दगड वितळविला तरी या खाकी गोसाव्यांना एखादी गोष्ट समजावून सांगणे फार अवघड आहे. कारण हे लोक बहुधा शूद्र वर्णाचे मजूर, किसान, कहार असतात आणि मजूरी करण्याचे सोडून अंगाला राख लावून बैरागी किंवा गोसावी बनतात. त्यांना विद्या किंवा सत्संग यांचे माहात्म्य कळणे शक्य नसते.

यांपैकी नाथ पंथियांचा मंत्र **'नमः शिवाय'** खाकी गोसाव्यांचा **'नृसिंहाय नमः'** रामावतांचा **'श्रीरामचन्द्राय नमः'** अथवा **'सीतारामाभ्यां नमः'** कृष्णभक्तांचा **'श्रीराधाकृष्णाभ्यां नमः'** किंवा **'नमो भगवते वासुदेवाय'** आणि बंगाल्यांचा **'गोविन्दाय नमः'** आहे. यांपैकी आपापला मंत्र कुणाच्याही कानात उच्चारून ते त्याला आपला शिष्य बनवितात. ते शिष्याला सांगतात, ''बच्चे! तू आता तुंब्याचा (कडू भोपळ्याचा) मंत्र मी सांगतो तसा म्हण'' :-

**जल पवितर स्थल पवितर, और पवितर कुआ।**
**शिव कहे सुन पार्वती, तूंबा पवितर हुआ॥** रामस्नेही धर्मप्रकाश, रामपटल

**अर्थ :-** जल पवित्र आहे. स्थळ पवित्र आहे आणि विहीर पवित्र आहे. शिव म्हणतो, पार्वती ऐक. तूंबा (भोपळा) पवित्र झाला.

अशा माणसाची योग्यता साधू, विद्वान होण्याची किंवा जगावर उपकार करणाऱ्याची कधी तरी असू शकेल काय? बैरागी, गोसावी रात्रंदिवस लाकडे व गोवऱ्या जाळीत असतात. एका महिन्यात अनेक रुपयांची लाकडे ते जाळून टाकतात. त्याऐवजी एका महिन्यात जाळल्या जाणाऱ्या लाकडाच्या किंमतीचे घोंगडे वगैरे घेतील तर शतांश पैशात ते आनंदात राहतील. पण एवढी बुद्धी त्यांना कुठून सुचणार? या लोकांनी धुनीजवळ बसून तापणारे (शेकणारे) म्हणून स्वत:ला तपस्वी म्हणवून घेतात. या मार्गाने तपस्वी होता येत असेल तर जंगली माणसे यांच्याहूनही अधिक तपस्वी ठरतील. जटा वाढविल्या, अंगाला राख लावली, कपाळावर टीळा लावला म्हणजे माणूस तपस्वी होत असेल तर सगळेच तपस्वी होऊ शकतील. हे बैरागी, गोसावी वगैरे बाहेरून त्यागमूर्ती दिसतात, परंतु आतून महासंग्रही असतात.

## कबीरपंथ-समीक्षा

**(प्रश्न)** कबीरपंथी तरी चांगले आहेत ना?

**(उत्तर)** मुळीच नाहीत.

**(प्रश्न)** का बरे? ते लोक तर पाषाणादिकांच्या मूर्तींची पूजा करण्याचे खंडन करतात. कबीर साहेब स्वत: फुलातून उत्पन्न झाले आणि शेवटी फुलांतच विलीन झाले. ब्रह्मा, विष्णू, महेश यांचा जेव्हा जन्मही झालेला नव्हता तेव्हाही कबीरसाहेब होते. ते मोठे सिद्ध पुरुष होते. त्यामुळे वेद व पुराणे यांना जी गोष्ट समजली नाही ती कबीरांनी जाणली होती. कबीरांनीच लोकांना खरा मार्ग दाखविला. 'सत्यनाम कबीर' आदी हा त्यांचा मंत्र आहे.

**(उत्तर)** पाषाणादिकांच्या मूर्तीऐवजी पलंग, गादी, खडावा, ज्योती म्हणजे दिवा यांची पूजा करणे हे मूर्तिपूजेहून काही वेगळे आहे काय ? फुलांतून उत्पन्न होऊन कबीर साहेब हे एखादा भुंगा होते की फुलाचे कळी होते ?

या संदर्भात जी गोष्ट प्रचलित आहे ती खरी असावी. काशीमध्ये एक विणकर राहत होता. त्याला मूलबाळ नव्हते. एके दिवशी रात्रीच्या अंधुक प्रकाशात तो रस्त्याने चालला होता. इतक्यात त्याला रस्त्याच्या कडेला एक टोपली दिसली. त्या टोपलीत रात्रीच जन्मलेले एक मूल फुलांमध्ये ठेवलेले होते. तो विणकर त्या मुलाला घेऊन घरी गेला आणि त्याने ते मूल आपल्या बायकोच्या स्वाधीन केले. तिने त्याचे पालन पोषण केले. तो मुलगा मोठा झाल्यावर विणकराचे काम करू लागला. त्याला संस्कृत शिकण्याची इच्छा झाली. म्हणून तो एका पंडिताकडे गेला. परंतु त्या पंडिताने त्याचा अपमान केला. तो म्हणाला, "आम्ही विणकरांना शिकवीत नसतो." ज्ञान प्राप्तीसाठी तो अनेक पंडितांकडे गेला परंतु कोणीही त्याला विद्या शिकविली नाही. तेव्हा मग तो आपल्या मोडक्या-तोडक्या भाषेत विणकर वगैरे लोकांना उपदेश करू लागला. तो भजने रचीत असे व एकतारीवर ती गात असे. तो पंडित, वेद व शास्त्रे यांची यथेच्छ निंदा करीत असे. काही मूर्ख लोक

त्याच्या जाळ्यात अडकले. तो मेल्यावर लोकांनी त्याला सिद्ध पुरुष बनवून टाकले. त्याने आपल्या हयातीत जी काही काव्यरचना केली होती तिचे अध्ययन त्याचे चेले करू लागले. कान बंद करून घेतल्यावर जो आवाज ऐकू येतो त्याला त्यांनी अनहत शब्द असे नाव दिले. मनाच्या वृत्तीला ते 'सुरति' म्हणतात त्या सुरतीला तो अनहत शब्द ऐकण्यात तल्लीन करणे हेच परमेश्वराचे ध्यान असून ते ध्यान जो करतो तो संत होय असे ते समजतात. त्या ठिकाणी काळ पोहोचू शकत नाही. ते लोक बर्छीच्या आकाराचे गंध लावतात आणि चंदनादिकाच्या माळा गळ्यात घालतात. आता तुम्हीच विचार करा की, या मार्गाने आत्म्याची उन्नती कशी होणार आणि ज्ञान कसे वाढणार? हा साराच पोरकटपणा आहे.

## नानक-पंथाची समिक्षा

**(प्रश्न)** पंजाबात नानकजींनी एक संप्रदाय सुरू केला होता. तेही मूर्तिपूजेचे खंडन करीत असत. त्यांनी लोकांना मुसलमान होण्यापासून वाचविले. ते साधू बनले नाहीत. गृहस्थच राहिले. त्यांनी ज्या मंत्राचा उपदेश केला त्यावरून त्यांचा हेतू फार चांगला होता असे दिसून येते. तो मंत्र असा आहे :-

**ओं सत्यनाम कर्त्ता पुरुष निर्भो निर्वैर अकालमूर्त अजोनि सहभं गुरु प्रसाद जप। आदि सच, जुगादि सच, है भी सच, नानक होसी भी सच॥** जपजी, पौडी १

'ओ३म्' ज्याचे सत्य नाव आहे तो कर्ता पुरुष निर्भय व निर्वैर आहे. तो अकालमूर्ती आहे. म्हणजे काळाच्या पकडीत सापडत नाही आणि योनित येत नाही. तो 'अजन्मा' आहे. तो प्रकाशमान आहे. गुरूच्या कृपेने त्याचाच जप कर. तो परमात्मा आदिमध्ये सत्य होता. युगादिकांच्या वेळी सत्य होता. वर्तमानकाळी सत्य आहे आणि यापुढेही सत्यच राहील.

**(उत्तर)** नानकांचा हेतू चांगला होता. परंतु त्यांच्याजवळ विद्वत्ता मुळीच नव्हती. त्यांना फक्त आपल्या प्रदेशातील खेड्याची पंजाबी भाषा येत होती. त्यांना संस्कृतचे ज्ञान नव्हते आणि वेदादी शास्त्रांचे अध्ययन त्यांनी केले नव्हते. त्यांना संस्कृत येत असती तर त्यांनी 'निर्भय' हा शब्द 'निर्भो' असा का लिहिला असता? संस्कृत भाषेचे ज्ञान त्यांनी रचलेल्या संस्कृती स्तोत्रांवरून दिसून येते. आपण संस्कृतमध्ये देखील ढवळाढवळ करावी परंतु संस्कृत भाषा शिकल्याशिवाय कशी येणार ? पण ज्या खेडवळ लोकांनी कधी संस्कृत भाषा ऐकली नव्हती त्यांचे समोर संस्कृतचे 'संस्कृती-स्तोत्र' बनवून आपण संस्कृतचेही पंडित बनले असतील. लोकांनी आपल्याला मान द्यावा, आपली ख्याती व्हावी व आपली प्रतिष्ठा वाढावी अशी इच्छा त्यांच्या मनांत नसती तर त्यांनी ही गोष्ट कधी केली नसती. त्यांना कीर्तीची हांव नक्कीच असणार. ती नसती तर त्यांनी जी भाषा येत होती तिच्यातच त्यांनी लिहिले असते. आपण संस्कृत शिकलेलो नाही असे त्यांनी सांगून टाकले असते. मनांत गर्वाची भावना असल्यामुळे मानसन्मान मिळवण्यासाठी त्यांनी ते ढोंग केले असावे. म्हणूनच त्यांच्या ग्रंथात वेदांची निंदा व स्तुती आढळतात. कारण त्यांनी तसे केले नसते तर त्यांना जेव्हा कोणी वेदांचा अर्थ विचारला असता व त्यांना तो सांगता आला नसता तेव्हा त्यांची प्रतिष्ठा धुळीला मिळाली असती. म्हणून त्यांनी आधीच आपल्या शिष्यांसमोर कोठे-कोठे वेदाच्या विरुद्ध उद्गार काढले तर कोठे-कोठे वेदाविषयी चांगले मतही व्यक्त केले आहे. कारण वेदाविषयी थोडेफारही अनुकूल उद्गार काढले नसते तर लोकांनी त्यांना नास्तिक म्हटले असते. जसे,

**वेद पढत ब्रह्मा मरे।** आसा १। प. १० **चारों वेद कहानि।** राग तिलंग १। प. १

**सन्त कि महिमा वेद न जानी॥ (नानक) ब्रह्मज्ञानी आप परमेश्वर।** सु.पौ. ७प. ८

अर्थ : (सतत वेदपठन करणारा ब्रह्माही मेला. चारही वेद म्हणजे निव्वळ एक कल्पित कथा आहे. संतांचा महिमा वेदांना कळत नाही. नानक म्हणतात की, ब्रह्मज्ञानी माणूस हा स्वत:च परमेश्वर असतो.)

वेदपठन करणारे मेले. पण वेदपठन न करणारे नानकजींसारखे लोक स्वत:ला अमर समजत होते ? ते मेले नाहीत काय ? वेद हे सर्व विद्यांचे भांडार आहे. परंतु जो कोणी वेद ही एक कहाणी आहे असे म्हणतो त्याच्या सगळ्याच गोष्टी कल्पित कथा आहेत, ज्या मूर्खांना लोक संत समजतात त्या बिचाऱ्यांना वेदांचा महिमा कधीच कळणार नाही. नानकजींनी वेदांचा गौरव केला असता तर त्यांचा पंथ चालला नसता; आणि ते गुरूही बनू शकले नसते. कारण ते स्वत: संस्कृत विद्या शिकलेले नसल्याने इतरांना ती शिकवून त्यांना शिष्य कसे बनवू शकले असते.

ज्यावेळी पंजाबात नानकजींचा उदय झाला त्यावेळी पंजावात संस्कृत विद्येचा पूर्ण अभाव होता आणि तो प्रदेश मुसलमानांच्या छळाने त्रस्त झालेला होता. अशा वेळी त्यांनी काही लोकांना (इस्लामपासून) वाचविले. नानकजींच्या हयातीत त्यांचा संप्रदाय फारसा नव्हता आणि त्यांना पुष्कळसे शिष्य मिळालेले नव्हते. परंतु अविद्वान लोकांमध्ये अशी प्रथा आहे की, ते एखाद्या माणसाला तो मेल्यानंतर सिद्धपुरुष बनवून टाकतात; आणि मग त्याचे माहात्म्य रचून त्याला ईश्वरासमान मानतात.

वस्तुत: नानकजी फार श्रीमंत किंवा जमीदार वर्गातलेही नव्हते. परंतु त्यांच्या चेल्यांनी 'नानक चंद्रोदय' व 'जनमसाखी' इत्यादी ग्रंथांमध्ये ते फार मोठे सिद्ध पुरुष व अत्यंत ऐश्वर्यवान होते असे लिहून ठेवले आहे. नानकजी ब्रह्माला भेटले, त्यांच्याशी खूप चर्चा केली, सर्वांनी त्यांचा सन्मान केला, त्यांच्या लग्नात पुष्कळ घोडे, रथ, हत्ती वगैरे सोने, चांदी, मोती, पन्ना, हिरे माणके वगैरे रत्नांनी सजविले, अमूल्य रत्नांची तर गणतीच नव्हती, असे लिहिले आहे. या सगळ्या थापा नाही तर काय? मात्र हा सारा नानकजींच्या चेल्यांचा दोष आहे. नानकजींचा नाही.

नानकांच्या निधनानंतर त्यांच्या मुलाने 'उदासी' नावाचा पंथ सुरू केला; तर रामदास वगैरे मंडळींनी 'निर्मले' नावाचा पंथ निर्माण केला. नानकांच्या नंतर त्यांच्या गादीवर बसलेल्यांनी त्याची भाषा ग्रंथसाहेबामध्ये संग्रहित केल्या. दहावे गुरू गोविंदसिंग गुरू झाले. त्यांच्यानंतर कुणाचीही रचना ग्रंथसाहिबमध्ये समाविष्ट केली नाही. परंतु तोपर्यंतच्या काळात जी लहान लहान पुस्तके लिहिली गेली होती त्या सर्वांचे एकत्र संकलन करून ग्रंथ बांधला गेला. नानकांनंतर त्यांच्या पंथातील अनेक लोकांनी अनेक पुस्तके लिहिली. काही लोकांनी पुराणांसारख्या भाकडकथाही लिहिल्या. ब्रह्मज्ञानी माणूस स्वत:च परमेश्वर असतो, हे तत्त्व गृहीत धरून नानकांचे शिष्य झुकत गेले. त्यांनी कर्म व उपासना करणे सोडल्याने परिस्थिती खूपच बिघडली. नानकजींनी ईश्वराची जी विशिष्ट प्रकारची भक्ती करायला सांगितली होती ती त्यांचे शिष्य करीत राहिले असते तर चांगले झाले असते. आता उदासी म्हणतात की आम्ही मोठे, तर निर्मले म्हणतात आम्ही मोठे. अकाली व सूतरहसाई म्हणतात आम्ही सर्वांचे वर आहोत.

या गुरूंपैकी गोविंदसिंह अत्यंत शूरवीर होते. मुसलमानांनी त्यांच्या पूर्वजांचा फार छळ केला होता.

म्हणून ते मुसलमानांवर सूड उगवू इच्छित होते. परंतु त्यांच्याजवळ कसलीच युद्धसामग्री नव्हती; आणि मुसलमानांची बादशाही तर ऐन जोरात होती. म्हणून त्यांनी एक पुरश्चरण केले आणि असे जाहीर केले की, ''देवीने मला एक वर आणि एक तलवार देऊन अशी आज्ञा केली आहे की, तू मुसलमानांशी लढाई कर. तुझा जय होईल.'' ही वार्ता सर्वत्र पसरली आणि खूप लोक त्यांना येऊन मिळाले. ज्याप्रमाणे वाममार्गी लोकांनी 'पंचमकार' व चक्रांकित (वैष्णव) लोकांनी 'पंच संस्कार' चालविले त्याप्रमाणे गुरू गोविंदसिंहांनी 'पंच ककार' सुरू केले. त्यांचे हे पंच ककार युद्धाकरिता उपयुक्त होते. पहिला ककार म्हणजे 'केश' (केस). डोकीवरील केस वाढविल्याने लाठी किंवा तलवार यांच्या आघातापासून थोडाफार बचाव होण्याची शक्यता होती. दुसरा ककार म्हणजे 'कंगण'. अकाली शीख डोकीवरील फेट्यात मोठे लोखंडी कडे घालतात. हातात कडे घालतात. या दोन कड्यांमुळे डोक्याचे व मनगटाचे रक्षण होते. तिसरा ककार म्हणजे 'काछ' (कसोटा). लोक जशी लंगोट किंवा घुटन्यावर चड्डी घालतात तसा हा पळण्याच्या व उड्या मारण्यात चांगला उपयोगी होतो. पुष्कळसे अखाडेबाज पहिलवान हे नेसतात. चौथा ककार म्हणजे 'कंगा' (कंगवा). या कंगव्याने केस विंचरून स्वच्छ ठेवता येतात. पाचवा ककार म्हणजे 'काचू' (कट्यार) किंवा किरपान (कृपान). शत्रूशी हातघाईच्या लढाईत याचा चांगला उपयोग होतो. गुरू गोविंदसिंहानी आपल्या बुद्धीमत्तेने त्यावेळी आवश्यक ही प्रथा चालू केली होती. आता या सगळ्या गोष्टींचा काही उपयोग नाही. युद्धाच्या कामी उपयुक्त ठराव्यात म्हणून ज्या गोष्टी त्यांनी प्रचलित केल्या त्या आता शीख पंथाचे अभिन्न अंग बनल्या आहेत.

शीख लोक मूर्तिपूजा करीत नाहीत. परंतु त्याहूनही अधिक पूजा ग्रंथसाहेबाची करतात. तीही एक प्रकारची मूर्तिपूजाच नाही काय? **कोणत्याही जड (ज्ञानरहित) वस्तूसमोर मस्तक नमविणे किंवा तिची पूजा करणे ही सर्व मूर्तिपूजाच आहे.** मूर्तिपूजकांनी आपल्या भक्तीचे दुकान मांडून जशी पोटापाण्याची सोय केली आहे तशीच या लोकांनीही केली आहे. जसे पुजारी मूर्तीचे दर्शन घडवितात आणि तिच्यापुढे पैसे वगैरे ठेवायला लावतात तसेच नानकपंथी लोकही ग्रंथाची पूजा करतात, इतरांकडून पूजा करवितात आणि त्यांना भेटवस्तू अर्पण करायला लावतात. परंतु मूर्तिपूजक लोक वेदांचा जेवढा मान ठेवतात तेवढा हे ग्रंथसाहेबवाले ठेवीत नाहीत. हे म्हटले जाऊ शकते की, यांनी वेदपठण किंवा वेदश्रवण केलेले नसते. काय करणार? हट्टी किंवा दुराग्रही नसलेले बुद्धिमान लोक जेव्हा वेदांचे श्रवण करतात अथवा वेद वाचतात तेव्हा ते कोणत्याही संप्रदायाचे असले तरी वेदमतात येतात. तरीपण या शीख लोकांनी खाण्यापिण्यातील निरर्थक बंधने पुष्कळ अंशी काढून टाकली आहेत. याचप्रमाणे विषयासक्ती व दुरभिमान यांचा त्याग करून हे लोक वैदिक धर्माची उन्नती करतील तर चांगली गोष्ट होईल.

## दादूपंथ-समीक्षा

**(प्रश्न)** दादूपंथी लोकांचा मार्ग तरी चांगला आहे ना?

**(उत्तर)** चांगला असा फक्त वेदमार्गच आहे. तो मार्ग धरणे असेल तर तसे करा नाही तर सदैव गटांगळ्या खात राहाल. संत दादू दयाल यांचा जन्म त्यांच्या मतानुसार गुजरातेत झाला होता. नंतर ते जयपूरजवळच्या आमेर या गावी राहू लागले. ते तेल्याचा धंदा करीत. देवाची लीला अगाध आहे. दादूजीही पूजले जाऊ लागले.

त्यांनी वेदादी शास्त्रांचा अभ्यास करायचे सोडून 'दादूराम, दादूराम' यातच मुक्ती आहे असे मानले. जेव्हा सत्याचा उपदेश होत नाही तेव्हा असल्या वितंड गोष्टी चालतात.

## रामस्नेही मत-समीक्षा

अगदी अलीकडेच शाहपुरा या गावी 'रामसनेही' या नावाचे मत सुरू झाले. त्या लोकांनी वेदोक्त धर्माचा त्याग करून 'राम, राम' असे म्हणणेच चांगले मानले आहे. रामनामातच ज्ञान, ध्यान व मुक्ती ते मानतात. परंतु जेव्हा भूक लागते तेव्हा रामनामाचा-जप करून भाजीभाकरी मिळत नाही. कारण खाण्यापिण्याचे पदार्थ गृहस्थांच्या घरीच मिळतात. हे लोकही मूर्तिपूजेचा धिक्कार करतात. परंतु ते स्वतःच मूर्ती बनत आहेत. हे लोक बहुधा स्त्रियांच्याच संगतीत रहतात. कारण रामजीला 'रामकी' (रामाची स्त्री) शिवाय आनंद मिळू शकत नाही.

रामचरण नावाचा एक साधू होऊन गेला. त्याचा पंथ मुख्यत: मेवाडमधील शाहपुरा या गावातून सुरू झाला. या पंथाचे लोक 'रामराम' हा परममंत्र व तोच सिद्धांत मानतात. त्यांच्या एका ग्रंथात संतदास वगैरेंची वाणी संग्रहित केलेली आहे. त्यात लिहिले आहे :

**भरम रोग तब ही मिट्या, रट्या निरंजन राइ।**
**तब जम का कागज फट्या, कट्या कर्म तब जाइ ॥१॥** सारवी. ६। सुमरणका अंग १७

(अर्थ : जेव्हा एखादा माणूस ईश्वराच्या नावाचा जप करतो तेव्हा त्याच्या साऱ्या शंका दूर होतात, त्याला रोगराई होत नाही, यमराज त्याच्या पापपुण्याची नोंद असलेले कागदपत्र फाडून टाकतो आणि त्याची सर्व पापे नाहीशी होतात.)

आता शहाण्या लोकांनी विचार करावा की, केवळ 'रामराम' म्हटल्याने माणसाचा भ्रम जे अज्ञान आहे ते कसे नष्ट होणार ? आणि यमराजाच्या नियमांनुसार त्याच्या पापांची फळे त्याला भोगावी न लागता माणूस आपल्या कर्माच्या फळांतून मुक्त होणार की नाही ? असा समज पसरविणे म्हणजे माणसाला पापाच्या जाळ्यात अडकविणे आणि मनुष्य जन्म वाया घालवणेच आहे. आता या लोकांचा मुख्य गुरू जो रामचरण त्याची काही वचने पहा.

**महमा नांव प्रताप की, सुणौ सरवण चित्त लाइ।**
**रामचरण रसना रटौ, क्रम सकल झड़ जाइ ॥**
**जिन जिन सुमिऱ्या नांव कूं, सो सब उतऱ्या पार।**
**रांमचरण जो वीसऱ्या, सो ही जम के द्वार ॥**
**रांम विना सब झूठ वतायो, । रांम भजत छूट्या सब क्रम्मा ॥**
**चंद अरु सूर देइ परकम्मा। रांम कहे तिन कूं भै नाही ॥**
**तीन लोक में कीरति गाहीं। रांम रटत जम जोर न लागै ॥**
**रांम नाम लिख पथर तराई। भगति हेति औतार ही धरही ॥**
**ऊंच नीच कुल भेद विचारै। सो तो जनम आपणो हारै ॥**
**संन्तां कै कुल दीसै नाहीं। रांम रांम कह राम सम्हांही ॥**

**ऐसो कुण जो कीरति गावै। हरि हरिजन कौ पार न पावै॥**
**रांम संतां का अन्त न आवै। आप आपकी बुद्धि सम गावै॥**

(अर्थ : हे मित्रा, परमेश्वराच्या नावाचा प्रताप व महिमा किती मोठा आहे ते लक्ष देऊन ऐक. रामनामाचा जप केल्याने सारी पापे नष्ट होतात. ज्यांनी ज्यांनी नामस्मरण केले ते सारे भवसागर तरून गेले. परंतु ज्यांना देवाचे विस्मरण झाले ते यमाच्या तावडीत सापडले. रामाखेरीज इतर सर्व मिथ्या आहे. रामाची भक्ती केल्याने मनुष्य कर्ममुक्त होतो. चंद्र व सूर्य अशा रामभक्ता भोवती प्रदक्षिणा घालतात. राम सांगतो की, अशा लोकांना कसलेही भय उरत नाही. तीन्ही लोक त्यांचे गुणगान करतात. रामनाम जपणाऱ्यावर यमाचा जोर चालत नाही. रामाचे नाव लिहिलेले दगड पाण्यावर तरंगत राहिले. आपल्या भक्तांसाठी ईश्वर अवतार धारण करतो. जो कोणी माणसाची जात व कुळ यांचा विचार करून उच्चनीच असा भेदभाव करतात ते आपला जन्म व्यर्थ घालवितात. संत लोक जातीपातींचा विचार करीत नाही. राम नाम असे म्हणत ते रामस्वरूप होऊन जातात. जो कोणी रामाचे गुणगान करतो तो थोर होय. त्याचे सामर्थ्य अपार असते. राम म्हणतो, संतांच्या मोठेपणाला अंत नाही. प्रत्येकाने आपापल्या बुद्धीप्रमाणे रामाचे गुणगान करावे.)

यांचे खंडन :- रामचरण वगैरे लोकांचे ग्रंथ पाहिल्यानंतर प्रथमत: ही गोष्ट लक्षात येते की, रामचरण हा एक साधा खेडवळ माणूस होता. तो मुळीच शिकलेला नव्हता. तो सुशिक्षित असता तर त्याने अशा थापा कशाला मारल्या असत्या ? केवळ राम राम असे म्हटल्याने सर्व पापे नष्ट होतात, हा या लोकांचा केवळ भ्रम आहे. असल्या गोष्टी सांगून ते आपला व इतरांचा जन्म वाया घालवितात. यमाचे भय ही तर फारच मोठी गोष्ट झाली. परंतु राजाचा शिपाई, चोर, डाकू, वाघ, साप, विंचू आणि डास इत्यादिकांचे भयही रामनामाच्या जपाने दूर होत नाही. रात्रंदिवस राम, राम करीत राहिल्याने काहीही साध्य होत नाही. ज्याप्रमाणे 'साखर, साखर' असे म्हणत राहिल्याने तोंड गोड होत नाही त्याचप्रमाणे सत्यभाषण आदी कर्मे न करता केवळ रामनामाचा जप केल्याने काहीही होणार नाही. एकदा राम-राम असे म्हटल्याने त्यांच्या रामाला ते ऐकू जात नसेल तर जन्मभर रामनामाचा जप करूनही त्याला ते ऐकू जाणार नाही आणि जर ज्याला एकदा म्हटलेले ऐकू जात असेल तर दुसऱ्यांदा राम-राम म्हणणे व्यर्थ आहे. या लोकांनी आपले पोट भरण्यासाठी आणि इतरांचा जन्म नष्ट करण्यासाठी ही सारी लबाडी रचली आहे. यांचे नाव असते रामस्नेही परंतु काम करतात ते रांडस्नेही. जिकडे पाहावे तिकडे रांडाच रांडा. त्या संतांभोवती घोळका करून बसलेल्या दिसतात. असली पाखंडे या देशात नसती तर आर्यावर्त्त देशाची अशी दुर्दशा का झाली असती ? हे लोक आपल्या चेल्यांना आपले उष्टे खायला लावतात आणि स्त्रियाही यांना साष्टांग नमस्कार घालतात. हे साधू लोक स्त्रियांशी एकांतवासही करतात.

या पंथाची आणखी एक शाखा मारवाडातील खेडापा नावाच्या गावी सुरू झाली आहे. या शाखेचा इतिहास असा आहे :-

रामदास नावाचा चांभार कुळात जन्मलेला एक व्यक्ती होता. त्याला दोन बायका होत्या. प्रथम अनेक दिवसांपर्यंत तो औघड (अघोरी) पंथाचा अनुयायी बनून कुत्र्यांबरोबर खात-पीत असे. नंतर तो वाममार्गी लोकांच्या कुंडापंथात गेला. नंतर तो रामदेवाचा 'कामडिया' बनला. तो आपल्या बायकांसह गात असे. असाच हिंडता-हिंडता तो 'सीथल' गावाच्या चर्मकारांचा गुरू असलेल्या हररामदासाला जाऊन भेटला.

हररामदासाने त्याला रामदेव पंथाचा उपदेश करून आपला चेला बनविले. नंतर हा रामदास आपल्या खेडापा गावी परत गेला आणि तेथे त्याने आपली गादी स्थापन केली व आपला पंथ सुरू केला.

तिकडे शाहपुरा या गावी रामचरणाचा पंथ वाढू लागला होता. त्याचाही इतिहास असा ऐकिवात आहे की, तो जयपूरचा व्यापारी होता. त्याने दांतडा या गावी एका साधूकडून वेश घेऊन त्याला आपला गुरू केला आणि शाहपुऱ्यात आपले स्थान जमविले. भोळ्या लोकांमध्ये पाखंडाची पाळेमुळे लवकर रुजतात. त्यामुळे त्याचा पंथ तेथे चांगला रुजला. वर उल्लेखिलेल्या रामचरणाची वचने प्रमाण मानून लोकांना आपले चेले बनवितात. त्यांमध्ये उच्च-नीच असा भेद नाही. ब्राह्मणापासून अंत्यजांपर्यंत सर्व लोक त्यांचे अनुयायी बनतात. आजही ते लोक कुंडापंथी लोकांप्रमाणेच आचरण करतात. कारण ते मातीच्या कुंड्यातूनच खातात; आणि साधूंचे उष्टे खातात. ते लोकांना वेदमत व आई, बाप व सांसारिक गोष्टी इत्यादींविषयी त्यांचा संबंध तोडायला लावतात व आपले चेले बनवितात. हे लोक रामनामाला महामंत्र समजतात आणि त्यालाच ते 'छुच्छम' (सूक्ष्म) वेदही मानतात. रामनामाचा जप केल्याने अनंत जन्मांची पापे नष्ट होतात. त्याशिवाय कोणालाही मुक्ती मिळत नाही. प्रत्येक श्वासोच्छ्वासाबरोबर राम-राम जे म्हणतात त्यांना ते सत्यगुरू म्हणतात; आणि सत्यगुरूला परमेश्वराहूनही श्रेष्ठ मानून ते त्याच्या मूर्तीचे ध्यान करतात. साधूंचे पाय धुऊन ते पाणी तीर्थ समजून पितात. जेव्हा चेला गुरूपासून दूर जातो तेव्हा त्याने आपल्या गुरूची नखे व दाढीचे केसही आपल्याजवळ ठेवावीत आणि रोज त्यांना आंघोळ घालून ते पाणी तीर्थ समजून प्राशन करतात. हे लोक रामदास व हररामदास यांच्या उक्ती वेदांहूनही श्रेष्ठ समजतात. त्या ग्रंथांना प्रदक्षिणा घालून ते आठ साष्टांग नमस्कार घालतात आणि गुरूजवळ असल्यास त्याला साष्टांग नमस्कार घालतात. स्त्रियांना व पुरुषांना ते रामनामाचा जप करण्याचा सारखाच मंत्रोपदेश देतात. नामस्मरण केल्यानेच कल्याण होते असे ते मानतात. ग्रंथ पठण व विद्याध्ययन हे पाप आहे असे ते समजतात. त्यांची एक साखी अशी आहे :-

**पंडताइ पाने पड़ी, ओ पूरब लो पाप।**
**राम-राम सुमर्‍यां विना, रइग्यौ रीतो आप॥**
**वेद पुराण पढ़े पढ़ गीता, रांमभजन बिन रइ गये रीता॥**

(अर्थ :- विद्याध्ययन हे निरर्थक आहे. ग्रंथ वाचने हे पाप आहे. रामनाम न घेता केलेली सारी कर्मे व्यर्थ आहेत. वेद, पुराणे व गीता यांचा अभ्यास करताना रामनामाचा जप केला नाही तर त्या अभ्यासाचा काही उपयोग नाही.)

अशा प्रकारची पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. स्त्रीने पतीची सेवा करणे हे पाप पण गुरू व साधूची सेवा करणे हा धर्म आहे असे ते सांगतात. वर्णाश्रम व्यवस्था ते मानीत नाहीत. ब्राह्मण हा रामस्नेही नसेल तर तो नीच आणि चांडाळ, रामस्नेही असल्यास तो उत्तम (श्रेष्ठ) आहे, असे ते मानतात. ते ईश्वराचा अवतार मानीत नाहीत आणि रामचरणाचे जे वचन आम्ही यापूर्वी उद्धृत केले आहे त्यात सांगितल्याप्रमाणे **'भगति हेति औतार ही धरही'** म्हणजे संत व भक्तांसाठी ईश्वर अवतार घेतो असे ते समजतात. अशा प्रकारचे जे पाखंडी पंथ आहेत त्यांच्यामुळे आर्यावर्त्त देशाला अहितकारी आहेत. या विवेचनावरून शहाणे लोक योग्य तो बोध घेतील.

# गोकुलियापंथ-समीक्षा

**(प्रश्न)** गोसाव्यांमध्ये गोकुलिये या नावाचा पंथ आहे. तो फार चांगला आहे. पाहा ना, ते कसे ऐश्वर्य उपभोगतात. त्यांच्याजवळ काहीतरी लीला व सामर्थ्य असल्याखेरीज त्यांना एवढे ऐश्वर्य प्राप्त होणे शक्य आहे काय?

**(उत्तर)** ते ऐश्वर्य गृहस्थाश्रमी लोकांचे असते. त्यात गोसाव्यांचे काहीच नसते.

**(प्रश्न)** वाहवा ! गोसाव्यांना त्यांच्या कर्तृत्वाने ते ऐश्वर्य प्राप्त होते. असे ऐश्वर्य इतरांना का प्राप्त होत नाही?

**(उत्तर)** इतर लोकही त्यांच्यासारख्या लांड्यालबाड्या करतील तर त्यांनाही असे ऐश्वर्य लाभेल यात काय संशय? इतर लोक यांच्यापेक्षा अधिक करतील तर त्यांना यांच्यापेक्षाही जास्त ऐश्वर्य मिळू शकेल.

**(प्रश्न)** वाहवा ! यात कसला धूर्तपणा? ही सारी गोलोकाची लीला आहे.

**(उत्तर)** ती गोलोकाची लीला नसून गोसाव्यांची लीला आहे. ती जर गोलोकाची लीला असेल तर गोलोकातही इथल्यासारखीच स्थिती असली पाहिजे. या पंथाचा उदय तैलंगण (आंध्र) देशात झाला. लक्ष्मणभट्ट नावाचा एक तेलंगी ब्राह्मण लग्न झाल्यानंतर आपले आईबाप व पत्नी यांचा त्याग करून काशीला गेला आणि 'माझे लग्न झालेले नाही', असे खोटेच सांगून त्याने संन्यास घेतला. योगायोगाने त्याचे आईबाप व पत्नी यांना काशीमध्ये त्याने संन्यास घेतल्याची बातमी समजली. ते ऐकताच त्याचे आईबाप व पत्नी काशीला गेले आणि ज्याने लक्ष्मणभट्टाला संन्यास दिला होता त्याला भेटून त्यांनी सांगितले की, ''याला तुम्ही संन्यासदीक्षा कशी दिली? ही पाहा. ही तरुणी त्याची पत्नी आहे.'' त्याची पत्नी म्हणाली, ''तुम्ही माझा पती मला परत देणार नसाल तर मलाही संन्यास द्या.'' यावर त्या गुरूने लक्ष्मणभट्टाला बोलावून असे सांगितले की, ''तू फारच खोटा आहेस. तू खोटे बोलून संन्यास घेतला आहे. म्हणून संन्यासाश्रमाचा त्याग करून पुनः गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर.'' त्याप्रमाणे लक्ष्मणभट्टाने पुनः गृहस्थाश्रमात प्रवेश केला आणि आपल्या घरच्या लोकांबरोबर तो परत गेला.

अशा या मताचे मूळ हे असत्य कपटावर आधारले आहे. जेव्हा ते चौघे तेलंग देशास परत गेले तेव्हा त्याच्या वर्णाच्या लोकांनी त्याला जातीतून काढून टाकले. मग लक्ष्मणभट्ट गाव सोडून इकडे-तिकडे भटकू लागले. तेथून ते पुनः काशीला आले. काशीच्या जवळ असलेल्या चरणार्गढाजवळ चंपारण्य नावाचे जंगल होते. लक्ष्मणभट्ट त्या जंगलातून आपल्या पत्नीसह चालले असता त्यांना तेथे एक लहान मुलगा कोणीतरी टाकून दिलेला दिसला. त्या मुलाला एखाद्या श्वापदाने मारून टाकू नये म्हणून त्याच्या सभोवती आग पेटवून ठेवली होती. लक्ष्मणभट्ट आणि त्याची पत्नी यांनी त्या मुलाला उचलून घेतले आणि त्याचे पुत्रवत पालन पोषण केले. मग ते काशीतच राहू लागले. तो मुलगा मोठा झाल्यावर त्याच्या पालक आई-वडिलांचे निधन झाले. यावेळेपर्यंत त्याचे थोडेफार अध्ययन झाले होते. काही दिवसांनी तो मुलगा एका विष्णुस्वामीच्या मंदिरात जाऊन चेला बनला. तेथे त्याचे न पटल्यामुळे तो काशीला परत गेला व त्याने संन्यास घेतला. त्यावेळी असाच एक जातिबहिष्कृत ब्राह्मण काशीत राहत होता. त्याला एक तरुण मुलगी होती. तो ब्राह्मण या तरुणाला म्हणाला, ''तू संन्यासाचा त्याग करून माझ्या मुलीशी लग्न कर.'' त्याप्रमाणे त्याने त्या मुलीशी लग्न केले.

त्याचे वडिलांनी जसे केले तसेच त्यानेही केले. तो आपल्या पत्नीला घेऊन तो विष्णुस्वामीच्या मंदिरात चेला बनला होता तेथे गेला. परंतु ते विवाहित असल्यामुळे त्यांना तेथे कोणी राहू दिले नाही. म्हणून तो तेथून वज्रदेशात जे अविद्येचे माहेरघरच आहे. तेथे त्याने अनेक प्रकारच्या लांड्यालबाड्या करून खोट्यानाट्या गोष्टी लोकांना सांगायला सुरुवात केली. तो असे सांगू लागला की, 'भगवान श्रीकृष्ण मला भेटले; आणि त्यांनी मला असे सांगितले की, "गोलोकातून जे दैवी जीव मर्त्यलोकात आले आहेत त्यांना तू ब्रह्मसंबंध व्रताने पवित्र करून गोलोकात परत पाठव." अशा प्रकारे मूर्ख लोकांना प्रलोभन दाखवून त्याने काही थोड्या म्हणजे ८४ लोकांना वैष्णव बनविले. त्यांच्यासाठी त्याने खालील मंत्र बनविले. आणि त्यांतही रहस्य ठेवले जसे, **श्रीकृष्णः शरणं मम ॥**

**क्लीं कृष्णाय गोपीजनवल्लभाय स्वाहा ॥ २ ॥**

हे दोन्ही सामान्य मंत्र आहेत. यानंतरचा मंत्र ब्रह्मसंबंध आणि समर्पण करण्यासंबंधी आहे :-

**श्रीकृष्णः शरणं मम सहस्रपरिवत्सरमितकालजातकृष्णवियोग जनिततापक्लेशानन्ततिरोभावोऽहं भगवते कृष्णाय देहेन्द्रियप्राणान्तःकरणतद्धर्मांश्च दारागारपुत्राप्त वित्तेहपराण्यात्मना सह समर्प्पयामि, दासोऽहं कृष्ण तवास्मि ॥**

या मंत्राचा उपदेश करून शिष्य आणि शिष्यिणी यांचे समर्पण करवितात. 'क्लीं कृष्णायेति' हा 'क्लीं' शब्द तंत्र ग्रंथातील आहे. यावरून हा वल्लभपंथही वाममार्गी लोकांचा एक भेद आहे, हे दिसून येते. यामुळेच बहुधा गोसावी लोक स्त्रीसंग करतात.

'गोपीवल्लभेति' - कृष्ण काय फक्त गोपींनाच प्रिय होते? इतरांना ते प्रिय नव्हते काय? जो स्त्रैण म्हणजे स्त्रीभोगामध्ये गुंतलेला असतो तोच स्त्रियांना प्रिय असतो. श्रीकृष्ण असे होते काय?

आता 'सहस्रपरिवत्सरेति' - हजार वर्षांची गणना व्यर्थ आहे. कारण वल्लभ आणि त्याचे शिष्य हे काही सर्वज्ञ नाहीत. कृष्णाचा वियोग काय फक्त हजार वर्षांचाच होता? जेव्हा वल्लभाचा जन्मही झालेला नव्हता तेव्हा आपल्या दैवी जीवांच्या उद्धारासाठी गोलोकातून कोणीच का आला नाही?

'ताप' व 'क्लेश' हे दोन्ही शब्द पर्यायवाची आहेत. त्यांच्यापैकी एक घ्यायला हवा होता. दोन्हीचा वापर करण्याची आवश्यकता नव्हती.

'अनंत' शब्दाचा वापर करणे निरर्थक आहे. कारण अनंत हा शब्द ठेवला तर 'सहस्र' या शब्दाला काही अर्थ उरत नाही. आणि सहस्र हा शब्द ठेवला तर अनंत शब्द निरर्थक ठरतो. तसेच माणूस अनंत काळापर्यंत 'तिरोहित' म्हणजे दुःखाने आच्छादित राहत असेल तर त्याच्या मुक्तीसाठी वल्लभाचे आगमनही व्यर्थ ठरते. कारण अनंताला अंत नसतो.

बरे! देह, इंद्रिये, प्राण, अंतःकरण, धर्मपत्नी, घर-दार, पुत्र, धन-दौलत इत्यादि श्रीकृष्णाला अर्पण का करावयाचे? श्रीकृष्ण हा तर पूर्णकाम होता. त्याला कोणाच्या देहादिकाची इच्छा कशी असू शकेल ? शिवाय देहादिकांचे अर्पण करणे शक्यही नसते. कारण देहाचे अर्पण नखशिखांत देह म्हटला जातो. त्यातील मलमूत्रादी घाणेरड्या गोष्टींचे अर्पण कसे करू शकाल ?

शिवाय पापपुण्यरूपी कर्मे कृष्णार्पण केल्याने त्यांची फळे कृष्णाला भोगावी लागणार. म्हणजे नाव कृष्णाचे परंतु समर्पण मात्र स्वतःच्या फायद्यासाठी करतात. देहामध्ये जे काही मलमूत्रादी आहे ते सारे गोसाईजींना का अर्पण केले जात नाही? की गोड तेवढे आपण घ्यायचे आणि कडू तेवढे थुंकून टाकायचे ?

त्यांच्या ग्रंथात असेही लिहिले आहे की जे काही अर्पण करावयाचे ते आपल्या पंथाच्या गोसाईजींनाच अर्पण करावे; इतर पंथाच्या लोकांना काही देऊ नये. हा सारा स्वार्थसाधूपणा आहे. इतरांचे धनादी लुटण्यासाठी आणि वेदोक्त धर्माचा नाश करण्यासाठी रचलेल्या या लांड्यालबाड्या आहेत. वल्लभपंथाच्या ग्रंथात काय लिहिले आहे ते पहा :-

**श्रावणस्यामले पक्षे एकादश्यां महानिशि।**
**साक्षाद्भगवता प्रोक्तं तदक्षरश उच्चते ॥१॥**
**ब्रह्मसम्बन्धकरणात् सर्वेषां देहजीवयोः।**
**सर्वदोषनिवृत्तिर्हि दोषाः पञ्चविधाः स्मृता ॥२॥**
**सहजा देशकालोत्था लोकवेदनिरूपिताः।**
**संयोगजाः स्पर्शजाश्च न मन्तव्याः कदाचन ॥३॥**
**अन्यथा सर्वदोषाणां न निवृत्तिः कथञ्चन।**
**असमर्पितवस्तूनां तस्माद्वर्ज्जनमाचरेत् ॥४॥**
**निवेदिभिः समर्प्यैव सर्वं कुर्यादिति स्थितिः।**
**न मतं देवदेवस्य स्वामिभुक्तिसमर्प्पणम् ॥५॥**
**तस्मादादौ सर्वकार्ये सर्ववस्तुसमर्प्पणम्।**
**दत्तापहारवचनं तथा च सकलं हरेः ॥६॥**
**न ग्राह्यमिति वाक्यं हि भिन्नमार्गपरं मतम्।**
**सेवकानां यथा लोके व्यवहारः प्रसिध्यति ॥७॥**
**तथा कार्य्यं समर्प्यैव सर्वेषां ब्रह्मता ततः।**
**गङ्गात्वे गुणदोषाणां गुणदोषादिवर्णनम् ॥८॥**

हे श्लोक गोसाव्यांच्या 'सिद्धान्तरहस्य' इत्यादी ग्रंथातून घेतले आहेत. हेच गोसाव्यांच्या पंथाचे मूळ तत्त्व आहे. यांना कोणीतरी विचारले पाहिजे की, श्रीकृष्ण निजधामाला गेलेल्या किमान पाच हजार वर्षे होऊन गेली. अशा स्थितीत तो श्रावण महिन्यातील एकादशीच्या रात्री तो वल्लभांना कसा भेटला? ॥१॥

गोसाईजीचा जो चेला त्यांना सर्वकाही समर्पित करतो त्याच्या शरीराच्या व जीवाच्या साऱ्या दोषाची निवृत्ति होते. मूर्ख लोकांना फसवून आपल्या पंथात आणण्याची ही वल्लभांचा खटाटोप आहे. गोसाव्यांचे चेले व चेल्या यांचे सारे दोष नाहीसे होत असतील तर ते रोग, दारिद्र्य इत्यादी दुःखांनी गांजलेले का असतात? त्यांच्या मते हे दोष पाच प्रकारचे असतात. ॥२॥

(१) सहज दोष : काम, क्रोध इत्यादिकांपासून उत्पन्न होणारे स्वाभाविक दोष. (२) विशिष्ट देशकाळामध्ये केली गेलेली नाना प्रकारची पापे. (३) सर्व सामान्य लोक ज्याला भक्ष्याभक्ष्य म्हणतात ते दोष आणि वेदोक्त

जो मिथ्याभाषणादी आहे. (४) संयोगजन्य दोष : वाईट संगतीमुळे निर्माण होणारे चोरी, जारी वगैरे आणि आई, बहीण, मुलगी, सून, गुरुपत्नी यांच्याशी संभोग केल्याने होणारे दोष. (५) स्पर्शजन्य दोष : अस्पृश्य व्यक्तींना स्पर्श केल्याने होणारे दोष. या पाच प्रकारच्या दोषांना गोसावी पंथाचे लोक मुळीच मानत नाही म्हणजे त्यांनी स्वैराचार करावा ॥३॥

इतर कोणत्याही प्रकारच्या दोषांची निवृत्ती गोसावी पंथाखेरीज होऊ शकत नाही. म्हणून कोणताही पदार्थ गोसावीबुवांना अर्पण केल्याखेरीज त्यांच्या चेल्यांनी त्याचा उपभोग घेऊ नये. यासाठी हे चेले आपली पत्नी, मुलगी, सून व धनादी पदार्थ गोसाईजींना अर्पण करतात. या समर्पणाचा असा नियम आहे की, जोपर्यंत आपली पत्नी गोसाईजींच्या चरणसेवेत समर्पित होत नाही तोपर्यंत तिच्या पतीने तिला स्पर्श करू नये.॥४॥

म्हणून गोसाव्यांच्या चेल्यांनी समर्पण केल्यानंतरच आपापल्या पदार्थांचा उपभोग घ्यावा. कारण त्यांनी उपभोग घेतल्यानंतर त्या पदार्थांचे समर्पण होऊ शकत नाही.॥५॥

यासाठी प्रथम सर्व कामांमध्ये सर्व वस्तू समर्पित कराव्यात. पत्नी वगैरे प्रथम गोसाईजींना समर्पित करून मग त्यांचे आपण ग्रहण करावे. याचप्रमाणे सारे पदार्थ हरीला अर्पण करून मग आपण त्याचा उपभोग घ्यावा.

गोसावी पंथाहून भिन्न मार्गाचे एक वाक्यही गोसाव्यांच्या चेल्यांनी कधी ऐकू नये अथवा त्याचे ग्रहण करू नये. त्यांच्या शिष्यांचा हा व्यवहार प्रसिद्ध आहे.

याचप्रमाणे सर्व वस्तू समर्पित करून सर्वांमध्ये ब्रह्मबुद्धी धारण करावी. त्यानंतर ज्याप्रमाणे गंगेमध्ये दुसरे पाणी मिसळल्यानंतर ते गंगारूप बनते. त्याप्रमाणे इतर पंथांतील त्यांचे दोष नाहीसे होऊन त्यांना गोसावी पंथाचे गुण प्राप्त होतात. म्हणून आपल्या पंथांच्या गुणांचे वर्णन सदैव करीत राहावे. ॥८॥

आता पहा ! इतर सर्व पंथांपेक्षा गोसाव्यांचा पंथ आपले प्रयोजन आहे की नाही ? या गोसाव्यांना विचारले पाहिजे की, ब्रह्माचे एकही लक्षण तुम्ही जाणत नाही. मग तुम्ही आपले शिष्य आणि शिष्या यांना ब्रह्माशी संबद्ध कसे करणार ? तुम्ही असे म्हणाल की आम्हीच ब्रह्म आहोत. तेव्हा आमच्याशी संबंध झाल्याने ब्रह्माशी संबंध होतो. परंतु तुमच्यामध्ये ब्रह्माचे गुण, कर्म, स्वभाव यांपैकी एकही गोष्ट नाही. मग काय केवळ भोगविलासासाठी तुम्ही स्वतःला ब्रह्म मानता ? असे पाहा ! तुम्ही आपले शिष्य व शिष्या यांना स्वतःला समर्पित करून घेऊन शुद्ध करता परंतु तुम्ही स्वतः, तुमची बायको, मुलगी व सून वगैरे असमर्पितच राहतात. म्हणजे तुमचे समर्पण कोणालाच केले जात नाही. तेव्हा तुम्ही सगळे अशुद्ध राहिलात की नाही ? तुम्ही असमर्पित वस्तूला अशुद्ध मानता. म्हणजे असमर्पित आईबापांच्या पोटी तुमचा जन्म झाल्याने तुम्ही स्वतःच अशुद्ध ठरत नाही काय ? म्हणून तुम्ही आपली बायको, मुलगी, सून इत्यादिंना इतर पंथांच्या लोकांना समर्पित करणे उचित होय.

ही गोष्ट करायला तुम्ही तयार नसाल तर मग तुम्ही इतर स्त्री-पुरुष, व धन वगैरे स्वतःला समर्पित करून घेणे आता सोडून द्या. आजवर जे झाले ते झाले. यापुढे तरी लांड्यालबाड्या सोडून द्या. आणि सुंदर ईश्वरोक्त वेदविहित सन्मार्गावर येऊन आपला मानवजन्म सफळ करा; आणि धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारी पुरुषार्थ साध्य करून आनंद उपभोगा.

आणि असे पाहा. हे गोसावी लोक आपल्या संप्रदायाला 'पुष्टिमार्ग' असे म्हणतात. खाणे, पिणे, धष्टपुष्ट होणे, सर्व स्त्रियांशी मनसोक्त भोगविलास करणे यालाच पुष्टिमार्ग असे म्हणतात. परंतु यामार्गाने जाणारे लोक भगंदरासारख्या रोगांनी ग्रस्त होऊन कसे झिजून-झिजून मरतात ते त्यांचे त्यांनाच ठाऊक. खरे म्हणाल तर हा पुष्टिमार्ग नसून कुष्टिमार्ग आहे. कुष्ठरोगी (महारोगी) माणसाचे शरीर कुजून त्यातील सप्त धातू विरघळून जातात आणि तो विलाप करीत मरून जातो. तीच गत या लोकांची होते, असे दिसून येते. त्यामुळे या पंथाला नरकाचा मार्ग असेही म्हणता येते. कारण दु:खाचे नाव नरक व सुखाचे नाव स्वर्ग आहे. अशाप्रकारे हे गोसावी लोक ढोंग व लबाडी यांचे जाळे पसरवून त्यात भोळ्याभाबड्या लोकांना पकडतात आणि स्वत:ला श्रीकृष्ण समजून सगळ्यांचे स्वामी बनतात.

हे लोक असे सांगतात की, गोलोकातून जितके दैवी लोक इहलोकी आले आहेत त्यांच्या उद्धारासाठी आम्ही लीला पुरुषोत्तम जन्मलो आहोत. जोपर्यंत जो कोणी आमच्याकडून दीक्षा व उपदेश घेत नाहीत तोपर्यंत त्यांना गोलोकाची प्राप्ती होत नाही. तेथे एकटा श्रीकृष्ण पुरुष असून बाकी सगळ्या स्त्रिया आहेत. वाहवा! तुमचा हा पंथ मोठा छानच आहे. गोसावी बुवांचे सारे चेले गोपी बनणार म्हणे. आता तुम्हीच विचार करा. एखाद्या पुरुषाला दोन बायका असल्या तर त्याचे किती हाल होतात ! तर मग एका पुरुषामागे कोट्यवधी बायका लागल्या तर त्याच्या दुर्दशेचे काय वर्णन करावे ? तुम्ही असे म्हणाल की श्रीकृष्णाचे सामर्थ्य फार मोठे आहे, ते सर्वांना खुष करतात. त्याच्या पत्नीला स्वामिनीजी असे म्हणतात. तिच्यामध्येही श्रीकृष्णासारखे सामर्थ्य असावे. कारण ती त्याची अर्धांगी आहे.

इहलोकामध्ये स्त्रीपुरुषांमधील कामवासना सारखीच जोरदार असते. किंबहुना पुरुषापेक्षा स्त्रीची कामवासना अधिक प्रबळ असते. तसेच गोलोकात का नाही ? तसे असल्यास स्वामिनीची इतर बायकांशी चांगलीच खडाजंगी होत असणार. कारण सवतीमत्सर फार वाईट असतो. त्यामुळे गोलोक हा स्वर्गलोक बनण्याऐवजी नरक लोकच बनत असेल. किंवा ज्याप्रमाणे अनेक परस्त्रीगामी पुरुषांना गरमी, परमा यांसारखे लैंगिक रोग होतात त्याप्रमाणे गोलोकातील रहिवाशांनाही हे रोग होत असतील. शि:! शि :! शि :! अशा या गोलोकापेक्षा आपला हा मृत्युलोकच बरा म्हणायचा.

असे बघा! येथील गोसावीबुवा स्वत:ला श्रीकृष्ण समजून अनेक स्त्रियांशी शरीरसंबंध ठेवतात. त्यामुळे त्यांना गरमी, परमा यांसारखे रोग होऊन खूप दु:ख सहन करावे लागते. आता तुम्हीच सांगा, स्वत:ला श्रीकृष्णाचा अवतार समजणारे गोसावी असे रोगपीडित होतात तर गोलोकाचा स्वामी श्रीकृष्ण या रोगांनी पीडीत का होणार नाही ? आणि जर त्याला हे रोग नसतील तर त्याचा अवतार असणाऱ्या गोसाव्यांना ते का होतात ?

**(प्रश्न)** मर्त्य लोकात लीलावतार धारण केल्याने रोग वगैरे दोष निर्माण होत असतात. परंतु गोलोकात रोग वगैरे दोषच नसल्यामुळे तेथे राहणाऱ्यांना ते होत नाहीत.

**(उत्तर) 'भोगे रोगभयम्'** म्हणजे भोग असतो तेथे रोग असतो. बरे ! श्रीकृष्णाच्या त्या कोट्यावधी स्त्रियांना मुले होतात की नाही ? जर ती होत असतील तर सगळी मुलेच होतात की मुली ? की मुले व मुली दोन्ही होतात ? तुम्ही जर असे म्हणाल की, त्यांना सगळी मुलेच होतात, तर मग त्या मुलींची लग्ने कोणाशी होत

असतील ? कारण तेथे तर श्रीकृष्णाखेरीज दुसरा कोणी पुरुषच नसतो. जर दुसरा एखादा पुरुष तेथे असेल तर मग तुमचे मूळ विधान खोटे ठरते. तुम्ही जर असे म्हणाल की, त्या स्त्रियांना फक्त मुलेच होतात, तर त्यांच्याबाबतीतही तोच प्रश्न उपस्थित होणार की, त्यांची लग्ने कोणाशी होतात ? ते आपआपसातच भानगडी करतात की काय ? किंवा इतर कोणाची मुले अथवा मुली तेथे असतील तर गोलोकात एकटा श्रीकृष्णच पुरुष असतो हे तुमचे म्हणणे खोटे ठरते. आता तुम्ही जर असे म्हणाल की, त्या बायकांना मुलेच होत नाहीत तर मग श्रीकृष्ण नपुंसक असून तेथील स्त्रिया वांझ असतात असा ठपका त्यांच्यावर येईल. हा कसला गोलोक ? हा तर दिल्लीच्या बादशहांचा जनानखानाच झाला की !

आता गोसावी लोक आपले शिष्य व शिष्यिणी यांचे जे तन-मन-धन स्वतःला अर्पण करवून घेतात तेही योग्य नाही. कारण विवाहाच्यावेळी स्त्री आणि पुरुष आपापली शरीरे एकमेकांना अर्पण करतात. शिवाय मन हे इतर कोणाला स्वतंत्रपणे समर्पित करता येत नाही. कारण मनाबरोबरच शरीराचेही समर्पण करावे लागते. तसे न करता मन एकाला व शरीर दुसऱ्याला अर्पण केले तर तो व्यभिचार ठरतो. राहता राहिले धन. त्याचीही स्थिती अशीच आहे. जेव्हा मन एखाद्याला (पतीला किंवा पत्नीला) दिल्यानंतर तन किंवा धन दुसऱ्याला देता येत नाही.

या गोसाव्यांचा मुख्य हेतू असा असतो की, चेल्यांनी पैसा कमवावा आणि त्यावर आपण चैन करावी. वल्लभ संप्रदायाचे गोसावी लोक मुळात तेलंगी ब्राह्मण होते. परंतु आता त्यांना वर्ण बहिष्कृत करण्यात आले आहे. त्यांना चुकून कोणी आपली मुलगी दिली तर तोही भ्रष्ट समजला जातो. व त्याला जाति बहिष्कृत करण्यात येते. त्यांना असे जातितून बाहेर काढल्यामुळे ते विद्याहीन बनून अहोरात्र आळसात राहतात.

पाहा ! जेव्हा कोणी गृहस्थ या गोसावी गुरूला पादपूजेसाठी घरी बोलावतो. तेव्हा हा गुरू त्याच्या घरी जाऊन एखाद्या लाकडीपुतळ्यासारखा गप्प बसून राहतो. तोंडातून एक शब्दही काढीत नाही. मूर्ख नसेल तरच बोलेल ना ? **'मूर्खाणां बलं मौनम्'** मौन हेच मूर्खांचे बळ असते. तो बोलला की, त्याचे बेंड फुटणार ! मात्र तो तिथल्या स्त्रियांकडे टक लावून पाहत असतो. अशा प्रकारे तो ज्या स्त्रीकडे विशेष रोखून पाहतो तिचे भाग्यच फळाले आले असे समजले जाते. आणि तिचा नवरा, भाऊ, आई, बाप सगळेच अत्यंत खुष होतात. तेथील सर्व स्त्रिया गोसाव्याच्या पाया पडतात. त्यांच्यापैकी जिच्यावर गोसाव्याचे मन बसेल अथवा त्याची कृपा होईल तिचे बोट तो पायाने दाबतो. त्या कृत्याने ती स्त्री व तिचा नवरा वगैरे स्वतःला धन्य समजतात. आणि ते तिला असे सांगतात की, ''तू गुरुमहाराजांची चरण सेवा करायला जा. !'' ज्या घरातील पतीला व इतर लोकांना ही गोष्ट मान्य नसते तेथील स्त्रीला वश करून घेण्यासाठी हे गोसावडे कुंटिनी, मोलकरीण वगैरेंचा उपयोग करतात. खरे म्हणाल तर असली कामे करणारी अनेक माणसे गोसाव्यांच्या मंदिरात आणि त्यांच्या आसपास सदैव वावरत असतात.

अशाच प्रकारे हे लोक अनेक क्लृप्त्या योजून दक्षिणा उपटतात. ते आपल्या भक्तांना सांगतात, ''लाओ भेंट गोसाईजी की ! त्याची पत्नी, मुलगा, मुलगी, मुख्य नोकर, पाईक, गवई व ठाकुरजी (श्रीकृष्ण) या सर्वांसाठी भेटवस्तू द्या.'' या सात-आठ जणांच्या नावावर ते भरपूर धन लुटतात. जेव्हा एखाद्या गोसाव्याचा शिष्य मरायला टेकतो तेव्हा त्याच्या छातीवर पाय ठेवून त्याच्याकडून तो भरपूर पैसे उकळतो आणि ते गिळंकृत करतो. और्ध्वदैहिक क्रियाकर्म करणाऱ्या मुडदेफरासाच्या कामासारखेच त्याचे हे काम नाही काय ?

एखादा चेला आपल्या मुला-मुलीच्या लग्नाच्यावेळी गोसावीबुवांना बोलावून त्यांच्या हातून पाणिग्रहण करवितो. काही शिष्य आपल्या गुरूला आंघोळ घालून ते पाणी तीर्थ समजून त्याने आचमन करतात. त्यातील केशरी स्नान विशेष उल्लेखनीय आहे. घरातील स्त्रिया गोसाव्याच्या अंगाला केशराचे उटणे चोळतात. नंतर एका मोठ्या भांड्यात चौरंग ठेवून त्यावर गोसाव्याला बसवितात आणि पुरुष व स्त्रिया मिळून त्याला आंघोळ घालतात. मग गोसावीजी पीतांबर नेसून, खडाव घालून त्या भांडयातून बाहेर येतात. आणि आपले भिजलेले धोतर त्या भांडयात टाकतात. त्यानंतर सारे भक्त त्या पाण्याने आचमन करतात. मग उत्तम पानाचा मसाला विडा तयार करून गुरूला देतात. तो थोडासा खाऊन (चघळून) उरलेला विडा शिष्याने तोंडासमोर धरलेल्या चांदीच्या कटोऱ्यात थुंकून टाकतो. तो उष्टा विडाही सर्वांना प्रसाद म्हणून वाटला जातो. याला खास प्रसाद असे म्हणतात. आता तुम्हीच विचार करा की, ही कसली माणसे ? मूढपणातून असाच अनाचार होत राहणार !

अनेक गोसावी आपल्या शिष्यांकडून नाना प्रकारच्या भेटी, नजराणे घेतात. त्याच्यापैकी कित्येकजण फक्त वैष्णवांच्या हातचेच खातात. इतरांच्या हातचे खात नाहीत. काही जण तर वैष्णवांच्या हातचेही खात नाहीत. ते लोक लाकडे देखील धुऊन घेतात. परंतु पीठ, गूळ, साखर, तूप वगैरे पदार्थ न धुता वापरावे लागल्याने त्यांच्या सोवळ्याला बट्टा लागतो. काय करणार बिचारे ? हे पदार्थ धुऊन घ्यायचे ठरविले तर हातात धुपाटणे यायचे !

हे लोक असे सांगतात ही, आम्ही ठाकुरजींच्या विलासाखातर पुष्कळ पैसा खर्च करतो. परंतु ती सारी चैनबाजी ते स्वतःच करतात. आणि त्यातून बऱ्याच भानगडी निर्माण होतात. होळीच्या वेळी रंगीत पाण्याने पिचकाऱ्या भरभरून स्त्रियांच्या अस्पर्शनीय अवयवांवर म्हणजे गुप्त स्थानांवर नेम धरून मारतात. खाद्य पदार्थांची विक्री करणे ब्राह्मणांना निषिद्ध आहे. पण तो धंदाही हे लोक करतात.

**(प्रश्न)** गोसावीजी रोटी, आमटी, कढी, भात, भाजी, मटकीची वडी आणि लाडू वगैरे मिठाई स्वतः बाजारात बसून विकत नाहीत. परंतु हे पदार्थ पत्रावळीत घालून ते आपल्या नोकर-चाकरांना देतात. मग ते लोक त्या पदार्थांची विक्री करतात. स्वतः गोसावीजी ते काम करीत नाहीत.

**(उत्तर)** गोसावी गुरूंनी आपल्या नोकरांना दरमहा पगार दिला असता तर त्यांनी कामाच्या मोबदल्यात अन्न व मिठाई कशाला घेतली असती ? गोसावी बुवा आपल्या नोकरांना पगाराऐवजी भात, आमटी, मिठाई वगैरे देतात. हे पदार्थ ते बाजारात नेऊन विकतात. गोसावीबुवांना स्वतःच बाजारात जाऊन हे पदार्थ विकले असते तर त्यांच्या ब्राह्मण नोकरांना खाद्यपदार्थ विकण्याचे पाप तरी लागले नसते; आणि फक्त गोसावीच खाद्यपदार्थ विकण्याच्या पापाचे भागीदार झाले असते. गोसावी महाराज आधी स्वतः या पापात बुडाले आणि मग त्यांनी इतरांनाही आपल्या बरोबर त्या पापात ओढून घेतले. नाथद्वारा वगैरे ठिकाणी स्वतः गोसावीही खाद्यपदार्थ विकतात. खाद्यपदार्थ विकणे हे निकृष्ट लोकांचे काम आहे. चांगले लोक ते करीत नाहीत. अशा या नीच लोकांनीच आर्यावर्त्ताची अधोगती करून टाकली.

## स्वामी नारायणमत-समीक्षा

**(प्रश्न)** स्वामीनारायण संप्रदाय कसा आहे ?

**(उत्तर)** **'यादृशी शीतला देवी तादृशो वाहनः खरः'** (म्हणजे 'जशी शीतळा देवी तसे

तिचे वाहन गाढव') या म्हणीप्रमाणे गोसावी लोक जसे भक्तांना लुबाडतात तसेच स्वामीनारायण संप्रदायाचे लोकही करतात ! असे पाहा ! सहजानंद नावाचा एक इसम अयोध्येजवळच्या एका खेड्यात जन्मास आला होता. तो ब्रह्मचारी बनून गुजरात, काठेवाड, कच्छ, भुज वगैरे प्रदेशात फिरत होता. त्याने असे पाहिले की, या भागातील लोक मूर्ख व साधेभोळे आहेत. त्यांना आपल्या संप्रदायात प्रविष्ट करून घेणे फार सोपे आहे. म्हणून त्याने तेथे आपले दोन-चार शिष्य बनविले आणि त्यांच्यातर्फे अशी अफवा पसरविली की, सहजानंद हा नारायणाचा अवतार असून मोठा सिद्ध पुरुष आहे व तो चतुर्भुज मूर्तीच्या रूपात आपल्या भक्तांना साक्षात दर्शनही देतो.

काठेवाडात दादा खाचर नावाचा एक काठी कुळाचा जमीनदार होता. एकदा सहजानंदाच्या शिष्यांनी त्याला सांगितले की, "तुला चतुर्भुज नारायणाचे दर्शन करायचे आहे काय ? तुझी इच्छा असल्यास आम्ही सहजानंद स्वामींना तुला दर्शन घडविण्याची विनंती करू." खाचर म्हणाला. "फार चांगली गोष्ट आहे." तो एक साधाभोळा खेडूत होता. एका खोलीमध्ये सहजानंद डोकीवर मुकुट धारण करून आणि हातात शंख व चक्र घेऊन उभा राहिला. दुसरा एक इसम त्यांच्यामागे हातात गदा व पद्म घेऊन उभा राहिला. त्याने आपले हात अशा प्रकारे सहजानंदाच्या शरीराला चिकटून बाहेर काढले की, ती एक चतुर्भुज मूर्ती असल्याचा भास निर्माण झाला. सहजानंदाच्या चेल्यांनी दादा खाचराला सांगितले की, "आम्ही तुम्हाला तेथे घेऊन जातो. तुम्ही एकदा डोळे उघडून त्या चतुर्भुज मूर्तीचे दर्शन घ्या. नंतर लगेच डोळे मिटून इकडे परत या. फार वेळ पाहत राहाल तर भगवान नारायण कोप करतील." त्याने फार वेळपर्यंत ते दृश्य पाहिले तर आपली लबाडी त्याच्या लक्षात येईल असे त्यांना वाटल्यावरून त्यांनी ही सूचना केली होती. त्याप्रमाणे ते त्याला तेथे घेऊन गेले. त्या खोलीत सहजानंद कलाबुताने झगमगणारे रेशमी कपडे अंगात घालून उभा होता. अंधार कोठडीत उभा होता. त्याच्या शिष्यांनी कंदिलाचा उजेड त्याच्यावर पाडला. दादा खेचराला चतुर्भुज मूर्ती दिसली. शिष्यांनी झटकन कंदील बाजूला घेऊन खोलीत पूर्ववत अंधार केला. सर्वांनी त्या चतुर्भुज नारायणाला साष्टांग नमस्कार घातला, आणि ते त्याला घेऊन तेथून बाहेर पडले. त्यावेळी ते दादा खाचराला म्हणाले, "तुम्ही फारच भाग्यवान आहात. आता तुम्ही महाराजांचे चेले बनून दीक्षा घ्या." तो म्हणाला, "फार छान गोष्ट आहे." ते शिष्य त्याला घेऊन बाहेर येण्यापूर्वीच सहजानंद दुसरे कपडे घालून आपल्या गादीवर येऊन बसला होता. त्याच्याकडे बोट दाखवून शिष्य दादा खाचराला म्हणाले, "बघा ! एवढ्यात दुसरे रूप धारण करून महाराज येथे आपल्या आसनावर विराजमान झाले आहेत." तो दादा खाचर त्यांच्या या लबाडीने त्यांच्या जाळ्यात अडकला. तो मोठा जमीनदार असल्यामुळे या संप्रदायाची मुळे तेथे चांगली रुजली. तेथेच त्याने आपल्या स्वामीनारायण संप्रदायाचे मुख्यालय स्थापन केले. तेथून आसपासच्या प्रदेशात हिंडून तो लोकांना उपदेश करू लागला. त्याने अनेकांना साधूही बनविले. कधी-कधी एखाद्या साधूच्या गळ्याची शीर दाबून तो त्याला बेशुद्ध करी आणि लोकांना सांगे, "पाहा. मी याची समाधी लावली." अशा प्रकारच्या लबाड्यांमुळे काठेवाडातील भोळेभाबडे लोक त्याच्या जाळ्यात अडकत गेले. त्याच्या निधनानंतर त्याच्या चेल्यांनी खूप पाखंड पसरविला.

हा संप्रदाय कसा पसरला ते पुढील गोष्टीच्या दृष्टांतावरून लक्षात येईल. एक इसम चोरी करताना पकडला गेला. न्यायाधीशाने त्याचे नाक कापण्याची शिक्षा दिली. त्याप्रमाणे त्याचे नाक कापण्यात आले. त्याबरोबर

तो लबाड चोर नाचू, गाऊ व हसू लागला. लोकांनी त्याला विचारले, ''तू का हसतो आहेस?'' तो म्हणाला, ''ती सांगण्यासारखी गोष्ट नाही.'' लोकांनी विचारले, ''अशी कोणती गोष्ट आहे ?'' त्याने सांगितले, ''अत्यंत आश्चर्याची गोष्ट आहे. अशी गोष्ट मी कधी पाहिली नाही.'' लोकांनी पुन: विचारले, ''कोणती गोष्ट ? सांग ना ! '' तो म्हणाला, ''माझ्या समोर साक्षात चतुर्भुज नारायण उभे आहेत. त्यांना पाहून मी अत्यंत आनंदित होऊन नाचत-गात आहे. मी किती भाग्यवान आहे की, प्रत्यक्ष नारायण मला दर्शन देत आहेत.'' लोकांनी विचारले, ''आम्हाला नारायणाचे दर्शन का होत नाही ?'' तो म्हणाला, ''तुमचे नाक मध्ये येत आहे. ते आडवे येणारे नाक तुम्ही कापून टाकले तर तुम्हालाही नारायण दिसतील. नाहीतर ते दिसणार नाहीत.'' त्यांच्यापैकी एका मूर्खाला वाटले की, नाक गेले तरी हरकत नाही. परंतु नारायणाचे दर्शन अवश्य झाले पाहिजे. म्हणून तो चोराला म्हणाला, ''माझे नाक तू कापून टाक आणि मला नारायणाचे दर्शन घडव.'' त्याप्रमाणे त्या चोराने त्याचे नाक कापले आणि त्याच्या कानात हळूच सांगितले की, ''तूही माझ्यासारखे कर. नाहीतर लोक तुझी आणि माझी टर उडवितील.'' त्या मूर्खाने विचार केला, आता नाक काही परत येणार नाही. तेव्हा तो चोर सांगतो तसेच करणे योग्य होईल. म्हणून तोही त्या चोराप्रमाणे नाचू, गाऊ, हसू लागला. आणि मला नारायण दिसतोय असे सांगू लागला. असे होता-होता नाक कापून घेतलेल्या लोकांची संख्या एक हजारापर्यंत जाऊन पोचली. तेथे मोठा गोंधळ माजला; आणि त्या लोकांनी आपल्या या संप्रदायाचे नाव 'नारायणदर्शी' (नारायणाला पाहणारे) असे ठेवले. एका राजाने ही बातमी ऐकली; आणि त्याने त्या लोकांना बोलावून घेतले. राजाजवळ जाताच ते लोक जोरजोरात नाचू, गाऊ, हसू लागले. तेव्हा राजाने विचारले, ''हे सारे कशासाठी चालले आहे ?'' लोकांनी सांगितले की, ''साक्षात नारायण आम्हांला दिसत आहे.''

**(राजा)** आम्हांला तो का दिसत नाही ?

**(नारायणदर्शी)** जोपर्यंत तुमचे नाक जाग्यावर आहे तोपर्यंत नारायण दिसणार नाही. जेव्हा तुम्ही नाक कापून घ्याल तेव्हा तुम्हाला साक्षात नारायण दिसेल.

राजाने मनाशी विचार केला की, हे ठीक आहे. आणि त्याने राजज्योतिषाला सांगितले, ''जोशीबुवा, नाक कापून घेण्यासाठी उत्तम मुहूर्त कोणता ते सांगा.'' ज्योतिषी म्हणाला, ''जो हुकूम अन्नदाता ! दशमीच्या दिवशी सकाळी आठ वाजता नाक कापून घेण्यास आणि नारायणाचे दर्शन करण्यास उत्तम मुहूर्त आहे.'' वाहवा ! भटजीबुवा ! तुम्ही आपल्या पोथीत नाक कापून घेण्याचाही मुहूर्त लिहून ठेवला ना ? जेव्हा राजाचा निर्णय पक्का झाला तेव्हा त्याने त्या नाक कापलेल्या हजार लोकांच्या खाण्यापिण्याची उत्तम सोय करून दिली. त्यामुळे ते सगळे जण अत्यंत खुष होऊन नाचू, गाऊ, हसू लागले. ही गोष्ट राजाचा दिवाण आणि थोडीफार बुद्धी असणारे इतर लोक यांना आवडली नाही. त्या नगरात ९० वर्षांचा एक म्हातारा गृहस्थ होता. तो चार पिढ्यांपूर्वी राजाचा दिवाण होता. त्याचा पणतू सध्या दिवाण होता. त्याने घरी जाऊन पणजोबांना ही गोष्ट सांगितली. ती ऐकूण तो वृद्ध पुरुष म्हणाला, ''ते लोक धूर्त दिसतात. तू मला राजाकडे घेऊन चल.'' त्याप्रमाणे दिवाण आपल्या पणजोबांना घेऊन राजाकडे गेला. तो बसल्यावर राजाने त्याला अत्यंत आनंदाने त्या नाक कापलेल्या लोकांची हकीगत सांगितली. ती ऐकूण दिवाण म्हणाला, ''महाराज ! अशी घाई करू नका. पारख केल्याखेरीज एखादी गोष्ट केल्यास पश्चातापाची पाळी येते.''

**(राजा)** हे हजार लोक खोटे बोलत असतील काय ?

**(दिवाण)** ते खोटे बोलत असतील किंवा खरे बोलत असतील. त्यांची परीक्षा घेतल्याशिवाय खरे किंवा खोटे कसे ठरविता येईल ?

**(राजा)** ही परीक्षा कशी घ्यावयाची ?

**(दिवाण)** विद्या, सृष्टिक्रम, प्रत्यक्षादी प्रमाणे यांच्या साह्याने परीक्षा घेतली जाते.

**(राजा)** अशिक्षित माणसाने परीक्षा कशी घ्यायची ?

**(दिवाण)** विद्वानांच्या संगतीने आपल्या ज्ञानाची वृद्धी करून.

**(राजा)** विद्वान मिळाला नाही तर काय करावे ?

**(दिवाण)** पुरुषार्थी माणसाला कोणतीही गोष्ट दुर्लभ नसते.

**(राजा)** मग आता तुम्हीच सांगा की या बाबतीत आम्ही काय करावे ?

**(दिवाण)** मी म्हातारा माणूस. दिवसरात्र घरातच बसून राहतो. मी फार थोड्या दिवसांचा सोबती आहे. म्हणून मी स्वत:च प्रथम नाक कापून घेऊन त्यातल्या सत्यासत्याची पारख करून घेतो. त्यानंतर तुम्हाला जसे काही योग्य वाटेल तसे करा.

**(राजा)** फार छान. जोशीबुवा, दिवाणजींसाठी मुहूर्त बघा.

**(ज्योतिषी)** जशी महाराजांची आज्ञा ! येत्या शुक्ल पंचमीला सकाळी १० वाजता उत्तम मुहूर्त आहे.

त्याप्रमाणे पंचमीच्या दिवशी सकाळी ८ वाजता म्हातारा दिवाण राजाकडे जाऊन त्याला म्हणाला, ''महाराज, हजार-दोन हजार सैनिक बरोबर घेऊन गेले पाहिजे.''

**(राजा)** तेथे सैन्याची काय गरज ?

**(दिवाण)** तुम्हाला राज्यकारभाराची माहिती नाही. मी सांगतो तसे तुम्ही करा.

**(राजा)** सेनापती, जाऊन सैन्य तयार करा.

साडे नऊ वाजता राजा सर्व लोकांना बरोबर घेऊन मिरवणुकीने त्या नारायणदर्शी लोकांकडे गेला. त्याला पाहून ते लोक नाचू, गाऊ लागले. राजा तेथे बसला. त्याने त्या संप्रदायाच्या महंताला बोलावून घेतले. प्रथम ज्याचे नाक कापण्यात आले होते त्यानेच हा संप्रदाय स्थापन केला होता व तो त्याचा महंत बनला होता. राजा त्याला म्हणाला, ''आज आमच्या दिवाणजींना नारायणाचे दर्शन घडवा.'' महंत म्हणाला, ''ठीक आहे.'' दहा वाजण्याची वेळ होताच एक माणूस एक थाळी घेऊन आला. त्याने ती थाळी दिवाणाच्या नाकाखाली धरली. मग महंताने धारदार चाकूने दिवाणाचे नाक कापून त्या थाळीत टाकले. दिवाणाच्या नाकाला रक्ताची धार लागली. दिवाणाचा चेहरा मलूल झाला. त्या लबाड महंताने दिवाणाच्या कानात हळूच सांगितले की, ''दिवाणजी, तुम्हीही हसून सर्वांना सांगा की, ''मला नारायण दिसतो आहे.'' आता तुमचे कापलेले नाक काही परत येणार नाही. तुम्ही तसे म्हटले नाही तर लोक तुमची टर उडवतील. सर्व लोक तुमची टिंगल करतील.'' एवढे बोलून तो दूर गेला. दिवाणाने आपला हात रुमाल आपल्या कापलेल्या नाकावर दाबून धरला. तेव्हा राजाने त्याला विचारले, ''काय दिवाणजी ? तुम्हाला नारायण दिसतोय की नाही?'' दिवाणाने राजाच्या कानात सांगितले, ''मला तसले काहीही दिसत नाही. या लबाड इसमाने निष्कारण या हजार माणसांना

विद्रूप करून टाकले आहे.'' यावर राजाने विचारले, ''मग आता काय करायचे ?'' दिवाणाने सांगितले, ''यांना पकडून चांगली अद्दल घडेल अशी शिक्षा दिली पाहिजे. त्यांना मरेपर्यंत तुरुंगात ठेवले पाहिजे. आणि ज्याने या सर्वांना बिघडविले आहे त्या बदमाषाची गाढवावरून धिंड काढून आणि हालहाल करून त्याला ठार मारले पाहिजे.'' इकडे राजा व दिवाण कानगोष्टी करीत असलेले पाहून ते सगळे घाबरले आणि पळून जाण्याची तयारी करू लागले. परंतु त्यांच्याभोवती सैन्याचा घेरा होता. त्यामुळे त्यांना पळून जाता आले नाही. मग राजाने आज्ञा केली की, ''या सगळ्यांना पकडून बेड्या घाला आणि तुरुंगात टाका. या बदमाष महंताच्या तोंडाला काळोखी फासून त्याला गाढवावर बसवा. त्याच्या गळ्यात फाटक्या जोड्यांच्या माळा घाला आणि गावातून त्याची धिंड काढा, गावच्या पोरांना त्याच्या अंगावर धूळ आणि राख टाकायला सांगा, प्रत्येक चौकात त्याला जोड्यांनी मारा, त्याच्या अंगावर कुत्री सोडून त्याला फाडून खायला लावा अशा प्रकारे त्याला मारून टाका. असे झाले नाही तर पुन: असले कृत्य करण्यास इतर लोक भिणार नाहीत.'' राजाच्या हुकुमाची अंमलबजावणी झाली आणि अशा प्रकारे नाक कापलेल्या लोकांचा तो संप्रदाय अखेर बंद झाला.

याचप्रमाणे सगळे वेदविरोधी लोक दुसऱ्यांचे द्रव्य लुबाडण्यात मोठे पटाईत असतात. ही सगळी संप्रदायाची लीला आहे. हे स्वामीनारायण संप्रदायाचे लोकही इतरांचे धन लुबाडण्यासाठी लांड्यालबाड्या करतात. त्यांच्यापैकी अनेक जण मूर्खांना फसविण्यासाठी मरताना असे सांगतात की, ''शुभ्र घोड्यावर बसून मला मोक्षाला नेण्यासाठी सहजानंद आले आहेत. ते दररोज दिवसातून एकदा या मंदिरात येत असतात.''

जेव्हा या लोकांची जत्रा भरते तेव्हा पुजारी देवळात बसतात आणि बाहेरच्या बाजूस एक दुकान थाटलेले असते. देवळातून दुकानात माल पाठविण्यासाठी गुप्त छिद्र असते. भक्ताने देवाला नारळ वाहिला की तो त्या भोसक्यातून सरळ दुकानात जाऊन पडतो. अशा प्रकारे एक नारळ दिवसातून हजारो वेळा विकला जातो. इतर वस्तूंच्या बाबतीत अशीच लबाडी चालू असते.

ज्या जातीचा साधू असेल त्याच जातीचे काम त्याच्याकडून करवून घेतले जाते. उदाहरणार्थ तो न्हावी असल्यास न्हाव्याचे, कुंभार असल्यास कुंभाराचे, कारागीर असल्यास कारागिराचे, व्यापारी असल्यास व्यापाराचे आणि शूद्र असल्यास शूद्राचे काम त्याच्याकडून करवून घेतले जाते.

या लोकांनी आपल्या चेल्यांवर एक प्रकारचा कर बसविला असून त्यापासून त्यांनी आजपर्यंत लाखो-करोडो रुपये फसवणुकीने गोळा केले आहेत आणि आजही करीत आहेत. जो कोणी गादीवर बसतो तो लग्न करून गृहस्थाश्रमी बनतो. अंगावर दागदागिने घालतो. जेव्हा एखाद्या शिष्याच्या घरी पाद्यपूजेसाठी तो जातो तेव्हा गोकुलिया (गोसावी) गुरूप्रमाणे हा स्वामीनारायण संप्रदायाचा स्वामीही स्वत:बरोबरच आपली बायको, मुले, सुना यांच्यसाठीही भेटी गोळा करतो. हे लोक स्वत:ला 'सत्संगी' म्हणवितात आणि इतरांना 'कुसंगी' म्हणतात. आपल्या खेरीज दुसरा कोणी कितीही उत्तम, धार्मिक, विद्वान असला तरी ते त्याला मान देत नाहीत अथवा त्याची सेवा करीत नाहीत. कारण इतर पंथांच्या लोकांची सेवा करणे हे पाप आहे असे ते समजतात. समाजात वावरताना या पंथाचे साधू स्त्रियांचे तोंड देखील पाहत नाहीत. परंतु लपूनछपून ते काय काय करतात याची माहिती लोकांना फारशी नसते. अधून-मधून या साधूंच्या व्यभिचाराच्या परस्त्रीगमनाच्या गोष्टी कानांवर येत असतात. त्यांच्यापैकी जे मोठे असतात ते मेल्यानंतर त्यांना गुप्त विहिरीत फेकून देतात आणि असे जाहीर

करतात की, ''अमुक महाराज सदेह वैकुंठाला गेले. सहजानंदजी स्वत: येऊन त्यांना घेऊन गेले. आम्ही त्यांची खूप विनवणी केली की, ''स्वामीजी, आमच्या महाराजांना तुम्ही नेऊ नका. कारण ते महात्मा आहेत. ते येथे राहण्यात लोकांचे कल्याण आहे.'' परंतु सहजानंदांनी सांगितले की, ''नाही ! आता यांची वैकुंठात फार आवश्यकता आहे म्हणून आम्ही त्यांना घेऊन जात आहोत.'' आम्ही प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी सहजानंदजींना त्यांच्या विमानासह पाहिले आणि आमच्या मरणोन्मुख गुरूंना त्या विमानात बसवून दिले. ते त्यांना विमानातून वर घेऊन गेले आणि जाता-जाता पुष्पवृष्टी करीत गेले.''

जेव्हा एखादा साधू आजारी पडतो आणि तो जगण्याची आशा नसते तेव्हा तो सांगतो की, ''मी उद्या रात्री वैकुंठाला जाणार आहे.'' असे म्हणतात की ठरलेल्या रात्री तो साधू न मरता नुसताच बेशुद्ध झाला तर त्याचे चेले त्याला विहिरीत फेकून देतात. कारण त्या रात्री त्याला फेकून दिले नाही तर त्याचे भविष्य खोटे ठरते. म्हणून ते असले कृत्य करीत असावेत. याचप्रमाणे जेव्हा गोकुलिया गोसावी मरतो तेव्हा त्याचे चेले असे सांगतात की, ''गुसाईजी लीला विस्तार करून गेले.''

गोसावी व स्वामीनारायणवाले या दोघांचा उपदेश करण्याचा मंत्र एकच आहे. ''श्रीकृष्ण: शरणं मम'' याचा अर्थ मी श्रीकृष्णाला शरण जातो, असा आहे. परंतु त्याचा अर्थ श्रीकृष्णाने मला शरण यावे किंवा श्रीकृष्ण मला शरण येतो असाही होऊ शकतो. हे सारे पंथ व संप्रदाय विद्याविहीन, निर्बुद्ध लोकांनी स्थापन केले असल्यामुळे ते वाटेल तशी शास्त्रविरुद्ध वाक्यरचना करतात. कारण त्यांना कारण त्यांना विद्याच्या नियमांची माहिती नसेल.

## माध्वमत-समीक्षा

**(प्रश्न)** माध्व संप्रदाय तर चांगला आहे ना ?

**(उत्तर)** जसे इतर संप्रदाय आहेत तसाच हा माध्व संप्रदायही आहे. कारण त्या पंथाचे अनुयायीही चक्रांकित (चिह्नित) म्हणजे टिळे, माळा करणारे असतात. त्यांच्यामध्ये एवढाच फरक आहे की, रामानुज पंथाचे लोक आयुष्यात एकदाच चक्रांकित होतात म्हणजे कपाळावर वगैरे छाप मारून घेतात. तर माध्व लोक वर्षातून एकदा असे वारंवार चक्रांकित होत असतात. रामानुजीय चक्रांकित कपाळावर पिवळी रेघ ओढतात तर माध्व काळी रेघ ओढतात. एका माध्व पंडिताशी एका महात्म्याचा खालील प्रमाणे शास्त्रार्थ झाला होता :-

**(महात्मा)** तुम्ही ही काळी रेघ आणि टिळा कपाळावर का लावला आहे ?

**(शास्त्री)** हा टिळा लावल्यामुळे आम्ही वैकुंठाला जाऊ, आणि श्रीकृष्णाचे शरीरही सावळ्या रंगाचे होते म्हणून आम्ही ही काळी रेघ कपाळावर ओढतो.

**(महात्मा)** काळी रेखा आणि टिळा लावल्याने जर तुम्ही वैकुंठाला जात असाल तर सारा चेहरा काळा करून घेतल्यास तुम्ही कोठे जाल ? वैकुंठाच्याही पलीकडे जाऊन पोहचाल काय ? शिवाय श्रीकृष्णाचे सारे शरीर काळे होते म्हणून तुम्ही आपले सारे शरीर काळे करून घेतल्यास तुम्ही श्रीकृष्णासारखे व्हाल.

सारांश, हे माध्वमतही इतर मतांसारखेच त्याज्य आहे.

**(प्रश्न)** लिंगांकितांचा पंथ कसा आहे?

**(उत्तर)** जसा चक्रांकितांचा तसाच हा लिंगांकितांचा (लिंगायतांचा) संप्रदाय आहे. ज्याप्रमाणे रामानुजीय

व माध्वमतवाले चक्रमुद्रांनी स्वत:ला डागून घेतात त्याप्रमाणे हे लिंगायत लोक लिंगाकृती मुद्रांनी स्वत:ला डागून घेतात. ते महादेवा खेरीज इतर कोणाची भक्ती करीत नाहीत. या लोकांचे वैशिष्ट्य असे की, ते पाषाणाचे एक शिवलिंग सोन्यात अथवा चांदीत मढवून गळ्यात लटकावतात. साधे पाणी प्यायचे असले तरी ते त्या लिंगाला दाखवून पितात. त्यांचा मंत्रही शैवाच्या मंत्रासारखाच असतो.

## ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज यांची समीक्षा

**(प्रश्न)** ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज हे तरी चांगले आहेत की नाहीत ?

**(उत्तर)** त्यांच्या काही गोष्टी चांगल्या व पुष्कळशा वाईट आहेत.

**(प्रश्न)** ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज हे सर्वांत चांगले आहेत. कारण त्यांचे नियम फार चांगले आहेत.

**(उत्तर)** त्यांचे नियम सर्वांशाने चांगले नाहीत. कारण वेदविद्याविहीन लोकांची कल्पना पूर्णपणे सत्य कशी असू शकेल ? ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज यांच्यामुळे ख्रिस्ती पंथात जाणारी काही माणसे बाटली नाहीत; आणि त्यांनी मूर्तिपूजेचे प्रस्थ थोडेफार कमी केले. इतर ग्रंथांच्या भ्रमजाळातून काही थोड्या लोकांना त्यांनी वाचविले. यांसारख्या त्यांच्या काही गोष्टी चांगल्या आहेत. परंतु,

(१) या लोकांमध्ये स्वदेशभक्ती फार कमी आहे. त्यांनी ख्रिस्ती लोकांचे पुष्कळसे आचार विचार आत्मसात केले आहेत. खाणे-पिणे आणि विवाह इत्यादिकांचे नियमही त्यांनी बदलले आहेत.

(२) आपल्या देशाची प्रशंसा करणे व पूर्वजांचा मोठेपणा सांगणे या गोष्टी तर दूरच राहिल्या. उलट ते त्यांची यथेच्छ निंदा करतात. आपल्या व्याख्यानांमध्ये हे लोक ख्रिस्ती, इंग्रज वगैरे लोकांची तोंड भरून स्तुती करतात. ब्रह्मादी महर्षिंचे ते नाव देखील घेत नाहीत. उलट ते असे सांगत असतात की, ''जगामध्ये इंग्रजांसारखे विद्वान इतरत्र कोठेही झाले नाहीत व आर्यावर्त्तातील लोक अनादी काळापासून अडाणीच राहिले आहेत; त्यांची उन्नती कधीच झाली नाही.''

(३) वेद व शास्त्रे यांचा सन्मान करणे दूरच राहिले उलट त्यांची भरपूर निंदा ते करतात. ब्राह्मसमाजाच्या उद्दिष्टांची माहिती देणाऱ्या पुस्तिकेत साधुसंतांची जी नावे दिली आहेत त्यांत येशू, मोझेस, मुहम्मद, नानक व चैतन्य यांचाच उल्लेख आहे. त्यात कोणत्याही ऋषींचे अथवा महर्षींचे नाव नाही. यावरून ज्यांची नावे त्यांनी उद्धृत केली आहेत त्यांच्या मतांसारखीच या लोकांची मते असणार हे उघड आहे. आता तुम्हीच विचार करा. हे लोक देशात जन्मले आहेत. याच देशाचे अन्न खातात व पाणी पितात. त्याच अन्न-पाण्यावर ते लहानचे मोठे झाले. अशा स्थितीत आपले आई-बाप व पूर्वज यांचा मार्ग सोडून परकीयांच्या मताकडे झुकणे, ब्राह्मसमाजी व प्रार्थनासमाजी लोकांनी एतद्देशीय संस्कृत विद्या न शिकता स्वत:ला विद्वान समजणे, इंग्रजी शिकून पांडित्याच्या अहंकाराने झटपट एक नवा पंथ सुरू करण्यास प्रवृत्त होणे, या सगळ्या गोष्टी मानव-जातीला स्थिर व उन्नत बनविण्यास कशा साह्यभूत होतील ?

(४) इंग्रज, यवन, अंत्यज यांच्याबरोबर कसलाही भेदभाव न बाळगता हे लोक खाणेपिणे करतात. त्यांची अशी समजूत झालेली दिसते की, खाण्यापिण्यातील बंधने व जातिभेद मोडल्याने आपली व आपल्या देशाची सुधारणा होईल. परंतु असल्या गोष्टींनी सुधारणा होण्याऐवजी उलट बिघाडच होत असतो.

(५) **(प्रश्न)** जातिभेद ईश्वरकृत आहे की मनुष्यकृत ?

**(उत्तर)** तो ईश्वरकृत आहे, मनुष्यकृत नाही.

**(प्रश्न)** कोणते जातिभेद ईश्वरकृत आहेत ?

**(उत्तर)** मनुष्य, पशू, पक्षी, वृक्ष, जलचर इत्यादी जाती ईश्वराने निर्मिलेल्या आहेत. पशूंमध्ये गाई, घोडे, हत्ती वगैरे जाती आहेत. वृक्षांमध्ये पिंपळ, वड, आंबा वगैरे जाती आहेत. पक्षांमध्ये हंस, कावळा, बगळा वगैरे जाती आहेत. जलचरांमध्ये मासे, मगरी वगैरे जातिभेद आहेत. माणसांमध्ये ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अंत्यज हे जातिभेद ईश्वरकृत नाहीत. वर्णाश्रमव्यवस्थेच्या संदर्भात आम्ही यापूर्वी सांगितल्याप्रमाणे गुण-कर्म-स्वभावानुसार वर्णव्यवस्था मानणे आवश्यक आहे. ती जन्मानुसार समजणे चूक आहे. म्हणून ती मनुष्यकृत आहे, असे म्हणावे लागते. माणसाच्या गुणकर्मस्वभावानुसार त्याला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आदी वर्णांची परीक्षा घेऊन त्या-त्या वर्णात टाकणे हे राजाचे व विद्वानांचे काम आहे. भोजनभेदमात्र ईश्वरकृत व मनुष्यकृत आहेत. सिंह, वाघ हे मांसाहारी प्राणी आहेत तर गाय, म्हैस, जंगली रेडा, हत्ती हे प्राणी गवत व झाडपाला खाणारे शाकाहारी प्राणी आहेत. हा भोजनभेद ईश्वरकृत आहे. तर देशकाल वस्तुस्थिती प्रमाणे केला जाणारा भोजनभेद हा मनुष्यकृत आहे.

**(प्रश्न)** असे पाहा ! युरोपीय लोक बूट, कोट, पाटलोण घालतात आणि हॉटेलात सर्वांबरोबर खातात, म्हणूनच त्यांची सारखी प्रगती होत असते.

**(उत्तर)** हे तुमचे म्हणणे चूक आहे. कारण मुसलमान व अंत्यज सर्वांच्या हातचे खातात. तरीही त्यांची उन्नती का होत नाही ? युरोपीय लोकांमध्ये बालविवाह होत नाहीत. मुले व मुली शिक्षण घेऊन सुशिक्षित बनतात. त्यांच्यात स्वयंवराची प्रथा आहे. भोंदू लोकांच्या उपदेशाकडे ते लक्ष देत नाहीत. ते चांगले सुशिक्षित असल्यामुळे कुणाच्याही पाखंडाच्या जाळ्यात अडकत नाहीत. ते जे काही करतात ते आपसात विचार विनिमय करून, सभेमध्ये निर्णय घेऊन करतात. आपल्या देशाच्या व वंशाच्या उन्नतीसाठी ते तनमनधन अर्पण करतात. आळस झटकून उद्योग करतात.

पाहा ना ! ते लोक आपल्या देशात बनविलेल्या बुटांना कार्यालयात व न्यायालयात जाऊ देतात परंतु इथल्या देशी पादत्राणांना तेथे प्रवेश करू देत नाहीत. यावरूनच लक्षात घ्या की, ते लोक आपल्या देशात तयार झालेल्या पादत्राणांचीही केवढी प्रतिष्ठा ठेवतात. तेवढी प्रतिष्ठा ते इतर देशातल्या माणसांचीही ठेवीत नाहीत. तुम्हीच विचार करा. या देशात युरोपीय लोक आल्याला शंभर वर्षांहून अधिक काळ लोटला आहे. तरी देखील ते आपल्या देशात जसे जाड कपडे वापरीत असत तसेच येथेही वापरतात. आपले स्वदेशी रीतिरिवाज त्यांनी मुळीच सोडलेले नाहीत. परंतु तुमच्यापैकी अनेक लोकांनी त्यांचे अनुकरण केले. यावरूनच तुम्ही निर्बुद्ध व ते बुद्धिमान ठरतात. अनुकरण करणे हे शहाण्याचे काम नव्हे. या युरोपीय लोकांना जे काम सोपविले जाते ते यथोचितपणे ते पार पाडतात. ते अत्यंत आज्ञाधारक असतात. आपल्या स्वत:च्या देशबांधवांना व्यापार वगैरेमध्ये ते मदत करतात. इत्यादी गुणांमुळे आणि सत्कृत्ये केल्यामुळे त्यांची उन्नती होत असते. बूट, कोट, पाटलोण, हॉटेलात खाणे-पिणे इत्यादी सामान्य व वाईट गोष्टी केल्यामुळे त्यांची ही प्रगती झालेली नाही. शिवाय त्यांच्यात जातिभेदही आहे. जेव्हा एखादा युरोपियन, तो कितीही मोठ्या हुद्यावर आणि प्रतिष्ठित

असला तरी, दुसऱ्या देशातल्या अथवा संप्रदायातल्या मुलीशी लग्न करतो अथवा एखादी युरोपीय मुलगी इतर देशातल्या तरुणाशी लग्न करते तेव्हा तावडतोब त्यांच्याशी असलेले संबंध त्यांचे जातबांधव तोडून टाकतात. त्यांना सार्वजनिक कार्यक्रमाचे निमंत्रण दिले जात नाही. त्यांच्याबरोबर एका टेबलावर बसून इतर लोक जेवण करीत नाहीत. आणि त्यांच्या मुलाबाळांशी रोटी-बेटी व्यवहार करीत नाहीत. हा जातिभेद नव्हे तर काय? असे हे युरोपीय लोक तुमच्या सारख्या साध्याभोळ्या लोकांना असे खोटेच सांगतात की, आमच्यात जातिभेद नाही. तुम्ही सर्व मूर्ख असल्यामुळे त्यांचे म्हणणे खरे मानता. म्हणून आमचे तुम्हाला असे सांगणे आहे की, जे काही करायचे असेल ते नीट विचार करून करावे. म्हणजे पुन: पश्चाताप करण्याची पाळी येत नाही.

असे पाहा! वैद्य व औषध यांची आवश्यकता रोगी माणसाला असते. निरोगी माणसाला ती नसते. विद्यावान हा निरोगी आणि अविद्यावान हा रोगट असतो. त्या रोगापासून त्याची सुटका सत्य विद्या आणि सत्य उपदेश हे करतात. अविद्येमुळे त्यांना असा रोग जडला आहे की, खाण्यापिण्यामध्येच धर्म साठविलेला असून त्याचे नियम न पाळल्यास तो जातो असे ते समजतात. जेव्हा कोणी खाण्यापिण्याच्या बाबतीत दृढ नियमांचे पालन करीत नाही असे त्यांना दिसते तेव्हा तो धर्मभ्रष्ट झाला आहे असे ते समजतात व इतरांना तसे सांगत सुटतात. अशा लोकांचे बोलणे आपण ऐकू नये, त्यांच्याजवळ बसू नये व त्यांना आपल्याजवळ बसू देऊ नये.

आता असे सांगा की, तुमची विद्या स्वार्थासाठी आहे की, परमार्थासाठी? जेव्हा तुमच्या विद्येमुळे अज्ञजनांचा फायदा होतो तेव्हा तुमची विद्या परमार्थासाठी आहे, असे म्हणता येते. तुम्ही म्हणाल की, ''आम्ही त्यांना ज्ञान देऊ इच्छितो पण ते घेतच नाहीत. मग आम्ही काय करावे?'' तर यात तुमचाच दोष आहे. त्यांचा नाही. कारण तुम्ही स्वत:चे आचरण उत्तम ठेवले असते तर तुमच्यावर प्रेम करून ते उपकृत झाले असते. याचा अर्थ असा की, तुम्ही हजारो लोकांच्या कल्याणाची पर्वा न करता आपलेच हित पाहिले. हा तुमचा मोठा अपराध आहे. कारण परोपकार करणे हा धर्म असून परहानी करणे हा अधर्म आहे. म्हणून विद्वानांनी यथायोग्य आचरण ठेवून अज्ञानी लोकांसाठी दु:खरूपी सागर तरून जाण्याची नौका बनले पाहिजे. त्यांनी मूर्खांसारखे वर्तन करू नये; ज्यायोगे अज्ञजनांची व आपली स्वत:ची दिवसेंदिवस उन्नती होत जाईल असे कर्म करणे उचित आहे.

**(प्रश्न)** कोणताही ग्रंथ ईश्वरप्रणीत अथवा सर्वांशाने सत्य असतो असे आम्ही मानीत नाही. कारण माणसाची बुद्धी निर्भ्रांत (निर्दोष) असत नाही. म्हणून त्याने रचलेले सगळे ग्रंथ भ्रांतिपूर्ण (सदोष) असतात. म्हणून आम्ही सर्व ग्रंथांतून सत्य ग्रहण करतो आणि असत्य सोडून देता. सत्य हे वेद, बायबल, कुराण यांमध्ये अथवा इतर कोणत्याही ग्रंथात असले तरी ते आम्हाला ग्राह्य आहे आणि असत्य हे कोणत्याही ग्रंथातले असले तरी ते त्याज्य आहे.

**(उत्तर)** ज्या तत्त्वांच्या आधारे तुम्ही सत्यग्राही होऊ इच्छिता त्याच तत्त्वाच्या आधारे तुम्ही असत्यग्राही ठरता. कारण जर सगळीच माणसे निर्भ्रांत होऊ शकत नसतील तर तुम्हीही माणूसच असल्यामुळे भ्रांतिपूर्ण आहात. भ्रांतिपूर्ण माणसाची वचने सर्वांशाने प्रमाणित किंवा शास्त्रशुद्ध असू शकत नाहीत. त्यामुळे तुमचे म्हणणेही विश्वसनीय असणार नाही. म्हणून तुमच्या बोलण्यावरही संपूर्ण विश्वास ठेवता येत नाही. असे

असल्यामुळे तुमची मते विषयुक्त अन्नासारखी त्याज्य आहेत. म्हणून तुमची व्याख्याने व पुस्तके कोणीही प्रमाणभूत मानता कामा नये. 'चौबेजी (चतुर्वेदी) छब्बेजी (षड्वेदी) बनायला निघाले आणि जवळचे दोन वेद घालवून दुबेजी (द्विवेदी) बनले.' (म्हणजे 'इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशी तुमची स्थिती झाली आहे.) इतर माणसे सर्वज्ञ नाहीत त्याप्रमाणे तुम्हीही सर्वज्ञ नाही. कदाचित भ्रमाच्या आहारी जाऊन तुम्ही असत्य ग्रहण करून सत्य सोडून देत असाल. म्हणून सर्वज्ञ परमात्म्याची वचनेच आपण अल्पज्ञांनी आधारभूत मानली पाहिजेत.

वेदांविषयी विवेचन करताना आम्ही (सातव्या अध्यायात) जे काही सांगितले आहे ते तुम्ही अवश्य मानले पाहिजे. नाही तर 'यतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशी तुमची स्थिती होऊन जाईल. सारे सत्य वेदांतून मिळते. त्यांत काहीही असत्य नाही. म्हणून त्यांचे ग्रहण करण्याच्या बाबतीत शंका बाळगणे म्हणजे स्वतःचे व इतरांचे नुकसान करून घेणे होय. याच गोष्टीमुळे आर्यावर्त्तातील लोक तुम्हांला आपले समजत नाहीत आणि तुम्ही आर्यावर्त्ताच्या उन्नतीला कारणीभूत होऊ शकत नाही. कारण तुम्ही ख्रिश्चन, मुसलमान वगैरे परपंथियांच्या दारात जाऊन तत्त्वांची भीक मागता. या मार्गाने आपण आपले व इतरांचे कल्याण करू असे तुम्हाला वाटते. पण ते शक्य नाही. एका मातापित्याने जगातल्या सगळ्या मुलांचे पालन पोषण करण्याचा आव आणण्यासारखे हे आहे. सर्व मुलांचे पालनपोषण करणे त्यांना अशक्य असते. परंतु त्या प्रयत्नात ते स्वतःच्या मुलांचा नाश करून टाकतात. तुम्हा लोकांचे वर्तन हे असे आहे. वेदादी सत्य शास्त्रांना मान्यता दिल्याखेरीज तुम्ही आपल्या वचनांची सत्यता व असत्यता यांची पारख करु शकणार नाही आणि आर्यावर्त्ताची उन्नतीही कधी करू शकणार नाही.

या देशाला रोग झालेला आहे, त्याचे औषध तुमच्याजवळ नाही. युरोपीय लोक तुमची पर्वा करीत नाहीत; आणि आर्यावर्त्तातील लोक तुम्हाला परमतानुयायी समजतात. आजवर जे झाले ते झाले. आता तरी तुम्ही आपली चूक ओळखून वेद व इतर सत्य शास्त्रे यांच्या साह्याने देशोन्नतीच्या कामात सहभागी व्हा. त्यातच सर्वांचे कल्याण आहे. तुम्ही असे म्हणता की, सारे सत्य परमेश्वराद्वारे प्रकट होते. तर मग ऋषींच्या आत्म्यांमध्ये परमेश्वराच्या प्रेरणेने प्रकट झालेले सत्यार्थाचे ज्ञान देण्याऱ्या वेदांना तुम्ही का प्रमाणभूत मानीत नाही ? हां ! तुम्ही वेदांचे अध्ययन केलेले नाही आणि ते करू इच्छित नाही, हेच त्याचे कारण आहे. अशा स्थितीत तुम्हाला वेदांचे ज्ञान कसे प्राप्त होणार ?

(६) ख्रिश्चन, मुसलमान वगैरे लोकांप्रमाणे तुम्हीही असे मानता की हे जग उपादान कारणाशिवाय उत्पन्न झाले आहे आणि जीवाचीही उत्पत्ती करण्यात आली आहे. कारणाशिवाय कार्य होणे हे सर्वथैव अशक्य असते. आणि उत्पन्न झालेल्या वस्तूंचा नाश अटळ असतो. या ग्रंथाच्या सातव्या व आठव्या प्रकरणात सृष्टीची उत्पत्ती आणि जीव व ईश्वर यांच्या संबंधी आम्ही विवेचन केलेले आहे.

(७) पश्चाताप व ईश्वराची प्रार्थना यांच्या योगाने पापे नाहीशी होतात, असे जे तुम्ही मानता तीही तुमची चूक आहे. या समजुतीमुळेच जगात खूप पापे वाढली आहेत. पौराणिक लोक तीर्थयात्रेने, जैन लोक नमोकार मंत्राचा जप व तीर्थयात्रा यांच्या योगाने ख्रिस्ती लोक येशूवर श्रद्धा ठेवल्याने व मुसलमान लोक 'तोबा' (पश्चाताप) केल्याने पापाची फळे भोगावी न लागता पापे नष्ट होतात असे मानतात. या समजुतीमुळे पापाची भीती नाहीशी

होऊन उलट पापे करण्याची वृत्ती खूप वाढली आहे. या बाबतीत ब्राह्म व प्रार्थनासमाजी लोकही पौराणिकांसारखेच आहेत. तुम्ही वेदांचे वाचन वा श्रवण केले असते तर पापपुण्याची फळे भोगल्याशिवाय त्यांचा नाश होत नाही हे तुमच्या लक्षात आले असते आणि तुम्हाला पाप करण्याची भीती वाटली असती व सदैव धर्माच्या मार्गावरून तुम्ही चालत राहिला असता. पाप किंवा पुण्य भोगल्याशिवाय त्याची निवृत्ती होते असे मानले तर परमेश्वर अन्याय करणारा ठरतो.

जीवाच्या उन्नतीला काही अंत नाही असे तुम्ही मानता. पण ती गोष्ट अशक्य आहे. जीव मर्यादायुक्त (ससीम) असून त्याच्या गुणकर्मस्वभावाचे फळही मर्यादायुक्त असणे अनिवार्य आहे.

**(प्रश्न)** परमेश्वर दयाळू आहे. तो परिमित कर्मांचे फळ अपरिमित (अनंत) देईल.

**(उत्तर)** परमेश्वर तसे करील तर त्याचा न्याय नष्ट होईल; आणि सत्कृत्ये करण्याची धडपडही कोणी करणार नाही. कारण थोड्याशा सत्कर्माचे अनंत फळ परमेश्वर देईल आणि पश्चाताप व प्रार्थना यांच्या योगाने कितीही पापे असली तरीही ती नष्ट होतील अशी समजूत पसरल्यास धर्माची हानी व पापकर्मांची वृद्धी होते.

**(प्रश्न)** आम्ही असे मानतो की स्वाभाविक (सहजप्रवृत्त) ज्ञान हे वेदांच्या ज्ञानाहून श्रेष्ठ असते. नैमित्तिक ज्ञानाला काही महत्त्व नसते. कारण परमेश्वराने दिलेले स्वाभाविक ज्ञान आमच्यामध्ये नसते तर आम्ही वेदांचे अध्ययन व अध्यापन कसे केले असते ? म्हणून आमचे मत फार चांगले आहे.

**(उत्तर)** हे तुमचे म्हणणे निरर्थक आहे. कारण जे ज्ञान कोणीतरी दिलेले असते ते स्वाभाविक नसते. जे ज्ञान सहजप्रवृत्त असते ते स्वाभाविक किंवा नैसर्गिक असते. ते वाढतही नाही अथवा कमीही होत नाही. त्याच्या साह्याने कोणीही उन्नती करू शकत नाही. कारण जंगली माणसांमध्येही स्वाभाविक ज्ञान असते. तरीही ते आपली उन्नती करू शकत नाहीत. जे नैमित्तिक ज्ञान असते त्याच्यामुळेच उन्नती होते. असे पाहा, तुम्ही-आम्ही जेव्हा बाल्यावस्थेत होतो तेव्हा कर्तव्याकर्तव्य व धर्माधर्म यासंबंधी आपल्याला काहीच नीट कळत नव्हते. जेव्हा आपण विद्वानांकडून ज्ञान ग्रहण केले तेव्हाच आपल्याला कर्तव्याकर्तव्ये व धर्माधर्म कळू लागले म्हणून स्वाभाविक ज्ञान सर्वश्रेष्ठ आहे असे समजणे बरोबर नाही.

(९) तुम्ही मंडळी पूर्वजन्म व पुनर्जन्म मानीत नाही. ही गोष्ट तुम्ही ख्रिस्ती व मुसलमान लोकांकडून घेतली असावी. पुनर्जन्माविषयीचे विवेचन यापूर्वी येऊन गेले आहे, ते पाहावे. तरी पण एवढे समजून घ्या की जीव हा शाश्वत व नित्य आहे, आणि त्याची कर्मेही प्रवाहरूपाने नित्य आहेत. कर्म आणि कर्मवान (कर्ता) यांचा नित्य संबंध असतो. जीव कोणतेही कर्म न करता (मागील जन्मी) रिकामटेकडा बसून राहिला होता किंवा (पुढीलजन्मी) राहील काय ? तुम्ही तर परमेश्वरालाही कर्मरहित म्हणजे रिकामटेकडा मानता. पूर्वजन्म न मानल्यास परमेश्वराला कृतहानि व अकृत अभ्यागम (न केलेल्या कर्माचे फळ मिळणे), नैघृण्य (निर्दयता) व वैषम्य (विषमता, अनौचित्य) हे दोष लागतात. कारण पुनर्जन्म नसेल तर जीवाला पापपुण्याची बरीवाईट फळे कशी भोगता येतील ? जीव दुसऱ्याला जे सुख, दुःख, हानि, लाभ देतो त्याप्रमाणे त्याची फळे पुनः जन्म घेतल्याखेरीज त्याला भोगता येत नाहीत. तसेच, पूर्वजन्मात केलेल्या पापपुण्यांची फळे सुखदुःखाच्या रूपाने या जन्मात भोगावयाची असतात. ती गोष्ट पुनर्जन्माखेरीज कशी शक्य होईल ? मागील जन्मातील पापपुण्यानुसार या जन्मात सुखदुःखे

भोगावी लागली नाहीत तर परमेश्वर अन्याय करणारा ठरेल. तसेच, या जन्मात केलेल्या कर्मांची फळे भोगण्यासाठी पुढील जन्म मिळणार नसेल तर ती कर्मे निष्फळ ठरतील. म्हणून पुनर्जन्मावर विश्वास न ठेवण्याचे तुमचे मत बरोबर नाही.

(१०) एका ईश्वराखेरीज दिव्य गुण असणाऱ्या पदार्थांना व विद्वानांनाही देव न मानणे योग्य नाही. कारण परमेश्वराला तुम्ही महादेव म्हणजे सर्व देवांचा देव असे म्हणता. जर इतर देव नसते तर त्याला हे नाव कसे प्राप्त झाले असते ?

(११) अग्निहोत्रादी परोपकारी कर्मांना कर्तव्य न मानणे बरोबर नाही.

(१२) ऋषींनी व महर्षींनी केलेले उपकार न स्मरता येशूच्या पाया पडणे चांगले नव्हे.

(१३) सर्व विद्यांचे मूळ कारण वेदरूपी विद्या हे आहे. तिच्या मदतीखेरीज इतर कार्य विद्या अस्तित्वात आल्या असे समजणे हा केवळ भ्रम आहे.

(१४) जानवे व शेंडी ही विद्येची चिह्ने आहेत. त्यांचा त्याग करून मुसलमान व ख्रिस्ती लोकांसारखे बनणे हे निरर्थक आहे. तुम्ही कोट-पाटलोण घालता आणि आपल्याला बिल्ले लावून मिरविता यावे अशी इच्छा बाळगता. तर तुम्हाला जानवे वगैरेचे फार ओझे वाटले काय ?

(१५) आर्यावर्त्तामध्ये जुन्या काळी ब्रह्मापासून आजपर्यंत पुष्कळ विद्वान् होऊन गेले आहेत. त्यांची प्रशंसा न करता युरोपीय लोकांचीच भरमसाट स्तुती करीत राहणे हा पक्षपात व खुशामतखोरपणा नव्हे काय ?

(१६) बीजांकुराप्रमाणे जड (अचेतन) व चेतन यांच्या संयोगाने जीवोत्पत्ती होते असे मानणे, उत्पत्तीपूर्वी जीवतत्त्व नव्हते असे मानणे आणि उत्पन्न होणाऱ्या वस्तूचा नाश होतो असे न मानणे हे पूर्वपार विरुद्ध आहे. उत्पत्तीच्या आधी जड (अचेतन) व चेतन वस्तू नव्हती तर जीव कोठून आला ? संयोग कोणाचा झाला ? जड (अचेतन) व चेतन हे सनातन आहेत असे तुम्ही मानीत असाल तर ते बरोबर आहे. परंतु सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी ईश्वराखेरीज दुसरे कोणतेच तत्त्व अस्तित्वात नव्हते असे जे तुम्ही समजता ते मात्र निखालस चूक आहे. **"म्हणून या देशाची उन्नती व्हावी असे तुम्हाला वाटत असेल तर तुम्ही 'आर्यसमाजा'शी सहकार्य करून त्याच्या उद्दिष्टानुसार आचरण करण्यास सुरुवात करा. नाहीतर तुम्ही काहीही करू शकणार नाही. ज्या देशातील पदार्थांनी तुमची-आमची शरीरे बनली आहेत, आज त्यांचे पालनपोषण होत आहे व यापुढे होणार आहे त्यांची आपण सर्वजण मिळून तनमनधनाने व प्रेमाने उन्नती करूया. आर्यावर्त्ताची उन्नती करण्यास 'आर्यसमाज' जसा समर्थ आहे तसा दुसरा कोणताही समाज, संस्था अथवा संघटना असू शकत नाही. या समाजाला तुम्ही यथोचित साह्य कराल तर ती फार चांगली गोष्ट होईल. कारण समाजाला भाग्यशाली बनविणे हे समुदायाचे काम असते. ते एकट्या दुकट्याचे काम नसते."**

**(प्रश्न)** तुम्ही तर सगळ्यांचे खंडन करण्याचाच सपाटा लावला आहे; परंतु त्यांच्या दृष्टीने सगळेच पंथ चांगले आहेत. म्हणून कोणाचेही खंडन करू नये. तुम्ही त्यांचे खंडन करता खरे; परंतु तुम्ही तरी त्यांच्या पेक्षा वेगळे असे काय सांगता ? आणि जरी तुम्ही काही सांगत असला तरी तुमच्या तोडीचा किंवा तुमच्यापेक्षा श्रेष्ठ असा एखादा पुरुष नव्हता काय ? आज नाही काय ? अशी घमेंड बाळगणे तुम्हाला शोभत नाही. कारण

परमात्म्याच्या सृष्टीत एकाहून एक वरचढ, तुल्य आणि कमी प्रतीचे असे अनेक प्रकारचे लोक आहेत. म्हणून कोणीही घमेंड करणे योग्य नाही.

**(उत्तर)** धर्म सर्वांचा एकच असतो की अनेक ? जर अनेक असतील तर ते एकमेकांच्या विरुद्ध असतात की अविरुद्ध ? जर ते एकमेकांच्या विरुद्ध असतील तर एकाशिवाय दुसरा धर्म असू शकत नाही आणि ते एकमेकांच्या अविरुद्ध असतील तर वेगवेगळे धर्म असणे व्यर्थ आहे. म्हणून सर्व मानव जातीच्या दृष्टीने धर्म एकच आहे व अधर्मही एकच आहे. अनेक धर्म व अधर्म नाहीत. इतरांहून आमचा जो वेगळेपणा आहे तो हाच होय. एखाद्या राजाने सर्व संप्रदायांचे उपदेश एकत्र केले तर ते हजाराहून कमी भरणार नाहीत. परंतु त्या सर्वांची चार प्रमुख भागांत विभागणी केल्यास जगात चारच पंथ प्रमुख असल्याचे आढळून येते. ते असे : पुरानी (पौराणिक), किरानी (ख्रिस्ती), जैनी (जैन व बौद्ध), व कुरानी (मुसलमानी) या चार पंथात सगळे संप्रदाय येऊन जातात. एखाद्या राजाने या सर्वांचे संमेलन भरवून जिज्ञासू वृत्तीने प्रथम वाममार्गी इसमाला विचारले की, "हे महाराज ! मी आजपर्यंत कोणालाही गुरू बनविलेले नाही अथवा कोणताही धर्म स्वीकारलेला नाही. तुम्ही मला असे सांगा की, सर्व धर्मांमध्ये उत्तम धर्म कोणता आहे ? मी कोणता धर्म स्वीकारावा ?"

**(वाममार्गी)** आमचा धर्म सर्वोत्तम आहे.

**(जिज्ञासू)** मग हे उरलेले नऊशे नव्याण्णव धर्म कसे आहेत ?

**(वाममार्गी)** ते सर्व खोटे आणि नरकाला नेणारे आहेत. कारण **"कौलत्परतरं नहि"** या वचनाप्रमाणे आमच्या वाममार्गाहून श्रेष्ठ असा दुसरा कोणताही धर्म नाही.

**(जिज्ञासू)** तुमचा धर्म काय आहे ?

**(वाममार्गी)** देवी भगवतीवर श्रद्धा ठेवणे, मद्यमांसादि पंच मकारांचे सेवन करणे, आणि रुद्रयामल वगैरे चौसष्ट तंत्रग्रंथांना प्रमाण मानणे, वगैरे. तुला मुक्तीची इच्छा असेल तर तू आमचा चेला होऊन जा.

**(जिज्ञासू)** ठीक आहे. तरी पण इतर महात्म्यांचे दर्शन घेऊन त्यांच्या धर्माविषयी प्रथम चौकशी करतो आणि मग ज्या धर्मावर माझी श्रद्धा बसेल व प्रीती जडेल त्याचा चेला बनेन.

**(वाममार्गी)** अरे, तू असा भ्रमात का पडला आहेस ? ते लोक तुला भुलवून आपल्या जाळ्यात अडकवतील. इतर कोणाकडे मुळीच जाऊ नकोस. आम्हालाच शरण ये. नाहीतर पस्तावशील. पाहा ! आमच्या पंथात भोग व मोक्ष दोन्ही आहेत.

**(जिज्ञासू)** ठीक आहे. तरीपण इतरांकडे जाऊन चौकशी करतो.

त्याप्रमाणे जिज्ञासू शैवांकडे गेला. तेथेही त्याला असेच उत्तर मिळाले. त्यांत त्यांनी विशेष असे सांगितले की, शिव, रुद्राक्ष, भस्मधारण व लिंगार्चन यांखेरीज मुक्ती कधीच मिळत नाही. तेव्हा त्यांना तेथेच सोडून तो नववेदांती गृहस्थांकडे गेला.

**(जिज्ञासू)** महाराज, तुमचा धर्म काय आहे ?

**(वेदांती)** आम्ही धर्म-अधर्म जाणत नाही. आम्हीच साक्षात ब्रह्म आहोत. आमच्यामध्ये धर्म-अधर्म कोठून असणार ? हे सारे जग मिथ्या आहे. तुला ज्ञानी व शुद्ध व्हायचे असेल तर तू स्वतःला ब्रह्म मान व जीवभावना सोडून दे. तू नित्यमुक्त होऊन जाशील.

**(जिज्ञासू)** तुम्ही ब्रह्म व नित्यमुक्त आहात असे म्हणता. तर ब्रह्माचे गुण, कर्म, स्वभाव तुमच्यामध्ये का नाहीत ? आणि तुम्ही या शरीरात का बद्ध आहात ?

**(वेदांती)** तुला शरीर दिसते म्हणून तू भ्रमात आहेस. आम्हाला ब्रह्माशिवाय काहीही दिसत नाही.

**(जिज्ञासू)** तुम्ही पाहणारे कोण, आणि तुम्ही कोणाला पाहता ?

**(वेदांती)** पाहणारे ब्रह्म असून ब्रह्माला ब्रह्म पाहते.

**(जिज्ञासू)** म्हणजे दोन ब्रह्मे आहेत काय ?

**(वेदांती)** नाही. ब्रह्म स्वत:लाच पाहते.

**(जिज्ञासू)** कोणी आपल्या स्वत:च्या खांद्यावर चढू शकतो काय ? तुमचे हे बोलणे म्हणजे वेड्याचे बरळणेच आहे.

तेथून जिज्ञासू जैनांकडे गेला. त्याच्या प्रश्नांना त्यांनी तशीच उत्तरे दिली. फरक इतकाच की, ते म्हणाले, ''जिणधम्माखेरीज इतर सर्व धर्म खोटे आहेत. जगाचा कर्ता अनादी ईश्वर असा कोणी नाही. जग हे अनादी काळापासून जसेच्या तसे राहिले आहे; आणि यापुढेही ते तसेच राहणार आहे. ये, तू आमचा अनुयायी होऊन जा. कारण आम्ही सम्यक्त्व मानणारे म्हणजे सर्व प्रकारे चांगले आहोत. आम्ही उत्तम गोष्टी मानतो. जैन मार्गाखेरीज इतर सर्व मार्ग चुकीचे आहेत.''

तेथून तो ख्रिस्ती इसमाकडे गेला. त्या इसमाने वाममार्गी माणसाप्रमाणेच त्याच्या सर्व प्रश्नांना उत्तरे दिली. आपले वैशिष्ट्य सांगताना तो म्हणाला, ''सर्व माणसे पापी आहेत. माणसाच्या स्वत:च्या सामर्थ्याने पापे नष्ट होत नाही. येशूवर श्रद्धा ठेवून पवित्र झाल्याखेरीज माणसाला मुक्ती मिळू शकत नाही. येशूने सर्वांसाठी प्रायश्चित करण्याकरिता आपले प्राण दिले आणि दयेचा प्रकाश दाखविला. तू आमचाच अनुयायी हो.''

त्याचे बोलणे ऐकल्यावर जिज्ञासू मौलवी साहेबांकडे गेला. त्यांच्याशीही त्याची अशीच प्रश्नोत्तरे झाली. त्यांनी एवढीच भर घातली की, 'एकमेव खुदा, त्याचा पैगंबर आणि कुराणशरीफ हा धर्मपंथ मान्य केल्याखेरीज कुणालाही मुक्ती मिळू शकत नाही. जो या धर्माचा स्वीकार करीत नाही तो काफिर असून नरकात जातो. तो ठार मारण्याच्याच योग्यतेचा असतो.'

तेथून जिज्ञासू वैष्णवांकडे गेला. तेथेही असाच संवाद झाला. फक्त त्याने एवढे अधिक सांगितले की, 'आमचा टिळा व छाप पाहून यमराज घाबरतो.' जिज्ञासूने मनात विचार केला, 'या माणसाला डास, माशा, पोलिस, चोर, डाकू आणि शत्रू घाबरत नाहीत. तर यमदूत कसे घाबरतील ?'

तेथून तो पुढे गेला. सर्वच मतांच्या व पंथाच्या लोकांनी आपापले मत व पंथ खरे असल्याचे त्याला सांगितले. कोणी म्हणे आमचा कबीर खरा आहे, कोणी म्हणे नानक, कोणी म्हणे दादू तर कोणी म्हणे वल्लभ, कोणी सहजानंद तर कोणी माध्व अशा प्रकारे सर्वजण आपापल्या पंथाच्या संस्थापकाला फार मोठा अवतार समजतात, असे त्याला आढळून आले. हजार लोकांना विचारल्यावर त्यांच्या परस्पर विरोधी भूमिका त्याच्या लक्षात आल्या आणि त्याने असा निर्णय घेतला की, त्यांच्यापैकी कोणीही गुरू करण्यास योग्य नाही. कारण एकेक जण कसा खोटा आहे ते सांगणारे नऊशे नव्याण्णव साक्षीदार त्याला भेटले. ज्याप्रमाणे खोटा दुकानदार,

वेश्या किंवा भडवा आपापल्या वस्तूची महती गातो आणि इतरांच्या वस्तूंची निंदा करतो तसेच हे सगळे मत-पंथवाले आहेत असे त्याला आढळून आले. तेव्हा त्याला उपनिषदाच्या खालील वचनांचे स्मरण झाले :-

**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत। समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्॥१॥**
**तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशान्तचित्ताय शमान्विताय।**
**येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम्॥२॥** मुण्डक. १।खं. २।मं. १२,१३

अर्थ :- सत्यस्वरूप परब्रह्माच्या साक्षात्काराकरिता हातात समिधा घेऊन त्याने श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ गुरूपाशीच जावे. या पाखण्डी लोकांच्या जाळ्यात अडकू नये. ॥१॥

त्या विद्वान ब्रह्मज्ञ गुरूने ज्ञानार्जनासाठी आलेल्या त्या दर्पादी दोषरहित व शांतस्वभावी, जिज्ञासू शिष्याला ''यथार्थ ब्रह्मविद्येचा म्हणजे परमेश्वराच्या गुण, कर्म, स्वभावाचा उपदेश करावा. तसेच ज्या ज्या पद्धतीने तो श्रोता धर्म, अर्थ, काम, मोक्ष व परमेश्वरास जाणेल त्या त्या मार्गाचा उपदेश करावा.'' ॥२॥

जेव्हा तो अशा पुरुषाकडे जाऊन म्हणाला, ''महाराज, या संप्रदायांच्या आपसातील कलहामुळे माझे चित्त भ्रांत झाले आहे. कारण यांच्यापैकी एकाचे शिष्यत्व मी पत्करले तर उरलेल्या नऊशे नव्याण्णव लोकांचे शत्रुत्व मला पत्करावे लागेल. ज्याचे नऊशे नव्याण्णव शत्रू व एक मित्र असेल त्याला कधीही सुख लाभू शकणार नाही. म्हणून माझ्या हिताचा व मला ग्रहण करता येईल असा उपदेश तुम्ही मला करा.''

**(आप्तविद्वान्) (खरा उपदेशक)** हे सर्व संप्रदाय अविद्याजन्य, विद्याविरोधी आहेत. तू मूर्ख, पामर व जंगली लोकांना फसवून, त्यांची दिशाभूल करून, आपल्या जाळ्यात अडकवितात आणि आपला स्वार्थ साधतात. ते बिचारे आपल्या मनुष्यजन्माचे फळ गमावून आपला मनुष्यजन्म वाया घालवितात. असे पाहा! हे हजार लोक ज्या बाबतीत एकमत होऊ शकतात ते वेदमत ग्राह्य आहे आणि ज्यात परस्परविरोध आहे ते सारे काल्पनिक, खोटे, अधर्म व अग्राह्य आहे.

**(जिज्ञासू)** याची पारख कशी करायची?

**(आप्त)** तू यांच्याकडे जाऊन त्यांना खालील प्रश्न विचार. त्यांच्या उत्तरांच्या बाबतीत त्या सर्वांचे एकमत असल्याचे तुला आढळून येईल.

त्याप्रमाणे जिज्ञासू त्या हजार लोकांच्या समुदायाकडे गेला आणि त्यांच्या मधोमध उभा राहून तो त्यांना म्हणाला, ''ऐका हो ऐका! सत्यभाषणामध्ये धर्म आहे की खोटेपणामध्ये?'' सर्वांनी एका स्वरात सांगितले की, ''सत्यभाषणात धर्म आहे व असत्यभाषणात अधर्म आहे.'' मग जिज्ञासूने विचारले, ''विद्याध्ययन करणे, ब्रह्मचर्याचे पालन करणे, पूर्ण तारुण्यात विवाह करणे, सत्संग, पुरुषार्थ व सत्यव्यवहार करणे इत्यादी गोष्टींमध्ये धर्म आहे की विद्या न शिकणे, ब्रह्मचर्याचे पालन न करणे, व्यभिचार, कुसंगती, आळस, असत्य व्यवहार, लबाडी, कपट, हिंसा, दुसऱ्यांची हानी इत्यादी गोष्टी करण्यामध्ये धर्म आहे?''

सर्वांनी एकमताने सांगितले की, ''विद्याध्ययन वगैरे गोष्टींमध्ये धर्म असून विद्या न शिकणे वगैरे गोष्टींत अधर्म आहे.''

तेव्हा जिज्ञासूने सर्वांना विचारले, ''अशा प्रकारे वैदिक धर्माच्या बाबतीत तुम्हां सर्वांचे एकमत आहे तर सत्यधर्माची उन्नती व मिथ्या मार्गाचा नाश करण्यास का प्रवृत्त होत नाही ?'' यावर ते म्हणाले, ''आम्ही तसे केले तर मग आम्हाला कोण विचारील ? आमचे चेले आमच्या आज्ञेत राहणार नाहीत. आमचा पोटापाण्याचा धंदाच नाहीसा होईल. आणि मग आम्ही आज जी चैन करीत आहोत ती आम्हाला करता येणार नाही. म्हणून आम्हाला जरी सगळे कळत असले तरी आम्ही आपापल्या पंथाचा व संप्रदायाचा उपदेश व प्रचार करीत राहतो. कारण 'रोटी खाईए शक्करसे और दुनिया ठगिये मक्करसे' म्हणजे जगाला धूर्ततेने फसवून मौजमजा करावी. असे पाहा ! जगामध्ये साध्यासुध्या, प्रामाणिक माणसाला कोणी काही देत नाही किंवा विचारीत नाही. जो कोणी ढोंगबाजी व धूर्तपणा करतो त्याचीच चैन असते.''

**(जिज्ञासू)** तुम्ही अशा प्रकारे लबाडी करून लोकांना जे फसवता त्याबद्दल तुमचा राजा तुम्हाला शिक्षा का करीत नाही ?

**(पंथवाले)** आम्ही राजालाच आमचा चेला बनविले आहे. आम्ही पक्का बंदोबस्त केला आहे. आमच्या तावडीतून कोणी सुटू शकत नाही.

**(जिज्ञासू)** तुम्ही कपटाने इतर पंथाच्या लोकांना फसवून त्यांचे नुकसान करता. या बद्दल परमेश्वरासमोर तुम्ही काय जाब द्याल ? तुम्ही घोर नरकात पडाल. इहलोकातील थोड्याशा जीवनासाठी एवढा मोठा गुन्हा करण्याचे तुम्ही का सोडून देत नाही ?

**(पंथवाले)** जेव्हा जे काही होईल तेव्हा पाहता येईल. नरक आणि परमेश्वराची शिक्षा जेव्हा होईल तेव्हा होवो. सध्या तर चैन करीत आहोत ना ! लोक आम्हाला स्वखुशीने धनधान्य देतात. आम्ही कोणाकडून बळजबरीने काही घेत नाही. मग राजा आम्हाला का शिक्षा करील ?

**(जिज्ञासू)** जेव्हा एखादा माणूस लहान मुलांना फूस लावून त्यांच्या जवळचे पैसे वगैरे लुबाडतो तेव्हा त्याला शिक्षा होते. तशी शिक्षा तुम्हाला का होऊ नये ? कारण,

**अज्ञो भवति वै बालः पिता भवति मन्त्रदः ॥** मनु. अ. २ श्लो. ५३

जो ज्ञानरहित म्हणजे अज्ञ असतो तो बालक आणि जो ज्ञान देणारा असतो तो पिता किंवा वृद्ध समजावा. जो बुद्धिमान, विद्वान असतो तो तुमच्या जाळ्यात अडकत नाही. परंतु बालकांप्रमाणे अज्ञानी असणारे लोक तुमच्यावर विश्वास ठेवून फसतात. त्यांना फसविल्याबद्दल तुम्हाला अवश्य शिक्षा झाली पाहिजे.

**(पंथवाले)** राजा, प्रजा सगळेच आमच्या पंथाचे अनुयायी आहेत. मग आम्हाला कोण शिक्षा करणार ? जेव्हा आमच्या कृत्यांना शिक्षा देणारे कायदे होतील तेव्हा आम्ही या गोष्टी सोडून दुसरी काही व्यवस्था करू.

**(जिज्ञासू)** तुम्ही रिकामटेकडे बसून लोकांच्या संपत्तीवर डल्ला मारता. त्याऐवजी विद्याभ्यास करून गृहस्थांच्या मुलामुलींना शिकविण्याचे काम कराल तर तुमचे व गृहस्थांचे कल्याण होईल.

**(पंथवाले)** जन्मभर सहजासहजी मिळणारी सुखे आम्ही का सोडावीत ? लहानपणापासून तारुण्यावस्था प्राप्त होईपर्यंत विद्याध्ययन करीत राहायचे, नंतर मरेपर्यंत अध्यापन व उपदेश करीत राहायचे, याची आम्हाला काय गरज ? आम्हाला तर काहीही काम न करता लाखो रुपये मिळतात. त्यावर आम्ही चैन करतो. ती आम्ही का सोडावी ?

**(जिज्ञासू)** पण त्याचा परिणाम वाईट होतो ना ? पाहा ! तुम्हाला अनेक रोग होतात. तुम्ही फार लवकर मरता. शहाणी माणसे तुम्हाला नावे ठेवतात. तरीही कसे समजत नाही ?

**(पंथवाले)** अरे बाबा !

**टका धर्मष्टका कर्म टका हि परमं पदम्।**
**यस्य गृहे टका नास्ति हा ! टकां टकटकायते ॥१॥**
**आना अंशकला: प्रोक्ता रूप्योऽसौ भगवान् स्वयम्।**
**अतस्तं सर्व इच्छन्ति रूप्यं हि गुणवत्तमम् ॥२॥**

तू अजून बच्चा आहेस. तुला जगाचा व्यवहार कळत नाही. असे पाहा ! टक्क्या (पैशा) शिवाय धर्म, टक्क्याशिवाय कर्म आणि टक्क्याशिवाय परमपद प्राप्त होत नाही. ज्याच्या घरात टक्का नाही तो हाय टक्का ! हाय टक्का ! असे म्हणत उत्तम पदार्थांकडे टकमका पाहत राहतो. तो मनात म्हणतो की, ''अरेरे ! माझ्याजवळ टक्का असता तर मी या उत्तम पदार्थांचा उपभोग घेतला असता.'' ॥१॥ कारण सर्व लोक सोळा कलांनी युक्त अदृश्य परमेश्वराविषयी ऐकतात. परंतु तो कोणाला दिसत नाही. याउलट सोळा आणे आणि पैसे, कवड्या यांचे अंश आपल्यामध्ये समाविष्ट करणारा षोडशकलायुक्त रुपया मात्र सर्वांना दिसतो. तोच साक्षात भगवान आहे. म्हणून सर्व लोक रुपये मिळविण्याची इच्छा बाळगतात. कारण सर्व कामना रुपयाच्या साह्याने सफळ होतात. ॥२॥

**(जिज्ञासू)** ठीक आहे. तुमच्या मनातली मळमळ बाहेर आली ते बरे झाले. तुम्ही जे हे सारे पाखंड उभे केले आहे ते केवळ स्वत:ला सुख मिळावे म्हणून केले आहे. परंतु त्यामुळे जगाचा नाश होतो. कारण सत्योपदेशाने जसा जगाचा लाभ होतो तशीच असत्योपदेशाने हानी होते. तुम्हाला पैसाच हवा असेल तर नोकरी, व्यापार वगैरे करून तुम्ही पैसा का मिळवीत नाही ?

**(पंथवाले)** तसे करण्यामध्ये खूप परिश्रम होतात आणि त्यात नुकसान होण्याचीही शक्यता असते. परंतु आमच्या या मोफतच्या धंद्यात नुकसान कधीच होत नाही. नेहमी फक्त फायदाच फायदा होतो. आम्ही पाण्यात तुळशीची पाने टाकून लोकांना चरणामृत देतो. एखाद्याला चेला बनवून त्याचे मुंडन करवितो आणि त्याच्या गळ्यात रुद्राक्षांची माळ घालतो. एवढे केले की तो चेला जन्मभर पशुवत बनून राहतो. मग तो आमच्यासाठी गुरासारखा राबतो. त्याच्याकडून आम्हाला जे हवे असेल ते आम्ही करवून घेऊ शकतो.

**(जिज्ञासू)** तुमचे अनुयायी तुम्हाला इतके धन कशासाठी देतात ?

**(पंथवाले)** धर्म साधावा आणि स्वर्ग व मोक्ष मिळावा यासाठी.

**(जिज्ञासू)** तुम्ही स्वत: मुक्त नाही तुम्हांला मुक्तीचे स्वरूप व साधन माहीत नाही तर तुमची सेवा करणाऱ्यांना मुक्ती अथवा मोक्ष कोठून मिळणार ?

**(पंथवाले)** त्यांच्या सेवेचे फळ त्यांना इहलोकात मिळते काय ? मुळीच नाही. ते त्यांना मेल्यानंतर परलोकात मिळते. हे लोक आमची सेवा करून आम्हाला जे काही देतात ते सारे त्यांना परलोकात परत मिळते.

**(जिज्ञासू)** या लोकांनी तुम्हाला दिलेले त्यांना परत मिळत असेल किंवा नसेल. पण ते तुम्हा घेणाऱ्यांना काय मिळेल ? नरकच मिळेल की इतर काही ?

**(पंथवाले)** आम्ही भजन करतो व करवतो त्याबद्दल आम्हाला स्वर्गात सुख मिळेल.

**(जिज्ञासू)** तुमचे भजन हे पैसा मिळविण्याचे एक साधन आहे. तुम्ही मिळविलेले सगळे धन येथेच राहून जाईल आणि ज्या शरीराचे एवढे कोडकौतुक तुम्ही करता ते शरीरही राख होऊन येथेच राहील. तुम्ही जर खरोखरी ईश्वराचे भजन करीत असता तर तुमचा आत्माही पवित्र झाला असता.

**(पंथवाले)** आम्ही अशुद्ध आहोत की काय ?

**(जिज्ञासू)** तुम्ही आतून अत्यंत गलिच्छ आहात.

**(पंथवाले)** ते तुम्हाला कसे कळले ?

**(जिज्ञासू)** तुमचे वर्तन आणि व्यवहार यावरून.

**(पंथवाले)** महात्म्यांचा व्यवहार हत्तीच्या दातासारखा असतो. ज्याप्रमाणे हत्तीचे दात खाण्याचे वेगळे आणि दाखविण्याचे वेगळे असतात त्याप्रमाणे आम्ही आतून पवित्र आहोत आणि बाह्यत: लांड्यालबाड्या करीत असतो.

**(जिज्ञासू)** तुम्ही आतून शुद्ध असता तर तुमचे बाह्य व्यवहारही शुद्ध राहिले असते. म्हणून तुम्ही आतून घाणेरडे आहात, असे सिद्ध होते.

**(पंथवाले)** आम्ही कसेही असलो तरी आमचे अनुयायी तरी चांगले आहेत ना ?

**(जिज्ञासू)** जसे तुम्ही गुरू आहात तसेच तुमचे चेले असणार.

**(पंथवाले)** सर्व माणसांसाठी एक धर्म कधीच चालू शकणार नाही. कारण सर्व माणसांचे गुण, कर्म, स्वभाव वेगवेगळे असतात.

**(जिज्ञासू)** लोकांना लहानपणापासून एकाच प्रकारचे उत्तम शिक्षण मिळाले, त्यांनी सत्यभाषणादी धर्माचे ग्रहण केले आणि मिथ्याभाषणादी अधर्माचा त्याग केला तर सर्वांचा एक धर्म अवश्य होऊ शकतो. अर्थात माणसांमध्ये धर्मात्मा व अधर्मात्मा हा भेद नेहमीच राहणार. परंतु धर्मात्मे जास्त झाले आणि अधर्मी लोक कमी झाले तर जगातील सुख वाढते; आणि जेव्हा अधर्मी लोकांची संख्या जास्त होते तेव्हा दु:ख वाढते. जेव्हा सर्व विद्वान एकाच प्रकारचा उपदेश करतील तेव्हा धर्माची प्रस्थापना होण्यास मुळीच विलंब लागणार नाही.

**(पंथवाले)** आजकाल कलियुग चालू आहे. तुम्ही सांगता त्या सत्ययुगातील गोष्टी घडून येतील अशी इच्छा तुम्ही बाळगू नका.

**(जिज्ञासू)** कलियुग हे एका कालखंडाचे नाव आहे. काळ हा स्वत: निष्क्रिय असल्यामुळे धर्म अथवा अधर्म करण्याबाबतीत तो साधक किंवा बाधक होऊ शकत नाही. मात्र तुम्हीच मूर्तिमंत कलियुगी आहात. मनुष्य हा मुळात सत्ययुगी अथवा कलियुगी नसतो. कारण माणसातील गुण-दोष हे अंगभूत किंवा स्वभावसिद्ध नसतात. संगतीमुळे माणसामध्ये गुण किंवा दोष निर्माण होतात. ते स्वाभाविक नसतात.

एवढे बोलून जिज्ञासू आप्तांकडे गेला; आणि त्यांना म्हणाला, ''महाराज ! तुम्ही माझा उद्धार केला, नाहीतर मीही कुणाच्यातरी जाळ्यात अडकून नष्ट भ्रष्ट झालो असतो. यापुढे मी या पाखंडी लोकांच्या मताचे खंडन आणि वेदोक्त सत्य मताचे मंडन करीत राहीन.''

**(आप्त)** हेच सर्व लोकांचे, विशेषत: विद्वानांचे व संन्याशांचे काम आहे. त्यांनी सर्वासमोर सत्याचे मंडन व असत्याचे खंडन केले पाहिजे. त्याप्रकारचे साहित्य लोकांना वाचून दाखवून सत्योपदेशाद्वारे इतरांवर उपकार केला पाहिजे. त्यातच समाजाचे कल्याण आहे.

## ब्रह्मचारी व संन्यासी समीक्षा

**(प्रश्न)** आजकालचे ब्रह्मचारी व संन्यासी तर चांगले आहेत ना ?

**(उत्तर)** हे आश्रम तसे चांगले आहेत. परंतु आजकाल त्याच्यामध्येही पुष्कळच घोटाळा माजलेला आहे. कित्येक लोक स्वत:ला ब्रह्मचारी म्हणवितात; आणि जटाजूट वाढवून आपण सिद्ध पुरुष असल्याचा आव आणतात. जपजाप्य व पुरश्चरण वगैरे गोष्टीत ते गुंतून पडतात. विद्याध्ययन मुळीच करीत नाहीत. ज्या ब्रह्माच्या प्राप्तीसाठी प्रेरणार्थक ब्रह्मचारी हा शब्द बनलेला आहे त्या ब्रह्माचे ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी वेदाध्ययन करण्याचे कष्ट मुळीच घेत नाहीत. हे ब्रह्मचारी म्हणजे बकरीच्या गळ्यातील स्तनासारखे (अजागलस्तन) निरर्थक असतात. त्यांच्यासारखेच संन्यासीही गल्लोगल्ली भटकताना दिसतात. ते विद्याविहीन असतात. केवळ दंड व कमंडलू घेऊन भिक्षा मागत फिरतात. वैदिक धर्माच्या उन्नतीसाठी ते काहीही करीत नाहीत. लहान वयातच ते संन्यास घेतात आणि विद्याभ्यास सोडून देतात. असे ब्रह्मचारी व संन्यासी तीर्थयात्रा करतात व पाषाणादिकांच्या मूर्तीचे दर्शन व पूजन करीत फिरतात. त्यांच्याजवळ ज्ञान असले तरी ते इतरांना न देता मौन धारण करतात. एकांत ठिकाणी यथेष्ट खाऊन-पिऊन झोपा काढतात. आणि इतरांची ईर्ष्या व द्वेष यांच्या आहारी जाऊन त्यांची निंदानालस्ती करण्यात वेळ घालवितात. भगवी वस्त्रे परिधान केल्याने व दंड ग्रहण केल्यानेच स्वत:ला कृतकृत्य समजतात. आणि आपले जीवन सर्वोत्कृष्ट आहे असे समजून कोणतेही चांगले काम करीत नाहीत. असले संन्यासी या जगात व्यर्थ जगत असतात. अर्थात त्यांच्यापैकी जे कोणी जगाच्या कल्याणाची कामे करतात. ते चांगले असतात.

**(प्रश्न)** गिरी, पुरी, भारती वगैरे पंथांचे लोक तर चांगले आहेत ना ? कारण ते गटागटांनी फिरत असतात. शेकडो साधूंना आनंदी करतात; आणि सर्वत्र अद्वैत मताचा उपदेश करतात. थोडेफार अध्ययन-अध्यापनही करतात. त्यामुळे ते चांगले असावेत असे वाटते.

**(उत्तर)** गिरी, पुरी वगैरे दहा नावे सनातन नाहीत,कल्पित केली आहेत. ते केवळ चांगले-चुंगले खायला मिळावे म्हणून आपले समुदाय (टोळकी) बनवितात. पुष्कळसे साधू केवळ जेवण्यासाठीच या लोकांच्या टोळ्यांबरोबर राहतात. ते लोक ढोंगीही आहेत. कारण ते आपल्यापैकी एखाद्याला महंत बनवितात. संध्याकाळी त्यांच्यातला प्रमुख महंत गादीवर बसतो. त्यावेळी सर्व ब्राह्मण व साधू उभे राहतात आणि हातात फुले घेऊन पुढील श्लोक म्हणतात :

**'नारायणं पद्मभवं वसिष्ठं शक्तिं च तत्पुत्रपराशरं च। व्यासं शुकं गौडपदं महान्तम्॥'** (या श्लोकात नारायण, पद्मभव, वसिष्ठ, शक्ती त्याचा पुत्र पराशर, व्यास, शुक्र आणि महान गौडपद यांची नावे आहेत. यांना नमस्कार असो.)

आणि 'हरहर' ची गर्जना करीत त्या महंतावर पुष्पवृष्टी करून त्याला साष्टांग नमस्कार घालतात. जो

कोणी असे करू इच्छित नाही त्याला त्या टोळीत राहणे अशक्य होऊन जाते. हे सारे ढोंग जगाला दाखविण्यासाठी ते करतात. ते दृश्य पाहून लोकांच्या मनावर त्या महंताचा मोठेपणा ठसावा आणि त्यांनी भरपूर धनदौलत आपल्याला द्यावी, हा हेतू त्यामागे असतो. कित्येक मठपती लग्न करून गृहस्थ बनतात. परंतु आव मात्र संन्साची असल्याचा आणतात. ते संन्याशाचे कोणतेही कर्तव्य पार पाडीत नाहीत. संन्याशाची कर्तव्यकर्मे कोणती आहेत याची चर्चा आम्ही पाचव्या समुल्लासात केली आहे. ती कर्तव्ये न करता हे लोक आपला वेळ वाया घालवितात. कोणी चांगला उपदेश केला तर त्यालाही ते विरोध करतात. यांच्यातील बहुतांश लोक भस्म व रुद्राक्ष धारण करणारे असतात. परंतु कोणी-कोणी शैव संप्रदायाचा अभिमान बाळगणारेही असतात. आणि जेव्हा शास्त्रार्थ करतात तेव्हा ते आपल्या म्हणजे शंकराचार्यांच्या मताचे समर्थन करतात. आणि चक्रांकित वगैरे मतांचे खंडन करतात. ते कधीही वैदिक धर्माचे मंडन व पाखंड मताचे खंडन करीत नाहीत.

हे संन्यासी लोक असे समजतात की, 'खंडन-मंडनाशी काय कर्तव्य ? आम्ही तर महात्मे आहोत.' असले हे लोक जगाच्या दृष्टीने भाररूप आहेत. असल्या लोकांमुळेच वेदमार्ग विरोधी, वाममार्गादी संप्रदायी, ख्रिस्ती, मुसलमान, जैन वगैरे लोकांचे फावले; आणि आजही त्यांची संख्या वाढतच आहे. इकडे वैदिक धर्माला उतरती कळा लागलेली दिसते. तरीही त्यांचे डोळे उघडत नाहीत. कसे उघडणार ? त्यांच्या मनात समाजहिताची बुद्धी आणि स्वत:ची कर्तव्ये पार पाडण्याचा उत्साह असता तर त्यांना आपली अवनती दिसली असती. परंतु हे लोक आपली स्वत:ची प्रतिष्ठा आणि खाण्यापिण्याची चैन यापुढे इतर कशालाच महत्त्व देत नाहीत; आणि लोकांच्या टिकेला घाबरतात. संन्याशांनी लोकैषणा-प्रसिद्धीची हाव, वित्तैषणा-संपत्तीचा मोह व पुत्रैषणा-पुत्रप्राप्तीची अभिलाषा किंवा शिष्यांवर पुत्रांप्रमाणे मोहित होणे या तीन एषणांचा-इच्छांचा त्याग करावयाचा असतो. जोपर्यंत या एषणा सुटत नाहीत तोपर्यंत त्या संन्यासाला काय अर्थ ? म्हणून पक्षपातरहित बनून वेदमार्गाच्या उपदेशाने जगाचे कल्याण करण्यासाठी अहर्निश झटत राहणे हे संन्याशाचे मुख्य कर्तव्य आहे. जोपर्यंत संन्यासी लोक आपल्या आश्रमाची कर्तव्ये पार पाडीत नाहीत. तोपर्यंत त्यांनी स्वत:ला संन्यासी म्हणवून घेणे निरर्थक आहे. गृहस्थाश्रमी लोक आपला व्यवहार व स्वार्थ साधण्यासाठी खूप परिश्रम करतात. त्याहून अधिक परिश्रम लोकहित साधण्यासाठी संन्यासी करतील तरच सर्व आश्रमांची उन्नती होईल.

**पाहा ! तुमच्या समोर पाखंडी मते वाढत चालली आहेत. लोक ख्रिस्ती व मुसलमानदेखील होत आहेत. पण तुम्हाला आपल्या घराचे रक्षण करता येत नाही आणि इतरांना आपल्यात सामील करून घेणे शक्य होत नाही. तुमच्या मनात प्रबळ इच्छा असेल तरच तुम्ही या गोष्टी करू शकाल.** जोपर्यंत वर्तमानकाळी व भविष्यकाळी संन्यासी लोक उन्नतिशील बनणार नाहीत तोपर्यंत आर्यावर्त्तातील व इतर देशांतील मानवांचे खरे कल्याण होणार नाही. वेदादी सत्य शास्त्रांचे अध्ययन-अध्यापन, ब्रह्मचर्यादी आश्रमांचे यथावत् अनुष्ठान व सत्योपदेश यांच्यामुळे माणसाची प्रगती होत असते. या गोष्टी अमलात आणल्या जात असतील तरच कोणत्याही देशाची उन्नती होते.

लक्षात ठेवा ! बुवाबाजी, मूर्तिपूजा वगैरेसारखे अनेक पाखंड तुमच्या डोळ्यासमोर घडत आहेत. उदाहरणार्थ, एखादा धंदेवाईक वृत्तीचा साधू स्वत: सिद्ध पुरुष असल्याचे जाहीर करतो. आणि निपुत्रिकांना

मुले होतील अशी किमया आपल्याजवळ असल्याचे सांगतो. तेव्हा अनेक स्त्रिया त्याच्याकडे जातात आणि हात जोडून पुत्र प्राप्तीसाठी प्रार्थना करतात. मग ते बाबाजी सर्वांना मुलगा होईल असा आशीर्वाद देतात. त्यांच्यापैकी जिला पुत्र होतो ती असे समजते की बुवाच्या आशीर्वादाने तो झाला आहे. तिला जेव्हा कोणी विचारते की, ''बाई गं ! डुकरीण, गाढवीण, कुत्री, कोंबडी वगैरे प्राण्यांना कोणत्या बुवाच्या आशीर्वादाने पिले होतात ?'' तेव्हा ती काही उत्तर देऊ शकत नाही. जर कोणी असे म्हणत असेल की मी मुलाला जिवंत ठेवू शकतो, तर तो स्वत:च का मरतो ?

अनेक लबाड लोक असे काही भ्रमाचे जाळे पसरवितात की मोठेमोठे बुद्धिमान लोकही त्याला फसतात. जसे धनसारीचे ठग. हे लोक पाचसात जणांचे टोळके बनवून दूरदूरच्या प्रदेशात जातात. त्यांच्यापैकी जो कोणी देखणा व रुबाबदार असतो त्याला ते सिद्ध पुरुष बनवितात. आणि ज्या गावात किंवा शहरात श्रीमंत लोक राहत असतील त्याच्या जवळच्या जंगलात त्या सिद्ध पुरुषाला बसवितात. मग ते साधक गावात जाऊन, काही माहीत नसल्याचा आव आणून भेटेल त्यांना विचारतात, ''असा असा महात्मा तुम्ही कोठे पाहिला आहे काय ?'' यावर लोक त्यांना विचारतात, ''असा महात्मा कोण आहे ? कसा आहे ?''

मग ते साधक साथीदार त्यांना विचारतात, ''तो फार मोठा सिद्ध पुरुष आहे. तुमच्या मनात काय आहे ते तो सांगतो. तो जे बोलतो ते घडते. मोठा योगीराज आहे. त्याच्या दर्शनासाठी आम्ही आपली घरेदारे सोडून त्याला शोधीत फिरत आहोत. आम्हाला कोणीतरी सांगितले की ते महात्मा याच बाजूला आले आहेत.''

त्यांचे बोलणे ऐकून गावातले लोक त्यांना म्हणतात, ''ते महात्मा तुम्हाला भेटले तर आम्हालाही सांगा. आम्ही त्यांचे दर्शन करू आणि मनातल्या गोष्टी त्यांना विचारू.''

अशा प्रकारे ते दिवसभर त्या गावात फिरतात आणि भेटणाऱ्या प्रत्येक माणसाला त्या सिद्ध पुरुषाची माहिती सांगतात. रात्री सगळे सिद्ध साधक एकत्र जमतात; खातात-पितात आणि झोपतात. पुन: सकाळी उठून गावात जातात आणि लोकांना त्या सिद्ध पुरुषाचे माहात्म्य समजाऊन सांगतात. हा क्रम तीन-चार दिवस चालविल्यानंतर चारही साधक एकेका धनाढ्याला गाठून सांगतात की, ''ते महात्मा सिद्ध पुरुष आम्हाला भेटले. तुम्हाला त्यांचे दर्शन घ्यायचे असेल तर आमच्या बरोबर चला.'' जेव्हा ते जायला तयार होतात तेव्हा साधक त्यांना विचारतात, ''तुम्ही महाराजांना काय विचारू इच्छिता ? आम्हाला सांगा.'' त्याप्रमाणे ते लोक त्यांना सांगतात. कोणाला मुलगा हवा असतो तर कोणाला संपत्ती. कोणाला आपला रोग बरा व्हावा असे वाटते तर कोणाला शत्रूवर विजय मिळवायचा असतो. त्यांना ते साधक घेऊन जातात. सिद्ध साधकांनी आपसात पूर्वी ठरविल्याप्रमाणे ज्याला द्रव्याची अभिलाषा असते त्याला उजव्या बाजूला, ज्याला मुलगा हवा असेल त्याला समोर, ज्याला आजार जावा असे वाटत असेल त्याला डावीकडे आणि ज्याला शत्रूवर जय मिळवायचा असतो त्याला मागील बाजूने आणून पुढे आणलेल्या लोकांमध्ये बसवितात. हे लोक जेव्हा सिद्ध पुरुषाला नमस्कार करतात तेव्हा तो आपल्या सिद्धपणाच्या घमेंडीत जोरात ओरडून म्हणतो, ''आमच्याकडे मुलगा मागायला तू आला आहेस. अरे, आमच्याजवळ काय मुले भरून ठेवली आहेत ?'' त्याचप्रमाणे धन मागायला आलेल्या आणसाला उद्देशून तो म्हणतो, ''तू द्रव्य मिळविण्याची इच्छा बाळगून इथे आला आहेस,

इथे काय पैशाच्या थैल्या भरून ठेवल्या आहेत ? आम्हा फकिरांजवळ धन कोठून असणार ?'' रोगनिवारणासाठी आलेल्या इसमाला तो म्हणतो, ''तू रोग मुक्त होण्याची इच्छा मनात बाळगून आला आहेस, आम्ही काय वैद्य आहोत ? जा, एखाद्या वैद्याला जाऊन भेट.'' मात्र आलेल्या माणसाचा बाप आजारी असेल तर त्याला घेऊन आलेला साधक अंगठा दाखवितो, आई आजारी असल्यास तर्जनी (अंगठ्याजवळचे बोट), भाऊ आजारी असल्यास मधले बोट, पत्नी आजारी असल्यास करंगळीजवळचे बोट (अनामिका) आणि मुलगी आजारी असल्यास तो करंगळी दाखवून खूण करतो. ती खूण ओळखून सिद्ध सांगतो की, ''तुझा बाप, भाऊ, आई, पत्नी किंवा मुलगी आजारी आहे.'' त्याचे ते अंतर्ज्ञान पाहून ते लोक थक्क होऊन जातात. मग साधक त्यांना म्हणतात, ''बघा ! जसे आम्ही सांगितले होते तसे हे महाराज आहेत की नाहीत ?'' यावर ते गृहस्थ म्हणतात, ''होय, तुम्ही जसे सांगितले होते तसेच हे आहेत. तुमचे आमच्यावर फार मोठे उपकार आहेत. अशा महात्म्यांचे दर्शन झाले, हे आमचे मोठे भाग्य. त्यांच्या दर्शनाने आम्ही कृतार्थ झालो.''

तेव्हा साधक म्हणतो, ''लोकहो ऐका ! हे महात्मा मनोगामी आहेत. ते तुमच्या मनातील सर्वकाही जाणतात. हे येथे फार दिवस राहणार नाहीत. म्हणून त्यांचा आशीर्वाद मिळविण्यासाठी आपापल्या कुवतीप्रमाणे तुम्ही तनमनधनाने यांची सेवा करा. कारण सेवा केली की मेवा मिळतो. ते ज्याच्यावर प्रसन्न होतील त्याला काय वर देतील ते सांगता येणार नाही. म्हटलेच आहे की, संतांची गती अपार आहे.'' सिद्धाचे माहात्म्य वर्णन करणारे हे उद्गार ऐकून आलेले लोक खूष होऊन त्यांची स्तुती करीत घरी जातात. साधकही त्यांच्याबरोबर जातात. वाटेत कोणी आपले बिंग फोडू नये यासाठी तेही खबरदारी घेतात. त्या धनाढ्यांचा कोणी मित्र भेटल्यास त्याच्याजवळ ते आपल्या सिद्ध पुरुषाची तोंड भरून स्तुती करतात. अशा प्रकारे जे जे लोक साधकांना भेटतात ते त्यांची हकीकत इतरांना सांगतात. लौकरच गावभर ही गोष्ट वाऱ्यासारखी पसरते की अमुक ठिकाणी एक फार मोठे सिद्धपुरुष आले आहेत. मग लोक एकमेकांना सांगतात की, ''चला, आपण त्या साधू महाराजांकडे जाऊ.'' अशा प्रकारे जणू मोठी जत्राच तेथे भरते. जेव्हा फार मोठ्या संख्येने लोक सिद्धपुरुषाकडे जाऊन त्यांना म्हणतात की, ''महाराज, आमच्या मनातली गोष्ट सांगा.'' तेव्हा सगळी व्यवस्था बिघडते. मग तो सिद्ध सर्व लोकांना सांगतो, ''आम्हाला त्रास देऊ नका.'' आणि तो मौन धारण करतो. त्याबरोबर ते साधकही लोकांना सांगू लागतात की, ''महाराजांना तुम्ही फार त्रास द्याल तर ते येथून निघून जातील.'' मग एखादा खूप श्रीमंत माणूस एखाद्या साधकाला बाजूला नेऊन सांगतो, ''आमच्या मनात काय आहे ते महाराज सांगतील तर ते खरे सिद्ध पुरुष आहेत हे आम्ही मान्य करू.'' साधक त्याला विचारतो, ''तुमच्या मनात काय आहे ?'' तो धनाढ्य माणूस त्याला आपल्या मनातील गोष्ट सांगतो. त्यानंतर तो साधक त्याला सिद्ध पुरुषाकडे घेऊन जातो व पूर्व संकेताप्रमाणे त्याला बसवितो. सिद्ध पुरुष चटकन त्याच्या मनातली गोष्ट सांगतो. सभोवताली जमलेले सारे लोक त्यांचे बोलणे ऐकतात, आणि सगळे जण म्हणू लागतात, ''अहाहा ! खरोखरीच हे फार थोर सिद्धपुरुष आहेत.'' मग कोणी मिठाई, कोणी पैसे, कोणी रुपये, कोणी मोहरा, कोणी कापड तर कोणी शिधा आणून महाराजांना अर्पण करतात. अशा प्रकारे जोपर्यंत लोकांकडून भेटी येत राहतात तोपर्यंत हे लोक त्यांना लुबाडत राहतात. अधून-मधून भरपूर श्रीमंत परंतु फारशी अक्कल नसलेले एक दोन लोक त्यांना भेटतात. सिद्ध पुरुष त्यांना मुलगा होण्याचा आशीर्वाद देतो किंवा प्रसाद म्हणून

मूठभर राख देतो आणि त्यांच्याकडून हजारो रुपये उकळून त्यांना सांगतो की, ''तुमची भक्ती खरी असेल तर तुम्हाला नक्कीच मुलगा होईल.'' अशाप्रकारचे अनेक ठग लोकांना लुटत असतात. विद्वान लोकच अशांची पारख करू शकतात. सामान्य लोकांना त्यांची लबाडी कळत नाही.

म्हणून वेदादी विद्यांचे अध्ययन व सत्संग करणे आवश्यक असते. त्यामुळे कोणीही ठग अशा ज्ञानी व्यक्तीला फसवू शकत नाही; आणि ती व्यक्ती इतरांनाही धोक्यापासून वाचवू शकते. कारण विद्या हा माणसाचा तिसरा डोळाच आहे. विद्या आणि शिक्षण यांच्याशिवाय ज्ञान होत नाही. जे लहानपणापासून उत्तम शिक्षण घेतात तेच माणूस आणि विद्वान बनतात. ज्यांना वाईट संगत लागते ते दुष्ट, पापी, महामूर्ख बनतात. त्यांना फार दुःख भोगावे लागते म्हणूनच ज्ञान ही सर्वश्रेष्ठ गोष्ट आहे असे म्हटले जाते. जो कोणी जाणतो तोच मानतो.

**न वेत्ति यो यस्य गुणप्रकर्षं स तस्य निन्दां सततं करोति।**

**यथा किराती करिकुम्भजाता, मुक्ताः परित्यज्य बिभर्ति गुञ्जाः॥** वृद्ध चाणक्य अ. ११ श्लो. १२

हा कोण्या कवीचा श्लोक आहे. जो ज्याचा गुण जाणत नाही, तो त्याची निरंतर निंदा करतो. उदाहरणार्थ, जंगली भिल्ल हत्तीच्या गंडस्थळातील मोती टाकून देऊन गुंजांच्या माळा गळ्यात घालून फिरतो. त्याचप्रमाणे जो पुरुष विद्वान, ज्ञानी, धार्मिक, सत्पुरुषांचा सत्संग करणारा, योगी, पुरुषार्थी, जितेंद्रिय, सुशील असतो तोच धर्म, अर्थ, काम व मोक्ष प्राप्त करून या जन्मी व नंतरच्या जन्मात सदा आनंदात राहतो.

आर्यावर्तात राहणाऱ्या लोकांचे पंथ व संप्रदाय यांविषयी हे सारे थोडक्यात लिहिले आहे. यानंतर आर्यराजांचा जो थोडासा इतिहास मिळालाआहे तो सर्व सज्जनांच्या माहितीसाठी आम्ही खाली देत आहोत.

आता आर्यवर्त्तातील श्रीमान महाराज युधिष्ठिर यांच्यापासून महाराज यशपाल यांच्यापर्यंत जे राजवंश होऊन गेले त्यांचा इतिहास आम्ही लिहितो. श्रीमान् महाराज स्वायंभुव मनू पासून महाराजा युधिष्ठिरांपर्यंतचा इतिहास महाभारतादी ग्रंथामध्ये लिहिलेलाच आहे. त्यामुळे सज्जनांना येथील काही इतिहास माहीत असेल. आम्ही खाली जी माहिती देत आहोत ती 'हरिश्चन्द्रचन्द्रिका' व 'मोहनचन्द्रिका' या पाक्षिकांमधून अनुवादित करून घेतलेली आहे. ही पाक्षिके राजपुतान्यातील मेवाड भागातील उदयपूर संस्थानाची राजधानी चित्तौडगढजवळ नाथद्वारा या क्षेत्रस्थानाहून प्रकाशित होत होती. आमचे आर्यसज्जन अशाच प्रकारे इतिहास आणि ज्ञानग्रंथ यांचे संशोधन करून ते प्रसिद्ध करतील तर देशाचा फार मोठा लाभ होईल. या पाक्षिकांच्या संपादकांना त्यांच्या एका मित्राकडून विक्रम संवत् १७८२ (इ.स. १७२५) साली लिहिल्या गेलेल्या एका प्राचीन ग्रंथाचे हस्तलिखित मिळाले होते. त्या ग्रंथाचा सारांश संवत् १९३९ (इ.स. १८८२) यावर्षी सदर पाक्षिकाच्या मार्गशीर्ष शुक्लपक्षातील १९ व २० या दोन क्रमांकाच्या अंकात छापलेला आहे. तोच आम्ही खाली देत आहोत :-

## आर्यावर्तीय राजांची वंशावळ

इंद्रप्रस्थामध्ये आर्य लोकांनी श्रीमन्महाराज यशपाल यांच्यापर्यंत राज्य केले. त्यांमध्ये श्रीमन्महाराज युधिष्ठिर यांच्यापासून महाराज यशपाल यांच्यापर्यंत सुमारे १२४ पिढ्यांनी म्हणजे राजांनी ४१५७ वर्षे, ९ महिने, १४ दिवस एवढा काळ राज्य केले. श्रीमन्महाराज युधिष्ठिराच्या वंशात ३० पिढ्या होऊन गेल्या. त्यांनी १७७० वर्षे, ११ महिने व १० दिवस राज्य केलेल त्याचा तपशील पुढील प्रमाणे आहे.

तपशील :-

| आर्यराजा | | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| १) | राजा युधिष्ठिर | ३६ | ८ | २५ |
| २) | राजा परीक्षित | ६० | ० | ० |
| ३) | राजा जनमेजय | ८४ | ७ | २३ |
| ४) | राजा अश्वमेघ | ८२ | ८ | २२ |
| ५) | द्वितीयराम | ८८ | २ | ८ |
| ६) | छत्रमल | ८१ | ११ | २७ |
| ७) | चित्ररथ | ७५ | ३ | १८ |
| ८) | दुष्टशैल्य | ७५ | १० | २४ |
| ९) | राजा उग्रसेन | ७८ | ७ | २१ |
| १०) | राजा शूरसेन | ७८ | ७ | २१ |
| ११) | भुवनपति | ६९ | ९ | ५५ |
| १२) | रणजीत | ६५ | १० | ४ |
| १३) | ऋक्षक | ६४ | ७ | ४ |
| १४) | सुखदेव | ६२ | ० | २४ |
| १५) | नरहरिदेव | ५१ | १० | २ |
| १६) | सुचिरथ | ४२ | ११ | २ |
| १७) | शूरसेन (दुसरा) | ५८ | १० | ८ |
| १८) | पर्वतसेन | ५५ | ८ | १० |
| १९) | मेधावी | ५२ | १० | १० |
| २०) | सोनचीर | ५० | ८ | २१ |
| २१) | भीमदेव | ४७ | ९ | २० |
| २२) | नृहरिदेव | ४५ | ११ | २३ |
| २३) | पूर्णमल | ४४ | ८ | ७ |
| २४) | करदवी | ४४ | १० | ८ |
| २५) | अलंमिक | ५० | ११ | ८ |
| २६) | उदयपाल | ३८ | ९ | ० |
| २७) | दुवनमल | ४० | १० | २६ |
| २८) | दमात | ३२ | ० | ० |
| २९) | भीमपाल | ५८ | ५ | ८ |
| ३०) | क्षेमक | ४८ | ११ | २१ |

राजा क्षेमकाचा प्रधान विश्रवा याने क्षेमक राजाला मारून त्याची गादी बळकावली. त्याच्या वंशातील १४ पिढ्यांनी ५०० वर्षे, ३ महिने व १७ दिवस राज्य केले. त्याचा तपशील

| आर्यराजा | | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| १) | विश्रवा | १७ | ३ | २९ |
| २) | पुरसेनी | ४२ | ८ | २१ |
| ३) | वीरसेनी | ५२ | १० | ७ |
| ४) | अनङ्गशायी | ४७ | ८ | २३ |
| ५) | हरिजित | ३५ | ९ | १७ |
| ६) | परमसेनी | ४४ | २ | २३ |
| ७) | सुखपाताल | ३० | २ | २१ |
| ८) | कद्रुत | ४२ | ९ | ४ |
| ९) | सज्ज | ३२ | २ | १४ |
| १०) | अमरचूड | २७ | ३ | १६ |
| ११) | अमीपाल | २२ | ११ | २५ |
| १२) | दशरथ | २५ | ४ | १२ |
| १३) | वीरसाल | ३१ | ८ | ११ |
| १४) | वीरसालसेन | ४० | ० | १४ |

राजा वीरसालसेनचा पंतप्रधान वीरमहा याने राजाला ठार मारुन तो राज्यावर बसला. त्याच्या वंशातील १६ पिढ्यांनी ४४५ वर्ष, ५ महिने व ३ दिवस राज्य केले. त्याचा तपशील :-

| आर्यराजा | | वर्ष | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| १) | राजा वीरमहा | ३५ | १० | ८ |
| २) | अजितसिंह | २७ | ७ | १९ |
| ३) | सर्वदत्त | २८ | ३ | १० |
| ४) | भुवनपति | १५ | ४ | १० |
| ५) | वीरसेन (पहिला) | २१ | २ | १३ |
| ६) | महीपाल | ४० | ८ | ७ |
| ७) | शत्रुपाल | २६ | ४ | ३ |
| ८) | संघराज | १७ | २ | १० |
| ९) | तेजपाल | २८ | ११ | १० |
| १०) | माणिकचन्द | ३७ | ७ | २१ |
| ११) | कामसेनी | ४२ | ५ | १० |
| १२) | शत्रूमर्दन | ८ | ११ | १३ |
| १३) | जीवनलोक | २८ | ९ | १७ |
| १४) | हरिराव | २६ | १० | २९ |
| १५) | वीरसेन (दुसरा) | ३५ | २ | २० |
| १६) | आदित्यकेतु | २३ | ११ | १३ |

मगध देशाचा राजा आदित्यकेतु याला प्रयागचा राजा धन्धर याने ठार मारले व तो गादीवर बसला. त्याच्या वंशातील ९ पिढ्यांनी ३७४ वर्षे, ११ महिने, २६ दिवस राज्य केले. त्याचा तपशील :

| | आर्यराजा | वर्ष | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| १) | राजा धन्धर | ४२ | ७ | २४ |
| २) | महर्षी | ४१ | २ | २९ |
| ३) | सनरच्ची | ५० | १० | १९ |
| ४) | महायुद्ध | ३० | ३ | ८ |
| ५) | दुरनाथ | २८ | ५ | २५ |
| ६) | जीवनराज | ४५ | २ | ५ |
| ७) | रुद्रसेन | ४७ | ४ | २८ |
| ८) | आरीलक | ५२ | १० | ८ |
| ९) | राजपाल | ३६ | ० | ० |

राजा राजपाल याला सामंत महानपालाने ठार मारून त्याचे राज्य बळकावले. त्याने १पीढी १४ वर्षे राज्य केले. अवंतिकेचा (उज्जैनचा) राजा विक्रमादित्य याने महानपालाला लढाईत मारून त्याचे राज्य घेतले. त्याने ९३ वर्षे राज्य केले. राजा विक्रमादित्याला पैठणच्या शालि-वाहनाचा उमराव समुद्रपाल योगी याने ठार मारून तो राज्यावर आला. त्याच्या १६ पिढ्यांनी ३७२ वर्षे, ४ महिने, २७ दिवस राज्य केले. त्याचा तपशील :-

| | राजा | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| १) | समुद्रपाल | ५४ | २ | २० |
| २) | चन्द्रपाल | ३६ | ५ | ४ |
| ३) | सहायपाल | ११ | ४ | ११ |
| ४) | देवपाल | २७ | १ | २८ |
| ५) | नरसिंहपाल | १८ | ० | २० |
| ६) | सामपाल | २७ | १ | १७ |
| ७) | रघुपाल | २२ | ३ | २५ |
| ८) | गोविन्दपाल | २७ | १ | १७ |
| ९) | अमृतपाल | ३६ | १० | १३ |
| १०) | बलीपाल | १२ | ५ | २७ |
| ११) | महीपाल | १३ | ८ | ४ |
| १२) | हरिपाल | १४ | ८ | ४ |
| १३) | सीसपाल* | ११ | १० | १३ |
| १४) | मदनपाल | १७ | १० | १९ |
| १५) | कर्मपाल | १६ | २ | २ |
| १६) | विक्रमपाल | २४ | ११ | १३ |

राजा विक्रमपालने पश्चिम दिशेचा राजा मलुखचंद बोहरा याच्यावर चढाई करून त्याच्याशी मैदानात लढाई केली. या लढाईत विक्रमपाल मारला गेला. त्यानंतर मलुखचंदाने इंद्रप्रस्थाचे राज्य जिंकून घेतले. त्याच्या १० पिढ्यांनी १९१ वर्षे, १ महिना, १६ दिवस राज्य केले. त्याचा तपशील :-

| | आर्यराजा | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| १) | मलुखचंद | ५४ | २ | १० |
| २) | विक्रमचंद | १२ | ७ | १२ |
| ३) | अमीनचंद (+) | १० | ० | ५ |
| ४) | रामचंद | १३ | ११ | ८ |
| ५) | हरिचंद | १४ | ९ | २४ |
| ६) | कल्याणचंद | १० | ५ | ४ |
| ७) | भीमचंद | १६ | २ | ९ |
| ८) | लोवचंद | २६ | ३ | २२ |
| ९) | गोविंदचंद | ३१ | ७ | १२ |
| १०) | राणी पद्मावती* | १ | ० | ० |

* काही इतिहासात याचे नाव भीमपाल असेही लिहिले आहे.

+ त्याचे नाव कोठे कोठे मानकचंद असेहि लिहिलेले आढळते.

* ही पद्मावती गोविंदचंदाची राणी होती.

राणी पद्मावती मरण पावली. तिला मूलबाळ नव्हते. म्हणून सर्व मंत्र्यांनी आपसात विचार-विनिमय करून हरिप्रेम बैरागी याला गादीवर बसविले व ते त्याच्या नावाने राज्य करू लागले. हरिप्रेम बैराग्याच्या ४ पिढ्यांनी ५० वर्षे, २१ दिवस

राज्य केले. त्याचा तपशील :-

| आर्यराजा | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|
| १) हरिप्रेम | ७ | ५ | १६ |
| २) गोविंदप्रेम | २० | २ | ८ |
| ३) गोपालप्रेम | १५ | ७ | २८ |
| ४) महाबाहु | ६ | ८ | २९ |

राजा महाबाहु राज्य त्याग करून तपश्चर्या करण्यास वनात गेला. बंगालचा राजा आधीसेन याला ही बातमी कळताच तो इंद्रप्रस्थाला येऊन राज्य करू लागला. त्याच्या वंशातील बारा पिढ्यांनी १५१ वर्षे, ११ महिने व २ दिवस राज्य केले. त्याचा तपशील :-

| आर्यराजा | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|
| १) राजा आधीसेन | १८ | ५ | २१ |
| २) विलावलसेन | १२ | ४ | २ |
| ३) केशवसेन | १५ | ७ | १२ |
| ४) माधवसेन | १२ | ४ | २ |
| ५) मयूरसेन | २० | ११ | २७ |
| ६) भीमसेन | ५ | १० | ९ |
| ७) कल्याणसेन | ४ | ८ | २१ |
| ८) हरिसेन | १२ | ० | २५ |
| ९) क्षेमसेन | ८ | ११ | १५ |
| १०) नारायणसेन | २ | २ | २९ |
| ११) लक्ष्मीसेन | २६ | १० | ० |
| १२) दामोदर सेन | ११ | ५ | १९ |

राजा दामोदरसेन याने आपल्या उमरावाला फार त्रास दिला. त्यामुळे राजाचा उमराव दीपसिंह याने बंड पुकारले. त्याने राजाच्या सैन्याला आपल्याकडे वळवून घेतले. नंतर झालेल्या लढाईत राजा मारला गेला; आणि दीपसिंह स्वत: राजा बनला. त्याच्या वंशातील ६ पिढ्यांनी १०७ वर्षे, ६ महिने व २२ दिवस राज्य केले, त्याचा तपशील :-

| राजा आर्य | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|
| १) दीपसिंह | १७ | १ | २६ |
| २) राजसिंह | १४ | ५ | ० |
| ३) रणसिंह | ९ | ८ | ११ |
| ४) नरसिंह | ४५ | ० | १५ |
| ५) हरिसिंह | १३ | २ | २९ |
| ६) जीवनसिंह | ८ | ० | १ |

राजा जीवनसिंहाने काही कारणाने आपले सर्व सैन्य उत्तरेकडे पाठविले होते. ती बातमी वैराटचा राजा पृथ्वीराज चव्हाण याला समजताच त्याने जीवनसिंहावर चढाई केली. त्या लढाईत जीवनसिंह मारला गेला; आणि पृथ्वीराज इंद्रप्रस्थाचा राजा बनला त्याच्या ५ पिढ्यांनी ८६ वर्षे व २० दिवस राज्य केले. त्याचा तपशील :-

| आर्यराजा | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|
| १) पृथ्वीराज | १२ | २ | १९ |
| २) अभयपाल | १४ | ५ | १७ |
| ३) दुर्जनपाल | ११ | ४ | १४ |
| ४) उदयपाल | ११ | ७ | ३ |
| ५) यशपाल | ३६ | ४ | २७ |

राजा यशपाल याच्यावर गझनीचा सुलतान शहाबुद्दीन घोरी याने स्वारी केली आणि संवत् १२४९ (इ.स. ११९२) साली राजा यशपालला पकडून प्रयागच्या किल्ल्यात कैद करून ठेवले. त्यानंतर सुलतान शहाबुद्दीन इन्द्रप्रस्थावर म्हणजे दिल्लीवर राज्य करू लागला. त्याच्या ५३ पिढ्यांनी ७४५ वर्षे, १ महिना व १७ दिवस राज्य केले. त्याचा तपशील इतिहासाच्या अनेक पुस्तकांतून दिलेला असल्याने आम्ही येथे तो लिहिलेला नाही.

यानंतर बौद्ध व जैन या पंथाविषयी आम्ही लिहिणार आहोत.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे सुभाषाविभूषित आर्य्यावर्त्तीयमतखण्डनमण्डनविषय एकादशः समुल्लासः सम्पूर्णः ॥११॥**






# अनुभूमिका (२)

जेव्हा आर्यावर्त्तातील लोकांमध्ये सत्यासत्याचा यथायोग्य निर्णय करणाऱ्या वेदविद्येचा प्रसार बंद झाला आणि अविद्येचा पगडा बसून मतमतांतरे उत्पन्न झाली तेव्हा ज्ञानविरोधी जैन वगैरे मतांचा प्रचार सुरू झाला. वाल्मीकींचे रामायण व व्यासांचे महाभारत वगैरे प्राचीन ग्रंथांमध्ये जैनांचा नाममात्र देखील उल्लेख आढळत नाही. उलट जैनांच्या ग्रंथांमध्ये रामायण-महाभारतातील राम, कृष्ण वगैरे महापुरुषांच्या जीवन-गाथा विस्तारपूर्वक आलेल्या आहेत. यावरून असे सिद्ध होते की, हा जैन संप्रदाय पुष्कळच नंतरचा आहे. आपला पंथ फार प्राचीन आहे, असे जैन मंडळीचे म्हणणे आहे. तसे असते तर रामायण-महाभारतादी ग्रंथांमध्ये जैन मताचा उल्लेख अवश्य आला असता. तसा तो आलेला नसल्यामुळे जैन पंथ (मत) या ग्रंथांच्या निर्मितीनंतर उदयास आला असला पाहिजे हे उघड होते.

कोणी असे म्हणतील की, जैनांच्या ग्रंथातून कथा घेऊन रामायण-महाभारतादी ग्रंथांची रचना करण्यात आली असावी. त्यांना असे विचारले पाहिते की, रामायणादी ग्रंथांमध्ये तुमच्या ग्रंथांचा उल्लेखही का नाही ? उलट तुमच्या ग्रंथांमध्ये त्यांचे उल्लेख आहेत. हे कसे ? पित्याच्या जन्माला पुत्र हजर असतो काय ? मुळीच नाही. यावरून हेच सिद्ध होते की, जैन व बौद्ध हे संप्रदाय शैव, शाक्त इत्यादी संप्रदायांच्या नंतर उदयास आले.

आम्ही या बाराव्या समुल्लासामध्ये जैन पंथाविषयी जे काही लिहिले आहे, ते सर्व त्यांच्या ग्रंथांतील पुराव्यांनिशी लिहिले आहे. त्याबद्दल जैन बंधूंनी राग मानू नये. कारण त्यांच्या संप्रदायाविषयी आम्ही जे काही लिहिले आहे, ते केवळ सत्यासत्याचा निवाडा करण्यासाठी लिहिले आहे. त्यांना विरोध करावा किंवा त्यांचे नुकसान करावे, अशी आमची भूमिका मुळीच नाही. आमचे हे विवेचन जेव्हा जैन, बौद्ध अथवा इतर लोक वाचतील तेव्हा सर्वांना सत्यासत्याचा निर्णय घेण्याच्या दृष्टीने विचार करता येईल व लिखाणही करता येईल. त्यापासून त्यांना योग्य तो बोधही घेता येईल. जोपर्यंत वादी-प्रतिवादी बनून प्रेमाने वादविवाद किंवा लिखाण केले जात नाही तोपर्यंत सत्यासत्याचा निवाडा होऊ शकत नाही.

जेव्हा विद्वान लोकांमध्ये सत्यसासत्याचा निर्णय होत नाही तेव्हा अज्ञ जनांना महाअंध:कारात पडून फार दु:ख सहन करावे लागते. म्हणून सत्याचा जय व असत्याचा क्षय व्हावा यासाठी मैत्रीपूर्ण वादविवाद किंवा

लिखाण करणे हे मानवजातीचे मुख्य काम आहे. ते काम कोणी केले नाही तर मानवांची प्रगती कधीच होणार नाही.

तसेच बौद्ध व जैन संप्रदायासंबंधी आम्ही येथे जे विवेचन केले आहे त्यावरून बौद्ध व जैन यांच्या प्रमाणेच इतर पंथांच्या लोकांचाही अपूर्व लाभ होईल आणि त्यांना खूप बोध मिळेल. कारण जैन लोक आपले ग्रंथ इतर पंथांच्या लोकांना पाहायला, वाचायला अथवा लिहायला देत नाहीत. आम्ही स्वत: या बाबतीत खूप खटपट केली. आणि मुंबईच्या आर्य समाजाचे मंत्री सेठ सेवकलाल कृष्णदास यांनीही पुष्कळ धडपड केली. त्यामुळे आम्हाला जैनांचे ग्रंथ पहायला मिळाले. अलीकडेच काशी येथील जैन प्रभाकर यंत्रालय (छापखाना) या संस्थेतर्फे जैनपंथासंबंधी काही ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. आणि मुंबईतून 'प्रकरणरत्नाकर' नावाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्यामुळे सर्व लोकांना जैन पंथासंबंधी माहिती मिळविणे सुलभ झाले आहे.

आपल्या पंथाचे ग्रंथ फक्त आपल्यालाच वाचायला मिळावेत, इतरांच्या हाती ते पडू नयेत असे समजणाऱ्या विद्वानांना काय म्हणावे ? ते कसले विद्वान ? त्यांच्या या भूमिकेवरूनच लक्षात येते की, हे ग्रंथ रचणाऱ्यांना आधीपासूनच शंका वाटत असावी की, या ग्रंथांमध्ये ज्या असंभव गोष्टी आपण लिहिल्या आहेत त्या जेव्हा इतर पंथांचे लोक वाचतील तेव्हा ते त्यांचे खंडन करतील. त्या लोकांना बहुधा अशीही भीती वाटत असावी की, आपल्या पंथाचे लोक जेव्हा इतरांचे ग्रंथ वाचतील तेव्हा त्यांची आपल्या पंथावरची श्रद्धा उडून जाईल. म्हणून आपल्या पंथाच्या लोकांनी इतरांचे ग्रंथ वाचू नयेत असा निर्बंध त्यांनी घातला असावा ! ते कसेही असो, सांगावयाचे तात्पर्य एवढेच की, अनेक लोकांना आपल्यातील दोष दिसत नाहीत; परंतु इतरांचे दोष काढण्यात मात्र ते पटाईत असतात. हे योग्य नाही. माणसाने प्रथम आपले दोष पाहून ते काढून टाकावेत आणि मग इतरांचे दोष पहावेत व ते काढून टाकण्याच्या कामी त्यांना मदत करावी. आता या बौद्ध व जैन लोकांच्या संप्रदायांचा विषय आम्ही सर्व सज्जनांसमोर मांडतो. त्यांनी स्वत: विचार करून त्यासंबंधी निर्णय घ्यावा.

**किमधिकलेखेन बुद्धिमद्वर्य्येषु ॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






# बारावा समुल्लास
# नास्तिक पंथाची समीक्षा

## चार्वाक मत-समीक्षा

बृहस्पती नावाचा एक गृहस्थ होऊन गेला. तो वेद, ईश्वर व यज्ञादी उत्तम कर्मे यांपैकी काहीही मानीत नव्हता. त्याचे म्हणणे असे:-

**(प्रश्न) यावज्जीवं सुखं जीवेन्नास्ति मृत्योरगोचरः ।**
**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥** सर्वदर्शनसंग्रह, चा.द.पृ.२

कोणीही मनुष्यादी प्राणी मृत्यूला अगोचर नाही; म्हणजे मरण कोणालाही चुकत नाही. सर्वांनाच मरावे लागते. म्हणून जोपर्यंत शरीरात जीव आहे तोपर्यंत सुखाने राहावे. जर कोणी असे म्हणेल की, अधर्माचरणाने त्रास भोगावा लागतो आणि धर्माचा त्याग केल्यास पुढील जन्मी खूप दु:ख भोगावे लागते, तर त्याला चार्वाकाचे असे उत्तर आहे की, ''भोळ्या माणसा! मेल्यानंतर शरीराची राख होऊन जाते. खाणे, पिणे, मौजमजा करणारा (शरीर) तो काही पुन: या जगात येणार नाही. म्हणून जेवढे शक्य होईल तेवढे मजेत राहावे. इहलोकी नीतीने चालावे. ऐश्वर्य वाढवावे आणि त्याचा यथेष्ट उपभोग घ्यावा. हाच लोक खरा आहे. परलोक वगैरे काही नाही.''

पाहा! पृथ्वी, जल, अग्नी, वायू या चार भूतांच्या संयोगाने हे शरीर बनले आहे. त्यांच्या योगाने शरीरात चैतन्य उत्पन्न होते. ज्याप्रमाणे मादक पदार्थांच्या सेवनाने नशा उत्पन्न होते त्याचप्रमाणे शरीराच्या उत्पत्तीबरोबर जीव उत्पन्न होतो आणि शरीराच्या नाशाबरोबर स्वत: नष्ट होतो. मग पापपुण्याचे फळ कोणाला मिळणार ?

**तच्चैतन्यविशिष्टदेह एव आत्मा; देहातिरिक्त आत्मनि प्रमाणाभावात् ॥**

चार्वाक दर्शन पृ. ३

या शरीरामध्ये चारही भूतांच्या संयोगाने जीवात्मा उत्पन्न होऊन त्यांच्या वियोगाने तो नष्ट होतो. कारण मेल्यानंतर कोणताही जीव साकार रूपात प्रत्यक्ष दिसू शकत नाही. आम्ही फक्त प्रत्यक्ष प्रमाणच

मानतो. कारण प्रत्यक्ष नसेल तर अनुमानादी प्रमाणे टिकूच शकत नाहीत. म्हणून मुख्य प्रत्यक्षासमोर अनुमानादी प्रमाणे गौण असल्यामुळे आम्ही त्याचे ग्रहण करीत नाही. सुंदर स्त्रीच्या अलिंगनाने आनंद मिळविणे हे पुरुषार्थाचे फळ आहे.

**(उत्तर)** ही पृथ्वी आदी भूते जड (अचेतन) आहेत. त्यांतून चेतनाची उत्पत्ती कधीही होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे आता मातापित्यांच्या संयोगातून देहाची उत्पत्ती होते त्याचप्रमाणे आदिसृष्टीमध्ये मनुष्यादिकांच्या शरीराची आकृती सृष्टिकर्ता परमेश्वरावाचून निर्माण होऊ शकत नाही. मद (नशा) चढतो व नाहीसा होतो (उतरतो), त्याचप्रमाणे चेतनाची उत्पत्ती व नाश होत नाही. कारण मद हा चेतनाला होतो; जडाला (अचेतनाला) नव्हे. पदार्थ नष्ट म्हणजे अदृश्य होतात. परंतु अभाव कोणाचाच होत नाही. त्याचप्रमाणे जीव अदृश्य झाला की त्याचा अभाव झाला असे मानता कामा नये. जेव्हा जीवात्मा सदेह असतो तेव्हाच तो प्रकट असतो. जेव्हा तो शरीराला सोडून देतो तेव्हा हे शरीर मृत्यूला प्राप्त होत असल्यामुळे पूर्वीसारखे चेतनयुक्त होऊ शकत नाही. हीच गोष्ट बृहदारण्यकात सांगितली आहे:-

**नाहं मोहं ब्रवीमि अनुच्छित्तिधर्मायमात्मेति ।।** बृहदा. उप. प्रपा. ४। खं. ५। व. १४

याज्ञवल्क्य म्हणतात की, ''हे मैत्रेयी ! मी हे मोहाने बोलत नाही. परंतु आत्मा अविनाशी आहे. त्याच्या योगानेच शरीर हालचाल करीत असते. जेव्हा जीव शरीरापासून वेगळा होतो तेव्हा शरीरामध्ये कसलीही चेतना उरत नाही. जर देहापासून आत्मा वेगळा नसेल तर ज्याच्या संयोगाने चेतनता व वियोगाने जडता प्राप्त होते तो देहापासून वेगळा आहे, असे कसे म्हणता येईल? ज्याप्रमाणे डोळा सर्वांना पाहातो परंतु स्वतःला पाहू शकत नाही त्याचप्रमाणे प्रत्यक्षाचे ज्ञान प्राप्त करणारा जीव स्वतःला प्रत्यक्ष पाहू शकत नाही. जीव आपल्या डोळ्यांनी सर्व घटपटादी पदार्थ पाहतो त्याप्रमाणे तो आपल्या डोळ्यांना ज्ञानाने पाहातो. जो द्रष्टा आहे तो द्रष्टाच राहतो. तो केव्हाही दृश्य होत नाही. ज्याप्रमाणे आधारावाचून आधेय, कारणावाचून कार्य, अवयवीवाचून अवयव आणि कर्त्यावाचून कर्म राहू शकत नाही त्याप्रमाणे कर्त्यावाचून (पाहणाऱ्या वाचून) प्रत्यक्ष दर्शन कसे होऊ शकेल?''

सुंदर स्त्रीशी समागम करणे हेच पुरुषार्थाचे फळ आहे, असे तुम्ही मानीत असाल तर ते क्षणिक सुख असून त्यापासून नंतर दुःखही होते. तेही पुरुषार्थाचे फळ मानावे लागेल. स्वर्गातील निवासही अंतिमतः दुःखदायक ठरतो. यावर तुम्ही असे म्हणाल की, दुःख दूर करण्याच्या व सुख वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. याचा अर्थ असा की, ते मुक्तीचे सुख नव्हेच आणि म्हणून ते पुरुषार्थाचे फळ होऊ शकत नाही.

**(चार्वाक)** जे लोक दुःखाने युक्त असलेल्या सुखाचा त्याग करतात, ते मूर्ख आहेत. ज्याप्रमाणे धान्यार्थी माणूस धान्य ग्रहण करून कोंडा टाकून देतो त्याप्रमाणे जगामध्ये बुद्धिमंतांनी सुखाचे ग्रहण व दुःखाचा त्याग करावा. इहलोकी प्रत्यक्ष उपस्थित (निश्चित) असलेले सुख सोडून स्वर्गातील अनुपस्थित (अनिश्चित) सुखाची इच्छा बाळगून धूर्त लोकांनी सांगितलेली वेदोक्त अग्निहोत्रादी कर्मे, उपासना आणि ज्ञानकांडाचे अनुष्ठान जे

परलोक प्राप्तीसाठी करतात ते अज्ञानी होत. मुळात परलोकच नाही. तेव्हा त्याची आशा करणे हा मूर्खपणाच होय. कारण,

**अग्निहोत्रं त्रयो वेदास्त्रिदण्डं भस्मगुण्ठनम्।**
**बुद्धिपौरुषहीनानां जीविकेति बृहस्पतिः॥** चार्वाक दर्शन पृ. ५

चार्वाकमतप्रचारक बृहस्पती म्हणतो की, अग्निहोत्र, तीन वेद, तीन दण्ड आणि भस्म फासणे या गोष्टीद्वारे बुद्धिहीन व पुरुषार्थ-रहित लोकांनी पोटापाण्याचा धंदा बनविला आहे. परंतु काटा बोचणे व तदितर कारणांनी उत्पन्न होणाऱ्या दु:खाचे नाव नरक असून लोकसिद्ध राजा हाच परमेश्वर आहे व शरीराचा नाश होणे हाच मोक्ष होय. अन्य काही नाही.

**(उत्तर)** विषयसुखालाच पुरुषार्थाचे फळ मानून विषयदु:ख निवारणामध्येच कृतकृत्यता व स्वर्ग मानणे हा मूर्खपणा आहे. अग्निहोत्रादी यज्ञांनी वायु, वृष्टि, पाणी यांची शुद्धी होऊन आरोग्य प्राप्त होते. त्यायोगे धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांची सिद्धी होते. हे सारे न जाणता वेद, ईश्वर व वेदोक्त धर्म यांची निंदा करणे हे लबाड लोकांचे काम आहे.

यामध्ये त्रिदंड आणि भस्मधारण यांचे जे खंडन करण्यात आले आहे, ते बरोबर आहे. काटे बोचल्यामुळे होणाऱ्या दु:खाचे नाव नरक असेल तर त्याहून अधिक दु:ख देणारे महारोग वगैरे नरक का नाहीत?

राजा ऐश्वर्यवान व प्रजापालनतत्पर असेल तर त्याला श्रेष्ठ मानणे हे बरोबर आहे. परंतु राजा अन्याय करणारा व पापी असेल तर त्यालाही तुम्ही परमेश्वरासमान मानीत असाल तर तुमच्या सारखा मूर्ख दुसरा कोणी नाही. शरीराचा नाश होणे हाच मोक्ष असेल तर गाढवे, कुत्री इत्यादी आणि तुम्ही यांच्यामध्ये काय फरक राहिला? फक्त बाह्य आकारांमध्येच फरक असतो, असे म्हणावे लागेल.

**(चार्वाक) अग्निरूष्णो जलं शीतं समस्पर्शस्तथाऽनिलः।**
**केनेदं चित्रितं तस्मात् स्वभावात्तद् व्यवस्थितिः॥१॥**

चार्वाक, आभाणक, बौद्ध व जैन हे चार नास्तिक संप्रदाय जगाची उत्पत्ती स्वाभाविक किंवा नैसर्गिक आहे असे मानतात. जे-जे स्वाभाविक गुण आहेत, त्या-त्या गुणांशी द्रव्यांचा संयोग होऊन सर्व पदार्थ बनतात जगाचा कर्ता असा कोणीही नाही. ॥१॥

**न स्वर्गोनाऽपवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः।**
**नैव वर्णाश्रमादीनां क्रियाश्च फलदायिकाः॥२॥**

हे चार्वाकाचे मत आहे. पण बौद्ध व जैन हे परलोक व जीवात्मा मानतात. चार्वाक ते मानीत नाही. इतर काही बाबतीत या लोकांच्या मतांत फरक असला तरी बाकीच्या सर्व बाबतीत या तिघांची मते सारखीच आहेत. त्यांच्या मते स्वर्ग, नरक वगैरे काहीही नाही अथवा परलोकात जाणारा आत्माही नाही. तसेच वर्णाश्रमाची कर्मे केल्याने कोणतेही फळ मिळत नाही. ॥२॥

**पशुश्चेन्निहतः स्वर्गं ज्योतिष्टोमे गमिष्यति।**
**स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्न हिंस्यते ॥३॥**

यज्ञामध्ये पशूला मारून त्याचा होम केल्याने तो स्वर्गाला जात असेल तर यजमान आपल्या आईबापांना मारून व त्यांचा होम करून त्यांना स्वर्गाला का पाठवीत नाही.॥३॥

**मृतानामपि जन्तूनां श्राद्धं चेत्तृप्तिकारणम्।**
**गच्छतामिह जन्तूनां व्यर्थं पाथेयकल्पनम् ॥४॥**

जर मेलेल्या जीवांच्या नावाने श्राद्ध व तर्पण केल्याने त्यांची तृप्ती होत असेल तर परदेशी जाणारे लोक वाटेत उपयोगी पडावे म्हणून अन्न, वस्त्र, धन वगैरे बरोबर कशाला घेऊन जातात ? मृत व्यक्तीच्या नावाने अर्पण केलेला पदार्थ जर स्वर्गात जाऊन पोहचतो तर परदेशी जाणाऱ्यांसाठी त्यांच्या आप्तेष्टांनी आपल्या घरामध्ये त्यांच्या नावाने अर्पण केलेले पदार्थ परदेशी गेलेल्यांना मिळाले पाहिजेत. पण अशा प्रकारे अर्पण केलेले पदार्थ पोहचत नाही. मग ते स्वर्गात जाऊन कसे पोहचणार ? ॥४॥

**स्वर्गस्थिता यदा तृप्तिं गच्छेयुस्तत्र दानतः।**
**प्रासादस्योपरिस्थानामात्र कस्मान्न दीयते ॥५॥**

जर मर्त्यलोकात दान केल्याने स्वर्गवासी आत्मे तृप्त होत असतील तर तळमजल्यावर दान केले असता वरच्या मजल्यावर राहणारा माणूस तृप्त का होत नाही ? ॥५॥

**यावज्जीवेत्सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्।**
**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥६॥**

म्हणून जिवात जीव असेपर्यंत मजेत जगावे. घरात पदार्थ नसतील तर ऋण काढून सण साजरा करावा. काढलेले कर्ज फेडावे लागणार नाही. कारण ज्या शरीरातील जीवाने खाणे-पिणे केले असेल त्या दोघांचेही पुनरागमन होत नसल्याने मागणार कोण व देणार कोण ?

**यदि यच्छेत् परं लोकं देहादेष विनिर्गतः।**
**कस्माद् भूयो न चायाति बन्धुस्नेहसमाकुलः ॥७॥**

लोक असे म्हणतात की, मरणकाळी जीव शरीरातून बाहेर पडून परलोकात जातो. हे सारे खोटे आहे. कारण तसे असते तर कुटुंबाच्या मोहात अडकून तो पुनः घरी परत का येत नाही ? ॥७॥

**ततश्च जीवनोपायो ब्राह्मणैर्विहितस्त्विह।**
**मृतानां प्रेतकार्याणि न त्वन्यद् विद्यते क्वचित् ॥८॥**

सारांश या साऱ्या क्लृप्त्या, ब्राह्मणांनी आपले पोट भरण्यासाठी वापरात आणलेल्या आहेत. हे लोक दशगात्रादी जी क्रियाकर्मे करतात ती सारी पोटापाण्याची साधने आहेत.॥८॥

**त्रयो वेदस्य कर्त्तारो भण्डधूर्तनिशाचराः।**
**जर्फरीतुर्फुरीत्यादि पण्डितानां वचः स्मृतम् ॥९॥**

वेदांचे कर्ते हे विदूषक, लबाड व निशाचर म्हणजे राक्षस हे तिघे आहेत. 'जर्फरी' 'तुर्फरी' इत्यादी पंडितांची वचने (शब्द) लबाडीने भरलेली आहेत. ॥९॥

**अश्वस्यात्र हि शिश्नन्तु पत्नीग्राह्यं प्रकीर्त्तितम् ।**
**भण्डैस्तद्वत्परं चैव ग्राह्यजातं प्रकीर्त्तितम् ॥१०॥**

या बदमाशांची शिकवण कशी आहे पाहा ! घोड्याचे लिंग स्त्रीने ग्रहण करावे, यजमान पत्नीचा घोड्याशी संभोग करवावा, आणि नवऱ्यामुलीशी थट्टा, वात्रटपणा करावा, असल्या गोष्टी लबाड लोकांशिवाय कोण लिहिणार ? ॥१०॥

**मांसानां खादनं तद्वन्निशाचरसमीरितम् ॥११॥** चार्वाक-दर्शन. पृ.१३,१४,१५

वेदांमध्ये मांसभक्षणाचा जो भाग आलेला आहे, तो तर राक्षसांनीच लिहिलेला आहे. ॥११॥

**(उत्तर)** चैतन्यस्वरूप परमेश्वराने उत्पन्न केल्याखेरीज जड (अचेतन) पदार्थ स्वत: आपापसात स्वभावानेच नियमपूर्वक एकत्र येऊन उत्पन्न होऊ शकत नाहीत. म्हणून सृष्टीचा कर्ता अवश्य असला पाहिजे. जर सगळे पदार्थ आपोआप स्वभावतया उत्पन्न होत असते तर दुसरे सूर्य, चंद्र, पृथ्वी, नक्षत्रादी लोक आपोआप का उत्पन्न होत नाहीत? ॥१॥

स्वर्ग हे सुखोपभोगाचे आणि नरक हे दु:खोपभोगाचे नाव आहे. जीवात्मा नसता तर सुखदु:खाचा उपभोग घेणारा कोण झाला असता ? जसा यावेळी सुखदु:खाचा भोक्ता जीव आहे तसाच परजन्मामध्ये तोच असतो. सत्यभाषण व परोपकारादी क्रियाही वर्णाश्रमधर्मियांच्या असल्यामुळे निष्फळ व निरर्थक ठरतील काय ? मुळीच नाही. ॥२॥

पशूंना मारून त्यांचा होम करावा असे वेदादी सत्यशास्त्रात कोठेही लिहिलेले नाही. तसेच मृतकांचे श्राद्ध, तर्पण करणे हेही कपोलकल्पित आहे. कारण ते वेदादी सत्यशास्त्रांच्या विरुद्ध असून भागवतादी पुराणकारांचे ते मत आहे. म्हणून चार्वाकाने या गोष्टीचे केलेले खंडन अखंडनीय आहे. ॥३-५॥

जी वस्तू असते तिचा अभाव केव्हाही होऊ शकत नाही. विद्यमान जीवाचा अभाव होऊ शकत नाही. देह भस्म होतो व जीव भस्म होत नाही. जीव तर दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो. म्हणून जे कोणी इतरांकडून कर्ज काढून इहलोकी चैन करतात आणि घेतलेले कर्ज परत देत नाहीत, ते नक्कीच पापी बनतात आणि दुसऱ्या जन्मात दु:खरूपी नरक भोगतात. यात मुळीच शंका नाही. ॥६॥

देहातून बाहेर पडल्यावर जीव स्थलांतर व शरीरांतर प्राप्त करतो. त्याला आपला पूर्वजन्म व कुटुंब वगैरे आठवत नाही. त्यामुळे तो पुन: पूर्वीच्या कुटुंबात परत येत नाही. ॥७॥

होय ! मृत्यूनंतरची क्रियाकर्मे या साऱ्या गोष्टी ब्राह्मणांची गुणकर्मे नसलेल्या, ब्राह्मण हे नाव व्यर्थ धारण करणाऱ्या ब्राह्मणांनी आपल्या पोटापाण्याची सोय लावण्यासाठी रचल्या आहेत. त्या वेदोक्त नसल्यामुळे खंडनीय आहेत. ॥८॥

आता तुम्हीच सांगा ! चार्वाक वगैरे मंडळींनी वेदादी सत्यशास्त्रे पाहिली, ऐकली अथवा वाचली असती

तर त्यांनी वेदांची निंदा कधीच केली नसती. वेद हे विदूषक, लबाड व निशाचरांसारख्या पुरुषांनी रचले आहेत, असे उद्गार त्यांनी कधीच काढले नसते. हां ! महीधरादी टीकाकार विदूषक, लबाड व निशाचरांसारखे अवश्य होते. सारी लबाडी त्यांची आहे, वेदांची नव्हे. परंतु दु:खाची गोष्ट अशी की, चार्वाक, आभाणक, बौद्ध व जैन यांच्यापैकी कोणीही चार वेदांच्या मूळ संहिता ऐकल्या नाहीत, पाहिल्या नाहीत अथवा विद्वानांजवळ त्यांचे अध्ययनही केले नाही. त्यामुळे त्यांची बुद्धी नष्ट-भ्रष्ट झाली आणि ते वेडपटपणाने वेदांची अर्थशून्य निंदा करू लागले. दुष्ट वाममार्गी लोकांच्या प्रमाणशून्य कपोलकल्पित वाह्यात टीका वाचून हे लोक वेदांचे विरोधक बनले आणि अविद्यारूपी अगाध समुद्रात जाऊन बुडाले. ॥९॥

आता तुम्हीच विचार करा की, यजमानाच्या पत्नीला घोड्याचे लिंग हातात घ्यायला लावून त्या घोड्याशी संभोग करण्यास तिला भाग पाडणे आणि यजमानाच्या मुलीशी थट्टा, मस्करी करणे; यासारख्या गोष्टी हे वाममार्गी लोकांखेरीज इतरांचे काम कसे असू शकेल ? या महापापी वाममार्गी लोकांखेरीज वेदांचे असे भ्रष्ट, वेदार्थाहून विपरीत व अशुद्ध निरूपण दुसरा कोण करील ? हे चार्वाक वेदांची निंदा करण्यास उद्युक्त झाले, ही अत्यंत शोचनीय गोष्ट आहे. त्यांनी आपल्या बुद्धीचा थोडा तरी वापर करायला हवा होता. काय करतील बिचारे ? सत्यासत्याचा विचार करून सत्याचे मंडन व असत्याचे खंडन करण्याइतकी विद्याच त्यांच्याजवळ नव्हती. ॥१०॥

वेदांमध्ये मांसभक्षणाचे समर्थन करण्यात आले आहे, असे जे म्हटले जाते तीही या वाममार्गी टीकाकारांचीच अगाध लीला आहे. म्हणून त्यांना राक्षस म्हणणे उचित होईल. वेदांमध्ये कोठेही मांस खावे असे सांगितलेले नाही. त्यामुळे या खोट्या प्रचाराचे पाप त्या टीकाकारांना आणि ज्यांनी वेदांची माहिती करून न घेताच त्यांची मनसोक्त निंदा केली आहे, त्यांनाच लागेल यात शंका नाही. खरी गोष्ट अशी आहे की, ज्यांनी वेदांना विरोध केला, आज करीत आहेत व पुढे करीत राहतील, ते सर्व निश्चितपणे अविद्यारूपी अंध:कारात पडतील आणि सुखाऐवजी दारुण दु:ख भोगतील. त्यांना जेवढे दु:ख मिळेल तेवढे थोडेच होईल. म्हणून मनुष्यमात्रांनी वेदानुकूल आचरण ठेवणे उचित होय. ॥११॥

वाममार्गियांनी मिथ्या कपोलकल्पना करून वेदांच्या नावावर आपले उद्दिष्ट साधले. अर्थात यथेष्ट मद्यपान, मांसभक्षण व परस्त्रीगमन इत्यादी दुष्कृत्यांकडे त्यांची प्रवृत्ती असल्यामुळे या गोष्टी वेदांत सांगितल्या आहेत, असे त्यांनी दडपून सांगितले; व अशा प्रकारे वेदांना कलंक लावला. त्यांच्या या गोष्टी ऐकून चार्वाक, बौद्ध व जैन हेही वेदांची निंदा करू लागले आणि त्यांनी एक वेगळा वेदविरोधी अनीश्वरवादी म्हणजे नास्तिक संप्रदाय सुरू केला. चार्वाकादी लोकांनी वेदांचा मूळ अर्थ समजून घेतला असता तर चुकीच्या टीका वाचून खऱ्या वेदोक्त-धर्मापासून ते दूर कशाला गेले असते ? काय करणार बिचारे ? **'विनाशकाले विपरीतबुद्धिः'।** जेव्हा माणसाचा विनाश होण्याची वेळ येते तेव्हा त्याची बुद्धी उलटी चालू लागते.

आता चार्वाकादिकांमध्ये आपसात भेद आहेत. त्याविषयी लिहितो. हे चार्वाकादी पंथ अनेक गोष्टींच्या बाबतीत एकमत आहेत. परंतु चार्वाक हा देहाच्या उत्पत्तीबरोबर जीव उत्पन्न होतो आणि देहाच्या नाशा बरोबर

जीवाचाही नाश होतो असे मानतो. तो पुनर्जन्म व परलोक मानीत नाही. केवळ प्रत्यक्ष प्रमाणाखेरीज अनुमानादी इतर प्रमाणे तो मानीत नाही. 'चार्वाक' या शब्दाचा अर्थ 'बोलण्यात पटाईत' असा असून विशेष अर्थ 'वितंडवादी' असा आहे. बौद्ध व जैन हे प्रत्यक्षादी चारही प्रमाणे मानतात. अनादी जीव, पुनर्जन्म, परलोक व मुक्तीही ते मानतात. एवढाच चार्वाक आणि बौद्ध-जैन यांच्यात भेद आहे. परंतु नास्तिकता, वेद व ईश्वर यांची निंदा, परमत द्वेष, षड् यातना (पुढे सांगितलेली सहा कर्मे) आणि जगाचा कर्ता कोणी नाही असे मानणे, इत्यादी बाबतीत त्या सर्वांचे एकमत आहे. अशा प्रकारे चार्वाकाच्या मताविषयी आम्ही थोडक्यात विवेचन केले. आता बौद्ध मताविषयी विचार करू.

## बौद्धमत-समीक्षा

**कार्य्यकारणभावाद्वा स्वभावाद्वा नियामकात् ।**
**अविनाभावनियमो दर्शनान्तरदर्शनात् ।।१।।** सर्वदर्शन-संग्रह, बौद्धमत, पृ. १६

कार्यकारणभाव म्हणजे कार्याच्या दर्शनाने कारणाचा व कारणाच्या दर्शनाने कार्यादींचा साक्षात्कार होत असतो. म्हणजेच तत्संबंधी शेष भागाचे अनुमान होत असते. या कार्यकारणभावाच्या ज्ञानावाचून प्राण्यांचे सारे व्यवहार पूर्ण होऊ शकत नाहीत. इत्यादी कारणांनी अनुमानाला अधिक मानून चार्वाकाहून भिन्न शाखा बौद्धांची झाली. बौद्धांचे चार प्रकार आहेत :-

(१) माध्यमिक (२) योगाचार (३) सौत्रान्तिक (४) वैभाषिक. 'बुद्ध्या निर्वतते स: बौद्धः' म्हणजे जी गोष्ट बुद्धीने सिद्ध होते म्हणजे जी गोष्ट बुद्धीच्या आवाक्यात येते, ती मानणारा व जी बुद्धीच्या कसोटीवर उतरत नाही, ती न मानणारा तो बौद्ध होय.

या चार प्रकारांपैकी माध्यमिक बौद्ध हे सर्व शून्य मानतात. अर्थात जेवढे पदार्थ आहेत, ते सर्व शून्य आहेत. म्हणजे ते प्रारंभी नसतात, अंतीही नसतात आणि मध्यकाळी ते असल्याचे जे प्रतीत होते, तेही तो प्रतीतीचा क्षण गेल्यानंतर शून्यरूप होऊन जातात. जसे उत्पत्तीच्या पूर्वी घट नव्हता. त्याचा नाश झाल्यावरही तो राहत नाही. घटज्ञान समयीच तो भासतो; आणि इतर पदार्थांचे ज्ञान होण्याच्या वेळी घटाचे ज्ञान राहत नाही. म्हणून शून्य हेच एकमेव तत्त्व आहे.

दुसरे योगाचार बौद्ध बाह्य शून्य मानतात. सर्व पदार्थ आंतरिक ज्ञानामुळे भासमान होतात. बाह्यत: त्याचे अस्तित्व नाही. उदाहरणार्थ, घटज्ञान हे आत्म्यामध्ये असते. म्हणूनच माणूस म्हणतो की घट आहे. त्याला आंतरिक ज्ञान नसेल तर तो असे म्हणू शकत नाही. यावरून वस्तुत: बाह्य पदार्थांचे अस्तित्व नाही. यामुळेच आत्म्यामध्ये अस्तित्व सिद्ध होते. म्हणून बाह्य पदार्थाचा अभाव म्हणजे 'बाह्य-शून्य' असे ते मानतात.

तिसरे सौत्रान्तिक बौद्ध असे मानतात की, बाहेरील पदार्थ अनुमानाने जाणला जातो. कारण कोणताही पदार्थ बाहेरून सांगोपांग दिसत नाही. त्याचा काही भांग दिसतो त्यावरून उरलेल्या भागाचे अनुमान केले जाते, असे या लोकांचे मत आहे.

चौथे वैभाषिक बौद्ध असे मानतात की, पदार्थाची प्रतीती बाहेरूनच होते, आतून नाही. जसे 'अयं नीलो घट:' म्हणजे हा निळा घट आहे असे म्हटले जाते तेव्हा निळ्या घटाची आकृती बाहेरून प्रतीत होते, ती प्रतीती आतून होत नाही.

वस्तुत: या सर्वांचा आचार्य बुद्ध एकच आहे. परंतु शिष्यांमधील बुद्धिभेदामुळे त्यांच्या चार शाखा झाल्या आहेत. ज्याप्रमाणे सूर्यास्त झाल्यानंतर जारकर्म करणारा पुरुष परस्त्रीगमन करतो आणि विद्वान लोक सत्यभाषणादी श्रेष्ठ कर्मे करतात, त्याप्रमाणे वेळ एकच असली तरी वेगवेगळी माणसे आपापल्या बुद्धीप्रमाणे वेगवेगळी कृत्ये करीत असतात.

वर उल्लेखिलेल्या चार प्रकारच्या बौद्धांमधील माध्यमिक बौद्ध हे, सारेच क्षणिक आहे असे मानतात. प्रत्येक क्षणी बुद्धीमध्ये परिवर्तन होत असल्यामुळे जो पदार्थ पूर्वीच्या क्षणी ज्ञात होता, जो नंतरच्या क्षणी तसा राहत नाही. म्हणून सर्वच क्षणिक आहे, असे मानतात.

योगाचार बौद्धांचे म्हणणे असे की, सारीच प्रवृत्ती दु:खरूप आहे. कारण प्राप्तीमध्ये कोणीही संतुष्ट राहत नसतो. एकाच्या प्राप्तीमध्ये दुसऱ्याची इच्छा विद्यमानच असते, याप्रकारे मानतात.

सौत्रांतिक बौद्धांचे म्हणणे असे की, सर्व पदार्थ आपापल्या लक्षणांनी लक्षित होत असतात. जसे गायीच्या लक्षणांनी गाय व घोड्याच्या चिह्नांनी घोडा ज्ञात होत असतो. अशी लक्षणे लक्ष्य वस्तूमध्ये नेहमीच असतात, असे ते मानतात.

वैभाषिक बौद्ध शून्यालाच एक पदार्थ मानतात. पहिला माध्यमिक सर्वांला शून्य मानीत होता. तोच पक्ष व वैभाषिकांचाही आहे.

इत्यादी तसे बौद्धांमध्ये पुष्कळसे विवाद पक्ष आहेत. याप्रकारे चार प्रकारची भावना मानतात.

**(उत्तर)** जर सर्व शून्य असेल तर शून्याला जाणणारा शून्य असू शकत नाही. आणि जर सर्व शून्य असेल तर शून्याला शून्य जाणू शकणार नाही. म्हणून शून्याचा ज्ञाता व ज्ञेय असे दोन पदार्थ असल्याचे सिद्ध होते. जर योगाचार बौद्ध बाह्यशून्यत्व मानत असतील तर पर्वत त्यांच्यामध्ये असला पाहिजे. पर्वत आमच्या हृदयात आहे, असे ते म्हणत असतील तर पर्वत राहण्या एवढी जागा त्यांच्या हृदयात कोठे आहे ? म्हणून पर्वत बाहेर असतो आणि पर्वताचे ज्ञान आत्म्यामध्ये असते.

सौत्रान्तिक बौद्ध कोणत्याही पदार्थाला प्रत्यक्ष मानीत नाहीत. तर मग ते स्वत: आणि त्यांचे वचनही प्रत्यक्ष नसून अनुमेय असले पाहिजे. जर पदार्थ प्रत्यक्ष असू शकत नसतील तर 'अयं घट:' असा प्रयोगही होता कामा नये. त्या ऐवजी 'अयं घटैकदेश:' म्हणजे हा माठाचा एक भाग आहे असे म्हटले पाहिजे. परंतु माठाच्या एका भागाचे नाव माठ असे नसून सर्व भागांच्या समुदायाचे नाव माठ आहे. 'हा माठ आहे.' हे प्रत्यक्ष आहे. ते अनुमेय नाही. कारण सर्व अवयवांमध्ये अवयवी एकच असतो. त्याचे प्रत्यक्ष ज्ञान झाल्यानंतर माठाचे सर्व अवयवही प्रत्यक्ष होतात. म्हणजेच सावयव माठ प्रत्यक्ष होतो.

वैभाषिक बौद्ध बाह्य पदार्थांना प्रत्यक्ष मानतात तेही बरोबर नाही. कारण जेथे ज्ञाता व ज्ञान असते तेथेच

प्रत्यक्ष जाणीव होते. अर्थात आत्म्यामध्ये सर्व गोष्टींचे ज्ञान असते. प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय बाहेर असला तरी तदाकार ज्ञान आत्म्याला होते. जर पदार्थ क्षणिक असतात व त्यांचे ज्ञानही क्षणिक असते, असे मानले तर 'प्रत्यभिज्ञा' असू शकत नाही. (पूर्वी कधीतरी पाहिलेली व्यक्ति किंवा पदार्थ पुन्हा दिसल्यानंतर ही अमूक व्यक्ती किंवा पदार्थ आहे, असे ज्ञान किंवा स्मरण होणे याला प्रत्यभिज्ञा असे म्हणतात.) परंतु पूर्वी पाहिलेल्या, ऐकलेल्या गोष्टीचे स्मरण होत असते. म्हणून क्षणिक वादही बरोबर नाही. सर्वच दु:खमय असेल आणि सुख मुळीच नसेल अशा स्थितीची कल्पनाच करता येणार नाही. कारण सुख-दु:ख हे सापेक्ष असल्यामुळे सुखाच्या अपेक्षेशिवाय दु:ख सिद्ध होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे रात्रीच्या अपेक्षेने (संदर्भात) दिवस व दिवसाच्या अपेक्षेने रात्र ज्ञात होते त्याचप्रमाणे सुख व दु:ख यांच्या बाबतीत समजावे. म्हणून सारे दु:खमय आहे, असे मानणे बरोबर नाही. बौद्धांचा स्वलक्षणवादही बरोबर नाही. कारण स्वलक्षण मानल्यास नेत्रग्राह्यत्व हे रूपाचे लक्षण आहे आणि रूप हे लक्ष्य आहे. माठाचे रूप हे लक्ष्य व नेत्रग्राह्यत्व लक्षण असून ती दोन्ही परस्पर भिन्न आहेत. तसेच गंध हे पृथ्वीचे लक्षण असून तो पृथ्वीहून अभिन्न आहे. सारांश, लक्ष्य व लक्षण ही परस्परांहून भिन्नही आहेत व अभिन्नही आहेत, असे मानले पाहिजे. शून्यवादाला उत्तर पूर्वी दिलेच आहे की, शून्याला जाणणारा शून्याहून वेगळा असतो.

**सर्वस्य संसारस्य दुःखात्मकत्वं सर्वतीर्थङ्करसंमतम् ॥** बौद्धदर्शन पृ. २८, प.३

जग हे दु:खरूप, दु:खाचे साधनरूप आहे, अशी भावना करून जगातून सुटका करून घ्यावी, असे बौद्ध मानतात. मुक्ती, अनुमान व जीवाचे अस्तित्व यांचा निषेध हे चार्वाकांमध्ये विशेष अधिक आहेत. ज्यांना बौद्ध लोक तीर्थङ्कर मानतात त्यांनाच जैनही मानतात. म्हणून या बाबतीत हे दोन्ही पंथ एक आहेत. पूर्वोक्त भावनाचतुष्टयाने म्हणजे चार भावनांच्या योगाने सर्व वासनांपासून निवृत्त होऊन माणूस शून्यरूप निर्वाण म्हणजे मुक्ती प्राप्त करतो, असे ते मानतात. ते आपल्या शिष्यांना योग व आचार यांचा उपदेश करतात. गुरूचे वचन प्रमाण मानावयास सांगतात. अनादी बुद्धीमध्ये वासना असल्यामुळे बुद्धीच अनेकाकार भासते, असे ते सांगतात. चित्त-चैतात्मक स्कन्ध पाच प्रकारचे असतात, असे ते मानतात:-

**रूपविज्ञानवेदनासंज्ञासंस्कारसंज्ञकः ॥** बौद्धदर्शन. पृ. ३९, पं.११

त्यांतील (पहिला) इंद्रियांकडून रूपादी विषयांचे जे ग्रहण केले जाते तो 'रूपस्कंध' होय. (दुसरा) आलयविज्ञान प्रवृत्तीच्या ज्ञानरूप व्यवहाराला 'विज्ञानस्कंध' म्हणतात. (तिसरा) रूपस्कंध व विज्ञानस्कंध यांच्यापासून उत्पन्न झालेला सुखदु:खादी प्रतीतिरूप व्यवहार हा 'वेदना स्कंध' होय. (चौथा) गाय आदी संज्ञांचा संबंध अर्थात नामांचा नामीशी असणारा संबंध हा 'संज्ञास्कंध' होय. (पाचवा) वेदना स्कंधापासून राग (मोह) द्वेषादि क्लेश आणि क्षुधातृषादी उपक्लेश, मद, प्रमाद, अभिमान, धर्म व अधर्मरूप व्यवहार हा 'संस्कारस्कंध' आहे असे ते मानतात. सर्व संसारात दु:खरूप दु:खाचे घर, दु:खाचे साधनरूप भावना करून संसारातून सुटणे, चार्वाकात अधिक मुक्ती व अनुदान तथा जीवांचे अस्तित्व न मानणे असे बौद्ध मानतात.

**देशना लोकनाथानां सत्त्वाशयवशानुगाः ।**
**भिद्यन्ते बहुधा लोके उपायैर्बहुभिः किल ॥१॥** बौद्धदर्शन, पृ. ४५, ४६

अर्थात जो ज्ञानी, विरक्त, जीवनमुक्त लोकांचे नाथ असणाऱ्या बुद्ध आणि तीर्थंकरांच्या पदार्थांचे स्वरूप जाणविणारा, भिन्न-भिन्न पदार्थांचा उपदेशक, पुष्कळ रहस्ये जाणणारा, अनेक उपायांनी वर्णन करण्यात आलेला आहे, त्याच्यावर बौद्धांनी श्रद्धा ठेवावी. ॥१॥

**गम्भीरोत्तानभेदेन क्वचिच्चोभयलक्षणा ।**
**भिन्ना हि देशनाऽभिन्ना शून्यताऽद्वयलक्षणा ॥२॥** बौद्धदर्शन, पृ. ४५, ४६

खूप गंभीर व प्रसिद्ध अशा रहस्यांनी कोठे-कोठे गुप्तपणे व प्रकटपणे भिन्न-भिन्न गुरूंचे उपदेश, जे शून्य लक्षणांनी युक्त पूर्वी सांगितले आहेत, त्यांच्यावरही श्रद्धा ठेवावी. ॥२॥

**द्वादशायतनपूजा श्रेयस्करीति बौद्धा मन्यन्ते:**
**अर्थानुपार्ज्य बहुशो द्वादशायतनानि वै ।**
**परितः पूजनीयानि किमन्यैरिह पूजितैः ॥३॥** बौद्धदर्शन, पृ. ४५,४६

जी द्वादशायतन पूजा आहे, तीच मोक्ष देणारी आहे. त्या पूजेसाठी पुष्कळ द्रव्यादी पदार्थ मिळवून द्वादशायतन म्हणजे बारा प्रकारची विशिष्ट स्थाने बनवून सर्व प्रकारे पूजा करावी. इतरांची पूजा करण्याचे काय प्रयोजन ? ॥३॥

**ज्ञानेन्द्रियाणि पञ्चैव तथा कर्मेन्द्रियाणि च ।**
**मनो बुद्धिरिति प्रोक्तं द्वादशायतनं बुधैः ॥४॥** बौद्धदर्शन, पृ. ४५,४६

यांची द्वादशायतन पूजा अशी आहे : श्रोत्र, त्वक्, चक्षू, जिव्हा व नासिका ही पाच ज्ञानेंद्रिये, वाक्, हस्त, पाद, गुह्य व उपस्थ ही पाच कर्मेंद्रिये, म्हणजे दहा इंद्रिये आणि मन व बुद्धी या बारांचा सत्कार करणे म्हणजे त्यांना आनंदात ठेवणे, ही त्यांची पूजा आहे. हेच बौद्ध मत आहे. ॥४॥

**(उत्तर)** जर सारे जग खरोखरीच दुःखमय असते तर कोणत्याही जीवाला जगाविषयी कसलेच आकर्षण वाटले नसते. परंतु आपण दैनंदिन जीवनात असे प्रत्यक्ष पाहतो की, सारे जीव काही ना काही मिळविण्यासाठी सतत प्रवृत्तीत मग्न असतात. म्हणून सारे जग दुःखरूप असू शकत नाही. वस्तुतः जगामध्ये सुख व दुःख दोन्ही आहेत. बौद्ध लोक हे जग दुःखमय असल्याचा सिद्धांत मानीत असतील तर खाणेपिणे, पथ्य-पाणी, औषध-सेवन यांद्वारे शरीररक्षण करून त्यामध्ये ते सुख का मानतात ? जर ते म्हणत असतील की, आम्ही या गोष्टी करण्यास प्रवृत्त होतो खरे; परंतु त्याला दुःखच मानतो, तर ते ही शक्य नाही कारण जीव हा सुखाच्या बाबतीत प्रवृत्त आणि दुःखाच्या बाबतीत निवृत्त होऊ इच्छितो. जगामध्ये धर्मकृत्ये, विद्या, सत्संग इत्यादी श्रेष्ठ व्यवहार सुखकारक असतात. त्यांना कोणताही विद्वान दुःखाचे कारण मानू शकणार नाही. फक्त बौद्ध लोकच तसे मानतात. त्यांचे जे पाच स्कंध आहेत तेही अपूर्ण आहेत. कारण अशा प्रकारे स्कंधांचा विचार करू गेल्यास

त्यांच्यापैकी प्रत्येकाचे अनेक भेद होऊ शकतात. हे लोक तीर्थंकरांना उपदेशक व लोकनाथ मानतात. परंतु सर्व नाथांचा नाथ जो अनादी परमात्मा त्याला मात्र ते मानीत नाहीत. जर तो परमात्मा नसेल तर त्या तीर्थंकरांनी कोणाकडून उपदेश घेतला? त्यांना स्वयंभू (स्वयंसिद्ध) ज्ञान झाले, असे जर त्यांचे म्हणणे असेल तर ते शक्य नाही. कारण, कार्य हे कारणावाचून होऊ शकत नाही. अथवा त्यांच्या म्हणण्यानुसार तसेच घडत असते तर आता त्यांच्यामध्ये अध्ययन-अध्यापन, श्रवण-कीर्तन आणि ज्ञानी लोकांचा सत्संग केल्याशिवाय ज्ञानी का निर्माण होत नाहीत ? जर तसे निर्माण होत नाहीत तर अशा प्रकारचे कथन पूर्णपणे निराधार व तर्कशून्य, सन्निपात रोगग्रस्त माणसाच्या बरळण्यासारखे ठरते.

शून्यरूप अद्वैत हाच बौद्धांचा उपदेश असेल तर तो खरा नाही. कारण, विद्यमान वस्तू कधीच शून्यरूप असू शकत नाही. हां ! ती सूक्ष्म कारणरूप होते. म्हणून हेही विधान भ्रामक आहे. जर द्रव्यांचा उपार्जनामुळेच पूर्वोक्त द्वादशायतनपूजा, हे मोक्षाचे साधन आहे असे ते मानतात तर दहा प्राण आणि अकरावा जीवात्मा यांची पूजा ते का करीत नाहीत ? जर इंद्रिये व अंत:करण यांची पूजाही मोक्षप्रद असेल तर या बौद्धांमध्ये आणि विषयी जनांमध्ये काय फरक उरला ? विषयवासनांच्या गुलामगिरीतून बौद्ध लोक आपली सुटका करून घेऊ शकले नाहीत. मग तेथे मुक्ती कोठून येणार ?

या लोकांनी अविद्येच्या बाबतीत केवढी प्रगती केली आहे, पहा ! त्यात ते अद्वितीय आहेत. त्यांच्याशी तुलना होऊ शकेल असे इतर कोणी नाहीत. यावरून असेच सिद्ध होते की, यांना वेद व ईश्वर यांचा विरोध करण्याचेच हे फळ मिळाले आहे. त्यांनी प्रथमत: सारे जग दु:खमय असल्याची कल्पना केली आणि मग तिच्यात द्वादशायतनपूजा घुसडून दिली. यांची ही द्वादशायतनपूजा जगातील पदार्थांच्या बाहेरची आहे काय की जी मुक्ती देणारी व्हावी ? जर कोणी डोळे मिटून रत्न शोधू लागला तर त्याला ते कधीतरी मिळू शकेल काय ? वेद व ईश्वर न मानल्यामुळे त्यांची अशी अवस्था झाली आहे. अजूनही त्यांना सुख हवे असेल तर वेद व ईश्वर यांचा आश्रय घेऊन त्यांनी आपला जन्म सार्थक करावा. 'विवेक विलास' या ग्रंथामध्ये बौद्धांचे तत्त्वज्ञान पुढील शब्दात सांगितले आहे.

**बौद्धानां सुगतो देवो विश्वं च क्षणभङ्गुरम् ।**
**आर्य्यसत्त्वाख्यया तत्त्वचतुष्टयमिदं क्रमात् ॥१॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २६५

बौद्धांचा सुगत देव बुद्ध भगवान हा पूजनीय देव आहे. जग क्षणभंगुर आहे, सर्व पुरुष व स्त्रिया यांनी आर्य म्हणजे सज्जन बनण्याचे शिकस्तीचे प्रयत्न करावेत, आणि सर्वांनी तत्त्वांच्या अथवा खऱ्या सिद्धांतांच्या विज्ञानाचे अध्ययन करावे, हे चार मूळ सिद्धांत ही बौद्धांची (माननीय) श्रद्धा-स्थाने आहेत. ॥१॥

**दु:खमायतनं चैव तत: समुदयो मत: ।**
**मार्गश्चेत्यस्य च व्याख्या क्रमेण श्रूयतामत: ॥२॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २६६

या विश्वाला दु:खाचे घर जाणावे. त्यामुळे समुदय म्हणजे (मोह, द्वेष वगैरे दोषांची) उत्पत्ती होते. आता त्या मार्गाचे क्रमश: विवेचन ऐका. ॥२॥

**दुःखसंसारिणः स्कन्धास्ते च पञ्च प्रकीर्त्तिताः ।**
**विज्ञानं वेदना संज्ञा संस्कारो रूपमेव च ॥३॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २६७

जगामध्ये केवळ दु:ख आहे. यापूर्वी ज्या पंच स्कंधाची चर्चा केली आहे ते जाणून घ्यावेत. ॥३॥

**पञ्चेन्द्रियाणि शब्दाद्या विषयाः पञ्च मानसम् ।**
**धर्मायतनमेतानि द्वादशायतनानि तु ॥४॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २६८

पाच ज्ञानेंद्रिये, त्यांचे शब्दादी पाच विषय, मन, बुद्धी व अंतःकरण ही धर्माची बारा स्थाने (आयतने) आहेत. ॥४॥

**रागादीनां गणोऽयं स्यात्समुदेति नृणां हृदि ।**
**आत्मात्मीयस्वभावाख्यः स स्यात्समुदयःपुनः ॥५॥** विवेकविलास अ.८। श्लो. २६९

माणसांच्या हृदयामध्ये राग (मोह) द्वेषादी समूहाची जी उत्पत्ती होते, तिला समुदय तसेच, आत्मा, आत्म्याचे संबंधी व स्वभाव यांना आख्या असे म्हणतात. त्यांच्यापासून पुनः समुदाय होत असतो. ॥५॥

**क्षणिकाः सर्वसंस्कारा इति या वासना स्थिरा ।**
**स मार्ग इति विज्ञेयःस च मोक्षोऽभिधीयते ॥६॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २७०

सर्व संस्कार क्षणिक आहेत, ही वासना स्थिर करणे हा बौद्धांचा मार्ग आहे आणि तेच शून्य तत्त्व, शून्यरूप होणे हा मोक्ष आहे. ॥६॥

**प्रत्यक्षमनुमानं च प्रमाणं द्वितयं तथा ।**
**चतुःप्रस्थानिका बौद्धाः ख्याता वैभाषिकादयः ॥७॥** विवेकलिास अ. ८। श्लो. २७१

बौद्ध लोक प्रत्यक्ष व अनुमान ही दोनच प्रमाणे मानतात. त्यांच्यामध्ये वैभाषिक, सौत्रांतिक, योगाचार व माध्यमिक असे त्यांचे चार भेद आहेत. ॥७॥

**अर्थो ज्ञानन्वितो वैभाषिकेण वहु मन्यते ।**
**सौत्रान्तिकेन प्रत्यक्षग्राह्योऽर्थो न बहिर्मतः ॥८॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २७२

ज्ञानामध्ये असणारा अर्थ (पदार्थ) विद्यमान असतो असे वैभाषिक मानतात. कारण जो ज्ञानामध्ये नसतो तो अर्थ (पदार्थ) सिद्ध आहे असे कोणीही पुरुष मानू शकत नाही. सौत्रांतिक लोक आत्म्यात जो प्रत्यक्ष पदार्थ असतो तोच मानतात. बाहेरचा पदार्थ ते मानीत नाहीत. ॥८॥

**आकारसहिताबुद्धिर्योगाचारस्य संमता ।**
**केवलां संविदं स्वस्थां मन्यन्ते मध्यमा पुनः ॥९॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २७३

योगाचार लोक आकारसहित, विज्ञानयुक्त बुद्धीला मानतात आणि माध्यमिक लोक केवळ आपल्यामधील पदार्थांच्या ज्ञानालाच मानतात. (बाहेरच्या) पदार्थांना मानीत नाहीत. ॥९॥

**रागादिज्ञानसन्तानवासनाच्छेदसम्भवा ।**
**चतुर्णामपि बौद्धानां मुक्तिरेषा प्रकीर्तिता ॥१०॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २७४

रागादी (मोहादी) ज्ञानाच्या प्रवाहरूप वासनेच्या नाशातून उत्पन्न होणारी मुक्ती किंवा मोक्ष चारही प्रकारचे बौद्ध मानतात. ॥१०॥

**कृत्तिः कमण्डलुमौण्ड्यं चीरं पूर्वाह्णभोजनम् ।**

**सङ्घो रक्ताम्बरत्वं च शिश्रिये बौद्धभिक्षुभिः ॥११॥** विवेकविलास अ. ८। श्लो. २७५

मृगादिकांचे कातडे (मृगचर्म), कमंडलू, मुंडन, वल्कल वस्त्रे, पूर्वाह्णी म्हणजे सकाळी ९ वाजण्याच्या आधी भोजन, एकटे न राहणे (एकांत टाळणे), लाल वस्त्रे धारण करणे हा बौद्ध साधूंचा वेश आहे. ॥११।

**(उत्तर)** सुगत बुद्ध हाच बौद्धांचा देव असेल तर मग त्याचा गुरू कोण होता ? आणि जर विश्व क्षणभंगुर असेल तर पूर्वी पाहिलेल्या पदार्थाचे 'हाच तो आहे' असे स्मरण होता कामा नये. विश्व क्षणभंगुर असते तर तो पदार्थच राहिला नसता. मग स्मरण कशाचे होणार ? क्षणिकवाद हाच बौद्धांचा मार्ग असेल तर त्यांचा मोक्षही क्षणभंगुर असणार ! जर ज्ञानाने मुक्त असणारा अर्थच द्रव्य असेल तर जड (अचेतन) द्रव्यामध्येही ज्ञान असले पाहिजे. म्हणून ज्ञानामध्ये अर्थाचे प्रतिबिंब असते. जर आतील ज्ञानामध्ये द्रव्य असेल तर ते बाहेर असता कामा नये. मग ते चालनादी क्रिया कोणावर करते ? जे बाहेर दिसते ते खोटे कसे असू शकेल ? जर बुद्धी साकार असेल तर ती दिसली पाहिजे. जर केवळ ज्ञानच हृदयात आत्मस्थ असेल व बाह्य पदार्थांना केवळ ज्ञानच मानले तर ज्ञेय पदार्थाशिवाय ज्ञानच होऊ शकत नाही. वासनांचा नाश हीच मुक्ती असेल तर सुषुप्ती (स्वप्नरहित निद्रा) हीही भक्ती समजली पाहिजे. तसे मानणे विद्येच्या विरुद्ध असल्याने ते तिरस्कारणीय आहे.

अशा प्रकारे बौद्ध लोकांची मते थोडक्यांत सांगितली. यावरून यांची विद्या कशी आहे व त्यांचा पंथ कसा आहे हे बुद्धिमान विचारशील पुरुष विचार करून समजून घेतील.

आता आम्ही जैनमताचे वर्णन करतो. प्रकरण रत्नाकर भाग १. 'नयचक्रसार' या ग्रंथात खालील गोष्टी सांगितल्या आहेत :

बौद्ध लोक वेळोवेळी नवनवीन अशी (१) आकाश, (२) काळ, (३) जीव, (४) पुद्गल ही चार द्रव्ये मानतात आणि जैन लोक धर्मास्तिकाय, अधर्मास्तिकाय, आकाशास्तिकाय, पुद्गलास्तिकाय, जीवास्तिकाय व काळ ही सहा द्रव्ये मानतात. यापैकी काळाला ते 'अस्तिकाय' मानीत नाहीत. त्यांचे म्हणणे असे की काळ हे औपचारिक (व्यवहारदृष्टचा) द्रव्य आहे. ते वस्तुतः तसे नाही. यांपैकी 'धर्मास्तिकाय' हे द्रव्य गतिपरिणामीपणामुळे परिणामाला प्राप्त होऊन जीव व पुद्गल (परमाणु; ज्या द्रव्यांच्या संघाताने शरीर, मन, प्राण इत्यादी निर्माण होतात) यांच्या गतीच्या समीप स्तंभन करण्याला हेतुभूत आहे. ते असंख्य प्रदेश, परिणाम व लोक यांमध्ये व्यापक आहे. दुसरे 'अधर्मास्तिकाय' हे आहे की, ते स्थिरतेच्या योगाने परिणामी झालेला जीव पुद्गल यांच्या स्थितीच्या आश्रयाचा हेतू आहे. तिसरे 'आकाशास्तिकाय' हे सर्व द्रव्यांचा आधार आहे. त्यामध्ये अवगाहन, प्रवेश, निर्गम आदी क्रिया करणारे जीव व पुद्गल यांच्या अवगाहनाचा हेतू असून ते सर्वव्यापी आहे. चौथे 'पुद्गलास्तिकाय' हे आहे की, ते कारणरूप सूक्ष्म, नित्य, एकरस असून वर्ण, गंध, स्पर्श, कार्य यांचे चिह्न पूर्ण करणे व गळून पडणे हा त्याचा स्वभाव आहे. पाचवे 'जीवास्तिकाय' हे चेतनालक्षण

असून ज्ञान दर्शना मध्ये उपयुक्त आहे. अनंत पर्यायांनी परिणामी होणारा कर्त्ता व भोक्ता आहे. सहावा 'काळ' हा पूर्वोक्त पाच अस्तिकायांचे परत्व, अपरत्व, नवीनत्व, प्राचीनत्व यांचे चिह्नरूप व प्रसिद्ध वर्तमानरूप या पर्यायांनी युक्त आहे. म्हणून त्याला काळ असे म्हणतात.

**(समीक्षक)** बौद्धांनी जी चार द्रव्ये प्रतिसमयी नवीन नवीन मानली आहेत ती खोटी आहेत. कारण आकाश, काळ, जीव व परमाणू हे कधीच नवे अथवा जुने होऊ शकत नाही. ते अनादी व कारणरूपाने अविनाशी आहेत. मग त्यांना नवीनपणा किंवा जुनेपणा कसा चिकटविता येईल ? तसेच, जैनांचे मानणेही बरोबर नाही. कारण धर्म व अधर्म ही द्रव्ये नसून ते गुण आहेत. हे दोन्ही जीवास्तिकायामध्ये येतात. म्हणून आकाश, परमाणू, जीव व काळ त्यांनी मानले असते तर ते बरोबर झाले असते. वैशेषिकांनी मानलेली नऊ द्रव्येच बरोबर आहेत. कारण पृथ्वी आदी पाच तत्त्वे काळ, दिशा, आत्मा व मन हे नऊ वेगवेगळे पदार्थ निश्चितच आहेत. एका जीवाला चेतन मानून ईश्वराला न मानणे ही जैन व बौद्ध यांची मिथ्या पक्षपाताची गोष्ट आहे.

## बौद्ध व जैन पंथाचे ऐक्य

बौद्ध व जैन लोक सप्तभंगी व स्याद्वाद मानतात. तो असा आहे :-

(१) 'सन् घटः' याला ते प्रथम भंग म्हणतात. कारण माठ आपल्या विद्यमानत्वाने युक्त आहे. म्हणजे 'माठ आहे,' या वाक्याने त्याच्या अभावाचा निषेध (विरोध) केला आहे. (२) दुसरा भंग 'असन् घटः' म्हणजे 'माठ नाही,' पहिला भंग हा माठाच्या अस्तित्वामुळे (भावामुळे) व दुसरा भंग त्याच्या अभावामुळे मानलेला आहे. (३) तिसरा भंग 'सन्नसन् घटः' हा आहे. याचा अर्थ असा की, हा माठ आहे खरा परंतु तो पट (कपडा) नाही. कारण त्या दोहोंपासून तो वेगळा झाला आहे. (४) चौथा भंग 'घटोऽघटः' 'अघटःपटः' दुसऱ्या पटाच्या (वस्त्राच्या) अभावाची अपेक्षा आपणामध्ये असल्यामुळे घटाला अघट म्हणतात. त्याच्या दोन संज्ञा घट व अघट अशा युगपत (एकाच वेळी) होतात. (५) पाचवा भंग असा की, घटाला पट म्हणणे अयोग्य आहे. अर्थात त्यामध्ये घटत्व (घटपण) वक्तव्य आहे आणि पटत्व हे अवक्तव्य आहे. (६) सहावा भंग हा आहे की, जर घट नाही तर त्या विषयी बोलणेही योग्य नाही. व जर तो असेल तर त्याविषयी बोलणेही योग्य आहे. (७) सातवा भंग हा आहे की, जे वक्तव्यासाठी योग्य आहे परंतु जे नाही व वक्तव्यासाठी योग्य ही घट नाही. याला सातवा भंग म्हणतात. याच प्रकारे,

**स्यादस्ति जीवोऽयं प्रथमो भङ्ग ॥१॥ स्यान्नास्ति जीवो द्वितीयो भङ्ग ॥२॥ स्यादवक्तव्यो जीवस्तृतीयो भङ्ग ॥३॥ स्यादस्ति नास्तिरूपो जीवश्चतुर्थो भङ्ग ॥४॥ स्यादस्ति (च) अवक्तव्यो जीवः पञ्चमो भङ्ग ॥५॥ स्यान्नास्ति (च) वक्तव्यो जीवः षष्ठो भङ्ग ॥६॥ स्यादस्ति नास्ति अवक्तव्यो जीव इति सप्तमो भङ्ग ॥७॥**

हे लोक जीवाखेरीज ईश्वर हे दुसरे चेतन तत्त्व आहे, असे मानीत नाहीत. कोणीही अनादी सिद्ध ईश्वर नाही, असे बौद्ध व जैन लोक मानतात.

अर्थ : जीव आहे, असे म्हटले असता जीवाच्या विरोधी जड पदार्थांच्या जीवामध्ये अभाव होतो. हा प्रथम भंग होय. जडा मध्ये जीव नाही, असे म्हणणे हा दुसरा भंग होय. जीव आहे परंतु तो अवर्णनीय आहे, हा तिसरा भंग होय. जेव्हा जीव शरीर धारण करतो तेव्हा तो प्रकट असतो आणि जेव्हा तो शरीरापासून वेगळा होतो तेव्हा अप्रकट राहतो, असे म्हणणे हाच चतुर्थ भंग होय. जीव नक्की आहे परंतु त्याचे वर्णन करणे अशक्य आहे, असे म्हणणे हा पाचवा भंग होय. जीव प्रत्यक्ष प्रमाणाने दाखविता येत नाही म्हणून तो डोळ्यांना दिसत नाही, असे म्हणणे हा सहावा भंग होय. एका वेळी अनुमानाने जीवाचे असणे व अदृश्यत्वामुळे त्याचे नसणे, समान स्थितीत न राहणे परंतु क्षणोक्षणी परिणामाला प्राप्त होणे. अस्ति-नास्ति न होणे व नास्ति-अस्ति असा व्यवहारही न होणे हा सातवा भंग होय.

अशा प्रकारे ही नित्यत्व सप्तभंगी व अनित्यत्व सप्तभंगी आहे. तसेच सामान्य धर्म, विशेष धर्म, गुण व पर्याय या प्रत्येक वस्तू मध्ये सप्तभंगी असते. तसेच द्रव्य, गुण, स्वभाव व पर्याय अनंत असल्यामुळे सप्तभंगीही अनंत असते. हा असा बौद्ध व जैन लोकांचा स्याद्वाद आणि सप्तभंगी न्याय म्हटला जातो.

**(समीक्षक)** हे म्हणणे एका अन्योन्यभावातील साधर्म्य व वैधर्म्य यांना लागू पडू शकते. हे सरळ प्रकरण सोडून अवघड जाळे रचणे, हे केवळ अज्ञानी लोकांना फसविण्यासाठी असते. पाहा ! जीवाचा अजीवामध्ये अजीवाचा जीवामध्ये अभाव असतोच. जीव आणि जड (अचेतन) दोहोंमध्ये वर्तमानत्व (विद्यमानत्व) असल्यामुळे त्यांच्यात साधर्म्य आहे आणि एक चेतन व दुसरा जड (अचेतन) असल्यामुळे त्यांच्यात वैधर्म्य आहे. अर्थात जीवामध्ये चेतन (अस्तित्व) आहे व जडत्व (अचेतनत्व) नाही. याचप्रकारे जड़ामध्ये जडत्व (अचेतनत्व) आहे आणि चेतनत्व नाही. यावरून हे स्पष्ट होते की, गुणकर्मस्वभावाचे समान धर्म व विरुद्ध धर्म यांच्या विचाराच्या योगाने या लोकांचे सप्तभंगी व स्याद्वाद सहज लक्षात येऊ शकतात. मग एवढे सारे अवडंबर कशासाठी ? या बाबतीत बौद्ध व जैन यांचे एक मत आहे. थोडासा वेगळेपणा असल्याने भिन्न भावही असतो.

आता यानंतर केवळ **जैनमताचे** विवेचन करतो.

**चिदचिद् द्वे परे तत्त्वे विवेकस्तद्विवेचनम् ।**
**उपादेयमुपादेयं हेयं हेयं च कुर्वतः ॥१॥** सर्वदर्शन संग्रह. आर्हत जैन दर्शन

जैन लोक 'चित्' आणि 'अचित्' म्हणजे चेतन व जड (अचेतन) ही दोनच परतत्त्वे मानतात. या दोहोंच्या विवेचनाचे नाव विवेक असे आहे. जे-जे ग्रहण करण्यास योग्य आहे त्याचे ग्रहण करणे आणि जे-जे त्याज्य आहे त्याचा त्याग करणे, हे जो करतो त्याला विवेकी असे म्हणतात. ॥१॥

**हेयं हि कर्तृरागादि तत्कार्य्यमविवेकिनः ।**
**उपादेयं परं ज्योतिरूपयोगैकलक्षणम् ॥२॥** सर्वदर्शन संग्रह. आर्हत जैन दर्शन पृ. ६७

जगाचा कर्ता, रागादी विकार आणि 'ईश्वराने जग निर्माण केले' या अविवेकी मताचा त्याग करणे, तसेच योगाने लक्षित होणाऱ्या परमज्योतिस्वरूप जीवाचे ग्रहण करणे हे उत्तम आहे. ॥२॥

हे लोक जीवाखेरीज ईश्वर हे दुसरे चेतन तत्त्व आहे, असे मानीत नाहीत. कोणीही अनादी सिद्ध ईश्वर नाही, असे बौद्ध व जैन लोक मानतात.

या विषयी राजा शिवप्रसादजी 'इतिहासतिमिर नाशक' ग्रंथात लिहितात की, यांची दोन नावे आहेत : एक जैन व दुसरे बौद्ध. हे दोन्ही पर्यायवाची शब्द आहेत. बौद्धांमध्ये वाममार्गी, मद्यमांसाहारी बौद्ध आहेत. त्यांना जैनांचा विरोध आहे. परंतु महावीर व गौतम गणधर आहेत. त्यांचे नाव बौद्धांनी बुद्ध ठेवले आहे आणि जैनांनी गणधर व जिनवर असे ठेवले आहे. यांतील जिन यांची परंपरा जैनमताची आहे त्या राजा शिवप्रसादजींनी आपल्या 'इतिहासतिमिरनाशक' ग्रंथाच्या तिसऱ्या खंडात असे लिहिले आहे की, "स्वामी शंकराचार्यांच्या आधी संपूर्ण भारतवर्षात बौद्ध अथवा जैन पंथ पसरलेला होता. शंकराचार्य हे सुमारे एक हजार वर्षांपूर्वी होऊन गेले आहेत." यावर त्यांची टिप्पणी अशी आहे: "आम्ही जेव्हा बौद्धमत असे म्हणतो तेव्हा त्यांचा अर्थ असा की, गणधर महावीर अथवा गौतम स्वामी यांच्या काळापासून स्वामी शंकर यांच्या काळापर्यंत जो वेद विरोधी धर्म संपूर्ण भारत वर्षात पसरलेला होता त्याला उद्देशून आम्ही तो शब्द वापरला आहे. सम्राट अशोक व संप्रती महाराज हे त्या पंथाचे अनुयायी आहेत. जैन लोक या पंथामधून कोणत्याही प्रकारे बाहेर पडू शकत नाहीत किंवा अलिप्त राहू शकत नाहीत. जिन या शब्दापासून जैन आणि बुद्ध शब्दापासून बौद्ध हा शब्द तयार झाला आहे. जिन व बुद्ध हे दोन्ही पर्यायवाची शब्द आहेत. शब्दकोशामध्ये त्या दोन्ही शब्दांचा एकच अर्थ सांगितलेला आहे आणि गौतमाला दोन्ही पंथाचे लोक मानतात. एवढेच नव्हे तर दीपवंश वगैरे प्राचीन बौद्ध ग्रंथांमध्ये शाक्यमुनी गौतमबुद्ध यांचा उल्लेख बहुतेक ठिकाणी महावीर या नावानेच केला आहे. यावरून त्यांच्या काळी त्या दोघांचा एकच संप्रदाय चालू असावा असे दिसते. आम्ही गौतमांच्या अनुयायांना उद्देशून जैन हा शब्द न वापरता बौद्ध हा शब्द वापरला आहे, याचे कारण एवढेच आहे की, इतर देशांतील लोकांनी त्यांना उद्देशून बौद्ध हाच शब्द वापरला आहे. 'अमरकोशातही' असेच लिहिले आहे :-

**सर्वज्ञः सुगतो बुद्धो धर्मराजस्तथागतः ।**
**समन्तभद्रो भगवान् मारजिल्लोकजिज्जिनः ॥१॥**
**षडभिज्ञो दशबलोऽद्वयवादी विनायकः ।**
**मुनीन्द्रः श्रीघनः शास्ता मुनिः शाक्यमुनिस्तु यः ॥२॥**
**स शाक्यसिंहः सर्वार्थः सिद्धश्शौद्धोदनिश्च सः ।**
**गौतमश्चार्कबन्धुश्च मायादेवीसुतश्च सः ॥३॥** अमरकोश कां. १। वर्ग १। श्लो. ८-१०

आता तुम्हीच पाहा. बुद्ध, जिन आणि बौद्ध व जैन ही एकाचीच नावे आहेत की नाहीत ? अमरसिंहही बुद्ध व जिन एक आहेत, असे लिहिण्यामध्ये चुकला काय ? जे अविद्वान जैन आहेत ते आपलेही जाणत नाहीत आणि दुसऱ्याचेही जाणत नाहीत. ते केवळ हट्टाने बरळत असतात. परंतु जैनांमध्ये जे विद्वान आहेत ते सर्व जाणतात की 'बुद्ध' व 'जिन' आणि 'बौद्ध' व 'जैन' हे पर्यायवाची शब्द आहेत, यात मुळीच संशय नाही.

जैन लोक असे म्हणतात की, जीवच परमेश्वर होतो. ते आपल्या तीर्थंकरांनाच केवली, मुक्तिप्राप्त व परमेश्वर मानतात. अनादी परमेश्वर असा कोणी नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. सर्वज्ञ, वीतराग, अर्हन, केवली, तीर्थकृत, जिन ही सहा नास्तिकांच्या देवांची नावे आहेत. आदिदेवाचे स्वरूप चंद्रसूरीने 'आप्तनिश्चयालङ्कार' या ग्रंथात असे लिहिले आहे:-

**सर्वज्ञो वीतरागादिदोषस्त्रैलोक्यपूजितः ।**

**यथास्थितार्थवादी च देवोऽर्हन् परमेश्वरः ॥१॥** स. स. आ. द. पृ. ५६

जो रागादी (मोहादि) दोषांनी रहित, त्रैलोक्यामध्ये पूजनीय, यथावत पदार्थांचा वक्ता, सर्वज्ञ असा अर्हन देव आहे. तोच परमेश्वर होय. ॥१॥

त्याचप्रमाणे 'तौतातितां' (तुतातित-भट्ट कुमारिल) नीही लिहिले आहे :-

**सर्वज्ञो दृश्यते तावन्नेदानीमस्मदादिभिः ।**

**दृष्टो न चैकदेशोस्ति लिङ्गं वा योऽनुमापयेत् ॥२॥** आर्हत-दर्शन पृ. ५६

आपण यावेळी ज्याअर्थी परमेश्वराला पाहत नाही त्याअर्थी कोणी सर्वज्ञ व अनादी परमेश्वर प्रत्यक्ष अस्तित्वात नाही. ईश्वराच्या बाबतीत प्रत्यक्ष प्रमाण नसल्यामुळे अनुमान प्रमाणही लागू पडत नाही. कारण कोणत्याही पदार्थाचा एक भाग प्रत्यक्ष दिसल्याखेरीज त्याच्याविषयी अनुमान करता येत नाही. ॥२॥

**न चागमविधिः कश्चिन्नित्यसर्वज्ञबोधकः**

**न च तत्रार्थवादानां तात्पर्यमपि कल्प्यते ॥३॥** आर्हत-दर्शन पृ. ५६

ज्याअर्थी प्रत्यक्ष व अनुमान ही प्रमाणे विद्यमान नाहीत त्याअर्थी आगम म्हणजे शब्द प्रमाणही नित्य, अनादी, सर्वज्ञ, परमात्म्याचा बोधक होऊ शकत नाही. ज्याअर्थी ही तीन्ही प्रमाणे संभवत नाहीत त्याअर्थी अर्थवाद म्हणजे स्तुती, निंदा व परकृती म्हणजे दुसऱ्याच्या चरित्राचे वर्णन व पुराकल्प म्हणजे इतिहासाचे तात्पर्यही (संदर्भही) लागू पडत नाहीत. ॥३॥

**न चान्यार्थप्रधानैस्तैस्तदस्तित्वं विधीयते ।**

**न चानुवदितुं शक्यः पूर्वमन्यैरबोधितः ॥४॥** आर्हता-दर्शन पृ. ५६

तसेच अन्यार्थप्रधान म्हणजे बहुव्रीही समासाप्रमाणे परोक्ष परमात्म्याच्या सिद्धीचे विधानही होऊ शकत नाही. तसेच, ईश्वराच्या उपदेशकांकडून ऐकल्याशिवाय ईश्वराचे गुण, कर्म, स्वभाव इत्यादींचा अनुवाद (पुनरुच्चार) तरी कसा होऊ शकेल ? ॥४॥

(या मताचे प्रत्याख्यान म्हणजे खंडन) जर अनादी ईश्वर नसता तर 'अर्हन्' देवांच्या मातापितादिकांच्या शरीराचा साचा कोणी बनविला असता ? संयोगकर्त्यावाचून यथायोग्य, सर्व अवयवांनी संपन्न, यथोचित कार्य करण्यास उपयुक्त, असे शरीर तयार होऊ शकत नाही आणि ज्या पदार्थांचे शरीर बनले आहे ते जड (अचेतन) असल्यामुळे ते स्वतःच अशा प्रकारच्या उत्तम रचनेने युक्त शरीर धारण करू शकत नाहीत. कारण त्यांच्यामध्ये यथायोग्य बनण्याचे ज्ञानच नाही. तसेच जो प्रथमतः रागादी (मोहादि) दोषांनी युक्त असतो व नंतर दोष रहित

बनतो तो कधीही ईश्वर होऊ शकत नाही. कारण ज्या निमित्ताने तो रागादी (मोहादि) कांपासून मुक्त होतो ते मुक्तीचे निमित्त नाहीसे झाल्यावर त्या निमित्ताचे कार्य जी मुक्ती तीच अनित्य होईल. जो अल्प व अल्पज्ञ आहे तो सर्वव्यापक व सर्वज्ञ कधीच होऊ शकत नाही. कारण जीवाचे स्वरूप एकदेशी असते आणि तो परिमित गुणकर्मस्वभावयुक्त असतो. तो सर्व विद्यांमध्ये सर्व प्रकारे यथार्थवक्ता होऊ शकत नाही. म्हणून तुमचे तीर्थंकर कधीच परमेश्वर होऊ शकत नाहीत. ॥१॥

जे पदार्थ प्रत्यक्ष दिसतात त्यांनाच तुम्ही मानता काय ? अप्रत्यक्षाना नाही ? ज्याप्रमाणे कानांनी रूपाचे व डोळ्यांनी शब्दाचे ग्रहण होऊ शकत नाही. त्याप्रमाणे परमेश्वराचे ग्रहणही इंद्रिये करू शकत नाहीत. अनादी परमात्म्याला पाहण्याचे साधन शुद्ध अंत:करण हे आहे. विद्या आणि योगाभ्यास यांनी पवित्र बनलेला आत्मा परमात्म्याला प्रत्यक्ष पाहू शकतो. ज्याप्रमाणे अभ्यास केल्यावाचून विद्येच्या प्रयोजनांची प्राप्ती होत नाही त्याचप्रमाणे योगाभ्यास व विज्ञान यांच्यावाचून परमात्माही दिसत नाही. ज्याप्रमाणे भूमीचे रूपादी गुण पाहून व जाणूनच गुणांच्या अव्यवहित संबंधाने पृथ्वी प्रत्यक्ष होत असते; त्याप्रमाणे परमेश्वराने केलेली या सृष्टितील अद्‌भुत रचना पाहून त्याचे बुद्धीद्वारे जणू प्रत्यक्षच झाल्यासारखे जाणवते. तसेच जेव्हा पापाचरणाची इच्छा होते त्यावेळी मनात जी भीती, शंका व लज्जा उत्पन्न होते, ती अंतर्यामी परमात्म्याच्या प्रेरणेनेच होत असते. त्यातूनही परमात्मा प्रत्यक्ष होतो. मग अनुमान होण्यामध्ये काय संशय ? ॥२॥

प्रत्यक्ष व अनुमान यांची प्रमाणे अशा प्रकारे उपलब्ध होत असल्याने आगम प्रमाणही नित्य, अनादि, सर्वज्ञ ईश्वराचे बोधक होते. म्हणून ईश्वराच्या बाबतीत शब्द प्रमाणही विद्यमान असते. ज्याअर्थी या तीन्ही प्रमाणांच्या साह्याने जीव ईश्वराला जाणू शकतो त्याअर्थी अर्थवाद म्हणजे परमेश्वराच्या गुणांची प्रशंसा करणे हेही यथार्थ असू शकते. कारण जे पदार्थ नित्य आहेत त्यांचे गुणकर्मस्वभावही नित्य असतात. त्यांची प्रशंसा करण्यास कसलीच आडकाठी नाही. ॥३॥

ज्याप्रमाणे मनुष्यांमध्ये कर्त्यावाचून कोणतेही कार्य होत नाही त्याचप्रमाणे हे महत्कार्य कर्त्यावाचून होणे पूर्णपणे असंभव आहे. असे जर आहे तर ईश्वराच्या अस्तित्वाविषयी मूढालाही संदेह होऊ शकत नाही. उपदेश करणाऱ्यांकडून परमात्म्याचे गुणगान ऐकल्यानंतर त्याचा पुनरुच्चार करणेही सोपे आहे. ॥४॥

यावरून जैन लोक प्रत्यक्षादी प्रमाणांनी ईश्वराचे जे खंडन करतात ते कसे अनुचित आहे, हे लक्षात येईल.

**(प्रश्न) अनादेरागमस्यार्थो न च सर्व-आदिमान्।**
**कृत्रिमेण त्वसत्येन स कथं प्रतिपाद्यते ॥१॥** आर्हत-दर्शन पृ. ५६,५७

यामध्ये सर्वज्ञ झालेला अनादी शास्त्राचा अर्थ होऊ शकत नाही. कारण असत्य वचनाने सर्वज्ञ परमात्म्याचे प्रतिपादन कसे होऊ शकेल ? ॥१॥

**अथ तद्वचनेनैव सर्वज्ञोऽन्यैः प्रतीयते।**
**प्रकल्प्येत कथं सिद्धिरन्योऽन्याश्रययोस्तयोः ॥२॥** आर्हत-दर्शन पृ. ५६,५७

जर परमेश्वराच्याच वचनाने परमेश्वर सिद्ध होत असेल तर अनादी ईश्वराने अनादी शास्त्राची सिद्धी आणि अनादी शास्त्राने अनादी ईश्वराची सिद्धी हा अन्योन्याश्रय दोष घडतो. ॥२॥

**सर्वज्ञोक्ततया वाक्यं सत्यं तेन तदस्तिता।**

**कथं तदुभयं सिध्येत् सिद्धमूलान्तराद्दृते ॥३॥** आर्हत-दर्शन पृ. ५६,५७

कारण सर्वज्ञाच्या कथनानुसार वेदवाक्य हे सत्य मानावयाचे आणि त्याच वेदवचनाच्या आधारे ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करावयाचे, हे कसे होऊ शकेल ? वेदशास्त्र व परमेश्वर यांच्या सिद्धीसाठी एखादे तिसरे प्रमाण हवे. जर तसे मानाल तर अनवस्था हा दोष घडेल. ॥३॥

**(उत्तर)** आम्ही परमेश्वराला आणि त्याच्या गुणकर्मस्वभावाला अनादी मानतो. अनादी, नित्य पदार्थांमध्ये अन्योन्याश्रय दोष येऊ शकत नाही. ज्याप्रमाणे कार्यावरून कारणाचे ज्ञान होते आणि कारणांवरून कार्याचा बोध होतो. कारण, कार्यामध्ये कारणाचा स्वभाव आणि कारणामध्ये कार्याचा स्वभाव नित्य असतो. त्याप्रमाणे परमेश्वर आणि त्याचे विद्यादी अनंत गुण नित्य असल्याने वेद हे ईश्वर प्रणीत आहेत, असे म्हणण्यात अनवस्था हा दोष घडत नाही. ॥१।२।३॥

तुम्ही तीर्थंकरांना परमेश्वर मानता ते कधीच खरे असू शकत नाही. कारण आईबापांवाचून त्यांचे शरीर निर्माण झाले नसते. मग त्यांनी तपश्चर्या करून ज्ञान व मुक्ती कशी मिळवली असती ? तसेच संयोगाचा आरंभ अवश्य असला पाहिजे. कारण वियोगावाचून संयोग होऊ शकत नाही. म्हणून अनादी सृष्टीकर्ता परमात्मा मानला पाहिजे.

पाहा ! कोणी कितीही सिद्ध पुरुष असला तरी शरीरादिकाची रचना तो पूर्णपणे जाणू शकत नाही. तेव्हा सिद्ध जीव सुषुप्तीच्या म्हणजे स्वप्नरहित गाढ झोपेच्या अवस्थेत जातो तेव्हा त्याला कसलेही भान राहत नाही. जेव्हा जीव दुःखी होतो तेव्हा त्याचे ज्ञानही कमी होते. अशा मर्यादित सामर्थ्याच्या व परिमित स्थानात राहणाऱ्या वस्तूला ईश्वर मानणे, ही गोष्ट भ्रमिष्ट बुद्धीच्या जैनांखेरीज कोणाकडूनही होणार नाही. जर तुमचे म्हणणे असे असेल की, तीर्थंकार हे त्यांच्या आईबापांपासून निर्माण झाले, तर ते आई बाप कोणापासून उत्पन्न झाले ? आणि त्यांचे आई बाप, त्यांच्या आईबापांचे आई बाप कोणापासून उत्पन्न झाले ? अशी अनावस्था होईल.

## आस्तिक-नास्तिक संवाद

यानंतर 'प्रकरण रत्नाकरा' च्या दुसऱ्या भागातील आस्तिक व नास्तिक यांच्या संवादातील प्रश्नोत्तरे आम्ही येथे देत आहोत. मोठमोठ्या जैनांनी या संवादाला मान्यता दिलेली असून तो त्यांनी मुंबईत छापून प्रसिद्ध केला आहे.

**(नास्तिक)** ईश्वराच्या इच्छेने काही होत नाही. जे काही होते ते कर्माने होते.

**(आस्तिक)** जर सर्व कर्माने होते तर कर्म कशाने होते ? जीवादिकांकडून कर्म होते असे तुमचे म्हणणे असेल तर ज्या श्रोतादी साधनांनी जीव कर्म करतो ती साधने कोणापासून उत्पन्न झाली ? जर तुमचे असे म्हणणे असेल की, ती अनादिकाळापासून आहेत आणि स्वभावतः उत्पन्न होतात तर अनादीचे सुटणे अशक्य होऊन तुमच्या मते मुक्तीचा अभाव होईल. जर तुम्ही असे म्हणाल की, प्राक अभाववत अनादी सांत आहेत, तर प्रयत्नावाचून सारी कर्मे निवृत्त होऊन जातील. जर ईश्वर फळ देणारा नसेल तर जीव स्वेच्छेने पापाचे फळ

असणारे दु:ख कधीच भोगणार नाही. ज्याप्रमाणे चोर वगैरे चोरीचे फळ असणारी शिक्षा स्वेच्छेने भोगत नाहीत, राज्यव्यवस्थेमुळे भोगतात. त्याचप्रमाणे परमेश्वराने भोगावयास भाग पाडल्यामुळे जीव पापाची व पुण्याची फळे भोगतात. तसे झाले नाही तर कर्मसंकर होईल. एकाची कर्मे दुसऱ्याला भोगावी लागतील.

**(नास्तिक)** ईश्वर अक्रिय आहे. कारण तो जर कर्म करणारा असता तर त्यालाही कर्माचे फळ भोगावे लागले असते. जसे आम्ही केवली प्राप्त मुक्तांना अक्रिय मानतो तसे तुम्हीही माना.

**(आस्तिक)** ईश्वर अक्रिय नसून सक्रिय आहे. जर तो चेतन आहे तर कर्ता कसा नसेल ? आणि जर तो कर्ता आहे तर क्रियेहून वेगळा कधीही राहू शकणार नाही. तुम्ही तुमच्या कृत्रिम, बनावटी तीर्थंकरांना जीवांपासून बनलेले ईश्वर मानता. अशा प्रकारच्या ईश्वराला कोणीही विद्वान मानू शकत नाही. कारण जर निमित्त कारणांनी ईश्वर बनला तर तो अनित्य व पराधीन होईल. कारण ईश्वर बनण्यापूर्वी तो जीव होता. नंतर काही कारणांनी तो ईश्वर बनला तरी पुन: जीव होईल. जीव आपला जीवत्व स्वभाव कधीही सोडू शकत नाही. कारण तो अनंत काळापासून जीव असून अनंत काळापर्यंत जीवच राहणार आहे. म्हणून हा अनादी स्वयंसिद्ध ईश्वर मानणे योग्य होय.

पाहा ! वर्तमान काळामध्ये जीव जसे पाप-पुण्य करतो व सुखदु:ख भोगतो तसे ईश्वर कधीही करीत नाही. ईश्वर क्रियावान नसता तर तो या जगाची निर्मिती कसा करू शकला असता ? जर तुम्ही कर्मांना प्राक अभावत अनादी सांत मानत असाल तर ते कर्म समवाय संबंधाने राहणार नाही. जर समवाय संबंध नसेल तर ते संयोगजन्य बनून अनित्य होते. मुक्तीमध्ये क्रियाच नसते असे तुम्ही मानता. तर मग ते मुक्त जीव ज्ञानवान असतात की नाही ? तसे ते असतात असे तुमचे म्हणणे असेल तर ते अंत:क्रियायुक्त ठरतात. नाहीतर ते काय मुक्तीमध्ये पाषाणवत जड होऊन जातात व एके ठिकाणी पडून राहतात आणि कसलीही हालचाल करीत नाहीत ? तसे असेल तर ही मुक्ती कसली ? ते तर अंध:कारात व बंधनात पडणे झाले.

**(नास्तिक)** ईश्वर सर्वव्यापक नाही. तो सर्वव्यापी असता तर सगळ्या वस्तू चेतन का नसतात ? आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादींची उत्तम, मध्यम, निकृष्ट अवस्था का झाली ? जर ईश्वर सर्वांमध्ये समान रूपाने व्याप्त असेल तर लहान, मोठा असा फरक असता कामा नये.

**(आस्तिक)** व्याप्य व व्यापक हे एकच असत नाहीत. व्याप्य हा एकदेशी म्हणजे स्थानिक किंवा स्थानसीमित असतो आणि व्यापक हा सर्वदेशी म्हणजे सर्वत्र पसरलेला असतो. आकाश हे सर्वव्यापक आहे आणि भूगोल व घटपटादी सर्व व्याप्य गोष्टी एकदेशी आहेत. जसे पृथ्वी व आकाश हे एक नाहीत तसे ईश्वर व जग हे एक नाहीत. ज्याप्रमाणे सर्व घटपटादिकांमध्ये आकाश व्यापक आहे आणि घटपटादी आकाश नाही त्याप्रमाणे चेतन परमेश्वर सर्वांमध्ये भरून राहिलेला असला तरी सर्व पदार्थ चेतन होत नाहीत. ज्याप्रमाणे आकाश सर्वांमध्ये समान असते आणि पृथ्वी आदी पदार्थांचे अवयव समान नसतात त्याप्रमाणे परमेश्वरासमान कोणी नाही. ज्याप्रमाणे विद्वान व अविद्वान, धर्मात्मा व अधर्मात्मा यांची बरोबरी होऊ शकत नाही त्याप्रमाणे विद्यादी सद्गुण, सत्यभाषणादि सत्कर्मे, सुशीलतादी स्वभाव यांच्या न्यूनाधिक्यामुळे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य,

शुद्र व अंत्यज हे लहान वा मोठे मानले जातात. वर्णासंबंधीचे विवेचन चतुर्थ समुल्लासात आम्ही केले आहे ते पाहावे.

**(नास्तिक)** ईश्वराने जगाचे आधिपत्य आणि जगत्‌रूपी ऐश्वर्य यांचा स्वीकार कशासाठी केला ?

**(आस्तिक)** ईश्वराने जगाचे आधिपत्य कधीही ग्रहण केले नव्हते अथवा सोडलेही नव्हते. परंतु आधिपत्य आणि जगत्‌रूपी ऐश्वर्य या गोष्टी ईश्वरामध्येच आहेत. तो त्यापासून कधी वेगळा होऊ शकत नाही. तेव्हा ग्रहण काय करणार ? कारण अप्राप्त असेल त्याचेच ग्रहण होऊ शकते. व्याप्यापासून व्यापक आणि व्यापकापासून व्याप्य कधी वेगळे होऊ शकत नाही. त्यामुळे अनादी काळापासून सदैव स्वामित्व व अनंत ऐश्वर्य ईश्वरामध्ये आहे. त्याचे ग्रहण व त्याग जीवांच्या बाबतीत घडू शकते. ईश्वराबाबतीत ती शक्यता नसते.

**(नास्तिक)** ईश्वराने रचल्यामुळे सृष्टी अस्तित्वात आली असेल तर आई-बापांचे कार्य काय ?

**(आस्तिक)** ऐश्वरी सृष्टीचा कर्ता ईश्वर आहे. तो जीवसृष्टीचा कर्ता नाही. जीवांची जी कर्तव्यकर्मे आहेत ती ईश्वर करीत नाही. ती जीवच करतात. जसे वृक्ष, फळे औषधी, अन्न इत्यादी गोष्टी ईश्वराने उत्पन्न केल्या आहेत. आता त्या वस्तू घेऊन त्या दळून, कुटून, पोळी, भाकरी वगैरे पदार्थ माणसाने बनविले व खाल्ले नाहीत तर त्याच्या ऐवजी परमेश्वर त्या गोष्टी करील काय ? जीवांनी या गोष्टी केल्या नाहीत तर जीवन जगणेच शक्य नाही. म्हणून आदी सृष्टीमध्ये जीवांच्या शरीरांचे साचे बनविणे हे ईश्वराधीन असते. त्यानंतर त्यांपासून पुत्रादींची उत्पत्ती करणे हे जीवांचे कर्तव्य कर्म असते.

**(नास्तिक)** जर परमात्मा शाश्वत, अनादी, चिदानंद, ज्ञानस्वरूप आहे तर जगाच्या प्रपंचात व दुःखात तो का पडला ? आनंद सोडून दुःख ग्रहण करण्याचे असले काम कोणी सामान्य मनुष्यही करीत नाही. मग ईश्वराने ते का केले ?

**(आस्तिक)** परमेश्वर कसल्याही कटकटीत व दुःखात पडत नाही. तो आपल्या आनंदाचा त्यागही करीत नाही. कारण कटकटीत व दुःखात पडणे ही गोष्ट जो एकदेशी व मर्यादित असेल त्याच्या बाबतीत संभवते. जो सर्वदेशी आहे त्याच्या बाबतीत ती संभवत नाही. जर अनादी, चिदानंद, ज्ञानस्वरूप परमात्मा जगाची उत्पत्ति करणार नाही तर दुसरा कोण करू शकेल ? जग निर्माण करण्याचे सामर्थ्य जीवामध्ये नाही; आणि जडामध्ये स्वतः बनण्याचेही सामर्थ्य नाही. यावरून हे सिद्ध होते की, परमात्माच जगाची निर्मिती करतो व सदा आनंदात राहतो. परमात्मा जसा परमाणूंपासून सृष्टि निर्माण करतो तसा मातापितारूपी निमित्त कारणाच्या योगाने जीवाची उत्पत्ती होण्याच्या व्यवस्थेचा नियम त्यानेच केला आहे.

**(नास्तिक)** ईश्वर मुक्तिरूपी सुख सोडून जगाची सृष्टी करणे, ती धारण करणे व प्रलय करणे या भानगडीत कशाला पडला ?

**(आस्तिक)** ईश्वर सदैव मुक्त असल्यामुळे तुमच्या साधनांनी सिद्ध झालेल्या, एका देशात राहणाऱ्या, बंधनपूर्वक मुक्तीने युक्त अशा तीर्थकरांप्रमाणे तो सनातन परमात्मा नाही. जो अनंतस्वरूपी, गुणकर्मस्वभावयुक्त परमात्मा आहे तो या किंचित मात्र जगाची उत्पत्ति, स्थिती व लय करीत असूनही बंधनात पडत नाही. कारण

बंधन व मोक्ष या गोष्टी परस्पर सापेक्ष आहेत. जसे मुक्तीच्या अपेक्षेने बंधन आणि बंधनाच्या अपेक्षेने मुक्ती होत असते. जो कधी बद्ध नव्हता त्याला मुक्त कसे म्हणता येईल ? जे जीव एकदेशी असतात तेच सदा बद्ध व मुक्त होत असतात. अनंत, सर्वदेशी, सर्वव्यापक ईश्वर, तुमच्या तीर्थंकरांप्रमाणे नैमित्तिक बंधन-मुक्तीच्या चक्रात कधी अडकत नाही. म्हणून तो परमात्मा सदैव मुक्त असतो, असे म्हटले जाते.

**(नास्तिक)** भांग घेतली असता तिची नशा जशी भांग पिणाऱ्याला आपोआपच भोगावी लागते. तसेच जीव कर्माची फळे भोगतात. त्यात ईश्वराचा काहीही संबंध नाही.

**(आस्तिक)** राजाचे शासन नसेल तर चोर, डाकू, लंपट इत्यादी दुष्ट माणसे स्वत: होऊन तुरुंगात किंवा फाशीला जात नाहीत किंवा जाऊ इच्छित नाहीत. परंतु राज्याच्या न्यायव्यवस्थेप्रमाणे त्यांना बळजबरीने पकडून राजा त्यांना शिक्षा देत असतो. याचप्रमाणे जीवालाही ईश्वर त्याच्या कर्मानुसार न्यायव्यवस्थेच्या योगाने यथायोग्य शिक्षा देतो. कारण कोणताही जीव आपल्या दुष्ट कर्मांची फळे भोगू इच्छित नाही. म्हणून न्यायनिवाडा करण्यासाठी न्यायाधीश म्हणून परमेश्वराची आवश्यकता आहे.

**(नास्तिक)** जगामध्ये एक ईश्वर असून जितके मुक्त जीव आहेत ते सगळे ईश्वर आहेत.

**(आस्तिक)** हे म्हणणे पूर्णपणे निरर्थक आहे. कारण जो प्रथम बद्ध असतो तो मुक्त होऊन पुन: बंधनात अवश्य अडकतो. कारण तो स्वाभाविकपणे सदैव मुक्त नसतो. तुमचे चोवीस तीर्थंकर पूर्वी बद्ध होते. नंतर ते मुक्त झाले. ते पुन: बंधनात अवश्य पडतील. तुमच्या म्हणण्याप्रमाणे जीवांसारखेच ईश्वरही अनेक असतील तर जीव अनेक असल्यामुळे जसे आपसात भांडतात तसे ईश्वरही आपसात मारामाऱ्या करतील.

**(नास्तिक)** हे मूढ ! जगाचा कर्ता (निर्माता) कोणी नाही. जग हे स्वयंसिद्ध आहे.

**(आस्तिक)** ही जैनांची फार मोठी घोडचूक आहे. कर्त्यावाचून कोणतेही कर्म आणि कर्मावाचून कोणतेही कार्य होत असलेले जगात दिसते काय ? गव्हाच्या शेतात गहू आपोआप दळले जाऊन त्यांच्या चपात्या बनून त्या जैनांच्या पोटात जाव्यात अशी ही गोष्ट आहे. कापसापासून सूत, कापड व अंगरखा, दुपट्टा, धोतर, पगडी इत्यादी कपडे आपोआप बनत नाहीत. जर असे आहे तर कर्त्या ईश्वरावाचून हे विविध जग आणि नाना प्रकारची विशेष रचना कशी बनू शकेल ? जर तुम्ही हट्टाने हे जग स्वयंसिद्ध आहे असे मानणार असाल तर वर सांगितेली वस्त्रे कर्त्यावाचून आपोआप तयार होतात असे तुम्ही प्रत्यक्ष दाखवून द्या. जर तुम्ही तसे सिद्ध करू शकत नसाल तर मग तुमचे निराधार कथन कोणता बुद्धिमान मानू शकतो ?

**(नास्तिक)** ईश्वर विरक्त आहे की मोहित ? तो विरक्त असेल तर जगाच्या प्रपंचात तो का पडला ? जर तो मोहित असेल तर जग बनविण्यास समर्थ होणार नाही.

**(आस्तिक)** परमेश्वरामध्ये वैराग्य अथवा मोह कधीच संभवत नाही. कारण जो सर्वव्यापक आहे तो कोणाला सोडणार व कोणाचे ग्रहण करणार ? ईश्वराहून उत्तम किंवा त्याला अप्राप्त असा कोणताही पदार्थ नाही. त्यामुळे कोणत्याही गोष्टीचा मोह त्याला होत नाही. वैराग्य व मोह होणे या गोष्टी जीवाच्या बाबतीत घडतात, ईश्वराच्या बाबतीत नाही.

**(नास्तिक)** ईश्वराला जगाचा कर्ता व जीवांच्या कर्मांची फळे देणारा समजाल तर ईश्वर ऐहिक गोष्टींत गुरफटून दु:खी होईल.

**(आस्तिक)** पाहा! अनेकविध कर्मांचा कर्ता आणि प्राण्यांना त्यांच्या कर्मांची फळे देणारा या जगातील धार्मिक, न्यायाधीश, विद्वान माणूस जर कर्मांमध्ये गुंतत नाही व दु:खी होत नाही तर अनंत सामर्थ्यसंपन्न परमेश्वर ऐहिक गोष्टीत कसा गुरफटेल व कसा दु:खी होईल? बाकी तुम्ही स्वत:प्रमाणे व आपल्या तीर्थंकराप्रमाणे परमेश्वरासही अज्ञानयुक्त समजता. ही सारी तुमच्या अविद्येची लीला आहे. अविद्यादी दोषांपासून मुक्त होण्याची तुमची इच्छा असेल तर तुम्ही वेदादी सत्य शास्त्रांचा आश्रय घ्या. निष्कारण भ्रमात पडून धक्के का खाता?

## जगाच्या अनादीत्वाची समीक्षा

आता जैन लोक जगाकडे कोणत्या दृष्टीने पाहातात व मानतात ते त्यांच्या सूत्रांच्या आधाराने आम्ही दाखवतो आणि सूत्रांचा मूळ अर्थ संक्षेपाने सांगून मग खऱ्या खोट्याची समीक्षा करतो :-

**मूल- सामि अणाइ अणन्ते, चउगई संसारघोरकान्तारे।**
**मोहाइ कम्मगुरुठिइ, विवागवसउ भमइ जीवो ॥**

प्रकरण रत्नाकर भाग दुसरा षष्ठीशतक। (२) सम्यक्त्वस्वरूपस्तव। सूत्र २।

हे प्रकरण रत्नाकर नावाच्या ग्रंथाच्या 'सम्यक्त्वप्रकाश' या प्रकरणातील गौतम व महावीर यांचा संवाद आहे. याचा संक्षेपाने उपयोगी अर्थ असा आहे की, जग हे अनादि अनंत आहे. याची कधीही उत्पत्ती झाली नाही व कधीही नाश होणार नाही. अर्थात हे जग कोणीही बनविलेली नाही. आस्तिक, नास्तिक संवादामध्ये हीच गोष्ट याच शब्दांत सांगितलेली आहे की, "हे मूढा! जगाचा कर्ता कोणीही नाही. हे कधी बनले नाही आणि याचा नाश कधी होत नाही."

**(समीक्षक)** जो संयोगाने उत्पन्न होतो तो कधीच अनादी व अनंत असू शकत नाही. तसेच कर्मांची उत्पत्ती व विनाश झाल्याखेरीज राहत नाही. जगामध्ये जितके पदार्थ उत्पन्न होतात ते सर्व संयोगजन्य उत्पत्ती व विनाशयुक्त असल्याचे दिसतात. मग हे जग उत्पत्तीविनाशयुक्त का नाही? म्हणून तुमच्या तीर्थंकरांना सम्यक बोध झालेला नव्हता हेच खरे. त्यांना सम्यक ज्ञान झाले असते तर त्यांनी अशा अशक्य गोष्टी कशाला लिहिल्या असत्या? जसे तुमचे गुरू आहेत तसेच तुम्ही त्यांचे शिष्य आहात. तुमच्या गोष्टी ऐकणाऱ्यांना पदार्थांचे खरे ज्ञान कधीच होऊ शकणार नाही.

पाहा! जो प्रत्यक्ष संयुक्त (संयोगजन्य) पदार्थ दिसतो त्याची उत्पत्ती व विनाश तुम्ही का मान्य करीत नाही? अर्थात यांच्या आचार्यांना व जैनांना भूगोल-खगोल विद्याही येत नव्हती; आणि आजही त्यांच्यात ही विद्या नाही. नाहीतर खाली लिहिलेल्या अशक्य गोष्टी त्यांनी का मानल्या व सांगितल्या असत्या?

पाहा! या सृष्टीमध्ये पृथ्वीकाय म्हणजे पृथ्वी ही जीवाचे शरीर आहे आणि जलकायादी जीवही आहेत, असे मानतात. पण त्यांचे हे म्हणणे इतर कोणीही मान्य करू शकणार नाहीत. यांच्या असल्याच आणखी काही खोट्या गोष्टी पाहा. ज्या तीर्थंकरांना जैन लोक सम्यक ज्ञानी व परमेश्वर मानतात त्यांच्या खोटेपणाचे हे नमुने

आहेत. 'रत्नसारभाग' या ग्रंथाच्या १४५ व्या पृष्ठावर काळाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. : (या ग्रंथाला जैन लोक मानतात. २८ एप्रिल १८७९ रोजी बनारसच्या जैनप्रभाकर छापखान्यात नानकचंद जती यांनी हा ग्रंथ छापून प्रसिद्ध केला आहे.)

समयाचे नाव सूक्ष्मकाल असे आहे. असंख्यात समयांना 'आवलि' असे म्हणतात. एक कोटी, सदुसष्ट लाख, सत्तर हजार, दोनशे सोळा आवल्यांचा एक मुहूर्त होतो. अशा तीस मुहूर्तांचा एक दिवस, पंधरा दिवसांचा एक पक्ष, दोन पक्षांचा एक महिना आणि बारा महिन्यांचे एक वर्ष होते. अशा सत्तर लाख कोटी, छप्पन्न हजार कोटी वर्षांचा एक पूर्व होतो. अशा असंख्यात पूर्वांचा एक 'पल्योपम काळ' होतो असे म्हणतात.

असंख्यात म्हणजे काय ? चार कोस चौरस आणि तितकीच खोल अशी एक विहीर खणावी आणि ती जुगुली माणसाच्या शरीरावरील निम्नलिखित केसांच्या तुकड्यांनी भरावी. हल्लीच्या माणसाच्या केसांहून जुगुली माणसाचा केस चार हजार शहाण्णवव्या हिश्श्याने सूक्ष्म असतो. म्हणजे जुगुली माणसाचे चार हजार शहाण्णव केस एकत्र केले तर आजकालच्या माणसाचा एक केस होतो. अशा जुगुली माणसाच्या एका केसांच्या अंगुळाएवढ्या भागाचे सात वेळा आठ-आठ तुकडे केल्यास २०,९७,१५२ म्हणजे वीस लाख, सत्त्याण्णव हजार, एकशे बावन्न तुकडे होतात. अशा तुकड्यांनी वर सांगितलेली विहीर भरावयाची. त्यातून दर शंभर वर्षांनी एक तुकडा बाहेर काढावयाचा. जेव्हा सर्व तुकडे बाहेर काढले जातील व विहीर रिकामी होईल तेव्हा त्यासाठी जेवढा काळ लागला असेल त्याला 'संख्यात काळ' असे म्हणतात.

आता त्यांपैकी एकेका तुकड्याचे असंख्यात तुकडे करून तीच विहीर अशी ठासून भरावयची की, तिच्यावरून चक्रवर्ती राजाची सेना चालत गेली तरी तो ढीग दबता कामा नये. त्या तुकड्यांपैकी दर शंभर वर्षांनी एकेक तुकडा काढावयाचा. अशा प्रकारे जेव्हा ती विहीर रिकामी होईल तेव्हा त्यासाठी लागलेला काळ हा त्यात असंख्यात पूर्व पडेल. तेव्हा एक 'पल्योपम' काळ होतो, हा पल्योपम काळ विहीरीच्या दृष्टांतावरून जाणावा.

जेव्हा दहा कोट्यान् कोटी पल्योपम काळ व्यतीत होतो. तेव्हा एक 'सागरोपम काळ' होतो. जेव्हा दहा कोट्यान् कोटी सागरोपम काळ निघून जातात तेव्हा एक 'उत्सर्प्पिणी काळ' होतो आणि जेव्हा एक उत्सर्प्पिणी व अवसर्प्पिणी काळ व्यतीत होतो तेव्हा एक 'कालचक्र' होते. जेव्हा अनंत कालचक्रे व्यतीत होतात तेव्हा एक 'पुद्गलपरावर्त्त' होतो.

आता अनंत काळ कशाला म्हणावयाचे ? सिद्धांत पुस्तकामध्ये नऊ दृष्टांतानी काळाची संख्या (गणती) केलेली आहे. त्याच्या पलीकडे असणाऱ्या काळाला अनन्तकाळ असे म्हणतात. जीवाचे भ्रमण चालू असतांना असे अनन्त पुद्गल परावर्त काळ व्यतीत झाले आहेत. इत्यादी:

**(समीक्षक)** गणितज्ञविद्याविशारद लोकहो, ऐका ! जैनांच्या ग्रंथांतील काळ गणना तुम्ही करू शकाल काय ? आणि ती गणना तुम्ही खरी मानू शकाल काय ? पाहा ! या तीर्थकरांचे गणितविद्येचे ज्ञान हे असे होते.

ज्यांच्या अविद्येला काही पारावार नाही असे गुरू व शिष्य यांच्या संप्रदायात आहेत. त्यांच्या अफाट अडाणीपणाची आणखी काही उदाहरणे पाहा.

ऋषभदेवापासून महावीरापर्यंत जैनांचे चोवीस तीर्थंकर होऊन गेले आहेत. त्यांच्या वचनांचा सारसंग्रह 'रत्नसारभाग' या ग्रंथात करण्यात आला आहे. या ग्रंथाच्या पृष्ठ १३३ पासून जैनांचे सिद्धांत ग्रथित करण्यात आले आहेत. या ग्रंथाच्या पृष्ठ १४८ वर असे लिहिले आहे की, माती, दगड इत्यादी पृथ्वीपासून भिन्न असून त्यांना पृथ्वीकाय जीव समजावे. त्यात राहणाऱ्या जीवांच्या शरीराचे परिमाण (आकार) एका अंगुळाचा असंख्यातवा भाग समजावा. म्हणजे असे की ते असंख्य सूक्ष्म जीव असतात. त्यांचे आयुर्मान जास्तीत जास्त २२ हजार वर्षे असते.

'रत्नसारभाग' पृ. १४९ : वनस्पतीच्या एका शरीरात अनंत जीव असतात. त्यांना साधारण वनस्पती असे म्हणतात. जे कंदमूल प्रमुख व अनंतकाय प्रमुख असतात त्यांना साधारण वनस्पतींचे जीव म्हटले पाहिजे. त्यांचे आयुर्मान अनंतमुहूर्त असते. मात्र येथे पूर्वी सांगितलेला जैन मुहूर्त समजावा.

सामान्य वनस्पतींचे शरीर एकेंद्रिय असते. म्हणजे त्यात फक्त स्पर्शेंद्रिय असते. त्यात एक जीव राहतो. त्याला प्रत्येक वनस्पती म्हणतात. या जीवाचे देहमान म्हणजे शरीराची लांबी एक हजार योजने असते. अर्थात पौराणिकांचे योजन ४ कोसांचे असते. परंतु जैनांचे योजन दहा हजार कोसांचे असते. अशा चार हजार कोसांचे एक शरीर असते. त्याचे जास्तीत जास्त आयुर्मान दहा हजार वर्षांचे असते.

आता दोन इंद्रिये असणाऱ्या जीवांची माहिती त्यांचे एक इंद्रिय म्हणजे त्यांचे शरीर व दुसरे इंद्रिय म्हणजे तोंड होय. शंख, कवडी, ऊ वगैरे जीवांचा यात अंतर्भाव होतो. त्यांचे देहमान जास्तीत जास्त अठ्ठेचाळीस कोस स्थूल असते आणि आयुर्मान जास्तीत जास्त बारा वर्षांचे असते. येथे या लोकांची फारच मोठी गफलत झालेली दिसते. कारण एवढ्या मोठ्या शरीराचे आयुर्मान जास्त लिहावयास हवे होते. अशा प्रकारची अठ्ठेचाळीस कोस लांबी-रुंदी असलेली ऊ जैनांच्या शरीरात पडत असणार व त्यांनीच ती पाहिली असणार. एवढी मोठी ऊ पाहण्याचे भाग्य इतरांना कसे लाभणार ?

'रत्नसारभाग' पृ. १५० : यांची आणखी अंदाधुंदी पाहा. यांचे विंचू, ढेकूण, कसर व माशी हे प्राणी एक योजन लांब शरीराचे असतात. त्यांचे आयुर्मान जास्तीत जास्त सहा महिन्यांचे असते. आता तुम्हीच पाहा. चार-चार कोसांचा विंचू इतर कोणी पाहिला नसेल. आठ मैल लांब शरीर असणारे विंचू व माशाही जैनांच्या ग्रंथात आढळतात. असे विंचू व माशा त्यांच्यात घरांत असतील व त्यांनीच पाहिल्या असतील. जगात इतर कोणी असे विंचू व माशा पाहिल्या नसतील. असे विंचू जेव्हा एखाद्या जैनाला चावत असतील तेव्हा त्यांचे काय हाल होत असतील ?

मासे वगैरे जलचरांचे शरीरमान एक हजार योजने असते. म्हणजे दहा हजार कोसांचे एक योजन या हिशेबाने त्यांची शरीरे एक कोटी कोस लांब-रुंद असतात आणि त्यांचे आयुर्मान एक कोटी पूर्व वर्षांचे असते. एवढे प्रचंड जलचर जैनांखेरीज इतर कोणीही पाहिले नसतील. हत्ती वगैरे चतुष्पाद प्राण्यांचे देहमान दोन कोसांपासून नऊ कोसांपर्यंत आणि आयुर्मान चौऱ्याऐंशी हजार वर्षांचे असते असे लिहिले आहे. असे प्रचंड

शरीरांचे जीवही जैनांनी पाहिले असावेत. म्हणून ते त्यावर विश्वास ठेवतात. इतर कोणी बुद्धिमान् त्यावर विश्वास ठेवू शकणार नाही.

'रत्नसारभाग' पृ. १५१ :- जलचर गर्भज जीवांचे देहमान उत्कृष्ट एक हजार योजने म्हणजे १ कोटी कोस आणि आयुर्मान एक कोटी पूर्व वर्षे असते. एवढे मोठे शरीर व आयुर्मान असणारे जीवही यांच्याच आचार्यांनी स्वप्नात पाहिले असतील. जी गोष्ट असणे असंभव व कधीच शक्य नाही, ती आहे असे सांगणे हे एक प्रचंड असत्यच नाही काय ?

## जैनांचे भूमि परिमाण

आता भूमीच्या परिमाणाची कथा ऐका. 'रत्नसारभाग', पृ. १५२:- या तिरप्या लोकात असंख्यात द्वीपे आणि असंख्यात समुद्र आहेत. या असंख्याताचे प्रमाण असे की, अडीच सागरोपम काळात जेवढा काळ येतो तितकी द्वीपे व सागर आहेत, असे समजावे. आता या पृथ्वीमध्ये प्रथम एक 'जंबुद्वीप' सर्व द्वीपांच्या मधोमध आहे. त्याचे क्षेत्रफळ एक लाख योजने म्हणजे चार लाख कोस आहे. त्याच्या सभोवती लवण समुद्र असून त्याचे क्षेत्रफळ दोन लाख योजने म्हणजे आठ लाख कोस आहे. या जंबुद्वीपाच्या सभोवती 'धातकी खंड' नावाचे द्वीप आहे. त्याचे क्षेत्रफळ चार लाख योजने म्हणजे सोळा लाख कोस आहे त्याच्या मागे 'कालोदधी' समुद्र आहे. त्याचे क्षेत्रफळ आठ लाख योजने म्हणजे बत्तीस लाख कोस आहे. त्याच्या मागे 'पुष्करावर्त्त' द्वीप आहे. त्याचे क्षेत्रफळ सोळा कोस आहे. ते द्वीप वेगवेगळ्या भागात विभागलेले आहे. त्या द्वीपाच्या अर्ध्या भागात माणसांची वस्ती आहे. त्याखेरीज असंख्यात द्वीपे व समुद्र आहेत. त्यांमध्ये तिर्यक योनीतील जीव राहतात.

'रत्नसारभाग', पृ. १५३:- जंबुद्वीपामध्ये एक हिमवंत, एक ऐरण्यवंत, एक हरिवर्ष, एक रम्यक, एक दैवकुरू, एक उत्तरकुरू ही सहा क्षेत्रे आहेत.

**(समीक्षक)** भूगोल विद्या जाणणाऱ्या लोकांनो, ऐका ! भूगोलाचे मोजमाप करण्यात तुमची चूक झाली आहे की, जैनांची ? जर जैनांची चूक असेल तर तुम्ही त्यांना समजावून सांगा आणि तुमची चूक असेल तर त्यांच्याकडून ती समजावून घ्या. थोडा विचार केला असता आपली अशी खात्री पटते की, जैनांच्या आचार्यांनी व त्यांच्या शिष्यांनी भूगोल, खगोल व गणित विद्या यांपैकी कशाचाही अभ्यास केलेला नाही. जर ते या विद्या शिकले असते तर त्यांनी या अशा अगदीच अशक्य थापा कशाला मारल्या असत्या ?

असे अविद्वान पुरुष जगाला अकर्तृक समजत असतील आणि ईश्वर मानीत नसतील तर त्यात काय आश्चर्य ? म्हणून जैन लोक आपले ग्रंथ इतर संप्रदायाच्या विद्वानांना वाचायला देत नाहीत. कारण ज्यांना हे लोक प्रामाणिक तीर्थंकरांनी रचलेले सिद्धांत ग्रंथ असे मानतात, त्यांमध्ये अशाच अडाणीपणाच्या गोष्टी भरलेल्या आहेत. म्हणून ते लोक आपले ग्रंथ कोणाला पाहू देत नाहीत. ते इतरांनी पाहिले तर त्यांचे बिंग फुटेल ना ! यांच्याखेरीज थोडी देखील बुद्धी असलेला कोणीही माणूस त्यांच्या या थापा खऱ्या मानणार नाही. हे जग अनादी आहे असे सिद्ध करण्यासाठी जैनांनी हा सारा डोलारा उभा केलेला आहे. पण त्यांचा हा सिद्धांत मुळातच साफ खोटा आहे.

अर्थात जगाचे कारण अनादी आहे. कारण ते परमाणू आदी तत्त्वस्वरूप अकर्तृक आहेत. परंतु त्यांच्यामध्ये नियमपूर्वक संयुक्त अथवा वियुक्त होण्याचे सामर्थ्य मुळीच नाही. द्रव्यांचे परमाणू स्वभावत: पृथक व जड आहेत म्हणून ते स्वत:च्या सामर्थ्याने, आपोआप यथायोग्य बनू शकत नाहीत. म्हणून त्यांना बनविणारा कोणीतरी चेतन अवश्य असला पाहिजे. तो बनविणारा ज्ञानस्वरूप आहे.

असे पाहा ! पृथ्वी, सूर्य आदी सर्व लोक-लोकांतरांना नियमांमध्ये ठेवणे हे अनादी, अनंत व चेतन परमेश्वराचे काम आहे. ज्यामध्ये संयोग व रचना विशेष दिसते ते स्थूल जग कधीही अनादी असू शकत नाही. जर कार्यरूप जगाला नित्य मानले तर त्याचे कारण कोणीही असणार नाही व तेच कार्यकारणरूप होऊन जाईल. तसे तुम्ही म्हणाल तर आपले आपणच कार्य व कारण असे मानण्यामध्ये अन्योन्याश्रय व आत्माश्रय दोष येईल. आपल्या खांद्यावर आपणच चढू शकत नाही आणि आपला पिता आपणच होणे शक्य नसते. म्हणून जगाचा कर्त्ता अवश्य मानावा लागतो.

**(प्रश्न)** जगाचा कर्त्ता ईश्वर आहे असे तुम्ही मानत असाल तर त्या ईश्वराचा कर्त्ता कोण आहे ?

**(उत्तर)** कर्त्याचा कर्त्ता व कारणाचे कारण कोणी असू शकत नाही. कारण प्रथम कर्त्ता व कारण असल्यानेच कार्य होते. ज्यामध्ये संयोग-वियोग नसतो, जो प्रथम संयोग-वियोगाचे कारण आहे, त्याचा कर्त्ता अथवा कारण कोणी असू शकत नाही. या मुद्याचे विशेष विवेचन आठव्या समुल्लासात सृष्टीविषयक चर्चेमध्ये केले आहे. ते पाहावे.

या जैन लोकांना स्थूल गोष्टींचेही नीट ज्ञान नाही. तर मग त्यांना परम सूक्ष्म सृष्टिविद्येचे ज्ञान कसे काय असणार ? जैन लोक सृष्टीला अनादी अनंत मानतात. तसेच द्रव्यपर्यायांनाही अनादी अनंत मानतात आणि प्रतिगुण, प्रतिदेश यांमध्ये पर्याय व प्रतिवस्तूमध्येही अनंत पर्याय मानतात. हे सारे 'प्रकरणरत्नाकरा' च्या प्रथम भागात लिहिले आहे. तसे होणे कधीही शक्य नाही. कारण ज्यांना अंत म्हणजे मर्यादा असते. त्यांचे सर्व संबंधित पदार्थ अंत असणारेच असतात. अनंताला जरी असंख्य म्हटले तरीही ते टिकू शकत नाही. जीवाच्या संदर्भात ही गोष्ट होऊ शकते. परंतु परमेश्वरासमोर ती टिकू शकत नाही. कारण एका-एका-द्रव्यामध्ये आपापल्या एकेका कार्यकारण सामर्थ्याला अविभाग पर्यायांनी अनंत सामर्थ्ययुक्त मानणे हे निव्वळ अडाणीपणाचे आहे. जर एकेका परमाणू द्रव्याची सीमा आहे तेव्हा त्यात अनंत विभागरूप पर्याय कसे राहू शकतात ? याचप्रमाणे एकेका द्रव्यामध्ये अनंत गुण आणि एका गुण प्रदेशात अविभागरूप अनंत पर्यायांनाही अनंत मानणे हा निव्वळ पोरकटपणा आहे. कारण ज्याच्या अधिकरणाला अंत आहे तर त्यात राहणाऱ्याला अंत का नसेल ? अशाच लंब्याचवड्या खोट्या गोष्टी या ग्रंथात लिहिल्या आहेत.

## जीवभिन्नांचे अचेतनत्व

आता जीव व अजीव या दोन पदार्थांविषयी जैनांचे मत असे आहे:-

**चेतनालक्षणो जीव: स्यादजीवस्तदन्यक: ।**

**सत्कर्मपुद्गला: पुण्यं पापं तस्य विपर्यय: ॥** आर्हत-दर्शन पृ. ८७

हे जिनदत्तसूरीचे वचन आहे आणि हेच प्रकरण रत्नाकराच्या पहिल्या भागातील नयचक्रसार प्रकरणातही

लिहिलेले आहे. जीव चेतनालक्षणयुक्त आहे आणि अजीव चेतनारहित म्हणजे जड़ (अचेतन) आहे. सत्कर्मरूप पुद्‌गल हे पुण्य आणि दुष्कर्मरूप पुद्‌गल हे पाप आहे.

**(समीक्षक)** जीव आणि जड (अचेतन) यांचे लक्षण बरोबर आहे. पण जे जड़रूप पुद्‌गल आहेत ते कधीच पापपुण्ययुक्त असू शकत नाहीत. कारण पाप व पुण्य करण्याचा स्वभाव चेतनामध्ये असतो. पाहा ! हे जितके जड (अचेतन) पदार्थ आहेत ते सर्व पापपुण्यारहित आहेत. जीवांना अनादि मानता ते ठिक आहे. परंतु त्याच अल्प व अल्पज्ञ जीवाला मुक्ती लाभल्यानंतर सर्वज्ञ मानणे चूक आहे. कारण जो अल्प व अल्पज्ञ आहे त्याचे सामर्थ्यही सर्वदा मर्यादितच राहाणार.

जैन लोक जग, जीव, जीवाची कर्मे व बंधने अनादि आहेत असे मानतात. या बाबतीतही जैनांच्या तीर्थंकरांची चूक झालेली आहे. कारण संयुक्त जगताचे कार्यकारण, प्रवाहाने कार्य आणि जीवाचे कर्मे, बंधनेही अनादी होऊ शकत नाहीत. जर तुम्ही तसे मानता तर कर्म व बंधन यांपासून मुक्त होणे का मानता ? कारण जो पदार्थ अनादी आहे तो कधीच सुटू शकत नाही. जर अनादीचाही नाश होतो असे मानाल तर तुमच्या सर्व अनादी पदार्थांचा नाश होतो असे मानण्याचा प्रसंग तुमच्यावर ओढवेल आणि जर तुम्ही अनादीला नित्य मानाल तर कर्म व बंधन हेही नित्य ठरतील. मग सर्व कर्मांच्या नाशाचा प्रसंग येईल आणि जर अनादीला नित्य मानाल तर कर्म व बंधनही नित्य मानावे लागतील. सर्व कर्मे सुटणे हीच मुक्ती आहे असे तुम्ही मानत असाल तर सर्व कर्मे सुटणे हे मुक्तीचे निमित्त झाले व मग मुक्ती ही नैमित्तिक मुक्ती होईल व ती सदैव राहू शकणार नाही. कर्म व कर्त्ता यांचा संबंध नित्य असल्यामुळे कर्मेही कधीच सुटणार नाहीत. शिवाय तुम्ही आपली मुक्ती व तीर्थंकरांची मुक्ती नित्य मानली आहे ते बरोबर नाही.

**(प्रश्न)** ज्याप्रमाणे धान्याचे फोलपट काढून टाकल्यावर किंवा त्याचा अग्नीशी संयोग झाल्यावर ते बीज पुन्हा उगवत नाही त्याप्रमाणे मुक्त झालेल्या जीवाला पुन: जन्ममरणरूपी संसारचक्रात सापडावे लागत नाही.

**(उत्तर)** जीव आणि कर्म यांचा संबंध टरफल व बीज यांच्यातील संबंधासारखा नाही. त्यांचा समवाय संबंध आहे. म्हणजे ते नित्य आहे. म्हणून जीव आणि त्याच्यातील कर्म व कर्तृत्वशक्ती यांचा संबंध अनादी काळापासून आहे. जीवामध्ये कर्म करण्याच्या शक्तीचाही अभाव आहे, असे तुम्ही मानाल तर सगळे जीव पाषाणवत होऊन जातील आणि त्यांच्यामध्ये मुक्तीचा उपभोग घेण्यासाठी सामर्थ्यही उरणार नाही. अनादी काळापासून असलेल्या कर्मबंधनातून सुटून जीव जसा मुक्त होतो तसाच तो तुमच्या मुक्तीतूनही सुटून बंधनात पडेल. कारण जसे तुम्ही कर्मरूपी मुक्तीच्या साधनांपासूनही सुटून जीव मुक्त होतो असे मानता तसेच तो नित्य मुक्तीतूनही सुटून बंधनात पडतो असे मानावे लागेल. साधनांनी सिद्ध झालेला पदार्थ कधीही नित्य असू शकत नाही. आणि जर साधन सिद्धीवाचून मुक्ती होते असे तुम्ही मानाल तर कर्मांवाचूनही बन्ध प्राप्त होऊ शकेल. ज्याप्रमाणे वस्त्रांना घाण लागते आणि वस्त्र धुतल्यावर ती निघून जाते आणि पुन: वस्त्र घाण होते. त्याप्रमाणे मिथ्यात्वादी हेतुमुळे व राग (मोह), द्वेषादि कारणांच्या आश्रयामुळे जीवाला कर्मरूपी मळ लागतो व तो सत्यक् ज्ञान, दर्शन, चरित्राने निर्मळ होतो. मळ लागण्याच्या कारणांमुळे मळ लागला असे तुम्ही मानीत असाल तर मुक्त

जीव संसारी बनतो व संसारी जीव मुक्त होतो असे तुम्हाला अवश्य मानावे लागेल. कारण ज्याप्रमाणे निमित्तांनी (कारणांनी) मलिनता सुटते, (नाहीशी होते) त्याप्रमाणे निमित्तांनी मलिनता लागेलही. म्हणून जीवाचे बंधन व मुक्ती यांना प्रवाह रूपाने अनादी माना. अनंतत्वाने त्यांना अनादी मानू नका.

**(प्रश्न)** जीव कधीही निर्मळ नव्हता. किंतु मळासह आहे.

**(उत्तर)** जर तो कधी निर्मळ नव्हता तर तो कधीच निर्मळ होऊ शकणार नाही. ज्याप्रमाणे शुभ्र वस्त्रावर नंतर लागलेला मळ धुवून काढता येतो. त्याचा स्वाभाविक पांढरा रंग काढून टाकता येत नाही. वस्त्र धुतल्यानंतरही त्याला मळ लागतो. त्याचप्रमाणे जीवाला मुक्त झाल्यानंतरही मळ लागू शकतो.

**(प्रश्न)** जीव हा पूर्वोपार्जित कर्मानेच स्वतः शरीर धारण करतो. त्यासाठी ईश्वराला मानणे व्यर्थ आहे.

**(उत्तर)** जर केवळ कर्मच शरीर धारणेचे निमित्त असेल, ईश्वर हे कारण नसेल तर कोणताही जीव ज्यात खूप दु:ख भोगावे लागेल असा वाईट जन्म कधीच घेणार नाही, सदैव चांगलेच जन्म धारण करील. कर्म हे प्रतिबंधक आहे, पण ज्याप्रमाणे चोर आपण होऊन तुरुंगात जात नाही किंवा स्वेच्छेने फासावर चढत नाही, पण राजा त्याला तशी शिक्षा देतो, त्याचप्रमाणे जीवाला शरीर धारण करावयास लावणाऱ्या व त्याच्या कर्मानुसार फळ देणाऱ्या परमेश्वराला तुम्हीही माना.

**(प्रश्न)** मद (नशा) जसा आपोआप चढतो त्याप्रमाणे कर्मांचे फळ आपोआप प्राप्त होते. ते देण्यासाठी दुसऱ्याची आवश्यकता नसते.

**(उत्तर)** तसे असेल तर नेहमी मद्यपान करणाऱ्याला कमी नशा चढते आणि सवय नसलेल्यांना जास्त चढते, याप्रमाणे नेहमी खूप पाप अथवा पुण्य करणाऱ्यांना कमी फळ आणि कधी-मधी व थोडेसे पाप-पुण्य करणाऱ्यांना जास्त फळ मिळाले पाहिजे. तसेच लहान कर्म करणाऱ्यांना मोठे फळ मिळाले पाहिजे.

**(प्रश्न)** ज्याचा जसा स्वभाव असतो त्याला तसेच फळ मिळत असते.

**(उत्तर)** जर स्वभावानुसार फळ मिळत असेल तर ते मिळणे अथवा न मिळणे हे घडू शकत नाही. स्वच्छ वस्त्राला काही कारणांनी मळ लागतो व तो धुण्याच्या निमित्ताने दूर होतो, असे मानणेच योग्य ठरते.

**(प्रश्न)** संयोगावाचून कर्म परिणामाला प्राप्त होत नाही. ज्याप्रमाणे दूध व विरजण यांच्या संयोगावाचून दही तयार होत नाही त्याचप्रमाणे जीव आणि कर्म यांच्या संयोगाने कर्माचा परिणाम होत असतो.

**(उत्तर)** दूध आणि विरजण यांचे मिश्रण करणारा तिसरा एकजण असतो. ज्याप्रमाणे जीव आणि त्यांच्या कर्मांची फळे यांचा संबंध जोडणारा तिसरा ईश्वर असला पाहिजे. कारण जड (अचेतन) पदार्थ स्वतः नियमाने संयुक्त होत नाहीत; आणि जीवही अल्पज्ञ असल्यामुळे स्वतः आपल्या कर्मांची फळे प्राप्त करीत नाहीत. यावरून हे सिद्ध होते की, ईश्वरस्थापित सृष्टिक्रमावाचून कर्मफळाची व्यवस्था होऊ शकत नाही.

**(प्रश्न)** जो कर्मापासून मुक्त असतो त्यालाच ईश्वर असे म्हणतात.

**(उत्तर)** अनादी काळापासून जीवांशी कर्मे जोडली गेलेली आहेत. त्यांच्यापासून जीव कधीच मुक्त होऊ शकणार नाही.

**(प्रश्न)** कर्मांचा बंध अनादी नसून सादी (आदिसहित) आहे.

**(उत्तर)** बंध हा सादी असेल तर कर्मांचा योग अनादी असू शकत नाही. आणि संयोगापूर्वी जीव निष्कर्म होता असे ठरेल. मग निष्कर्माला कर्म लागते तर मुक्तांनाही ते लागेल. कर्म व कर्ता यांचा समवाय म्हणजे नित्य संबंध असतो. तो कधी सुटत नाही. म्हणून नवव्या समुल्लासात आम्ही जे लिहिले आहे तसेच मानणे योग्य आहे.

जीवाने आपले ज्ञान व सामर्थ्य कितीही वाढविले तरी त्याचे ज्ञान परिमित आणि सामर्थ्य मर्यादितच राहणार. ते ईश्वरासारखे अनंत व अमर्यादित कधीच होऊ शकणार नाही. मात्र जितके सामर्थ्य वाढणे उचित आहे तितके तो योगाच्या साह्याने वाढवू शकतो.

जैनांमधील अर्हत लोक देहाच्या परिमाणावरून जीवाचेही परिमाण मानतात. त्यांना असे विचारले पाहिजे की, हत्तीचा जीव किडामुंगीत व किडामुंगीचा जीव हत्तीच्यामध्ये कसा सामावू शकेल ? हीही एक मूर्खपणाचीच गोष्ट आहे. कारण जीव हा एक सूक्ष्म पदार्थ असून तो एका परमाणूतही राहू शकतो. परंतु त्याच्या शक्ती शरीरामध्ये प्राण, विद्युत व नाडी इत्यादिकांशी संयुक्त होऊन राहतात. त्या शक्तींमुळे त्याला संपूर्ण शरीरातील हालचाली कळतात. तो चांगल्या संगतीने चांगला व वाईट संगतीने वाईट बनतो. जैन लोक अशा प्रकारचा धर्म मानतात.

**मूल :- रे जीव भव दुहादं, इक्कं चिय हरइ जिणमयं धम्मं।**
**इयराणं पणमंतो, सुहकय्ये मुढमुसिओसि ॥** प्रकरणरत्नाकर भाग २। षष्ठीशतक ६०। सूत्राङ्क३

संक्षिप्त अर्थ : अरे जीवा ! एकच जिनमत, श्रीवीतरागभाषित धर्मच इहलोकाशी संबंधित जन्म, जरा, मरण इत्यादी दु:खांचे हरण करणारा आहे. याचप्रमाणे सुदेव व सुगुरू हेही जैन धर्मी आहेत असे जाणावे. वीतराग ऋषभ देवापासून महावीरापर्यंतच्या वीतराग देवाखेरीज हरी, हर, ब्रह्मा इत्यादी जे इतर कुदेव आहेत त्यांची पूजा आपल्या कल्याणासाठी जे लोक करतात ते सगळे फसविले गेले आहेत.

याचा भावार्थ असा की जैनमताचे सुदेव, सुगुरु व सुधर्म वगळता इतर कुदेव, कुगुरु व कुधर्म यांचे सेवन केल्याने काहीही कल्याण होत नाही. ॥३॥

**(समीक्षक)** याचे धर्मग्रंथ कसे निंदायुक्त आहेत याचा विद्वानांनीच आता विचार करावा.

**मूल :- अरिहं देवो सुगुरु धम्मं च पंच नवकारो ।**
**धन्नाणं कयच्छाणं, निरन्तरं वसइ हिययम्मि ॥** प्रक. भा. २। षष्टी. ६०। सू. १

अरिहन् देवेन्द्रकृत पूजादिरुण सारखा दुसरा कोणताही उत्तम पदार्थ नाही असा जो देवांचा देव, शोभायमान अरिहन्त देव, ज्ञानक्रियावान, शास्त्रांचा उपदेष्टा, शुद्ध, कषायमलरहित, सम्यकत्व विनय दयामूल, श्रीजिनभाषित जो धर्म आहे तोच दुर्गतीत पडणाऱ्या प्राण्यांचा उद्धार करणारा आहे. इतर हरिहरादिकांचा धर्म इहलोकातून उद्धार करणारा नाही. पंच अरिहंतादिक परमेष्ठी व त्यांच्याशी संबंधित या सर्वांना नमस्कार. हे चार पदार्थ धन्य आहेत, अर्थात श्रेष्ठ आहेत. दया, क्षमा, सम्यकत्व, ज्ञान, दर्शन व चारित्र्य हा जैनांचा धर्म आहे. ॥१॥

**(समीक्षक)** जी दया मनुष्यमात्रावर नाही ती दयाही नव्हे व क्षमाही नव्हे. ज्ञानाऐवजी अज्ञानाला, दर्शनाऐवजी अंधाराला आणि चारित्र्याऐवजी उपासमारीला महत्त्व देणे ही काय चांगली गोष्ट आहे ?

जैन पंथाची प्रशंसा -

**मूल - जइ न कुणसि तव चरणं, न पढसि न गुणेसि देसि नो दाणम्।**
**ता इत्तियं सक्किसि, जं देवो इक्क अरिहन्तो।** प्र. भा. २। षष्ठी. सू. १८

हे मनुष्या ! जे तू तप-चरित्र करू शकत नाही, सूत्र पण वाचू शकत नाही, प्रकरणादिचा विचारही करू शकत नाही आणि सुपात्राला दान पण देऊ शकत नाही. तो तू एक देवता अरिहंत जो आमची आराधना हेतू सुयोग्य गुरू, सुधर्म जैन मतामध्ये श्रद्धा ठेवणे सर्वोत्तम गोष्टी आहेत, उद्धाराचे कारण आहे.॥२॥

**(समीक्षक)** दया आणि क्षमा या जरी चांगल्या गोष्टी असल्या तरी पक्षपात केल्याने दया ही अदया व क्षमा ही अक्षमा होत असते. आमच्या म्हणण्याचा मथितार्थ असा की, कोणत्याही जीवाला दुःख न देणे ही गोष्ट सर्वथा संभव होऊ शकत नाही. कारण दुष्टांना शिक्षा करणे ही गोष्टही दयाच समजली पाहिजे. एका दुष्टाला शिक्षा दिली गेली नाही तर हजारो माणसांना दुःख होण्याची शक्यता असते. म्हणून त्याच्या बाबतीतली दया ही अदया व क्षमा ही अक्षमा होते.

सर्व प्राण्यांचे दुःख नाहीसे करणे व त्यांना सुखी करण्याचा उपाय अंमलात आणणे याला दया असे म्हटले जाते, हे खरे आहे. केवळ पाणी गाळून पिणे आणि क्षुद्र जीवजंतूंना वाचविणे ही खरी दया नव्हे. परंतु अशा प्रकारची दया जैनांच्या फक्त बोलण्यातच असते. कारण तसे आचरण ते मुळीच करीत नाहीत. माणूस कोणत्याही पंथाचा असला तरी त्याच्यावर दया करून त्याला खायला प्यायला घालून त्याचा सत्कार करणे आणि दुसऱ्या पंथाच्या विद्वानांचा सम्मान व सेवा करणे ही दया नाही काय ?

जर या लोकांमध्ये खरी दया असती तर 'विवेकसार' या ग्रंथाच्या पृष्ठ २२१ वर त्यांनी असे का लिहिले असते ? त्यांनी काय लिहिले आहे पहा :- (१) दुसऱ्या पंथाच्या लोकांची स्तुती करू नये; अथवा त्यांच्या सद्गुणांची प्रशंसा करू नये. (२) दुसऱ्या संप्रदायाच्या लोकांना नमस्कार करू नये. (३) 'आलपन' म्हणजे इतर पंथांच्या लोकांशी कमी बोलावे. (४) 'संलपन' म्हणजे त्यांच्याशी पुनः पुनः बोलू नये. (५) त्यांना अन्नवस्त्राचे दान करू नये. म्हणजे त्यांना खाण्या-पिण्याच्या वस्तूही देऊ नयेत. (६) इतर पंथाच्या प्रतिमांच्या पूजेसाठी गंध, पुष्पे वगैरेही देऊ नयेत. या सहा यातना आहेत. म्हणजे ही सहा प्रकारची कर्मे जैनांनी कधी करू नयेत.

**(समीक्षक)** आता बुद्धिमंतांनी याचा विचार करावा की, जैनांच्या मनामध्ये इतर पंथाच्या लोकांविषयी किती अदया, कुदृष्टी व द्वेष आहे. इतर पंथांच्या मनामध्ये इतकी अदया जैनांमध्ये असल्याने त्यांना दयाहीन किंवा निर्दयी म्हणण्यास काही हरकत नसावी. कारण आपल्याच घरच्या लोकांची सेवा करणे याला काही विशेष धर्म म्हणत नाहीत. त्यांच्या पंथाची माणसेही त्यांच्या घरच्या माणसांसारखीच आहेत. म्हणून ते त्यांची सेवा करतात. इतर संप्रदायांच्या लोकांची सेवा ते करीत नाहीत. मग त्यांना कोणता बुद्धिमान दयाळू म्हणू शकेल ?

'विवेकसारा' च्या पृ. १०८ वर असे लिहिले आहे की, मथुरेच्या राजाच्या नमुची नावाच्या दिवाणाला जैनांनी आपला विरोधक समजून ठार मारले आणि ते आलोयणा करून शुद्ध झाले. हे कृत्यही दया व क्षमा

यांचा नाश करणारे नाही काय ? इतर पंथांच्या लोकांशी त्यांचे प्राण घेण्यापर्यंत जे लोक वैरबुद्धी बाळगतात त्यांना दयाळू म्हणण्याऐवजी हिंसक म्हणणेच योग्य होईल.

सम्यकत्व दर्शनादिकांची लक्षणे-आहर्त प्रवचन संग्रह परमागमसार या ग्रंथामध्ये सांगितली आहेत. सम्यक श्रद्धान, सम्यकदर्शन, ज्ञान व चारित्र्य ही मोक्षमार्गाची चार साधने आहेत. (सम्यक म्हणजे योग्य, उचित, समग्र, उपयुक्त, बरोबर... वगैरे) त्यांची व्याख्या योगदेवाने केली आहे. ज्या रूपाने जीवादी द्रव्ये अवस्थित आहेत त्याच रूपाने जिनप्रतिपादित ग्रंथानुसार विपरीत अभिनिवेशादिरहित जी श्रद्धा म्हणजे जिनमतावर प्रीती असते तिला 'सम्यक् श्रद्धान' व 'सम्यक् दर्शन' असे म्हणतात.

**रुचिर्जिनोक्ततत्त्वेषु सम्यक् श्रद्धानमुच्यते ।** आ. द. पृ ६२

जिनाने सांगितलेल्या तत्त्वांवर सम्यक श्रद्धा ठेवली पाहिजे. म्हणजे इतर कशावर श्रद्धा असता कामा नये.

**यथावस्थिततत्त्वानां संक्षेपाद्विस्तरेण वा ।**
**योऽवबोधस्तमत्राहुः समग्ज्ञानं मनीषिणः ॥** आ. द. पृ. ६३

ज्या प्रकारची जीवादी तत्त्वे आहेत त्यांचा संक्षेपाने अथवा विस्ताराने जो बोध होतो त्यालाच शहाणे लोक 'सम्यक् ज्ञान' असे म्हणतात.

**सर्वथाऽवद्ययोगानां त्यागश्चारित्रमुच्यते ।**
**कीर्त्तितं तदहिंसादिव्रतभेदेन पंचधा ।**
**अहिंसासूनृतास्तेयब्रह्मचर्य्यापरिग्रहाः ॥** आ. द. पृ. ६५

सर्व प्रकारे निंदनीय अशा अन्य मतसंबंधाचा त्याग म्हणजे चारित्र्य होय. अहिंसादी भेदांच्या दृष्टीने व्रते ही पाच प्रकारची आहेत :- (१) अहिंसा म्हणजे कोणत्याही प्राण्याला न मारणे. (२) सुनृता म्हणजे प्रिय भाषण करणे. (३) अस्तेय म्हणजे चोरी न करणे. (४) ब्रह्मचर्य म्हणजे जननेन्द्रियाच्या बाबतीत संयम पाळणे. (५) अपरिग्रह म्हणजे सर्व वस्तूंचा त्याग करणे.

यांतील अनेक गोष्टी चांगल्या आहेत. अहिंसा आणि चोरी वगैरे निंद्य कर्मांचा त्याग ही चांगली गोष्ट आहे. परंतु या साऱ्या चांगल्या गोष्टी इतर संप्रदायाची निंदा वगैरे दोषांनी युक्त असल्यामुळे त्या चांगल्या गोष्टीही दोषयुक्त झाल्या आहेत. उदाहरणार्थ, पहिल्या सूत्रात असे लिहिले आहे की, ''अन्य हरिहरादिकांचा धर्म जगामध्ये उद्धार करणारा नाही.'' ज्यांचे ग्रंथ पाहिले असता पूर्णविद्या व धार्मिकता स्पष्ट दिसून येते त्यांची नालस्ती करणे ही काय लहान सहान निंदा आहे ? आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे अत्यंत अशक्य अशा गोष्टी बोलणाऱ्या आपल्या तीर्थकरांची स्तुती करणे म्हणजे निव्वळ हटवादीपणा आहे.

ज्या जैनांजवळ चारित्र्य नाही, विद्या नाही, दान देण्याचे सामर्थ्य नाही तो माणूस केवळ जैन पंथ खरा आहे असे म्हणतो म्हणूनच उत्तम ठरतो काय ? आणि इतर पंथाचे लोक श्रेष्ठ असूनही अश्रेष्ठ ठरतात काय ? असे म्हणणाऱ्या लोकांना भ्रमिष्ट व बालबुद्धीचे म्हणावयाचे नाही तर काय म्हणावयाचे ?

यावरून हेच सिद्ध होते की, यांचे आचार्य स्वार्थी होते. ते पूर्ण विद्वान नव्हते. त्यांनी अशी इतरांची

निंदानालस्ती केली नसती तर त्यांच्या त्या खोट्या गोष्टी ऐकून कोणी फसले नसते व त्यांचा हेतू पूर्ण झाला नसता.

पाहा ! यावरून हेच सिद्ध होते की, जैनांचा पंथ सर्वांना बुडविणारा असून वैदिक धर्म सर्वांचा उद्धार करणारा आहे. हरिहरादि देव हे सुदेव असून त्यांचे ऋषभदेवादी सगळे कुदेव आहेत, असे जर इतरांनी म्हटले तर त्यांनाही तसेच वाईट वाटणार नाही काय ? यांचे आचार्य व अनुयायी यांच्या आणखी चुका पाहा. :

**मूल- जिणवर आणा भंगं, उमग्ग उस्सुत्त लेस देसणउ।**
**आणा भंगे पावं ता जिणमय दुक्करं धम्मम् ।।** प्र. भाग २ षष्टी.। श. ६१। सू. ११

उन्मार्ग उत्सूत्रांचा लेख दाखविण्याने जिनवर म्हणजे वीतरागी तीर्थंकरांच्या आज्ञेचा जो भंग होतो तोच दु:खाचा हेतू म्हणजे कारण असणारे पाप आहे. जिनेश्वराने सांगितलेल्या सम्यक्त्वादी धर्माचे ग्रहण करणे फार अवघड आहे. म्हणून ज्यायोगे जिनाच्या आज्ञेचा भंग होणार नाही असे वर्तन केले पाहिजे. ॥११॥

**(समीक्षक)** आपल्याच तोंडाने आपलीच प्रशंसा करणे आणि आपलाच पंथ मोठा आहे असे म्हणून दुसऱ्या पंथाची निंदा करणे हा मूर्खपणा आहे. कारण ज्याची प्रशंसा इतर विद्वान करतात त्याचीच प्रशंसा करणे उचित आहे. चोर देखील स्वत:च्या तोंडाने आपली प्रशंसा करतात; म्हणून ते प्रशंसनीय ठरतात काय ? या लोकांची स्थिती अशीच आहे.

**मूल - बहुगुण विज्झा निलओ, उस्सुत्त भासी तहा विमुत्तव्वो।**
**जह वर मणि जुत्तो विहु, विग्घकरो विसहरो लोए।।** प्र. भा. २। षष्ठी। सू. १८

ज्याप्रमाणे विषधर सापाचा मणी त्याज्य असतो त्याप्रमाणे जो जैन पंथाचा अनुयायी नाही तो कितीही मोठा धार्मिक व पंडित असला तरी त्याचा त्याग करणे हे जैनांच्या दृष्टीने उचित होय. ॥१८॥

**(समीक्षक)** पाहा ! किती चुकीची गोष्ट आहे ! यांचे चेले व आचार्य विद्वान असते तर त्यांनी विद्वानांवर प्रेम केले असते. पण यांच्या तीर्थंकरासहित सगळेच अविद्वान् असल्यामुळे ते विद्वानांचा संन्मान कसा करतील ? सोने मळात किंवा धुळीत पडले तरी त्याचा त्याग कोणी करतो काय ? यावरून हेच सिद्ध होते की, जैनांखेरीज इतर कोणी त्यांच्यासारखे पक्षपाती, हट्टी, दुराग्रही व विद्याहीन नसतील.

**मूल - अइसय पाविय पावा, धम्मिअ पव्वेसु तोवि पाव रया।**
**न चलन्ति सुद्ध धम्मा, धन्ना किविपाव पव्वेसु ।।** प्र. भा. २। षष्ठी.। सू. २९

इतर दर्शन मानणारे कुलिंगी म्हणजे जैनमतविरोधी असे जे असतील त्यांचे दर्शनही जैन लोकांनी करू नये. ॥२९॥

**(समीक्षक)** ही किती पामरपणाची गोष्ट आहे याचा विचार बुद्धिमान लोकांनी करावा. खरी गोष्ट अशी आहे की, ज्याचे मत खरे असते त्याला कुणाचीही भीती नसते. यांच्या आचार्यांना माहीत होते की, आपले मत पोकळ व विसंगतींनी भरलेले आहे. ते इतरांना सांगितले तर ते त्याचे खंडर्न करतील. म्हणून सर्वांची निंदा करावी व मूर्ख जैनांना फसवावे, हा मार्ग त्यांनी पत्करला.

**मूल - नामंपि तस्स असुहं, जेण निदिठाई मिच्छ पव्वाइ ।**

**जेसिं अणुसंगाउ, धम्मीणवि होइ पाव मई ।।** प्र. भा. २। षटी.। सू. २७

जैन धर्माच्या विरुद्ध असे जे धर्म आहेत ते सर्व माणसांना पापी बनविणारे आहेत. म्हणून कोणताही अन्य धर्म न मानता जैन धर्मच मानणे उत्तम होय. ॥२७॥

**(समीक्षक)** यावरून हे सिद्ध होते की, सर्वांशी वैर, विरोध, निंदा, ईर्ष्या वगैरे दुष्ट कर्मरूपी सागरामध्ये माणसाला बुडविणारा जैन पंथ आहे. जैन लोक जसे सर्वांची निंदा करणारे आहेत तसे इतर पंथाच्या अनुयायांमध्ये इतरांची निंदा करणारे महानिंदक व अधर्मी लोक कोणीही नसतील. एका बाजूने सर्वांची निंदा व दुसऱ्या बाजूने स्वतःची अतिप्रशंसा करणे हे शठांचे म्हणजे लबाड लोकांचेच लक्षण नाही काय ? विवेकी लोक कोणत्याही पंथाचे असले तरी ते चांगल्याला चांगले व वाईटाला वाईटच म्हणतात.

**मूल - हा हा गुरु अ अकज्झं, सामी न हु अच्छि कस्स पुक्करिमो ।**

**कह जिण वयाण कह सुगुरु, सावया कह इय अकज्झं ।।** प्र.भा.२। षष्टी. सू. ३५

कोठे सर्वज्ञभाषित जिनवचन, जैनांचे सुगुरू व जैनधर्म आणि कोठे त्यांच्या विरुद्ध असणारे कुगुरू व अन्य पंथांचे उपदेशक ? अर्थात आमचे ते सुगुरू, सुदेव व सुधर्म आणि इतरांचे ते कुदेव, कुगुरू व कुधर्म आहेत. ॥३५॥

**(समीक्षक)** हे म्हणजे बोरे विकणाऱ्या माळणीसारखे आहे. ती जशी आपली आंबट बोरे गोड आहेत म्हणून सांगते आणि दुसऱ्या माळणींची गोड बोरेही आंबट व निरुपयोगी असल्याचे सांगते तशाच या जैनांच्या गोष्टी आहेत. हे लोक आपल्या खेरीज इतर पंथाच्या लोकांची सेवा करणे हे मोठे पाप आहे असे समजतात.

आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे नागाच्या मस्तकावरील मणीही त्याज्य असतो. त्याप्रमाणे इतर पंथातील श्रेष्ठ धार्मिक पुरुषांचाही त्याग करावा. आता याहूनही जास्त निंदा ते इतर पंथियांची करतात. ते म्हणतात,

**मूल - सप्पो इक्कं मरणं, कुगुरु अणंताइ देइ मरणाइ ।**

**तो वरिसप्पं गहियुं, मा कुगुरुसेवणं भद्दम् ।।** प्र.भा. २। षटी.। सू. ३७

जैन पंथाखेरीज इतर सर्वपंथांचे गुरू हे कुगुरू असून ते सापांहूनही वाईट आहेत. त्यांचे दर्शन, सेवा व संग कधीही करू नये. कारण सापाच्या संगतीने एकदाच मरण येते; तर अन्य पंथीय कुगुरूंच्या संगतीने अनेकवार जन्म-मरणाच्या फेऱ्यात पडावे लागते. म्हणून हे भद्र पुरुषा ! इतर पंथाच्या गुरूंच्या जवळही तू उभा राहू नकोस. कारण तू अन्य पंथियांची थोडी जरी सेवा करशील तर तू दुःखात पडशील. ॥३७॥

**(समीक्षक)** पाहा ! जैनांसारखे कठोर, भ्रांत, द्वेषी, निंदक, वाट चुकलेले लोक कोणत्याही पंथात नसतील. यांनी मनाशी असा विचार केलेला दिसतो की, आपण इतरांची निंदा व आपली प्रशंसा केली नाही तर आपली सेवा कोणी करणार नाही व आपली प्रतिष्ठा होणार नाही. परंतु हे त्यांचे दुर्भाग्य आहे. कारण जोपर्यंत हे उत्तम विद्वानांचा सत्संग व सेवा करणार नाहीत तोपर्यंत यांना यथार्थ ज्ञान व सत्यधर्म याची प्राप्ती कधीच होणार नाही. म्हणून जैनांनी आपल्या ज्ञानविरोधी खोट्या गोष्टी सोडून देऊन वेदोक्त सत्य गोष्टींचे ग्रहण करावे हे उचित होय. त्यानेच त्यांचे फार कल्याण होईल.

**मूल – किं भणिमो किं करिमो, ताण हयासाण धिट्ठ दुट्ठाणं ।**
**जे दंसिऊण लिंगं खिवंती न रयम्मि मुद्ध जणं ॥** प्र. भा. २। षष्टी।। सू. ४०

ज्याची कल्याणाची आशा नष्ट झाली आहे, उद्धट, वाईट गोष्टी करण्यात अत्यंत चतुर, दुष्ट दोषांनी युक्त अशा माणसाला काय सांगावे ? काय करावे ? कारण जो त्याच्यावर उपकार करतो त्याचाच तो नाश करतो. ज्याप्रमाणे कोणी एकजण दया करावी म्हणून आंधळ्या सिंहाचे डोळे बरे करण्यासाठी त्याच्या जवळ गेला असता त्या सिंहानेच त्या दयाळू माणसाला खाऊन टाकले. त्याप्रमाणे अन्य पंथातील कुगुरूंवर उपकार करणे म्हणजे आपलाच नाश ओढवून घेणे आहे. म्हणून त्यांच्यापासून सदैव दूर राहावे. ॥४०॥

**(समीक्षक)** जैन लोक जसा विचार करतात तसा इतर पंथांचे लोक विचार करतील तर जैनांची केवढी दुर्दशा होईल ! त्यांच्यावर कोणीही कसलाही उपकार केला नाही तर त्यांची अनेक कामे नष्ट होऊन त्यांना किती दु:ख भोगावे लागेल ! इतरांसंबंधी जैन लोक असा विचार का करीत नाहीत?

**मूल – जह जह तुट्टइ धम्मो, जह जह दुट्ठाण होइ अइ उदउ ।**
**समदिट्ठि जियाणं, तह तह उल्लसइ समत्तं ॥** प्र.भा. २१ षष्ठी सू. ४२

जसजशी दर्शनभ्रष्ट, निह्नव, पासच्छा, उसन्ना व कुसीलियादिक आणि अन्य दर्शनावलंबी, त्रिदंडी, परिव्राजक व विप्रादिक दुष्ट लोकांची अतिशय शक्ती, सत्कार व पूजा आदी अधिक होईल तस तसे सम्यकदृष्टी जीवांचे सम्यकत्व विशेष प्रकाशित व्हावे, हे मोठे आश्चर्यच आहे. ॥४२॥

**(समीक्षक)** आता तुम्हीच पाहा. या जैनांहून अधिक ईर्ष्या, द्वेष व वैरबुद्धी बाळगणारा दुसरा कोणी असेल काय ? अर्थात इतर पंथामध्येही ईर्ष्या व द्वेष आहेत परंतु जैनांमध्ये ते दुर्गुण जेवढ्या प्रमाणात आहेत तेवढे इतर कोणामध्येच नाहीत. आणि द्वेष हे तर पापाचे मूळ आहे. म्हणून जैनांमध्ये पापाचार का असणार नाही ?

**मूल – संगोवि जाण अहिउ, तेसिंधिम्माइ जे पकुव्वन्ति ।**
**मुत्तूण चोर संगं, करन्ति ते चोरियं पावा ॥** प्र.भा. २१ षष्ठी सू. ७५

याचा मथितार्थ एवढाच आहे की, अडाणी लोकांना चोरांच्या संगतीत राहिल्यानंतर आपल्यालाही शिक्षा होईल व आपले नाक कापले जाईल याची भीती वाटेनाशी होते त्याप्रमाणे जैन पंथाहून भिन्न अशा चोर पंथामध्ये असणाऱ्या लोकांना आपल्या अकल्याणाचे भय वाटत नाही. ॥७५॥

**(समीक्षक)** जो माणूस जसा असतो तो बहुधा आपल्या सारखेच इतर आहेत असे समजतो. इतर सगळे पंथ चोरांचे पंथ आहेत आणि जैनांचा तेवढा सज्जनांचा पंथ आहे, ही गोष्ट खरी असू शकते काय? जोपर्यंत माणसामध्ये अत्यंत अज्ञान असते व कुसंगतीने त्याची बुद्धी भ्रष्ट झालेली असते तोपर्यंत तो इतरांविषयी अत्यंत ईर्ष्या, द्वेष बाळगणे यासारखा दुष्टपणा सोडत नाही. जैनमत जसे इतरांचा द्वेष करणारे आहे तसे दुसरे कोणतेही मत नाही. ॥७५॥

**मूल – जच्छ पसुमहिसलरका पव्वं होमन्ति पाव नवमीए ।**
**पूअन्ति तंपि सड्ढा, हा हीला वीयरायस्स ॥** प्र.भा.२। षष्टी।। सू. ७६ ॥

पूर्व सूत्रात सांगितल्याप्रमाणे जैनमार्गाहून भिन्न मार्गांचे अनुसरण करणारे इतर सगळे मिथ्यात्वाचा उपदेश करणारे आहेत व आम्ही सम्यकत्वाचा उपदेश करणारे आहोत. अर्थात इतर सगळे पापी असून जैन मात्र पुण्यात्मे आहेत. म्हणून खोटेपणाचा प्रचार करणाऱ्या धर्माची स्थापना करणाऱ्याला जो कोणी मदत करतो तो पापी आहे. ॥७६॥

**(समीक्षक)** चामुंडा, कालिका, ज्वाला इत्यादी देवतांना प्रसन्न करून घेण्यासाठी पापनवमी म्हणजे दुर्गानवमी वगैरे जी व्रते व उपवास केले जातात ते जसे वाईट आहेत तशी पर्यूषण पर्वासारखी तुमची व्रतेही वाईट नाहीत काय? त्या व्रतांमुळेही व्रत करणाऱ्याला फार कष्ट सोसावे लागतात. या ठिकाणी वाममार्गी लोकांच्या दुष्कृत्यांचे केलेले खंडन बरोबर आहे. परंतु जे लोक शासनदेवी व मरुतदेवी इत्यादिकांची भक्ती करतात त्यांचेही खंडन यांनी केले असते तर बरे झाले असते. आमची देवी हिंसक नाही असे ते म्हणत असतील तर त्यांचे ते म्हणणे खोटे आहे. कारण शासनदेवीने एका पुरुषाचे व एका बकऱ्याचे डोळे काढले होते. म्हणजे ती राक्षसीण आणि दुर्गा व कालिका यांची सख्खी बहीणच ठरत नाही काय? तसेच आपल्या पच्चखाण वगैरे व्रतांना अतिश्रेष्ठ आणि नवमी वगैरे व्रतांना वाईट म्हणणे हा मूर्खपणाच आहे. कारण इतरांच्या उपवासांची निंदा व आपल्या उपवासांची स्तुती करणे हा अडाणीपणाच आहे. अर्थात जैन लोक सत्यभाषणादी ज्या व्रतांचे पालन करतात ती सर्वांसाठीच उत्तम आहेत. मात्र जैन लोक व इतर लोक जो उपवास करतात ती गोष्ट चांगली नाही.

**मूल – वेसाण वंदियाणय, माहण डुंबाण जरकसिरकाणं ।**
**भत्ता भरकट्ठाणं, वियाणं जन्ति दूरेणं ॥** प्रक. भा.। षष्टी.। सू. ८२

याचा मुख्य भावार्थ असा की, जे लोक वेश्या, चारण, भाट आणि ब्राह्मण यांचे कौतुक करतात, यज्ञाचे समर्थन करतात, वस्तुत: ज्यांच्याकडे कधी पाहू नये अशा गणेशासारख्या खोट्या देवदेवतांची उपासना करतात ते स्वत: अज्ञान सागरात बुडतात व इतरांना बुडवितात. कारण या देवदेवतांकडे सगळ्या गोष्टी मागतात आणि वितराग (जैन) पुरुषांपासून दूर राहतात. ॥८२॥

**(समीक्षक)** इतर पंथांच्या देवांना खोटे म्हणणे आणि आपले देव खरे आहेत असे सांगणे केवळ पक्षपातीपणा आहे. हे लोक वाममार्गी संप्रदायाच्या देवीदेवतांचा निषेध करतात. परंतु आपल्या शासनदेवीचा निषेध करीत नाहीत. ''श्राद्धदिनकृत'' या ग्रंथाच्या पृष्ठ ४६ वर लिहिले आहे की, या शासनदेवीने रात्री जेवण केल्याबद्दल एका पुरुषाला थप्पड मारली व त्याचा एक डोळा काढला. मग तिने बकऱ्याचा एक डोळा काढून तो त्या माणसाच्या डोळ्याच्या खाचेत बसविला. अशा या देवीला ते हिंसक का मानत नाहीत? 'रत्नसार' भाग १, पृ.६७ वर काय लिहिले आहे पाहा :- मरुतदेवी पथिकांना दगडाची मूर्ती बनून साह्य करीत असे. तिलाही ते तशीच का मानत नाहीत?

**मूल – किं सोपि जणणि जाओ, जाणो जणणी इकिं गओ विद्धि ।**
**जइ मिच्छरओ जाओ, गुणेसु तह मच्छरं वहइ ॥** प्रक. भा. २। षष्टी.। सू. ८१

जे जैनमतविरोधी मिथ्या धर्म मानणारे आहेत ते जन्माला तरी कशाला येतात ? आणि जन्मले तर मोठे का होतात ? ते जन्मल्यानंतर लगेच मरून गेले असते तर फार चांगले झाले असते. ॥८१॥

पाहा ! यांचा हा वीतरागभाषित दयाधर्म ! इतर पंथाच्या लोकांनी जिवंतही राहू नये अशी इच्छा ते करतात. यांचा हा दयाधर्म केवळ बोलण्यापुरता आहे. आणि जो काही आहे तो क्षुद्र जीवजंतू व पशू यांच्यासाठी आहे. जैनांखेरीज इतर लोकांसाठी तो नाही.

**मूल – सुद्धे मग्गे जाया, सुहेण गच्छत्ति सुद्ध मग्गंमि ।**
**जे पुण अमग्गजाया, मग्गे गच्छन्ति तं चुय्यं ॥** प्रक. भा. २। षष्टी.। सू. ८३

याचा थोडक्यात अर्थ असा की, एखादा माणूस जैन कुळात जन्म घेऊन मुक्तीला गेला तर त्यात काही आश्चर्य नाही. परंतु जैनांखेरीज इतर कुळात जन्मलेल्या मिथ्यात्वी अन्यमार्गी माणसाला मुक्ती मिळेल तर ते फारच मोठे आश्चर्य ठरेल. याचा मथितार्थ असा की, जैन पंथाचे लोकच मोक्षाला जातात, इतर कोणी नाही. जे जैन पंथाचा स्वीकार करीत नाहीत ते नरकात जातात. ॥८३॥

**(समीक्षक)** जैन पंथामध्ये कोणी दुष्ट अथवा नरकाला जाणारा असत नाही काय? सगळेच मुक्तीला जातात काय? इतर कोणाला मुक्ती मिळत नाही काय? भोळ्या भावड्या लोकांखेरीज या गोष्टीवर कोणाचा विश्वास बसेल?

**मूल – तिच्छयराणं पूआ, संमत्त गुणाण कारिणी भणिया ।**
**साविय मिच्छत्तयरी, जिण समये देसिया पूआ ।** प्रक. भा. २। षष्टी.। सू. ९०

याचा थोडक्यात अर्थ असा की, जिनमूर्तींची पूजा हेच एक सार असून इतर पंथातील मूर्तिपूजा असार आहे. जो जिनमार्गाची आज्ञा पाळतो तो तत्त्वज्ञानी असून जो ती आज्ञा पाळत नाही तो तत्त्वज्ञानी नव्हे ॥९०॥

**(समीक्षक)** वाहवा ! कमालच केली !! वैष्णवादिकांच्या मूर्ती जशा पाषाणादी जड (अचेतन) पदार्थांच्या असतात तशा तुमच्या मूर्ती नाहीत काय? जशी तुमची मूर्तिपूजा मिथ्या आहे तशीच वैष्णवादिकांची मूर्तिपूजाही मिथ्या आहे. तुम्ही स्वतःला तत्त्वज्ञानी समजता आणि इतर लोक तत्त्वज्ञानी नाहीत असे म्हणता, यावरून तुमच्या पंथात तत्त्वज्ञानच नाही हे सिद्ध होते.

**मूल – जिण आणाए धम्मो, आणा रहिआण फुडं अहमुत्ति ।**
**इय मुणिऊणय तत्तं, जिण आणाए कुणहु धम्मं ॥** प्रक. भा. २। षष्टी.।सू. ९२

याचा मथितार्थ असा की, जी जिनदेवाची आज्ञा व दया क्षमादी गोष्टी आहेत तोच धर्म आहे. त्याखेरीज इतरांच्या आज्ञा हा अधर्म आहे. ॥९२॥

**(समीक्षक)** ही केवढी मोठी अन्यायाची गोष्ट आहे ! जैनमताखेरीज इतर कोणत्याही पंथात सत्यवादी, धर्मात्मे पुरुष नाहीत काय? इतर पंथातील धार्मिक लोकांना मान देऊ नये काय? हां ! जैनमतस्थ माणसाचे मुख व जिव्हा ही चामड्याची नसती व इतरांची कातड्याची असती तर हे म्हणणे ठीक झाले असते. या जैन लोकांनी

आपल्या ग्रंथांची, वचनांची व साधूंची अशी काही महती वर्णिली आहे की, जणू हे जैन लोक भाट चरणांचेच थोरले भाऊ बनले आहेत.

**मूल - वन्नेमि नारयाउवि, जेसिं दुरकाइ सम्भरं ताणम्।**

**भव्वाण जणइ हरि हर, रिद्धि समिद्धी वि उद्धोसं॥** प्रक. भा. २। षटी.। सू. ९५

याचा मथितार्थ असा की, हरिहरादी देवांची विभूती नरकाला कारणीभूत आहे. त्यांना पाहून जैनांचा भीतीने थरकाप उडतो. ज्याप्रमाणे राजाज्ञेचा भंग केल्याने माणसाला मरणापर्यंत दु:ख भोगावे लागते त्याप्रमाणे जिनेंद्राच्या आज्ञेचा भंग केल्याने माणसाला आमरण दु:ख का भोगावे लागणार नाही? ॥९५॥

**(समीक्षक)** आता पाहा! जैनांच्या आचार्यांची ही मनोवृत्ती म्हणजे उघड उघड कपट व ढोंग आहे. आता तर यांच्या मनातली गोष्टही बाहेर आली. हरिहरादी देव आणि त्यांचे उपासक यांचे ऐश्वर्य व उन्नती त्यांच्याने पाहवत नाही. इतरांची उन्नती झालेली पाहून यांच्या अंगावर भीतीने काटा उभा राहतो. बहुधा त्यांची अशी इच्छा असावी की, या लोकांचे सारे ऐश्वर्य आपल्यालाच मिळावे आणि हे लोक दरिद्रीच राहावेत. जैन लोक राजाची फार खुशामत करणारे, खोटारडे व भ्याड असतात. म्हणून ते राजाज्ञेचा दृष्टांत देतात. राजाची खोटी गोष्टही मानली पाहिजे काय? जैनांहून अधिक ईर्ष्या व द्वेष करणारा दुसरा कोणीही नसेल.

**मूल - जो देई सुद्ध धम्मं, सो परमप्पा जयम्मि न हु अन्नो।**

**किं कप्पद्दुम सरिसो इयत तरू होइ कइयावि॥** प्रक. भा. २। षटी.। सू. १०१

याचा थोडक्यात अर्थ असा की, जे लोक जैन पंथाच्या विरूद्ध आहेत ते मूर्ख आहेत. जे जिनेंद्रभाषित धर्मोपदेशक साधू, गृहस्थ व ग्रंथकार आहेत ते तीर्थंकरांसमान आहेत. त्यांची बरोबरी करू शकेल असा कोणीही नाही. ॥१०१॥

**(समीक्षक)** कसा असणार? जैन लोक पोरकट नसते तर त्यांनी ही गोष्ट खरी कशी मानली असती? वेश्या स्वत:खेरीज इतर स्त्रियांची स्तुती करत नसते. तशीच स्थिती जैनांची आहे असे दिसते.

**मूल - जिणिदं देवो तव्वयणं गुरुजणं महासयाणमं।**

**सेसं पावट्ठाणं परमप्पाणं च वज्जेमि॥** प्रक. भा. २। षटी.। सू. १०३

याचा थोडक्यात अर्थ असा की, जिनेंद्रदेव, त्यांनी सांगितलेले सिद्धांत व जिनमताचे उपदेशक यांचा त्याग करणे जैनांना उचित नाही. ॥१०३॥

**(समीक्षक)** हे सारे जैनांचा हटवादीपणा, पक्षपात व अविद्या यांचे फळ नव्हे तर काय आहे? जैनांच्या काही थोड्या गोष्टी सोडल्यास बाकी सर्व त्याज्य आहेत. ज्याला थोडीशीही बुद्धी आहे तो जैनांचे देव, सिद्धांतग्रंथ आणि उपदेशकांचे उपदेश पाहून, ऐकून विचार करील तर तत्क्षणीच तो नि:संदेह त्या सर्वांचा त्याग करील.

**मूल - वयणे वि सुगुरु जिणवल्लहस्स केसिं न उल्लसइ सम्मं।**

**अह कह दिणमणि तेयं, उलुआणं हरइ अंधत्तं॥** प्रक. भा. २। षटी.। सू. १०८

संक्षिप्त अर्थ :- जे जिनवचनानुसार आचरण करतात ते पूजनीय आहेत आणि जे त्याविरूद्ध आचरण करतात ते अपूज्य आहेत. जैन गुरूंचे अनुसरण करावे. इतर पंथाच्या लोकांचे अनुसरण करू नये. ॥१०८॥

**(समीक्षक)** जैन लोकांनी इतर अज्ञानी लोकांना चेले बनवून पाळीव पशू प्रमाणे बांधू ठेवले नसते तर त्यांनी त्यांच्या जाळ्यातून सुटून आपली मुक्ती साध्य केली असती व आपल्या जन्माचे सार्थक केले असते. अहो, तुम्हाला जर कोणी कुमार्गी, कुगुरू, खोटारडा व वाईट उपदेशक म्हटले तर तुम्हाला किती दुःख होईल ! ज्या अर्थी तुम्ही दुसऱ्याला दुःख देणारे आहात त्या अर्थी तुमच्या पंथामध्ये पुष्कळच निरर्थक व दुःखदायक गोष्टी भरलेल्या आहेत असे सिद्ध होते.

**मूल - जे रज्जधानईणं कारणभूय हवंति वावारा।**

**ते विहु अइपावजुया धन्ना छड्डंतिभवभिया ॥** प्रक. भा. २। षष्टी.। सू. १०९

संक्षिप्त अर्थ :- मरणाचे दुःख जरी भोगावे लागले तरीही जैनांनी शेती, व्यापार वगैरे गोष्टी करू नयेत. कारण ही कर्मे नरकात नेणारी आहेत. ॥१०९॥

**(समीक्षक)** आता या जैनांना कोणीतरी विचारले पाहिजे की, तुम्ही व्यापारादी कर्मे का करता? ती कामे सोडून का देत नाही? तुम्ही जर ती सोडून द्याल तर तुमच्या शरीराचे पालन पोषणही होऊ शकणार नाही. आणि तुमच्या सांगण्याप्रमाणे सर्वच लोक ही कामे सोडून देतील तर तुम्ही कोणती वस्तू खाऊन जगाल? असला हास्यास्पद उपदेश करणे पूर्णपणे निरर्थक आहे. ते तरी बिचारे काय करतील? विद्या, सत्संग वगैरे न लाभल्यामुळे जे मनात आले ते लिहून मोकळे झाले.

**मूल - तइया हमाण अहमा, कारणरहिया अनाणगव्वेण।**

**जे जंपन्ति उसुत्तं, तेसिं तिद्धिच्छ पंडिच्चं ॥** प्रक. भा.२। षष्टी.। सू. १२१

संक्षिप्त अर्थ :- जे जैनागमाच्या विरुद्ध शास्त्रांना मानणारे आहेत ते अधमाधम आहेत. कोणतेही उद्दिष्ट साध्य होत असले तरीही जैनमताविरुद्ध बोलू नये व मानू नये. कोणताही हेतू साध्य होत असला तरी अन्य पंथाचा त्यागच करावा. ॥१२१॥

**(समीक्षक)** तुमच्या मूळ पुरुषापासून आजपर्यंत जितके पुरुष होऊन गेले व होतील त्यांनी इतर पंथांच्या लोकांना शिवीगाळी करण्याखेरीज दुसरे काहीच केले नाही व करणार नाहीत. आपले प्रयोजन सिद्ध होत आहे असे जेव्हा जैनांना दिसते तेव्हा ते चेल्यांचेही चेले बनतात. खोट्यानाट्या थापा मारण्यास त्यांना मुळीच लाज वाटत नाही. ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे.

**मूल - जं वीरजिणस्स जिओ, मिरई उस्सुत्त लेस देसणओ।**

**सागर कोडाकोडिं हिंडइ अइभीमभवरण्णे ॥** प्रक. भा. २। षष्टी.। सू.१२२

संक्षिप्त अर्थ :- जर कोणी असे म्हणत असेल की, जैन साधूंमध्ये जसा धर्म आहे तसाच तो आमच्या व इतर धर्मांच्या साधूंमध्येही आहे तर तो माणूस कोट्यवधी वर्षे नरकात राहून पुन: नीच योनीत जन्म घेतो. ॥१२२॥

**(समीक्षक)** वाहवा रे वाहवा ! हे विद्येच्या शत्रूंनो ! तुम्ही असाच विचार केला असणार की आमच्या मिथ्या वचनाचे खंडन कोणी करू नये. म्हणूनच तुम्ही हे भयंकर वचन लिहिले आहे. पण ती गोष्ट अशक्य आहे.आता तुम्हाला कुठवर समजवावे? तुम्ही तर खोटी निंदा व अन्य पंथाशी वैर व विरोध करण्यासाठी कंबर कसली आहे आणि आपले प्रयोजन साध्य करणे हे शिन्यासारखे आहे असे तुम्ही समजला आहात.

**मूल – दुरे करणं दूर म्मि साहणं तह पभावणा दूरे।**

**जिण धम्म सद्दहाणं पि तिरकदुरकाइ निट्ठवइ ।।** प्रक. भा. २। षटी.।सू. १२७

संक्षिप्त अर्थ :- जर कोणा माणसाकडून जैन धर्माचे काहीही पालन होत नसेल तरी त्याने जैन धर्मच खरा आहे आणि दुसरा कोणताही खरा नाही अशी श्रद्धा बाळगली. अशा केवळ श्रद्धेने सुद्धा तो दु:खातून तरून जातो. ।।१२७।।

**(समीक्षक)** मूर्ख लोकांना आपल्या पंथाच्या जाळ्यात अडकविण्याची याहून दूसरी कोणती गोष्ट असणार? कारण काहीही कर्म न करता मुक्ती मिळेल असे भोंदू मत कोणते होऊ शकेल ?

**मूल – कइया होही दिवसो, जइया सुगुरूण पायमूलम्मि।**

**उस्सुत्त लेस विसलव, रहिओ निसुणेसु जिण धम्मं।।** प्रक. भा. २।षटी.। सू. १२८

संक्षिप्त अर्थ :- जो कोणी माणूस अशी इच्छा करील की, मी फक्त जिनागम म्हणजे जैनांच्या शास्त्रांचे श्रवण करीन, आणि उत्सूत्र म्हणजे इतर पंथांच्या ग्रंथांचे श्रवण कधीही करणार नाही, तर तेवढ्या इच्छेनेच तो दु:खसागर तरून जातो. ।।१२८।।

**(समीक्षक)** ही गोष्टही भोळ्या लोकांना फसविण्यासाठी आहे. कारण वर सांगितलेल्या इच्छेने माणूस इहलोकातील दु:खसागर तरून जात नाही; आणि पूर्वजन्मातील संचित पापांचे फळ भोगल्याशिवाय त्याची सुटका होऊ शकत नाही. जर त्यांनी अशा खोट्या म्हणजे विद्याविरोधी गोष्टी लिहिल्या नसत्या तर लोकांनी वेदादी शास्त्रे वाचून व ऐकून सत्यासत्य जाणून घेतले असते तर यांचे पोकळ ग्रंथ सोडले असते. परंतु त्यांनी अडाणी लोकांना असे काही जखडून टाकले आहे की, त्यांच्या जाळ्यातून एखादा बुद्धिमान सत्संगी माणूसच त्याची इच्छा असल्यास सुटू शकेल परंतु इतर जडबुद्धी लोक त्यातून सुटणे फार अवघड आहे.

**मूल – जम्हा जिणेहिं भणियं, सुय ववहारं विसोहियं तस्स।**

**जायइ विसुद्ध बोही, जिणआणा राहगत्ताओ।।** प्रक. भा. २। षटी.। सू. १३८

संक्षिप्त अर्थ :- जे लोक जिनाचार्यांनी सांगितलेली सूत्रे, निरुक्ती, वृत्ती भाष्यचूर्णी मानतात तेच शुभ व्यवहार व दु:सह व्यवहार केल्याने चारित्र्ययुक्त होऊन सुखे प्राप्त करतात. इतर पंथांचे ग्रंथ वाचून त्यांना सुखे मिळत नाहीत. ।।१३८।।

**(समीक्षक)** स्वत:ची उपासमार करून घेण्यासारखे कष्ट सहन करणे यालाच चारित्र्य म्हणतात काय ? जर भुकेने व तहानेने तडफडणे हेच चारित्र्य असेल तर दुष्काळात ज्यांची उपासमार होते अथवा ज्यांना अन्न पाणी न मिळाल्यामुळे उपासमार सहन करावी लागते असे लोक शुद्ध होऊन आणि त्यांना शुभ फळे मिळाली

पाहिजेत. पण तेही शुद्ध बनणार नाहीत अथवा तुम्हीही शुद्ध होणार नाही. मात्र पित्तादिकाचा प्रकोप होऊन तुम्ही रोगी होऊन आणि तुम्हाला सुखाऐवजी दु:ख भोगावे लागते. न्यायाचरण, ब्रह्मचर्य, सत्यभाषण हाच खरा धर्म असून असत्यभाषण व अन्यायाचरण हे पाप आहे. सर्वांशी प्रेमाने वागून परोपकारासाठी देह झिजविणे यालाच शुभ चारित्र्य म्हणतात. जैन पंथात सांगितल्याप्रमाणे उपाशी व तहानलेले राहणे हा धर्म नव्हे. यांची ही सूत्रे मानल्याने थोडेसे सत्य व पुष्कळसे असत्य मिळाल्याने व लोक दु:खसागरात बुडून जातात.

**मूल - जइ जाणिसि जिण नाहो, लोयायारा विपरकए भूओ ।**

**ता तं तं मन्नंतो, कह मन्नसि लोअ आयारं ॥** प्रक.भा. २। षटी.। सू. १४८

संक्षिप्त अर्थ :- जे उत्तम प्रारब्धवान लोक असतात तेच जिनधर्म ग्रहण करतात. अर्थात जे जिनधर्माचा स्वीकार करीत नाहीत त्यांचे प्रारब्ध नष्ट होते. ॥१४८॥

**(समीक्षक)** ही गोष्ट चुकीची व खोटी नाही काय ? इतर पंथामध्ये उत्तम प्रारब्धवान आणि जैन पंथात प्रारब्धहीन लोक नाहीत काय ? हे लोक असे सांगतात की, सहधर्मी लोकांनी म्हणजे जैनांनी आपसात भांडण तंटा न करता प्रेमाने वागावे. यावरून ही गोष्ट सिद्ध होते की, इतर पंथियांशी भांडणतंटा करण्यामध्ये काही दोष आहे असे जैन लोक मानीत नाहीत. त्यांचे हे म्हणणेही उचित नाही. कारण सज्जन लोक सज्जनांशी प्रेमाने वागतात व दुर्जनांना शिक्षण देऊन सुशिक्षित बनवितात. ब्राह्मण, त्रिदंडी, परिव्राजकाचार्य म्हणजे संन्यासी व तापसी म्हणजे बैरागी वगैरे सगळे जैन पंथाचे शत्रू आहेत असेही लिहिले आहे. आता तुम्हीच पाहा की, हे जैन इतर सर्वांकडे शत्रुत्वाच्या भावनेने पाहतात व त्यांची निंदा करतात. मग जैनांचा दया-क्षमारूपी धर्म कोठे राहिला ? कारण दुसऱ्यांचा द्वेष करणे म्हणजे दया व क्षमा यांचा नाश करण्यासारखे आहे. त्याच्यासारखा दुसरा हिंसारूपी दोष नाही. जैन लोक जसे द्वेष मूर्ती आहेत तसे दुसरे लोक थोडेच असतील. ऋषभदेवापासून महावीरापर्यंतच्या २४ तीर्थंकरांना कोणी रोगी, द्वेषी, मिथ्यावादी म्हटले आणि जैन पंथाचे अनुयायी सन्निपातज्वराने पीडित असून त्यांचा पंथ नरकासमान व विषारी आहे असे कोणी मानले तर जैनांना किती वाईट वाटेल ? म्हणूनच जैन लोक निंदा व परमतद्वेषरूपी नरकात पडून महाक्लेश भोगत आहेत. ते या गोष्टी सोडून देतील तर फार बरे होईल.

**मूल - एगो अगुरू एगो विसावगो चेइ आणि विवहाणि ।**

**तच्छय जं जिणदव्वं, परुप्परं तं न विच्चन्ति ॥** प्रक. भा. २। षटी.। सू. १५०

संक्षिप्त अर्थ :- सर्व श्रावकांचा देव, गुरू व धर्म एकच आहे. चैत्यवंदन म्हणजे जिनप्रतिबिंब असलेल्या मूर्तीचे, देवळांचे व जैनांच्या संपत्तीचे रक्षण करणे व मूर्तीची पूजा करणे हा धर्म आहे. ॥१५०॥

**(समीक्षक)** आता तुम्हीच पाहा. मूर्तिपूजेचा जो सावळा गोंधळ माजला आहे व जे पाखंड पसरले आहे, तिची सुरुवात जैनांच्या घरातून झालेली आहे; आणि पाखंडीपणाचे मूळही जैन पंथामध्येच आहे.

'श्राद्धदिनकृत्य' ग्रंथाच्या पहिल्या पानावर मूर्तिपूजेचा आधार आहे.

**नवकारेण विवोहो ॥१॥ अणुसरणं सावउ ॥२॥ वयाइं इमे ॥३॥ जोगो ॥४॥ चिय वन्दणगो ॥५॥ पच्चरखाणं तू विहि पुच्छम् ॥६॥** इत्यादी

श्रावकांनी पहिल्या दारात नवकाराचा जप करावा. ॥१॥ दुसऱ्या दारात नवकाराच्या जपानंतर 'मी श्रावक आहे' असे स्मरण करावे. ॥२॥ तिसऱ्या दारात त्याने स्वत:ला विचारावे की, ''आमच्याजवळ अणुव्रतासारखी किती व्रते आहेत?'' ॥३॥ चौथ्या दारात ''जीवनाच्या चार प्रमुख उद्दिष्टांपैकी मोक्ष हे अग्रगण्य आहे.'' त्याचे कारण ज्ञान आहे. म्हणून त्याला योग म्हणतात. ॥४॥ पाचव्या दारात श्रावकाने चैत्यवंदन करावे. म्हणजे मूर्तीला नमस्कार करून द्रव्यभाव पूजा म्हणावी. ॥५॥ सहाव्या प्रत्याख्यान दारात नवकारसी प्रमुखी विधिपूर्वक म्हणेल. ॥६॥

याच ग्रंथात पुढे पुष्कळसे विधि लिहिले आहेत. अर्थात संध्याकाळच्या भोजनाच्या वेळी जिनबिंबाची म्हणजे तीर्थंकरांच्या मूर्तीची पूजा करावी आणि द्वारपूजन करावे. या द्वारपूजेत बरेच व्यत्यय आहेत. मंदिरे उभारण्याचे नियम, जुन्या मंदिरांचा जीर्णोद्धार करणे या गोष्टींमुळे मोक्ष होत असतो. मंदिरामध्ये अशा प्रकारे जाऊन बसावे, मोठ्या भक्तीभावाने पूजा करावी, **'नमो जिनेंद्रेभ्य:'** इत्यादी मंत्रांनी स्नान वगैरे करावे, आणि **'जलचन्दनपुष्पधूपदीपनै:'** इत्यादी मंत्रांनी गंध वगैरे अर्पण करावे. 'रत्नसारभाग' या ग्रंथाच्या १२व्या पृष्ठावर मूर्तिपूजेचे असे फळ सांगितले आहे की, पुजाऱ्याला राजा किंवा प्रजा कोणीही अडवू शकत नाही.

**(समीक्षक)** या सगळ्या गोष्टी कपोलकल्पित आहेत. कारण पुष्कळशा जैन पुजाऱ्यांना राजा वगैरे लोक अडवतात. 'रत्नसारभाग' पृष्ठ १३ वर असे लिहिले आहे की, मूर्तिपूजा केल्याने रोग, पीडा व महादोष नाहीसे होतात. कोणी एकाने पाच पैशाचे फूल वाहिले तर त्याला १८ देशांचे राज्य मिळाले. त्याचे नाव कुमारपाल झाले होते वगैरे गोष्टी लिहिल्या आहेत. त्या सगळ्या खोट्या असून अडाणी लोकांना आकर्षित करण्यासाठी आहेत. कारण अनेक जैनलोक पूजा करीत असतानाही रोगी बनतात आणि मूर्तिपूजा करून त्यांना एका बिघ्याचेही राज्य मिळत नाही. पाच कवड्यांचे फूल मूर्तीला वाहिल्याने राज्य मिळत असेल तर पाच-पाच कवड्यांची फुले वाहून हे लोक साऱ्या जगाचे राज्य का मिळवत नाहीत ? आणि शासकीय शिक्षा का भोगतात ? आणि जर मूर्तिपूजा करून भवसागर तरून जाता, तर ज्ञान, सम्यग्दर्शन व चारित्र्य यांच्या गोष्टी कशाला करता ? 'रत्नसारभाग' पृष्ठ १३ वर लिहिले आहे की, गौतमाच्या अंगठ्यात अमृत असून त्याच्या स्मरणाने मनोवांछित फळ मिळते.

**(समीक्षक)** असे असले तर सर्व जैन लोक अमर झाले पाहिजेत. पण तसे होत नाही. हे केवळ मूर्ख लोकांना फसविण्यासाठी असून त्यात काहीही दुसरे तथ्य नाही. 'विवेकसागर' पृष्ठ ५२ वर पूजा करण्याचा श्लोक आहे :-

**जलचन्दन (पुष्प) धूपनैरथ दीपाक्षतकैर्नैवेद्यवस्त्रै: ।**
**उपचारवैरर (वयं) जिनेन्द्रान् रुचिरैरद्य (मुदा) यजामहे ॥**

आम्ही जल, चंदन, अक्षता, फुले, धूप, दीप, नैवेद्य, वस्त्र यांनी व अतिश्रेष्ठ उपचारांनी जिनेंद्राची म्हणजे तीर्थंकरांची पूजा करावी. म्हणून आम्ही असे म्हणतो की, मूर्तिपूजा जैनांपासून सुरू झाली आहे. 'विवेकसार' पृष्ठ २१ :- जिनमंदिरात मोह येत नाही आणि (तेथे गेल्याने) भवसागर पार करता येतो. 'विवेकसार' पृष्ठ ५१-५२ :- मूर्तिपूजेने मुक्ती मिळते; आणि जिनमंदिरात गेल्याने माणसामध्ये सद्गुण येतात. जल-चंदनादिकांनी तीर्थंकरांची पूजा करणारा नरकातून मुक्त होऊन स्वर्गाला जातो. 'विवेकसार' पृष्ठ ५५ :- जिनमंदिरातील ऋषभदेवादिकांच्या मूर्तीची पूजा केल्याने धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांची सिद्धी होते. 'विवेकसार' पृष्ठ ६१ :- जिनमूर्तीची पूजा केल्यास जगातील सारे क्लेश नाहीसे होतात.

**(समीक्षक)** आता यांच्या या अविद्यायुक्त असंभव गोष्टी पाहा ! जर अशा प्रकारे पापादी वाईट कर्मे सुटत असतील, मोह होत नसेल, भवसागर तरून जाता येत असेल, सद्गुण प्राप्त होत असतील, नरक सोडून स्वर्गाला जाता येत असेल; धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांची प्राप्ती होत असेल आणि सर्व क्लेश नाहीसे होत असतील तर सर्व जैन लोक सुखी झाले असते व सर्व पदार्थांची सिद्धी त्यांना प्राप्त झाली असती. मग तसे का होत नाही ?

याच 'विवेकसार' ग्रंथाच्या पृष्ठ ३ वर लिहिले आहे की, ज्यांनी जिनमूर्तीची स्थापना केली आहे, त्यांनी आपल्या व आपल्या कुटुंबाच्या चरितार्थाची तरतूद केली आहे. 'विवेकसार' पृष्ठ २२५ :- शिव, विष्णू इत्यादिकांच्या मूर्तीची पूजा करणे ही अत्यंत वाईट गोष्ट असून ते नरक प्राप्तीचे साधन आहे.

**(समीक्षक)** शिवादिकांच्या मूर्ती हे नरकाचे साधन असेल तर जैनांच्या मूर्ती तशाच नाहीत काय ? आमच्या मूर्ती त्यागी, शांत व शुभमुद्रायुक्त आहेत म्हणून त्या चांगल्या आहेत आणि शिवादिकांच्या मूर्ती तशा नसल्यामुळे वाईट आहेत, असे त्यांचे म्हणणे असेल तर सांगा की तुमच्या मूर्ती लाखो रुपये खर्च करून बांधलेल्या मंदिरात राहतात; आणि त्यांना चंदन, केशर वाहिले जाते मग त्या त्यागी कशा ? शिवादिकांच्या मूर्ती तर छत्र नसलेल्या ठिकाणीही राहतात. मग त्या त्यागी का नाहीत ? त्या शांत असतात असे तुमचे म्हणणे असेल तर सगळेच जड (अचेतन) पदार्थ निश्चल असल्यामुळे शांत भासतात. (तात्पर्य असे की), सर्वच पंथांतील मूर्तिपूजा निरर्थक आहे.

**(प्रश्न)** आमच्या मूर्ती, वस्त्रे, आभूषणे वगैरे धारण करीत नाहीत म्हणून त्या चांगल्या आहेत.

**(उत्तर)** सर्वांसमोर नागव्या मूर्ती असणे व ठेवणे पशुवत खेळ आहे.

**(प्रश्न)** स्त्रीचे चित्र अथवा मूर्ती पाहिल्याने कामोत्पत्ती होते पण साधू आणि योगी यांच्या मूर्ती पाहिल्याने शुभ गुण प्राप्त होतात.

**(उत्तर)** पाषाणाच्या मूर्ती पाहून शुभ परिणाम उत्पन्न होतात असे तुम्ही मानता तर त्यांचे जडत्वादी (ज्ञानरहित्यादी) गुणही तुमच्यात येतील. तुम्ही जडबुद्धी व्हाल तर सर्वथा नष्ट होऊन जाल. शिवाय उत्तम, विद्वान लोकांची संगत व सेवा सुटल्याने तुमच्यात जास्त मूढता येईल. अकराव्या समुल्लासात मूर्तिपूजेमुळे येणारे जे दोष सांगितले आहेत ते सारे पाषाणादिकांच्या मूर्तीची पूजा करणाऱ्यांना लागतात. जैनांनी मूर्तिपूजेच्या बाबतीत

जसा सावळागोंधळ माजविला आहे तसाच गोंधळ त्यांच्या मंत्रांमध्येही पुष्कळ असंभव गोष्टी सांगितल्यामुळे आहे. 'रत्नसारभाग' पृष्ठ १ वर त्यांचा हा मंत्र आहे :-

**नमो अरिहन्ताणं नमो सिद्धाणं नमो आयरियाणं नमो उवज्झायाणं नमो लोए सव्वसाहूणं । एसो पंच नमुक्कारो सव्व पावप्पणासणो मंगलाचरणं च सव्वेसिं पढमं हवइ मंगलम् ।।१।।**

या मंत्राचे फार माहात्म्य सांगितले आहे; आणि सर्व जैनांचा हा गुरुमंत्र आहे. त्याचे एवढे माहात्म्य वर्णिले आहे की, तंत्रे, पुराणे व भाटांच्या गाथा यांच्यावरही त्याने मात केली आहे. 'श्राद्धदिनकृत्य' पृष्ठ ३ :-

**नमुक्कारं तउ पढे ।।९।।**
**जउ कव्वं मंताणमंतो परमो इमुत्ति । धेयाणधेयं परमं इमुत्ति ।**
**तत्ताणतत्तं परमं पवित्तं । संसार सत्ताण दुहाहयाणं ।।१०।।**

हा मंत्र पवित्र व श्रेष्ठ आहे. तो ध्यानास योग्य व परम ध्येय आहे. तत्त्वांमध्ये ते परम तत्त्व आहे. दुःखपीडित संसारी जीवांसाठी हा नवकार मंत्र जणू समुद्रातून पलीकडे नेणाऱ्या नौकेसमान आहे. ।।१०।।

**ताणं अंनतु नो अत्थि जीवाणं भवसायरे ।**
**बुड्डुं ताणं इमं मुत्तुं नमुक्कारं सुपोयमम् ।।११।।**

हा नवकार मंत्र नौकेसारखा आहे. जे त्याचा त्याग करतात ते भवसागरात बुडून जातात; आणि जे त्याचे ग्रहण करतात ते दुःखातून तरून जातात. जीवांना दुःखापासून दूर ठेवणारा, सर्व पापांचा नाश करणारा, मुक्ती देणारा असा या मंत्राखेरीज दुसरा कोणताही मंत्र नाही. ।।११।।

**कव्वं अणेगजम्मंतरसं चिआणं । दुहाणं सारिरिअमाणुसाणुसाणं ।**
**कत्तोय भव्वाणभिविज्जनासो । न जावपत्तो नवकारमन्तो ।।१२।।**

अनेक जन्मांच्या कर्मांमुळे उत्पन्न झालेल्या शारीरिक दुःखातून मुक्त करणारा व जीवांना भवसागर तारून नेणारा हाच मंत्र आहे. जोपर्यंत नवकार मंत्राचा जप केला जात नाही तोपर्यंत जीव भवसागर तरून जाऊ शकत नाही हा अर्थ सूत्रात आहे. अग्निप्रमुख भय असणाऱ्या अष्टमहाभयातही यामंत्रासारखा साहायक दुसरा नाही. ज्याप्रमाणे वैडूर्य हे महारत्न बाळगणारा अथवा शत्रूचे भय असताना अमोघ शस्त्र धारण करणारा माणूस अभिनंदनीय ठरतो. त्याप्रमाणे श्रुत केवली स्वीकार करणारा आणि द्वादशांगीचा नवकार मंत्र रहस्य आहे.।।१२।।

या मंत्राचा अर्थ असा आहे :- (नमो अरिहन्ताणं) सर्व तीर्थकरांना नमस्कार. (नमो सिद्धाणं) जैन पंथातील सर्व सिद्धांना (संतांना) नमस्कार. (नमो आयरियाणं) जैन पंथातील सर्व आचार्यांना नमस्कार. (नमो ठबज्झायाणं) जैन पंथाच्या सर्व उपाध्यायांना नमस्कार. (नमो लोए सब्ब साहूणं) इहलोकी असणाऱ्या सर्व जैन साधूंना नमस्कार. या मंत्रामध्ये जैन हा शब्द नाही. तथापि जैनांच्या अनेक ग्रंथांमध्ये जैनांशिवाय इतर कोणालाही नमस्कार करू नये असे लिहिले आहे. म्हणून हाच अर्थ बरोबर आहे.

'तत्त्वविवेक' पृष्ठ १६९ :- जो मनुष्य लाकूड व दगड यांची देवबुद्धीने पूजा करतो त्याला चांगली फळे मिळतात.

**(समीक्षक)** असे असेल तर सर्व लोक दर्शन करून सुखरूपी फळे का प्राप्त करून घेत नाहीत ? 'रत्नसारभाग' पृष्ठ १० :- पार्श्वनाथाच्या मूर्तीच्या दर्शनाने पापे नष्ट होतात. 'कल्पसूत्रभाष्य' पृष्ठ ५१ वर लिहिले आहे की, सव्वा लाख मंदिरांचा जीर्णोद्धार केला वगैरे. मूर्तिपूजेविषयी याचे पुष्कळ लिखाण आहे. त्यावरूनच हे लक्षात येते की, मूर्तिपूजेचे मूळ कारण जैनमत आहे.

आता या जैनसाधूंच्या लीला पाहा. 'विवेकसार' पृष्ठ २२८ :- एक साधू कोशा नावाच्या वेश्येचा उपभोग घेऊन नंतर त्यागी होऊन स्वर्गाला गेला. 'विवेकसागर' पृष्ठ १०१ :- अणकमुनी चारित्र्यहीन बनून अनेक वर्षांपर्यंत दत्त शेटाच्या घरी विषयोपभोग करून देवलोकी गेला. श्रीकृष्णाचा मुलगा ढंढण मुनी याला एका कोल्ह्याने पळवून नेले. त्यानंतर तो देव झाला. 'विवेकसार' पृष्ठ १५६ :- जैनमताचा साधू फक्त लिंगधारी म्हणजे वेशधारी असला तरी श्रावकांनी त्याचा सत्कार करावा. साधू शुद्ध चारित्र्याचा असो की अशुद्ध चारित्र्याचा, सगळेच पूजनीय आहेत. 'विवेकसार' पृष्ठ १६८ :- जैन साधू चारित्र्यहीन असला तरी तो इतर पंथांतील साधूंहून श्रेष्ठ असतो. 'विवेकसार' पृष्ठ १७१ :- जैन साधू चारित्र्यहीन व भ्रष्टाचारी असल्याचे दिसून आले तरी श्रावकांनी त्याची सेवा केली पाहिजे. 'विवेकसार' पृष्ठ २१६ :- एका चोराने पाच मुठी (केश) लुंचन केले; म्हणजे आपले केस उपटून काढले आणि मग चारित्र्य ग्रहण केले. त्याने खूप कष्ट केले व पश्चाताप केला. सहाव्या महिन्यात तो केवल ज्ञान प्राप्त करून सिद्ध पुरुष बनला.

**(समीक्षक)** आता जैन साधूंची व गृहस्थांची लीला पाहा. यांच्या मतानुसार खूप कुकर्मे करणाऱ्या साधूलाही सद्गती प्राप्त झाली; आणि 'विवेकसार' पृष्ठ १०६ वर लिहिले आहे की, श्रीकृष्ण तिसऱ्या नरकात गेला. 'विवेकसार' पृष्ठ १४५ वर लिहिले आहे की, धन्वंतरी वैद्य नरकात गेला. 'विवेकसार' पृष्ठ ४८ वर असे लिहिले आहे की, योगी, जंगम, काजी, मुल्ला असे कितीतरी लोक अजाणता तप व कष्ट करूनही कुगती प्राप्त करतात. 'रत्नसारभाग' पृष्ठ १७१ वर लिहिले आहे की, नऊ वासुदेव म्हणजे त्रिपृष्ठ वासुदेव, द्विपृष्ठ वासुदेव, स्वयंभू वासुदेव, पुरुषोत्तम वासुदेव, सिंहपुरुष वासुदेव, पुरुषपुंडरीक वासुदेव, दत्त वासुदेव, लक्ष्मण वासुदेव व श्रीकृष्ण वासुदेव हे सगळे अकराव्या, बाराव्या, चौदाव्या, अठराव्या, विसाव्या व बाविसाव्या तीर्थकरांच्या वेळी नरकात गेले; आणि नऊ प्रतिवासुदेव म्हणजे अश्वग्रीव प्रतिवासुदेव, तारक प्रतिवासुदेव, मोरक प्रतिवासुदेव, मधु प्रतिवासुदेव, निशुंभ प्रतिवासुदेव, बली प्रतिवासुदेव, प्रह्लाद प्रतिवासुदेव, रावण प्रतिवासुदेव आणि जरासंध प्रतिवासुदेव हे सगळेही नरकात गेले. 'कल्प(सूत्र)भाष्य' ग्रंथात लिहिले आहे की, ऋषभदेवापासून महावीरापर्यंतचे २४ तीर्थंकर सगळे मोक्षाला गेले.

**(समीक्षक)** आता शहाण्या माणसांनीच या गोष्टीचा विचार करावा की, जैनांचे साधू, गृहस्थ व तीर्थंकर यांच्यामध्ये पुष्कळसे वेश्यागामी, परस्त्रीगामी, चोर वगैरे होते; परंतु ते जैन पंथी असल्यामुळे ते सगळे स्वर्गाला गेले व त्यांना मोक्ष मिळाला; तर श्रीकृष्णादी सगळे महान धार्मिक महात्मे नरकाला गेले, असे म्हणणे ही किती वाईट गोष्ट आहे ! चांगल्या माणसांनी जैनांची संगत करणे किंवा त्यांच्याकडे पाहणे हेही वाईट आहे. कारण जे

कोणी यांची संगत धरतील त्यांच्या मनातही असल्या खोट्या गोष्टी घर करून बसतील. या महाहट्टी, दुराग्रही माणसांच्या संगतीतून वाईट गोष्टींखेरीज दुसरे काहीच मिळणार नाही. अर्थात जैनांमध्ये जे उत्तम लोक आहेत त्यांची संगत करण्यात काही दोष नाही.*

'विवेकसार' पृष्ठ ५५ वर लिहिले आहे की, गंगादी तीर्थे आणि काशी वगैरे क्षेत्रे यांचे सेवन केल्याने कसलाही परमार्थ सिद्ध होत नाही. मात्र गिरनार, पालीताणा, आबू वगैरे तीर्थक्षेत्रे मुक्ती देखील देणारी आहेत, असे लिहिले आहे.

**(समीक्षक)** येथे असा विचार केला पाहिजे की, शैव-वैष्णवादिकांची तीर्थक्षेत्रे जल, स्थल, जडस्वरूप आहेत तशीच ती जैनांचीही आहेत. त्यांच्यापैकी एकाची निंदा व दुसऱ्याची स्तुती करणे हे मूर्खपणाचे काम आहे.

## जैनांच्या मुक्तीचे वर्णन

'रत्नसारभाग' पृष्ठ २३ :- महावीर तीर्थंकर गौतमजींना सांगतात की, 'उर्ध्वलोकांमध्ये एक सिद्धशिला स्थान आहे. ती स्वर्गपुरीच्या वर पंचेचाळीस लक्ष योजने लांब व तितकीच आतून पोकळ आहे; आणि ८ योजने जाड आहे. मोत्यांचा शुभ्र हार किंवा गाईचे दूध जितके पांढरे असते त्याहूनही ती जास्त शुभ्र आहे. ती सोन्याप्रमाणे प्रकाशमान आणि स्फटिकाहूनही अधिक निर्मळ आहे. ही सिद्धशिला चौदाव्या लोकाच्या शिखरावर आहे. या सिद्धशिलेवर शिवपुर धाम आहे. त्यामध्येही मुक्त पुरुष अधांतरी राहतात. तेथे जन्ममरणादी कसलाही दोष लागत नाही. सर्व लोक तेथे मोठ्या आनंदात राहतात. त्यांना पुन: जन्ममरणाच्या फेऱ्यात पडावे लागत नाही. ते सर्व कर्मांपासून मुक्त होतात. ही जैनांची मुक्ती आहे.'

**(समीक्षक)** हा विचार आहे की, ज्याप्रमाणे इतर पंथांमध्ये वैकुंठ, कैलास, गोलोक, श्रीपुर वगैरे ठिकाणी पौराणिकांच्या दृष्टीने, चौथ्या आकाशात ख्रिस्ती लोकांच्या दृष्टीने व सातव्या आकाशात मुसलमानांच्या मतामध्ये मुक्तीचे स्थान लिहिले आहे; त्याप्रमाणे जैनांच्या दृष्टीने सिद्धशिला व शिवपुर हे मोक्षाचे स्थान आहे. ज्याला जैन लोक उंच असे मानतात तोच भाग आमच्या भूगोलाच्या खालच्या भागात राहणाऱ्या लोकांच्या अपेक्षेने खाली आहे. उंच-खाली हे व्यवस्थित पदार्थ नाहीत. आर्यावर्त्तात राहणारे जैन लोक ज्याला वर (वरचा) मानतात त्यालाच अमेरिकावासी खाली (खालचा) मानतात; आणि आर्यावर्त्तवासी ज्याला खाली (खालचा) मानतात त्यालाच अमेरिकावासी वर (वरचा) मानतात. मग ती शिला पंचेचाळीस लाखच नव्हे तर त्याच्या दुप्पट म्हणजे नव्वद लाख कोस लांब असती तरी तेथे राहणारे लोक मुक्त बंधनामध्येच आहेत. कारण त्या शिलेच्या अथवा शिवपुराच्या बाहेर पडल्यास त्यांची मुक्ती नष्ट होत असली पाहिजे आणि त्यांच्या मनामध्ये कायम तेथे राहण्याची इच्छा व तेथून बाहेर पडण्याच्या बाबतीत अनिच्छाही राहत असणार. जेथे अडवणूक, इच्छा व अनिच्छा आहे, तेथे मुक्ती आहे असे कसे म्हणता येईल ? नवव्या समुल्लासात वर्णन केल्याप्रमाणे मुक्ती

* जो सदाचारी व बुद्धिमान असेल तो या आसार जैन पंथात कधीच राहणार नाही.

मानणे हेच योग्य होय. जैनांची मुक्ती हे एक प्रकारचे बंधनच आहे. हे जैन लोकही मुक्तीच्या बाबतीत भ्रमात गुरफटले आहेत. वेदांच्या ज्ञानाशिवाय नीट अर्थबोध झाल्याशिवाय मुक्तीचे स्वरूप कोणालाही कधी जाणता येणार नाही.

आता यांच्या आणखी काही असंभव गोष्टी ऐका. 'विवेकसार' पृष्ठ ७८ :- एक कोटी साठ लाख कलशांनी महावीराला त्याच्या जन्मकाळी स्नान घातले. 'विवेकसार' पृष्ठ १३६ :- दशाण राजा महावीराच्या दर्शनाला गेला. तेथे त्याला गर्व झाला. तेव्हा त्याच्या निवारणासाठी १६,७७,७२,१६,००० इतकी इंद्राची रूपे आणि १३,३७,०५,७२,८०,००,००,००० इतक्या इंद्राण्या तेथे आल्या होत्या. ते पाहून राजा आश्चर्यचकित झाला.

येथे असा विचार करावा की, इतके इंद्र व इंद्राण्या यांना उभे राहण्यास असे कितीतरी भूगोल हवेत. 'श्राद्धदिनकृत्य' (आत्मनिंदा भावना) पृष्ठ ३१ वर असे लिहिले आहे की आड, विहीर व तलाव बनवू नये.

**(समीक्षक)** जर सर्व माणसे जैन पंथाची अनुयायी असतील आणि कोणीही आड, विहीर, तलाव बांधणार नाही. तर मग सर्व लोक पाणी कोठून पीतील ?

**(प्रश्न)** तलाव वगैरे बांधल्याने त्यात सजीव प्राणी पडून मरतात. त्याचे पाप तलाव बांधणाऱ्याला लागते. म्हणून जैन लोक हे काम करीत नाहीत.

**(उत्तर)** तुमची अक्कल अशी नष्ट का झाली ? क्षुद्र किड्यांच्या मरणाने पाप लागते असे तुम्ही समजता. तर गाय, बैल वगैरे मोठे पशू आणि मनुष्यादी प्राणी यांना पाणी प्यावयास मिळाल्याने महापुण्य मिळेल त्याचा विचार तुम्ही का करीत नाही ?

'तत्त्वविवेक' पृष्ठ १९६ :- नंदमणिकार नावाच्या शेटजीने या शहरात एक विहीर बांधविली. त्यामुळे तो धर्मभ्रष्ट होऊन त्याला सोळा महारोग झाले. पुढे तो मेल्यावर त्याच विहिरीतला बेडूक बनला. महावीरांच्या दर्शनाने त्याला आपल्या पूर्वजन्माचे स्मरण झाले. महावीर म्हणतात की, ''मी आलो आहे हे ऐकून मी मागील जन्मात धर्माचार्य होतो हे ओळखून तो मला वंदन करण्यासाठी येऊ लागला. वाटेत श्रेणिकाच्या घोड्याचा टापेखाली सापडून तो मरून शुभ ध्यान योगाने तो दर्दुशंक नावाचा महर्द्धिक देव झाला. आपल्या मर्यादित ज्ञानाच्या आधारे मी येथे आलो आहे ओळखून त्याने मला प्रणाम केला आणि ऋद्धी दाखवून परत गेला.''

**(समीक्षक)** अशा प्रकारच्या ज्ञानविरोधी, अशक्य, खोट्या गोष्टी सांगणाऱ्या महावीराला सर्वोत्तम मानणे हे अत्यंत भ्रमिष्टपणाचे लक्षण आहे.

'श्राद्धदिनकृत्य' ग्रंथाच्या पृष्ठ ३६ वर लिहिले आहे की, मृत माणसाच्या शरीरावरील वस्त्रे साधूने घ्यावीत.

**(समीक्षक)** म्हणजे आता पहा ! यांचे साधूही महाब्राह्मणासारखे झाले. प्रेतावरील वस्त्रे साधूने घ्यावीत. पण आभूषणे कोणी घ्यावीत ? ती बहुमूल्य असल्यामुळे घरातच ठेवून घेत असतील. मग आपण कोण ?

'रत्नसार' पृष्ठ १०५ :- धान्य वगैरे भाजणे, कुटणे, दळणे, अन्न शिजविणे वगैरे गोष्टींनी पाप लागते.

आता त्यांची ही ज्ञानहीनता पाहा ! ही कामे केली नाहीत तर मनुष्यादी प्राणी कसे जगू शकतील ? आणि जैनही तडफडून मरतील.

'रत्नसार' पृष्ठ १०४ :- बाग लावल्यामुळे माळ्याला एक लक्ष पापे लागतात.

**(समीक्षक)** माळ्याला लक्ष पापे लागत असतील तर असंख्य जीव झाडांची पाने, फुले, फळे व सावली मिळून आनंदित होत असतात. त्यामुळे कोट्यवधी पटीने पुण्यही लागत असते. इकडे मुळीच लक्ष दिलेले नाही. हे केवढे अज्ञान आहे !

'तत्त्वविवेक' पृ. २०२ :- एके दिवशी लब्धी नावाचा साधू चुकून एका वेश्येच्या घरी गेला आणि त्याने धर्माच्या नावाने तिच्याकडे भिक्षा मागितली. वेश्या म्हणाली, 'येथे धर्माचे काम नसून अर्थाचे काम आहे.' तेव्हा त्या लब्धी (सिद्ध) साधूने साडेबारा लाख मोहरांचा वर्षाव तिच्या घरात केला.

**(समीक्षक)** ही गोष्ट खरी आहे असे निर्बुद्ध माणसांखेरीज कोण मानील ?

'रत्नसार भाग १' पृष्ठ ६७ वर लिहिले आहे की, एक दगडी मूर्ती घोड्यावर बसली आहे. तिचे स्मरण करताच ती तेथे हजर होऊन रक्षण करते.

**(समीक्षक)** जैन लोकांनो, आता तुम्हीच सांगा, आजकाल तुमच्या घरी जेव्हा चोरी होते, दरोडा पडतो किंवा अशाच प्रकारच्या शत्रूपासून भय निर्माण होते तेव्हा तुम्ही तिचे स्मरण करून तिच्याकडून आपले रक्षण का करवून घेत नाही ? पोलीस वगैरे शासकीय रक्षकांच्या मागे कशाला मदतीसाठी फिरत असता ? आता जैनांच्या साधूंची लक्षणे -

## जैन साधू लक्षण समीक्षा

**सरजोहरणा भैक्षभुजो लुञ्चितमूर्द्धजाः ।**
**श्वेताम्बराःक्षमाशीला निःसङ्गा जैनसाधवः ॥१॥** सर्व.सं.आ.द.श्लो. १०

जैनांच्या साधूंची लक्षणार्थ म्हणून जिनदत्तसूरीने हे श्लोक रचले आहेत. :- सरजोहरण - चवरी जवळ बाळगणे आणि भिक्षा मागून खाणे, डोक्यावरील केसांचे लुंचन करणे म्हणजे ते उपटून काढणे, पांढरी वस्त्रे परिधान करणे, क्षमायुक्त राहणे, कोणाचीही संगत न धरणे, या लक्षणांनी युक्त असणाऱ्या श्वेतांबर जैनांना 'जती' म्हणतात. ॥१॥

**लुञ्चिताः पिच्छिकाहस्ता पाणिपात्रा दिगम्बराः ।**
**ऊर्ध्वाशिनो गृहे दातुर्द्वितीयाः स्युर्जिनर्षयः ॥२॥** सर्व.सं.आ.द.श्लो. ११

दिगंबर म्हणजे वस्त्रे धारण न करणे, डोकीचे केस उपटून टाकणे, पिच्छिका म्हणजे लोकरीच्या सुताचे केरसुणी सारखे झाडण्याचे साधन काखेत धरणे, कोणी भिक्षा दिली तर ती हातावर घेऊन खाणे असे करणारे दिगंबर जैन हे दुसऱ्या प्रकारचे साधू होत. ॥२॥

**भुङ्क्ते न केवलं न स्त्री मोक्षमेति दिगम्बरः ।**
**प्राहुरेषामयं भेदो महान् श्वेताम्बरैःसह ॥३॥** सर्व.सं.आ.द. श्लो. १२

भिक्षा देणारा गृहस्थ जेवून उठल्यावर जे भोजन करतात ते जिनर्षी हे तिसऱ्या प्रकारचे साधू होत. दिगंबरांचा श्वेतांबराबरोबर इतकाच भेद आहे की, दिगांबरी स्त्रियांशी संस्पर्श करीत नाही आणि श्वेतांबरी करतात हा जैनांच्या साधूमधील फरक आहे.॥३॥

जैन लोकांचे केशलुंचन (केस उपटणे) सर्वत्र प्रसिद्ध आहे. पाच मुठी लुंचन करावे असे त्यांच्या ग्रंथात लिहिले आहे. 'विवेकसारभाग' या ग्रंथाच्या पृष्ठ २१६ वर लिहिले आहे की, पाच मुटी लुंचन करून चारित्र्य ग्रहण केले म्हणजे डोकीचे पाच मुठी.केस उपटून साधू झाला. 'कल्पसूत्रभाष्य' पृष्ठ १०८ :- केशलुंचन करावे. गाईच्या अंगावरील केसांप्रमाणे केस ठेवावेत.

**(समीक्षक)** जैनांनो, आता तुम्हीच सांगा. तुमचा दयाधर्म कोठे राहिला ? केशलुंचन ही हिंसा नाही काय ? केस उपटण्याचे काम स्वत: केले, गुरूने केले अथवा इतर कोणी केले तरी जिवाला किती यातना होत असतील ? जिवाला यातना देणे यालाच हिंसा असे म्हणतात.

'विवेकसार' पृष्ठ ७-८ विक्रम संवत् १०३३ (इ.स. ९७६) साली श्वेतांबरामधून ढूंढिया व ढूंढिया मधून तेरापंथी वगैरे संप्रदाय निघाले. ढूंढिये लोक पाषाणदिकांच्या मूर्तींना मानीत नाहीत आणि भोजन व स्नान करण्याच्या वेळा वगळता इतर सर्व वेळी तोंडावर पट्टी बांधून राहतात. जती वगैरे लोकही पुस्तक वाचण्याच्या वेळी तोंडावर पट्टी बांधतात. इतर वेळी बांधीत नाहीत.

## मुखपट्टी-समीक्षा

**(प्रश्न)** तोंडावर पट्टी अवश्य बांधली पाहिजे. कारण 'वायुकाय' म्हणजे हवेत असणारे सूक्ष्म जीव तोंडातील वाफेच्या उष्णतेने मरतात आणि त्याचे पाप तोंडावर पट्टी न बांधणाऱ्याला लागते. म्हणूनच आम्ही तोंडावर पट्टी बांधणे चांगले समजतो.

**(उत्तर)** ही गोष्ट विज्ञानाच्या दृष्टीने व प्रत्यक्षादी प्रमाणांच्या आधारे अनुचित आहे. कारण जीव अजर, अमर असल्याने ते तोंडाच्या वाफेने कधीच मरू शकत नाहीत. त्यांना तुम्हीही अजर, अमर मानता.

**(प्रश्न)** जीव मरत नाही हे खरे; परंतु तोंडातील उष्ण वाफेने त्यांना जी पीडा होते ती पीडा देणाऱ्याला पाप लागते. म्हणून तोंडावर पट्टी बांधणे चांगले.

**(उत्तर)** तुमचे हे विधानही अगदीच अशक्य कोटीतील आहे. कारण पीडा दिल्याखेरीज कोणत्याही जीवाचे निर्वाह होऊ शकत नाही. तोंडातील वाफेने तुमच्या मते जीवांना पीडा होत असेल तर चालणे, फिरणे, बसणे, हात उचलणे, डोळे मिचकावणे इत्यादी गोष्टींनीही जीवांना अवश्य पीडा होत असणार. म्हणून तुम्हीही जीवांना पीडा देण्यापासून अलिप्त राहू शकत नाही.

**(प्रश्न)** होय ! तरीपण शक्य होईल तितके जीवांचे रक्षण केले पाहिजे. जेथे आम्ही जीवांना वाचवू शकत नाही तेथे आपला निरुपाय आहे असे आम्ही समजतो. कारण हवा वगैरे सर्व पदार्थांमध्ये जीव भरलेले आहेत. आम्ही तोंडावर कापड बांधले नाही तर पुष्कळ जीव मरतील. कापड बांधल्याने कमी जीव मरतात.

**(उत्तर)** तुमचे हे म्हणणेही युक्तिशून्य आहे. कारण कापड बांधल्याने जीवांना अधिक दुःख पोचते. तोंडावर कापड बांधल्याने त्याच्या तोंडातील हवेला प्रतिबंध होतो; आणि ती खाली अथवा आजूबाजूला पसरते आणि मौनाच्या वेळी एकत्र येऊन नाकावाटे वेगाने बाहेर पडते. त्यामुळे उष्णता वाढून तुमचे मताप्रमाणे जीवांना जास्तच पीडा पोचत असणार. पाहा ! घराची किंवा खोलीची सर्व दारे बंद केली अथवा पडदे सोडले तर त्यात उष्णता विशेष जाणवते. दारे खिडक्या उघड्या ठेवल्याने उष्णता कमी होते. याचप्रमाणे तोंडावर पट्टी बांधल्याने उष्णता जास्त होते आणि ते उघडे ठेवल्याने ती कमी होते. म्हणजे तुम्ही तुमच्या वागण्याने जीवांना जास्त क्लेश देता. तोंड बंद ठेवल्याने तोंडात साठलेली हवा नाकपुड्यातून वेगाने बाहेर पडून जींवाना जास्त धक्का व दुःख देत असणार.

पाहा ! एखादा माणूस अग्नीला तोंडाने फुंकर घालतो तर दुसरा फुंकणीतून वारा फुंकतो. अशावेळी तोंडाने फुंकलेला वारा आजूबाजूला पसरल्यामुळे अग्नीजवळ जाईपर्यंत त्याचा जोर कमी होतो आणि नळीतून फुंकलेला वारा एकत्रित असल्याने जास्त वेगाने अग्नीला लागतो. याचप्रमाणे तोंडावर पट्टी बांधून हवेला अडवल्याने ती नाकपुड्यातून अत्यंत वेगाने बाहेर पडून जीवांना जास्तच दुःख देते. यावरून तोंडावर पट्टी बांधणाऱ्यांपेक्षा न बांधणारे लोक अधिक धर्मात्मे आहेत. शिवाय तोंडावर पट्टी बांधल्याने शब्दांचा उच्चार प्रयत्नपूर्वक केला तरी अक्षरांची यथायोग्य स्थाने व प्रयत्नांसह उच्चार होत नाहीत. सानुनासिक नसलेल्या अक्षरांचा सानुनासिक उच्चार करण्याचा दोष तुम्हाला लागतो.

तोंडावर पट्टी बांधल्याने तोंडाची दुर्गंधीही जास्त वाढते. कारण शरीरात दुर्गंध भरलेला आहे. शरीरातून जो वायु बाहेर पडतो तो प्रत्यक्षतः दुर्गंधयुक्त असतो. त्याला प्रतिबंध केल्यास दुर्गंध जास्तच वाढतो. ज्याप्रमाणे बंद असलेले शौचालय जास्त दुर्गंधयुक्त असते व ते उघडे असल्यास त्यात कमी दुर्गंध होतो. त्याचप्रमाणे तोंडावर पट्टी बांधल्याने दंतधावन, मुखप्रक्षालन व स्नान न केल्याने आणि वस्त्रे न धुतल्याने तुमच्या शरीराला फार घाण वास येतो. आपल्या या वागण्याने तुम्ही जगात अनेक रोग पसरवून जीवांना जितके दुःख देता तितके तुमचे पाप जास्त होते. जत्रा वगैरेच्या ठिकाणी सर्वत्र दुर्गंधी पसरल्याने महामारीसारखे अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होऊन जीवांना दुःखदायक होते. याउलट जेथे कमी दुर्गंध असते तेथे रोगांचा प्रसारही कमी होतो व जीवांना जास्त दुःख सहन करावे लागत नाही. यावरून तुम्ही जास्त दुर्गंध पसरविण्याच्या बाबतीत अधिक अपराधी आहात. जे लोक तोंडावर पट्टी बांधत नाहीत, दात घासतात, तोंड धुतात, स्नान करतात आणि अशा प्रकारे स्थान व वस्त्रे निर्मळ ठेवतात ते तुमच्यापेक्षा खूपच चांगले आहेत.

जसे अंत्यजांच्या दुर्गंधीयुक्त सहवासापासून दूर राहणारे लोक फार चांगले आहेत. ज्याप्रमाणे अंत्यजांच्या दुर्गंधयुक्त सहवासामुळे बुद्धी निर्मळ होत नाही त्याप्रमाणे तुमची तुमच्या सहकाऱ्यांची बुद्धीही विकसित होत नाही. ज्याप्रमाणे रोगाची अधिकता व बुद्धीची अल्पता यांमुळे धर्मानुष्ठानात बाधा निर्माण होते. त्याचप्रमाणे तुमचे व तुमच्या सहकाऱ्यांचे दुर्गंधीयुक्त वर्तमान होत असणार.

**(प्रश्न)** ज्याप्रमाणे बंद घरात पेटविलेल्या अग्नीच्या ज्वाळा बाहेर पडून जीवांना दुःख पोचवू शकत नाही,

त्याप्रमाणे आम्ही तोंडावर पट्टी बांधून आतील वायूला प्रतिबंध करतो आणि बाहेरच्या जीवांना कमीत कमी दुःख होईल अशी खबरदारी घेतो. तोंडावर पट्टी बांधल्याने बाहेरच्या हवेतील जीवांना त्रास पोचत नाही. ज्याप्रमाणे समोर अग्नी ताप देतो त्याच्या आड हात धरल्यास त्याची धग कमी लागते त्याप्रमाणे हे आहे. अर्थात हवेतील जीव शरीरधारी असल्यामुळे त्यांना पीडा अवश्य पोचते.

**(उत्तर)** तुमचे हे बोलणे पोरकटपणाचे आहे. प्रथम हे पाहा की, जेथे छिद्र नाही व आतील वायूचा बाहेरच्या हवेशी संयोग होत नाही तेथे अग्नी पेटूच शकत नाही. हे तुम्हाला प्रत्यक्ष पाहावयाचे असेल तर एखाद्या कंदिलात दिवा पेटवून सर्व छिद्रे बंद करा. आतील दिवा ताबडतोब विझतो असे तुम्हाला दिसेल. ज्याप्रमाणे पृथ्वीवर राहणारे मनुष्यादि प्राणी बाहेरच्या हवेशिवाय जगू शकत नाहीत त्याप्रमाणे हवेशिवाय अग्नीही जळू शकत नाही. अग्नीचा वेग एका बाजूने अडविल्यास तो दुसऱ्या बाजूने अधिक वेगाने बाहेर पडतो. अग्नी समोर हात धरल्यास तोंडावर अग्नीची झळ कमी लागते हे खरे, परंतु ती झळ हातावर अधिक लागते. म्हणून तुमचे म्हणणे बरोबर नाही.

**(प्रश्न)** जेव्हा एखादा लहान माणूस मोठ्या माणसाच्या जवळ जाऊन किंवा त्याच्या कानात बोलतो तेव्हा तो आपल्या तोंडावर उपरणे, रूमाल किंवा हात धरतो, हे सर्वांना माहित आहे. कारण आपल्या तोंडातील थुंकी दुसऱ्या माणसाच्या अंगावर उडू नये अथवा आपल्या तोंडाची दुर्गंध त्याच्यापर्यंत पोचू नये असे त्याला वाटत असते. पुस्तक वाचताना तोंडातून थुंकी उडून पुस्तकावर अवश्य पडते आणि ते उष्टे होऊन खराब होते. म्हणून तोंडावर पट्टी बांधणे चांगले आहे.

**(उत्तर)** यावरून हे सिद्ध होते की सूक्ष्म जीवांच्या रक्षणासाठी तोंडावर पट्टी बांधणे व्यर्थ आहे. जेव्हा कोणी एखाद्या मोठ्या माणसाशी बोलताना तोंडावर हात अथवा रुमाल धरतो यासाठी की आपली गुप्त गोष्ट इतर कोणी ऐकू नये कारण कोणी जेव्हा उघडपणे बोलतो तेव्हा तो तोंडावर हात अथवा रुमाल धरीत नाही. यावरून हे स्पष्ट आहे की, गुप्त गोष्ट सांगण्यासाठीच असे केले जाते. दंतधावन वगैरे न केल्याने तुमच्या मुखादी अवयवांची फारच घाण येते. जेव्हा तुम्ही कोणाजवळ बसत असाल अथवा कोणी तुमच्या जवळ बसत असेल तेव्हा त्याला दुर्गंधाशिवाय काय मिळत असेल ? अर्थात तोंडासमोर हात किंवा फडके धरण्याची इतरही अनेक प्रयोजन आहेत. जसे पुष्कळ लोकांसमोर गुप्त बोलताना तोंडासमोर हात अथवा कापड धरले नाही तर हवा जशी इतरांच्या दिशेने पसरेल तशी गोष्टही पसरेल. जेव्हा दोन माणसे एकांतात बोलत असतात तेव्हा तोंडावर हात अथवा फडके धरत नाहीत. कारण तेथे तिसरा कोणी ऐकणारा नसतो. मोठ्या माणसांच्या अंगावर थुंकी उडू नये असे वाटते तर लहान माणसांच्या अंगावर थुंकी उडाली तरी हरकत नाही, असे समजावयाचे काय? कारण आपण दुरून बोलत असलो तरी आपल्याकडून दुसऱ्याकडे वारा वहात असेल तर थुंकीचे त्रसरेणू सूक्ष्मरूपात वाऱ्याबरोबर वाहत जाऊन त्या दुसऱ्या माणसाच्या अंगावर नक्कीच पडणार. त्यामध्ये काही दोष अथवा पाप आहे असे समजणे हे अडाणीपणाचे लक्षण आहे. कारण तोंडातील वाफेच्या उष्णतेने सूक्ष्म जीव मरत असतील अथवा त्यांना पीडा पोचत असेल तर वैशाख किंवा ज्येष्ठ महिन्यात सूर्याच्या भयंकर उष्णतेने

वायुकाय जीवांपैकी एकही जिवंत राहत नसेल; सगळेच मरून जात असतील. परंतु त्या उष्णतेनेही हवेतील सूक्ष्म जीव मरत नाहीत. म्हणून तुमचा हा सिद्धांत खोटा आहे. तुमचे तीर्थंकर पूर्ण विद्वान असते तर त्यांनी असल्या निरर्थक गोष्टी कशाला केल्या असत्या ? पाहा ! ज्या जीवाची वृत्ती सर्व अवयवांसह विद्यमान असते त्यालाच वेदना होत असतात. याला प्रमाण हे आहे.

**पञ्चावयवयोगात सुखसंवित्तिः ॥** सां. द. अ. ५। सू. २७

हे सांख्य शास्त्रातील सूत्र आहे :- जेव्हा पाच इंद्रियांचा पाच विषयांशी संबंध घडून येतो तेव्हाच जीवाला सुखाची किंवा दुःखाची प्राप्ती होते. जसे बहिऱ्या माणसाला शिव्या देऊन काय होणार ? आंधळ्या माणसाला रूप कसे दिसणार अथवा समोरून साप, वाघ वगैरे भयंकर प्राणी निघून गेले तरी त्याला कसे कळणार ? बधिराला स्पर्श समजणार नाही. नाकाचा पीनस रोग होऊन ज्याचे घ्राणेंद्रिय नष्ट झाले आहे त्याला गंध कसा येणार ? आणि ज्याला जीभच नाही त्याला रसस्वाद कसा घेता येणार ? तशीच स्थिती त्या जीवांची सुद्धा व्यवस्था आहे.

पाहा ! जेव्हा माणसाचा जीव सुषुप्ती (गाढनिद्रेच्या) ज्या अवस्थेत असतो तेव्हा त्याला सुख किंवा दुःख काहीच होत नाही. कारण तो शरीराच्या आत असला तरी बाहेरच्या अवयवांशी त्यावेळी त्याचा संबंध नसल्यामुळे तो सुखाचा अथवा दुःखाचा अनुभव घेऊ शकत नाही. ज्याप्रमाणे वैद्य किंवा आजकालचे डॉक्टर रोग्याला गुंगी आणणारी वस्तू खायला देऊन अथवा हुंगायला लावून त्याच्या शरीराचे अवयव कापतात किंवा फाडतात तेव्हा त्या रोग्याला दुःखाची जाणीव मुळीच होत नाही, त्याप्रमाणे वायुकाय किंवा अन्य स्थावर शरीरयुक्त जीवांना कधीही सुख अथवा दुःख होऊ शकत नाही. मूर्च्छित झालेल्या प्राण्याला सुखदुःखाची जाणीव होत नाही. त्याचप्रमाणे वायुकाय वगैरे जीवही अत्यंत मूर्च्छित असल्याने त्यांना सुख-दुःख होत नाही. तेव्हा त्यांना वाचविण्याची गोष्ट कशी सिद्ध होऊ शकेल ? त्यांना सुख दुःखाची प्रत्यक्ष अनुभूतीच होत नसल्यामुळे त्यांच्या बाबतीत अनुमानादी प्रमाणे कशी तर्कसंगत ठरू शकतील ?

**(प्रश्न)** ते जर जीव आहेत तर त्यांना सुख-दुःख का होत नसेल ?

**(उत्तर)** भोळ्या लोकांनो, ऐका ! जेव्हा तुम्ही सुषुप्तावस्थेत असता तेव्हा तुम्हाला सुख दुःख का होत नाही ? जीव आणि ज्ञानेंद्रिये यांचा प्रत्यक्ष संबंध हा सुखदुःखाच्या अनुभूतीला कारणीभूत असतो. याचे उत्तर आम्ही नुकतेच दिले आहे की, गुंगीचे औषध हुंगायला देऊन डॉक्टर लोक रोग्याच्या अवयवांची शल्य चिकित्सा करतात. त्याचे दुःख त्या रोग्याला जाणवत नाही. त्याचप्रमाणे अति मूर्च्छित जीवांना सुख-दुःखाची जाणीव कशी होईल. कारण तेथे ती जाणीव होण्याचे कोणतेच साधन नसते.

**(प्रश्न)** पाहा. निलोति म्हणजे हिरव्या पालेभाज्या व कंदमुळे आम्ही लोक खात नाही. कारण निलोति मध्ये आणि अनेक कंदमुळांमध्ये अनंत जीव असतात. त्या भाज्या व कंदमुळे आम्ही खाल्ली तर त्या जीवांना मारण्याचे व दुःख देण्याचे पाप आम्हाला लागेल.

**(उत्तर)** तुमचे हे बोलणे अगदी अज्ञानपणाचे आहे. कारण पालेभाज्या खाल्याने जीव मरतात किंवा

त्यांना पीडा होते असे तुम्ही कसे मानता ? त्यांना पीडा होत असलेली तुम्हाला प्रत्यक्ष दिसत नाही आणि जर ती तुम्हाला दिसत असेल तर ती आम्हालाही दाखवा. परंतु तुम्ही कधीही ती प्रत्यक्ष पाहू किंवा आम्हाला दाखवू शकणार नाही. जेथे प्रत्यक्ष प्रमाण नसते तेथे अनुमान, उपमान व शब्द प्रमाणही कधी असू शकत नाही. शिवाय आम्ही वर जे उत्तर दिले आहे तेच या बाबतीतही खरे आहे. कारण जे जीव अत्यंत अंध:कारात, महासुषुप्तीत व गाढ गुंगीत असतात त्यांना सुख दु:ख होते असे मानणेही तुमच्या तीर्थकरांचीही चूकच दिसते. या तीर्थकरांनी तुम्हाला तर्क व ज्ञान यांच्या विरोधी असणारा उपदेश केला आहे. तुम्हीच विचार करा, जेव्हा घराला अंत आहे तेव्हा त्या घरात राहणारे अनंत कसे असू शकतील ? कंदाचा अंत आम्ही पाहतो. मग त्यात राहणाऱ्या जीवांचा अंत का असणार नाही ? म्हणून तुमचे हे म्हणणे अत्यंत चूक आहे.

**(प्रश्न)** पाहा. तुम्ही लोक पाणी न तापविता तसेच पिता. ते फार मोठे पाप आहे. आम्ही तापविलेले पाणी पितो तसेच तुम्हीही पीत जावे.

**(उत्तर)** हे तुमचे बोलणेही भ्रामक आहे. कारण जेव्हा तुम्ही पाणी उकळता तेव्हा त्या पाण्यातील सारे जीव मरत असणार आणि त्यांची शरीरे पाण्यात शिजून ते पाणी बडीशेपेच्या अर्कासारखे होत असणार. म्हँणजे तुम्ही जणू त्यांच्या शरीराचा रस पिता. म्हणून तुम्ही फार मोठे पापी बनता. याउलट जे लोक थंड पाणी पितात ते तुमच्या सारखे पापी ठरत नाहीत. कारण थंड पाणी प्याल्यानंतर जे जीव पाण्याबरोबर पोटात जातात त्यांना तेथील ऊब मिळून ते श्वासाबरोबर बाहेर येतील. जलकाय जीवांना वर सांगितल्याप्रमाणे सुखदु:ख होत नाही. म्हणून थंड पाणी प्याल्याने कोणालाही पाप लागत नाही.

**(प्रश्न)** जठराग्नीच्या उष्णतेने जसे पोटात गेलेले जीव बाहेर पडतात तसे पाणी गरम करताना लागणाऱ्या उष्णतेने ते बाहेर का जाणार नाहीत ?

**(उत्तर)** होय. ते बाहेर निघून जातात. परंतु तुम्ही तर तोंडातील हवेच्या उष्णतेने जीवांचे मरण मानता. तेव्हा पाणी गरम केल्याने तुमच्या मतानुसार जीव मरून जातील किंवा जास्त दु:ख सोसून बाहेर पडतील आणि मग मेलेल्या जीवांची शरीरे त्या पाण्यात शिजून जातील. त्यायोगे तुम्ही अधिक पापी व्हाल की नाही ?

**(प्रश्न)** आम्ही आपल्या हातांनी पाणी तापवीत नाही अथवा कोणाही गृहस्थाला पाणी गरम करण्यास सांगत नाही. म्हणून आम्हाला पाप लागत नाही.

**(उत्तर)** तुम्ही गरम पाणी पीत नसता तर गृहस्थांनी ते कशाला गरम केले असते ? म्हणून त्या पापाचे भागीदार तुम्हीच आहात. किंबहुना तुम्ही जास्त पापी आहात. कारण तुम्ही कोणा एका गृहस्थाला पाणी तापविण्यास सांगितले असते तर एकाच घरी पाणी तापविले गेले असते. परंतु साधू महाराज कोणाच्या घरी येतील याची काहीच कल्पना नसल्यामुळे सर्वच गृहस्थ आपापल्या घरी पाणी तापवून ठेवतात. म्हणून या पापाचे मुख्य भागीदार तुम्हीच आहात.

तसेच अधिक लाकडे जाळून अग्नी पेटविल्याने वर सांगितल्याप्रमाणे स्वयंपाक, शेती व व्यापार इत्यादिकांमध्ये तुम्हीच अधिक पापी व नरकगामी ठरता. पाणी तापविण्याच्या बाबतीत तुम्हीच मुख्यत:

निमित्तकारण असता; आणि लोकांनी गरम पाणी प्यावे व थंड पाणी पिऊ नये असा उपदेश तुम्ही करता. म्हणून त्या पापाचे मुख्य भागीदार तुम्हीच आहात. तुमचा उपदेश ऐकून जे लोक तसे करतात तेही पापी आहेत.

आता पाहा ! सूक्ष्म जीवांवर दया करण्याच्या गोष्टी तुम्ही बोलता आणि अन्य पंथियांची निंदा व अहित करता ते काय थोडे पाप आहे ? तुमच्या तीर्थंकरांनी सांगितलेले सिद्धांत खरे असते तर या जगात ईश्वराने इतका पाऊस का पाडला असता ? इतक्या नद्या का वाहिल्या असत्या ? आणि ईश्वराने इतके पाणी का निर्माण केले असते. त्याने सूर्यही उत्पन्न केला नसता. कारण तुमच्या मतानुसार सूर्याच्या उन्हाने कोट्यावधी जीव मरतच असणार. ज्यांना तुम्ही ईश्वर मानता ते तुमचे तीर्थंकर जेव्हा विद्यमान होते तेव्हा त्यांनी दया करून सूर्याची उष्णता का नष्ट केली नाही आणि ढगांची निर्मिती का थांबविली नाही.

आम्ही वर दाखवून दिल्याप्रमाणे भाजीपाल्यात किंवा कंदमुळांमध्ये असणाऱ्या जीवांना सुखदु:खाची जाणीव होत नाही, तर केवळ प्रत्यक्ष दिसणाऱ्या प्राण्यांमध्येच ती जाणीव असते. सर्वथा सर्व जीवांवर दया करणे हेही दु:खाला कारणीभूत होते. कारण तुमच्या सांगण्याप्रमाणे सगळी माणसे वागू लागतील आणि चोर-दरोडेखोरांना कसलीच शिक्षा होईनाशी झाली तर जगात किती पाप वाढेल ! म्हणून दुष्टांना यथोचित शिक्षा देणे व श्रेष्ठांचे पालन करणे हीच खरी दया आहे. याविरुद्ध आचरण करण्यात दयाक्षमारूपी धर्माचा नाश आहे. कितीतरी जैन लोक दुकानदारी करतात. ते आपल्या व्यवहारात खोटे बोलतात, दुसऱ्यांच्या धनाचा अपहार करतात आणि गरिबांना फसवितात. त्यांनी अशी कुकर्मे करू नयेत असा खास उपदेश तुम्ही का करीत नाही ? तोंडावर पट्टी बांधणे वगैरे सोंगे ढोंगे का करीत असता ?

जेव्हा तुम्ही लोकांना चेला किंवा चेली बनवता तेव्हा त्यांचे केशलुंचन करता; आणि त्यांना पुष्कळ दिवस उपाशी राहायला भाग पाडता. अशा प्रकारे तुम्ही इतरांच्या व आपल्या स्वत:च्या आत्म्याला कष्ट व दु:ख देता. स्वत: पीडा सहन करून इतरांना दु:ख देता. एकप्रकारे तुम्ही आत्महत्या करणारे म्हणजे आत्म्याला दु:ख देणारे ठरून हिंसक का बनता ? हत्ती, घोडे, बैल, उंट इत्यादी प्राण्यांवर बसण्यात आणि माणसांकडून मजूरी करविण्यात पाप आहे असे जैन लोक का समजत नाहीत ? तुमचे चेले जसे मूर्खपणाच्या व बाष्कळ गोष्टी खऱ्या आहेत असे सिद्ध करू शकत नाहीत तसेच तुमचे तीर्थंकरही त्यांना सत्य ठरवू शकत नाहीत. जेव्हा तुम्ही मतग्रंथ वाचता तेव्हा तुम्ही आणि तुमचे श्रोते यांच्यामध्ये असणारे जीव तुमच्या मतानुसार मरतच असणार; मग तुम्ही त्या पापाचे धनी का होता ? आम्ही हे सारे थोडक्यात सांगितले आहे. त्यावरून पुष्कळ काही समजून घ्या. या साऱ्या विवेचनाचे तात्पर्य हे आहे की जल, स्थल व वायू यांमध्ये राहणाऱ्या स्थावर शरीरधारी मूर्च्छित जीवांना कधीच सुख अथवा दु:ख होऊ शकत नाही.

## जैनांच्या असंभव गोष्टी

आता जैनांच्या आणखी काही असंभव गोष्टी लिहितो. त्या तुम्ही ऐका आणि हेही लक्षात ठेवा की, आपल्या हाताने साडेतीन हातांचे धनुष्य असते आणि जी कालगणना आम्ही यापूर्वी नमूद केली आहे ती तशीच आहे हे समजावे. 'रत्नसारभाग' पृ. १६६-१६७ वर असे लिहिले आहे की,

१) ऋषभदेवाचे शरीर ५०० धनुष्ये लांब (उंच) होते आणि त्याचे आयुष्य ८४ लाख पूर्ववर्षे होते.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २) अजितनाथाचे | शरीर | ४५० | धनुष्ये लांब | आणि आयुष्य ७२लाख | पूर्ववर्षेचे आयुष्य. |
| ३) संभवनाथाचे | शरीर | ४०० | धनुष्ये लांब | आणि ६० लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ४) अभिनंदनाचे | शरीर | ३५० | धनुष्ये लांब | आणि ५० लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ५) सुमतिनाथाचे | शरीर | ३०० | धनुष्ये लांब | आणि ४० लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ६) पद्मप्रभाचे | शरीर | १४० | धनुष्ये लांब | आणि ३० लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ७) पार्श्वनाथाचे | शरीर | २०० | धनुष्ये लांब | आणि २० लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ८) चंद्रप्रभचे | शरीर | १५० | धनुष्ये लांब | आणि १० लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ९) सुविधिनाथाचे | शरीर | १०० | धनुष्ये लांब | आणि २ लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| १०) शीतलनाथाचे | शरीर | ९० | धनुष्ये लांब | आणि १ लाख | पूर्ववर्षांचे आयुष्य. |
| ११) श्रेयांसनाथाचे | शरीर | ८० | धनुष्ये लांब | आणि ८४ लाख | वर्षांचे आयुष्य. |
| १२) वासुपूज्यस्वामीचे | शरीर | ७० | धनुष्ये लांब | आणि ७२ लाख | वर्षांचे आयुष्य. |
| १३) विमलनाथाचे | शरीर | ६० | धनुष्ये लांब | आणि ६० लाख | वर्षांचे आयुष्य. |
| १४) अनंतनाथाचे | शरीर | ५० | धनुष्ये लांब | आणि ३० लाख | वर्षांचे आयुष्य. |
| १५) धर्मनाथाचे | शरीर | ४५ | धनुष्ये लांब | आणि १० लाख | वर्षांचे आयुष्य. |
| १६) शांतिनाथाचे | शरीर | ४० | धनुष्ये लांब | आणि १ लाख | वर्षांचे आयुष्य. |
| १७) कुंथुनाथाचे | शरीर | ३५ | धनुष्ये लांब | आणि ९५ हजार | वर्षांचे आयुष्य. |
| १८) अमरनाथाचे | शरीर | ३० | धनुष्ये लांब | आणि ८४ हजार | वर्षांचे आयुष्य. |
| १९) मल्लीनाथाचे | शरीर | २५ | धनुष्ये लांब | आणि ५५ हजार | वर्षांचे आयुष्य. |
| २०) मुनी सुवृताचे | शरीर | २० | धनुष्ये लांब | आणि ३० हजार | वर्षांचे आयुष्य. |
| २१) नमिनाथाचे | शरीर | १४ | धनुष्ये लांब | आणि १० हजार | वर्षांचे आयुष्य. |
| २२) नेमिनाथाचे | शरीर | १० | धनुष्ये लांब | आणि १ हजार | वर्षांचे आयुष्य. |
| २३) पार्श्वनाथाचे | शरीर | ९ | हात लांब | आणि १०० | वर्षांचे आयुष्य. |
| २४) महावीर स्वामीचे | शरीर | ७ | हात लांब | आणि ७२ | वर्षांचे आयुष्य |

हे चोवीस तीर्थंकर जैनांचे मतप्रवर्तक आचार्य व गुरू आहेत. त्यांनाच जैन लोक परमेश्वर मानतात; आणि ते सर्व मोक्षाला गेले असे समजतात. माणसाचे एवढे मोठे शरीर आणि इतके दीर्घ आयुष्य असणे शक्य तरी आहे काय असा विचार बुद्धिमंतांनी केला पाहिजे. या भूगोलावर असली अवाढव्य माणसे फारच थोडी राहू शकतील. याच जैनांच्या थापा उसन्या घेऊन पुराणिकांनी एक लाख, दहा हजार व एक हजार वर्षांची आयुष्ये असल्याच्या गोष्टी लिहिल्या. त्यादेखील शक्य कोटीतील असू शकत नाहीत; मग जैनांच्या या थापा कशा खऱ्या असू शकतील ?

आता आणखी ऐका. 'कल्पभाष्य' पृष्ठ ४ : नागकेताने गावाएवढ्या आकाराची एक शिळा बोटावर उचलून धरली. 'कल्पभाष्य' पृष्ठ ३५ : महावीराने अंगठ्याने पृथ्वीला दाबले. त्यामुळे शेषनागाचा थरकाप झाला. 'कल्पभाष्य' पृष्ठ ४६ : महावीराला साप चावला त्यावेळी रक्ताऐवजी दूध निघाले आणि तो साप आठव्या स्वर्गाला गेला. 'कल्पभाष्य' पृष्ठ ४७ : महावीराच्या पायावर खीर शिजवीली पण पाय भाजले नाहीत. 'कल्पभाष्य' पृष्ठ १६ : एका लहानश्या भांड्यात एक उंट उभा केला. 'रत्नसार', भाग १, पृष्ठ १४ : शरीरावरील मळ काढून टाकू नये व खाजवू नये. 'विवेकसार' पृष्ठ २१५ : दमसार नावाच्या एका जैन साधूने क्रुद्ध होऊन, उद्वेगजनक सूत्र उच्चारून एका शहराला आग लावली. हा साधू महावीर तीर्थंकरांचा फार लाडका होता. 'विवेकसार' पृष्ठ २२७ : राजाची आज्ञा अवश्य मानली पाहिजे. 'विवेकसार' पृष्ठ २२७ : कोशा नावाच्या एका वेश्येने थाळीमध्ये मोहऱ्यांचा ढीग करून त्याच्यावर फुलांनी झाकलेली एक सुई उभी केली. त्या सुईवर उभे राहून तीने उत्तम प्रकारे नाच केला. परंतु ती सुई तिच्या पायात घुसली नाही अथवा मोहऱ्यांचा ढीगही विस्कटला नाही!! 'तत्त्वविवेक' पृष्ठ २२८ : याच कोशा वेश्येशी एका स्थूल मुनीने १२ वर्षे भोग केला आणि त्यानंतर दीक्षा घेऊन तो सद्गतीला गेला. ती कोशा वेश्याही जैन धर्माचे पालन करून सद्गतीला गेली. 'विवेक' पृष्ठ १९५ : एका सिद्धाची गळ्यात घालण्याची कंथा एका वैश्याला दररोज ५०० मोहरा देत असे. 'विवेक' पृष्ठ २२८ : बलवान पुरुषाची आज्ञा व देवाची आज्ञा मोडल्याने घोर वनात कष्ट सहन करून राहिल्याने आणि गुरू, माता, पिता, कुलाचार्य जातीचे लोक आणि धर्मोपदेशक यांच्या आज्ञेचे उल्लंघन केल्याने धर्माचा कमीपणा होत असला तरी त्यामुळे धर्माची हानी होत नाही.

**(समीक्षक)** आता पाहा! यांच्या मिथ्या गोष्टी! एक माणूस गावाच्या आकाराची मोठी शिळा बोटावर उचलून कधीतरी धरू शकेल काय? आणि जमिनीवर अंगठा दाबल्याने कधीतरी पृथ्वी दाबली जाऊ शकते काय? आणि शेषनाग नावाचा प्राणी अस्तित्वातच नाही तर थरकाप कुणाचा उडणार? ॥२॥ शरीराला कापल्यावर त्यातून दूध निघाल्याचे कोणीही पाहिलेले नाही. हा इंद्रजाल जादूचा खेळच झाला. महावीराला चावणारा साप स्वर्गाला गेला आणि महात्मा श्रीकृष्ण वगैरे तिसऱ्या नरकात गेले, ही किती खोटी गोष्ट आहे! ॥३।४॥ महावीराच्या पायावर खीर शिजविली तेव्हा त्याचे पाय जळून कसे गेले नाहीत? ॥५॥ एका लहान भांड्यात उंट कधी सामावला आहे काय? ॥६॥ अंगावरील मळ ते काढून टाकत नसतील व अंग चोळीत नसतील तर ते दुर्गंधरूपी महानरक भोगीत असणार. ॥७॥ ज्या साधूने शहर जाळले त्याची दया व क्षमा कोठे गेली? महावीराच्या सहवासात राहूनही त्याचा आत्मा पवित्र बनला नाही. तर मग आता महावीराच्या मृत्यूनंतर त्याच्या आश्रयाने जैन लोक कधीही पवित्र बनू शकणार नाहीत.॥८॥ राजाची आज्ञा मानली पाहिजे; परंतु जैन लोक व्यापारी असल्यामुळे भिऊन ही गोष्ट लिहिली असावी. ॥९॥ कोशा वेश्येचे शरीर कितीही हलके असले तरी तिने मोहऱ्यांच्या ढीगावर सुई उभी करून तिच्यावर नृत्य करणे, सुई न टोचणे आणि मोहरा न विस्कटणे, हे धडधडीत खोटे नाही तर काय आहे? ॥१०॥ कोणत्याही अवस्थेत काहीही झाले तरी, कोणीही धर्म सोडता कामा नये. ॥११॥ कंथा हे केवळ वस्त्र आहे. ती दररोज ५०० मोहरा कशी देऊ शकेल? ॥१२॥

जैनांच्या साहित्यातील अशा असंभव व खोट्या गोष्टी मी लिहू लागलो तर त्यांच्या पोकळ ग्रंथांसारखा एक महाग्रंथ तयार होईल. म्हणून मी जास्त लिहीत नाही. याचा अर्थ एवढाच की, जैनांच्या काही थोड्या चांगल्या गोष्टी वगळता इतर सगळ्या गप्पा खोट्या व जादूने भरल्या आहेत. पाहा :-

## जैन पंथातील जम्बूद्वीप परिमाण

**दो ससि दो रवि पढमे। दुगुणा लवणंमि धायई संडे।**
**वारस ससि वारस रवि। तप्पमि इं निदिठ ससि रविणो।** प्रक. भा. ४ संग्रहणी सू. ७७

जे जंबुद्वीप लाख योजने म्हणजे ४ लाख कोस क्षेत्रफळाचे आहे असे लिहिले आहे त्यातील हे पहिले द्वीप आहे. त्यात दोन सूर्य व दोन चंद्र आहेत; आणि लवण समुद्रात त्याच्या दुप्पट म्हणजे चार सूर्य व चार चंद्र आहेत. तसेच धातकी (धातूच्या) खंडात बारा चंद्र व बारा सूर्य आहेत. ॥७७॥

**तिगुणा पुव्विल्लजुया। अणन्तराणंतरं मिखित्तंमि।**
**कालो ए बयाला। बिसत्तरी पुरकर द्धंमि।** प्रक. भा. ४ संग्रहणी सूत्र ७८

त्यांची तिप्पट केल्यास त्यांची संख्या छत्तीस होते. त्यात जंबुद्वीपाचे दोन व लवण समुद्राचे चार मिळवले तर बेचाळीस चंद्र व बेचाळीस सूर्य कालोदधि समुद्रात आहेत. याचप्रमाणे पुढील द्वीपे व समुद्र त्यामध्ये धातकी खंडाचे १२, लवण समुद्राचे ४ आणि जंबुद्वीपाचे २-२ अशी बेरीज केल्यास पुष्करद्वीपात १४४ चंद्र व १४४ सूर्य होतात. ही फक्त अर्ध्या मनुष्यक्षेत्राची गणना आहे. परंतु जेथे माणसे राहत नाहीत तेथे पुष्कळसे सूर्य व चंद्र आहेत. अर्ध्या पुष्करद्वीपात जे पुष्कळ चंद्र व सूर्य आहेत ते स्थिर आहेत. वर सांगितलेल्या १४४ ची तिप्पट केल्यास ४३२ होतात. त्यामध्ये पूर्वोक्त जंबुद्वीपाचे २ चंद्र, २ सूर्य, ४-४ लवण समुद्राचे, १२-१२ धातकी खंडाचे व ४२ कालोदधीचे मिळविल्यास पुष्कर समुद्रात ४९२ चंद्र व ४९२ सूर्य होतात. ॥७८॥ या सर्व गोष्टी श्रीजिनभद्रगणीक्षमाश्रमणाने मोठ्या 'संघयणी' मध्ये व 'योतीसकरण्डक पयन्ना' मध्ये आणि 'चन्द्रपन्नति' या प्रमुख सिद्धांतग्रंथांमध्ये अशाच प्रकारे लिहिलेल्या आहेत.

**(समीक्षक)** भूगोल-खगोलाचे जाणकार असलेल्या लोकांनो, आता ऐका! या एका भूगोलामध्ये एका प्रकारे ४९२ आणि दुसऱ्या प्रकारे असंख्य सूर्य व चंद्र आहेत असे जैन लोक मानतात! तुम्ही मोठे भाग्यवान आहात की, वेदमतानुयायांनी लिहिलेल्या 'सूर्य सिद्धांत' वगैरे ज्योतिष ग्रंथांचे अध्ययन केल्यामुळे तुम्हाला भूगोल व खगोल या शास्त्रांचे खरे ज्ञान प्राप्त झाले. जैनांच्या महाअंध:कारपूर्ण पंथाचे तुम्ही अनुयायी असता तर जसे जैन लोक आजकाल अंधारात चाचपडत आहेत तसेच तुम्हीही जन्मभर अंधारात राहिला असता. या अविद्वानांना अशी शंका आली की, जंबुद्वीपात एक सूर्य व एक चंद्र यांनी काम भागणार नाही. कारण एवढ्या मोठ्या पृथ्वीला ३० घटिका (२४ तास) एक सूर्य व एक चंद्र कसे प्रकाश देऊ शकतील? हे जैन लोक पृथ्वी ही सूर्यचंद्रापेक्षा मोठी व स्थिर आहे असे मानतात. त्यांची ही फार मोठी चूक आहे.

**दो ससि रवि पंती एगंतरिय छसठि संखाया।**
**मेरुं पयाहिणंता। माणुसखित्ते परिअडंति॥** प्रक. भा. ४, संग्रहणी सूत्र ७९

मनुष्य लोकातील चंद्र व सूर्य यांच्या पंक्तींची (मालांची) संख्या ते सांगतात दोन चंद्रांच्या व दोन सूर्यांच्या पंक्ती (श्रेणी) आहेत. त्या एकमेकींपासून एक लाख योजने म्हणजे चार लाख कोस अंतरावरून फिरत असतात. सूर्यांच्या एका पंक्तीच्या अनंतर चंद्राची एक पंक्ती आहे व त्याचप्रमाणे चंद्राच्या एका पंक्तीनंतर सूर्यांची एक पंक्ती आहे. अशा प्रकारच्या चार चार पंक्ती आहेत, चंद्राच्या एकेका पंक्तीत ६६ चंद्र आणि सूर्यांच्या एकेका पंक्तीत ६६ सूर्य आहेत. या चारही पंक्ती जंबुद्वीपातील मेरू पर्वताला प्रदक्षिणा घालीत मनुष्यक्षेत्रात परिभ्रमण करीत आहेत. ज्यावेळी जंबुद्वीपातील मेरू पर्वताच्या दक्षिणेला एक सूर्य फिरत असतो त्यावेळी दुसरा सूर्य उत्तर दिशेला फिरत असतो. याचप्रमाणे लवण समुद्राच्या एकेका दिशेला दोन-दोन सूर्य फिरत असतात. धातकी खंडाचे ६, कालोदधीचे २१ व पुष्करार्धाचे ३६ अशा प्रकारे सगळे मिळून ६६ सूर्य दक्षिण दिशेला आणि ६६ सूर्य उत्तर दिशेला आपापल्या क्रमानुसार फिरत असतात. या दोन्ही दिशांतील सर्व सूर्यांची बेरीज केली असता त्यांची संख्या १३२ होते. याचप्रमाणे दोन्ही दिशांना फिरणाऱ्या चंद्रांची संख्याही १३२ होते. हे सर्व चंद्र-सूर्य मनुष्यलोकामध्ये फिरत असतात. चंद्राबरोबर नक्षत्रांच्याही अनेक मालिका फिरत असतात असे समजावे. ॥७९॥

**(समीक्षक)** आता तुम्हीच पाहा ! या भूगोलातील १३२ सूर्य व १३२ चंद्र जैनांच्या घरावरच तळपत असतील. जर ते खरोखरीच तळपत असतील तर जैन लोक जिवंत कसे ? रात्रीच्या वेळी ते थंडीने काकडून जात असतील ना ? अशा अशक्य गोष्टींवर भूगोल व खगोल शास्त्रांचे ज्ञान नसलेले लोकच विश्वास ठेवतात. इतर लोक असे फसत नाहीत. वस्तुतः एकच सूर्य या भूगोलासारख्या इतर अनेक भूगोलांना प्रकाशित करीत असतो. मग या लहानशा भूगोलाची काय कथा ? वर पृथ्वी फिरत नसती व सूर्य पृथ्वीभोवती फिरत असता तर अनेक वर्षांचा दिवस, अनेक वर्षांची रात्र झाली असती. हिमालयाशिवाय सुमेरु नावाचा दुसरा कोणताही पर्वत नाही. एखाद्या घागरी समोर मोहरीचा एक दाणा असावा तसा हा पर्वत सूर्यासमोर आहे. किंबहुना तेवढाही नाही. जोपर्यंत जैन लोक आपल्या पंथात गुरफटून राहतील तोपर्यंत त्यांना या गोष्टी समजणार नाहीत. ते सदैव अंधारातच राहतील.

**सम्मत्तचरण सहिया सव्वं लोगं फुसे निरवसेसं ।**
**सत्तय चउदसभाए पंचय सुयदेसविरईए ॥** प्रक. भा. ४, संग्रहणी सूत्र १३५

सम्यक चारित्र्यासह जे केवली (ते केवळ समुद्घात) स्थितीने सर्व १४ राज्य आत्मप्रदेश करून भ्रमण करतील.॥१३५॥

**(समीक्षक)** जैन लोक १४ राज्ये मानतात. त्यांतील चौदाच्या राज्याच्या शिखरावर सर्वार्थसिद्धी विमानाच्या ध्वजापासून थोड्या अंतरावर सिद्धशिला व दिव्य आकाश आहे. त्याला शिवपुर म्हणतात. तेथे केवली लोक जातात. ज्यांना केवल ज्ञान, सर्वज्ञता व पूर्ण पवित्रता प्राप्त झालेली आहे. ते त्या लोकात जातात आणि ते आत्मप्रदेशात सर्वज्ञ बनून राहतात. ज्याचा प्रदेश असतो तो विभू नसतो तो कधीच सर्वज्ञ व केवलज्ञानी असू शकत नाही. कारण ज्याचा आत्मा एकदेशी असतो तोच जातो व येतो, आणि बद्ध, मुक्त, ज्ञानी, अज्ञानी होतो

तो कधीच सर्वव्यापी व सर्वज्ञ होऊ शकत नाही. जैनांचे जे तीर्थंकर जीवरूपामध्ये अल्प व अल्पज्ञ होऊन राहत होते ते सर्वव्यापक व सर्वज्ञ कधीच होऊ शकत नाहीत. परंतु जो परमात्मा अनादी अनंत, सर्वव्यापक, सर्वज्ञ, पवित्र, ज्ञानस्वरूप आहे त्याला जैन लोक मानीत नाहीत की ज्याच्या मध्ये सर्वज्ञतादी गुण अथवा तथातथ्य असतात.

**गब्भनर तिपलियाऊ। तिगाउ उक्कोस ते जहन्नेणं।**

**मुच्छिम दुहावि अन्तमुहु। अंगुल असंख भागतणू॥** प्रक. भा. ४, संग्रहणी सूत्र २४१

येथे माणसे दोन प्रकारची आहेत. एक गर्भातून उत्पन्न झालेली व दुसरी गर्भाशिवाय उत्पन्न झालेली. त्यांच्यापैकी गर्भज माणसांचे आयुष्य उत्कृष्ट तीन पल्यापम असते व शरीर तीन केसांचे असते असे जाणावे. ॥२४१॥

**(समीक्षक)** तीन पल्योपमाचे आयुष्य व तीन कोसांचे शरीर असणारी माणसे या पृथ्वीमध्ये फारच थोडी सामावू शकतील. शिवाय आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे तीन पल्योपम आयुष्य व तीन कोसांचे शरीर असलेली माणसे फार दीर्घकाळापर्यंत जगतील आणि त्यांची मुलेही तीन कोस लांब शरीराची असतील. त्यामुळे मुंबईसारख्या शहरात दोन आणि कलकत्त्यासारख्या शहरात जेमतेम तीन-चारच माणसे राहू शकतील. एका शहरात लाखो माणसे राहत असल्याचे जैनांनी लिहून ठेवले आहे. त्यामुळे हे लोक राहत असलेले नगरही लाखो कोसांचे असले पाहिजे. म्हणजे संपूर्ण भूगोलावर तसे एक देखील नगर राहू शकणार नाही.

**पणयाल लरकजोयण। विरकंभा सिद्धिसिल फलिह विमला।**

**तदुवरि गजोगणंये लोगंतो तच्छ सिद्धठिई॥२५८॥** प्रक. भा. ४, संग्रहणी सूत्र २५८

सर्वार्थसिद्धी विमानाच्या ध्वजाच्या १२ योजनेवर जी सिद्धशिला आहे तिची लांबी, रुंदी व पोकळी ४५ लाख योजने आहे. ती संपूर्ण शुभ्र आहे. सुवर्णमय स्फटिकासारखी निर्मळ असणारी सिद्धशिला ही सिद्धभूमी आहे. कोणी तिला 'ईषत् प्राग्भरा' असेही म्हणतात. या सर्वार्थ सिद्धशिला विमानापासून १२ योजनांवर अलोक (ज्याची अनुभूती होऊ शकत नाही असा प्रदेश) ही आहे. हा परम अर्थ (रहस्य) फक्त बहुश्रुत केवलीला माहीत आहे. ही सर्वार्थ सिद्धशिला मध्यभागी ८ योजने जाड आहे. तेथून ती चार दिशांना व उपदिशांना माशीच्या पंखाप्रमाणे पातळ होत गेली आहे. तिचा आकार उघडलेल्या छत्रीसारखा आहे. त्या शिळेवर एक योजन अंतरावर लोकान्त आहे. तेथे सिद्ध लोक राहतात. ॥२५८॥

**(समीक्षक)** आता विचारले पाहिजे की, जैनांच्या मुक्तीचे स्थान सर्वार्थसिद्धी विमानाच्या ध्वजाच्या वर ४५ लाख योजनेची शिळा आहे. ती शिळा कितीही चांगली व निर्मळ असली तरी तेथे राहणारे मुक्त जीव एक प्रकारे बद्ध आहेत. कारण ते त्या शिळेवरून बाहेर पडले की, त्यांचे मुक्तीचे सुख साधन सुटत असावे आणि ते शिळेमध्येच राहत असतील तर त्यांना हवा देखील लागत नसेल. हे सारे अडाणी लोकांना फसविण्यासाठी कल्पनेने विणलेले भ्रमाचे जाळेच आहे.

**(जोयण सहस्स महियं एगिंदियदेह मुक्कोसं)**

**वि ति चउरिंदिस सरीरं। वारस जोयणं तिकोस चउकोसं।**

**जोयण सहसपणिं दिय। उहे वुच्छंत विसेसंतु ॥** प्रक. भा. ४, संग्रहणी सूत्र (२६६) २६७

सामान्यत: एका इंद्रियाचे शरीर १ हजार योजनांचे असते. ते उत्कृष्ट आहे असे समजावे दोन इंद्रियांचे शंखादिकांचे शरीर १२ योजनांचे जाणावे. कृमीकीटकांचे तीन इंद्रियांचे शरीर ३ कोसांचे समजावे. भ्रमरादिकांचे चार इंद्रियांचे शरीर ४ कोसांचे आणि पाच इंद्रिये असणाऱ्या जीवांचे शरीर १ हजार योजनांचे म्हणजे ४ हजार कोसांचे असते असे जाणावे. ॥२६७॥

**(समीक्षक)** चार-चार हजार कोसांची शरीरे असतील तर पृथ्वीच्या पाठीवर फारच थोडी माणसे राहू शकतील. शेकडो माणसांनी हा भूगोल अगदी ठासून भरला जाईल. कोणाला हिंडाफिरायला जागाही राहणार नाही मग ती माणसे जैनांनाच विचारतील की आम्ही कोठे राहायचे ? तेव्हा जैन लोक त्यांना कदाचित आपल्या घरातच ठेवून घेतील. परंतु चार हजार कोस लांब शरीर असणाऱ्या एका माणसाला राहण्यासाठी किमान ३२ हजार कोस लांब-रुंद असणारे घर तरी पाहिजे. असे एक घर बांधण्यासाठी जैनांची सारी संपत्ती खर्च झाली तरी ते तयार होऊ शकणार नाही. एवढ्या मोठ्या आठ हजार कोस लांबीच्या घराचे छप्पर तयार करण्यासाठी लागणारे वासे कोठून आणणार ? आणि त्या घराला आधारासाठी मध्ये खांब लावला तर त्यात राहणाऱ्या माणसाला आत प्रवेशच करता येणार नाही. म्हणून असल्या गोष्टी खोट्याच होत असतात.

**ते थूला पल्ले विहु संखिज्जाचे वहुंति सव्वेवि।**

**ते इक्किक्क असंखे। सुहुमे खम्मे पकप्पेह ॥** प्रकरण. भाग ४, लघुक्षेत्रसमासप्रकरण सूत्र ४

पूर्वी सांगितल्या प्रमाणे एक अंगुळ केसांच्या तुकड्यांनी चार कोस औरस-चौरस व तितकाच खोल खड्डा भरावा. अंगुळा एवढ्या केसांचे एकूण तुकडे वीस लाख, सत्तावन्न हजार एकशे बावन्न होतात. एक घन योजन पल्योपम जागेमध्ये मावणाऱ्या सर्व स्थूल केसांच्या तुकड्यांची संख्या जास्तीत जास्त ३३०, ७६२, १०८, २४६, ५६२, ५४२, १९९, ६०९७, ५३,६१,०००,०००० एवढी होते. हाही संख्यात काल होतो. पूर्वी सांगितल्याप्रमाणे एका केसाच्या तुकड्याचे असंख्यात तुकडे मनाने कल्पना करून जाणावेत. तेव्हा ते असंख्यात सूक्ष्म रोमाणू होतील.

**(समीक्षक)** अशी आहे यांची गणनेची रीत. पहा ! एका अंगुळाएवढ्या केसाचे किती तुकडे झाले आहेत याची गणना कोणाला तरी करता येईल काय ? शिवाय त्यानंतरही त्या एकेका तुकड्याचे असंख्य तुकडे केले आहेत अशी कल्पना ते करतात. यावरून हे ही सिद्ध होते की पूर्वोक्त तुकडे हाताने केले असावेत. जेव्हा हाताने होऊ शकले नाहीत तेव्हा मनाने केले. खरे तर एक अंगुळ केसाचे असंख्य तुकडे करणे कधीतरी शक्य आहे काय ?

**जम्बूद्वीपपमाणं गुलजोयणलरक वट्टविरकंभी।**

**लवणाई यासेसा। वलयाभा दुगुण दुगुणाय ॥** प्रकरण. भाग ४. लघुक्षेत्रसमा. सूत्र १२

जम्बुद्वीपाचे क्षेत्रफळ १ लाख योजने एवढे असून ते पोकळ आहे. बाकी लवणादी सात समुद्र व सात द्वीपे

यांची क्षेत्रफळे जंबुद्वीपाच्या दुप्पट आहेत. पूर्वी सांगितल्याप्रमाणे या एका पृथ्वीवर जम्बुद्वीपादी सात द्वीपे व समुद्र आहेत. ॥१२॥

**(समीक्षक)** दुसरे द्वीप जंबुद्वीपाहून मोठे असून त्याचे क्षेत्रफळ २ लाख योजन आहे. तिसरे द्वीप चार लाख योजनांचे, चौथे आठ लाख योजनांचे, पाचवे सोळा लाख योजनांचे, सहावे बत्तीस लाख योजनांचे व सातवे चौसष्ट लाख योजनांचे आहे. एवढेच किंवा याहून मोठे असे समुद्रांच्या परिमाणाचे ह्या पन्द्राह सहस्त्र परिधि असणाऱ्या भूगोलात कसे सामावू शकतील यावरून ही गोष्ट खोटी आहे.

**कुरु नइ चुलसी सहसा। छच्चेवन्तरनईउ पइ विजयं।**
**दोदो महा नईउ। चउदस सहसाउ पत्तेयं॥** प्रकरण. भाग ४, लघुक्षेत्रसमा. ६३

कुरुक्षेत्रामध्ये ८४ हजार नद्या आहेत. ॥६३॥

**(समीक्षक)** कुरुक्षेत्र हा फार लहान प्रदेश आहे. तो न पाहताच एक धादांत खोटी गोष्ट लिहिण्यात यांना मुळीच लाज वाटली नाही.

**जामुत्तराउ ताउ। इगेग सिंहासणाउ अइपुव्वं। चउसुवि तासु नियासण, दिसि भवजिण मज्जणं होई॥** प्रकरणरत्नाकर, भाग ४, लघुक्षेत्रसमा, सू. ११९

त्या शिळेच्या थेट दक्षिणेला व उत्तरेला एक-एक सिंहासन आहे हे जाणावे. त्या शिळांची नावे दक्षिणेकडील अतिपांडुकंबला आणि उत्तरेकडील अतिरक्तकंबला आहेत. त्या सिंहासनांवर तीर्थंकर बसतात. ॥११९॥

**(समीक्षक)** आता यांच्या तीर्थंकरांचे जन्मोत्सवादी करण्याच्या शिळा पाहा! अशीच यांची मुक्तीची सिद्धशिला आहे. अशा यांच्या अनेक गोष्टी घोटाळ्याच्या आहेत. कुठवर लिहावे? परंतु पाणी गाळून पिणे, सूक्ष्म जीवांवर नाममात्र दया करणे आणि रात्री जेवण न करणे या यांच्या तीन गोष्टी चांगल्या आहेत. यांच्या बाकी सर्व गोष्टी अशक्य कोटीतील आहेत.

आम्ही जे थोडक्यात सांगितले आहे. त्यावरून बुद्धिमान लोक पुष्कळ काही समजून घेतील. आम्ही केवळ नमुन्या दाखल लिहिले आहे. यांच्या सगळ्या अशक्य गोष्टी लिहायला बसलो तर इतके ग्रंथ तयार होतील की एक मनुष्य जन्मभर वाचीत राहिला तरी ते संपणार नाहीत. म्हणून ज्या प्रमाणे शितावरून भाताची परीक्षा करतात त्याप्रमाणे या संक्षिप्त विवेचनावरून शहाण्या लोकांना पुष्कळ गोष्टी माहीत होतील. बुद्धिमान माणसांना फार विस्ताराने सांगावे लागत नाही. कारण केवळ दिग्दर्शन केले तरी तेवढ्यावरून ते सर्व काही जाणतात. यानंतर ख्रिस्ती पंथाविषयी आम्ही विवेचन करणार आहोत.

**इति श्रीमद्दयानन्द सरस्वती स्वामि निर्मिते सत्यार्थप्रकाशे सुभाषविभूषिते नास्तिकमतान्तर्गतचार्वाकबौद्धजैनमतखण्डनमण्डनविषये द्वादशः समुल्लासः सम्पूर्णः ॥१२॥**




# अनुभूमिका (३)

या बायबलावर आधारलेला पंथ फक्त ख्रिस्ती लोकांचाच नसून यहुदी वगैरे लोकांच्या पंथांचाही त्यात समावेश होतो. या तेराव्या समुल्लासात आम्ही फक्त ख्रिस्ती पंथाचीच चर्चा केली आहे. याचे कारण असे की आजकाल बायबलाच्या पंथाचे अनुयाची मुख्यत: ख्रिस्ती लोक असून यहुदी वगैरे इतर लोक गौण आहेत. मुख्य गोष्टीचे ग्रहण केले की त्यामध्ये गौण गोष्टीचे ग्रहण येऊन जाते. म्हणून यात यहुदी लोकांचा समावेश आहे असे समजावे. यांचा जो विषय आम्ही या प्रकरणात लिहिला आहे. तो केवळ बायबलातील ज्या त्या ख्रिस्ती, यहुदी वगैरे सर्व पंथाचे लोक मानतात आणि आपल्या पंथाचे मूळ कारण आहे असे समजतात.

या ग्रंथाची अनेक भाषांतरे झाली आहेत. या पंथातील मोठमोठ्या पादऱ्यांनीच ही भाषांतरे केली आहेत. त्यातील देवनागरी (हिंदी) अथवा संस्कृत भाषांतर वाचल्यानंतर माझ्या मनात बायबलबाबत अनेक शंका उत्पन्न झाल्या. त्यापैकी काही शंका या तेराव्या समुल्लासात सर्वांच्या विचारासाठी मी लिहिल्या आहेत. मी हे लिखाण केवळ सत्याची वृद्धी व असत्याचा ऱ्हास व्हावा या हेतूने केले आहे. कोणाला दु:ख द्यावे, कोणाचे नुकसान करावे अथवा कोणावर खोटे दोषारोप करावेत यासाठी हे लिखाण केलेले नाही. याचा अभिप्राय पुढील लेखात सर्वजण समजून घेतील की हा ग्रंथ आणि याचे मत कसे आहे ? या लिखाणाचे हे प्रयोजन आहे की, सर्व लोकांना यास पाहणे, त्याचे श्रवण व त्यासंबंधी लेखन करणे सहज होईल आणि कोणीही याचा पक्षी प्रतिपक्षी होऊन विचाराने हे ईसाई मत आंदोलन कसे आहे हे जाणतील. यामुळे एक हेतू हा सिद्ध होईल की, लोकांचे धर्मविषयक ज्ञान वाढेल आणि सत्यासत्य व कर्तव्याकर्तव्य या बाबतीत आपण काय केले पाहिजे हे त्यांना कळेल. त्यायोगे सत्य व कर्तव्य कर्माचा स्वीकार आणि असत्य व अकर्तव्य कर्माचा परित्याग करणे त्यांना सोपे जाईल.

सर्व लोकांना उचित आहे की त्यांनी सगळ्यांची पंथविषयक पुस्तके वाचावीत, समजून घ्यावीत, त्यातील गोष्टींविषयी आपली संमती अथवा असंमती व्यक्त करावी किंवा लिहावी नाहीतर ऐकावी. कारण माणूस जसा वाचनाने पंडित होतो तसा श्रवणाने बहुश्रुत होतो. जर श्रोता दुसऱ्याला समजाऊ शकत नसला तरी स्वत: समजू

शकतोच. जे कोणी पक्षपाताच्या आहारी जाऊन पाहतात त्यांना आपले किंवा दुसऱ्यांचे गुण-दोष कळत नाहीत. माणसाचा आत्मा यथायोग्य सत्यासत्याचा निर्णय करण्यास समर्थ असतो. त्याने स्वत: जेवढे काही वाचले अथवा ऐकले असेल तेवढ्यावरून तो निर्णय करू शकतो. दोन्ही पक्षांच्या लोकांना एकमेकांच्या मतांविषयी नीट माहिती नसेल, ते फक्त आपल्याच पंथाविषयी जाणत असतील व दुसऱ्यांच्या पंथाविषयी अज्ञानी असतील तर त्यांच्यामध्ये यथायोग्य संवाद घडून येऊ शकत नाही. उलट अज्ञानी लोक भ्रमरूपी खड्ड्यात जाऊन पडतात. असे होऊ नये म्हणून या ग्रंथामध्ये सर्व प्रचलित पंथांची थोडक्यात चर्चा लिहिली आहे. यावरून त्या पंथातील इतर गोष्टी खऱ्या आहेत की खोट्या याविषयी वाचकाला अंदाज बांधता येईल. जी सर्वमान्य सत्ये आहेत ती सर्व पंथात सारखीच आहेत. मतभेद होतात ते खोट्या गोष्टींच्या संबंधात किंवा एक सत्य आहे तर दुसरे असत्य आहे तरीही थोडाफार वादविवाद होतो. जर वादी-प्रतिवादी सत्यासत्याचा निर्णय करण्यासाठी वादविवाद करतील तर अवश्य निर्णय होईल.

आता मी या तेराव्या समुल्लासात ख्रिस्ती पंथाविषयी थोडेसे विवेचन करून ते सर्वांसमोर ठेवतो. ते कसे आहे याचा वाचकांनी विचार करावा.

## अलमतिलेखेन विचक्षणवरेषु

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.





## तेरावा समुल्लास

# ख्रिश्चन पंथाची समीक्षा

आता आम्ही ख्रिस्ती लोकांच्या पंथाविषयी लिहितो. त्यावरून त्यांचा पंथ निर्दोष आणि त्यांचा मतग्रंथ बायबल ईश्वरकृत आहे किंवा नाही ? प्रथम आम्ही बायबलाच्या तौरेत भागाविषयी लिहितो :-

## आकाश, पृथ्वी आणि सृष्टि उत्पत्ति

(१)'आरंभी ईश्वराने आकाश व पृथ्वी उत्पन्न केली. पृथ्वी बेडौल व उजाड होती. सखोल पाण्यावर अंधार होता आणि ईश्वराचा आत्मा पाण्याच्या पृष्ठ भागावर डोलत होता. -उत्पत्ति अध्याय १, ओवी १, २

**(समीक्षक)** तुम्ही आरंभ कशाला म्हणता ?

**(ख्रिस्ती)** सृष्टिच्या प्रथम उत्पत्तिला.

**(समीक्षक)** हीच सृष्टि प्रथम उत्पन्न झाली काय ? हिच्या पूर्वी ती कधीच उत्पन्न झाली नव्हती काय ?

**(ख्रिस्ती)** आम्हाला ते माहीत नाही. ती झाली होती की नव्हती ते ईश्वर जाणे.

**(समीक्षक)** तुम्हाला जर ते माहीत नाही तर ज्या या पुस्तकातून शंकेचे निवारण होऊ शकत नाही त्याच्यावर तुम्ही विश्वास का ठेवला ? आणि याच पुस्तकाच्या आधारे लोकांना उपदेश करून या संशयग्रस्त ख्रिस्ती पंथात तुम्ही का फसविता ? त्याऐवजी नि:संदेह सर्व शंकांचे निवारण करणाऱ्या वेदमताचा स्वीकार तुम्ही का करीत नाही ? तुम्हाला ईश्वराच्या सृष्टिचे ज्ञान नाहीतर तुम्ही ईश्वराला कसे जाणणार ? तुम्ही आकाश कशाला मानता ?

**(ख्रिस्ती)** पोकळीला आणि वरचे.

**(समीक्षक)** पोकळीची उत्पत्ति कशी झाली ? कारण हा पदार्थ विभू, अत्यंत सूक्ष्म आणि वर खाली एकसारखा आहे. जेव्हा आकाश उत्पन्न झाले नव्हते तेव्हा पोकळी व अवकाश हे होते की नाही ? जर ते नसेल तर ईश्वर जगाचे कारण आणि जीव कोठे राहत होते ? अवकाशाशिवाय कोणताही पदार्थ स्थिर राहू शकत नाही. म्हणून तुमच्या बायबलातील हे विधान बरोबर नाही. ईश्वर बेडौल आणि त्याचे ज्ञान-कर्म बेडौल असते की सर्व व्यवस्थित असते ?

**(ख्रिस्ती)** सर्व सुडौल असते.

**(समीक्षक)** तर मग येथे ईश्वराने निर्माण केलेली पृथ्वी बेडौल होती असे का लिहिले आहे ?

**(ख्रिस्ती)** बेडौल याचा अर्थ ती उंच-सखल होती व सपाट नव्हती.

**(समीक्षक)** मग ती सपाट कोणी बनविली ? आजही ती उंच-सखल नाही काय ? ईश्वर सर्वज्ञ आहे. म्हणून त्याचे कोणतेही काम, कृती बेडौल असू शकत नाही. त्याच्या कामात कधीच भूलचूक होऊ शकत नाही. बायबलमध्ये ईश्वराची सृष्टि बेडौल असे लिहिली आहे. म्हणून ते पुस्तक ईश्वरकृत असू शकत नाही. प्रथम हे सांगा की ईश्वराचा आत्मा काय पदार्थ आहे ?

**(ख्रिस्ती)** तो चेतन आहे.

**(समीक्षक)** तो साकार आहे की निराकार ? व्यापक आहे की एकदेशी ?

**(ख्रिस्ती)** तो निराकार, चेतन व व्यापक आहे. परंतु एका सिनाई पर्वत, चौथा स्वर्ग (आकाश) वगैरे ठिकाणी तो विशेषकरून राहतो.

**(समीक्षक)** तो निराकार असेल तर त्याला कोणी पाहिले आहे ? आणि व्यापकाचे जलावर डोलणे कधी होऊ शकत नाही. बरे ! जेव्हा ईश्वराचा आत्मा पाण्यावर डोलत होता तेव्हा ईश्वर कोठे होता ? यावरून हेच सिद्ध होते की ईश्वराचे शरीर कोठेतरी अन्यत्र असणार; अथवा आपल्या आत्म्याचा एक तुकडा त्याने पाण्यावर तरंगत ठेवला असणार. तसे असेल तर तो कधीच विभू व सर्वज्ञ होऊ शकत नाही. तो विभू नसेल तर जगाची उत्पत्ती, धारण, पालन आणि जीवांच्या कर्मांची व्यवस्था अथवा प्रलय या गोष्टी तो कधी करू शकला नसता. कारण ज्या पदार्थाचे स्वरूप एकदेशी असते. त्याचे गुण, कर्म, स्वभावही एकदेशी असतात. असे असल्यामुळे तो ईश्वर होऊ शकत नाही. कारण ईश्वर हा सर्वव्यापक अनंत गुण कर्म स्वभावयुक्त , सच्चिदानंदस्वरूप, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव, अनादी, अनंत इत्यादी लक्षणांनी युक्त आहे असे वेदात सांगितले आहे. त्यालाच तुम्ही मानाल तरच तुमचे कल्याण होईल, नाहीतर नाही.

(२) आणि ईश्वराने म्हटले की, ''प्रकाश होवो'' आणि प्रकाश झाला आणि ईश्वराने पाहिले की, प्रकाश चांगला आहे. -'उत्पत्ति', अ. १, ओ. ३,४.

**(समीक्षक)** ईश्वराचे बोलणे जडरूप प्रकाशाने ऐकले काय ? जर ऐकले असेल तर आजही सूर्य, दिवा व अग्नी यांचा प्रकाश तुमचे आमचे म्हणणे का ऐकत नाही ? प्रकाश हा जड असतो. तो कधीही कोणाचेही बोलणे ऐकू शकत नाही. ईश्वराने जेव्हा प्रकाश पाहिला तेव्हाच त्याला प्रकाश चांगला आहे ? त्यापूर्वी त्याला ते माहीत नव्हते काय ? जर त्याला ते माहीत असते तर तो पाहिल्यानंतर तो चांगला आहे असे त्याने का म्हटले ? जर त्याला ते आधीपासून माहीत नसेल तर तो ईश्वरच नव्हे. म्हणून तुमचे बायबल ईश्वरोक्त नाही आणि त्यात वर्णिलेला ईश्वर सर्वज्ञ नाही. ॥२॥

(३) आणि ईश्वराने म्हटले आहे की पाण्यामध्ये आकाश (अवकाश) होवो; आणि ते पाण्यांना पाण्यांपासून विभक्त करो. तेव्हा ईश्वराने आकाश बनविले आणि आकाशाच्या वरील पाण्यांपासून वेगळे केले

आणि तसे झाले आणि ईश्वराने आकाशाला स्वर्ग म्हटले आणि संध्याकाळ व सकाळ झाली. दुसरा दिवस उजाडला. -'उत्पत्ति', अ. १, ओ. ६,७,८

**(समीक्षक)** आकाशाने व पाण्यानेही ईश्वराचे ऐकले काय ? पाण्यामध्ये आकाश नसते तर पाणी कोठे राहिले असते ? पहिल्या ओवीत ईश्वराने आकाश निर्माण केल्याचे सांगण्यात आले आहे. मग पुन: आकाशाची निर्मिती करणे निरर्थक ठरते. आकाशाला स्वर्ग म्हटले आहे. ते तर सर्वव्यापक आहे. म्हणून स्वर्ग सर्वत्र आहे असे ठरते. म्हणून स्वर्ग वर आहे असे म्हणण्यात काही अर्थ नाही. एव्हाना सूर्य उत्पन्नच झालेला नव्हता. मग दिवस व रात्र कोठून झाले ? असल्याच अनेक अशक्य गोष्टी पुढील आयतामध्ये भरलेल्या आहेत. ॥३॥

(४) मग ईश्वर म्हणाला की, "आपण आपल्यासारखे स्वरूप देऊन माणसाला आपल्यासारखे बनवावे." आणि ईश्वराने माणसाला आपल्यासारखे स्वरूप देऊन उत्पन्न केले. म्हणजे त्याने माणसाला ईश्वराच्या रूपात निर्माण केले. ईश्वराने नर व नारी या रूपात माणसाची निर्मिती करून त्यांना आशीर्वाद दिला.

**(समीक्षक)** ईश्वराने माणसाला आपल्यासारखेच स्वरूपात निर्माण केले होते तर ईश्वराचे स्वरूप पवित्र, ज्ञानरूप, आनंदमय इत्यादी लक्षणांनी युक्त आहे. मग माणूस त्याच्यासारखा का झाला नाही ? तो तसा झाला नाही याचा अर्थच हा की माणूस ईश्वरासारखे स्वरूप धारण करणारा नव्हता. माणसाला ईश्वराने निर्माण केले; आणि त्याला आपल्यासारखेच रूप दिले. त्याचे स्वरूप निर्माण करता येण्यासारखे आहे. म्हणून तो अनित्य का नाही ? शिवाय त्याने माणसाला कोठून निर्माण केले ?

**(खिस्ती)** मातीपासून.

**(समीक्षक)** त्याने माती कशापासून निर्माण केली ?

**(खिस्ती)** आपल्या सामर्थ्याने.

**(समीक्षक)** ईश्वराचे सामर्थ्य अनादी आहे की नवीन ?

**(खिस्ती)** अनादी आहे.

**(समीक्षक)** जर अनादी असेल तर जगाचे कारण सनातन ठरते. मग अभावापासून भावाची उत्पत्ती का मानता ?

**(खिस्ती)** सृष्टिच्या पूर्वी ईश्वराखेरीज दुसरी कोणतीच वस्तू नव्हती.

**(समीक्षक)** जर नव्हती तर हे जग कशापासून बनले ? आणि ईश्वराचे सामर्थ्य हे द्रव्य आहे की गुण ? जर ते द्रव्य असेल तर ईश्वराहून वेगळा असा दुसरा पदार्थ अस्तित्वात होता; आणि जर तो गुण असेल तर गुणापासून द्रव्य कधी बनू शकत नाही. ज्याप्रमाणे रूपापासून अग्नी आणि रसापासून पाणी बनत नाही आणि ईश्वरापासून जग निर्माण झाले असते तर ते ईश्वरासारखे गुण, कर्म व स्वभाव असणारे बनले असते. परंतु ते ईश्वराच्या गुणकर्मस्वभावासारखे नसल्यामुळे ते ईश्वरापासून बनलेले नाही परंतु जगाचे कारण असणाऱ्या परमाणू वगैरे नावे असलेल्या जडाने बनले आहे हेच सिद्ध होते. जगाच्या उत्पत्तिसंबंधी वेदादी शास्त्रांमध्ये जे लिहिलेले आहे

ते तुम्ही मान्य करा. ज्यात ईश्वर हा सृष्टिकर्ता आहे असे सांगितले आहे. (आदमचे) आंतरिक स्वरूप जीवासारखे आणि बाह्यस्वरूप माणसासारखे आहे. मग ईश्वराचे स्वरूप तसे का नाही ? कारण आदम हा ईश्वरासारखा बनला तर ईश्वरही आदमसारखाच असला पाहिजे. ॥४॥

(५) आणि त्या महान परमेश्वराने जमिनीवरच्या धुळीपासून आदिमानव बनविला आणि त्याच्या नाकपुड्यांत प्राणवायू फुंकला. त्याबरोबर आदम हा जिवंत प्राणी झाला आणि महान परमेश्वराने एडनमध्ये पूर्वेच्या बाजूस एक बाग तयार केली आणि जो आदम त्याने बनविला होता त्याला तेथे ठेवले. मग त्या बागेच्या मध्यभागी जीवनाचा वृक्ष व बरे-वाईट जाणण्याचे झाड जमिनीतून उगविले. -'उत्पत्ति', अ. २, ओ. ७-९

**(समीक्षक)** जेव्हा ईश्वराने एडनमध्ये बाग तयार करून त्यामध्ये आदमला ठेवले तेव्हा त्याला पुन: तेथून हाकलून द्यावे लागेल हे ईश्वराला माहीत नव्हते काय ? ईश्वराने आदमला धुळीपासून बनविले, म्हणजे तो ईश्वराचे स्वरूप नव्हता आणि जर तो तसा असता तर मग ईश्वरही धुळीपासून बनला असेल ? ईश्वराने याच्या नाकपुड्यांत श्वास फुंकला. तर तो श्वास ईश्वरस्वरूप होता की वेगळा ? तो वेगळा असेल तर माणूस ईश्वराचे स्वरूप नव्हता असे म्हणावे लागेल. जर तो एकच असेल तर माणूस आणि ईश्वर हे एकसारखेच म्हणावयाचे. जर ते एकसारखेच असतील तर माणसाप्रमाणे जन्म, मरण, वृद्धी, क्षय, क्षुधा, तृष्णा वगैरे दोष ईश्वरामध्ये येतील. मग तो ईश्वर कसा होऊ शकेल ? म्हणून तौरेत ची ही गोष्ट बरोबर ठरत नाही; आणि हे पुस्तकही ईश्वरकृत ठरत नाही. ॥५॥

## आदमच्या बरगडीपासून स्त्री उत्पत्ति

(६) आणि महान परमेश्वराने आदमला गाढ झोप आणली व तो झोपी गेला. त्यावेळी परमेश्वराने आदमच्या छातीच्या फासळ्यांपैकी एक फासळी काढली आणि तिची जागा मांसाने भरून काढली. मग महान परमेश्वराने आदमच्या त्या फासळीपासून एक स्त्री बनविली आणि तिला आदमजवळ आणले.

-'उत्पत्ति', अ. २, ओ. २१-२२

**(समीक्षक)** ईश्वराने आदमला धुळीपासून बनविले मग त्यांच्या स्त्रीलाही धुळीपासून का बनविले नाही ? आणि स्त्रीला हाडापासून निर्माण केले तसे आदमला हाडापासून का बनविले नाही ? नरापासून उत्पन्न झाल्यामुळे स्त्रीही नारी तर नारीपासून उत्पन्न होत असल्यामुळे नर व्हावयाला पाहिजे. त्या दोघांमध्ये परस्परांविषयी प्रेम असले पाहिजे. पुरुष जसा आपल्या पत्नीवर प्रेम करतो तसे स्त्रीनेही आपल्या पतीवर प्रेम केले पाहिजे. विद्वज्जनांनो, ईश्वराची पदार्थविद्या म्हणजे फिलॉसॉफी कशी चमकते आहे. जर आदमची एक फासळी काढून स्त्री बनविली आहे तर सर्वच पुरुषांच्या छातीत एक फासळी कमी का असत नाही ? तसेच स्त्रीच्या छातीत एकच फासळी असली पाहिजे. कारण ती एका फासळीपासून बनलेली आहे. ज्या सामग्रीपासून सारे जग बनविले त्या सामग्रीपासून स्त्रीचे शरीर बनू शकत नव्हते काय ? म्हणून बायबलचा हा सृष्टिक्रम सृष्टिविद्येच्या विरुद्ध आहे. ॥६॥

## सैतान

(७) महान परमेश्वराने जे पशू बनविले होते त्यांमध्ये साप धूर्त होता आणि त्या स्त्रीला म्हटले, "तू या बागेतील प्रत्येक झाडाचे फळ खाऊ नको, असे ईश्वराने निश्चित सांगितले आहे काय ?" स्त्री सापाला म्हणाली, "आम्ही या बागेतील इतर झाडांची फळे खातो. परंतु "बागेच्या मधोमध असलेल्या त्या झाडाचे फळ तुम्ही खाऊ नका व त्याला स्पर्शही करू नका. तसे कराल तर मरून जाल." तेव्हा साप स्त्रीला म्हणाला, "तुम्ही मुळीच मरणार नाही. कारण ईश्वराला माहीत आहे की ज्या दिवशी तुम्ही त्याचे फळ खाल त्यादिवशी तुमचे डोळे उघडतील आणि बरे व वाईट ओळखण्याच्या बाबतीत ईश्वरासारखे बनाल." मग त्या झाडाचे फळ खाण्यास स्वादिष्ट, दिसायला सुंदर व बुद्धी देणारे आहे, असे जेव्हा त्या स्त्रीने पाहिले तेव्हा तिने त्या झाडाचे फळ काढून खाल्ले आणि आपल्या नवऱ्यालाही दिले. त्याने ते खाल्ले. तेव्हा त्या दोघांचे डोळे उघडले आणि आपण नग्न आहोत हे त्यांच्या लक्षात आले. मग त्यांनी उंबराची पाने एकत्र शिवून आपल्यासाठी वस्त्र तयार केले.

मग महान परमेश्वराने सापाला सांगितले, "तू हे जे केले आहेस त्यामुळे तू सर्व गुराढोरांहून आणि वन्य पशुपक्ष्यांहून अधिक शापित होशील. तू आपल्या पोटावर सरपटत राहशील आणि जन्मभर माती खात राहशील. मी तुझ्यामध्ये व स्त्रीमध्ये आणि तुझ्या वंशात व तिच्या वंशात वैर निर्माण करून ठेवीन. माणूस तुझे डोके ठेचील आणि तू त्याच्या टाचेला चावा घेशील." मग त्याने स्त्रीला सांगितले की, "मी तुझे दुःख आणि गर्भधारण खूप वाढवीन. तू दुःखाने लेकरे प्रसवशील, तुझी ओढ तुझ्या नवऱ्याकडे राहील आणि तो तुझ्यावर प्रभुत्व गाजवील.' मग तो आदमला म्हणाला, "तू आपल्या पत्नीचे सांगणे ऐकलेस आणि ज्या झाडाचे फळ तू खाऊ नकोस असे मी सांगितले होते त्या झाडाचे फळ तू खाल्लेस. म्हणून भूमी तुझ्यासाठी शापित झाली आहे. तू जन्मभर कष्ट करून तिचे फळ खाशील. ती तुझ्यासाठी काटेकुटे उगवील आणि तू शेतीतील भाजीपाला खाशील." -'उत्पत्ति', अ.३, ओ.१-७, १४-१८

**(समीक्षक)** ख्रिस्ती लोकांचा ईश्वर सर्वज्ञ असता तर त्याने या लबाड सापाला म्हणजे सैतानाला का निर्माण केले असते ? असा दुष्ट सैतान ज्या ईश्वराने निर्माण केला तो ईश्वरच त्या गुन्ह्याचा वाटेकरी आहे. कारण त्याने त्याला दुष्ट बनविले नसते तर त्याने दुष्टपणा कशाला केला असता ? आणि जर तो पूर्वजन्म मानीत नाही तर काही अपराध नसताना त्याला त्याने पापी का बनविले ? खरे म्हणाल तर तो साप नव्हताच. तो मनुष्यच होता. कारण तो मनुष्य नसता तर तो माणसाची भाषा कशी बोलू शकला असता ? जो स्वतः खोटा असतो व इतरांना खोट्या मार्गाने नेतो त्याला सैतान म्हटले पाहिजे. वस्तुतः येथे सैतान सत्यवादी होता आणि म्हणून त्याने त्या स्त्रीची दिशाभूल केलेली नव्हती. उलट त्याने खरे तेच सांगितले होते, आणि ईश्वराने आदम व हव्वा (ईव्ह) यांना असे खोटेच सांगितले होते की, "तुम्ही या झाडाचे फळ खाल तर मराल." तो वृक्ष ज्ञानदाता आणि अमर बनविणारा असताना त्याचे फळ खाण्याची मनाई ईश्वराने का केली ? ज्याअर्थी त्याने ते फळ वर्ज्य

ठरविले त्याअर्थी तो ईश्वर खोटा आणि दिशाभूल करणारा ठरतो. कारण त्या वृक्षाची फळे माणसाला ज्ञान व सुख देणारी होती, अज्ञानदायक व मृत्युकारक नव्हती. ईश्वराने त्या वृक्षाचे फळ खाण्यास बंदी केली होती. त्याला तसे करावयाचे होते तर त्याने त्या वृक्षाची उत्पत्तीच कशाला केली होती ? ती जर त्याने स्वत:साठी केली असेल तर तो अज्ञानी व मर्त्य होता काय ? आणि जर ती दुसऱ्यांसाठी केली असेल तर त्या वृक्षाचे फळ खाण्यात कसलाच अपराध नव्हता. आजकाल कोणताच वृक्ष ज्ञानदायक व मृत्युनिवारक असल्याचे पाहण्यात येत नाही. ईश्वराने त्या वृक्षाचे बीजही नष्ट करून टाकले काय ? असल्या गोष्टी करणारा माणूस लबाड व कपटी ठरतो. मग ईश्वरही तसाच का ठरू नये ? कारण जो इतरांना फसवितो व ढोंगबाजी करतो तो कपटी व ढोंगी होईल. मग ईश्वरालाही कपटी व ढोंगी का म्हणू नये ? शिवाय त्याने त्या तिघांना त्यांचा काहीच अपराध नसताना शाप दिला. त्यामुळे ईश्वर अन्याय करणाराही ठरला. खरे तर हा शाप ईश्वरालाच लागला पाहिजे. कारण तो खोटे बोलला होता व त्याने त्यांची दिशाभूल केली होती. अशी ही त्यांची फिलॉसॉफि ! पूर्वी वेदनेशिवाय गर्भधारणा आणि मुलाचा जन्म होऊ शकत होता काय ? श्रम केल्याखेरीज कोणीतरी आपली उपजीविका चालवू शकतो काय ? पूर्वी काटेकुटे असणारी झाडे नव्हती काय ? आणि ईश्वराच्या सांगण्याप्रमाणे भाजीपाला खाणे हे सर्व माणसांच्या बाबतीत उचित होते तर बायबलाच्या उत्तरार्धात मांसाहाराविषयी जे लिहिले आहे ते खोटे ठरत नाही काय ? ते खरे असेल तर आधी लिहिलेले हे खोटे ठरते. आदमचा कोणताच अपराध सिद्ध होत नसताना ख्रिस्ती लोक असे का म्हणतात की आदमच्या अपराधामुळे त्याची संतती असणारी सारी मानवजात पापी आहे ? असला मतग्रंथ व असला ईश्वर बुद्धिमंतांना कधी तरी मान्य होऊ शकेल काय ? ॥७॥

(८) आणि महान परमेश्वर म्हणाला, ''पाहा ! मनुष्य बरेवाईट जाणण्याच्या बाबतीत आमच्यापैकीच एक झाला.'' आणि आता असे होऊ नये की, त्याने आपल्या हाताने जीवनरूपी झाडाचे फळ तोडून खावे आणि अमर व्हावे म्हणून ईश्वराने त्याला बाहेर हाकलून दिले आणि एडनच्या बागेच्या पूर्व दिशेस जीवनवृक्षाच्या रखवालीसाठी देवदूत तैनात केले आणि सर्व दिशांना सतत फिरत राहणारी चकाकती तलवार त्या वृक्षाच्या वाटेवर ठेवली. -'उत्पत्ति', अ.२, ओ.२२,२४

**(समीक्षक)** बरे ! ज्ञानाच्या बाबतीत आदम आपल्या तोडीचा बनला याबद्दल ईश्वराला अशी ईर्ष्या व भ्रम का झाला ? ती काय वाईट गोष्ट होती ? अशी शंकाच त्याला का आली ? कारण ईश्वराच्या तोडीचा कोणीही कधीही होऊ शकत नाही. परंतु या लिखाणावरून असेही सिद्ध होऊ शकते की तो ईश्वर नसून विशेष मनुष्य होता. बायबलामध्ये जेथे-जेथे ईश्वराचा उल्लेख येतो तेथे-तेथे तो माणूस असल्यासारखाच लिहलेला आहे. आता पाहा, आदमच्या ज्ञानात वृद्धी होणार या कल्पनेने ईश्वर किती दु:खी झाला ! आणि त्याने त्या अमर वृक्षाचे फळ खाल्ले याबद्दल ईश्वराला त्याचा किती हेवा वाटला ! त्याने आदमला प्रथम जेव्हा त्या बागेत ठेवले तेव्हा त्याला हे भविष्यज्ञान नव्हते. म्हणून ख्रिस्ती लोकांचा ईश्वर सर्वज्ञ नव्हता असे म्हणावे लागते. तसेच त्याने चमचमत्या तलवारीचा पहारा ठेवला. हे कामही माणसाचे आहे. ईश्वराचे नाही. ॥८॥

(९) आणि कालांतराने काइन हा शेतकरी बनल्यावर भूमीतून पैदा केलेल्या फळांपैकी काही फळे

परमेश्वराला अर्पण करण्यासाठी घेऊन आला आणि आबेल हा मेंढपाळ बनल्यावर आपल्या मेंढरांपैकी नुकत्याच जन्मलेल्या धष्टपुष्ट कोकरांपैकी एक कोकरू परमेश्वराला अर्पण करण्यासाठी घेऊन आला. (काइन व आबेल हे दोघे भाऊ आदम व हव्वा यांची मुले होती. पुढे काइनने आबेलला ठार मारले.) परमेश्वराने आबेलचा आदरसत्कार करून त्याची भेट स्वीकारली. परंतु काइन आणि त्याची भेट यांचा आदर त्याने केला नाही. त्यामुळे काइन फार रागावला आणि त्याचा चेहरा उतरला. तेव्हा परमेश्वर त्याला म्हणाला, ''तू का रागावलास ? आणि तुझे तोंड का उतरले ?'' -'उत्पत्ति', अ.४, ओ.४-६

**(समीक्षक)** ईश्वर मांसाहारी नसता तर मेंढराची भेट त्याने का स्वीकारली असती ? आणि आबेलचा सत्कार, तसेच काइनचा व त्याच्या भेटीचा तिरस्कार का केला ? अशा प्रकारे त्यांच्यात भांडण लागल्यास आणि आबेलच्या मृत्यूला ईश्वरच कारणीभूत झाला आणि सामान्य माणसे जशी आपसात बोलतात तसेच हे ख्रिस्ती लोकांच्या ईश्वराचे बोलणे आहे. बाग तयार करणे व तेथे येणे-जाणे हेही माणसाचेच काम आहे. यावरून हे स्पष्ट होते की हे बायबल ईश्वराने रचलेले नसून माणसांनी लिहिलेले आहे. ॥९॥

(१०) जेव्हा परमेश्वराने काइनला विचारले की, ''तुझा भाऊ आबेल कोठे आहे ?'' तेव्हा तो म्हणाला, ''मला माहीत नाही. मी माझ्या भावाचा राखणदार आहे की काय ?'' तेव्हा ईश्वर म्हणाला, ''तू काय केलेस हे ? तुझ्या भावाचे रक्त शब्द बनून मला जमिनीतून हाका मारीत आहे. आता तू पृथ्वीकडून शापित झाला आहेस.'' -'उत्पत्ति', अ.४, ओ.९-११.

**(समीक्षक)** काइनला विचारल्याशिवाय ईश्वराला आबेलची हकीकत माहित नव्हती ? आणि रक्ताचा शब्द बनून तो कधी कोणाला हाक मारू शकतो काय ? या सगळ्या अज्ञानीयांच्या गोष्टी आहेत. म्हणूनच हे पुस्तक ईश्वराने किंवा विद्वानाने रचलेले असू शकत नाही. ॥१०॥

(११) आणि मेथूसलहच्या जन्मानंतर त्याचा बाप ईनक (हनोख) तीनशे वर्षे ईश्वराबरोबर चालत राहिला. -'उत्पत्ति', अ.५, ओ.२२

**(समीक्षक)** वाह रे वा ! ख्रिस्ती लोकांचा ईश्वर मानव नसता तर ईनक त्याच्या बरोबर कसा चालू शकला असता ? म्हणून ख्रिस्ती लोक वेदोक्त निराकार ईश्वरालाच मानतील तर त्यांचे कल्याण होईल. ॥११॥

(१२) आणि मग असे झाले की जेव्हा माणसे पृथ्वीवर वाढू लागली आणि त्यांना मुली झाल्या तेव्हा ईश्वराच्या पुत्रांनी मानवाच्या कन्या पाहिल्या. त्या सुंदर आहेत असे पाहून त्यांच्यापैकी त्यांना ज्या पसंत पडल्या त्यांच्याशी त्यांनी लग्ने केली. त्या काळी पृथ्वीवर त्यावेळी दानव होते आणि त्यानंतरही, जेव्हा ईश्वराच्या पुत्रांचा मानवाच्या कन्यांशी संबंध जुळून आला तेव्हा त्यांना मुले झाली. ती बलवान झाली. पूर्वीच्या काळी जे प्रख्यात लोक होते तेच हे. ईश्वराने असे पाहिले की पृथ्वीवर माणसाची दुष्टता फार वाढली आहे आणि त्यांच्या मनातील विचार व भावना या सदैव फक्त वाईटच असतात. तेव्हा माणसाला पृथ्वीवर उत्पन्न केल्याबद्दल परमेश्वर पस्तावला आणि त्याला फार दुःख झाले. मग परमेश्वर म्हणाला की, ज्या माणसाला मी उत्पन्न केले त्या

माणसापासून पशू, सरपटणारे प्राणी व आकाशात उडणारे पक्षी यांच्यापर्यंत सर्वांना मी पृथ्वीवरून नष्ट करून टाकीन. कारण त्यांना निर्माण केल्याबद्दल मला पश्चाताप होत आहे. -'उत्पत्ति', अ.६, ओ.१,२,४-७.

**(समीक्षक)** ख्रिश्चनांना विचारले पाहिजे की, ''ईश्वराचे पुत्र कोण आहेत ?'' आणि ईश्वराची बायको, सासू, सासरा, मेहुणा आणि नातेवाईक कोण आहेत ? कारण ईश्वराच्या पुत्रांनी मानवांच्या कन्यांशी विवाह केल्यामुळे ईश्वर त्यांचा व्याही झाला; आणि त्यांच्यापासून झालेली मुले ही ईश्वराची नातवंडे झाली. अशा गोष्टी ईश्वराच्या बाबतीत खऱ्या असू शकतात काय ? आणि ईश्वरी ग्रंथात त्यांना स्थान असू शकते काय ? यावरून हेच सिद्ध होते की अशा जंगली लोकांनी बायबल रचले आहे. जो सर्वज्ञ नाही व ज्याला भविष्यकाळाचे ज्ञान नाही तो ईश्वर असूच शकत नाही. तो जीव आहे. जेव्हा त्याने सृष्टी बनविली तेव्हा कालांतराने माणसे दुष्ट बनतील हे त्याला कळले नाही काय ? तसेच पस्तावणे, अत्यंत दु:खी होणे, चुकीचे कृत्य करून नंतर पश्चात्ताप करणे वगैरे गोष्टी ख्रिश्चनांच्या ईश्वराच्या बाबतीतच घडू शकतात. वेदोक्त ईश्वराच्या संबंधात त्या घडू शकत नाहीत. यावरून हेही सिद्ध होऊ शकते की ख्रिस्ती लोकांचा ईश्वर पूर्ण विद्वान योगीही नव्हता. नाहीतर मन:शांती व ज्ञान यांच्या साह्याने तो दु:खशोकापासून अलिप्त राहू शकला असता. अहो, पशुपक्षीही दुष्ट झाले. तो ईश्वर सर्वज्ञ असता तर त्याला असा विषाद का झाला असता ? त्याचे कारण एवढेच की तो ईश्वर नव्हता आणि म्हणून बायबल हा ईश्वरकृत ग्रंथ नाही. वेदोक्त परमेश्वर हा सर्व पापे, क्लेश, दु:खे, शोक इत्यादीपासून मुक्त असून तो 'सच्चिदानंदस्वरूप' आहे. त्याला ख्रिस्ती लोकांनी मानले असते अथवा अजूनही मानतील तर ते आपला मनुष्यजन्म सफळ बनवू शकतील. ॥१२॥

## नोहाची नौका

(१३) त्या नौकेची लांबी ३०० हात, रुंदी ५० हात आणि ऊंची ३० हात असावी. तू त्या नौकेतून जाशील. तुझ्याबरोबर तुझी मुले, तुझी पत्नी आणि तुझ्या मुलांच्या बायका असतील आणि साऱ्या प्राण्यांच्या जातीपैकी प्रत्येकी दोन जिवंत प्राण्यांना तू आपल्याबरोबर नौकेत घे. त्यायोगे तेवढे प्राणी तुझ्याबरोबर जिवंत रहतील. दोन प्राण्यांपैकी एक नर व एक मादी असावी. पक्ष्यांच्या एकेका जातीतून, गुरांच्या एकेका जातीतून आणि पृथ्वीवर सरपटणाऱ्या प्राण्यांच्या प्रत्येक जातीतून नर व मादी असे दोन-दोन प्राणी जिवंत राहण्यासाठी तुझ्याकडे येतील. तू स्वत:साठी आहाराची सर्व सामग्री जमवून ठेव. तिचा उपयोग तुला व त्या प्राण्यांना खाण्यासाठी होईल. ईश्वराच्या या आज्ञेप्रमाणे नूह (नोहा) ने सर्व काही केले. -उ.अ.६, ओ. १५,१८-२२

**(समीक्षक)** अशा ज्ञानविरोधी व अशक्य गोष्टी सांगणाऱ्याला कोणीही विद्वान माणूस ईश्वर मानू शकेल काय ? कारण एवढ्या मोठ्या, लांब, रुंद व ऊंच नावेत हत्ती-हत्तीण, उंट-उंटीण (सांडणी), वगैरे कोट्यावधी प्राणी आणि त्यांच्या खाण्यापिण्याचे पदार्थ व नोहाचे सगळे कुटुंब या सर्वांचा समावेश होणे शक्य आहे काय ? म्हणूनच हे पुस्तक मनुष्यकृत आहे आणि ज्याने हे लिखाण केले तो विद्वानही नव्हता. ॥१३॥

(१४) मग नोहाने परमेश्वरासाठी एक वेदी तयार केली; आणि सर्व पशुपक्ष्यांमधील शुद्ध (पवित्र) प्राणी

घेऊन त्या वेदीवर त्यांचा होम केला. (त्यांना बळी दिले) ... त्या सुगंधाने परमेश्वर प्रसन्न झाला आणि तो आपल्या मनात म्हणाला, "माणसासाठी मी पृथ्वीला (भूमीला) पुन: कधी शाप देणार नाही. कारण माणसाच्या मनातील भावना त्याच्या बालीशपणाने वाईट आहे आणि ज्याप्रमाणे मी सर्व प्राण्यांना आता मारले आहे त्याप्रमाणे पुन: कधी मारणार नाही." -'उत्पत्ति', अ. ८, ओ. २०-२१.

**(समीक्षक)** वेदी बनविणे व होम करणे या विधींच्या उल्लेखावरून या गोष्टी वेदांतून बायबलाने घेतल्या आहेत. परमेश्वराने सुगंध घेतला, याचा अर्थ त्याला नाकही आहे काय ? ख्रिस्ती लोकांचा हा ईश्वर कधी शाप देतो तर कधी पस्तावतो. म्हणजे तो माणसासारखा अल्पज्ञच नाही काय ? तो कधी म्हणतो की मी आता शाप देणार नाही. पूर्वी शाप दिला होता आणि पुन: देणार. प्रथम सर्वांना मारून टाकले आणि आता म्हणतो की आता कधीच मारणार नाही !!! हा सारा पोरकटपणा आहे. ईश्वर किंवा एखादा विद्वान असे बोलत नसतो. कारण विद्वानाचीसुद्धा गोष्ट आणि निश्चय स्थिर असतो. ॥१४॥

(१५) आणि ईश्वराने नोहाला व त्याच्या मुलांना आशीर्वाद दिला आणि तो त्यांना म्हणाला, "तुम्ही सफळ व्हा'; आणि आपली संख्या खूप वाढवून तिने पृथ्वी भरून टाका. हालचाल करणारा प्रत्येक जीवजंतू तुमच्यासाठी खाद्य पदार्थ होईल. मी तुम्हाला हिरव्या पालेभाज्यांसारख्या सर्व वस्तू दिल्या आहेत. मात्र ज्या मांसात जीव आहे ते, म्हणजे रक्तासहित मांस खाऊ नका." -'उत्पत्ति', अ. ९, ओ. १, ३, ४.

**(समीक्षक)** एकाला प्राणकष्ट देऊन दुसऱ्यांना आनंद देणारा हा ख्रिश्चनांचा ईश्वर निर्दयी ठरत नाही काय ? जे आईबाप एका मुलाला मारून दुसऱ्या मुलाला खाऊपिऊ घालतात ते महापापी नसतात काय ? तशीच ही गोष्ट आहे. कारण ईश्वराच्या दृष्टीने सर्वच प्राणी मुलांसारखे आहेत. परंतु ख्रिस्त्यांचा ईश्वर तसा नसल्यामुळे तो कसायाचे काम करतो आणि त्यानेच सर्व माणसांना हिंसक बनविले आहे. म्हणून ख्रिश्चनांचा ईश्वर निर्दय असल्याने पापी ठरत नाही काय ? ॥१५॥

(१६) आणि सर्व पृथ्वीवर एकच भाषा व एकच बोली होती. ... मग ते म्हणाले, "या ! आपण जगभर पांगून जाऊ नये व आपले नाव व्हावे यासाठी आपण एक नगर वसवू या आणि ज्याचे शिखर स्वर्गाला जाऊन भिडेल असा मनोरा बांधू या." माणसाची मुले जे नगर व मनोरा बांधीत होती ते पाहण्यासाठी परमेश्वर खाली उतरला. मग परमेश्वर म्हणाला, "पाहा ! हे लोक एकच आहेत आणि त्या सर्वांची भाषा एकच आहे. त्यांनी असे काम करावयास सुरुवात केली आहे. म्हणून ते जे काही मनात योजतील ते केल्याशिवाय राहाणार नाहीत. .... चला ! आपण खाली उतरू आणि त्यांच्या भाषेत गोंधळ निर्माण करू. त्यामुळे त्यांना एकमेकांचे बोलणे कळणार नाही." मग परमेश्वराने त्यांना सर्व पृथ्वीवर विखरून टाकले आणि त्यांनी ते नगर वसविण्याचे काम सोडून दिले. -'उत्पत्ति', अ. ११, ओ. १, ४-८.

**(समीक्षक)** जेव्हा संपूर्ण पृथ्वीच्या पाठीवर एकच भाषा बोलली जात असेल तेव्हा सर्व माणसे परस्परांशी अत्यंत आनंदाने वागत असतील. परंतु काय करणार ? या ख्रिस्त्यांच्या मत्सरी ईश्वराने सर्वांच्या भाषेत गोंधळ निर्माण करून सर्वांचा सत्यानाश केला ! खरोखर त्याने हा मोठाच अपराध केला. सैतानाच्या कृत्याहून हे कृत्य

अधिक नीचपणाचे नाही काय ? यावरून हेही लक्षात येते की ख्रिस्ती लोकांचा ईश्वर सिनाई नावाच्या पर्वतावर राहत होता; आणि जीवांचे कल्याण व्हावे अशी त्याची इच्छा नव्हती. ईश्वराची गोष्ट जाऊ द्या, कोणीही शाहणा माणूस असे करणार नाही आणि बायबल हा ईश्वरी ग्रंथ का होऊ शकतो. ॥१६॥

(१७) मग तो आपली पत्नी सराइ (सारा) हिला म्हणाला, ''हे पाहा ! तू दिसायला सुंदर आहेस हे मला माहीत आहे ... म्हणून जेव्हा मिसरी (ईजिप्तचे) लोक तुला पाहतील तेव्हा ते म्हणतील की ''ही याची बायको आहे.'' आणि ते मला मारून टाकतील पण तुला जिवत ठेवतील ... तेव्हा तू त्यांना असे सांग की, ''मी याची बहीण आहे.'' त्यायोगे तुझ्यामुळे माझे भले होईल आणि तुझ्या कारणाने माझे प्राण वाचतील.''

- 'उत्पत्ति', अ.१२, ओ.११-१३

**(समीक्षक)** आता तुम्हीच पाहा ! असे बोलणारा अब्राहम हा ख्रिस्ती व मुसलमान लोकांचा मोठा पैगंबर समजला जातो. त्याची कृत्ये असत्य भाषणादी वाईट आहेत. ज्यांचे पैगंबर असे असतील त्यांना ज्ञानाचा किंवा कल्याणाचा मार्ग कसा सापडणार ? ॥१७॥

(१८) आणि ईश्वराने अब्राहमला सांगितले, ''तू आणि तुझ्यानंतर तुझ्या वंशातील लोक पिढ्यान् पिढ्या माझा करार पाळाल ... माझा तुझ्याशी व तुझ्यानंतर तुझ्या वंशातील इतर लोकांशी झालेला करार तुम्ही सर्वांनी पाळावा. तो असा की तुमच्यापैकी प्रत्येक पुरुषाची सुंता करण्यात यावी .... आणि तुम्ही तुमच्या शिश्नाच्या टोकाचे कातडे कापून टाका. ती तुमच्या माझ्यामधील कराराची खूण असेल.... आणि पिढ्यान् पिढ्या तुमच्यांतील प्रत्येक पुरुषाची जन्मल्यानंतर आठव्या दिवशी सुंता करावी. ते मूल घरात जन्मलेले असो किंवा परक्या माणसाकडून विकत घेतलेले, तुझ्या रक्ताचे नसलेले असो, त्याची सुंता अवश्य करावी. जो तुझ्या घरात जन्मला असेल आणि तुझ्या पैशांनी विकत घेतलेला असेल त्याचीही सुंता अवश्य करावी. म्हणजे माझा हा करार तुमच्या मांसामध्ये कायमचा टिकून राहील. ... सुंता न केलेला मुलगा, ज्याच्या शिश्नाच्या टोकाचे कातडे कापलेले नाही असा जीव आपल्या लोकांपासून तुटला जाईल, कारण त्याने माझा करार मोडला आहे.'' - 'उत्पत्ति', अ.१७, ओ.९-१४.

**(समीक्षक)** आता पाहा, ईश्वराची ही आज्ञा किती विचित्र व अनैसर्गिक आहे ! ईश्वराला सुंता अभिप्रेत असती तर त्याने मुळातच शिश्नाच्या टोकावर कातडे निर्माण केले नसते. ज्याअर्थी त्याने ते निर्माण केले आहे त्याअर्थी ते शिश्नाग्राच्या रक्षणासाठी आहे. डोळ्यांवरील पापणीचे कातडे जसे डोळ्यांच्या रक्षणासाठी असते तसेच हे आहे. कारण ते गुप्तस्थान अत्यंत नाजुक आहे. त्याच्यावर कातडे नसते तर एखादी मुंगी चावल्याने किंवा थोडीशी इजा झाल्याने फार पीडा झाली असती. शिवाय लघवी केल्यानंतर मूत्राचे शेवटचे थेंब कपड्याला लागू नयेत वगैरे कारणांसाठी ते कातडे आहे. ते कापणे वाईट आहे. जर हा ईश्वरी करार होता तर ख्रिस्ती लोकांनी तो का मोडला ? ते आता सुंता का करीत नाहीत ? ही आज्ञा नेहमीसाठी आहे. तिचे पालन न केल्याने या ग्रंथातील एक शब्दही खोटा नाही, अशी जी साक्ष येशूने दिली होती की व्यवस्था पुस्तकातील एक बिंदु ही असत्य नाही, ती खोटी ठरते. येशूची ही प्रतिज्ञा खरी की खोटी याचा विचारही ख्रिस्ती लोक करीत नाहीत. ॥१८॥

(१९) नंतर अब्राहमशी बोलणे संपवून ईश्वर त्याच्यापासून वर गेला. -'उत्पत्ति', अ.१७, ओ.२२.

**(समीक्षक)** यावरून असे सिद्ध होते की ख्रिस्त्यांचा देव माणसासारखा किंवा पक्ष्यासारखा होता. तो वरून खाली व खालून वर जात-येत होता. बहुधा तो कुणी जादूगारच होता, असे दिसते. ॥१९॥

## ईश्वराने मांसाहार केला

(२०) नंतर त्याला परमेश्वर ममरेच्या मैदानात दिसला. तो दुपारच्या उन्हाच्या वेळी आपल्या तंबूच्या दारात बसला होता ... तो आपली दृष्टी वर करून पाहतो तो काय, त्याच्या जवळ तीन माणसे उभी होती. त्यांना पाहताच तो आपल्या तंबूच्या दारातून उठून त्यांना भेटावयासाठी त्यांच्याकडे धावत गेला आणि त्याने जमिनीपर्यंत वाकून त्यांना प्रणाम केला ... आणि म्हणाला, ''हे माझ्या प्रभू! आता तुमची कृपादृष्टी माझ्यावर झाली असेल तर तुम्हांला अशी विनंती करतो की या दासाला सोडून जाऊ नका. तुमची इच्छा असेल तर मी थोडे पाणी आणतो. त्याने तुम्ही आपले पाय धुवा आणि झाडाखाली विश्रांती घ्या ... मग मी भाकरीचा एक तुकडा आणीन. ती खाऊन तुम्ही तृप्त व्हा. नंतर पुढे जा. कारण यासाठीच तुम्ही या दासाजवळ आला आहात.'' ... तेव्हा ते म्हणाले, ''तू बोलतोस तसे कर.'' ... आणि अब्राहम घाईघाईने तंबूत असलेल्या साराकडे गेला आणि म्हणाला, ''घाई कर आणि तीन मापे सपीठ लवकर तयार करून ते मळून पोळ्या तयार कर.'' ... नंतर अब्राहम गुरांच्या कळपाकडे धावत गेला आणि एक चांगले कोवळे लुसलशीत वासरू निवडून त्याने ते चाकराकडे दिले. त्यानेही ते चटकन कापून साफसूफ केले. मग त्याने लोणी, दूध व शिजविलेले वासरू त्यांच्यासमोर आणून ठेवले आणि तो त्यांच्या जवळच झाडाखाली उभा राहिला आणि त्यांनी ते खाल्ले.

-'उत्पत्ति', अ.१८, ओ.१-८.

**(समीक्षक)** आता तुम्ही विचार करा, सज्जनांनो! ज्यांचा ईश्वर वासराचे मांस खातो त्याचे उपासक गायी, वासरे पशूंना खाल्ल्याशिवाय का सोडतील? ज्याला मुळीच दयामाया नाही, जो मांस खाण्यास आतुर असतो तो ईश्वर कसा असू शकेल? ईश्वराबरोबर जी दोन माणसे होती ती कोण होती कोण जाणे! बहुधा समजते की ते जंगली माणसांचे टोळके असावे. त्यांचा जो म्होरक्या होता त्याचे नाव बायबलमध्ये ईश्वर असे ठेवले असावे. या गोष्टींमुळेच बुद्धिमंत लोक बायबल हे ईश्वरकृत पुस्तक आहे असे मानू शकत नाहीत आणि अशा ईश्वराला ईश्वर समजत नाहीत. ॥२०॥

(२१) मग परमेश्वराने अब्राहमला विचारले, ''सारा असे म्हणून का हसली की, मी म्हातारी असूनही मला नक्की मूल होईल काय?'' परमेश्वराला कोणतीही गोष्ट असाध्य आहे काय? -'उत्पत्ति', अ.१८, ओ.१३-१४

**(समीक्षक)** आता ख्रिस्त्यांचा ईश्वराचा हा पोरकटपणा तुम्हीच पाहा. तो मुलांसारखा व स्त्रियांसारखा चटकन चिडतो आणि साराला टोमणे मारतो!!! ॥२१॥

(२२) तेव्हा परमेश्वराने सोडोम व गोमोरा या शहरांवर स्वर्गातून गंधक व अग्नी यांचा वर्षाव केला ... आणि ती शहरे, त्यात राहणारे सारे नागरिक, सगळी मैदाने आणि जे काही भूमीतून उगवले होते त्याचा त्याने नाश केला. -'उत्पत्ति', अ.१९, ओ.२४-२५

**(समीक्षक)** बायबलातील ईश्वराची ही लीलाही आता पाहा. त्याला मुलाबाळांचीही दया आली नाही. त्याने जमीन उलटवून तिच्याखाली त्या सर्वांना गाडून, मारून टाकले. ते सगळेच अपराधी होते काय ? ही गोष्ट न्याय, दया व विवेक यांच्या विरुद्ध आहे. ज्यांचा ईश्वर असली कृत्ये करतो त्याचे उपासक तशी कृत्ये का करणार नाहीत ? ॥ २२॥

## मुलीशी बापाचा संभोग

(२३) "चल, आपण दोघी आपल्या बापाला द्राक्षाची दारू पाजू आणि त्याच्याजवळ झोपू आणि आपल्या बापाचे बीज सुरक्षित ठेवू." त्याप्रमाणे त्या रात्री त्या दोघींनी आपल्या बापाला दारू पाजली. मग थोरली मुलगी बापापाशी जाऊन निजली. दुसऱ्या दिवशी थोरली म्हणाली, "आज रात्रीही आपण आपल्या बापाला दारू पाजू. मग तू त्याच्या कुशीत जाऊन झोप. अशा प्रकारे आपण आपल्या बापाचे बीज जतन करून ठेवू." त्याप्रमाणे लूथच्या दोन्ही मुली आपल्या बापापासून गरोदर राहिल्या. -'उत्पत्ति', अ.१९,ओ.३२-३४-३६.

**(समीक्षक)** पाहा ! ज्या दारूच्या नशेत बाप व मुलगी असले कुकर्म करण्यापासून परावृत्त होऊ शकत नाहीत असली दुष्ट दारू जे ख्रिस्ती लोक पितात त्यांच्या दुष्कृत्यांचा काय पारावार आहे ? म्हणून सज्जनांनी मद्यपानाचे नाव देखील घेऊ नये. ॥२३॥

(२४) आणि आपण सांगितल्याप्रमाणे परमेश्वराने साराची भेट घेतली आणि त्याने वचन दिले होते तसे त्याने साराच्या बाबतीत केले आणि सारा गरोदर राहिली. -'उत्पत्ति', अ. २१,ओ. १,२.

**(समीक्षक)** आता विचार करा. साराची भेट घेऊन तिला गरोदर केली. हे कसे घडले ? सारा आणि परमेश्वर या दोघांशिवाय तिसरा कोणी गर्भधारणेला कारणीभूत झालेला दिसतो काय ? सारा ही परमेश्वराच्या कृपेनेच गरोदर राहिली असे दिसून येते. ॥२४॥

(२५) मग अब्राहमने भल्या पहाटे उठून भाकरी व पाण्याची पखाल घेतली व ती हाजिराच्या खांद्यावर ठेवली आणि मुलगाही तिच्या स्वाधीन करून तिला रवाना केले ... तिने त्या मुलाला एका झुडुपात टाकून दिले. ... आणि ती त्याच्या समोर बसून जोरजोरात आक्रोश करू लागली. ... तेव्हा ईश्वराने त्या मुलाचा शब्द ऐकला. -'उत्पत्ति', अ. २१,ओ.१४-१७.

**(समीक्षक)** आता पाहा ! ख्रिस्ती लोकांच्या ईश्वराची लीला. साराचा पक्ष घेऊन त्याने हाजिराला तेथून हाकलून लावले. जोरजोरात आक्रोश केला हाजिराने आणि देवाने शब्द ऐकला मुलाचा. ही किती विचित्र गोष्ट आहे ! बहुधा हे मुलाचेच रडणे असावे असा ईश्वराला भ्रम झाला असावा. असला हा प्राणी कधी ईश्वर असू शकेल काय ? आणि बायबल हा ईश्वरी ग्रंथ होऊ शकतो काय ? त्या पुस्तकात सामान्य माणसाच्या वचनाशिवाय दुसरे काही नाही. त्यात थोडेसे सत्य पण सर्व नरर्थक गोष्टीच भरल्या आहेत. ॥२५॥

(२६) आणि या गोष्टीनंतर असे झाले की ईश्वराने अब्राहमची परीक्षा पाहिली आणि त्याला म्हटले की, "हे अब्राहम ... इसहाक या तुझ्या एकुलत्या पुत्रावर तू खूप प्रेम करतोस. त्याला घेऊन ते मोरिया देशात जा

आणि तेथील मी सांगेन त्या एका डोंगरावर त्याचा होम कर.'' ... त्याप्रमाणे अब्राहमने आपला मुलगा इसहाक याला बांधून लाकडाच्या वेदीवर ठेवले. ... मग अब्राहमने हातात सुरा घेऊन आपल्या मुलावर त्याचा वार करण्यासाठी त्याने हात वर उचलला ... तेव्हा परमेश्वराच्या दूताने स्वर्गातून त्याला ओरडून सांगितले की, ''अब्राहम, अब्राहम ! तू आपल्या मुलावर हात टाकू नकोस. त्याला काही करू नकोस. कारण तू ईश्वराला भितोस हे आता मला समजले आहे.'' -'उत्पत्ति', अ. २२, ओ. १,२,९-१२.

**(समीक्षक)** आता स्पष्ट झाले की हा बायबलातील ईश्वर सर्वज्ञ नसून अल्पज्ञ आहे आणि अब्राहमही एक भोळाभाबडा माणूस होता. तसे नसते तर त्याने जे केले ते केले नसते आणि जर बायबलातला ईश्वर सर्वज्ञ असता तर अब्राहमच्या भविष्यातील श्रद्धेचे ज्ञान जाणले असते. यावरून ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञ नाही याची खात्री पटते. ॥२६॥

(२७) म्हणून तुम्ही आमच्या कबरीपैकी एक निवडून तिच्यात तुम्ही आपल्या मृत व्यक्तीला पुरा... परंतु तुम्ही मृत माणसाला पुरावे हे बरे. -'उत्पत्ति', अ.२३, ओ. ६.

**(समीक्षक)** प्रेते पुरण्याने जगाचे फार नुकसान होते. कारण ती कुजून वातावरण दुर्गंधयुक्त होते आणि रोग पसरतात.

**(प्रश्न)** पाहा ! ज्याच्यावर आपले प्रेम असते त्याला जाळणे ही चांगली गोष्ट नाही. प्रेताला पुरणे म्हणजे जणू त्याला झोपविण्यासारखे असते. म्हणून प्रेत पुरणेच योग्य होय.

**(उत्तर)** प्रेतावर तुमचे इतके प्रेम असेल तर ते आपल्या घरातच का ठेवून घेत नाही ? आणि ते पुरता तरी कशाला ? ज्या जीवात्म्यावर प्रेम होते तो तर निघून गेला. आता दुर्गंधी मातीवर कसले प्रेम ? आणि त्याच्यावर तुम्ही प्रेम करता तर त्याला जमिनीत कशाला पुरता ? कारण एखाद्याला कोणी म्हटले की, ''मी तुला जमिनीत पुरून टाकतो'' तर ते ऐकून तो कधीच आनंदित होत नाही. त्याचे तोंड, डोळे, शरीर यांवर माती, दगड, विटा, चुना टाकणे, छातीवर भला मोठा दगड ठेवणे हे काय प्रेमाचे लक्षण म्हणावयाचे ? आणि पेटीत घालून पुरल्याने दुर्गंध निर्माण होतो तो जमिनीतून बाहेर पडून सारे वातावरण दूषित करतो; आणि त्यातून भयंकर रोग निर्माण होतात. दुसरी गोष्ट अशी की एक प्रेत पुरण्यासाठी कमीत कमी ६ हात लांब व ४ हात रुंद जमीन लागते. या हिशेबाने शेकडो, हजारो, लाखो किंवा करोडो माणसांसाठी कितीतरी जमीन निष्कारण गुंतून पडते. ती शेत, बाग किंवा वसाहत करण्यासाठी वापरता येत नाही. म्हणून प्रेत पुरणे ही सर्वात अधिक वाईट गोष्ट आहे. तिच्याहून थोडी कमी वाईट गोष्ट म्हणजे प्रेत पाण्यात टाकणे ही होय. कारण पाण्यातील जलचर जरी ते ताबडतोब फाडून खात असले तरी त्यांची हाडे व इतर घाण पदार्थ पाण्यातच राहतात आणि तेथे त्या कुजून जगाच्या दु:खाला कारणीभूत होतात. त्याहून आणखी थोडी कमी वाईट गोष्ट प्रेत जंगलात नेऊन टाकणे ही होय. तेथील मांसाहारी पशुपक्षी ते प्रेत फाडून खातील. तथापि त्याची हाडे, हाडांतील मज्जा व इतर घाण पदार्थ सर्वत्र पसरेल व तेवढ्या प्रमाणात जगाचे अकल्याणच होईल. म्हणून प्रेत जाळणे ही सर्वोत्तम गोष्ट होय. कारण त्यायोगे शरीरातील सर्व पदार्थ अणुरेणू बनून हवेत उडून जातील.

**(प्रश्न)** प्रेत जाळण्यानेही दुर्गंध पसरतो.

**(उत्तर)** जर ते अशास्त्रीय पद्धतीने जाळले तर थोडा दुर्गंध पसरतो. परंतु पुरणे वगैरे क्रियांतून उत्पन्न होणाऱ्या दुर्गंधापेक्षा तो पुष्कळच कमी असतो. परंतु वेदांत सांगितल्याप्रमाणे प्रेताचे विधिपूर्वक दहन केल्यास मुळीच दुर्गंध उत्पन्न होणार नाही. वेदात सांगितलेला विधी असा आहे :-

जमिनीमध्ये तीन हात खोल, साडेतीन हात रुंद व पाच हात लांब अशी वेदी(खड्डा) तयार करावी. या वेदीच्या भिंती (बाजू) अशा उतरत्या असाव्यात की तळाशी वेदीची रुंदी वरच्या रुंदीच्या निम्मी म्हणजे पावणे दोन हात असावी. त्यात शरीराच्या वजनाइतके तूप घालावे. एका शेराला गुंजभर कस्तुरी व एक मासा केशर या हिशेबाने केशर व कस्तुरी त्यात टाकावी. नंतर कमीत कमी अर्धा मण आणि जास्तीत जास्त कितीही चंदनाची लाकडे घालावीत. अगर, तगर, कापूर इत्यादी सुगंधी पदार्थ आणि पळस वगैरेची लाकडे त्या वेदीत भरावीत किंवा रचावीत. त्यावर प्रेत ठेवून पुन: वेदीच्या मुखापासून एक वीतभर उंच लाकडे चारी बाजूंनी रचावीत. त्यावर तुपाच्या आहुती देऊन अग्निसंस्कार करावा असे वेदात लिहिले आहे. या पद्धतीने प्रेत जाळल्यास मुळीच दुर्गंध पसरणार नाही. या संस्कारालाच अंत्येष्टी, नरमेध किंवा पुरुषमेध यज्ञ असे नाव आहे. माणूस दरिद्री असला तरी त्याने चितेमध्ये वीस शेराहून कमी तूप घालता कामा नये. त्यासाठी त्याला भीक मागावी लागली तरी हरकत नाही. त्याच्या जातीवाल्यांकडून किंवा राजाकडून त्याला एवढे तूप मिळाले पाहिजे. ते कसेही असले तरी याचप्रकारे दहन करावे. काही कारणाने चंदन, तूप, केशर, कस्तुरी वगैरे पदार्थ मिळू शकले नाहीत तर प्रेत पुरण्यापेक्षा नुसत्या लाकडांनी प्रेताचे दहन करणे उत्तम आहे. कारण सव्वा वीस चौरस वार (गज)जमिनीवर किंवा एका वेदीमध्ये लाखो करोडो प्रेते जाळता येतात. प्रेत पुरल्याने जमीन जशी वाया जाते तशी ती दहनाने वाया जात नाही. शिवाय कबरी किंवा थडगी पाहिली की मनात भीती उत्पन्न होते. म्हणून प्रेते पुरणे वगैरे सर्वथा निषिद्ध होय. ॥२७॥

(२८) माझा मालक अब्राहम याचा ईश्वर धन्य आहे. कारण ज्याने माझ्या मालकावर आपली दया केली आणि त्याच्याशी सत्याने वर्तन करणे सोडले नाही. मी वाटेवर असताना त्याने मला माझ्या धन्याच्या भावांचे घर दाखविण्यात माझ्यापुढे होऊन मार्ग दाखविला. -'उत्पत्ति', अ.२४ ओ. २७.

**(समीक्षक)** तो अब्राहमचाच ईश्वर होता काय ? ज्याप्रमाणे आजकाल जसा एखादा बिगारी किंवा वाटाड्या लोकांच्या पुढे चालत जाऊन त्यांना वाट दाखवितो तसेच ईश्वराने केले असेल तर तो आता मार्ग का दाखवित नाही ? आणि तो माणसांशी का बोलत नाही ? म्हणून या साऱ्या गोष्टी ईश्वराच्या किंवा ईश्वरी ग्रंथाच्या असू शकत नाहीत. त्या तर जंगली माणसाच्या गोष्टी आहेत. ॥२८॥

(२९) इस्माईलच्या मुलांची नावे त्यांच्या पिढ्यांनुसार अशी आहेत :- इस्माईलचा पहिला मुलगा नबजोत (नबीत) आणि केदार, अदबील व मिबसाम, मिश्मा, दुमाह, मस्सा, हदर, तेमा, जेतूर, नफीस आणि किदीमह. -'उत्पत्ति', अ.२५, ओ. १३-१५.

**(समीक्षक)** हा इस्माईल अब्राहमच्या पत्नीपासून नव्हे तर त्याची दासी हाजिरा हिच्यापासून झालेला दासीपुत्र होता. ॥२९॥

(३०) मी तुझ्या बापासाठी त्याच्या आवडीचे स्वादिष्ट भोजन तयार करीन. ते तू आपल्या बापाकडे घेऊन जा. म्हणजे तो खाईल आणि स्वतः मरण्यापूर्वी तुला आशीर्वाद देईल आणि रेबेकाने आपला थोरला मुलगा एसौ याची जी उंची वस्त्रे तिच्याजवळ घरात होती ती काढून आपला धाकटा मुलगा याकूब (जेकब) याच्या अंगात घातली आणि बकरीच्या पिलांची कातडी त्याच्या हातांभोवती व मानेच्या गुळगुळीत भागाभोवती गुंडाळली. तेव्हा याकूब आपल्या बापाला म्हणाला, "मी तुमचा थोरला मुलगा एसौ आहे. तुमच्या सांगण्याप्रमाणे मी केले आहे. कृपा करून उठून बसा आणि मी शिकार करून आणलेले मांस खा; म्हणजे तुमचा आत्मा मला आशीर्वाद देईल." -'उत्पत्ति',अ.२७, ओ.९,१०,१५,१६,१९.

**(समीक्षक)** पाहा ! अशा लबाडीने व कपटाने आशीर्वाद मिळवून हे लोक सिद्ध व पैगंबर बनतात. ही आश्चर्याची गोष्ट नाही काय ? आणि असे होते खिस्ती लोकांचे अग्रसर तेव्हा त्यांच्या पंथात काय कमी सावळा गोंधळ असेल ? ॥३०॥

(३१) आणि याकूब भल्या पहाटे उठला आणि त्याने उशाला जो दगड घेतला होता तो खांबासारखा उभा करून ठेवला आणि त्याच्या माथ्यावर तेल घातले. त्याने त्या स्थानाचे नाव बेथेल (बैतुल) असे ठेवले. आणि हा जो धोंडा मी खांबासारखा उभा केला आहे तो देवाचे घर होईल. -'उत्पत्ति', अ. २८, ओ.१८,१९,२२.

**(समीक्षक)** आता हे जंगली लोकांचे काम पाहा. यांनी दगडधोंडे पुजले आणि पुजविले. याला मुसलमान लोक 'बैतुल मुकद्दस' (पवित्र घर) म्हणतात. हाच दगड ईश्वराचे घर होते काय ? आणि त्या दगडातच ईश्वर राहत होता काय ? वाहवा ! तुम्हाला काय म्हणावे खिस्ती लोकांनो ? सर्वात मोठे मूर्तिपूजक तर तुम्हीच आहात. ॥३१॥

(३२) आणि ईश्वराने राहिला (राचेल) चे स्मरण केले आणि ईश्वराने तिचे म्हणणे ऐकले आणि तिची कूस उघडली आणि ती गरोदर राहिली. तिने एका पुत्राला जन्म दिला. ती म्हणाली, "देवाने माझे दूषण (दोष) दूर केले." -'उत्पत्ति', अ. ३०, ओ.२२,२३.

**(समीक्षक)** छान ! हे खिस्त्यांच्या ईश्वरा, तू फार मोठा डॉक्टर दिसतोस ! स्त्रियांची कूस उघडण्यासाठी तुझ्याजवळ कोणती शस्त्रे अथवा औषधे होती ? खरे म्हणजे या सगळ्या अंधाधुंद आहेत. ॥३२॥

(३३) परंतु ईश्वर अरामी (सीरियन) लाबान याच्याकडे रात्री स्वप्नात आला आणि त्याला म्हणाला, "नीट लक्षात ठेव. तू याकूबशी बरे किंवा वाईट काहीच करू नकोस. कारण तू तुझ्या बापाच्या घराची फार अभिलाषा बाळगली आहेस. तरीपण तू माझे देव का चोरलेस ?" -'उत्पत्ति', अ.३१, ओ.२४-३०.

**(समीक्षक)** आम्ही हे केवळ नमुन्यादाखल लिहिले आहे. बायबलात असे सांगितले आहे की ईश्वर हजारो लोकांच्या स्वप्नात आला, त्यांच्याशी बोलला, जागेपणी प्रत्यक्ष भेटला, आला, गेला, त्याने खाणे-पिणे केले. परंतु आता तो आहे की नाही, कोण जाणे ! कारण आता ईश्वर कोणालाही स्वप्नात अथवा जागेपणीही

भेटत नाही. हे जंगली लोक दगडादिकांच्या मूर्तींना देव मानून पुजत होते, असेही दिसून येते. परंतु ख्रिस्त्यांचा ईश्वर सुद्धा दगडालाच देव मानतो एव्ही देवांची चोरी कशी होऊ शकते. ॥३३॥

(३४) आणि याकूब आपल्या वाटेने निघून गेला आणि ईश्वराचे दूत त्याला भेटले. त्यांना पाहून याकूब म्हणाला, ''हे देवाचे सैन्य आहे.'' -'उत्पत्ति', अ. ३२, ओ. १,२.

**(समीक्षक)** आता मात्र ख्रिश्चनांचा ईश्वर माणूसच आहे याविषयी मुळीच शंका उरली नाही. कारण तो सैन्यही बाळगतो. सैन्य आहे म्हणजे शस्त्रेही असणार आणि जेथे-तेथे चढाई करून लढाई देखील तो करीत असणार. नाहीतर सैन्य ठेवण्याचे काय प्रयोजन ? ॥३४॥

(३५) मग याकूब एकटा राहिला आणि तेथे पहाट होईपर्यंत एक जण त्याच्याशी मल्लयुद्ध करीत राहिला आणि आपण त्याच्यावर जय मिळवू शकत नाही हे पाहून त्याने याकूबच्या मांडीच्या आतील भागाला स्पर्श केला. तेव्हा त्याच्याशी झोंबाझोंबी करताना याकूबच्या मांडीचा खळगा (सांधा) उखडला. तेव्हा तो म्हणाला, ''पहाट झाली. मला जाऊ दे.'' पण याकूब म्हणाला, ''जोपर्यंत तू मला आशीर्वाद देणार नाहीस तोपर्यंत मी तुला जाऊ देणार नाही.'' मग त्याने विचारले, ''तुझे नाव काय ?'' तेव्हा तो म्हणाला, ''याकूब'' तेव्हा तो म्हणाला की, ''यापुढे तुझे नाव याकूब असे राहणार नाही. लोक तुला इसराईल म्हणतील. कारण तू ईश्वराशी व माणसांशी राजाप्रमाणे मल्लयुद्ध केलेस व त्यात तू विजयी झालास.'' तेव्हा याकूब त्याला म्हणाला, ''कृपा करून मला तुमचे नाव सांगा.'' तेव्हा तो म्हणाला, ''तू माझे नाव कशाला विचारतोस ?'' आणि त्याने याकूबला आशीर्वाद दिला ... आणि याकूबने त्या स्थानाचे नाव 'पॅनिएल' असे ठेवले. कारण 'मी ईश्वराला प्रत्यक्ष पाहिले आणि माझा प्राण वाचला आहे.' ... आणि जेव्हा तो पॅनिएलच्या पलीकडे निघाला तेव्हा सूर्याचा प्रकाश त्याच्यावर पडला. तो आपल्या मांडीतून लंगडत होता. ... म्हणून इसराईलच्या वंशातील लोक त्या मांडीतील जी घोडशीर लचकली होती ती आजपर्यंत खात नाहीत. कारण त्याने याकूबच्या मांडीतील लचकलेल्या घोडशिरेला स्पर्श केला होता... (उ.अ.३२, ओ.२४-३२.)

**(समीक्षक)** ख्रिस्त्यांचा ईश्वर असा आखाड्यात कुस्ती करणारा मल्ल आहे. म्हणून तर सारा आणि राहिला यांना पुत्रवती बनविण्याची कृपा त्याने केली. असला कधी ईश्वर असू शकतो काय ? त्याची आणखी लीला पाहा ! एक जण नाव विचारतो तर दुसरा आपले नावच सांगत नाही आणि ईश्वराने त्याच्या मांडीतील नाडी चढविली आणि तो विजयी झाला. परंतु तो डॉक्टर असता तर त्याने मांडीची नाडी बरी केली असती. अशा या ईश्वराच्या भक्तीमुळे जसा याकूब लंगडत राहिला तसे इतर भक्तही लंगडत असतील. याकूबने ईश्वराला प्रत्यक्ष पाहिले आणि त्याच्याशी मल्लयुद्धही केले. ही गोष्ट ईश्वर शरीरधारी नसता तर कशी घडली असती ? हा सगळाच पोरकटपणाचा खेळ आहे. ॥३५॥

(३६) ईश्वराचे तोंड पाहिले. -'उत्पत्ति', अ. ३३, ओ. १०.

**(समीक्षक)** जर ईश्वराला तोंड असेल तर त्याला इतरही सगळे अवयव असतील आणि त्याला जन्ममरणही असणार. ॥३६॥

(३७) आणि यहूदाचा पहिला मुलगा एर परमेश्वराच्या दृष्टीने दुष्ट होता. म्हणून परमेश्वराने त्याला मारून टाकले. तेव्हा यहूदाने ओनानाला सांगितले की, "तू आपल्या भावाच्या बायकोजवळ जा. तिच्याशी लग्न कर आणि आपल्या भावासाठी संतती उत्पन्न करून त्याचा वंश चालव." ... तेव्हा ओनानाने हे जाणले की हा वंश आपला असणार नाही. म्हणून तो आपल्या भावाच्या बायकोजवळ गेला आणि त्याने आपले वीर्य भावासाठी देण्याऐवजी जमिनीवर सांडले. त्याचे हे कृत्य परमेश्वराच्या दृष्टीने वाईट होते. म्हणून त्याने ओनानालाही मारून टाकले. -'उत्पत्ति', अ. ३८, ओ.७-१०.

**(समीक्षक)** आता पाहा ! ही कृत्ये माणसांची आहेत की ईश्वराची ? वस्तुत: ईश्वराच्या आज्ञेनेच आपल्या भावजयीशी त्याने नियोग केला होता. मग त्याला त्याने जिवे का मारले ? त्याला ईश्वराने सद्बुद्धी का दिली नाही ? वेदोक्त नियोगही पूर्वी सर्वत्र चालत होता. यावरून हे सिद्ध होते की नियोग पद्धती सर्व देशात रूढ होती. ॥३७॥

## जुना करार 'निर्गम' चे पुस्तक
## अज्ञानी व भांडखोर मोझेस

(३८) जेव्हा मूसा (मोझेस) सज्ञान झाला तेव्हा तो आपल्या भाऊबंदांकडे गेला. तेथे त्याने त्यांची कष्टाची कामे पाहिली. एक मिसरी (ईजिप्शियन) माणूस आपल्या भावांपैकी कतएका इबरानी (हिब्रू) इसमाला मारीत असलेला त्याला दिसला. ... तेव्हा त्याने इकडे तिकडे नजर फिरवून कोणी नाही असे पाहिले आणि त्या मिसरी माणसाला ठार मारले आणि त्याला वाळूत लपविले. ...दुसऱ्या दिवशी तो बाहेर गेला तेव्हा दोन इबरानी आपापसात मारामारी करीत असलेले त्याला दिसले. तेव्हा ज्याने अपराध केला होता त्याला तो म्हणाला, "तू आपल्या शेजाऱ्याला का मारतोस ?" ... तेव्हा त्याने विचारले, "तुला आमच्यावर राजा किंवा न्यायाधीश म्हणून कोणी नेमले ? तू त्या मिसरी माणसाला जसे ठार मारलेस तसेच मलाही मारून टाकावे अशी तुझी इच्छा आहे काय ?" तेव्हा मूसा घाबरला व पळून गेला. -'निर्गम',अ. २, ओ.११-१५.

**(समीक्षक)** आता पाहा ! मूसा हा बायबलातील प्रमुख पैगंबर (प्रेषित) असून तोच या पंथाचा संस्थापक ज्याचे चरित्र क्रोधादी विकारयुक्त मानवाची हत्या करणारा आणि चोराप्रमाणे राजदंडापासून वाचणारा होता. आपण केलेले कृत्य तो लपवीत होता. म्हणजे तो नक्कीच खोटे बोलणाराही असणार. अशा माणसालाही ईश्वर भेटला. तो पैगंबर बनला. त्याने यहुदी पंथाची स्थापना केली. त्याचा तो पंथही मूसासारखा बनला. म्हणूनच खिस्ती लोकांचे मूसापासून पुढे जे पैगंबर झाले ते ज्ञानी नसून जंगली होते. ॥३८॥

(३९) जेव्हा परमेश्वराने पाहिले की मूसा आपल्याकडे येत आहे तेव्हा तो झाडीच्या मागून त्याला म्हणाला, "मूसा अरे मूसा !" तेव्हा तो म्हणाला, "मी इथे आहे." ... मग त्याने सांगितले की, "इकडे माझ्याजवळ येऊ नको. आपल्या पायांतील पादत्राणे काढून ठेव. कारण ज्या ठिकाणी तू उभा आहेस ती पवित्र भूमी आहे." -'निर्गम', अ.३, ओ. ४-५.

**(समीक्षक)** पाहा ! जो माणूस दुसऱ्या माणसाला मारून वाळूत पुरून टाकतो त्याच्याशी ईश्वराची मित्रता

आणि त्या माणसाला ते पैगंबर मानतात. आणखी असे पाहा की तुमच्या ईश्वराने पवित्र स्थानी पादत्राणे घालून जाता कामा नये असे मूसाला सांगितले होते. मग तुम्ही ख्रिस्ती लोक या आज्ञेच्या विरुद्ध आचरण का करता ?

**(प्रश्न)** आम्ही पादत्राणांऐवजी टोपी काढतो.

**(उत्तर)** हा दुसरा अपराध तुम्ही करता. कारण टोपी काढावी असे ईश्वराने सांगितलेले नाही अथवा तुमच्या मतग्रंथातही लिहिलेले नाही. जे काढावयास हवे ते काढीत नाही आणि जे काढता कामा नये ते काढता. या दोन्ही गोष्टी तुमच्या मतपुस्तकाच्या विरुद्ध आहेत.

**(प्रश्न)** आमच्या युरोपात थंडी फार असते. म्हणून आम्ही पादत्राणे काढीत नाही.

**(उत्तर)** डोक्याला थंडी लागत नाही काय ? आणि असेच असेल तर जेव्हा युरोपात जाल तेव्हा तसे करा. परंतु जेव्हा तुम्ही आमच्या घरी येता किंवा झोपण्याच्या खोलीत येता तेव्हा तरी पादत्राणे काढीत जा. तसे न कराल तर तुम्ही बायबलच्या आज्ञेविरुद्ध वागता असे म्हणावे लागेल. तसे तुम्ही करता कामा नये.

(४०) तेव्हा ईश्वराने त्याला म्हटले की, ''तुझ्या हातात हे काय आहे ?'' तो म्हणाला, ''ती छडी आहे.'' तेव्हा ईश्वराने सांगितले की, ''ती जमिनीवर टाकून दे.'' त्याने ती जमिनीवर टाकली. त्याबरोबर ती साप बनली आणि मूसा त्याच्या समोरून पळू लागला. ... तेव्हा परमेश्वराने मूसाला सांगितले की, ''आपला हात पुढे कर आणि त्या सापाची शेपटी पकड.'' त्याप्रमाणे मूसाने आपला हात पुढे करून सापाची शेपटी पकडली. त्याबरोबर पुनः त्याच्या हातात ती छडी बनली. ... तेव्हा परमेश्वराने त्याला सांगितले की, ''आता तू आपला हात काखेत घाल.'' त्याप्रमाणे त्याने आपला हात आपल्या काखेत घातला. जेव्हा त्याने आपला हात बाहेर काढला तेव्हा तो बर्फासारखा कोडाने भरलेला असल्याचे त्याला दिसले. ... आणि परमेश्वराने त्याला सांगितले की, ''तू आपला हात पुनः काखेत घाल.'' त्याने पुनः आपला हात आपल्या काखेत घातला आणि जेव्हा त्याने तो बाहेर काढला तेव्हा तो आपल्या इतर शरीरासारखा पूर्ववत झाल्याचे त्याला दिसून आले. ... ''तू नील (नाईल) नदीचे पाणी घेऊन कोरड्या जमिनीवर टाक. तू नदीतून जे पाणी बाहेर काढशील ते कोरड्या जमिनीवर पडताच त्याचे रक्त होईल.'' -'निर्गम', अ. ४,ओ.२-४,६,७,९.

**(समीक्षक)** आता पाहा ! हा जणू जादूचा खेळ, ईश्वर जादूगार, मूसा त्याचा सेवक आणि या गोष्टींवर विश्वास ठेवणारे लोक कसे आहेत ? आजकालचे जादूगार याहून कमी करामती करतात काय ? हा कसला ईश्वर ? तो तर जादूगार आहे. या गोष्टींवर विद्वान् लोक कसा विश्वास ठेवतील ? आणि दर खेपेस तो म्हणतो की, ''मी परमेश्वर आहे. मी अब्राहम, इसहाक आणि याकूब यांचा ईश्वर आहे.'' अशा प्रकारे प्रत्येकाजवळ तो आपल्या तोंडाने स्वतःचीच प्रशंसा करीत फिरतो. हे कृत्य सज्जनाचे असू शकत नाही. ढोंगी माणूसच अशी आत्मस्तुती करीत असतो. ॥४०॥

(४१) मग मूसाने इसराईलच्या सर्व वडील माणसांना बोलावून सांगितले की, ''तुम्ही आपापल्या कुटुंबाप्रमाणे मेंढरे काढून घ्या आणि वल्हांडण सणासाठी कापा आणि जुफ झाडाची जुडी घेऊन भांड्यातल्या रक्तात बुचकळून ते रक्त दाराच्या चौकटीच्या वरच्या पट्टीवर फासा आणि ते रक्त चौकटीच्या दोन्ही बाजूंवर

लावा आणि तुमच्यापैकी कोणी सकाळ होईपर्यंत घराच्या दाराबाहेर पडू नका. कारण परमेश्वर मिसरी लोकांना मारण्यासाठी तुमच्या दारांवरून जाणार आहे. तो तुमच्या दाराच्या चौकटीवरील आणि दोन्ही बाजवांवरील रक्त पाहून दारावरून पुढे निघून जाईल; आणि नाश करणाऱ्या लोकांना तुम्हाला मारण्यासाठी तुमच्या घरात शिरू देणार नाही.'' -'निर्गम', अ.१२, ओ.२१-२३.

**(समीक्षक)** हा जो जादूटोणा करणाऱ्यासारखा ईश्वर आहे तो कधीतरी सर्वज्ञ असू शकेल काय ? दाराच्या चौकटीवर रक्ताचा छाप पाहिला तरच ते इसराइली माणसाचे घर आहे अन्यथा नाही. हे काम क्षुद्र बुद्धीच्या माणसाच्या कृत्यासारखे आहे. यावरून हे लक्षात येते की या गोष्टी एखाद्या जंगली माणसाने लिहून ठेवल्या असाव्यात. ॥४१॥

(४२) मग असे झाले की परमेश्वराने मध्यरात्री मिसर देशातील सर्व प्रथम जन्मलेल्या मुलांना मारून टाकले. आपल्या राजसिंहासनावर बसणाऱ्या फारोहाच्या ज्येष्ठ पुत्रापासून बंदी गृहात असलेल्या कैद्याच्या थोरल्या मुलापर्यंत, एवढेच नव्हे तर गुराढोरांची पहिली वासरेही मारुन टाकली. तेव्हा रात्री फारोहा उठला. त्याचे सगळे नोकर-चाकर आणि सर्व मिसरी लोक जागे झाले आणि मिसर देशात मोठा हाहाकार उडाला. ज्या घरातील एकही माणूस मेले नव्हते असे घर उरले नाही. -'निर्गम', अ.१२, ओ.२९-३०.

**(समीक्षक)** छान ! मध्यरात्री एखाद्या दरोडेखोराप्रमाणे निर्दय बनून ख्रिस्त्यांच्या ईश्वराने मुले-बाळे, म्हातारे-कोतारे व गुरेढोरेही त्यांचा काही अपराध नसताना मारून टाकले. त्याला मुळीच दया आली नाही. मिसर देशामध्ये एवढा विलाप चालू होता तरीही ख्रिस्त्यांच्या ईश्वराच्या अंत:करणातून निष्ठुरता नष्ट झाली नाही. ईश्वरच काय पण कोणी सामान्य माणूसही असले क्रौर्य करणार नाही. परंतु हे आश्चर्य नाही. कारण असे लिहिलेच आहे की, 'मांसाहारिण: कुतो दया' ख्रिस्त्यांचा ईश्वर मांसाहारी असल्यामुळे त्याचा दयेशी काय संबंध ? ॥४२॥

(४३) परमेश्वर तुमच्यासाठी युद्ध करील. इसराईलच्या मुलांना सांग की, ''पुढे चला.' परंतु तू आपली काठी वर उचल आणि आपला हात समुद्रावर लांब करून समुद्राचे दोन भाग कर. मग इसराईलची मुले समुद्राच्या मधोमध बनलेल्या कोरड्या जमिनीवरून चालत जातील. - 'निर्गम', अ.१४, ओ.१४-१६.

**(समीक्षक)** काय महाराज ? जुन्या काळी मेंढरांच्या मागून धनगर चालतो तसा ईश्वर इसराईलच्या मुलांच्या मागे मागे डुलत होता. आता तो कोठे अंतर्धान पावला कोण जाणे ! तसे नसते तर त्याने समुद्रातून चारी बाजूंना आगगाड्यांचे रूळ टाकले असते व त्यामुळे जगाचे कल्याण झाले असते आणि नावा वगैरे बनविण्याचे श्रम वाचले असते. पण काय करावे ? ख्रिस्ती लोकांचा ईश्वर कुठे दडून बसला आहे कोण जाणे ! बायबलमधील ईश्वराने मोझेसच्या बाबतीत अशा अनेक असंभव गोष्टी केल्या आहेत. परंतु त्यावरून एवढेच दिसून आले की ख्रिस्ती लोकांचा ईश्वर जसा आहे तसेच त्याचे भक्त आहेत आणि तसाच त्याने रचलेला धर्मग्रंथ आहे. असला ग्रंथ आणि असला ईश्वर आम्हा लोकांपासून दूर राहिलेलाच बरा. ॥४३॥

(४४) कारण की, मी परमेश्वर, तुझा ईश्वर दैदिप्यमान व सर्वशक्तिमान आहे. पितरांच्या अपराधाची शिक्षा, त्यांच्या मुलांना. जे माझ्याशी वैर बाळगतात, त्यांच्या तिसऱ्या व चौथ्या पिढीपर्यंत देणारा आहे.

**(समीक्षक)** बापाने केलेल्या अपराधाबद्दल त्याच्या चार पिढ्यांतील वंशजांना शिक्षा देणे हे चांगले आहे असे समजणे हा कुठला न्याय ? चांगल्या बापाला वाईट मुले आणि दुष्ट बापाला सज्जन मुले होत नाहीत काय? असे असल्यामुळे तो चवथ्या पिढीपर्यंतच्या मुलाबाळांना तो कशी शिक्षा करू शकतो? आणि पाचव्या पिढीपासून नंतर जो कोणी दुष्ट निर्माण होईल त्याला तो शिक्षा करू शकणार नाही. अपराध नसताना कोणालाही शिक्षा देणे ही अन्यायकारी गोष्ट आहे. ॥४४॥

## ईश्वराचा विश्रामदिन

(४५) सब्बाथ हा विश्रांतीचा दिवस पवित्र राहावा म्हणून त्याचे स्मरण कर. ... तू सहा दिवस परिश्रम कर. ... परंतु सातवा दिवस तुझा देव परमेश्वर याच्या विसाव्याचा दिवस आहे. ... परमेश्वराने सब्बाथच्या दिवसाला आशीर्वाद दिला. -'निर्गम', अ.२०, ओ.८-११.

**(समीक्षक)** रविवार हा एकच पवित्र आणि सहा दिवस अपवित्र आहेत ? आणि परमेश्वराने सहा दिवस खूप परिश्रम केले होते म्हणून तो थकून सातव्या दिवशी झोपी गेला काय ? आणि जर रविवारला आशीर्वाद दिला तर सोमवार वगैरे इतर ६ वारांना काय दिले ? अर्थात शाप दिला असणार ! असले कृत्य कोणताही विद्वान करणार नाही. मग ते ईश्वराचे कसे असू शकेल ? रविवारमध्ये असे कोणते गुण होते आणि सोमवार वगैरे इतर दिवसांमध्ये कोणते दोष होते, की ज्यामुळे एकाला पवित्र ठरवून देवाने आशीर्वाद दिला; आणि इतर वारांना उगीचच अपवित्र ठरविले ? ॥४५॥

(४६) आपल्या शेजाऱ्याविषयी खोटी साक्ष देऊ नकोस. ... शेजाऱ्याची बायको, त्याचे दास-दासी, त्याचे बैल व गाढवे अथवा त्याची कोणतीही वस्तू यांविषयी तू अभिलाषा बाळगू नकोस किंवा लोभ धरू नकोस. -'निर्गम', अ.२०,ओ.१६-१७.

**(समीक्षक)** वाहवा, म्हणून तर ख्रिस्ती लोक परदेशी लोकांच्या मालमत्तेवर असे तुटून पडतात जसे तहानलेला माणूस पाण्यावर आणि उपाशी माणूस अन्नावर. ही जशी केवळ मतलब साधूपणाची आणि पक्षपाताची गोष्ट (आज्ञा) आहे तसाच खिश्चनांचा ईश्वरही अवश्य असणार. जर आम्ही सर्व माणसांना शेजारी मानतो असे कोणी म्हणत असतील तर ज्यांना शेजारी म्हणता येत नाही अशा, शिवाय कोण स्त्रिया व दासी आहेत की त्यांना अशेजारी समजावे ? म्हणून या सगळ्या गोष्टी स्वार्थी माणसांच्या आहेत; ईश्वराच्या नव्हेत. ॥४६॥

(४७) जेव्हा कोणी एखाद्या माणसाला मारतो व तो माणूस मरतो तेव्हा त्या मारणाऱ्याला अवश्य मारून टाकावे. ... आणि तो माणूस मारला गेला नाही परंतु ईश्वराने त्याच्या हाती सोपविला असेल तर मी तुला पळून जाण्याचे ठिकाण दाखवीन. -'निर्गम', अ.२१, ओ.१२-१३.

**(समीक्षक)** जर हा ईश्वराचा न्याय खरा असेल तर मूसा एका माणसाला मारून, पुरून पळून गेला होता. त्याला ही शिक्षा का झाली नाही ? ईश्वराने त्या माणसाला मारण्यासाठीच मूसाच्या हाती सोपविले होते असे असेल तर ईश्वर पक्षपाती ठरतो. कारण त्या मूसाचा राजाकडून न्यायनिवाडा का होऊ दिला नाही ? ॥४७॥

(४८) आणि शांततेसाठी परमेश्वराच्या नावाने बैलांचे बलिदान केले. ... आणि मूसाने अर्धे रक्त घेऊन ते भांड्यात ठेवले आणि अर्धे रक्त वेदीवर शिंपडले... आणि मूसाने ते रक्त घेऊन लोकांवर शिंपडले आणि तो म्हणाला, ''या गोष्टींसाठी परमेश्वराने तुमच्याशी जो करार केला आहे त्याचे हे रक्त आहे.'' आणि परमेश्वराने मूसाला सांगितले की, ''तू डोंगरावर माझ्याजवळ ये; आणि तेथे राहा. मी तुला दगडाच्या लाद्या आणि मी लिहिलेले नियम व आज्ञा देईन.'' -'निर्गम', अ.२४, ओ.५,६,८,१२.

**(समीक्षक)** आता पाहा ! या सगळ्या जंगली लोकांच्या गोष्टी आहेत की नाहीत ? आणि परमेश्वराने बैलांचा बळी स्वीकारणे आणि वेदीवर रक्त शिंपडणे ही किती रानटीपणाची व असभ्यतेची गोष्ट आहे ! जर ख्रिस्त्यांचा परमेश्वर बैलांचे बलिदान घेतो तर त्याचे भक्त बैलांचे व गायींच्या बलिदानाचा प्रसाद घेऊन आपले पोट का भरणार नाहीत ? आणि जगाची हानि का करणार नाहीत ? असल्या वाईट वाईट गोष्टी बायबलात भरलेल्या आहेत. असले कुसंस्कारी लोक वेदांमध्येही या गोष्टी आहेत असा खोटा आरोप करू पाहतात. परंतु वेदांमध्ये असल्या गोष्टी नावालाही नाहीत. यावरून असा निश्चय होतो की ख्रिस्त्यांचा ईश्वर हा एक गिरीजन होता. तो डोंगरावर राहत होता. त्या परमेश्वराला शाई, लेखणी, कागद तयार करण्याची कला अवगत नव्हती. अथवा त्याला त्या गोष्टी प्राप्तही झालेल्या नव्हत्या. म्हणून शिळांच्या पाट्यावर तो मजकूर लिहून देत होता आणि आपल्या सारख्याच जंगली लोकांसमोर तो ईश्वरही बनून बसला होता. ॥४८॥

(४९) आणि म्हणाला, ''तू माझा चेहरा पाहू शकणार नाहीस. कारण मला पाहिल्यावर कोणीही माणूस जगणार नाही.'' आणि परमेश्वराने सांगितले, ''हे पाहा ! माझ्याजवळ एक ठिकाण आहे आणि तू त्या खडकावर उभा राहा.... मग असे होईल की जेव्हा माझे वैभव जवळून जाईल तेव्हा मी तुला खडकाच्या खोबणात ठेवीन आणि तेथून निघून जाईपर्यंत मी तुला माझ्या हाताने झाकून टाकीन... मग मी माझा हात काढून घेईन. तेव्हा तुला माझा मागचा भाग दिसेल. परंतु माझा चेहरा दिसणार नाही.'' -'निर्गम', अ.३३, ओ.२०-२३.

**(समीक्षक)** आता पाहा. ख्रिस्त्यांचा ईश्वर केवळ माणसासारखाच शरीरधारी होता आणि मूसाशी कपटीपणा करून तो स्वतःच कसा ईश्वर होऊन बसला, पाहा ! मूसाला फक्त मागची बाजूच दिसावी म्हणून त्याने त्याला हाताने झाकून टाकले की नसेल. जेव्हा परमेश्वराने आपल्या हाताने मूसाला झाकले असेल तेव्हा त्याच्या हाताचे रूप मूसाने पाहिले नसेल काय ? ॥४९॥

## जुना करार, लेवीय व्यवस्थेचे पुस्तक
## मांसाहारी ईश्वर

(५०) आणि परमेश्वराने मूसाला बोलावले आणि सभामंडपाच्या तंबूतून तो त्याला म्हणाला की, ''इसराईलच्या लेकरांशी बोल आणि त्यांना सांग, ''तुमच्यापैकी कोणी परमेश्वरासाठी भेटवस्तू आणणार असेल तर त्याने ती गुराढोरांपैकी म्हणजे गाय, बैल व शेळी-मेंढी यांपैकी आपली भेटवस्तू आणावी.''

-'लेवीय', अ.१, ओ.१,२.

**(समीक्षक)** आता तुम्हीच विचार करा ! ख्रिस्त्यांचा परमेश्वर गाय, बैल इत्यादी पशूंचे बळी घेणारा, आपल्यासाठी बलिदान करण्याचा उपदेश करणारा आणि गाय, बैल वगैरे पशूंच्या रक्तामांसाचा भुकेला व तहानलेला आहे की नाही ? म्हणून त्याला अहिंसक व ईश्वरी कोटीतील समजता येणार नाही. तो तर मांसाहारी संसारी माणसासारखा आहे. ॥५०॥

(५१) आणि त्याने तो बैल परमेश्वरासमोर मारावा; आणि पाद्री (उपाध्याय) असलेल्या हारूनच्या पुत्रांनी त्याचे रक्त आणावे आणि सभामंडपाच्या तंबूच्या दारात असलेल्या यज्ञवेदीच्या सभोवती ते शिंपडावे. ... नंतर त्याने बळी दिलेल्या बैलाचे कातडे काढावे; आणि त्या पशूचे तुकडे करावेत... आणि पाद्री असलेल्या हारूनच्या मुलांनी यज्ञवेदीवर अग्नी ठेवावा आणि त्यावर लाकडे रचावीत... आणि हारूनच्या पाद्री मुलांनी ते (मांसाचे) तुकडे, डोके व मांदे (चरबी) यज्ञवेदीच्या अग्नीवर रचलेल्या लाकडांवर विधिपूर्वक ठेवावे... मात्र त्याने त्या पशूची आतडी व पाय पाण्याने धुवावेत आणि ते जळण्यासाठी अग्नीत टाकावेत. परमेश्वराला सुगंध मिळावा म्हणून अग्नीद्वारे ही भेट दिली गेली असे स्पष्ट होईल. -'लेवीय', अ.१, ओ.५-९.

**(समीक्षक)** थोडा विचार करा ! परमेश्वराच्या भक्तांनी त्याच्या समोर बैल मारावा आणि परमेश्वराने त्याला तो मारू द्यावा. भक्तांनी त्या बैलाचे रक्त वेदीच्या चोहोबाजूला शिंपडावे, अग्नीत त्याचा होम करावा, त्याचा सुगंध ईश्वराने घ्यावा, हा सारा प्रकार कसायाच्या घरापेक्षा कमी खेळ आहे काय ? म्हणूनच बायबल हे ईश्वरकृत नाही असे ठरते आणि जंगली लोकांसारखी कृत्ये करणारा तो ईश्वर असू शकत नाही. ॥५१॥

(५२) मग परमेश्वर मूसाला असे म्हणाला, ''ज्याच्यावर अभिषेक करण्यात आला आहे असा तो पाद्री इतर लोक करतात तसेच पाप करील तर त्याने आपण केलेल्या पापाच्या निवृत्तीसाठी एक निर्दोष खोंड परमेश्वराकरिता आणावा ... त्याने तो खोंड सभामंडपाच्या तंबूच्या दाराजवळ परमेश्वरासमोर आणावा आणि आपला हात खोंडाच्या डोक्यावर ठेवावा; आणि परमेश्वरासमोर तो खोंड कापावा.'' -'लेवीय', अ.४, ओ.१,३,४.

**(समीक्षक)** आता पापापासून मुक्त होण्याचे प्रायश्चित्त. पाप स्वत: करावयाचे गाय वगैरे उत्तम पशूंची हत्या करावयाची आणि खुद्द परमेश्वरानेच ती करवून घ्यावयाची ! धन्य आहेत हे ख्रिस्ती लोक ! अशा गोष्टी करणाऱ्याला व करविणाऱ्यालाही ईश्वर मानून लोक आपल्या मुक्तीची आशा बाळगतात ? ॥५२॥

(५३) जेव्हा एखादा राज्यकर्ता पाप करतो तेव्हा त्याने बकऱ्यांपैकी निर्दोष नर (बकरा) बळी देण्यासाठी आणावा ... आणि तो परमेश्वरासमोर कापावा. पापाच्या निवृत्तीसाठी केलेले हे बलिदान आहे ... -'लेवीय', अ.४, ओ.२२-२४.

**(समीक्षक)** वाहवा ! असे असेल तर यांचे अध्यक्ष म्हणजे न्यायाधीश, सेनापती वगैरे पाप करायला कशाला भीत असतील ? स्वत: यथेच्छ पापे करावीत आणि त्यांचे प्रायश्चित्त म्हणून गाय, वासरू, बकरे वगैरे प्राण्याचा जीव घ्यावा की झाले ! म्हणूनच ख्रिस्ती लोक कोणत्याही पशूला अथवा पक्षाला ठार मारण्यास कचरत नाहीत. ख्रिस्ती लोकांनो, ऐका ! आता तरी हा जंगली पंथ सोडून सुसभ्य, धर्ममय, वेदमताचा स्वीकार करा. त्यानेच तुमचे कल्याण होईल. ॥५३॥

(५४) आणि जर त्याला बकरा आणता आला नाही तर त्याने आपण केलेल्या पापाच्या निवृत्तीसाठी दोन होले आणि पारव्याची दोन पिले परमेश्वराला अर्पण करण्यासाठी आणावीत. ... त्याने त्यांची मुंडी मुरगळावी पण त्यांचे मुंडके धडापासून वेगळे करू नये. ... त्याने आपल्या पापाबद्दल पश्चात्ताप करावा; मग त्याला क्षमा केली जाईल. ... परंतु त्याला दोन होले आणि कबुतराची दोन पिले मिळाली नाहीत तर त्याने शेरभर सपीठाचा दहावा भाग पापाचे प्रायश्चित्त म्हणून आणावा. त्यावर तेल घालू नये. ... आणि त्याला क्षमा केली जाईल. ... -'लेवीय', अ. ५, ओ.७, ८, १०, ११, ११३.

**(समीक्षक)** आता ऐका ! ईश्वराने पापाचे प्रायश्चित्त करणे इतके सोपे करून ठेवले आहे की ख्रिस्तीलोकांमध्ये श्रीमंत अथवा गरीब कोणीही पाप करण्यास भीत नसेल. ख्रिस्त्यांच्या बायबलातील ही मोठी अद्भुत गोष्ट आहे की कष्टाविना पापाने पापमुक्त व्हावे प्रथम पाप करायचे आणि मग त्या पापाच्या क्षालनासाठी प्राण्यांची हिंसा करावयाची, खूप मजेत मांस खायचे आणि तिकडे पापही नाहीसे व्हायचे ! छान ! पारव्याच्या पिलाची मान मुरगळल्याने ते बराच वेळपर्यंत तडफडत असणार. तरीही ख्रिस्ती लोकांना दया येत नाही. दया कशी येणार ? त्यांचा ईश्वर त्यांना उपदेशच हिंसा करण्याचा करतो. जर सर्व पापांचे असे प्रायश्चित्त तयार आहे तर मग येशूवर विश्वास ठेवल्याने पाप नष्ट होते असला दिखावा ते कशाला करतात ? ।।५४।।

(५५) जो याजक (उपाध्याय) ज्या कोणाचा होम करतो त्याने अर्पण केलेल्या होमपशूचे कातडे त्या याजकाच्या मालकीचे होईल. ... आणि जे काही खाद्य पदार्थ-मग ते भट्टीत भाजलेले असोत, कढईत तळलेले असोत की तव्यावर परतलेले असोत, ज्या याजकाने अर्पण केलेले असतील ते सगळे त्या याजकाचे होतील. ... -'लेवीय', अ. ७, ओ. ८,९.

**(समीक्षक)** या देशातील देवीचे भोप्ये आणि मंदिरांचे पुजारी यांच्या क्लृप्त्या विचित्र आहेत हे आम्हाला माहीत होते. परंतु ख्रिस्त्यांचा ईश्वर आणि त्याचे पुजारी यांच्या लीला इथल्यापेक्षा हजारपटींनी जास्त आहेत. कारण कातड्याचे पैसे त्यांना मिळतात आणि खाद्य पदार्थ खायला मिळतात. त्यामुळे ख्रिस्ती याजकांची चांगलीच चंगळ त्यावेळी झाली असणार आणि आताही होत असणार ! एखादा माणूस आपल्या एका मूलाला ठार मारून दुसऱ्या मुलाला त्याचे मांस खायला घालतो असे कधी घडू शकेल काय ? सर्व माणसे, पशुपक्षी ही सारी जणू ईश्वराची लेकरेच आहेत. तर परमेश्वर अशी कृत्ये कधी करू शकत नाही. म्हणूनच हे बायबल ईश्वरकृत आणि त्या वर्णिलेला ईश्वर व त्याचे भक्त कधीही धर्मज्ञ असू शकत नाहीत. असल्याच सगळ्या गोष्टी लैव्य पुस्तकांत भरलेल्या आहेत. त्या कुठवर सांगाव्यात ? ।।५५।।

## 'गणना' चे पुस्तक

(५६) आणि परमेश्वराचा दूत हातात उपसलेली तलवार घेऊन वाटेत उभा असलेला गाढवीने पाहिला. म्हणून गाढवी रस्ता सोडून शेतात शिरली. तिने रस्त्यावर परत फिरावे म्हणून बलामाने गाढवीला काठीने मारले. ... तेव्हा परमेश्वराने गाढवीचे तोंड उघडले; आणि तिने बलामाला विचारले, ''मी तुला असे काय केले की ज्यासाठी तू मला तीन वेळा मारलेस ?'' -'गणना', अ.२२, ओ. २३,२८.

**(समीक्षक)** पूर्वी गाढवाला सुद्धा देवदूतांचे दर्शन घडत असे पण आजकाल विशप, पाद्री वगैरे श्रेष्ठ किंवा अश्रेष्ठ माणसांनाही ईश्वर व त्याचे दूत दिसत नाहीत. आता परमेश्वर व त्याचे दूत आहेत की नाहीत ? जर असतील तर ते गाढ झोपेत आहेत काय ? की आजारी पडले आहेत ? अथवा एखाद्या दुसऱ्या भूगोलांवर ते गेले आहेत ? की दुसऱ्या एखाद्या धंद्यात ते गुंतले आहेत ? की आता ख्रिस्ती लोकांवर रुष्ट झाले आहेत ? अथवा मरून गेले ? काय झाले कळत नाही. यावरून असे अनुमान निघते की जे सध्या नाहीत, दिसत नाहीत ते केव्हाही नव्हते व दिसत नव्हते. परंतु त्यांनी या सगळ्या कपोलकल्पित भाकडकथा रचल्या आहेत. ॥५६॥

(५७) तर आता मुलांपैकी प्रत्येक मुलाला आणि जिचा पुरुषाशी संयोग झाला आहे अशा प्रत्येक स्त्रीला ठार मारा. ... परंतु ज्या मुलींचा पुरुषांशी संयोग झालेला नाही त्यांना स्वत:साठी जिवंत ठेवा. -'गणना', अ. ३१, ओ. १७,१८

**(समीक्षक)** वाहवा ! मूसा पैगंबर आणि तुमचा ईश्वर धन्य आहे ! जो स्त्रिया, मुले, वृद्ध व पशू यांची हत्या करण्यापासून अलिप्त राहत नाही त्याला काय म्हणावे ? यावरून ही गोष्ट स्पष्ट दिसून येते की मूसा हा विषयासक्त होता. कारण तसा तो नसता तर अक्षतयोनी म्हणजे पुरुषांशी समागम न केलेल्या मुली आपल्यासाठी त्याने कशाला मागविल्या असत्या ? अथवा त्यांना अशी निर्दयी व विषयवासनायुक्त आज्ञा का देतो ? ॥५७॥

## सॅम्युएलचे दुसरे पुस्तक

(५८) आणि त्याच रात्री असे झाले की परमेश्वराचा हा शब्द नाथानकडे पोहचला. ॥ की, "जाऊन माझा सेवक दाऊद (दावीद) याला सांग की परमेश्वर असे म्हणतो, तू माझ्या निवासस्थानी एक घर बांधशील काय ? ॥ कारण जेव्हापासून इसराईलच्या मुलांना मिसर देशातून आणले तेव्हापासून आजपर्यंत मी घरात राहिलो नाही. तंबूत आणि डेऱ्यांमध्ये राहत आलो." -सॅम्युएल, दु.पु., अ.७, ओ.४-६.

**(समीक्षक)** आता तर ख्रिस्त्यांचा ईश्वर मनुष्यासारखा देहधारी नाही आणि उलाहणे देतो की, "मी फार श्रम केले. इकडे-तिकडे फिरत राहिलो. आता दाऊद घर बांधून देईल तर मी त्यात विश्रांती घेईन." असल्या ईश्वरावर आणि अशा पुस्तकावर श्रद्धा ठेवण्यास ख्रिस्ती लोकांना लाज का वाटत नाही ? पण काय करतील बिचारे ? फसले आहेत ! आता त्यातून बाहेर पडण्यासाठी त्यांनी खूप पुरुषार्थ करणे आवश्यक आहे. ॥५८॥

## राजांचे पुस्तक

(५९) आणि बाबिलोनचा राजा नबूखुदनजर याच्या राज्याच्या एकोणिसाव्या वर्षी पाचव्या महिन्याच्या सातव्या दिवशी बाबिलोनच्या राजाचा एक सेवक नबूजरअद्दीन हा हुजऱ्यांचा सरदार यरुशलेमला आला; आणि त्याने परमेश्वराचे मंदिर, राजाचा राजवाडा आणि यरुशलेमची सगळी घरे व प्रत्येक मोठ्या माणसाचे घर अग्नीने जाळून टाकले. ... आणि हुजऱ्यांच्या सरदाराबरोबर आलेल्या खालद्यांच्या सगळ्या सैन्याने यरुशलेमच्या सभोवती असलेले तट जमीनदोस्त केले. राजे. २, अ.२५, ओ.८-१०.

**(समीक्षक)** काय करणार ? ख्रिस्त्यांच्या ईश्वराने स्वत:च्या सुखासाठी दाऊद वगैरे मंडळींकडून घर

बांधून घेतले होते. त्यामध्ये तो विश्रांती करीत असेल. परंतु नबूजरअद्दीनने ईश्वराचे घर नष्ट करून टाकले आणि ईश्वर किंवा त्याच्या दूताचे सैन्य काहीही करू शकले नाही. पूर्वी त्यांचा ईश्वर मोठमोठ्या लढाया मारीत असे आणि विजयी होत असे. परंतु आता आपले घर मोडले-जाळले जात असताना तो गप्प का बसला कोण जाणे ! आणि त्याचे दूत कोठे पळून गेले कोण जाणे ? अशा कठीण समयी कोणीही मदतीस आला नाही आणि परमेश्वराचा पराक्रमही कोठे उडून गेला कोण जाणे ! ही गोष्ट खरी असेल तर यापूर्वी त्याच्या विजयाच्या गोष्टी लिहिल्या होत्या त्या खोट्याच म्हटल्या पाहिजेत. मिसर देशातील मुले व मुली यांना ठार मारण्यापुरताच तो शूरवीर बनला होता ? आणि आता शूरवीरांसमोर गप्प बसला काय ? अशा प्रकारे ख्रिस्त्यांच्या ईश्वराने आपलीच निंदा व अप्रतिष्ठा करून घेतली. या पुस्तकामध्ये अशाच हजारो निरर्थक कहाण्या भरलेल्या आहेत. ॥५९॥

## जुना करार, भाग दुसरा (जबूर) कालवृत्तांत १
## बायबलचा क्रुरकर्मा ईश्वर

(६०) म्हणून परमेश्वराने इसराईलवर मरी (रोगराई) धाडली आणि इसराईल मधील सत्तर हजार माणसे पडली. (मेली.) -कालवृत्तांत १, अ.२१, ओ.१४.

**(समीक्षक)** ही पाहिलीत इसराईलच्या ख्रिस्त्यांच्या ईश्वराची लीला ? ज्या इसराईलच्या वंशाला ईश्वराने पुष्कळ वर दिले होते आणि ज्यांच्या पालनपोषणासाठी तो अहोरात्र धडपडत होता त्याच ईश्वराने आता रागाच्या सपाट्यात मरी घालून सत्तर हजार माणसे मारून टाकली. एका कवीने जे लिहिले आहेत ते खरेच आहे. तो म्हणतो,

**क्षणे रुष्टः क्षणे तुष्टो रुष्टस्तुष्ट क्षणे क्षणे ।**
**अव्यवस्थितचित्तस्य प्रसादोऽपि भयङ्करः॥**

जसा एखादा माणूस क्षणात प्रसन्न तर क्षणात अप्रसन्न होतो म्हणजे ज्याची वृत्ती क्षणाक्षणाला बदलते त्याची प्रसन्नताही भयंकर असते, तशीच ही ख्रिस्त्यांच्या ईश्वराची विचित्र लीला आहे. ॥६०॥

## ईयोबाचे पुस्तक

(६१) आणि एके दिवशी असे झाले की परमेश्वरासमोर ईश्वराचे पुत्र येऊन उभे राहिले; आणि सैतानही त्यांच्यामध्ये परमेश्वरासमोर येऊन उभा राहिला. ... आणि परमेश्वराने सैतानाला विचारले, "तू कोठून आलास?" तेव्हा त्या सैतानाने उत्तर देऊन परमेश्वराला सांगितले की, ''पृथ्वीवर इकडे-तिकडे हिंडत-फिरत मी आलो आहे.'' ... तेव्हा परमेश्वराने सैतानाला विचारले, ''तू माझा दास ईयोब (ऐयूब) याची पारख केली आहेस काय ? पृथ्वीच्या पाठीवर त्याच्यासारखा कोणी नाही. तो सिद्ध पुरुष, प्रामाणिक असून तो ईश्वराला भितो व पापापासून दूर राहतो. त्याने अजूनही सचोटी सोडलेली नाही. असे असताना तू निष्कारण त्याचा नाश करण्यास मला चिथावलेस.'' ... तेव्हा सैतानाने उत्तर म्हणून परमेश्वराला सांगितले की, ''कातडीसाठी

कातडी ! माणसाजवळ जे काही असते ते सारे तो आपल्या प्राणासाठी देईल. परंतु आता तू आपला हात पुढे करून त्याच्या हाडांना व मांसाला स्पर्श कर आणि पाहा. तो तुझ्या तोंडावर तुझा अव्हेर करील.'' ... यावर परमेश्वर सैतानाला म्हणाला, ''पाहा ! तो तुझ्या हातात आहे. पण तू त्याचे प्राण वाचव.'' ... तेव्हा सैतान परमेश्वराच्या समोरून गेला; आणि त्याने ईयोबाला मोठमोठ्या फोडांनी (गळवांनी) तळापायापासून मस्तकापर्यंत हैराण केले. -'ईयोब', अ.२, ओ.१-७.

**(समीक्षक)** हे पाहा ख्रिस्त्यांच्या ईश्वराचे सामर्थ्य ! सैतान त्याच्या समोर त्याच्या भक्तांना यातना देतो. पण तो परमेश्वर सैतानाचे पारिपात्य करीत नाही, आपल्या भक्तांना वाचवू शकत नाही, अथवा त्याच्या दूतांपैकी कोणी सैतानाशी सामना करू शकत नाही. एकट्या सैतानाने सर्वांना भयभीत करून सोडले आहे. शिवाय ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञही नाही. तो सर्वज्ञ असता तर त्याने ईयोबाची पारख करायला सैतानाला का सांगितले असते ? ॥६१॥

## उपदेशांचे पुस्तक

(६२) होय ! माझ्या अंत:करणाने बुद्धी (शहाणपण) व ज्ञान यांचा खूप अनुभव घेतला आहे. ... आणि मी शहाणपण व मूर्खपणा व वेडपटपणा म्हणजे काय हे जाणून घेण्याच्या कामी माझे मन लावले. मला असे आढळून आले की तीही मनाची गांजणूकच आहे. ... कारण अधिक बुद्धीत (शहाणपणात) अधिक यातना असतात आणि ज्याचे ज्ञान वाढते त्याचे दु:खही वाढते. -'उपदेश', अ.१, ओ. १६-१८.

**(समीक्षक)** आता पाहा ! बुद्धी आणि ज्ञान हे दोन पर्यायवाची शब्द असून त्यांना हे लोक भिन्न मानतात. बुद्धी वाढली की शोक व दु:ख होते असे मानणे हे अविद्वानांचे काम आहे. विद्वान माणूस असे कसे लिहिल ? यावरून हे बायबल ईश्वराने तर नव्हेच, एखाद्या विद्वानानेही रचलेले नाही, हे सिद्ध होते. ॥६२॥

येथपर्यंत आम्ही जुन्या करारातील काही भागांविषयी थोडक्यात विवेचन केले; यानंतर मत्तयकृत शुभवर्तमान वगैरे नव्या करारातील काही भागांविषयी थोडक्यात विवेचन करू. कारण ख्रिस्ती लोक या नव्या कराराला प्रमाणभूत धर्मग्रंथ मानतात. त्याला ते 'नवा करार' असे म्हणतात. तेच त्याचे इञ्जील ठेवले आहे. त्यात काय लिहिले आहे ते पाहिले की त्याची पारख होईल.

## नवा करार अथवा पवित्रशास्त्र मत्तयकृत शुभवर्तमान

## कुमारी मातेपासून येशूचा जन्म

(६३) येशू ख्रिस्ताचा जन्म या प्रकारे झाला. त्याची आई मरीया हिचे योसेफास वाग्दान झाल्यावर त्यांचा सहवास होण्यापूर्वी ती पवित्र आत्म्यापासून गरोदर झालेली अशी दिसण्यात आली. ... तो त्या गोष्टींच्या विचारात आहे तो पाहा, प्रभूच्या दूताने त्याला स्वप्नात दर्शन देऊन म्हटले, ''योसेफा, दाविदाच्या पुत्रा, तू आपली बायको मरीया हिचा स्विकार करावयाला भिऊ नको, कारण तिच्या ठायी जो गर्भ आहे तो पवित्र आत्म्यापासून आहे.'' - मत्तय, अ.१, ओ. १८-२०.

**(समीक्षक)** या गोष्टी प्रत्यक्षादी प्रमाणे आणि सृष्टिक्रम यांच्या विरुद्ध असल्यामुळे त्या कोणीही विद्वान मान्य करु शकणार नाही. या गोष्टींवर मूर्ख आणि जंगली माणसेच विश्वास ठेवतील. सभ्य विद्वान त्या कधीही मानणार नाहीत. तुम्हीच पाहा! जो परमेश्वराचा नियम आहे तो कोण मोडू शकेल? खुद्द परमेश्वरच आपल्या नियमाचा भंग करील तर त्याची आज्ञा कोणीही पाळणार नाही; आणि तो परमेश्वरही सर्वज्ञ व निर्भ्रान्त राहणार नाही. मरीयाला ज्याप्रकारे गर्भ राहिला त्याप्रकारे कोणतीही कुमारिका गरोदर राहील त्या सगळ्या ईश्वरापासून गरोदर आहेत असे कोणालाही म्हणता येईल आणि त्या कुमारिका असे खोटेनाटेच सांगू लागतील की, ''परमेश्वराच्या दूताने स्वप्नात येऊन मला असे सांगितल की, हा गर्भ परमात्म्याकडून आहे.'' वस्तुत: ही अगदी अशक्य गोष्ट आहे. याचप्रमाणे सूर्यापासून कुंती गर्भवती झाली वगैरे ज्या गोष्टी पुराणात लिहिलेल्या आहेत त्याही सर्व असंभव आहेत. अशा गोष्टींना अज्ञानी निर्बुद्ध लोक मानतात आणि भ्रमजाळात पडतात. अशी गोष्ट झाली असेल की एखाद्या पुरुषाशी समागम झाल्याने मरीया गरोदर राहिली असावी. मग तिने किंवा दुसऱ्या कोणीतरी तो गर्भ ईश्वराकडून असल्याची असंभव गोष्ट पसरविली असावी. ॥६३॥

(६४) तेव्हा सैतानाकडून येशूची परीक्षा व्हावी म्हणून आत्म्याने त्याला रानात नेले ... मग तो चाळीस दिवस व चाळीस रात्र उपाशी राहिल्यानंतर त्याला भूक लागली ... तेव्हा परीक्षक त्याच्याजवळ येऊन म्हणाला, ''तू देवाचा पुत्र असलास तर या दगडाच्या भाकरी व्हाव्या अशी आज्ञा कर.'' -मत्तय, अ.४, ओ.१-३.

**(समीक्षक)** यावरून ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञ नाही, हे स्पष्ट सिद्ध होते. कारण तो सर्वज्ञ असता तर त्याने येशूची परीक्षा सैतानाकडून का करविली असती? स्वत:ने जाणले असते. आजकाल एखाद्या ख्रिस्त्याला चाळीस रात्री व चाळीस दिवस उपाशी ठेवले तर तो जगू शकेल काय? यावरून हेही सिद्ध झाले की येशू हा ईश्वरचा पुत्रही नव्हता अथवा त्याच्याजवळ कसलीही किमया म्हणजे सिद्धीही नव्हती. तशी सिद्धी असती तर त्याने सैताना समक्ष दगडाच्या भाकरी बनवून का दाखविल्या नसत्या आणि तो स्वत: उपाशी कशाला राहिला असता? खरे म्हणजे परमेश्वराने जे दगडधोंडे बनविले आहेत त्यांच्या भाकरी बनविणे कोणालाही शक्य नाही आणि ईश्वरही पूर्वी केलेले नियम बदलू शकत नाही. कारण तो सर्वज्ञ आहे आणि त्याची कामे चूकभूलविना आहेत. ॥६४॥

(६५) त्याने त्यांना म्हटले, ''माझ्या मागून या. मी तुम्हाला माणसे पकडणारे (कोळी) बनवीन.'' मग ते ताबडतोब आपली जाळी तेथेच सोडून देऊन त्याच्या मागून चालले. -मत्तय, अ.४, ओ.१९,२०.

**(समीक्षक)** जुन्या करारामध्ये ज्या दहा आज्ञा तौरेत ग्रंथात सांगितलेल्या आहेत त्याप्रमाणे **''आपल्या आईबापांचा मान ठेवा. म्हणजे तुम्हाला दीर्घायुष्य प्राप्त होईल.''** परंतु येशूने आपल्या आईबापांची सेवा केली नाही आणि इतरांनाही आईबापाच्या सेवेपासून परावृत्त करून आपल्या जाळ्यात अडकविले. या पापामुळेच तो चिरंजीव झाला नाही असे दिसते. या घटनेवरून हेही लक्षात येते मासळीप्रमाणे माणसांना आपल्या जाळ्यात अडकविण्यासाठी आणि आपला हेतू साध्य करण्यासाठी त्याने आपला एक पंथ सुरू केला. खुद्द येशूच असा आहे मग आजकालचे पाद्री लोक आपल्या जाळ्यात माणसाना अडकवीत असतील तर

त्यात काय आश्चर्य ? कारण ज्याप्रमाणे मोठमोठे व पुष्कळ मासे जाळ्यात पकडणाऱ्याची प्रतिष्ठा वाढते व त्याचा चरितार्थ उत्तम चालतो त्याचप्रमाणे जो अनेक लोकांना आपल्या पंथात ओढतो त्याची प्रतिष्ठा वाढते आणि याचा चरितार्थ उत्तम चालतो. म्हणूनच ज्यांनी वेदांचे व शास्त्रांचे पठण व श्रवण केलेले नाही अशा बिचाऱ्या भोळ्याभाबड्या माणसांना हे ख्रिस्ती लोक आपल्या जाळ्यात अडकवून त्यांच्या आईबापांपासून व कुटुंब वगैरे पासून वेगळे करतात. म्हणून सर्व विद्वान आर्यांनी स्वत: त्यांच्या भ्रमजाळापासून दूर राहून आपल्या इतर भोळ्या भाबड्या बांधवांना वाचविण्यात तत्पर राहवे. ॥६५॥

## रोग्यांना बरे करणे

(६६) नंतर येशू सभास्थानांत शिक्षण देत, राज्याची सुवार्ता गाजवीत आणि लोकातले सर्व प्रकारचे रोग व सर्व प्रकारची दुखणी बरी करीत सर्व गल्लीभर फिरला.... आणि त्याची कीर्ती सूरिया (सीरिया) देशभर पसरली; तेव्हा ज्यांस नाना प्रकारचे रोग व वेदना लागल्या होत्या, जे भूतग्रस्त, फेफरेकरी व पक्षघाती होते अशा सर्व दुखणेकऱ्यांस त्याजकडे आणले आणि त्याने त्यांस बरे केले. -मत्तय, अ. ४, ओ. २३, २४

**(समीक्षक)** आजकाल मंत्र, तंत्र, पुरश्चरण, आशीर्वाद, गंडा, ताईत, भस्म, चुटकी वगैरे उपायांनी भुतेखेते पळून जातात आणि रोग बरे होतात हे खरे असेल तर बायबलाची गोष्ट खरी व्हावी याचे कारण भोळ्याभाबड्या लोकांना फसविण्यासाठी या गोष्टी आहेत. येशूने केलेले चमत्कार खरे होते असे जर, ते लोक मानत असतील तर येथील दे ऋष्यांचे (भोप्यांचे) चमत्कार ते का खरे मानीत नाहीत ? कारण या दोन्ही गोष्टी एकसारख्याच आहेत. ॥६६॥

(६७) जे आत्म्याने 'दीन' ते धन्य, कारण स्वर्गाचे राज्य त्यांचे आहे ... मी तुम्हांस खचित सांगतो, आकाश व पृथ्वी नाहीशी होईपर्यंत सर्व गोष्टी पूर्ण झाल्यावाचून नियमशास्त्राची एक मात्रा किंवा एक बिंदू नाहीसा होणार नाही ... यास्तव जो कोणी या अगदी लहान आज्ञांतील एकही रद्द करील व तदनुसार लोकांस शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यात अगदी लहान म्हणतील पण जो कोणी त्या पाळील व शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यात मोठा म्हणतील. -मत्तय, अ. ५, ओ. ३,१८,१९.

**(समीक्षक)** जर स्वर्ग एक असेल तर राजाही एकच असला पाहिजे. त्यामुळे जितके दीनदुबळे आहेत ते सर्व स्वर्गात गेले तर स्वर्गातील राज्यावर अधिकार कोणाचा होईल ? म्हणजे ते आपसात भांडणतंटे करतील आणि सगळी राज्यव्यवस्था खिळखिळी होऊन जाईल आणि 'दीन' म्हणजे कंगाल लोक असे असेल तर ते बरोबर नाही. दीन म्हणजे निरभिमानी असा अर्थ घेतला तर तेही बरोबर नाही. कारण दीन आणि निरभिमान यांचा अर्थ एकच नाही. परंतु जो मनाने दीन असतो त्याला कधीच समाधान लाभत नाही. म्हणून तो अर्थही बरोबर नाही. जेव्हा आकाश व पृथ्वीही निघून जातील तेव्हा व्यवस्थाही नाहीशी होईल. अशी अनित्य व्यवस्था माणसांची असते. सर्वज्ञ ईश्वराची नसते. जो या आज्ञांचे पालन करणार नाही तो स्वर्गामध्ये सर्वांत लहान समजला जाईल असे प्रलोभन व भय दाखविले आहे. ॥६७॥

(६८) आमची रोजची भाकरी आज आम्हांस दे. ... पृथ्वीवर आपणाकरिता संपत्ती साठवू नका.

- मत्तय, अ.६, ओ. ११,१९.

**(समीक्षक)** यावरून असे दिसून येते की ज्या काळी येशूचा जन्म झाला होता त्या काळी माणसे जंगली व दरिद्री होती; आणि येशूही तसाच दरिद्री होता. म्हणूनच तो रोजची भाकरी मिळावी यासाठी ईश्वराची प्रार्थना करतो आणि अनुयायांना शिकवितो. असे आहे तर ख्रिस्ती लोक धनाचा संचय का करतात ? येशूच्या आज्ञेचे उल्लंघन न करता आपली सारी संपत्ती दान करून त्यांनी दीन बनले पाहिजे. ॥६८॥

(६९) मला हे प्रभो, हे प्रभो असे म्हणतो तो स्वर्गाच्या राज्यात प्रवेश करणार नाही. -मत्तय, अ.७, ओ.२१.

**(समीक्षक)** आता तुम्हीच विचार करा. मोठेमोठे पाद्री, बिशप साहेब व ख्रिस्ती लोक येशूचे हे वचन सत्य समजत असतील तर ते येशूला कधीही प्रभू म्हणजे ईश्वर म्हणणार नाहीत. ही गोष्ट त्यांनी मान्य केली नाही तर ते पापापासून केव्हाही वाचू शकणार नाहीत. ॥६९॥

(७०) त्या दिवशी मला अनेकजण म्हणतील, ''प्रभुजी, प्रभुजी, आम्ही तुझ्या नावाने संदेश दिला, तुझ्या नावाने भूते घालविली, व तुझ्या नावाने बहुत अद्‌भुत कृत्ये केली नाहीत काय ?'' तेव्हा मी त्यांना स्पष्ट सांगेन की, ''माझी तुमची कधीच ओळख नव्हती. अहो, अधर्म करणाऱ्यांनो, मजपुढून निघून जा.''

-मत्तय, अ.७, ओ.२२,२३.

**(समीक्षक)** पाहा ! जंगली माणसांची खात्री पटविण्यासाठी येशू आपण स्वर्गातील न्यायाधीश बनू पाहत होता ही भोळ्या लोकांना प्रलोभन दाखविण्याची एक क्लृप्ती आहे. ॥७०॥

(७१) तेव्हा पाहा, एक कुष्ठरोगी येऊन त्याच्या पाया पडत म्हणाला, ''प्रभुजी, तुझी इच्छा असली तर मला शुद्ध करावयास तू शक्तिमान आहेस.'' ... त्यावर त्याने हात पुढे करून त्याला स्पर्श केला व म्हटले, ''माझी इच्छा आहे. शुद्ध हो.'' तेव्हाच त्याचे कुष्ठ जाऊन तो शुद्ध झाला. -मत्तय, अ.८, ओ.२,३.

**(समीक्षक)** या सगळ्या गोष्टी भोळ्या भावड्या लोकांना फसविण्यासाठी आहेत. ज्ञान व सृष्टिक्रम यांच्याविरुद्धच्या गोष्टींना जर ख्रिस्ती लोक खऱ्या मानतात तर पुराणांत व महाभारतातील गोष्टी खऱ्या मानाव्या लागतील. जसे शुक्राचार्य, धन्वन्तरी, कश्यप इत्यादींनी अनेक दैत्यांच्या मेलेल्या सैन्याला जिवंत केले होते. बृहस्पतीचा मुलगा कच याचे तुकडे-तुकडे करून ते हिंस्र प्राण्यांना व माशांना खाऊ घातले होते. तरीही शुक्राचार्यांनी कचाला जिवंत केले. मग कचाला मारून त्याचे मांस शुक्राचार्याला खाऊ घातले गेले तरीही शुक्राचार्यांनि त्याला पोटात जिवंत करून बाहेर काढले. या प्रकरणात शुक्राचार्य स्वत: मेला पण कचाने त्याला जिवंत केले. कश्यप ऋषीने तक्षकाकडून भस्म केली गेलेली झाडे व माणसे पुन: जिवंत केली. धन्वन्तरीने लाखो प्रेते जिवंत केली. लाखो कुष्ठरोगी वगैरे बरे केले. लाखो आंधळ्यांना दृष्टी दिली आणि बहिऱ्यांना श्रवणशक्ती मिळवून दिली. या गोष्टी खोट्या असतील तर येशूच्या चमत्काराच्या गोष्टी खोट्या का नाहीत ? जे लोक इतरांच्या गोष्टी खोट्या आणि आपल्या खोट्या गोष्टी खऱ्या आहेत असे म्हणतात ते हटवादीच नव्हेत काय ? म्हणून ख्रिस्त्यांच्या ह्या कथा हठधर्मी का नाहीत ? ॥७१॥

(७२) मग तो पलीकडे गदरेकरांच्या देशात गेल्यावर दोन भूतग्रस्त माणसे कबरीतून निघून येत असताना त्याला भेटली. ती इतकी उग्र होती की त्या वाटेने कोणाच्याने जाववत नसे. ... तेव्हा पाहा ? ती ओरडून म्हणाली, ''हे देवाच्या पुत्रा, आमचा व तुझा काय संबंध ? नेमलेल्या समयापूर्वी तू आम्हांस पीडा द्यावयास येथे आला आहेस काय ?'' ... तेथे त्यांजपासून दूर अंतरावर डुकरांचा मोठा कळप चरत होता. ... मग त्या भूतांनी त्याला विनंती केली की, ''तू जर आम्हांला काढीत असलास तर आम्हांस त्या डुकरांच्या कळपात पाठव.'' ... त्याने त्यांस म्हटले, ''जा !'' मग ती निघून डुकरात शिरली आणि पाहा ! तो सारा कळप कड्यावरून समुद्रात धडक धावत जाऊन पाण्यात बुडून मेला. -मत्तय, अ.८, ओ.२८-३२.

**(समीक्षक)** आता तुम्ही थोडा विचार कराल तर या सगळ्या गोष्टी खोट्या आहेत कारण मेलेला माणूस कबरीतून कधीही बाहेर येऊ शकत नाही. मेलेली माणसे कोणाच्या अंगात प्रवेश करीत नसतात अथवा कोणाशी बोलतही नसतात. असल्या गोष्टी अडाणी लोकांच्या आहेत; जे महाजंगली असतात तेच असल्या गोष्टींवर विश्वास ठेवतात. येशूने त्या डुकरांची हत्या करविली. त्या डुकरांच्या मालकाचे जे नुकसान झाले त्याचे पाप येशूला नक्कीच लागले असणार ! ख्रिस्ती लोक येशू हा पापाबद्दल क्षमा करणारा व पवित्र करणारा मानतात. मग तो त्या भुतांनाच का पवित्र करू शकला नाही ? आणि डुकरांच्या मालकांना नुकसानभरपाई का दिली नाही ? आजकालचे सुशिक्षित ख्रिस्ती इंग्रज या भाकडकथांवर विश्वास ठेवीत असतील काय ? जर ठेवीत असतील तर ते भ्रमजाळात पडले आहेत. ।।७२।।

(७३) मग पाहा, खाटेवर पडलेल्या कोण्या एका पक्षाघाती माणसास त्याजकडे आणले. तेव्हा येशू त्यांचा विश्वास पाहून पक्षाघाती माणसाला म्हणाला, ''मुला धीर धर. तुझ्या पापांची क्षमा झाली आहे. ... मी धार्मिकांस नव्हे तर पापी जनांस बोलवावयास आलो आहे.'' -मत्तय, अ.९, ओ.२,१३.

**(समीक्षक)** वर सांगितल्याप्रमाणे ही गोष्टही तशीच असंभव आहे आणि पापाची क्षमा करण्याविषयी जे लिहिले आहे ते केवळ भोळ्या लोकांना प्रलोभन दाखवून फसविण्यासाठी आहे. ज्याप्रमाणे एकाने प्यालेल्या दारूची अथवा भांगेची आणि खाल्लेल्या अफूची नशा दुसऱ्याला चढत नाही त्याचप्रमाणे एकाने केलेले पाप दुसऱ्याला लागत नाही; तर जो पाप करतो तोच त्याची फळे भोगतो. हाच ईश्वराचा न्याय आहे. जर एकाने केलेले पापपुण्य दुसऱ्याला लागेल अथवा न्यायाधीश ते स्वत:वर ओढवून घेईल किंवा ते करणाऱ्यांना ईश्वर यथायोग्य फळ न देईल तर तो अन्याय करणारा ठरेल. पाहा ! धर्मच कल्याणकारक आहे. येशू किंवा दुसरा कोणी नाही. धर्मात्म्यांना तारण्यासाठी येशूची मुळीच आवश्यकता नाही आणि पाप्यांना त्याची गरजसुद्धा नाही. कारण पाप कुणाचेही सुटू शकत नाही. ।।७३।।

## मी शांततेसाठी आलो नाही

(७४) तेव्हा त्याने आपल्या बारा शिष्यांस जवळ बोलावून त्यांनी अशुद्ध आत्म्यांस काढावे आणि सर्व प्रकारचे विकार व सर्व प्रकारची दुखणी बरी करावी असा अधिकार त्यांस दिला. ... कारण बोलणारे तुम्ही

नाही, तर तुमच्या पित्याचा आत्मा हाच तुम्हांमध्ये बोलणार आहे. ... मी पृथ्वीवर शांतता चालवावयास आलो असे समजू नका. मी शांतता चालवावयास नव्हे तर तलवार चालवावयास आलो आहे. ... कारण मुलगा व बाप, मुलगी व आई, सून व सासू यांत विरोध पाडण्यास मी आलो आहे. ... आणि मनुष्याच्या घरचेच लोक त्याचे वैरी होतील. -मत्तय, अ.१०, ओ.१,२०,३४-३६.

**(समीक्षक)** ज्याने ३० रुपयांच्या लोभाने येशूला पकडून दिले आणि ज्यांनी बदलून ऐन वेळी पळ काढला तेच येशूचे बारा प्रिय शिष्य होत. भुते अंगात संचारणे अथवा ती काढून टाकणे, औषध किंवा पथ्यपाणी यांच्या मदतीशिवाय रोग बरे करणे या गोष्टी ज्ञानाच्या व सृष्टिक्रमाच्या विरुद्ध असंभव आहेत. म्हणून असल्या गोष्टींवर श्रद्धा ठेवणे हे अज्ञानी लोकांचे काम आहे. जर जीव बोलणारे नसून ईश्वरच बोलणारा असेल तर जीव काय काम करतात ? तसेच सत्य वा असत्य भाषणाचे फळ म्हणून मिळणारे सुख अथवा दुःख ईश्वरच भोगत असेल तर तीही एक खोटी गोष्ट आहे. येशू या जगात फूट पाडण्यास व भांडणे लावण्यासाठी आला होता. तोच आजकाल कलह लोकांमध्ये चालू आहे. फूट पाडणे ही किती वाईट गोष्ट आहे ! कारण त्यामुळे माणसांना सर्वथा दुःखच होते. ख्रिस्ती लोकांनी हाच कलहाचा गुरुमंत्र समजला असावा. कारण लोकांमध्ये फाटाफूट असणे ही गोष्ट चांगली आहे असे येशूच समजत होता. मग ख्रिस्ती लोक तसे का समजणार नाहीत ? घरच्या लोकांना घरच्या लोकांचे शत्रू बनविणे हे येशूचेच काम असणार. ते श्रेष्ठ पुरुषाचे काम असू शकत नाही. ॥७४॥

(७५) येशूने त्यांस विचारले, "तुम्हांजवळ किती भाकरी आहेत ?" ते म्हणाले, "सात, व काही मासळ्या." ... मग त्याने लोकसमुदायांस जमिनीवर बसावयास सांगितले. ... नंतर त्याने त्या सात भाकरी व मासळ्या घेऊन उपकारस्तुती केली, त्या मोडून शिष्यांस दिल्या आणि शिष्यांनी लोकसमुदायाला दिल्या. ... मग ते सर्व जेवून तृप्त झाले आणि त्यांनी उरलेल्या तुकड्यांच्या सात टोपल्या भरून घेतल्या. ... जेवणाऱ्यांमध्ये चार हजार पुरुष होते. शिवाय स्त्रिया व मुले निराळीच होती. ... -मत्तय, अ.१५, ओ.३४-३८.

**(समीक्षक)** आता पाहा ! आजकालचे दांभिक सिद्ध व जादूगार यांच्य हातचलाखीच्या गोष्टींसारखीच ही लबाडीची गोष्ट नाही काय ? त्या भाकरींमध्ये इतर भाकरी कोठून आल्या ? येशूजवळ अशा सिद्धी होत्या तर स्वतःला भूक लागल्यावर उंबराची फळे खाण्यासाठी तो का भटकत असे ? त्याने स्वतःसाठी माती, पाणी व दगड यांच्यापासून मोहनभोग, भाकरी वगैरे का बनविल्या नाहीत ? या सगळ्या गोष्टी पोरकटपणाच्या आहेत. जसे लबाड साधू, बैरागी असल्या लबाड गोष्टी करून भोळ्याभाबड्या लोकांना फसवितात तसेच हेही आहेत. ॥७५॥

(७६) आणि त्या समयी तो प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे फळ देईल. -मत्तय, अ.१६, ओ.२७.

**(समीक्षक)** जर कर्मानुसारच माणसाला फळ मिळणार असेल तर ख्रिस्तावर विश्वास ठेवणाऱ्यांना त्यांच्या पापाची क्षमा मिळते असा उपदेश करणे व्यर्थ आहे आणि कर्मानुसार फळ मिळते हे खरे असेल तर हा उपदेश खोटा ठरतो. जर कोणी असे म्हणेल की क्षमा करण्यास योग्य असणाऱ्यांना क्षमा केली जाते आणि क्षमा

करण्यास योग्य नसणाऱ्यांना क्षमा केली जात नाही तर तेही बरोबर नाही. कारण सर्व कर्मांची फळे यथायोग्यपणे दिल्यानेच न्याय व पूर्ण दया होते. ।।७६।।

## येशूचे विज्ञान विरोधी वचन

(७७) ''हे अविश्वासी व कुटिल पिढीच्या लोकांनो, मी कोठवर तुम्हांबरोबर राहू ? कोठवर तुमचे सोसू? ... कारण मी तुम्हांस खचित सांगतो की जर तुम्हांमध्ये मोहरीच्या दाण्याएवढा जरी विश्वास असेल तर या डोंगराला येथून तिकडे सरक असे तुम्ही म्हटल्यास तो सरकेल. तुम्हांला काहीच असाध्य असणार नाही.''

-मत्तय, अ. १७, ओ.१७,२०.

**(समीक्षक)** ख्रिस्ती लोक असा उपदेश करीत फिरत असतात की, ''आमच्या मतात या, क्षमा मिळवा आणि मुक्ती प्राप्त करा.'' पण ते सारे खोटे आहे. कारण येशूमध्ये पापाचे निवारण करण्याचे, श्रद्धा बसविण्याचे व पवित्र करण्याचे सामर्थ्य असते तर त्याने आपल्या शिष्यांच्या आत्म्यांना निष्पाप, श्रद्धावान व पवित्र का केले नाही ? जे लोक येशूच्या सहवासात राहून त्याच्याबरोबर फिरत असत त्यांनाच तो शुद्ध विश्वासू आणि पापमुक्त करू शकला नाही तर तो मेल्यानंतर आता-तो कोठे आहे कोण जाणे ! कोणालाही पवित्र बनवू शकणार नाही. येशूच्या चेल्यांमध्ये मोहरी एवढीही श्रद्धा नव्हती आणि त्यांनीच हे बायबल तयार केले आहे. म्हणून ते प्रमाणभूत असू शकत नाही. कारण जे अविश्वासू, अपवित्रात्मा, अधर्मी असतात अशा माणसांच्या लिखाणावर विश्वास ठेवणे हे कल्याणाची इच्छा बाळगणाऱ्या माणसाचे काम नव्हे. यावरून हेही सिद्ध होते की येशूचे हे वचन खरे असेल तर एकाही ख्रिस्ती माणसामध्ये एका मोहरीच्या दाण्या एवढाही विश्वास म्हणजे श्रद्धा नाही. जर कोणी असे म्हणत असेल की आमच्यामध्ये पूर्ण किंवा थोडी श्रद्धा आहे तर त्याला म्हणावे, ''हा जो डोंगर वाटेत आला आहे तो जरा पलीकडे सरकवा.'' जर त्याच्या प्रयत्नाने तो डोंगर सरकला तर त्याच्यामध्ये पूर्ण श्रद्धा नाही मोहरीच्या एका दाण्याएवढी श्रद्धा अवश्य आहे. परंतु जर त्याला तो डोंगर सरकविता आला नाही तर ख्रिस्ती लोकांमध्ये विश्वास, श्रद्धा म्हणजेच धर्म यांचा लवलेशही नाही असे खुशाल समजावे. जर कोणी असे म्हणेल की येथे अभिमान वगैरे दोषांसाठी डोंगर हा शब्द वापरलेला आहे, तर तेही बरोबर नाही. कारण जर असे असेल तर प्रेते, आंधळे, महारोगी, भूतग्रस्त यांना येशूने जिवंत व बरे केल्याच्या बायबलात ज्या गोष्टी आहेत त्याठिकाणी आळशी, अज्ञानी, विषयासक्त व भ्रांतचित्त लोकांना उपदेश करून ख्रिस्ताने सचेत (सावध) व कुशल बनविले असा अर्थ लावता येईल. परंतु असा अर्थ लावणेही बरोबर होणार नाही. कारण मग तो आपल्या शिष्यांनाच सावध व हुशार का बनवू शकला नाही ? म्हणून अशा असंभव गोष्टी सांगणे ही गोष्ट येशूचे अज्ञानच दर्शविते. येशूजवळ विद्या किंवा ज्ञान असते तर त्याने जंगली लोकांसारख्या मूर्खपणाच्या गोष्टी कशाला उच्चारल्या असत्या ? तथापि 'यत्र देशे द्रुमो नास्ति तत्रैरण्डोऽपि द्रुमायते' किंवा 'निरस्तपादपे देशे एरंडोऽपि द्रुमायते' म्हणजे ज्या देशात एकही मोठा वृक्ष नसतो तेथे एरंडाचे झाड हाच सर्वात मोठा व उत्तम वृक्ष समजला जातो, या न्यायाने महाजंगली लोकांच्या देशात येशूलाही श्रेष्ठत्व प्राप्त होणे स्वाभाविक होते. परंतु आजकाल येशूची काय गणती होऊ शकते ? येशू कोणाच्या खिजगणतीत असणार ? ।।७७।।

(७८) मी तुम्हांस खचित सांगतो, "तुमचे मन वळल्याशिवाय व तुम्ही बालकांसारखे झाल्याशिवाय स्वर्गाच्या राज्यात तुमचा प्रवेश होणारच नाही." -मत्तय, अ.१८, ओ.३.

**(समीक्षक)** आपल्याच इच्छेने मन वळविणे हे स्वर्गप्राप्तीला आणि न वळविणे नरकप्राप्तीला कारणीभूत होत असेल तर कोणीही कोणाचे पापपुण्य कधी घेऊ शकत नाही, असे सिद्ध होते आणि बालकांसारखे होण्याचा जो उल्लेख आला आहे त्यावरून असे लक्षात येते की येशूच्या गोष्टी ज्ञान आणि सृष्टिक्रम यांच्या विरोधी होत्या आणि त्याच्या मनात असाही विचार होता की लोकांनी माझे म्हणणे लहान मुलांप्रमाणे डोळे मिटून मान्य करावे, काहीही प्रश्न विचारू नयेत. पुष्कळसे ख्रिस्ती लोक बाळबुद्धीचे असल्यासारखेच वागतात. नाहीतर अशा तर्कविसंगत, ज्ञानविरोधी गोष्टी त्यांनी का मानल्या असत्या ? तसेच हेही सिद्ध झाले की येशू स्वत: विद्याविहीन व बालिश नसता तर इतरांना बालवत बनण्याचा उपदेश त्याने का केला असता ? याचे कारण एवढेच की जो जसा असतो तो इतरांनाही आपल्यासारखेच बनवू इच्छितो. ॥७८॥

(७९) तेव्हा येशूने आपल्या शिष्यांस म्हटले, "मी तुम्हांस खचित सांगतो की स्वर्गाच्या राज्यात धनवानाचा प्रवेश होणे कठिण आहे. ... मी आणखी तुम्हास सांगतो की देवाच्या राज्यात धनवानाचा प्रवेश होणे यापेक्षा उंटाला सुईच्या नेढ्यातून जाणे सोपे आहे." -मत्तय, अ.१९, ओ.२३-२४.

**(समीक्षक)** यावरून हे सिद्ध होते की येशू दरिद्री होता. श्रीमंत लोक त्याला मान देत नसणार. म्हणून त्याने हे लिहिले असावे. परंतु त्याचे हे म्हणणे बरोबर नाही. कारण श्रीमंत व गरीब लोकांमध्ये बरे-वाईट असतात. जो कोणी चांगले काम करील त्याला चांगले फळ व वाईट काम करील त्याला वाईट फळ मिळते. त्यावरून हेही सिद्ध होते की येशू ईश्वरी राज्य एखाद्या विशिष्ट प्रदेशापुरते मर्यादित मानत होतो सर्वत्र नव्हे. असे असल्यामुळे तो खरा ईश्वरच नव्हे. कारण जो ईश्वर आहे त्याचे राज्य सर्वत्र आहे. शिवाय त्या स्वर्गाच्या राज्यात कोण प्रवेश करील अथवा करणार नाही असे म्हणणे हे अज्ञानजनक आहे. याप्रमाणे हेही आले की जेवढे ख्रिस्ती लोक धनाढ्य आहेत ते सारे नरकातच जातील काय ? आणि सगळे दरिद्री लोक स्वर्गात जातील काय ? येशू ख्रिस्ताने थोडा विचार केला असता की श्रीमंतांजवळ जेवढी साधनसामग्री असते तेवढी गरिबांजवळ नसते आणि धनाढ्य लोक आपल्या संपत्तीचा विनियोग विवेकपूर्वक धर्मसंमत कामांसाठी करतील तर त्यांना उत्तम गती प्राप्त होऊ शकेल आणि गरिबांजवळ साधनसंपत्ती नसल्यामुळे ते दुर्दशेत खितपत पडतील. ॥७९॥

(८०) येशूने त्यांस म्हटले की, "मी तुम्हांस खचित सांगतो की पुनरुत्पत्तीत मानवाचा पुत्र आपल्या गौरवाच्या राजसिंहासनावर बसेल तेव्हा माझ्या मागून आलेले तुम्हीही बारा राजसिंहासनावर बसून इसराईलच्या बारा वंशांचा न्यायनिवाडा कराल. ... आणि ज्या कोणी घर, भाऊ, बहिणी, बाप, आई, मुले किंवा शेते माझ्या नावाकरिता सोडली आहेत त्याला शंभरपट मिळून सार्वकालिक (अनंत) जीवन हे वतन मिळेल."

-मत्तय, अ.१९, ओ.२८-२९.

**(समीक्षक)** आता मात्र येशूच्या मनातले बिंग बाहेर पडले. आपण मेल्यानंतरही लोकांनी आपल्या जाळ्यातून निसटून जाऊ नये. ३० रुपयांच्या लोभापायी ज्याने आपल्या गुरूला म्हणजे येशूला पकडून दिले

आणि ठार मारविले तो नराधमही त्याच्या बारा शिष्यांमध्ये होता. इतरांबरोबर तोही येशूच्या सिंहासनाजवळ असणाऱ्या सिंहासनावर बसणार आणि इसराईलच्या वंशाचा पक्षपाताने न्यायनिवाडा करणार. एवढेच नव्हे तर त्यांचे सर्व गुन्हे माफ करणार आणि इतर वंशांचाही न्यायनिवाडा करणार ! यावरून असे अनुमान निघते की ख्रिस्ती लोक न्यायनिवाडा करताना ख्रिस्त्यांच्या बाबतीत पक्षपात करतात. एखाद्या गोऱ्या इसमाने काळ्या माणसाला ठार मारले असले तरी बहुधा पक्षपात करून त्याला निरपराधी ठरवितात व सोडून देतात. तसाच येशूच्या स्वर्गाचा न्यायही असाच असणार. अंतिम निवाड्याच्या एकाच दिवशी सर्वांचा न्यायनिवाडा करण्याच्या या पद्धतीत एक मोठा दोष आहे. तो असा की एक माणूस सृष्टिच्या प्रारंभीच मेला; आणि दुसरा न्यायदानाच्या आदल्या रात्री मेला. आता जो आधी मेला असेल त्याला सृष्टिच्या सुरुवातीपासून अंतिम प्रलयापर्यंत आपला न्यायनिवाडा केव्हा होणार याची वाट पहत बसावे लागणार आणि दुसऱ्याला झटपट न्याय मिळणार. हा केवढा मोठा अन्याय आहे ! शिवाय जो नरकात जाईल तो अनंत काळापर्यंत नरकातच राहणार आणि जो स्वर्गात जाईल तो सदैव स्वर्गसुखाचा उपभोग घेत राहणार. हाही मोठा अन्याय आहे. कारण अंत असणारी साधने व कर्मे यांच्या फळांनाही अंत असला पाहिजे. शिवाय दोन जीवांची पापे अथवा पुण्ये कधीच सारखी नसतात. त्यामुळे तारतम्यानुसार कमी-जास्त सुख-दुःखे असणारे अनेक स्वर्ग व नरक असतील तरच सुख-दुःखे भोगता येतील. परंतु तशा प्रकारची व्यवस्था ख्रिस्त्यांच्या मतग्रंथात कोठेच दिसत नाही. म्हणून बायबल हे ईश्वरकृत ठरू शकत नाही अथवा येशूही ईश्वराचा मुलगा होता असे म्हणता येत नाही. तसेच कोणत्याही व्यक्तीला शंभर आईबाप असू शकत नाहीत. तसे समजणे मोठा अनर्थ आहे. कारण एका व्यक्तीची एकच आई व एकच बाप असतो. पण बायबलात म्हटले आहे की, ''ज्या कोणी आई, बाप, मुले... सोडली आहेत त्याला ती शंभरपट मिळतील.'' कुरानात अनुमान आहे की मुसलमानांनी स्वर्गात ७२ स्त्रिया मिळतील असे लिहिले आहे त्याप्रमाणेच हा विचार आहे. ॥८०॥

(८१) मग सकाळी तो परत नगरास येत असता त्याला भूक लागली. ... आणि वाटेवर अंजिराचे एक झाड पाहून तो त्याकडे गेला. पण पानांवाचून त्यावर त्याला काही मिळाले नाही. मग त्याने त्याला म्हटले, ''यापुढे तुला फळ कधी न येवो.'' आणि ते अंजिराचे झाड लागलीच वाळून गेले.

**(समीक्षक)** सर्व पाद्री आणि ख्रिस्ती लोक असे सांगतात की येशू अत्यंत शांत, क्षमाशील आणि क्रोधादी दोषांपासून मुक्त होता. परंतु या घटनेवरून तो अत्यंत रागीट होता व त्याला ऋतूंविषयीचे ज्ञान नव्हते. तो जंगली स्वभावाच्या माणसासारखा वागत होता. वस्तुतः वृक्ष हा जड परंतु मोसम नसल्यामुळे त्याच्यावर फळे नव्हती. यात त्याचा काय अपराध होता ? पण येशूने त्याला शाप दिला व तो वाळून गेला. कदाचित ते झाड त्याच्या शापाने वाळले नसणार. त्याच्यावर काहीतरी औषध टाकल्यामुळे ते वाळून गेले असेल तर त्यात आश्चर्य नाही. ॥८१॥

(८२) त्या दिवसांतील संकटांमागून लागलीच सूर्य अंधकारमय होईल, चंद्र प्रकाश देणार नाही, तारे आकाशातून पतन पावतील आणि आकाशाची दळे डळमळतील. -मत्तय, अ. २४, ओ. २९.

**(समीक्षक)** वाहवा येशूबुवा ! तारे पतन पावतात ही गोष्ट तुम्ही कोणत्या विद्येच्या आधाराने जाणली ? आणि ती डळमळणारी आकाशाची सैन्ये कोणती आहेत ? येशू थोडीशी जरी विद्या शिकला असता तरी त्याने जाणले असते की सगळे तारे हे आपल्या पृथ्वीसारखेच भूगोल (ग्रहगोल) आहेत आणि ते पडत नसतात. यावरून येशू हा सुताराच्या कुळात जन्माला आला होता हे लक्षात येते. नेहमी लाकडे कापणे, तासणे, जोडणे हीच कामे तो करीत असणार. परंतु आपणही या जंगली देशात पैगंबर बनू शकू अशी कल्पना त्याला सुचली आणि तो उपदेश करू लागला. त्याच्या मुखातून अनेक चांगल्या गोष्टी बाहेर पडल्या. पण पुष्कळशा गोष्टी वाईटही होत्या. तेथील लोक जंगली होते. त्यांनी त्यांचे मानले. आजकाल युरोपातील देश जसे सुधारलेले आहेत तसे ते जुन्याकाळी असते तर येशूची बुवाबाजी मुळीच चालली नसती. आता वस्तुस्थितीचे थोडेफार ज्ञान युरोपीय लोकांना झाले असले तरी व्यावहारिक डावपेच व हटवादीपणा यांमुळे हा पोकळ मत ते सोडत नाहीत आणि सर्वस्वी सत्य वेदमार्गाचा स्वीकार करीत नाहीत. हीच काय ती त्यांच्यात उणीव आहे. ॥८२॥

(८३) आकाश व पृथ्वी नष्ट होतील परंतु माझी वचने कधीच नष्ट होणार नाहीत. -मत्तय, अ. २४, ओ. ३५.

**(समीक्षक)** हे बोलणेही अज्ञानदर्शक व मूर्खतापूर्ण आहे. आकाश नष्ट कसे होणार ? आकाश अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे ते डोळ्यांना दिसतच नाही. मग त्याचे हलणे कोण पाहू शकतो ? शिवाय आपल्याच तोंडाने आपली बढाई मारणे हे भल्या माणसांचे काम नव्हे. ॥८३॥

(८४) मग डावीकडल्यांसही तो म्हणेल, "अहो शापग्रस्तहो, सैतान व त्याचे दूत यांच्यासाठी जो सार्वकालिक (कायमचा) अग्नी तयार केला आहे त्यात माझ्या पुढून निघून जा." -मत्तय, अ. २५, ओ. ४१.

**(समीक्षक)** जे आपले शिष्य आहेत त्यांना स्वर्ग देणे आणि इतरांना अनंत अग्नीत टाकणे हा केवढा मोठा पक्षपात आहे बरे ! परंतु आकाशच उरणार नाही असे एकदा म्हटल्यानंतर जळणारी आग, नरक, स्वर्ग या गोष्टी कोठे राहणार ? ईश्वराने सैतानाला व त्याच्या दूतांना निर्माण केले नसते तर त्याला नरकाची एवढी तयारी कशाला करावी लागली असती ? आणि एक अगदी सामान्य सैतान ज्या ईश्वराला भ्याला नाही तो ईश्वर तरी कसला ? कारण सैतान हा ईश्वराचाच दूत असूनही त्याने बंड केले. त्याच वेळी त्याला पकडून तुरुंगात टाकणे अथवा मारून टाकणे ईश्वराला जमले नाही. मग त्याचे ईश्वरत्व कोठे राहिले ? सैतानाने येशूलाही चाळीस दिवस दुःख दिले, पण येशू त्याचे काही वाकडे करू शकला नाही. म्हणजे त्याचे ईश्वराचा पुत्र असणे व्यर्थच ठरले. यावरून येशू हा ईश्वराचा पुत्र आणि बायबलातील ईश्वर हा ईश्वर असू शकत नाही. ।८४॥

(८५) तेव्हा यहूदा इस्कर्योत नावाच्या बारा शिष्यांतील एकाने मुख्य याजकांकडे जाऊन म्हटले, "मी त्याला धरून तुमच्या स्वाधीन केले तर मला काय द्याल ?" त्यांनी त्याला तीस रुपये द्यावयाचे ठरविले.

-मत्तय, अ. २६, ओ. १४-१५.

**(समीक्षक)** आता पाहा. येशूची सगळी करामत आणि ईश्वरत्व यांचे रहस्य येथे उघडे पडले. कारण त्याचा जो मुख्य शिष्य होता तो यहुदीही येशूच्या प्रत्यक्ष सहवासाने पवित्रात्मा बनला नाही. मग तो येशू मेल्यानंतर इतरांना पवित्रात्मा कसा बनवू शकणार ? त्याच्यावर श्रद्धा ठेवून त्याच्या भरवशावर राहणारे लोक

कसे फसविले जातात पाहा. कारण ज्याने आपल्या प्रत्यक्ष सहवासात राहिलेल्या शिष्याचे काहीही कल्याण केले नाही तो स्वत: मेल्यावर कोणाचे काय कल्याण करू शकणार ? ॥८५॥

## गुरूचे(येशुचे) रक्त-मांसभक्षण

(८६) मग ते भोजन करीत असता येशूने भाकर घेऊन व आशीर्वाद देऊन ती मोडली आणि शिष्यांस देऊन म्हटले, ''घ्या. खा. हे माझे शरीर आहे.'' ... आणि त्याने प्याला घेतला व उपकारस्तुती करून तो त्यांस दिला व म्हटले, ''तुम्ही सर्व यातील प्या. ... हे माझे (नव्या) कराराचे रक्त आहे. हे पापांची क्षमा होण्यासाठी बहुतांकरिता ओतले जात आहे.'' -मत्तय,अ.२६,ओ.२६-२८.

**(समीक्षक)** कोणताही सभ्य माणूस अशी गोष्ट करील काय ? अविद्वान, जंगली माणसाखेरीज इतर कोणीही आपले मांस हे आपल्या शिष्यांचे अन्न आ हे आणि आपले रक्त हे त्यांचे पेय आहे असे म्हणणार आणि याच प्रकाराला आजकाल ख्रिस्ती लोक 'प्रभु भोजन' म्हणतात. म्हणजे खाद्यपेयांमध्ये येशूच मांस व रक्त आहे अशी भावना बाळगून खातात-पितात. ही किती वाईट गोष्ट आहे. ज्यांनी आपल्या गुरूचे मांस व रक्तही खाण्यापिण्याच्या भावनेतून वगळले नाही ते इतरांना कसे सोडतील ? ॥८६॥

(८७) मग त्याने पेत्र व जब्दीचे दोघे पुत्र यांस बरोबर घेतले आणि तो खिन्न व अतिकष्टी होऊ लागला. ... तेव्हा त्याने त्यास म्हटले, ''माझा जीव मरणप्राय, अति खिन्न झाला आहे. तुम्ही येथे राहा व माझ्याबरोबर जागृत असा.'' ... मग तो थोडासा पुढे जाऊन पालथा पडला आणि त्याने अशी प्रार्थना केली : ''हे माझ्या बापा, होईल तर हा प्याला मजवरून टळून जावो. तथापि माझ्या इच्छेप्रमाणे नको, तर तुझ्या इच्छेप्रमाणे होवो.'' -मत्तय, अ. २६, ओ. ३७-३९.

**(समीक्षक)** पाहा ! येशू हा केवळ एक सामान्य माणूस नसता, ईश्वराचा पुत्र, त्रिकालदर्शी व विद्वान असता तर त्याने अशी मर्कटचेष्टा केली नसती. यावरून हे स्पष्ट दिसून येते की येशू हा ईश्वराचा मुलगा असून तो त्रिकालज्ञ होता व पापाची क्षमा करणारा आहे असे येशूने अथवा त्याच्या चेल्यांनी खोटेनाटेच पसरविले आहे. यावरून येशू हा केवळ एक सामान्य, साधा, अगदीच अडाणी होता; तो विद्वान योगी किंवा सिद्ध नव्हता. ॥८७॥

(८८) तो बोलत आहे इतक्यात, पाहा, बारांतील एक जो यहूदा तो आला आणि त्याजबरोबर मुख्य याजक व लोकांचे वडील यांजकडला मोठा समुदाय तलवारी व सोटे घेऊन आला. त्याला धरून देणाऱ्याने त्यांस अशी खूण सांगून ठेवली होती की, ''मी ज्याचे चुंबन घेईल तोच तो आहे, त्याला धरा.'' मग त्याने लागलीच येशूजवळ येऊन ''गुरुजी, सलाम '' असे म्हणून त्याची पुष्कळ चुंबने घेतली. तेव्हा त्यांनी जवळ येऊन येशूला धरून अटक केली. इतक्यात सर्व शिष्य त्याला सोडून पळून गेले. शेवटी दोघे जण येऊन म्हणाले की, ''देवाचे मंदिर मोडावयास व तीन दिवसांत बांधावयास मी समर्थ आहे असे ह्याने म्हटले.'' तेव्हा प्रमुख याजक उठून त्याला म्हणाला, ''तू काहीच उत्तर देत नाहीस काय ? हे तुझ्याविरुद्ध कशी साक्ष देतात ?'' तरी

पण येशू उगाच राहिला. यावरून प्रमुख याजकाने त्याला म्हटले, "मी तुला जिवंत देवाची शपथ घालून विचारतो की, "देवाचा पुत्र ख्रिस्त तो तू आहेस की नाहीस हे आम्हांस सांग." येशू त्याला म्हणाला, "तू म्हटलेस तसेच. आणखी मी तुम्हांस सांगतो, यापुढे तुम्ही मनुष्याच्या पुत्राला सर्व समर्थाच्या उजवीकडे बसलेले व आकाशाच्या मेघांवर आरूढ होऊन येताना पाहाल." तेव्हा प्रमुख याजकाने आपली वस्त्रे फाडून म्हटले, "याने दुर्भाषण केले आहे. आम्हास आणखी साक्षीदार कशाला पाहिजे ? पाहा ? आता तुम्ही हे दुर्भाषण ऐकले आहे. तुम्हांस कसे वाटते ?" त्यांनी उत्तर दिले की, "हा मरणदंडास पात्र आहे." तेव्हा ते त्याच्या तोंडावर थुंकले व त्यांनी त्याला बुक्क्या मारल्या; आणि कोणी त्याला थापडा मारून म्हटले, "अरे ख्रिस्ता, आम्हांला अंतर्ज्ञानाने सांग, तुला कोणी मारेल ? इकडे पेत्र वाड्यात बाहेर बसला होता. तेव्हा एक दासी त्याजकडे येऊन म्हणाली, "तूही गालीलकर येशूबरोबर होतास." तो सर्वांच्या समोर नाकारून बोलला, "तू काय म्हणतेस ते मला ठाऊक नाही." मग तो बाहेर देवडीवर गेल्यावर दुसरीने त्याला पाहून तेथल्या लोकांस म्हटले, "हाही नासोरी येशूबरोबर होता." पुन: तो शपथ वाहून नाकारून बोलला, "मी त्या मनुष्याला ओळखत नाही." तेव्हा तो शापोच्चारण करून व शपथा वाहून म्हणू लागला, "मी त्या मनुष्याला ओळखत नाही." -मत्तय, अ.२६, ओ.४७-५०, ५६, ६१-७२, ७४.

**(समीक्षक)** आता तुम्हीच विचार करा. आपल्या अनुयायांमध्ये दृढ विश्वास निर्माण करण्याचे सामर्थ्य किंवा प्रभाव येशू ख्रिस्तामध्ये नव्हता. तसा विश्वास त्यांच्यामध्ये असता तर त्यांनी आपल्या प्राणांचीही पर्वा न करता लोभाच्या आहारी जाऊन आपल्या गुरूला पकडून दिले नसते, त्याला नाकारले नसते, खोटे बोलले नसते व त्यांनी खोटी शपथ घेतली नसती. तसेच तौरेतमध्ये सांगितल्याप्रमाणे येशू ख्रिस्ताच्या अंगी चमत्कार करून दाखविण्याचे सामर्थ्य नव्हते, त्यात लिहिले आहे की लुकाच्या घरी त्याच्या पाहुण्यांना मारण्याकरिता अनेक लोक आले होते. तेथे ईश्वराचे दोन दूत होते. त्यांनी त्या लोकांना आंधळे करून टाकले. तशी ही गोष्टही असंभव आहे. तथापि येशूमध्ये एवढे देखील सामर्थ्य नव्हते. तरीही आजकाल ख्रिस्ती लोकांनी येशूच्या नावावर अवाच्या सवा चमत्कारांच्या कितीतरी भाकडकथा रचून सगळीकडे पसरविल्या आहेत. असे हालहाल होऊन मरण्यापेक्षा येशूने लढा दिला असता, समाधी घेतली असती अथवा दुसऱ्या एखाद्या पद्धतीने प्राणत्याग केला असता तर ते चांगले झाले असते. परंतु येशूजवळ विद्या नसल्यामुळे अशी बुद्धी त्याला कशी सुचणार ? तोच येशू असेही म्हणतो:-

(८९) तुला असे वाटते काय की मला माझ्या पित्याजवळ मागता येत नाही आणि आता तो मला देवदूतांच्या बारा सैन्यांपेक्षा अधिक पाठवून देणार नाही ? -मत्तय, अ. २६ ओ. ५३

**(समीक्षक)** येशू ख्रिस्त धमक्याही देतो, आपल्या बापासंबंधी बढाया करीत जातो, पण काहीही करू शकत नाही. ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे पाहा ! जेव्हा महायाजकाने त्याला विचारले की, "हे लोक तुझ्याविरुद्ध साक्ष देत आहेत, त्याचे उत्तर दे." तेव्हा येशू चूप राहिला. येशूने हे चांगले केले नाही. जे काही खरे होते ते त्याने अवश्य सांगितले असते तर बरे झाले असते. त्याने आपल्या मोठेपणाच्या वल्गना करणे उचित

नव्हते आणि ज्यांनी येशूवर खोटा आरोप करून त्याला ठार मारले त्यांचे ते कृत्यही उचित नव्हते. कारण त्यांनी येशूवर जो आरोप केला होता तो त्याचा अपराध नव्हता. परंतु तेही जंगलीच होते. त्यांना न्यायाच्या गोष्टी कशा समजणार ? येशूने आपण देवाचे पुत्र आहोत असा बहाणा केला नसता आणि त्या (ज्यू) लोकांनी त्याच्याशी असे वाईट वर्तन केले नसते तर दोघांच्याही दृष्टीने चांगले झाले असते. परंतु एवढे ज्ञान, धर्मात्मता आणि न्यायशीलता त्यांच्यामध्ये कोठून असणार ? ॥८९॥

(९०) मग येशू सुभेदाराच्या पुढे जाऊन उभा राहिला असता सुभेदाराने त्याला विचारले, ''तू यहुद्यांचा राजा आहेस काय ?'' येशूने त्याला म्हटले, ''तू म्हणतोस तसेच.'' मुख्य याजक व वडील हे त्याजवर दोषारोपण करीत असता त्याने काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा पिलात त्याला म्हणाला, ''हे लोक तुझ्याविरुद्ध किती गोष्टींबद्दल साक्ष देतात, हे तू ऐकत नाहीस काय ?'' परंतु त्याने त्याला काही उत्तर दिले नाही. एका शब्दानेही नाही. यावरून सुभेदाराला फार आश्चर्य वाटले. पिलाताने त्यांस म्हटले, ''तर ख्रिस्त म्हटलेल्या येशूचे मी काय करावे ?'' सर्व म्हणाले, ''त्याला वधस्तंभावर चढवावे. क्रुसावर खिळवावे. तेव्हा त्याने त्यांच्याकरिता बरब्बाला सोडले व येशूला फटके मारून वधस्तंभावर खिळविण्याकरिता (शिपायांच्या) स्वाधीन केले. नंतर सुभेदाराच्या शिपायांनी येशूला कचेरीत नेले आणि सगळी पलटण जमवून त्याजकडे आणली. त्यांनी त्याची वस्त्रे काढून त्याच्या अंगात किरमिजी झगा घातला. काट्यांचा मुकुट गुंफून त्याच्या मस्तकावर ठेवला; त्याच्या उजव्या हातात वेताची काठी दिली आणि त्याच्यापुढे गुडघे टेकून, ''हे यहुद्यांच्या राजा, तुझा जयजयकार होवो.'' असे म्हणून त्यांनी त्याची थट्टा केली. ते त्याजवर थुंकले व तो वेत घेऊन त्याच्या मस्तकावर मारू लागले. मग त्याची थट्टा (टवाळी) केल्यावर त्यांनी त्याच्या अंगातून तो झगा काढून त्याची वस्त्रे त्यांच्या अंगात घातली आणि ते त्याला वधस्तंभावर खिळविण्याकरिता घेऊन गेले. मग गलगुथा म्हणजे कवटीची जागा या नावाने ओळखल्या जाणाऱ्या ठिकाणी पोचल्यावर त्यांनी त्याला पित्तमिश्रित द्राक्षारस प्यावयास दिला. परंतु तो चाखून पाहिल्यावर तो पिईना. तेव्हा त्यांनी त्याला वधस्तंभावर खिळविले आणि त्यांनी त्याच्या दोषारोपाचा लेख त्याच्या डोक्याच्या वर लावला. तो असा : ''हा यहुद्यांचा राजा येशू आहे.'' नंतर त्यांनी त्याज बरोबर दोन लुटारू (डाकू), एक उजवीकडे व एक डावीकडे असे वधस्तंभावर खिळविले; आणि जवळून जाणाऱ्यांनी डोकी हलवीत त्याची अशी निंदा केली की, ''अरे, मंदिर मोडून तीन दिवसांत बांधणाऱ्या, तू स्वतःचे तारण कर. तू देवाचा पुत्र असलास तर वधस्तंभावरून खाली ये.'' तसेच मुख्य याजकही, शास्त्री व वडील यांसहित थट्टा करीत म्हणाले, ''त्याने दुसऱ्यांचे तारण केले; त्याला स्वतःचे तारण करता येत नाही. तो इसराईलांचा राजा आहे. त्याने आता वधस्तंभावरून खाली यावे. म्हणजे आम्ही त्याजवर विश्वास ठेवू. तो देवावर भरवसा ठेवतो. त्याला तो प्रिय असेल तर त्याने त्याला आता सोडवावे. कारण 'मी देवाचा पुत्र आहे', असे तो म्हणाला होता.'' जे लुटारू त्याच्या बरोबर वधस्तंभावर खिळले होते त्यांनीही त्याची अशीच निंदा केली. मग दुसऱ्या प्रहरापासून तिसऱ्या प्रहरापर्यंत सर्व देशात अंधार पडला आणि सुमारे तिसऱ्या प्रहरी येशू मोठ्याने आरोळी मारून बोलला, ''एलोई, एलोई, लमा सबक्तनी ! म्हणजे माझ्या देवा, माझ्या देवा, तू माझा त्याग का केलास ?'' तेथे उभे होते त्यांच्यातील कित्येकांनी हे ऐकून म्हटले, ''तो

एलीयाला बोलावतो.'' मग त्यांच्यातून एकाने लागलीच धावत जाऊन स्पंज घेतला आणि तो आंबेने भरून वेतावर ठेवून त्याला प्यावयास दिला. मग येशूने पुन: मोठ्याने ओरडून प्राण सोडला.'' -मत्तय, अ.२७, ओ.११-१४, २२, २६-३१, ३३-३५, ३७-४८, ५०.

**(समीक्षक)** त्या दुष्टांनी येशूशी अत्यंत वाईट वर्तन केले. परंतु येशूचाही दोष आहे. कारण ईश्वराचा कोणी पुत्र नाही आणि ईश्वर कुणाचा बाप नाही. तो कोणाचा बाप बनला तर कोणाचा तरी सासरा, मेहुणा, सोयरा वगैरेही होईल. तसेच जेव्हा अध्यक्षाने त्याला विचारले तेव्हा त्याने जे काही खरे होते ते सांगायला हवे होते. त्याने जे अद्भुत चमत्कार पूर्वी करून दाखविले असे सांगितले जाते ते खरे असते तर आताही सुळीवरून (क्रूसावरून) उतरून त्याने सर्वांना आपले अनुयायी बनविले असते. तसेच तो ईश्वराचा पुत्र असता तर ईश्वरानेही त्याला वाचविले असते. तो त्रिकालदर्शी असता तर पित्तमिश्रित द्राक्षारसाला ते आधीच कळले असते. तो चमत्कार करणारा असता तर त्याने आरोळी मारू प्राण का सोडला ? यावरून हे ओळखले पाहिजे की वाटेल तेवढी चलाखी केली तरी शेवटी खरे ते खरे व खोटे ते खोटेच ठरते. यावरून हेही सिद्ध झाले की येशू हा त्या काळच्या जंगली माणसांपैकी थोडाफार बरा माणूस होता. तो चमत्कार करणारा , ईश्वराचा पुत्र आणि विद्वानही नव्हता. कारण तो तसा असता तर त्याला असे दु:ख का भोगावे लागले असते ? ॥९०॥

(९१) तेव्हा पाहा, मोठा भूकंप झाला; कारण प्रभूचा दूत स्वर्गातून उतरला, त्याने येऊन धोंड एकीकडे लोटली आणि तिच्यावर तो बसला. ... तो येथे नाही, कारण त्याने सांगितल्याप्रमाणे तो उठलाआहे. ... या, प्रभू निजला होता ते हे स्थळ पाहा. ... तेव्हा त्या स्त्रिया त्याच्या शिष्यांस हे वर्तमान सांगावयास धावत गेल्या. मग पाहा, येशू त्यांस भेटून म्हणाला, ''कल्याण असो.'' त्यांनी जवळ जाऊन त्याचे चरण धरून त्यास नमन केले. ... तेव्हा येशूने त्यांस म्हटले, ''भिऊ नका. जा आणि हे माझ्या भावांस सांगा. यासाठी की त्यांनी गालीलात जावे. तेथे मी त्यांच्या दृष्टीस पडेन.'' ... इकडे अकरा शिष्य गालीलात जो डोंगर येशूने नेमिला होता त्यावर गेले. ... आणि त्यांनी त्याला पाहून नमन केले, तरी कित्येकांस संशय वाटला. ...तेव्हा येशू त्याच्या जवळ येऊन त्यांस म्हणाला, ''स्वर्गात आणि पृथ्वीवर सर्व अधिकार मला दिला आहे. ... आणि पाहा, जगाच्या अंतापर्यंत मी सदैव तुम्हांबरोबर आहे.'' -मत्तय, अ.२८, ओ.२,६,९,१०,१६-१८,२०.

**(समीक्षक)** ही गोष्टही विश्वास ठेवण्यासारखी नाही. कारण ती सृष्टिक्रमाविरुद्ध व विद्याविरोधी आहे. ईश्वराजवळ दूत असणे, त्यांना इकडे-तिकडे पाठविणे, स्वर्गातून खाली आणणे या गोष्टींवर विश्वास ठेवायचा म्हणजे ईश्वराला मामलेदार किंवा कलेक्टर बनविणेच नाही काय ? येशू त्याच शरीरासह स्वर्गात गेला आणि जिवंत झाला काय ? कारण त्या स्त्रियांनी त्याचे पाय धरून प्रणाम केला, तेव्हा त्याचे तेच शरीर होते काय ? आणि तीन दिवसांत ते शरीर सडले कसे नाही ? तसेच स्वत:च्या तोंडाने सर्वांचा अधिकारी म्हणणे हे शुद्ध ढोंग आहे. शिष्यांना भेटणे आणि त्यांच्याशी सर्व गोष्टी बोलणे हे अशक्य आहे. कारण जर ते सारे खरे असेल तर आजकाल कोणी मेलेली माणसे जिवंत का होत नाहीत ? आणि त्याच शरीरासह स्वर्गात का जात नाहीत ? ॥९१॥

हे सारे मत्तयकृत शुभवर्तमानाविषयी झाले. आता मार्ककृत शुभवर्तमानाविषयी लिहितो.

## मार्ककृत शुभवर्तमान

(९२) जो सुतार, मरीयेचा पुत्र, तो हाच आहे ना? -मार्क, अ.६, ओ.३.

**(समीक्षक)** वस्तुतः युसूफ हा सुतार होता. म्हणून येशूही सुतार होता. तो अनेक वर्षे सुताराचे काम करीत होता. त्यानंतर पैगंबर (प्रेषित) बनण्याचा प्रयत्न करता-करता तो देवाचा पुत्रच बनला आणि जंगली लोकांनीही त्याला देवाचा पुत्र मानले. तेव्हा मोठी करामात केली त्याने लोकांमध्ये फाटाफूट निर्माण केली. ॥९२॥

## लूककृत शुभवर्तमान

(९३) येशू त्याला म्हणाला, "तू मला उत्तम का म्हणतोस? एकावाचून म्हणजे देवावाचून कोणी उत्तम नाही." -लूक, अ.१८, ओ.१९.

**(समीक्षक)** जर येशूच एकमेव ईश्वर म्हटला जातो तर ख्रिश्चनांनी पवित्रात्मा, पिता व पुत्र हे तीन कोठून आणले? ॥९३॥

(९४) तेव्हा त्याने हेरोदाकडे पाठविले ... येशूला पाहून हेदोराला फार संतोष झाला. कारण त्याजविषयी ऐकल्यावरून त्याला भेटावे अशी बऱ्याच दिवसांपासून त्याची इच्छा होती; आणि त्याच्या हातून झालेले एखादे अद्‌भुत कृत्य दृष्टीस पडेल अशी त्याला आशा होती. ... त्याने त्याला बरेच प्रश्न केले; परंतु त्याला काही उत्तर दिले नाही. -लूक, अ.२३, ओ.७-९.

**(समीक्षक)** ही घटना मत्तयकृत शुभवर्तमानामध्ये नाही. यावरून साक्षदार लोकात मतभेद दिसतात म्हणून त्यांच्या साक्षीला काही अर्थ उरत नाही. कारण सर्व साक्षीदारांनी एकच गोष्ट सांगितली पाहिजे. तसेच येशू चतुर व चमत्कारी असता तर त्याने उत्तर दिले असते; आणि त्याने चमत्कार दाखविला असता. यावरून हेच सिद्ध होते की येशूजवळ विद्या व अद्‌भुत शक्ती मुळीच नव्हती. ॥९४॥

## योहानकृत शुभवर्तमान

(९५) प्रारंभी शब्द होता, शब्द देवासह होता आणि शब्द देव होता. ... तोच प्रारंभी देवासह होता. ... सर्व काही त्याच्या द्वारे झाले आणि जे काही झाले ते त्याच्यावाचून झाले नाही. त्याच्या ठायी जीवन होते; व ते जीवन मनुष्यांचा प्रकाश होते. -योहान, अ. १, ओ.१-४.

**(समीक्षक)** प्रथम वक्त्याशिवाय शब्द असू शकत नाही आणि शब्द देवाबरोबर होता असे म्हणणे निरर्थक ठरते. तसेच शब्द हा कधीही ईश्वर होऊ शकत नाही. कारण आधी शब्द देवासह होता असे म्हटल्यास देवाच्या पूर्वी शब्द अथवा शब्दाच्या आधी देव होता असे म्हणता येणार नाही. जोपर्यंत सृष्टिच्या उत्पत्तिचे कारण विद्यमान नसेल तोपर्यंत शब्दाद्वारे सृष्टिची निर्मिती मुळीच होऊ शकत नाही आणि शब्दाशिवाय, काहीही न बोलता, सृष्टिकर्ता सृष्टिची निर्मिती करू शकतो. जीव काय होते आणि ते कशात होते? या वचनानुसार जीव अनादी आहेत असे तुम्ही मानाल. ते अनादी असतील तर 'आदमाच्या (माणसाच्या) नाकपुड्यांत परमेश्वराने श्वास फुंकला' हे विधान खोटे ठरते आणि जीवन हे फक्त माणसांच्या दृष्टीनेच प्रकाश होते काय? पशुपक्ष्यादिकांचा तो प्रकाश नाही काय? ॥९५॥

(९६) (आणि रात्रीच्या भोजनाच्या वेळी) शिमोनाचा पुत्र यहूदा इस्कर्योत ह्याच्या मनात त्याला धरून द्यावे असे सैतान घालून चुकला होता. -योहान, अ. १३, ओ. २.

**(समीक्षक)** ही गोष्ट खरी नाही. कारण खिश्चनांना असे विचारता येईल की, "जर सैतान सर्वांना भुरळ घालतो किंवा भडकवितो तर सैतानाला कोण भडकवितो ?" सैतान स्वत:च बहकत असेल तर माणूसही आपोआप, स्वत:च बहकू शकतो. मग सैतानाचे काय काम ? परंतु जर सैतानाला उत्पन्न करणारा आणि भडकविणारा परमेश्वर असेल तर तोच सैतानाचा सैतान खिस्त्यांचा ईश्वर ठरतो. परमेश्वरानेच सर्वांना सैतानाद्वारे भडकविले. असली कामे ईश्वराची असू शकतात काय ? खरी गोष्ट अशी आहे की ज्यांनी खिस्त्यांचा हा मंतग्रंथ रचला आणि येशू हा देवाचा पुत्र आहे म्हटले तेच बहुधा सैतान असावेत. बाकी हा मतग्रंथ ईश्वरकृत नाही, यात वर्णिलेला ईश्वर हा खरा ईश्वर नाही आणि येशू हा देवाचा पुत्र होऊ शकत नाही. ॥९६॥

## येशू ईश्वराचा अवतार ?

(९७) तुमचे अंत:करण अस्वस्थ होऊ देऊ नका. देवावर विश्वास ठेवा आणि मजवरही विश्वास ठेवा. ... माझ्या पित्याच्या घरात राहण्याच्या जागा पुष्कळ आहेत. त्या नसत्या तर मी तुम्हास सांगितले असते की, "मी तुम्हासाठी जागा तयार करावयास जातो." ... आणि मी जाऊन तुम्हांसाठी जागा तयार केली म्हणजे पुन: येऊन तुम्हांस आपल्याजवळ घेईन. यासाठी की जेथे मी आहे तेथे तुम्हीही असावे. ... येशूने त्याला म्हटले, "मार्ग, सत्य व जीवन मीच आहे. माझ्याद्वारे आल्यावाचून पित्याजवळ कोणी जात नाही. ... मी कोण आहे हे तुम्ही ओळखले असते तर माझ्या पित्यालाही ओळखले असते." -योहान, अ.१४, ओ.१-३, ६,७.

**(समीक्षक)** आत पाहा. येशूचे हे उद्गार पोपांच्या लीलेपेक्षा कमी आहेत काय ? त्याने असला प्रपंच रचला नसता तर त्याच्या पंथात कोण अडकले असते ? येशूने आपल्या बापाचा मक्ता घेतला आहे काय ? जर ईश्वर येशूच्या अधीन असेल तर तो पराधीन झाल्याने तो ईश्वरच नव्हे कारण ईश्वर कुणाचीही शिफारस ऐकत नाही. येशूच्या पूर्वी कोणालाच ईश्वरप्राप्ती झाली नव्हती काय ? अशा प्रकारे स्थान वगैरेचे प्रलोभन देणारा आणि आपल्याच तोंडाने स्वत: मार्ग, सत्य व जीवन सांगणारा पूर्णपणे ढोंगी समजला जातो. म्हणून ही गोष्ट कधीही खरी असू शकत नाही. ॥९७॥

(९८) मी तुम्हास खचित सांगतो की, "मी जी कृत्ये ती मजवर विश्वास ठेवणाराही करील आणि त्यांपेक्षा मोठी करील." -योहान, अ.१४, ओ.१२.

**(समीक्षक)** आता पाहा. जे खिस्ती लोक येशूवर पूर्ण श्रद्धा ठेवतात ते येशूप्रमाणेच मृतांना जिवंत करणे वगैरे गोष्टी का करू शकत नाहीत ? आणि जर ते श्रद्धेच्या बळावर चमत्कार करू शकत नसतील तर येशूने देखील चमत्कार केले नव्हेत असेच ठामपणे समजले पाहिजे. कारण स्वत: येशूच सांगतो की तुम्हीही चमत्कार करून दाखवाल. तरीही आजकाल कोणी खिस्ती माणूस एकही चमत्कार करून दाखवू शकत नाही. येशूने मृतांना जिवंत केले वगैरे गोष्टींवर विश्वास ठेवणाऱ्याचे अंतश्चक्षू फुटलेच आहेत असे म्हटले पाहिजे. ॥९८॥

(९९) तू एकच खरा देव आहेस. -योहान, अ.१७, ओ.३.

**(समीक्षक)** जर तो एकच ईश्वर असेल तर ख्रिस्ती लोकांनी पिता, पुत्र व पवित्र आत्मा ही तीन ईश्वर आहेत असे म्हणणे साफ खोटे आहे. ॥९९॥

बायबलामध्ये अशा प्रकारच्या अवास्तव गोष्टी भरलेल्या आहेत.

## योहानाला झालेले प्रकटीकरण

आता योहानाच्या अद्‌भुत गोष्टी ऐका :

(१००) राजासनाभोवती चोवीस आसने आहेत; आणि त्या आसनांवर शुभ्र वस्त्रे परिधान केलेले व डोक्यांवर सोन्याचे मुकुट घातलेले चोवीस वडील बसलेले आहेत, असे दृष्टीस पडले. ... राजासनाच्या आतून विजा, पाणी व गर्जना निघत आहेत. सात अग्निरूपी मशाली राजासनापुढे जळत आहेत. ते देवाचे सात आत्मे आहेत. ... राजासनापुढे स्फटिकासारखा जसा काय काचेचा समुद्र आहे आणि राजासनाच्या मध्यभागी व राजासनाच्या चार बाजूंस, पुढे व मागे डोळ्यांनी भरलेले असे चार प्राणी आहेत. -योहान, प्र.अ. ४, ओ.४-६.

**(समीक्षक)** आता पाहा ! एखाद्या शहरासारखा ख्रिस्त्यांचा स्वर्ग आहे; आणि त्यांचा ईश्वरही दीपकाप्रमाणे अग्नि आहे. सोन्याचे मुकुट वगैरे आभूषणे धारण करणे आणि मागे-पुढे डोळे असणे या असंभवनीय गोष्टी आहेत. तेथे सिंह वगैरे चार पशू असल्याचेही लिहिले आहे. असल्या या गोष्टींवर कोणाचा विश्वास बसेल ? ॥१००॥

(१०१) जो राजासनावर बसलेला होता त्याच्या उजव्या हातावर पाठपोट लिहिलेली व सात शिक्के (सिले) मारून बंद केलेली अशी पुस्तकाची एक गुंडाळी मी पाहिली. ... आणि पुस्तकाचे शिक्के फोडून ते उघडावयास कोण योग्य आहे, असे मोठ्याने ओरडणारा एक बलवान देवदूत मी पाहिला. ... तेव्हा स्वर्गात, पृथ्वीवर किंवा पृथ्वीखाली कोणी हे पुस्तक उघडावयास किंवा पाहावयास समर्थ नव्हता. ... हे पुस्तक उघडावयास किंवा त्यात पाहावयास योग्य असा कोणी आढळला नाही, म्हणून मी फार रडलो.

-योहान, अ.५, ओ. १-४.

**(समीक्षक)** आता पाहा ! ख्रिस्ती लोकांच्या स्वर्गातील सिंहासनाचे व मनुष्यांचा थाटमाट आणि तेथे अनेक शिक्के असलेले मोहोरबंद पुस्तक आहे. ते पुस्तक उघडण्यास व त्यात डोकावून पाहण्यास समर्थ असा कोणी स्वर्गात अथवा पृथ्वीवर मिळाला नाही यामुळे योहान रडू लागला. यावर एक वृद्ध माणूस म्हणाला की येशू ते पुस्तक उघडणारा आहे. याचा अर्थ एवढाच की ज्याचे लग्न त्याचे गुणगान. अशा प्रकारे येशूचे माहात्म्य ठसविण्याचा प्रयत्न केला गेला आहे. परंतु ह्या सर्व सांगावयाच्या गोष्टी आहेत. ॥१०१॥

(१०२) तेव्हा राजासन व चार प्राणी यांच्यामध्ये आणि वडीलमंडळ यांच्यामध्ये, ज्याचा जणू काय वध करण्यात आला होता असे कोकरू उभे असलेले मी पाहिले. त्याला सात शिंगे व सात डोळे होते. ते सगळे पृथ्वीवर पाठविलेले देवाचे सात आत्मे आहेत. -योहान, प्र.अ. ओ. ५,६.

**(समीक्षक)** आता योहानाच्या स्वप्नातील मनोव्यापार पाहा. त्या स्वर्गामध्ये सगळे ख्रिस्ती चार पशु व येशूही आहे. इतर कोणी नाही. तेथे एक अद्‌भुत गोष्ट घडली की येथे तर येशूला दोन डोळे होते आणि एकही शिंग नव्हते, तो स्वर्गात गेल्यावर सात शिंगे आणि सात डोळ्यावाला झाला आणि ते सात डोळे व शिंगे ईश्वराचे आत्मे बनले होते. अरेरे! असल्या गोष्टींवर ख्रिस्ती लोकांनी का बरे विश्वास ठेवला? भले! बुद्धीचा थोडा तरी उपयोग करते. ॥१०२॥

(१०३) त्याने पुस्तक घेतले तेव्हा ते चार प्राणी व चोवीस वडील (पुरुष) कोकराच्या पाया पडले. त्या प्रत्येकाजवळ वीणा व धूपाने भरलेली सोन्याची धुपाटणी होती. ती म्हणजे पवित्र जनांच्या प्रार्थना होत.

-योहान, प्र.अ.५, ओ.८.

**(समीक्षक)** जेव्हा येशू स्वर्गात नसेल तेव्हा हे बिचारे धूप, दिप, नैवेद्य, आरती इत्यादींनी कोणाची पूजा करीत असतील? येथे प्रॉटेस्टंट ख्रिश्चन मूर्तिपूजेचे खंडन करतात आणि त्यांचा (कॅथलिकांचा) स्वर्ग हे मूर्तिपूजेचे घर बनले आहे. ॥१०३॥

(१०४) मग कोकराने सात शिक्क्यांपैकी एक शिक्का (सील) फोडला तेव्हा मी पाहिले तो चार प्राण्यांतील एकाला गर्जनेसारख्या वाणीने 'ये' असे म्हणताना मी ऐकले. ... मग मी पाहिले तो पांढरा घोडा आणि त्याजवर बसलेला एक स्वार दृष्टीस पडला. त्याच्याजवळ धनुष्य होते व त्याला मुकुट देण्यात आला. तो विजय मिळवीत मिळवीत आणखी विजयावर विजय मिळविण्यास निघून गेला. ... त्याने दुसरा शिक्का फोडला तेव्हा मी दुसऱ्या प्राण्याला 'ये' असे म्हणताना ऐकले. ... तेव्हा दुसरा घोडा निघून गेला. तो अग्निवर्ण (लाल) होता; आणि त्यावर बसलेल्या इसमाकडे पृथ्वीची शांती हरण करण्याचे आणि लोकांकडून एकमेकांचा वध करविण्याचे काम सोपविले होते. त्याला मोठी तलवार दिलेली होती. ... त्याने तिसरा शिक्का फोडला तेव्हा मी तिसऱ्या प्राण्याला 'ये' असे म्हणताना ऐकले. ... मग मी पाहिले तो काळा घोडा आणि त्यावर बसलेला कोणी एक दृष्टीस पडला. त्याच्या हातात तागडी होती. ... त्याने चौथा शिक्का फोडला तेव्हा मी चौथ्या प्राण्याला 'ये' असे म्हणताना ऐकले. ... मग मी पाहिले तो फिकट घोडा, आणि त्यावर बसलेला एक पुरुष दृष्टीस पडला. त्याचे नाव मृत्यु. .. इत्यादी. -योहान, प्र.अ., ओ.१-५, ७-८.

**(समीक्षक)** आता पाहा. पुराणातील भाकडकथांपेक्षा या गोष्टी जास्त हास्यास्पद व खोट्या आहेत की नाहीत? एखाद्या पुस्तकाच्या शिलबंदीत घोडा व घोडेस्वार कसे काय सामावू शकले असतील? हे स्वप्नातले बरळणे ज्यांनी खरे मानले आहे त्यांच्यात अविद्या जितकी म्हणावी ती थोडीच आहे. ॥१०४॥

(१०५) ते मोठ्याने ओरडून म्हणाले, "हे प्रभो, जो तू पवित्र व सत्य आहेस तो तू न्यायनिवाडा करीत नाहीस; आणि पृथ्वीवर राहणाऱ्या लोकांपासून आमच्या रक्ताचा सूड घेत नाहीस. हे किती काळ चालणार? ... तेव्हा त्या प्रत्येकास एक एक शुभ्र झगा देण्यात आला; आणि त्यांस असे सांगण्यात आले की तुमच्या सोबतीचे दास व तुमचे बंधू तुम्हांसारखे जिवे मारले जाणार. त्यांची संख्या पूर्ण होईपर्यंत तुम्ही आणखी थोडा वेळ स्वस्थ राहा." -योहान, प्र. अ.६, ओ.१०-११.

**(समीक्षक)** जे कोणी खिस्ती असतील ते न्यायासाठी न्यायाधीशाच्या हवाली असल्याने त्यांना न्याय मिळविण्यासाठी रडत बसावे लागेल. परंतु जो वैदिक मताचा स्वीकार करील त्याला न्याय मिळण्यात मुळीच विलंब लागणार नाही. खिस्त्यांना विचारले पाहिजे की, ''ईश्वराचे न्यायालय आजकाल बंद आहे काय ? न्यायदानाचे काम हल्ली होत नाही काय ? न्यायाधीश रिकामे बसले आहेत काय ?'' या प्रश्नांना योग्य उत्तरे ते देऊ शकणार नाही. खिस्त्यांच्या ईश्वराला भुरळ घालणे फार सोपे आहे व तो सुद्धा बहकावण्यास येतो कारण त्यांच्या सांगण्यावरून तो तावडतोब त्यांच्या शत्रूवर सूड घेऊ लागतो. हे खिस्ती लोक खुनशी स्वभावाचे आहेत. ते मेल्यानंतरही शत्रूवर सूड उगवितात. त्यांच्यामध्ये सहनशीलता मुळीच नाही आणि जेथे मन:शांती नसेल तेथे दु:खाला काही सीमा उरत नाही. ॥१०५॥

(१०६) उंबराचे झाड मोठ्या वाऱ्याने हलले म्हणजे त्याची कच्ची फळे जशी खाली पडतात तसे आकाशातील तारे पृथ्वीवर पडले. ... एखादे पुस्तक गुंडाळावे तसे आकाश गुंडाळले जाऊन निघून गेले.

-योहान, प्र. अ.६, ओ.१३-१४.

**(समीक्षक)** आता पाहा ! भविष्यवाणी उच्चारणाऱ्या योहानाजवळ विद्या किंवा ज्ञान नाही म्हणून तो असा बरळतो. सगळे तारे हे भूगोल (खगोल) असल्यामुळे ते एका पृथ्वीवर कसे पडू शकतील ? आणि सूर्यादिकांचे गुरुत्वाकर्षण त्यांना इकडे-तिकडे कसे जाऊ देईल ? आणि तो आकाशाला चटईसारखे समजतो काय ? वस्तुत: आकाश हा साकार पदार्थ नाही. त्यामुळे त्याला कोणीही गुंडाळून गोळा करू शकत नाही. सारांश, योहान वगैरे सर्व जंगली माणसे होती. त्यांना या गोष्टी काय माहीत असणार ? ॥१०६॥

(१०७) ज्यांच्यावर शिक्का करण्यात आला त्यांची संख्या मी ऐकली. इसराईल लोकांच्या सर्व वंशांपैकी एकशे चव्वेचाळीस हजारांवर शिक्का मारण्यात आला. ... यहूदाच्या वंशापैकी बारा हजारांवर शिक्का मारण्यात आला. -योहान, प्र. अ.७, ओ.४-५.

**(समीक्षक)** बायबलातील ईश्वर हा फक्त इसराईल वगैरे जमातींचाच स्वामी आहे की सगळ्या जगाचा ? तो फक्त त्यांचाच ईश्वर नसता तर त्याने त्या जंगली लोकांचीच बाजू का घेतली असती ? त्यांचीच सहायता करीत होता. तो इतरांचे नावही घेत नाही. म्हणून तो ईश्वरच नाही आणि योहानाने इसराईल जमातीच्या माणसांवर शिक्का मारणे ही त्यांची अल्पज्ञता आहे अथवा ती त्यांची चुकीची कल्पना आहे. ॥१०७॥

(१०८) यामुळे ते ईश्वराच्या सिंहासनासमोर आहेत. ते अहोरात्र त्याच्या मंदिरात त्याची सेवा करतात.

-योहान प्र. अ. ७, ओ. १५.

**(समीक्षक)** ही महा मूर्तिपूजा नाही काय ? अथवा त्यांचा ईश्वर देहधारी मनुष्यासमान एकदेशी नाही आहे ? आणि खिस्त्यांचा ईश्वर रात्री झोपतही नाही. तो रात्री झोपत असता तर रात्री त्याची पूजा कशी करीत असतील ? आणि त्याची झोपही उडत असणार ! जर तो अहोरात्र जागा राहत असेल तर तो विक्षिप्त किंवा महान रोगी असेल. ॥१०८॥

(१०९) मग दुसरा एक देवदूत येऊन वेदीपुढे उभा राहिला. त्याच्याजवळ सोन्याचे धुपाटणे होते आणि

सर्व पवित्र जनांच्या प्रार्थनांसह राजासनासमोरच्या सोन्याच्या वेदीवर धूप ठेवण्याकरिता त्याच्याजवळ पुष्कळ धूप दिला होता. ... देवदूताच्या हातातून धुपाचा धूर पवित्र जनांच्या प्रार्थनांसह देवासमोर वर चढला. ... तेव्हा देवदूताने धुपाटणे घेऊन त्यात वेदीवरचा अग्नी भरून पृथ्वीवर टाकला. त्यावेळी गर्जना, वाणी, विजा व भूमिकंपही झाला. -योहान, प्र.अ.८, ओ. ३-५.

**(समीक्षक)** आता पाहा ! स्वर्गातही वेदी, धूप, दीप, नैवेद्य आणि तुतारीचा निनाद आहे. येथील बैराग्यांच्या देवळापेक्षा ख्रिस्त्यांचा स्वर्ग काही कमी आहे काय ? काही तेथील थाटमाट जास्तच आहे.॥१०९॥

(११०) पहिल्या देवदूताने कर्णा (तुतारी) वाजविला तो रक्तमिश्रित गारा व अग्नी उत्पन्न होऊन त्यांची पृथ्वीवर वृष्टी झाली. तेव्हा पृथ्वीचा तृतीयांश भाग जळून गेला. झाडांचा तृतीयांश भाग जळून गेला व सर्व हिरवे गवत जळून गेले. -योहान, प्र. अ.८, ओ.७.

**(समीक्षक)** वाहवा ! ख्रिस्ती भविष्यवाद्यांनो ! ईश्वर, ईश्वराचे दूत, तुतारीचा निनाद आणि प्रलयाची लीला हा सगळा बालिश खेळ दिसत आहे. ॥११०॥

(१११) पाचव्या देवदूताने कर्ण वाजविला, तो एक तारा आकाशातून पृथ्वीवर पडलेला माझ्या दृष्टीस पडला; त्याच्याजवळ अगाध कूपाची किल्ली दिली होती. ... त्याने अगाधकूप उघडला तो त्यातून मोठ्या भट्टीच्या धुरासारखा धूर बाहेर येऊन वर चढला; आणि कूपाच्या धुराने सूर्य व अंतराळ ही अंधकारमय झाली. ... त्या धूरातून टोळ निघून पृथ्वीवर उतरले. त्यांस पृथ्वीवरील विंचवांसारखी शक्ती दिली हाती. ... त्यांस असे सांगितले होते की, पृथ्वीवरील गवताला, कोणत्याही हिरवळीला व कोणत्याही झाडाला उपद्रव करू नये; तर ज्या माणसांच्या कपाळावर देवाचा शिक्का नाही त्यांना मात्र (त्रास) द्यावा. ... त्यांना जिवे मारण्याचे काम त्यांजकडे सोपविले नव्हते. तर फक्त पाच महिने पीडा देण्याचे सोपविले होते. त्यापासून होणारी पीडा विंचू माणसाला नांगी मारतो तेव्हा होणाऱ्या पीडेसारखी होती. -योहान प्र. अ. ९, ओ.१-५.

**(समीक्षक)** तुतारीचा आवाज ऐकून तारे त्याच दूतांवर आणि त्याच स्वर्गात पडले असतील ! येथे पृथ्वीवर तर पडले नाहीत. तो कूप अथवा टोळही ईश्वराने प्रलयासाठी पाळले असतील ? त्यांना तो शिक्का पाहून व वाचूनही घेता येत असेल की शिक्क्यावाल्यांना चावू नका. हे सारे केवळ भोळ्याभाबड्या लोकांना घाबरवून ख्रिस्ती बनविण्यासाठी वापरलेले फसवणुकीचे डावपेच आहेत. तुम्ही ख्रिस्ती झाला नाही तर तुम्हाला टोळ चावतील, असल्या गोष्टी विद्याविहीन देशांत चालू शकतात. आर्यावर्तात त्या चालणार नाहीत. काय प्रलयाची ही गोष्ट होऊ शकते ? ॥१११॥

(११२) घोडेस्वारांच्या सैन्यांची संख्या वीस कोटी होती. -योहान प्र. ओ.९,१६.

**(समीक्षक)** इतके घोडे स्वर्गात कोठे राहत असतील ? कोठे चरत असतील ? त्यांच्याा पागा कोठे असतील ? आणि त्यांची किती लीद पडत असेल ? आणि त्या लिदीचा केवढा दुर्गंध स्वर्गात पसरत असेल ? बस्स ! असला स्वर्ग, असला ईश्वर आणि असला पंथ यांना आम्ही आर्यांनी तिलांजलि दिली आहे. सर्वशक्तिमान परमेश्वराच्या कृपेने ख्रिस्ती लोकांच्या शिरांवरील ख्रिस्ती पंथाचे हे थोतांड नाहीसे होईल तर फार बरे होईल. ॥११२॥

(११३) मी दुसरा एक बलवान देवदूत स्वर्गातून उतरताना पाहिला. तो मेघवेष्टित असून त्याच्या डोक्यावर मेघधनुष्य (इंद्रधनुष्य) होते. त्याचे तोंड सूर्यासारखे व त्याचे पाय अग्निस्तंभासारखे होते. ... त्याच्या हाती उघडलेले एक लहानसे पुस्तक होते. त्याने आपला उजवा पाय समुद्रावर व डावा पाय भूमीवर ठेवला आणि तो सिंहगर्जनेप्रमाणे मोठ्याने ओरडला. -योहान प्र.अ. १०, ओ.१-२.

**(समीक्षक)** आता तुम्हीच पाहा. बायबलातील देवदूतांच्या या कथा आमच्या पुराणातील व भाटचारणांच्या भाकडकथांहून काकणभर जास्तच नाहीत काय ? ॥११३॥

(११४) नंतर काठीसारखा एक बोरू कोणीतरी मला दिला आणि म्हटले, ''ऊठ ! देवाचे मंदिर, वेदी व त्यात उपासना करणारे लोक यांचे माप घे !'' -योहान प्र. अ. ११, ओ.१.

**(समीक्षक)** खिस्त्यांची देवळे इहलोकीच नव्हे तर स्वर्गातही बांधली जातात व त्यांचे मोजमाप होते ! त्यांच्या स्वर्गासारखाच त्यांच्या गोष्टी ही आहेत. म्हणूनच येथे प्रभुभोजनामध्ये येशूच्या शरीराचे अवयव, मांस व रक्त यांची भावना (कल्पना) करून खातात, पितात. आपल्या गिरजाघरात ते क्रूस (सूळी) वगैरेचा आकार बनवितात. ती तर मूर्तिपूजाच आहे. ॥११४॥

(११५) तेव्हा स्वर्गातील देवाचे मंदिर उघडले; आणि त्याच्या मंदिरात त्यांच्या कराराची पेटी दृष्टीस पडली. -योहान प्र. अ.११, ओ.१९.

**(समीक्षक)** स्वर्गात जे मंदिर आहे ते नेहमी बंद राहत असावे. ते कधी-कधी उघडले जात असावे. काय परमेश्वराचेही कोणी मंदिर होऊ शकते काय ? जो वेदोक्त परमात्मा सर्वव्यापक आहे त्याचे कोणतेही मंदिर असू शकत नाही. परंतु खिस्त्यांचा परमेश्वर साकार असल्यामुळे त्याचे मंदिर मात्र असू शकते मग ते स्वर्गात असो की पृथ्वीवर ! आणि येथे जशा तुताऱ्या फुंकल्या जातात व घंटा वाजविल्या जातात तशा त्या खिस्ती लोकांच्या स्वर्गातही वाजविल्या जातात आणि नियम असलेली पेटीही अधून-मधून खिस्ती लोक पाहत असावेत. त्यातून त्यांचे कोणते उद्दिष्ट साध्य होत असेल कोण जाणे. खरे म्हणजे या सगळ्या गोष्टी लोकांना आकर्षित करण्यासाठी आहेत. ॥११५॥

(११६) नंतर स्वर्गात एक मोठे आश्चर्य दृष्टीस पडले. एक स्त्री दिसली. तिने अंगात सूर्य घातला होता आणि तिच्या पायाखाली चंद्र व तिच्या मस्तकावर बारा ताऱ्यांचा मुकुट होता. ... ती गरोदर होती आणि वेणा देऊन प्रसूतीच्या कष्टांनी ओरडत होती. ... स्वर्गात दुसरा एक चमत्कार दृष्टीस पडला. पाहा ! एक मोठा अग्निवर्ण (लाल) अजगर दिसला. त्याला सात डोकी व दहा शिंगे होती; आणि त्याच्या डोक्यावर सात मुकुट होते. ... त्याच्या शेपटीने आकाशातील ताऱ्यांचा एक तृतीयांश भाग ओढून घेऊन तो पृथ्वीवर पाडला.

-योहान प्र.अ. १२, ओ. १-४.

**(समीक्षक)** आता यांच्या या प्रचंड थापा पाहा ! यांच्या स्वर्गातही बिचारी स्त्री रडत आहे. तिचे दुःख कोणी ऐकत नाही अथवा ते दूर करू शकत नाही आणि ज्या अजगराने आपल्या शेपटीने एक तृतीयांश तारे पृथ्वीवर पाडले त्याची ती शेपटी केवढी मोठी असेल ? वस्तुतः पृथ्वी लहान आहे आणि तारे मोठमोठे खगोल

आहेत. या पृथ्वीवर एकही तारा सामावू शकत नाही. त्यामुळे येथे असेच अनुमान केले पाहिजे की एक तृतीयांश तारे हे लिहिणाऱ्याच्या घरावर पडले असावेत आणि ज्या अजगराची शेपटी सर्व ताऱ्यांपैकी एक तृतीयांश ताऱ्यांना गुंडाळून पृथ्वीवर पाडण्याइतकी मोठी होती तो अजगरही त्याच्याच घरात राहात असावा. ॥११६॥

(११७) स्वर्गात युद्ध झाले. मीखाएल व त्याचे दूत अजगराबरोबर युद्ध करण्यास निघाले; आणि त्यांजबरोबर अजगर व त्याचे दूत लढले. ... -योहान प्र. अ.१२, ओ.७.

**(समीक्षक)** जो कोणी ख्रिस्त्यांच्या स्वर्गात जात असेल त्यालाही लढाईचे दुःख मिळत असेल. असल्या स्वर्गाची आशा सोडून येथेच हात बांधून बसून रहा. जेथे शांतताभंग व उपद्रव माजला असेल ते ठिकाण ख्रिस्त्यांनाच योग्य आहे. ॥११७॥

(११८) मग तो मोठा अजगर खाली टाकण्यात आला. म्हणजे सर्व जगाला ठकविणारा बायबल व सैतान म्हटलेला जुनाट साप ह्याला खाली पृथ्वीवर टाकण्यात आले; व त्याबरोबर त्याच्या दूतांस टाकण्यात आले.

-योहान प्र. ओ.१२, अ.९.

**(समीक्षक)** जेव्हा तो सैतान स्वर्गात होता तेव्हा तो लोकांना भ्रमित करत नव्हता काय ? मग त्याला जन्मभर तुरुंगात डांबून का ठेवले नाही ? किंवा त्याला मारून का टाकले नाही ? त्याला पृथ्वीवर का टाकण्यात आले? सगळ्या जगाला ठकविणारा जर सैतान असेल तर सैतानाला ठकविणारा कोण आहे ? जर सैतानाने स्वतःच स्वतःला ठकविले तर बहकणारी माणसे सैतानाच्या प्रेरणेशिवाय स्वतःच बहकत असणार आणि जर त्याला बहकावणारा परमेश्वर असेल तर तो ईश्वरच असू शकत नाही. असे दिसते की ख्रिस्त्यांचा ईश्वरच सैतानाला भीत असावा. कारण तो सैतानाहून प्रबळ असता तर त्याने अपराध करीत असतानाच त्याला शिक्षा का केली नाही ? जगात सैतानाचे जेवढे साम्राज्य आहे त्याच्या एक सहस्त्रांशही ख्रिस्ती लोकांच्या ईश्वराचे राज्य नाही. त्यामुळेच ख्रिस्ती लोकांचा ईश्वर त्याला हटवू शकत नसावा. यावरून हे सिद्ध होते की ज्याप्रमाणे आजचे राज्याधिकारी ख्रिस्ती लोक चोर, दरोडेखोर वगैरेंना ताबडतोब शिक्षा करतात त्यांच्याप्रमाणेही ख्रिस्ती लोकांचा ईश्वर नाही. अशा स्थितीत वैदिक मताचा त्याग करून पोकळ, खोट्या ख्रिस्ती पंथाचा स्वीकार करील असा कोण निर्बुद्ध माणूस असेल ? ॥११८॥

(११९) अरेरे! पृथ्वीवर व समुद्रात राहणाऱ्या लोकांनो, तुमच्यावर अनर्थ ओढवला आहे. कारण सैतान उतरून तुमच्याकडे आला आहे. -योहान प्र. आ.१२, ओ.२२.

**(समीक्षक)** ख्रिस्त्यांचा ईश्वर फक्त त्याच ठिकाणाचा (स्वर्गाचा) रक्षक व स्वामी आहे काय ? तो पृथ्वीवरील मनुष्यादी प्राण्यांचा रक्षक व स्वामी नाही काय ? तो या भूमीचाही राजा असेल तर तो सैतानाला का मारू शकला नाही ? ईश्वर पाहत राहतो आणि सैतान सर्वांना फसवीत फिरतो; तरीही तो सैतानाला प्रतिबंध करीत नाही. यावरून असे दिसते की एक चांगला ईश्वर आहे आणि सैतान नावाचा दुसरा एक सामर्थ्यशाली व दुष्ट ईश्वर होऊन राहिला आहे. ॥११९॥

(१२०) आणि त्याला बेचाळीस महिन्यांपर्यंत आपले काम (युद्ध) चालविण्याचा अधिकार दिला होता. ... त्याने देवाविरुद्ध निंदा करण्यास, म्हणजे त्याचे नाव, त्याचा मंडप व स्वर्गनिवासी लोक यांची निंदा करण्यास तोंड उघडले. ... पवित्र जनांशी लढण्याचे व त्यांना जिंकण्याचे कार्य त्याकडे सोपविले होते; आणि सर्व वंश, लोक, निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक व राष्ट्रे यांवर त्याला अधिकार दिला होता...... योहान प्र. अ.१३, ओ.५-७.

**(समीक्षक)** जो पृथ्वीवरील लोकांना भ्रमित करण्याच्या हेतूने सैतान व पशू इत्यादींना पाठवितो आणि पवित्र माणसांशी युद्ध करावयास लावतो. त्याचे हे काम डाकूंच्या सरदाराच्या कामासारखे आहे की नाही? असले काम ईश्वराचे अथवा ईश्वराच्या भक्तांचे असू शकत नाही. ॥१२०॥

(१२१) नंतर मी पाहिले तो पाहा ! कोकरू सीयोन डोंगरावर उभे असलेले दृष्टीस पडले. त्याजबरोबर त्याचे नाव व त्याच्या पित्याचे नाव कपाळावर लिहिलेले असे एकशे चव्वेचाळीस हजार इसम होते. -योहान प्र. अ. १४, ओ.१.

**(समीक्षक)** आता पाहा ! जेथे येशूचा बाप राहत होता तेथेच, सीयोन डोंगरावर त्याचा मुलगाही राहत होता. पण एक लाख चव्वेचाळीस हजार माणसांची गणती कशासाठी केली आहे ? एक लाख चव्वेचाळीस हजार लोकच स्वर्गाचे रहिवासी झाले ? बाकीच्या कोट्यावधी खिस्ती लोकांच्या कपाळावर शिक्का मारला गेला नाही मग ते सगळे नरकात गेले काय ? खिश्चनांनी सीयोन डोंगरावर जाऊन येशूचा तो बाप आणि त्यांची सेना तेथे आहे की नाही ते पाहिले पाहिजे. जर ती तेथे असतील तर हे लिखाण खरे आहे; नसतील तर ते खोटे आहे. ते तेथे कोठून तरी आले असणार. ते कोठून आले ? जर ते स्वर्गातून आले असतील तर एवढे मोठे सैन्य व तो स्वत: वरून खाली उडत ये-जा करायला ते सगळे पक्षी आहेत काय ? तो येत जात असेल तर तो एखाद्या जिल्ह्याच्या न्यायाधीशासारखा झाला आणि त्याच्यासारखे एक, दोन, तीन असून भागणार नाही. कमीत कमी एकेका भूगोलासाठी एकेक ईश्वर हवा. कारण एक, दोन, तीन ईश्वर अनेक ब्रह्मांडांतील लोकांचा न्याय करण्यास आणि एकाच वेळी सर्वत्र संचार करण्यास कधीच समर्थ होऊ शकणार नाहीत. ॥१२१॥

(१२२) आत्मा म्हणतो, "खरेच ! आपल्या कष्टांपासून सुटून त्यांना विसावा मिळेल. त्यांची कृत्ये तर त्यांच्या बरोबर जातात." -योहान प्र. अ.१४, ओ.१३.

**(समीक्षक)** पाहा ! खिस्त्यांचा ईश्वर तर असे म्हणतो की, "त्यांची कृत्ये त्यांच्या बरोबर राहतात." अर्थात ज्याच्या त्याच्या कर्मानुसार सर्वांना फळ दिले जाईल. परंतु हे खिस्ती लोक म्हणतात की येशू सर्वांची पापे घेऊन गेला आणि सर्वांना क्षमादानही केले जाईल. आता बुद्धिमंतांनी विचार करावा की ईश्वराचे वचन खरे की खिस्त्यांचे ? दोघांचेही म्हणणे एकाच वेळी खरे होऊ शकत नाही. त्यांच्यापैकी कोणीतरी एकजण नक्कीच खोटा असणार. आम्हांला काय ? खिस्त्यांचा ईश्वर खोटा ठरो की खिस्ती लोक खोटे ठरोत !

(१२३) तेव्हा त्या देवदूताने आपला विळा पृथ्वीवर चालविला; आणि पृथ्वीच्या द्राक्षवेलीचे घड तोडून देवाच्या क्रोधाच्या मोठ्या द्राक्षकुंडात टाकले. ... ते द्राक्षकुंड नगराबाहेर तुडविले गेले. त्यातून रक्त वाहिले.

त्याचा प्रवाह घोड्यांच्या लगामांस पोहोचेइतका असून तो शंभर कोसपर्यंत वाहत गेला. -योहान प्र. अ.१४, ओ.१९-२०.

**(समीक्षक)** आता पाहा ! यांच्या थापा पुराणातील थापांपेक्षाही वरचढ आहेत की नाहीत ? ख्रिस्त्यांचा ईश्वर क्रोध करताना फारच दु:खी होत असणार. त्याच्या क्रोधाने कुंडे भरली म्हणजे त्याचा क्रोध हे काय पाणी आहे ? की ज्याने कुंडे भरली असा दुसरा एखादा द्रव पदार्थ आहे ? आणि शंभर कोसपर्यंत रक्त वाहत जाणे ही अशक्य गोष्ट आहे. कारण वारा लागताच रक्त गोठते. मग ते कसे वाहू शकेल ? म्हणून असल्या गोष्टी मिथ्या असतात. ॥१२३॥

(१२४) नंतर मी पाहिले तो साक्षीच्या मंडपाचे स्वर्गातील मंदिर उघडले. -योहान प्र. अ. १५, ओ.५.

**(समीक्षक)** ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञ असता तर त्याला साक्षीदारांचे काय काम ? तो सर्वज्ञ असता तर त्याला सर्व काही समजले असते. यावरून असे नक्की ठरते की यांचा ईश्वर सर्वज्ञ नसून माणसांसारखा अल्पज्ञ आहे. तो ईश्वरत्वाचे काय काम करू शकणार ? नाही ! नाही !! नाही !!! याच प्रकरणात देवदूतांच्या मोठमोठ्या अशक्य गोष्टी लिहिलेल्या आहेत. त्या कोणीही खऱ्या मानू शकत नाही. किती म्हणून लिहावे ? या प्रकरणात सगळ्या अशाच गोष्टी भरलेल्या आहेत. ॥१२४॥

(१२५) आणि तिच्या अधर्मांची (कुकर्मांची) आठवण देवाने केली आहे. जसे तिने दिले तसे तिला द्या. तिच्या कर्मांप्रमाणे तिला दुप्पट द्या. तिने प्याल्यात जितके ओतले त्याच्या दुप्पट तुम्ही त्यात ओता.

-योहान प्र. अ. १८, ओ.५-६.

**(समीक्षक)** पाहा, ख्रिस्त्यांचा ईश्वर प्रत्यक्ष अन्याय करणारा आहे. कारण ज्याने जसे व जेवढे कर्म केले असेल त्याला तसे व तेवढेच फळ देणे याला न्याय म्हणतात. त्याहून कमी अथवा अधिक देणे हा अन्याय आहे. जे लोक अन्याय करणाऱ्याची उपासना करतात ते न्यायी कसे असतील ? ॥१२५॥

(१२६) कारण कोकराचे लग्न निघाले आहे; आणि त्याचा नवरीने स्वत:ला सजविले आहे.

-योहान प्र. अ. १९.अ. १९, ओ.७.

**(समीक्षक)** आता ऐका ! ख्रिस्त्यांच्या स्वर्गात विवाहही होतात. कारण येशूचा विवाह ईश्वराने तेथेच केला. तेव्हा विचारले पाहिजे की, त्याचा सासरा, सासू, मेहुणा वगैरे कोण होते आणि त्याला किती मुलेबाळे झाली ? आणि वीर्यनाश झाल्याने शक्ति, बुद्धि, पराक्रम, आयुष्य वगैरेही घटत जाते. त्यामुळे एव्हाना येशूने तेथे देहत्यागही केला असेल. कारण संयोगजन्य पदार्थांचा वियोग अवश्य होत असतो. आतापर्यंत ख्रिस्ती लोकांनी येशूवर श्रद्धा ठेवून स्वत:ची फसवणूक करून घेतली. यापुढेही ते किती काळ आपली अशी फसवणूक करून घेत राहतील कोण जाणे ? ॥१२६॥

(१२७) त्याने दियाबल व सैतान म्हटलेला जुनाट साप म्हणजे अजगर त्यास धरले. त्याने एक हजार वर्षेपर्यंत अगाधकूपात बांधलेला असा पडून राहावे म्हणून त्याला त्या अगाधकूपात टाकून दिले आणि हजार वर्षे पूर्ण होईपर्यंत त्याने राष्ट्रांस आणखी ठकवू नये म्हणून वरून बंद करून त्यावर सील ठोकले. त्यानंतर त्याला थोडा वेळ सोडले पाहिजे. -योहान प्र. अ.२०, ओ.२-३.

**(समीक्षक)** पाहा! मरू मरू म्हणून मोठ्या मुष्किलीने सैतानाला पकडले आणि एक हजार वर्षेपर्यंत त्याला बंद करून ठेवले. तरीही सुटेल त्यावेळी तो पुन: लोकांची दिशाभूल करणार नाही काय ? अशा दुष्टाला कायमचे तुरुंगातच डांबून ठेवले पाहिजे किंवा मारल्या शिवाय सोडूच नये. परंतु या सैतानाचे अस्तित्व हा खिस्त्यांचा केवळ भ्रम आहे. वास्तवात तसे काहीही नाही. फक्त लोकांना भीती दाखवून आपल्या कळपात ओढण्याची ती एक योजना आहे. एका लबाड इसमाने भोळ्याभाबड्या लोकांना सांगितले की, ''चला! मी तुम्हांला देवाचे दर्शन घडवितो.'' तो त्यांना एका एकांत जागी घेऊन गेला. त्या ठिकाणी त्याने आधीच एका माणसाला चतुर्भुज बनवून एका झाडीमध्ये उभे करून ठेवले होते. त्याने त्या लोकांना सांगितले की, ''डोळे मिटा व मी सांगेन तेव्हा डोळे उघडा. आणि पुन: मी सांगेन तेव्हा डोळे मिटा. जो कोणी डोळे मिटणार नाही तो आंधळा होईल.'' असाच त्यांच्या मनात आहे की जो आमचे मत मानत नाही तो सैतानाने पछाडलेला आहे. त्याप्रमाणे तो त्यांना तेथे घेऊन गेल्यावर म्हणाला, ''तो पाहा नारायण!'' आणि लगेच त्यांना डोळे मिटण्यास सांगितले. तो देव बनलेला माणूस जेव्हा झाडीत लपला तेव्हा त्याने त्या लोकांस सांगितले, ''आता डोळे उघडा, तुम्हा सर्वांना नारायणाचे दर्शन घडले!'' वेगवेगळ्या पंथियांच्या या अशाच लीला आहेत. म्हणून त्यांच्या मायाजाळात कोणी अडकता कामा नये. ॥१२७॥

(१२८) नंतर मोठे पांढरे राजसिंहासन व त्यावर बसलेला एक जण माझ्या दृष्टीस पडला. त्याच्या तोंडापुढून पृथ्वी व आकाश हे दोन्ही पळाले. त्यांच्याकरिता ठिकाण म्हणून सापडले नाही. ... मग मृत झालेल्या लहानथोरांना मी राजसिंहासनापुढे उभे राहिलेले पाहिले. त्यावेळी पुस्तके उघडली गेली. तेव्हा दुसरे एक पुस्तक उघडले गेले. ते जीवनाचे होते आणि त्या पुस्तकात जे लिहिले होते त्यावरून मृतांचा न्याय ज्यांच्या त्यांच्या कर्मांप्रमाणे ठरविण्यात आला. -योहान प्र. अ.२०, ओ.११-१२.

**(समीक्षक)** किती पोरकटपणाच्या गोष्टी आहेत पाहा! पृथ्वी आणि आकाश कसे पळू शकतील ? ते कशावर स्थिर राहणार ? ज्याच्या समोरून ते पळाले त्याचे सिंहासन व तो कोठे राहिला ? मेलेल्या माणसांना परमेश्वरासमोर उभे करण्यात आले तेव्हा परमेश्वर बसला होता की उभा होता ? इहलोकातील न्यायालय (कचेरी) व दुकान यांमध्ये जसा व्यवहार चालतो तसाच ईश्वराचा व्यवहार चालतो की जो कागदपत्रात लिहिल्याप्रमाणे हिशेब चालतो त्यांमध्ये सर्व जीवांची हकीकत ईश्वर स्वत: लिहितो की त्याचे दिवाणजी लिहितात ? असल्या हास्यास्पद गोष्टींवर लोकांना विश्वास ठेवायला सांगून खिस्ती वगैरे पंथाच्या लोकांनी जो ईश्वर नाही त्याला ईश्वर बनवून टाकले आहे; आणि जो खरा ईश्वर आहे त्याला अनीश्वर ठरवून टाकले आहे. ॥१२८॥

(१२९) सात देवदूतांपैकी एक देवदूत मजबरोबर बोलला. तो म्हणाला, ''ये. नवरी म्हणजे कोकराची बायको मी तुला दाखवितो.'' -योहान प्र.अ. २१, ओ.९.

**(समीक्षक)** छान! येशूला स्वर्गात नवरी म्हणजे स्त्री तर छानच मिळाली. तो मजा मारत असेल. जे-जे खिस्ती तेथे जात असतील त्यांनाही स्त्रिया मिळत असतील आणि मुले-बाळे होत असतील आणि फार गर्दी झाल्यामुळे रोगराई होऊन मरतही असतील. अशा स्वर्गाला येथूनच हात जोडले पाहिजेत! ॥१२९॥

(१३०) नगर चौरस होते. त्याची जितकी रुंदी होती तितकीच त्याची लांबी होती. त्याने नगराचे माप बोरूने घेतले. ते सहाशे कोस भरले. त्याची लांबी, रुंदी व उंची समान होती. ... मग त्याने त्याच्या तटाचे माप घेतले. ते माणसाच्या हाताने एकशे चव्वेचाळीस हात भरले. माणसाचा हात म्हणजे देवदूताचा हात. ... त्याचा तट 'यास्फे' रत्नाचा होता आणि नगर शुद्ध काचेसारखे शुद्ध सोनेच होते. ... नगराच्या तटाचे पाय वेगवेगळ्या मूल्यवान रत्नांनी शृंगारले होते. पहिला पाया यास्फे, दुसरा नीळ, तिसरा शिवधातू, चवथा पाचू, ... पाचवा गोमेद, सहावा सार्दी (माणिक), सातवा लसणा (पीतमणी), आठवा गोमेद (फीरोजा), नववा पुष्कराज, दहावा सोनलसणी, अकरावा याकींथ (धूम्रकांत), बारावा पद्मराग या रत्नांचा होता. ... बारा वेशी, बारा मोत्यांच्या होत्या. एकेक वेस एकेका मोत्याची होती. नगरातील मार्ग पारदर्शक काचेसारखा शुद्ध सोनेच होता.

- योहान प्र.अ.२१, ओ.१६-२१.

**(समीक्षक)** ख्रिस्त्यांच्या स्वर्गाचे हे वर्णन ऐका. ख्रिस्ती लोक एवढ्या मोठ्या संख्येने जन्मतात व मरतात. ते सगळे एवढ्या मोठ्या शहरात (स्वर्गात) कसे सामावू शकतील ? कारण तेथे माणसांचे आगमन होते. पण तेथून कोणी बाहेर जात नाही. ही नगरी बहुमूल्य रत्नांनी बनविलेली आहे, ती संपूर्ण सोन्याची आहे, वगैरे जे काही लिहिलेले आहे तो भोळ्याभावड्या लोकांना फसवून गुंतविण्याचा डाव आहे. शहराची जी लांबी-रुंदी लिहिलेली आहे ती असू शकते. परंतु त्याची उंची साडेसातशे कोस कशी काय असू शकेल ? ही सर्वस्वी खोटी, कपोलकल्पनेतील गोष्ट आहे आणि एवढे मोठे मोती कोठून आले असतील ? हे लिखाण करणाऱ्याच्या घरच्या माठातून ? या थापा पुराणांच्याही बाप आहेत. ॥१३०॥

(१३१) त्याच्यात काही निषिद्ध आणि अमंगळपणा व असत्य आचरणारा इसम यांचा प्रवेश होणारच नाही. तर कोकराच्या जीवनी पुस्तकात लिहिलेल्या लोकांचा मात्र होईल. -योहान प्र. अ.२१, ओ.२७.

**(समीक्षक)** जर असे आहे तर पापी लोकही ख्रिश्चन झाल्यास स्वर्गात जाऊ शकतात असे ख्रिस्ती लोक का सांगतात ? हे बरोबर नाही. तसे असेल तर ज्या योहानने (सेंट जॉनने) या पुस्तकात इतक्या खोट्यानाट्या गोष्टी लिहून ठेवल्या आहेत तो स्वर्गात कधीच प्रवेश करू शकला नसणार. तसेच येशूही स्वर्गात गेला नसणार. कारण जर एकटा पापी स्वर्ग प्राप्त करू शकत नाही तर ज्याने अनेक पाप्यांच्या पापांचे ओझे आपल्या शिरावर घेतले आहे तो कसा काय स्वर्गवासी होऊ शकेल ?

(१३२) पुढे काहीही शापित असणार नाही. तर त्यामध्ये देवाचे व कोकराचे राजसिंहासन असेल; आणि त्याचे दास त्याची सेवा करतील. ... ते त्याचे मुख पाहतील व त्याचे नाव त्यांच्या कपाळावर असेल. ... यापुढे रात्र असणार नाही आणि त्यांस दिव्याच्या अथवा सूर्याच्या प्रकाशाची गरज नाही. कारण प्रभू देव त्यांजवर प्रकाश पाडतो; आणि ते युगानुयुगे राज्य करतील. -योहान प्र. अ.२२, ओ.३-५.

**(समीक्षक)** पाहा ! हाच ख्रिस्त्यांचा स्वर्गवास. ईश्वर आणि येशू कायमचे सिंहासनावर बसून राहणार काय? आणि त्यांचे दास सदैव त्यांची तोंडे पाहत त्यांच्या समोर उभे राहणार ? आता हे तर सांगा की तुमच्या ईश्वराचे तोंड युरोपीय लोकांच्या तोंडासारखे गोरे आहे की आफ्रिकेतील काळ्या लोकांच्या तोंडासारखे काळे

अथवा इतर देशांतील लोकांच्या तोंडासारखे आहे ? तुमचा हा स्वर्गही तुरुंगासारखा बंधनरूप आहे. कारण तेथील लोकांमध्ये लहान मोठा भाव आहे आणि त्या एकाच नगरात राहणे भाग असते. मग तेथे दुःख का असणार नाही ? तसेच जो चेहरा धारण करणारा आहे तो ईश्वर कधीही सर्वज्ञ व सर्वेश्वर असू शकत नाही. ॥१३२॥

(१३३) पाहा, मी लौकर येतो. आणि प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे देण्यास माझ्याजवळ (फळ) आहे. -योहान प्र. अ. २२, ओ. १२.

**(समीक्षक)** प्रत्येकाला त्याच्या कर्मानुसार फळ मिळते तर पापांची कधीही क्षमा होत नाही आणि जर क्षमा दिली जात असेल तर बायबलातील गोष्टी खोट्या आहेत. जर कोणी असे म्हणेल की क्षमा करणेही बायबलात लिहिले आहे तर ही दोन विधाने परस्परविरोधी म्हणून खोटी आहेत. म्हणून त्यांना मानणे सोडून द्या. ॥१३३॥

बायबलामध्ये लाखो गोष्टी खंडनीय आहेत. त्या सर्वांविषयी कुठवर लिहावयाचे ? ख्रिस्त्यांचा मतग्रंथ जे बायबल त्यातील वर्णनाचा केवळ थोडासा नमुना वानगीदाखल आम्ही येथे दाखविला आहे. एवढ्या वरूनच बुद्धिमान लोक पुष्कळ काही समजून घेतील. त्यातील काही थोड्या गोष्टी वगळल्यास इतर साऱ्या खोट्यानाट्या गोष्टीच त्यात भरलेल्या आहेत. असत्याच्या संगतीने सत्यही शुद्ध राहत नाही. त्याचप्रमाणे बायबल हा मतग्रंथही स्वीकारार्ह होऊ शकत नाही. परंतु ते सत्य तर वेदांचा स्वीकार केल्यानेच ग्रहण होते.

**इति श्रीमदयानन्दसरस्वतीस्वामिनिर्मिते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषाविभूषिते कृश्चीनमतविषये**
**त्रयोदशः समुल्लास संम्पूर्णः ॥१३॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






# अनुभूमिका (४)

या चौदाव्या समुल्लासात आम्ही मुसलमानांच्या (मता) पंथाविषयी विवेचन केले आहे. ते केवळ कुराणाच्या अभिप्रायानुसार आहे. इतर ग्रंथांचा विचार नाही. कारण मुसलमान कुराणावरच पूर्ण श्रद्धा ठेवतात. मुसलमानांमध्ये अनेक पंथ असल्याने एखाद्या शब्दाचा काय अर्थ लावायचा या विषयी त्यांच्यात मतभेद आहेत. तथापि कुराणावरील श्रद्धेच्या बाबतीत सर्वांचे एकमत आहे. मूळ कुराण अरबी भाषेत असून मौलवी लोकांनी ते उर्दूत लिहिले आहे. त्याचे देवनागरी, हिंदीत रूपांतर करून ते अरबीच्या मोठमोठ्या विद्वानांकडून आम्ही तपासून लिहिले आहे. जर कोणी असे म्हणेल की, अमुक अर्थ बरोबर नाही, तर त्याने प्रथम मौलवी साहेबांच्या भाषांतराचे खंडन करावे आणि मग या विषयावर लिहावे. कारण हे लिखाण केवळ मानव जातीच्या कल्याणासाठी व सत्यासत्याच्या निर्णयासाठी केलेले आहे. सर्व (मतां) पंथाविषयी थोडे थोडे ज्ञान प्रत्येकाला व्हावे व त्यायोगे लोकांना परस्परांशी विचार विनिमय करण्याची संधी मिळावी आणि त्यांनी एकमेकांच्या दोषाचे खंडन करून गुणांचे ग्रहण करावे, इतर मता-पंथांवर ना या मतावर खोटेनाटे दोषारोप करावे अथवा त्यांची अवास्तव स्तुती करावी, हा हेतू नसून जे गुण म्हणून सांगावेत व जे दोष आहेत ते दोष सर्वांना कळावेत. यामुळे कोणीही खोट्या गोष्टी खऱ्या म्हणून सांगू शकणार नाही आणि सत्याच्या मार्गात अडथळा निर्माण करू शकणार नाही आणि अशा प्रकारे सत्यासत्य प्रकाशित केल्यानंतरही ज्याची इच्छा असेल त्याने ते मानावे अथवा मानू नये. कोणावरही जुलूम जबरदस्ती केली जात नाही. आपल्या अथवा इतरांच्या दोषांना दोष व गुणांना गुण समजून गुणांचे ग्रहण व दोषांचा त्याग करणे, तसेच दुराग्राही लोकांचा दुराग्रह कमी करणे हीच सज्जनांची रीत आहे. कारण पक्षपातामुळे जगात खूपच अनर्थ घडले आहेत व घडत आहेत. खरी गोष्ट अशी आहे की, या अनिश्चित व क्षणभंगुर जीवनात दुसऱ्याचे नुकसान करून स्वतःला व इतरांना लाभापासून वंचित ठेवणे हे माणुसकीला शोभणारे नाही.

जर काही वस्तुस्थितीच्या विरुद्ध लिहिले गेले असेल तर सज्जन लोकांनी त्या आमच्या निदर्शनास आणून

द्यावे. नंतर जे उचित असेल ते मानले जाईल कारण हे लिखाण हट्ट, दुराग्रह, ईर्ष्या, द्वेष, वादविवाद व विरोध वाढविण्यासाठी नव्हे तर कमी करण्यासाठी करण्यात आलेले आहे. एकमेकांची हानी करण्यापासून वेगळे राहून परस्परांना लाभदायक होईल असे कार्य करणे हे आमचे मुख्य कर्तव्य आहे. आता या चौदाव्या समुल्लासात मुसलमानांच्या पंथाविषयीचे विवेचन सर्व सज्जनांच्या विचारार्थ मी प्रस्तुत करीत आहे. त्यांनी विचार करून त्यातील इष्ट असेल ते ग्रहण करावे आणि अनिष्ट असेल त्याचा त्याग करावा.

आजकाल कुराणच्या सर्वसाधारण उपलब्ध आवृत्तीमध्ये सूरतचे नाव व आयतची क्रम संख्याच दिली जाते. परंतु या कारणाने महर्षिंनी दिलेले संदर्भ-चुकीचे होत नाहीत. तरीही आम्ही सर्वसाधारण वाचकांच्या विशेष सोईसाठी कुराणच्या सध्याच्या सर्वसाधारण आवृत्तीतील काही संदर्भ चौदाव्या समुल्लासाच्या समीक्षेच्या क्रमाने खाली देत आहोत.

**अलमतिविस्तरेण बुद्धिमद्वर्य्येषु इत्यनुभूमिका ॥**

**मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.

म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.






## चौदावा समुल्लास

# मुस्लिम पंथाची समीक्षा

यानंतर मुसलमानांविषयी आम्ही लिहिणार आहोत.

## ईश्वराच्या नावाने आरंभ

(१) परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नावाने (मी आरंभ करतो) मंजिल १। सिपारा १। सूरत १

**(समीक्षक)** मुसलमान लोक असे म्हणतात की, कुराण हे ईश्वराचे आहे; परंतु या वचनावरून असे दिसून येते की, हे रचणारा कोणीतरी दुसरा आहे. कारण जर परमेश्वराने कुराण रचले असते तर 'परमेश्वराच्या नावाने मी आरंभ करतो' असे न म्हणता त्याने 'मानवांना उपदेश देण्यासाठी मी आरंभ करतो' असे म्हटले असते. 'तुम्ही असे म्हणा,' अशी शिकवण तो माणसांना देत असेल तर तेही बरोबर नाही. कारण पापाचा प्रारंभही देवाच्या नावाने होऊन देवाचे नावही दूषित होऊन जाईल. जर तो दया व क्षमा करणारा असेल तर त्याने आपल्या सृष्टितील मनुष्यांच्या सुखासाठी इतर प्राण्यांना दारुण पीडा देऊन मारण्याची व त्यांचे मांस खाण्याची आज्ञा का दिली ? ते प्राणी निरपराधी व परमेश्वराने निर्माण केलेले नाहीत काय ? त्याने हे सुद्धा असे सांगावयास पाहिजे होते की, 'परमेश्वराच्या नावाने मी फक्त चांगल्या गोष्टींचा आरंभ करतो. वाईट गोष्टींचा नव्हे,' या वचनात गोंधळ, घोटाळा आहे. चोरी, जारी (व्यभिचार), मिथ्याभाषण वगैरे अधार्मिक कृत्यांचा प्रारंभही देवाचे नाव घेऊन करावा काय ? असा गोंधळ असल्यामुळेच कसाई वगैरे मुसलमान गाय वगैरे पशूंच्या माना कापतानाही प्रारंभी 'बिस्मिल्लाह' (देवाच्या नावाने) असे म्हणतात. जर हाच याचा पूर्वोक्त अर्थ आहे तर वाईट गोष्टीचा प्रारंभ सुद्धा परमेश्वराच्या नावाने म्हणतात. यामुळे मुसलमानांचा खुदा दयाळू देखील राहणार नाही. कारण त्याची दया त्या पशूंवर राहिली नाही. मुसलमानांना या वचनाचा दुसराच करतात. वेगळा अर्थ लावीत असतील तर त्याचा शुद्ध अर्थ काय आहे ? इत्यादी ॥१॥

(२) सर्व स्तुती सकल जगाचा पालनकर्ता असा जो परमेश्वर त्यालाच (योग्य) आहे. (तो) परम दयाळू (आणि) कृपाळू (आहे) मं. १। सि. १। सूरतुल्फातिहा आयत १। २

**(समीक्षक)** कुराणाचा खुदा जगाचा पालनकर्ता आणि सर्वांवर दया करणारा व क्षमाशील असता तर इतर मता (पंथा) च्या लोकांना आणि पशुपक्ष्यांनाही मुसलमानांकडून मारण्याचा हुकूम त्याने दिला नसता. तो क्षमा करणारा आहे म्हणजे तो पाप्यांनाही क्षमा करील काय ? जर तसे असेल तर काफिरांची कत्तल करा. जे कुराण व पैगंबर यांना मानणारे नाहीत ते काफिर आहेत असे त्याने मुसलमानांना का सांगितले असते ? म्हणून कुराण हे ईश्वरकृत दिसत नाही. ॥२॥

(३) (तो शेवटच्या) निर्णयाच्या दिवसाचा धनी (आहे). (हे परमेश्वरा) तुझीच भक्ती आम्ही करीत आहोत; व तुझीच मदत आम्ही मागत आहोत. तू सरळ मार्ग दाखव. मं. १ सि. १ सू. १ आ. ३-५

**(समीक्षक)** परमेश्वर नित्य न्याय करीत नाही काय ? तो एका दिवशीच न्यायनिवाडा करतो काय ? यामुळे तर अंधार दिसत आहे. त्याचीच भक्ती करणे व त्याच्याकडेच साह्य मागणे हे ठीक आहे. परंतु वाईट गोष्टींसाठीही साह्य मागावयाचे काय ? आणि सरळ (योग्य) मार्ग फक्त मुसलमानांनाच आहे की इतरांचाही आहे ? सरळ मार्गाचा अवलंब मुसलमान का करीत नाहीत ? वाईट गोष्टींकडे नेणारा सरळ मार्ग तर त्यांना नको ना ? सर्वांचे कल्याण एकच आहे. तर मग मुसलमानांचेच असे काय वैशिष्ट्य राहिले ? जे इतरांचे कल्याण इच्छित नसतील तर ते पक्षपाती आहेत. ॥३॥

(४) (म्हणजे) ज्या (लोकां) वर तू कृपा केली आहेस त्यांना मार्ग (दाखव) पण ज्यांच्यावर (तुझा) कोप झालेला आहे त्यांना (मार्ग) नको आणि आडमार्गी भटकणाऱ्यांनाही नको. मं. १ सि. १ सू. १ आ. ६।७

**(समीक्षक)** जर मुसलमान लोक पूर्वजन्म व पूर्वकृत पाप-पुण्य मानीत नाहीत तर काही लोकांवर दया करणे व काही लोकांवर दया न करणे यामुळे परमेश्वर पक्षपाती होईल. कारण पापपुण्याचा विचार न करता सुखदुःख देणे हा निव्वळ अन्याय आहे. तसेच विनाकारण एखाद्यावर दया करणे आणि एखाद्यावर कोप करणे हेही अस्वाभाविक आहे. कारण पापपुण्याचा विचार केल्याशिवाय तो दया अथवा कोप करू शकत नाही आणि त्यांचे पूर्वसंचित पापपुण्यच नाही तर कोणावर दया करणे व कोणावर क्रोध करणे होऊ शकत नाही. या आयतीवरील टिपणीत (भाष्यामध्ये) 'लोकांनी हा सूरा नेहमी याप्रकारे म्हणावा, यासाठी परमेश्वराने तो लोकांच्या तोंडून वदविला आहे.' असे असेल तर अलिफ, बे वगैरे अक्षरेही ईश्वराने शिकविली असतील. जर तसे नसेल तर अक्षरज्ञानाशिवाय हा सूरा ते लोक कसे वाचू (म्हणू) शकले ? ईश्वराने नुसते ते त्यांना म्हणायला सांगितले व ते म्हणत गेले काय ? असे असेल संपूर्ण कुराण तोंडी शिकविले असणार. यावरून असे समजले पाहिजे की, ज्या पुस्तकात पक्षपाताच्या गोष्टी असतील ते पुस्तक ईश्वरकृत होऊ शकत नाही. जसे कुराण अरबी भाषेत अवतरल्यामुळे अरब लोकांना त्याचे वाचन-अध्ययन करणे सोपे तर इतर भाषा बोलणाऱ्यांना अवघड जाते. यामुळे परमेश्वरात पक्षपात येतो. ज्याप्रमाणे परमेश्वराने या सृष्टितील सर्व देशांत राहणाऱ्या लोकांविषयी न्यायदृष्टी बाळगून सर्वच देशांतील लोकांना जी भाषा समान परिश्रम घेऊन शिकावी लागते अशा विलक्षण संस्कृत भाषेत वेदांची रचना केली त्याप्रमाणे त्याने कुराणाच्या बाबतीत केले असते तर त्याच्यावर पक्षपातीपणाचा आरोप ठेवता आला नसता. ॥४॥

## पहिल्या पुस्तकात कमतरता होती काय ?

(५) हे (असे) पुस्तक (होय की) त्या (च्या ईश्वरवाणी होण्या) त कसलाच संशय नाही. (ते परमेश्वराला) भिऊन चालणाऱ्यांस सन्मार्गदर्शक (होय). (म्हणजे) जे लोक (धर्मविषयक) गैबी-इंद्रियातीत-गोष्टींवर विश्वास ठेवतात व (नित्य) नमाज पढतात आणि जे काही आम्ही देऊन ठेवले आहे त्यातून (परमार्थात) खर्च वेच करतात; आणि (हे पैगंबरा!) जे लोक, तुला जे (पुस्तक) प्रकट करण्यात आले आहे त्यावर व तुझ्यापूर्वी जी (पुस्तके) प्रकट झाली आहेत त्यांवर विश्वास ठेवतात; आणि परलोकीचीही जे (पूर्ण) खात्री बाळगतात, असलेच लोक आपल्या पालनकर्त्याच्या सरळ मार्गावर होत; आणि हेच (अखेर आपल्या मनोरथात) सफल होतील. (हे पैगंबरा !) ज्या लोकांनी (इस्लाम स्वीकारण्याचे) नाकारिले, त्यांना तू (ईश्वरी शिक्षेचे) भय दाखविलेस काय अगर न दाखविलेस काय सारखेच. ते तर विश्वास धरणार नाहीत. परमेश्वराने त्यांच्या अंत:करणावर व त्यांच्या कानांवर मोहर लावली आहे; व त्यांच्या डोळ्यावर पडदा (पाडला) आहे; आणि त्यांना (परलोकी) मोठी शिक्षा (होणे) आहे. -मं.१,सि.१, सू.२, आ.२-७.

**(समीक्षक)** आपल्याच तोंडाने आपल्याच पुस्तकाची प्रशंसा करणे ही ईश्वराची दांभिकता नाही काय ? परहेजगार म्हणजे धार्मिक लोक स्वत:च सन्मार्गावर असतात. पण जे वाईट मार्गाने जाणारे आहेत त्यांना हे कुराण सन्मार्ग दाखवूच शकत नाही. मग त्याचा काय उपयोग ? ॥१॥ पाप, पुण्य व पुरुषार्थ केल्याशिवाय परमेश्वर आपल्याच खजिन्यातून खर्च करण्यास पैसे देतो काय ? जर देत असेल तर सर्वांना का देत नाही ? आणि मग मुसलमान लोक परिश्रम कशाला करतात ? ॥२॥ जर बायबल वगैरे मतग्रंथावर श्रद्धा ठेवणे योग्य आहे तर मुसलमान लोक कुराणावर जशी श्रद्धा ठेवतात तशी बायबल वगैरे ग्रंथावर का ठेवीत नाहीत ? आणि जर ते तशी श्रद्धा ठेवीत असतील तर कुराणाचे अस्तित्व कशासाठी आहे ? कुराणात अधिक गोष्टी सांगितल्या आहेत असे म्हणणे असेल तर पूर्वीच्या ग्रंथात म्हणजे बायबलात त्या गोष्टी लिहायला ईश्वर विसरला असेल. पण जर तो विसरला नसेल तर मग कुराणाची रचना निष्प्रयोजन आहे. आम्ही पाहतो की, बायबल व कुराण यांतील काही गोष्टी एकसमान मिळत नाहीत. तेवढ्या वगळल्यास बाकी सर्व गोष्टी सारख्याच आहेत. मग परमेश्वराने वेदाप्रमाणे एकच ग्रंथ का निर्माण केला नाही ? कयामतवर म्हणजे अंतिम न्यायनिवाड्याच्या दिवसावरच विश्वास ठेवला पाहिजे; इतर कशावर विश्वास ठेवायचा नाही काय ? ॥३॥ फक्त ख्रिस्ती व मुसलमान लोकच ईश्वराच्या उपदेशानुसार वागतात ? त्यांच्यामध्ये कोणी पापी असत नाही काय ? अधर्मी असणारे ख्रिस्ती व मुसलमानही मोक्ष मिळवितील आणि इतर धर्मनिष्ठ असणारेही मोक्ष मिळविणार नसतील तर ती अत्यंत अन्यायाची व अंदाधुंदी नव्हे काय ? ॥४॥ जे लोक इस्लाम मत मानत नाहीत त्यांना काफिर ठरविणे हा एकतर्फी निवाडा नाही काय ? ॥५॥ परमेश्वरानेच त्यांच्या अंत:करणावर व कानांवर मोहोर लावली असेल व म्हणूनच ते पाप करतात तर त्यात त्यांचा काही दोष नाही. तो ईश्वराचाच दोष आहे. त्यामुळे सुखदु:खाची किंवा पापपुण्याची जबाबदारी माणसांवर येऊ शकत नाही. मग खुदा त्यांना शिक्षा का करतो ? कारण त्यांनी पाप अथवा पुण्य स्वतंत्रतेने केले नाही. ॥६॥

(६) त्यांच्या अंतःकरणात (आधीच अविश्वासाचा) रोग होता. तशात आता (कुराण प्रकट करून) अल्लाने त्यांचा (तो) रोग (आणखीही) वाढविला. -मं. १, सि. १, सू. २, आ. १०.

**(समीक्षक)** त्यांचा काहीही अपराध नसताना खुदाने त्यांचा रोग वाढविला. त्याला दया आली नाही. त्या बिचाऱ्यांना फार दुःख झाले असणार. हे कृत्य सैतानाच्या कृत्याहूनही जास्त सैतानीपणाचे नाही काय ? एखाद्याचे मन मोहोरबंद करणे, एखाद्याचा रोग वाढविणे हे ईश्वराचे काम असू शकत नाही. कारण रोग वाढविणे हे ज्याच्या त्याच्या पापामुळे आहे.

(७) ज्या (परमेश्वरा) ने तुम्हांसाठी पृथ्वीला बिछाईत व आकाशाला छत बनविले. -मं. १, सि. १, सू. २, आ. २२.

**(समीक्षक)** आकाश हे कशाचे तरी छत होऊ शकते काय ? ही अडाणीपणाची गोष्ट आहे. आकाशाला छत समजणे हास्यास्पद आहे. जर कोणत्या प्रकारच्या पृथ्वीला आकाश मानत असाल तर ती त्यांची आपली घरातील गोष्ट आहे. ॥७॥

(८) आणि आम्ही आपला सेवक (मोहंमद) यास जे (कुराण) प्रकट केले त्यासंबंधाने जर तुम्ही संशयात असाल, (व समजत असाल की हे ईश्वरी पुस्तक नव्हे, पण मनुष्याने रचलेले आहे) आणि तुम्ही (आपल्या त्या दाव्यात) खरे असाल, तर ह्यासारखाच एक अध्याय (सूरा तुम्ही रचून) आणा व परमेश्वराखेरीज तुम्ही आपले प्रत्यक्षही माहितीही बोलावून घ्या. मग जर तुम्ही (एवढी गोष्टही) न करू शकला व (ती) तुमच्याने केव्हाही करवणारच नाही, तर ज्या नरकाग्नीचे इंधन मनुष्ये व दगड होतील, त्याचे भय बाळगा. तो नास्तिकांकरिता (भडकवून) तयार ठेवलेला आहे. -मं. १, सि. १, सू. २, आ. २३, २४.

**(समीक्षक)** कुराणातील सूऱ्यांसारखा एखादा सूरा रचणे ही अशक्य गोष्ट आहे काय ? अकबर बादशाहाच्या कारकीर्दीत मौलवी फैजीने टिंबविरहित (नुक्ता असणारी अक्षरे नसलेले) कुराण रचले नव्हते काय ? ती नरकाची आग कोणती आहे ? या आगीला भिण्याचे कारण नाही काय ? या आगीतही जे काही टाकावे ते सारे जळून जाते. ज्याप्रमाणे कुराणात असे लिहिले आहे की, काफिरांसाठी नरकाचे दगड तयार करण्यात आले आहे त्याचप्रमाणे पुराणांमध्ये असे लिहिले आहे की, म्लेच्छांसाठी घोर नरक तयार करण्यात आला आहे. आता तुम्हीच सांगा की, कोणाचे म्हणणे खरे मानायचे ? त्यांच्या म्हणण्याप्रमाणे आपापल्या पंथाचे लोक स्वर्गाला आणि दुसऱ्या पंथाचे अनुयायी नरकाला जातात. म्हणून दोघांचीही मते खोटी आहेत. खरी गोष्ट अशी आहे की जे धर्मनिष्ठ असतील त्यांना सुख मिळेल आणि जे पापी असतील यांना दुःख भोगावे लागेल. मग ते कोणत्याही पंथाचे असले तरीही त्याने काही फरक पडत नाही. ॥८॥

## स्वार्गातील स्त्रिया

(९) आणि (हे पैगंबरा!) ज्या लोकांनी विश्वास धरिला व चांगली कामेही केली, तू त्यांना शुभवर्तमान ऐकीव की, त्यांच्यासाठी अशा (स्वर्गीय) बागा आहेत की ज्यांच्या खालून नद्या वाहत असतील, जेव्हा त्यांना त्यातून एखादे फळ खावयास दिले जाईल, तेव्हा ते म्हणतील की आम्हाला पूर्वी जे दिले होते तेच हे आणि तेथे

त्यांच्यासाठी चोखी (व निर्मल) जोडपी असतील व ते त्या (बागां) त सदासर्वदा राहतील.

-मं.१,सू.१सू.२,आ.२५.

**(समीक्षक)** कुराणाचा हा स्वर्ग संसारापेक्षा कोणत्या बाबतीत उत्तम आहे ? कारण ज्या गोष्टी या जगात आहेत त्याच मुसलमानांच्या स्वर्गात आहेत. फरक एवढाच की, येथे पुरुष जन्मतात, मरतात, येतात, जातात. तसे स्वर्गात नसते. परंतु येथील स्त्रिया सदा सर्वकाळ राहत नाहीत; आणि तेथील स्त्रिया सदैव उत्तम राहतात. पण जोपर्यंत कयामतची (न्यायदानाची) रात्र येणार नाही तोपर्यंत त्या बिचाऱ्यांचे दिवस कसे जात असतील ? मात्र खुदाची त्यांच्यावर कृपा होत असेल आणि खुदाच्या आश्रयाने त्या काळ कंठीत असतील तर ठीक आहे. कारण हा मुसलमानांचा स्वर्ग गोकुलिये गोसाव्यांच्या गोलोकासारखा आहे व त्यांच्या देवळासारखा दिसतो. कारण जसे गोलोकामध्ये पुरुषांपेक्षा स्त्रियांना जास्त महत्त्व दिले जाते तसेच खुदाच्या घरी स्त्रियांचा मानमरतबा पुरुषांपेक्षा जास्त असून त्यांच्यावर खुदाचे प्रेमही पुष्कळ आहे. पुरुषांवर नाही. कारण खुदाने बायकांना जसे स्वर्गात कायमचे ठेवून घेतले आहे तसे पुरुषांना ठेवून घेतलेले नाही. खुदाची मर्जी नसती तर त्या बायका स्वर्गात कशा राहू शकल्या असत्या ? ही गोष्ट अशी असेल तर खुदा या स्त्रियांत फसावा. ॥९॥

(१०) आणि परमेश्वराने आदमाला सर्व (वस्तूंची) नावे शिकविली. नंतर त्याने त्या वस्तूंना दूतापुढे मांडून फर्माविले की, जर तुम्ही (आपल्या दाव्यात) खरे आहा, तर तुम्ही मला ह्या वस्तूंची नावे सांगा (पाहू ?) (तेव्हा परमेश्वराने आदमला) फर्माविले की, हे आदम ! तू दूतास त्या (वस्तूं) ची नावे सांग. मग जेव्हा आदमाने दूतास त्या (वस्तूं) ची नावे सांगितली, तेव्हा (परमेश्वराने दूतास उद्देशून) सांगितले की, काय मी तुम्हास सांगितले नव्हते की मी आकाशाचे व पृथ्वीचे गुप्त भेद जाणतो आणि जे काय तुम्ही (आता) जाहीर करता व जे काय तुम्ही (मनात) लपविता ते (सर्वही) मला माहित आहे. -मं.१,सि.१,सू.२,आ. ३१, ३३.

**(समीक्षक)** आपल्याच दूतांना फसवून आपला मोठेपणा सिद्ध करणे किंवा बढाई मारणे हे काय ईश्वराचे काम होऊ शकते ? हा तर शुद्ध दांभिकपणा झाला. त्याला कोणीही विद्वान मान्यता देऊ शकणार नाही अथवा त्याबद्दल अशी फुशारकी मारणार नाही. असल्याच गोष्टींद्वारे खुदा आपले श्रेष्ठत्व प्रस्थापित करू इच्छितो काय? अर्थात जंगली लोकांमध्ये वाटेल तसला पाखंडीपणा चालू शकतो. सभ्य समाजात तो चालत नाही. ॥१०॥

## सैताना द्वारा खुदाच्या आज्ञेचा भंग

(११) आणि आम्ही दूतास फर्माविले की, तुम्ही आदमाला नमन करा. तेव्हा सैतानाखेरीज (सर्वांनीच) नमन केले. त्याने (मात्र) नाकारिले; व तो शेखीत आला आणि नास्तिक बनून बसला. -मं.१, सि.१, सू.२, आ.३४.

**(समीक्षक)** यावरून खुदा सर्वज्ञ नाही आणि तो भूत, भविष्य व वर्तमानकाळाच्या सर्व गोष्टी जाणत नाही. तो जाणत असता तर त्याने सैतानाला उत्पन्नच कशाला केले असते ? शिवाय खुदामध्ये काही तेजही

नाही. कारण सैतानाने खुदाचा हुकूमच मानला नाही आणि खुदा त्याचे काही वाकडे करू शकला नाही. आणखी पाहा! जेथे सैतानासारखा एकच काफिर मुसलमानांच्या खुदाला पुरून उरला तेथे मुसलमानांच्या म्हणण्याप्रमाणे कोट्यावधी काफिर आहेत अशा ठिकाणी मुसलमानांच्या खुदाचे व मुसलमानांचे काय चालू शकेल ? कधी-कधी खुदाही एखाद्याचा रोग वाढवितो व एखाद्याला चुकीचा मार्ग दाखवितो या गोष्टी खुदाने सैतानाकडून व सैतानाने खुदाकडून शिकून घेतल्या असाव्यात. कारण खुदाखेरीज सैतानाचा गुरू दुसरा कोण असणार ? ॥११॥

(१२) आणि आम्ही (आदमला) सांगितले की, हे आदमा ! तू व तुझी पत्नी (उभयता) स्वर्गात राहा व तेथे तुमच्या मर्जीस येईल ते खूप खा (प्या). पण ह्या (गव्हाच्या) वृक्षाजवळ फिरकू नका. (असे कराल) तर तुम्ही (आपणच आपले) नुकसान करून घ्याल. मग सैतानाने त्यांना फूस दिली व (अखेर) ज्या (सुखा) त ते होते त्यापासून त्यांना अंतरविले आणि आम्ही फर्माविले की, तुम्ही (सर्व) खाली उतरा. तुम्ही एकमेकांचे शत्रू आहात आणि पृथ्वीत तुझ्यासाठी एक (खास) वेळपर्यंत राहण्याचे ठिकाण व (निर्वाहाचे) साधन आहे. मग आदमने आपल्या पालनकर्त्यापासून (क्षमायाचनेचे काही) शब्द शिकून घेतले. -मं. १, सि.१, सू. २, आ.३५-३७.

**(समीक्षक)** आता खुदाची अल्पज्ञता पाहा! आताच त्याने आदमला स्वर्गात राहण्याचा आशीर्वाद दिला आणि लगेच त्याला सांगितले की, "येथून चालता हो !" त्याला थोड्या वेळानंतर काय होणार याची कल्पना असती तर त्याने तो वर का दिला असता ? शिवाय भडकविणाऱ्या सैतानाला शिक्षा देण्यास हा खुदा असमर्थ दिसून पडतो आणि तो वृक्ष कोणासाठी उत्पन्न केला होता ? स्वत:साठी की इतरांसाठी ? त्याने तो स्वत:साठी निर्माण केला असेल तर त्याला त्याची काय गरज होती ? आणि जर तो इतरांसाठी असेल तर मग प्रतिबंध करण्याचे कारण काय ? म्हणून हे काम ईश्वराचे असू शकत नाही आणि ईश्वरकृत ग्रंथात त्याचा अंतर्भाव असू शकत नाही. आदम साहेबांनी स्वर्गात असताना खुदाकडून कोणत्या गोष्टी शिकून घेतल्या होत्या? आणि हे आदम साहेब पृथ्वीवर कोणत्या प्रकारे आले ? त्यांचा तो स्वर्ग डोंगरावर आहे की आकाशात ? तेथून ते पृथ्वीवर कसे आले ? ते पक्ष्यांसारखे उडत आले की वरून दगड पडावेत तसे खाली पडले ?

आदम साहेबांना मातीपासून बनविण्यात आले होते त्यावरून त्यांच्या स्वर्गात मातीही असावी आणि तेथे देवदूत वगैरे जे इतर लोक होते तेही मातीचे असले पाहिजेत. कारण मातीची शरीरे व अवयव नसतील तर इंद्रियांचे उपभोग घेता येत नाहीत. आता पार्थिव शरीरे असतील तर त्यांना मृत्यूही अवश्य येत असणार. त्यांना मृत्यू येत असेल तर मेल्यानंतर ते तेथून कोठे जात असतील ? आणि जर त्यांना मृत्यू येत नसेल तर त्यांचा जन्मही होत नसणार. जन्म असेल तर मृत्यू अवश्य असला पाहिजे. तसे असल्यास कुराणात जे लिहिले आहे की, स्वर्गात स्त्रिया सदैव रहतात, ते खोटे ठरते. कारण त्यात स्त्रियाही नक्कीच मरत असणार. याचा अर्थ असा की, स्वर्गात जाणाऱ्यांनाही अवश्य मरण येणार. ॥१२॥

आणि ज्या दिवशी कोणी मनुष्य दुसऱ्या कोणा मनुष्याच्या काहीच कामास येणार नाही व त्याच्या वतीने (कोणाचीच) शिफारस मान्य होणार नाही आणि त्याच्यापासून (कोणातऱ्हेची) काही भरपाई घेतली जाणार

नाही; व लोकांना (कोठूनही) काही साहाय्य मिळणार नाही. त्या (पुनरुत्थाचे) दिवसाला तुम्ही भ्या. - मं.१, सि.१,सू.२,आ.४८.

**(समीक्षक)** चालू काळातील दिवसांना भिऊ नये काय ? वाईट कृत्ये करण्यास सर्व दिवशीच भिले पाहिजे. जर कोणाचीच शिफारस मान्य होणार नसेल तर मग पैगंबराच्या साक्षीने अथवा शिफारसीने खुदा स्वर्ग देईल, ही गोष्ट कशी खरी असेल ? खुदा स्वर्गातील लोकांचाच मदतगार आहे आणि नरकातील लोकांना तो मदत करीत नाही काय ? असे असेल तर खुदा पक्षपाती आहे. ॥१३॥

आम्ही मूसाला (तौरात-जुना करार) पुस्तक व निर्णायक नियमशास्त्र (चमत्कार) दिले. - मं.१, सि.१, सू.२, आ.५३.

**(समीक्षक)** मूसाला (मोझेसला) पुस्तक दिले होते तर कुराण रचणे निरर्थक ठरते आणि त्याला चमत्कार करण्याचे सामर्थ्य दिले हे बायबलात व कुराणातही लिहिलेले आहे. परंतु त्यावर विश्वास ठेवता येत नाही. कारण तसे असते तर आताही तसे होत असते. परंतु आता कोणीही करू शकत नाही. पूर्वीही कोणामध्ये चमत्कार करण्याचे सामर्थ्य नव्हते. आज काल जसे स्वार्थी लोक अविद्वानांसमोर विद्वान असल्याचा आव आणतात तशी त्यावेळीही लबाडी केली असावी. कारण खुदा आणि त्याचे भक्त आजही विद्यमान आहेत. तर मग खुदा आता चमत्कार सामर्थ्य का देत नाही ?आणि खुदाचे भक्त आज चमत्कार का करु शकत नाहीत ? मूसाला पुस्तक (बायबल) दिले होते तर पुनः कुराण देण्याची आवश्यकता का होती ? कारण सत्कर्म करावे, दुष्कर्म करू नये हा उपदेश बायबलात व कुराणात सारखाच असताना तो उपदेश देण्यासाठी दोन वेगवेगळे ग्रंथ रचल्याने पुनरुक्तीचा दोष निर्माण होतो. मूसा वगैरे मंडळींना दिलेल्या पुस्तकांमध्ये काही गोष्टी सांगावयास ईश्वर विसरला होता काय? ॥१४॥

## पाप क्षमा

(१५) व (तोंडून) हित्तुन (म्हणजे क्षमा क्षमा) बोलत जा, म्हणजे आम्ही तुम्हांस तुमच्या पापाची क्षमा करू व जे (आमचा) हुकूम चांगला बजावतील त्यांना आम्ही अधिक (पुण्यही) देऊ (ते वेगळेच). -मं.१, सि.१, सू.२, आ.५८.

**(समीक्षक)** हा खुदाचा उपदेश सर्वांना पापी बनविणारा आहे की नाही ? कारण जेव्हा आपल्या पापाबद्दल क्षमा केली जाणार आहे अशी खात्री माणसाला वाटते तेव्हा पाप करण्यास कोणीही भीत नाही. म्हणून असे म्हणणारा ईश्वर असू शकत नाही आणि तसे सांगणारे पुस्तक ईश्वरीय ग्रंथ असू शकत नाही. कारण परमेश्वर हा न्याय करणारा आहे. तो कधीही अन्याय करीत नाही आणि क्षमा केल्याने तो अन्यायकारी बनतो. अपराधानुसार शिक्षा दिल्यानेच तो न्यायी ठरतो. ॥१५॥

(१६) जेव्हा मूसाने आपल्या लोकांसाठी पाण्याची दरखास्त केली तेव्हा आम्ही फर्माविले की (हे मूसा) तू आपली काठी खडकावर मार. (काठी मारताक्षणी) त्या (खडका) तून बारा झरे फुटून वाहू लागले. - मं.१, सि.१, सू.२, आ.६०.

**(समीक्षक)** आता तुम्हीच पाहा ! यापेक्षा अधिक असंभव थापा कोणी मारू शकेल काय ? एका शिळेवर काठी मारताच बारा झरे वाहू लागणे पूर्णपणे असंभव आहे. अर्थात ती शिळा पोखरून तिच्यात पाणी भरले व तिला बारा छिद्रे पाडली तर मात्र ते शक्य आहे. एरव्ही ते शक्य नाही. ॥१६॥

(१७) आम्ही त्यांस म्हणालो की, तुम्ही माकडे बनून जा, (की, जेथे जाल तेथे) धुत्कारले जाल. मग आम्ही या वृत्तांतात जे लोक ह्याच्या (घडून येण्याच्या) वेळी हजर होते व जे लोक ह्याच्या मागून येणार होते त्या (सर्वां) साठी एक धडा घालून दिला आणि (तसाच परमेश्वराला) भिऊन चालणाऱ्यांसाठी एक बोध. -मं.१, सि.१, सू.२, आ.६५, ६६.

**(समीक्षक)** खुदाने निंदनीय माकडे होण्याचा धाक केवळ भीती दाखविण्याकरिता दाखविला असेल तर त्याचे बोलणे खोटे ठरले किंवा त्याने फसविले असे म्हणावे लागते. जो कोणी अशा गोष्टी करतो आणि ज्यात अशा गोष्टी असतील तो ईश्वर नाही व हे पुस्तक त्या ईश्वराने रचलेले असू शकत नाही. ॥१७॥

(१८) अशाच तऱ्हेने (पुनरुत्थानाच्या दिवशी) परमेश्वर मेलेल्यास सजीव (जिवंत) करील; आणि तो (जगात) तुम्हास आपल्या (सामर्थ्याच्या) निशाण्या दाखवितो की नवल नव्हे की तुम्ही समजाल (की पुनरुत्थानाचे घडून येणे सत्य आहे). - मं.१, सि.१, सू.२, आ.७३.

**(समीक्षक)** खुदा मृतांना जिवंत करीत होता तर मग आता तो तसे का करत नाही ? कयामतीच्या दिवसापर्यंत ते त्यांच्या थडग्यात पडून राहणार काय ? आजकाल खुदा दौऱ्यावर आहे काय ? मृतांना जिवंत करणे हाच ईश्वराच्या अस्तित्वाचा पुरावा आहे काय ? पृथ्वी, सूर्य, चंद्र वगैरे त्याच्या अस्तित्वाच्या खाणाखुणा नव्हेत काय ? जगामध्ये ज्या विविध प्रकारच्या अद्‌भुत गोष्टी डोळ्यांना प्रत्यक्ष दिसतात त्या ईश्वराच्या अस्तित्वाच्या खाणाखुणा कमी आहेत काय ? ॥१८॥

(१९) ते निरंतर स्वर्गातच राहतील. - मं.१, सि.१, सू.२, आ.८२.

**(समीक्षक)** कोणत्याही जीवामध्ये अनंत पाप अथवा पुण्य करण्याचे सामर्थ्य नसते. म्हणून कोणीही कायमचे स्वर्गात किंवा नरकात राहू शकत नाही आणि जर खुदा तसे करील तर तो अन्यायी व अविद्वान ठरेल. कयामतीच्या रात्री न्यायनिवाडा होणार असेल तर माणसांची पापे व पुण्ये समसमान असणे उचित होय. जे (कर्म) अनंत नाही त्याचे फळ अनंत (काळपर्यंत मिळणारे) कसे असू शकेल ? सृष्टीची उत्पत्ती सात आठ हजार वर्षांहून कमीच आहे असे सांगतात. मग काय त्यापूर्वी खुदा रिकामटेकडा बसला होता काय ? आणि कयामतीनंतर तो रिकामाच राहणार काय ? या सगळ्या गोष्टी बालीश आहेत. कारण परमेश्वराचे कार्य सदैव चालूच असते. ज्याचे जेवढे पाप-पुण्य असेल तेवढेच फळ तो त्याला देत असतो. म्हणून या विषयासंबंधी कुराणात जे काही सांगितले आहे ते खरे नाही. ॥१९॥

(२०) आणि जेव्हा आम्ही तुम्हांपासून पक्के वचन घेतले की तुम्ही आपला (परस्पराचा) रक्तपात करू नये व आपल्या शहरातून आपल्या लोकांस हद्दपार करू नये. तुम्ही कबूल केले व तुम्हां (सांप्रतकाळचे) लोकांसही

(त्याची) साक्ष पटतेच तथापि तेच तुम्ही आहा की जे आपल्यास मारून टाकता आणि (तसेच) आपल्यापैकी काहीना त्यांच्या शहरांतून हद्दपार करता. - मं.१, सि.१, सू.२, आ.८४, ८५.

**(समीक्षक)** शपथ घेणे व घ्यायला लावणे हा अल्पज्ञतेचा प्रकार आहे की सर्वज्ञतेचा ? परमेश्वर तर सर्वज्ञ आहे. तर मग संसारी माणसासारखा कूडाकूट प्रकार तो कशाला करील ? आपापसात रक्ताचे पाट न वाहविणे आणि आपल्या पंथबांधवांना त्यांच्या घरांतून बाहेर हाकलून न लावणे परंतु इतर पंथाच्या लोकांचे रक्त सांडणे व त्यांना त्यांच्या घरांतून बाहेर काढणे. हा तर खोटा मूर्खपणा व पक्षपात आहे. आपले अनुयायी वचनभंग करतील ही गोष्ट परमेश्वराला आधीपासून माहीत नव्हती काय ? यावरून असे दिसून येते की, मुसलमानांचा खुदाही पुष्कळ बाबतीत ख्रिस्त्यांच्या ईश्वरासारखाच आहे; आणि हे कुराण स्वतंत्र पुस्तक नसून त्यातील काही थोड्या गोष्टी वगळल्यास इतर सर्व गोष्टी बायबलमधल्याच आहेत. ॥२०॥

(२१) ज्या लोकांनी पुढच्या (आयुष्या) चे ऐवजी ह्या जगाचे आयुष्य विकत घेतले, ते हेच होते. तर (पुनरुत्थानाचे दिवशी) त्याच्यावरून तर शिक्षा हलकी केली जाणार नाही व (कोठूनही) त्यांना मदत पोहोचणार नाही. - मं.१, सि.१, सू.२, आ.८६.

**(समीक्षक)** अशा ईर्ष्या व द्वेषाच्या गोष्टी कधीतरी ईश्वराकडून होऊ शकतात काय ? ज्या लोकांचा पापभार हलका केला जाईल अथवा ज्यांना साह्य केले जाईल ते कोण लोक आहेत ? जर ते पापी असतील व त्यांच्या पापांबद्दल त्यांना शिक्षा देण्याऐवजी त्यांची पापे हलकी केली जाणार असतील तर तो अन्याय होईल. जर त्यांना देऊन त्यांची पापे कमी केली जाणार असतील तर या आयतीमध्ये ज्यांचा उल्लेख आहे तेही शिक्षा मिळवून हलके होऊ शकतात. शिक्षा दिल्यानंतरही त्यांची पापे नाहीशी केली गेली नाहीत तर तोही अन्याय होईल. धर्मात्म्यांची पापे हलकी केली जातील असे म्हणण्याचा उद्देश असेल तर त्यांची पापे मुळातच अगदी थोडी असतात. ती खुदा आणखी कमी काय करणार ? यावरून हे लिखाण विद्वानाचे नाही, हे सिद्ध होते. वस्तुतः परमेश्वराने धर्मात्म्यांना सुखे आणि अधर्मियांना दुःखे त्यांच्या कर्मानुसार सदैव दिली पाहिजेत. ॥२१॥

(२२) आणि अलबत आम्ही मूसाला (तौरात) पुस्तक दिले; व त्याच्यामागून एकामागे एक (इतर) प्रेषितही पाठविले आणि मरयमचा पुत्र ईसा (येशू) यासही आम्ही ढळढळीत चमत्कार दिले व पवित्र आत्मा (म्हणजे जिब्रील) याद्वारे आम्ही त्याला पाठबळ दिले. तर का (तुम्ही इतके दांड होऊन गेला आहात की) जेव्हा जेव्हा तुम्हापाशी कोणी प्रेषित (पैगंबर) तुमच्या जीवास नको नको होत असे हुकूम घेऊन आला, तेव्हा तेव्हा तुम्ही गर्वाने अडून बसलात ? मग काहींना तुम्ही पाखंडी म्हटलेत व काहींना तुम्ही जीवे मारू लागतात. - मं.१, सि.१, सू.२, आ.८७.

**(समीक्षक)** मूसाला पुस्तक दिले असे कुराणात स्पष्टपणे सांगितले आहे. म्हणून तो मान्य करणे हे मुसलमानांचे कर्तव्य ठरते. तसेच, त्या ग्रंथात जे जे दोष आहेत तेही मुसलमानांच्या पंथात समाविष्ट झाले. त्यामध्ये 'मोजिजे' म्हणजे दैवी चमत्कारांविषयी जे काही लिहिले आहे ते सारे खोटे आहे. भोळ्याभाबड्या लोकांना फसविण्यासाठी वापरलेली ती एक खोटी गोष्ट आहे. कारण सृष्टिक्रम आणि विद्या (विज्ञान) यांच्या

विरुद्ध असणाऱ्या सगळ्या गोष्टी खोट्याच असतात. दैवी चमत्कार त्या काळी घडत होते तर ते आजकाल का घडत नाहीत ? ज्याअर्थी ते आजकाल घडत नाहीत त्याअर्थी पूर्वीही घडत नव्हते, यात मुळीच शंका नाही. ॥२२॥

## अल्लाह काफिरांचा शत्रू

(२३) व लोक ह्याच्या पूर्वी नास्तिकांविरुद्ध आपल्या जयाची प्रार्थना करीत होते; तर जेव्हा जे काही ते जाणून ओळखून होते ते त्यांच्यापाशी येऊन चुकले तेव्हा ते त्याची नाकारणी करू लागले. म्हणून नाकारणाऱ्यास परमेश्वराचा शाप होय. -मं.१, सिं.१, सू.२, अ.८८.

**(समीक्षक)** जसे तुम्ही इतर मत-पंथियांना काफिर म्हणता तसे तेही तुम्हाला काफिर म्हणत नाहीत काय? आणि आपल्या पंथाच्या ईश्वराच्या वतीने ते तुमचा धिक्कार करतात. मग कोण खरा व कोण खोटा ? विचार करून पाहिल्यास सर्वच पंथाच्या अनुयायांमध्ये कमी अधिक खोटेपणा आहे आणि जे काही सत्य आहे ते सर्व पंथामध्ये समान आहे. ही सारी भांडणे मूर्खपणाची आहेत. ॥२३॥

(२४) ते विश्वासूसाठी सद्बोध व (तारणाचे) शुभवर्तमान होय. जो कोणी परमेश्वराचा दुश्मन होय व त्याच्या दूतांचा व त्याच्या प्रेषितांचा व (प्रामुख्ये करून) जिब्रील (दूता) चा व मीकाएल (दूता) चा. तर खरोखरीच परमेश्वरही नास्तिकांचा दुश्मन होय. -मं.१, सि.१, सू.२, आ.१०१.

**(समीक्षक)** मुसलमान म्हणतात की, खुदा 'लाशरीक' आहे. मग त्याने ही फौजच्या फौज कोठून 'शरीक' (समाविष्ट) केली ? जो इतरांचा शत्रू आहे तो खुदाचाही शत्रू आहे काय ? तसे असेल तर ते योग्य नाही. कारण ईश्वर हा कोणाचाही शत्रू असू शकत नाही. ॥२४॥

(२५) परमेश्वर ज्यास इच्छितो त्याची आपल्या दयेसाठी खास (निवड) करतो.- मं.१, सि.१, सू.२, आ.१०५.

**(समीक्षक)** जो प्रमुख होण्यास आणि दया करण्यास योग्य नसेल त्यालाही खुदा प्रमुख बनवितो व त्याच्यावर दया करतो काय ? तसे असेल तर खुदा फारच मोठा गोंधळ माजविणारा ठरतो. कारण मग सत्कृत्ये कोण करील ? आणि दुष्कृत्ये करणे कोण सोडील ? कारण माणसाला मिळणारी फळे खुदाच्या लहरीवर अवलंबून असतील व ती कर्मावर अवलंबून नसतील तर सर्व लोक कर्माच्या बाबतीत बेफिकीर बनतील आणि कर्मोच्छेदाचा प्रसंग ओढवेल. ॥२५॥

(२६) (मुसलमानांनो!) बहुतेक ग्रंथधारी लोक आपल्या मनातील मात्सर्यामुळे अशी उत्कंठा बाळगतात की, तुमच्या विश्वासधारणानंतरही त्यांनी तुम्हांस पुन्हा नास्तिक करून टाकावेत. - मं.१, सि.१, सू.२, आ.१०९.

**(समीक्षक)** आता पाहा ! खुदाच आपल्या अनुयायांना सावध करीत आहे की तुमची श्रद्धा काफिर लोक डळमळीत करतील. खुदा सर्वज्ञ नाही काय ? अशा गोष्टी ईश्वराच्या असू शकत नाहीत. ॥२६॥

(२७) तर जेथेही कोठे तुम्ही (किबल्याकडे) तोंड कराल, तेथेच परमेश्वराचा सामना आहे. - मं.१, सि.१, सू.२, आ.११५.

**(समीक्षक)** ही गोष्ट खरी असेल तर मुसलमान किबल्याकडे तोंड का करतात ? त्यांचे म्हणणे जर असे असेल की, किबल्याकडे तोंड करण्याची आम्हाला खुदाची आज्ञा आहे, तर वाटेल तिकडे तोंड करा असेही खुदाने सांगितले आहे. यांपैकी कोणती तरी एक आज्ञा खरी व दुसरी खोटी असली पाहिजे आणि जर अल्लाला तोंड असेल तर ते सर्व बाजूंना असू शकत नाही. कारण एक तोंड (एकाच बाजूला असणार) ते सर्व बाजूंना कसे असणार ? म्हणून ही आज्ञा सुसंगत नाही. ॥२७॥

## सृष्टि रचना

(२८) (ही विचित्र) आकाश, पृथ्वी यांचा तोच उत्पादक होय आणि जेव्हा तो कोण एखाद्या कामाचा निश्चय करतो, तेव्हा तो त्याच्या संबंधाने फक्त एवढेच फर्मावितो की, 'हो' व ते होऊन जाते. - मं.१, सि.१, सू.२,आ. ११७.

**(समीक्षक)** खुदाने 'हो' असा जो हुकूम दिला तो कोणी ऐकला ? कोणाला उद्देशून तो हुकूम दिला होता? आणि काय झाले ? कोणत्या उपादान कारणातून त्याची उत्पत्ती झाली ? सृष्टीच्या पूर्वी खुदाशिवाय दुसरे काहीच नव्हते असे कुराणात व बायबलात सांगितले आहे. तर मग हे जग कोठून आले ? कारणाशिवाय कोणतेही कार्य घडत नाही. तर मग एवढे मोठे जग उपादान कारणाशिवाय कसे बनले ? म्हणून हा सारा शुद्ध पोरकटपणा आहे.

**(पूर्वपक्षी)** छे: छे: ! खुदाच्या इच्छेने ते बनले.

**(उत्तरपक्षी)** तुमच्या इच्छेने माशीचा एक पाय तरी बनू शकतो काय ? मग खुदाच्या इच्छेने हे सरे जग बनले असे तुम्ही कसे म्हणता ?

**(पूर्वपक्षी)** खुदा सर्वशक्तीमान आहे. म्हणून त्याची इच्छा असेल ते तो करतो.

**(उत्तरपक्षी)** सर्वशक्तीमान याचा अर्थ काय ?

**(पूर्वपक्षी)** जो वाटेल ते करु शकतो तो सर्वशक्तीमान होय.

**(उत्तरपक्षी)** खुदा दुसरा खुदाही बनवू शकतो काय ? तो स्वत: मरू शकतो काय ? मूर्ख, रोगी व अज्ञानीही बनू शकतो काय ?

**(पूर्वपक्षी)** असे कधी होऊ शकत नाही.

**(उत्तरपक्षी)** म्हणूनच परमेश्वर आपले व इतरांचे गुण, कर्म व स्वभाव यांच्या विरुद्ध काहीही करू शकत नाही. जगातील कोणतीही वस्तू बनण्यास व बनविण्यास प्रथम तीन गोष्टींची आवश्यकता असते :- (१) बनविणारा, उदाहरणार्थ, कुंभार (२) माठ बनविण्याचे साधन म्हणजे माती आणि (३) ज्याच्या साह्याने माठ बनविला जातो ते उपकरण म्हणजे चाक ! ज्याप्रमाणे कुंभार, माती व साधन किंवा उपकरण यांच्या योगाने माठ बनतो आणि तो बनण्यापूर्वी कुंभार, माती व उपकरण या गोष्टी विद्यमान असतात. त्याचप्रमाणे जग निर्माण होण्यापूर्वी परमेश्वर, जगाचे कारण प्रकृती व त्यांचे गुण, कर्म, स्वभाव या गोष्टी अनादी आहेत. म्हणून कुराणात वर्णिलेली गोष्ट सर्वथैव अशक्य आहे. ॥२८॥

(२९) जेव्हा आम्ही (काबा) गृहाला लोकांचे पुण्यक्षेत्र व शांतिस्थान ठरविले आणि (लोकांस आज्ञा केली की) इब्राहीमचे (ह्याच) जागेत तुम्ही नमाजाची जागा मुक्रर ठेवा. - मं.१, सि.१, सू.२, आ.१२५.

**(समीक्षक)** काब्याच्या पूर्वी खुदाने एकही पवित्र स्थान निर्माण केले नव्हते काय ? जर केले असेल तर काबा निर्माण करण्याची काहीच आवश्यकता नव्हती. जर केले नसेल तर पूर्वी जन्मलेल्या बिचाऱ्या लोकांना त्याने पवित्र स्थानाशिवायच ठेवले होते काय ? बहुधा ईश्वराला पवित्र स्थान बनविण्याची आठवणच राहिली नसेल. ॥२९॥

(३०) आणि असा कोण आहे की जो इब्राहीमचे पंथास विमुख होईल ? परंतु ज्याची अक्कल मारली गेली असेल तोच आणि आम्ही त्याला ह्या लोकीही खरोखरच निवडून घेतले होते व परलोकीही तो पवित्राचरणी लोकांपैकीच होईल. - मं.१, सि.१, सू.२, आ.१३०.

**(समीक्षक)** जे लोक इब्राहीमचा पंथ मानीत नाहीत ते सगळे मूर्ख असतील, हे कसे शक्य आहे ? इब्राहीमलाच खुदाने पसंत केले याचे कारण काय ? तो धर्मात्मा होता म्हणून पसंत केले असेल तर इतरही पुष्कळ धर्मात्मे असण्याची शक्यता होती. तो धर्मात्मा नसताना त्याची निवड केली असेल तर तो देवाने अन्याय केला अर्थात जो धर्मात्मा असतो तोच देवाला प्रिय असतो, अधर्मी प्रिय नसतो, हे योग्यच आहे. ॥३०॥

## मूर्तिपूजा

(३१) तसेच तोंड फिरवून फिरवून आकाशाकडे पाहणे आम्ही निरीक्षितच आहो. जो किबला (काबा) तू चाहतोस त्याच्याकडे आम्ही तुला वळण्याचा हुकूम देऊ. (बरे) तर (आता नमाज पढताना) आदर सन्मानाने मशीदी (म्हणजे काब्या)कडेच आपले तोंड करीत जा; आणि (मुसलमानांनो ! तुम्हीही) जेथे कोठेही असाल, तेथे त्याच्याकडे आपली तोंडे करीत असा. - मं.१, सि.२, सू.२, आ.१४४.

**(समीक्षक)** ही काय लहान मूर्तिपूजा आहे ? मोठी नाही.

**(पूर्वपक्षी)** आम्ही मुसलमान मूर्तिपूजक नसून मूर्तिभंजक आहोत. आम्ही किबल्याला (काब्याला) खुदा समजत नाही.

**(उत्तरपक्षी)** ज्यांना तुम्ही मूर्तिपूजक समजता तेही त्या-त्या मूर्तींना ईश्वर समजत नाहीत; तर त्या मूर्तींना प्रतीक मानून त्याच्यासमोर परमेश्वराची भक्ती करतात. तुम्ही मूर्तिभंजक आहात तर काबा मशिदीची ती मोठी मूर्ती तुम्ही का फोडून टाकली नाही ?

**(पूर्वपक्षी)** वाहवा ! आम्हाला किबल्याकडे तोंड करून नमाज पढण्याची जशी आज्ञा कुराणामध्ये देण्यात आलेली आहे तशी ईश्वरोपासना करण्याची आज्ञा वेदामध्ये नाही. म्हणून ते मूर्तिपूजक ठरतात. आम्ही मूर्तिपूजक नाही. खुदाचा हुकूम पाळणे हे आमचे कर्तव्यच आहे.

**(उत्तरपक्षी)** जसा तुमच्यासाठी कुराणात हुकूम आहे तशी त्यांच्यासाठी पुराणात आज्ञा आहे. जसे तुम्ही कुराणाला ईश्वरीय वचन मानता तसे पुराणपंथी लोकही पुराणे ही परमेश्वरी अवतार असणाऱ्या व्यासांची वचने

आहेत असे समजतात. तुमच्यात व त्यांच्यात मूर्तिपूजेच्या बाबतीत काहीच फरक नाही. उलट तुम्ही मोठे मूर्तिपूजक आहात आणि ते छोटे मूर्तिपूजक आहेत. एखाद्या माणसाने घरात शिरलेल्या मांजराला बाहेर काढण्याचा प्रयत्न करावा आणि त्याचवेळी घरामध्ये उंटाने प्रवेश करावा तसे मुहम्मद साहेबांनी लहान मूर्तीला मुसलमानांच्या पंथातून काढून टाकले; परंतु डोंगराएवढी मक्केची मशीद ही प्रचंड मूर्ती सर्व मुसलमानांच्या पंथात समाविष्ट केली. ही काय लहान मूर्तिपूजा आहे ? म्हणून जसे आम्ही वैदिक आहोत तसे तुम्हीही वैदिक व्हा म्हणजे मूर्तिपूजा वगैरे दोषांपासून तुमची सुटका होईल. अन्यथा नाही. जोपर्यंत तुम्ही आपल्या पंथातून ही मोठी मूर्तिपूजा काढून टाकणार नाही तोपर्यंत इतरांच्या लहान मूर्तिपूजेचे खंडन करणे तुम्हाला लज्जास्पद असून निवृत्त राहिले पाहिजे आणि अशा मोठ्या मूर्तिपूजेपासून दूर राहून तुम्ही स्वतःला पवित्र बनविले पाहिजे. ॥३१॥

(३२) जे लोक परमेश्वराचे मार्गात जिवे मारले जातील त्यांना मेलेले म्हणू नका. तर ते जिवंत आहेत.

- मं.१, सि.२, सू.२, आ.१५४.

**(समीक्षक)** ईश्वराच्या मार्गात मरण्याची किंवा मारण्याची काय आवश्यकता आहे ? ही गोष्ट केवळ आपला स्वार्थ साधण्यासाठी आहे, हे तुम्ही स्पष्टपणे का सांगत नाही ? ही लालूच दाखविली की लोक खूप लढतील, आपला विजय होईल, इतरांना मारण्यास ते मागेपुढे पाहणार नाहीत, लूट-मार करविल्याने ऐश्वर्य प्राप्त होईल आणि मग आपण विषयानंद घेऊ वगैरे तुम्ही स्वार्थासाठी हा विपरीत व्यवहार केला आहे. ॥३२॥

(३३) व (तसेच) हे की परमेश्वर शिक्षेतही कडक आहे. सैतानाचे पदोपदी (पावलावर पाऊल टाकून) चालू नका. कारण तो बोलून चालून दुष्मन होय. तो तर तुम्हांस कुकर्म व निर्लज्जपणा (चीच काय ती कामे) करावयास सांगील व हेच (इच्छील) की तुम्ही जाणत देखील नाही अशा (नसत्या कुभांडाच्या) गोष्टी तुम्ही (आपल्याकडून) परमेश्वरासंबंधी व्यक्त कराव्या. - मं.१, सि.२, सू.२, आ.१६५,१६८,१६९.

**(समीक्षक)** तुमचा खुदा पुण्यवान लोकांच्या बाबतीत दयाळू आणि पाप्यांना कठोर दुःख देणारा आहे की मुसलमानांवर दया करणारा आणि इतरांच्या बाबतीत दयाहीन आहे ? जर तसे असेल तर तो ईश्वरच असू शकत नाही. पण जर तो पक्षपाती नसेल तर जो कोणी माणूस कोठेही धर्माचरण करील तर तो (ईश्वर) त्याच्यावर दयाळु आणि अधर्माचरण करील त्याला तो शिक्षा देईल. तेव्हा ईश्वर व जीव यांच्यामध्ये मुहम्मद साहेब व कुराण यांना मानण्याची आवश्यकता नाही. जो सर्वांना दुष्कृत्ये करावयास लावणारा, मनुष्यमात्राचा शत्रू असा जो सैतान आहे त्याला खुदाने उत्पन्नच का केले ? त्याला भविष्यात काय घडणार आहे हे माहित नव्हते काय ? जर त्याला ते माहीत होते. परंतु परीक्षा पाहण्यासाठी ईश्वराने त्याला निर्माण केले तर तेही टिकू शकणार नाही. कारण परीक्षा पाहणे हे अल्पज्ञांचे काम आहे. जो सर्वज्ञ आहे तो सर्व जीवांची बरीवाईट कृत्ये नेहमीच जाणतो आणि सैतान सर्वांना बहकावीत असेल तर सैतानाला कोणी बहकाविले ? सैतान स्वतःच बहकू शकतो. तर इतरही आपण भडकू शकतात त्यात सैतानाचे काय काम ? आणि जर खुदानेच सैतानाला

बहकाविले असेल तर खुदा हा सैतानाचा सैतान ठरतो. ईश्वराच्या बाबतीत असे घडू शकत नाही. जो कोणी बहकतो तो वाईट संगतीने व अविद्येमुळेच भ्रान्त बनतो. ॥३३॥

(३४) त्याने तर तुम्हांसाठी फक्त मेलेले (जनावर) व रक्त व डुकराचे मांस ही निषिद्ध केली आहेत व (तसेच) परमेश्वराशिवाय अन्य कोणा (चे आराधने) स्तव जे (बळी दिले व) नामजाद केले जाईल ते (जनावर). - मं.१, सि.२, सू.२, आ.१७३.

**(समीक्षक)** येथे ही गोष्ट विचारात घेतली पाहिजे की, मृत पशूचे शरीर, आपोआप मेलेल्या पशूचे असो की कोणीतरी मारलेल्या पशूचे असो, हे सारखेच असते. अर्थात त्यांच्यात थोडा फरक असतो. परंतु मृतावस्थेत काही फरक नसतो आणि जर डुकराचे मांस निषिद्ध ठरविले तर माणसाचे मांस खाणे योग्य आहे ? परमेश्वराच्या नावाने शत्रू वगैरेना अत्यंत दु:ख देऊन ठार मारणे ही गोष्ट चांगली असू शकते काय ? वस्तुत: याने ईश्वराच्या नावाला काळिमा लागतो. ज्या प्राण्यांनी पूर्वजन्मी काहीही अपराध केलेला नाही त्यांना मुसलमानांच्या हातून ईश्वराने दारुण दु:ख का बरे दिले ? त्यांच्या बाबतीत ईश्वर दयाळू नाही काय ? खुदा त्यांना आपल्या मुलांसमान मानीत नाही काय ? गाय वगैरे ज्या प्राण्यांमुळे मानवजातीवर उपकार होतात त्यांना मारणे हे निषिद्ध न ठरविता त्यांची हत्या करविणारा खुदा जगाची हानी करणारा आहे. तो हिंसारूपी पापाने कलंकितही होतो. असल्या गोष्टी खुदाच्या व खुदाच्या पुस्तकाच्या कधीच असू शकत नाहीत. ॥३४॥

(३५) (मुसलमानांनो !) उपासाचे रात्रीत तुम्हास आपल्या पत्न्यांपाशी जाण्याची मुभा दिली गेली आहे. त्या तुमचा पदर (वस्त्र) होत व तुम्ही त्यांचा पदर आहात. परमेश्वराने पाहिले की, तुम्ही (चोरी छुपी त्यांचेपाशी गेल्याने) खुद्द आपलेच (धार्मिक) नुकसान करीत होता. म्हणून त्याने तुमचा पश्चाताप मान्य केला व तुमच्या अपराधांची क्षमा केली. तर आता (उपासात रात्रीचे समयी) तुम्ही त्यांच्याशी अंगसंग करा आणि (अंगसंगाचा परिणाम) जी (पुत्रप्राप्ती) परमेश्वराने तुम्हासाठी लिहून ठेवलेली आहे तिची आकांक्षा करा; (व निव्वळ कामतृप्तीचे नादास) लागू नका. तुम्ही खा व प्या; येथपर्यंत की (रात्रीचे) काळ्या धारेपासून प्रात:कालाची पांढरी धार तुम्हास स्पष्ट दिसून येऊ लागेल. -मं.१, सि.२, सू.२, आ.१८७.

**(समीक्षक)** जेव्हा मुसलमानांचा पंथ सुरू झाला तेव्हा किंवा त्याच्या आधी कोणीतरी येथील पौराणिकांना महिनाभर चालणाऱ्या चंद्रायण व्रताचा विधी काय असतो हे विचारून घेतले असावे आणि त्याप्रमाणे आपल्या येथे ते व्रत सुरू केले असावे असे यावरून (रमजानच्या रोज्यांवरून) सिद्ध होते. या शास्त्रविधी मध्ये कृष्ण पक्षात चंद्राची कला जसजशी घटत जाते तसतसा जेवणातून एक-एक घास कमी केला जातो व शुक्लपक्षात चंद्राच्या वाढत्या कलेप्रमाणे एकेक घास वाढविला जातो. या व्रतामध्ये ऐन मध्याह्नीला (भरदुपारी) जेवण करावयाचे असते ते नीट न कळल्यामुळे मुसलमानांनी त्यात बदल करून चंद्रदर्शन झाल्यावर जेवण करावे असे ठरविले असावे. परंतु या व्रतामध्ये स्त्रीसमागम वर्ज्य असतो. त्याऐवजी खुदाने सांगून टाकले की, तुम्ही रात्री स्त्रियांशी खुशाल समागम करा; आणि रात्री वाटेल तितक्या वेळा जेवा. याला काय व्रत म्हणावयाचे ? दिवसा न खाता रात्री खात राहिले. वस्तुत: दिवसा न जेवता रात्री जेवणे हे सृष्टिक्रमाच्या विरुद्ध आहे. ॥३५॥

(३६) आणि (मुसलमानांनो !) जे लोक तुम्हाशी लढतील त्यांच्याशी तुम्हीही परमेश्वराचे मागार्थ (म्हणजे धर्मार्थ) लढा आणि (जे लोक तुम्हाशी लढतात) त्यांना जेथे पावाल तेथे कत्तल करा आणि कुफ्र (काफिर राहणे हे) कत्तली पेक्षाही अधिक भयंकर होय; आणि तुम्ही येथपर्यंत लढा की (मुलुखात) फंदफितुर (नावासही) राहणार नाही; व (एका) परमेश्वराचाच हुकूम चालेल. तर जसा कहर त्यांनी तुम्हांवर गुदरविला तसाच कहर तुम्ही त्यांच्यावर गुदरवा. - मं. १, सि.२, सू. २, आ.१९०, १९१, १९३, १९४.

**(समीक्षक)** कुराणात अशा गोष्टी सांगितल्या नसत्या तर मुसलमान लोक इतर पंथांच्या लोकांवर जो इतका भयंकर जुलूम करतात तो त्यांनी केला नसता. वस्तुतः काहीही अपराध नसताना ते लोकांना ठार मारून फार मोठे पाप करीत असतात. इस्लामचा स्वीकार न करणे म्हणजे कुफ्र होय आणि जो कुफ्र करतो त्याला काफिर म्हणतात. कुफ्रापेक्षा काफिरांची कत्तल करणे हे जास्त चांगले, असे मुसलमान समजतात. जो कोणी इस्लामचा स्वीकार करणार नाही त्याची आम्ही कत्तल करणार, ही मुसलमानांची भूमिका असते. त्याप्रमाणे ते करत आले आहेत. पंथाच्या नावाने लढता-लढता ते आपली राज्ये वगैरे घालवून बसले. इतर पंथांविषयी त्यांचे मन फार कठोर असते. चोरीचा बदला (सूड) चोरी आहे काय ? चोरी वगैरे करून चोर आमचा जेवढा गुन्हा करतो त्याचा सूड म्हणून आपणही चोरी करावी काय ? तसे करणे पूर्णपणे अन्याय आहे. एखादा अडाणी माणूस आपल्याला शिव्या देऊ लागला तर आपणही त्याला शिव्या द्याव्यात काय ? तसे करणे हे ईश्वरी कृत्य नव्हे. ईश्वराचे विद्वान भक्त तसे कधीच करणार नाहीत. ईश्वरोक्त ग्रंथात अशा गोष्टीला स्थान असू शकत नाही. केवळ स्वार्थी व ज्ञानरहित माणूसच असे करतो किंवा लिहितो. ॥३६॥

## खुदा केवळ मुसलमानांचा आहे काय ?

(३७) परमेश्वर (कोणत्याही तऱ्हेने) अत्याचार करणाऱ्यांना पसंत करीत नाही. अहो मुसलमानांनो ! इस्लामात तुम्ही पुरेपुर दाखल व्हा. - मं.१, सि.२, आ.२०५, २०८.

**(समीक्षक)** झगडा करणाऱ्यांना खुदा पसंत करीत नसेल तर त्याने स्वतःच मुसलमानांना झगडा करण्यास का प्रवृत्त केले ? आणि झगडाळू मुसलमानांशी तो मैत्री का करतो ? मुसलमान इस्लामचा स्वीकार करतात, एवढ्यानेच परमेश्वर खुष होत असेल तर तो मुसलमानांचा पक्षपाती आहे. तो संपूर्ण विश्वाचा ईश्वर नव्हे. यावरून असे लक्षात येते की, कुराण ईश्वरकृत नाही आणि त्यात वर्णन केलेला खुदा हा ही ईश्वर होऊ शकत नाही. ॥३७॥

(३८) अल्लाची इच्छा असेल त्याला तो अमर्याद आजीविका देतो. - मं.१, सि.२, सू. २, आ.२१२.

**(समीक्षक)** पापपुण्याचा विचार न करता अल्ला माणसाच्या पोटापाण्याची सोय करतो काय ? मग पाप किंवा पुण्य करणे हे सारखेच झाले; कारण सुख-दुःख प्राप्त होणे हे ईश्वराच्या इच्छेवर आहे म्हणून ते धर्मापासून विमुख होऊन स्वैराचार करतात आणि कोणी-कोणी कुराणात सांगितलेल्या या गोष्टीवर विश्वास न ठेवता खऱ्या अर्थाने धर्माचरणही करतात. ॥३८

## स्त्रिया म्हणजे शेती

(३९) आणि (हे पैगंबरा ! लोक) तुला ऋतुस्नानाविषयी विचारतात. तर (तू त्यांना) समजावून दे की तो मल होय. तर विटाळात तुम्ही स्त्रियांपासून अलग राहा आणि त्या चोरख्या (शुद्ध) होईपर्यंत त्यांच्यापाशी जाऊ नका. मग जेव्हा त्या न्हाऊन धुऊन घेतील तेव्हा जेथून परमेश्वराने तुम्हास सांगून दिले आहे तेथून त्यांच्यापाशी या. तुमच्या पत्न्या (जणूकाय) तुमची क्षेत्रे (शेते) होत. तुम्ही आपल्या क्षेत्रात हवे तसे जा. तुमच्या शब्दात ज्या निरर्थक (शपथा) होत त्याबद्दल तर परमेश्वर तुम्हास पकडणार नाही. - मं.१, सि.२, सू.२, आ.२२२, २२३, २२५.

**(समीक्षक)** रजस्वला (विटाळशी) स्त्रीला स्पर्श , समागम करू नका, ते चांगले आहे. परंतु स्त्रिया या तुमच्या शेती सारख्या असून तुम्ही तुमच्या इच्छेप्रमाणे वाटेल तेव्हा त्यांच्याजवळ जा. हे पुरुषांना विषयासक्त बनविण्यास कारणीभूत आहे. निरर्थक शपथांबद्दल खुदा शपथ घेणाऱ्यांना जबाबदार धरीत नसेल तर सर्व लोक खोटे बोलतील व शपथा मोडतील. त्यामुळे खुदा असत्याचा प्रवर्तक होईल. ॥३९॥

## खुदाचे उधार मागणे

(४०) (असा) कोण आहे की, जो परमेश्वराला दिलखुशीने कर्ज देईल; की परमेश्वर त्याचे कर्ज त्याला अनेक पटींनी वाढवून (परत) देईल ? - मं.१, सि.२, आ.२४५.

**(समीक्षक)** खुदाला कर्ज काढण्याचे काय प्रयोजन ? ज्याने सारे जग निर्माण केले तो काय माणसाकडून कर्ज घेतो ? मुळीच नाही. अज्ञानानेच असे म्हटले जाऊ शकते. त्याचा खजिना रिकामा झाला होता काय ? व्यापारधंदा आणि हुंड्या देणे वगैरे करीत असताना त्याला भयंकर फटका बसला म्हणून तो कर्ज घेऊ लागला काय ? हा खुदा दामदुप्पट देण्याचा वायदा करतो काय तो सावकाराचे काम करतो ? परंतु असल्या गोष्टी तर दिवाळखोर, आयपेक्षा जास्त व्यय करणारे आणि ज्यांची आय (प्राप्ती) फार कमी असते अशा लोकांना कराव्या लागतात. ईश्वराला नाही. ॥४०॥

(४१) त्यांच्यापैकी कोणी असे होते की, ज्यांनी (इस्लाम स्वीकारला व कोणी असे होते की विश्वासास) नाकारिले आणि जर परमेश्वर इच्छिता तर (हे लोक) आपसात न लढते, परंतु ईश्वर जे योजितो ते करितो.

- मं.१, सि.३, सू.२, आ.२५३.

**(समीक्षक)** जेवढ्या लढाया होतात त्या सगळ्या ईश्वराच्या इच्छेने होतात काय ? ईश्वराला अधर्म करावासा वाटला तर तो तसे करू शकतो काय ? तसे असेल तर तो खुदाच नव्हे. कारण शांतता भंग करून लढाया करविणे हे भल्या माणसाचे काम नव्हे. यावरून विधित होते की, हे कुराण ईश्वरानेही रचलेले नाही अथवा एखाद्या धार्मिक विद्वानानेही रचलेले नाही. ॥४१॥

(४२) जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे ते त्याचेच होय. त्याच्या (सत्तारूपी) सिंहासनाने आकाश व पृथ्वी (ही सर्व) व्यापली आहे. - मं.१, सि.३, सू.२, आ.२५५.

**(समीक्षक)** आकाशात व भूमीवर जे काही पदार्थ आहेत ते सर्व परमात्म्याने जीवांसाठी उत्पन्न केले

आहेत; स्वत:साठी नव्हे. कारण तो पूर्णकाम आहे. त्याला कोणत्याही वस्तूची अपेक्षा नसते. जर त्याचे सिंहासन आहे तर तो खुदा एकदेशी (स्थानसिमित) आहे. परंतु जो एकदेशी असतो त्याला ईश्वर म्हणत नाहीत. कारण ईश्वर सर्वव्यापक आहे. ॥४२॥

(४३) परमेश्वर पूर्वेकडून सूर्य उगवितो. तू तो पश्चिमकडून उगीव (पाहू!). यावर तो नास्तिक (काफिर) थक्क होऊन राहिला. (तरीही त्याने विश्वास धरिला नाही.) आणि परमेश्वर हटवादी लोकांस सुबुद्धी देत नसतो.

- मं.१, सि.३, सू.२, आ.२५८.

**(समीक्षक)** हा अडाणीपणा आहे, पाहा! सूर्य पूर्वेकडून पश्चिमेकडे अथवा पश्चिमेकडून पूर्वेकडे कधीच जात-येत नसतो. तो तर आपल्या परिघीमध्येच फिरत असतो. यावरून हे सिद्ध होते की, कुराण रचणाऱ्याला खगोलविद्येचे किंवा भूगोलविद्येचे मुळीच ज्ञान नव्हते. जो मुसलमानांचा खुदा पाप्यांना सन्मार्ग दाखवीत नाही त्याची पुण्यात्म्यांना काहीच गरज नाही. कारण धर्मात्मे हे धर्माच्या मार्गानेच जात असतात. जे लोक वाट चुकलेले असतात त्यांना धर्माची वाट दाखविणे हे ईश्वराचे काम असते. आपले हे कर्तव्य पार पाडीत नाही ही त्याची फार मोठी चूक आहे.॥४३॥

(४४) फर्माविले की (बरे) तर चार पक्षी घे व त्यास आपल्या ध्यानात बरोबर ठेव. (व त्यांचा चेंदामेंदा कर) तदनंतर एकेका डोंगरावर त्याचा एकेक तुकडा ठेवून दे व मग त्यांना बोलव, म्हणजे ते (आपोआप) तुजकडे धावत येतील. - मं.१, सि.३, सू.२, आ.२६०.

**(समीक्षक)** वाहवा! भानामतीच्या जादूप्रमाणे मुसलमानांचा खुदाही जादूचे खेळ करीत आहे. असल्याच गोष्टीने देवाचे देवत्व असते काय? बुद्धिमान लोक असल्या खुदावर तिलांजली देऊन त्याच्यापासून चार हात दूर राहतील व मूर्ख लोक त्याच्या जाळ्यात अडकतील. असल्या गोष्टींनी खुदाची कीर्ती वाढण्याऐवजी त्याचा दुर्लौकिकच त्याचे पदरी पडेल. ॥४४॥

(४५) तो ज्याला इच्छितो त्याला (गोष्टीची) समज देतो. - मं.१, सि.३, सू.२, आ.२६९.

**(समीक्षक)** खुदा ज्याला इच्छितो त्याला नीती देतो म्हणजे ज्याला इच्छित नाही त्याला अनीती देत असणार! हे काम ईश्वराचे नाही. जो पक्षपात न करता सर्वांना नीतीचा उपदेश करतो तोच ईश्वर व सद्गुरु असू शकतो. इतर कोणी असू शकत नाही. ॥४५॥

(४६) जे लोक व्याज घेतात ते थडग्यातून उठणार नाहीत. - मं.१, सि.३, सू.२, आ.२७५.

**(समीक्षक)** ते थडग्यातच पडून राहतील काय? आणि तसेच पडून राहाणार असतील तर कुठवर राहतील? असली अशक्य गोष्ट ईश्वरीय ग्रंथातील असू शकत नाही. ती पोरकट लोकांचीच असू शकते. ॥४६॥

(४७) मग (खोट्या वासनेबद्दल) ज्याला तो इच्छील त्याला क्षमा करील व ज्याला इच्छील त्याला शिक्षा करील आणि परमेश्वर सर्वशक्तिमान आहे. - मं.१, सि.३, सू.२, आ.२८४.

**(समीक्षक)** जो क्षमेला पात्र आहे त्याला क्षमा न करणे आणि अयोग्य माणसाला क्षमा करणे हे शुद्ध मूर्खराजासारखे कर्म नाही काय? जर ईश्वर वाटेल त्याला पापी अथवा पुण्यवान बनवीत असेल तर जीवाला

पाप-पुण्य लागता कामा नये आणि ज्या अर्थी ईश्वरानेच त्याला पापी किंवा पुण्यवान बनविले आहे त्याअर्थी जीवाला सुख-दुःखही भोगावे लागता कामा नये. ज्याप्रमाणे सेनापतीच्या आज्ञेने त्याच्या हाताखालील सैनिकाने एखाद्याला ठार मारले किंवा त्याचे रक्षण केले तर त्या कृत्याचे फळ सैनिकाला भोगावे लागत नाही, त्याप्रमाणे त्यालाही नाही. ॥४७॥

## स्वर्ग की वेश्यावन

(४८) (हे पैगंबरा! या लोकांस) सांग की (तुमची इच्छा असेल तर) मी तुम्हांस ह्या (इहलौकिक क्षणिक साधना) पेक्षाही अत्युत्तम चीज दाखवून देऊ का ? पालनकर्त्यासमीप (स्वर्गाचे) बाग होते की त्यांच्या खालून नद्या वाहत आहेत. (व ते) त्यांत सदासर्वदा राहतील; आणि (बागांव्यतिरिक्त) शुचिर्भूत (व चौथ्या) पत्न्या होत आणि (सर्वांत अति श्रेष्ठ अशी) परमेश्वराची सुप्रसन्नता होय आणि परमेश्वर सेवका (च्या बऱ्यावाईटा) स पाहतो आहे. - मं.१, सि.३, सू.३, आ.१५.

**(समीक्षक)** हा स्वर्ग आहे की वेश्यावन (कुंटणखाना) आणि त्याला ईश्वर म्हणावे की स्त्रैण म्हणावे ? असल्या गोष्टी ज्या पुस्तकात असतील त्याला कोणीही बुद्धिमान माणूस ईश्वरप्रणीत ग्रंथ मानू शकेल काय ? हा खुदा पक्षपात का करतो ? ज्या बायका स्वर्गात सदैव राहतात त्या येथे जन्म घेऊन स्वर्गात गेल्या आहेत की तेथेच जन्मल्या आहेत ? जर त्या या जगात जन्म घेऊन स्वर्गाला गेल्या असतील आणि कयामतीच्या रात्रीच्या आधीच त्यांना तेथे बोलावून घेण्यात आले असेल तर त्यांच्या नवऱ्यांना का बोलावून घेतले नाही ? आणि कयामतीच्या रात्री सर्वांचा न्यायनिवाडा होईल, हा नियम का मोडला ? जर त्या तेथेच जन्मल्या असतील तर अंतिम निवाड्याच्या दिवसापर्यंत त्या कशा निर्वाह करतील ? तेथे त्यांच्यासाठी पुरुषही असतील तर येथून स्वर्गात जाणाऱ्या मुसलमानांना खुदा बायका कोठून देईल ? आणि जशा स्वर्गात सदैव राहणाऱ्या स्त्रिया खुदाने बनविल्या तसे तेथे कायम राहणारे पुरुष त्याने का बनविले नाहीत ? यावरून मुसलमानांचा खुदा अन्यायी व अजाण आहे. ॥४८॥

(४९) परमेश्वरापाशी (मूळचा सत्य) धर्म (म्हटला) तर केवळ इस्लामच होय. -मं.१, सि.३, सू.३, आ.१९.

**(समीक्षक)** अल्ला हा फक्त मुसलमानांचाच आहे आणि इतरांचा नाही काय ? तेराशे वर्षापूर्वी ईश्वरीय मत नव्हते काय ? यावरूनच हे कुराण ईश्वराने रचलेले नसून एखाद्या पक्षपाती इसमाने रचलेले आहे हे सिद्ध होते. ॥४९॥

(५०) प्रत्येक जीवास त्याच्या कर्माचे त्याला पुरेपूर फळ दिले जाईल; व लोकांवर (कोण्या तऱ्हेचा) जुलूम होणार नाही. (हे पैगंबरा!) तू (तर ही) प्रार्थना कर की, हे परमेश्वरा! (साऱ्या) राज्याचे मालका! तूच ज्याला इच्छितोस त्याला राज्य देतोस व तूच ज्याच्यापासून इच्छितोस त्याच्यापासून राज्य काढून घेतोस आणि तूच ज्याला इच्छितोस त्याला इज्जत अब्रू देतोस व तूच ज्याला इच्छितोस त्याला नमवितोस (हरतऱ्हेचे हित व) कल्याण तुझ्याच हाती आहे. निःसंशय तू सर्वशक्तिमान आहेस. तूच (उन्हाळ्यात) रात्रीस घटवून दिवसात सामील करतोस आणि तूच (हिवाळ्यात) दिवसास (घटवून) रात्रीत सामील करतोस आणि तूच निर्जीवापासून

सजीव व तूच सजीवातून निर्जीव काढतोस व तूच ज्याला इच्छितोस त्याला बेसुमार देतोस. मुसलमानांस पाहिजे की त्यांनी मुसलमानांना सोडून नास्तिकांस मित्र पत्करू नये आणि जो असे करील तर त्याशी व परमेश्वराशी काही संबंधच नाही. (हे पैगंबरा ! या लोकांस) सांगून दे की जर तुम्ही परमेश्वराशी प्रीती ठेवता तर तुम्ही माझे अनुकरण करा. म्हणजे परमेश्वरही तुम्हांशी प्रीती ठेवील व तुम्हांस तुमचे अपराध क्षमा करील आणि परमेश्वर क्षमाशील व दयाळू आहे. - मं.१, सि.३, सू.३, आ.२५-२८, ३१.

**(समीक्षक)** जर प्रत्येक जीवाला कर्मांचे पुरेपूर फळ दिले जाणार असेल तर त्याला क्षमा केली जाणार नाही; आणि जर क्षमा केली जाणार असेल तर कर्मांचे पुरेपूर फळ दिले जाणार नाही व तो अन्याय होईल. उत्तम कर्मे न करता जर ईश्वर राज्य व प्रतिष्ठा देईल तर तोही अन्याय होईल आणि पाप केले नसताना जो राज्य व प्रतिष्ठा हिरावून घेईल तरीही तो अन्यायी ठरेल. जिवंत असणाऱ्याला मृत बनविणे व मृताला जिवंत करणे अशक्य आहे. कारण ईश्वराची व्यवस्था अच्छेद्य-अभेद्य आहे. तिच्यात कधीही बदल होऊ शकत नाही. आता इस्लामच्या पक्षपाताच्या गोष्टी पाहा. जे कोणी मुसलमानी पंथाचे नसतील त्यांना काफिर ठरविणे, मुस्लिमेतरांमधील उत्तम, सदाचारी लोकांशीही मैत्री न करण्याचा व दुष्ट, दुराचारी मुसलमानांशी मैत्री ठेवण्याचा उपदेश करणे ही गोष्ट ईश्वराला ईश्वरत्वापासून दूर ठेवते. यावरून असा निष्कर्ष निघतो की कुराण, कुराणातील खुदा आणि मुसलमान पक्षपाती व अविद्येने भरलेले आहेत. म्हणूनच मुसलमान अंधारात चाचपडत आहेत आणि मुहम्मद साहेबांची ही हुशारी तर पाहा ! ते आपल्या अनुयायांना असे आश्वासन देतात की, 'तुम्ही माझा पक्ष घ्याल तर खुदा तुमचा पक्ष घेईल आणि तुम्ही पक्षपातपूर्ण पापे केली तर तो त्याबद्दल तुम्हाला क्षमाही करील.' यावरून सिद्ध होते की, मुहम्मद साहेबांचे अंतःकरण शुद्ध नव्हते. म्हणूनच आपला स्वार्थ साधण्यासाठी मुहम्मद साहेबांनी कुराण रचले किंवा दुसऱ्याकडून लिहून घेतले. ॥५०॥

(५१) आणि जेव्हा दूतांनी (मर्यमला) सांगितले की, अगे मर्यम ! तुला परमेश्वराने निवडले व (पापांच्या गंधापासूनही) तुला पाकसाफराखिले; आणि (त्यामुळेच) तुला सकल जगाचे स्त्रियांवर (श्रेष्ठत्व देऊन) निवडून काढले. - मं.१, सि.३, सू.३, आ.४१.

**(समीक्षक)** आजकाल देवदूत व खुदा हे कोणाशी बोलायला येत नाहीत. मग ते पूर्वी कसे आले असतील? पूर्वीचे लोक पुण्यवान होते व आताचे तसे नाहीत, असे तुमचे म्हणणे असेल तर ते साफ खोटे आहे. ज्या काळी ख्रिस्ती पंथ व इस्लाम प्रचारात आले त्या काळी त्या देशांत जंगली व विद्याविहीन माणसे जास्त होती. म्हणूनच असले ज्ञानविरोधी पंथ रूढ झाले. आता विद्वान लोक अधिक असल्यामुळे हे पंथ टिकाव धरू शकत नाहीत. किंबहूना असले पोकळ पंथ लयाला चालले आहेत; मग त्यांची वृद्धी होण्याची गोष्ट दूरच राहिली. ॥५१॥

(५२) तो त्यास मात्र इतकेच फर्मावितो की, 'हो,' व ते होऊन जाते आणि यहुद्यांनी (येशूशी) डाव केला व परमेश्वराने (त्यांच्याशी) डाव केला; आणि डाव करणाऱ्यांत परमेश्वर (सर्वांत) उत्तम (डाव करणारा) होय.

- मं.१, सि.३, सू.३, आ ४६, ५३.

**(समीक्षक)** मुसलमान लोक खुदाशिवाय दुसरी कोणतीच गोष्ट मानीत नाहीत. तर मग त्याने कोणाला व्हायला सांगितले ? आणि त्याच्या सांगण्याप्रमाणे कोण झाले ? याचे उत्तर मुसलमान सात जन्मांतही देऊ शकणार नाहीत. कारण उपादानकारणाशिवाय कधीही कार्य होऊ शकत नाही. कारणाशिवाय कार्य झाले असे म्हणणे म्हणजे आईबापांशिवाय माझे शरीर निर्माण झाले असे म्हणण्यासारखे आहे. जो इतरांना फसवितो व मक्कारी करतो तो कधीही ईश्वर तर असूच शकत नाही पण कोणताही सज्जन माणूस देखील असले कृत्य करीत नाही. ॥५२॥

(५३) तुम्हाला इतके पुरे नाही काय की तुमचा पालनकर्ता (आकाशातून) तीन हजार दूत पाठवून तुमची मदत करील. - मं.१, सि ४, सू.३, आ.१२४.

**(समीक्षक)** पूर्वीच्या काळी जो अल्ला मुसलमानांना तीन हजार देवदूतांसह साह्य करीत असे तो आता मुसलमानांची अनेक राज्ये नष्ट झाली व होत आहेत तरी त्यांच्या साह्याला धावून का येत नाही ? यावरून ही गोष्ट केवळ मूर्ख लोकांना लालूच दाखवून आपल्या जाळ्यात अडकविण्यासाठी रचलेली असून ती अत्यंत अन्यायाची आहे. ॥५३॥

(५४) नास्तिक लोकांवर आम्हांस विजयी कर. तुमचा (खरा) हितचिंतक परमेश्वर होय व तो (सर्व मदतगारांत) उत्तम मदतगार होय आणि परमेश्वराच्या मार्गात जर तुम्ही मारले जाल अगर मरून जाल तर परमेश्वराची क्षमा व दया, लोक (धनदौलत काही काळ जपून) गोळा करतात त्याहून उत्तम होय. - मं.१, सि.४, सू.३७, आ. १४७, १५०, १५७.

**(समीक्षक)** आता ही मुसलमानांची चूक लक्षात घ्या. हे लोक आपल्याहून वेगळ्या पंथाच्या लोकांना मारण्यासाठी खुदाची प्रार्थना करतात. त्यांचे म्हणणे ऐकण्याइतका परमेश्वर भोळा आहे काय ? अल्ला फक्त मुसलमानांचे कार्य सिद्ध आहे तर मग मुसलमानांची कामे नाश का होतात ? हा खुदा मुसलमानांच्या मोहात फसलेला दिसतो. खुदा जर असा पक्षपाती आहे तर धर्मात्मा पुरुषांच्या दृष्टीने तो कधीच उपासनीय होऊ शकत नाही. ॥५४॥

(५५) आणि परमेश्वर असाही नव्हे की, तुम्हाला अदृष्ट गैबी गोष्टी कळवील. पण (होय) परमेश्वर आपल्या पैगंबरांपैकी ज्याला इच्छितो त्याला निवडून घेतो. तर तुम्ही परमेश्वर व त्याचे पैगंबर यांजवर विश्वास ठेवा. - मं.१, सि.४, सू.३, आ.१७९.

**(समीक्षक)** जर मुसलमान लोक खुदाखेरीज इतर कोणावरही श्रद्धा ठेवीत नाहीत आणि इतर कोणाला खुदाचा भागीदार मानीत नाहीत तर मग त्यांनी पैगंबर साहेबांना श्रद्धेच्या बाबतीत खुदाबरोबर सामील का केले आहे ? अल्लाने पैगंबरावर श्रद्धा ठेवा असे लिहिले. यामुळे पैगंबरही अल्लामध्ये सामील झाला; या वचनाचा अर्थ जर असा लावला गेला की, मुहम्मद साहेब ईश्वराचे प्रेषित (पैगंबर) आहेत यांवर श्रद्धा ठेवली पाहिजे, तर मग असा प्रश्न निर्माण होतो की, मुहम्मद साहेबांना प्रेषित समजण्याची काय आवश्यकता आहे ? त्यांना प्रेषित बनविल्याशिवाय खुदा आपले अभीप्सित कार्य करू शकत नसेल तर तो नक्कीच असमर्थ आहे. ॥५५॥

## खुदा व पैगंबर भांडखोर

(५६) हे श्रद्धावानांनो! (अल्लाच्या मार्गात आलेल्या कष्टांना तोंड देण्यासाठी) सहन करा, सहनशीलतेच्या बाबतीत (एकमेकांच्या) पुढे रहा आणि काफिरांशी मुकाबला करण्यासाठी तयार रहा (पाय रोवून उभे रहा.) आणि परमेश्वराला भिऊन रहा. त्यायोगे तुमच्या अभिलाषा कदाचित पूर्ण होतील. - मं.१, सि.४, सू.३, आ.२००.

**(समीक्षक)** हा कुराणातील खुदा आणि पैगंबर दोघेही व युद्धखोर होते. जो लढाईचा हुकूम देतो तो शांतताभंग करणारा असतो. ईश्वराला नाममात्र भ्याल्याने मुक्ती मिळते काय ? की अधर्मयुद्धापासून दूर राहिल्याने मुक्त होता येते ? प्रथम पक्षानुसार ईश्वराला भिणे न भिणे हे सारखेच आहे. दूसऱ्या पक्षानुसार मात्र अधर्मयुद्धाची भीती बाळगणे योग्य ठरते. ॥५६॥

(५७) ह्या परमेश्वराच्या (बांधीव) मर्यादा होत आणि जो परमेश्वर व त्याचा पैगंबर यांच्या हुकुमाप्रमाणे चालेल, (परलोकी) त्याला परमेश्वर अशा बागांत (नेऊन) दाखल करील की ज्यांच्या खालून (पाण्याचे) पाट वाहत असतील आणि हे मोठे सार्थक होय आणि जो कोणी, परमेश्वर व त्याचा पैगंबर यांच्या हुकुमाचा अनादर करील व परमेश्वराच्या (बांधीव) मर्यादांचे उल्लंघन करील त्याला परमेश्वर नरकाग्नीत नेऊन दाखल करील. तो त्यात निरंतर राहील; व त्याला फजितीची शिक्षा (प्राप्त) होईल. - मं.१, सि.४, सू.४, आ.१३, १४.

**(समीक्षक)** खुदानेच मुहम्मद साहेब पैगंबरांना स्वत:मध्ये सामील (सहभागी) करून घेतले आहे आणि स्वतःच कुराणात तसे लिहून ठेवले आहे. खुदा पैगंबर साहेबांमध्ये असा काही गुंतला आहे की, त्याने स्वर्गामध्येही पैगंबराला भागीदार बनविले आहे. एकाही बाबतीत मुसलमानांचा खुदा स्वतंत्र नाही. म्हणून त्याला अद्वितीय म्हणणे व्यर्थ आहे. असल्या चुकीच्या गोष्टी ईश्वरीय ग्रंथात असू शकत नाहीत. ॥५७॥

(५८) (परमेश्वर) कोणावर अणुमात्रही जुलूम करीत नाही आणि (कोणाचे अणुमात्रही) पुण्य असेल तर तो ते अनेक पटींनी वाढवितो व आपल्याकडून मोठा मोबदला देतो. - मं.१, सि.५, सू.४, आ.४०.

**(समीक्षक)** ईश्वर कोणावर अणुमात्रही अन्याय करीत नाही तर तो पुण्य द्विगुणित कसे करतो ? आणि मुसलमानांसाठी पक्षपात का करतो ? वस्तुत: ईश्वर कर्मांची फळे कमी अथवा जास्त देईल तर तो अन्यायी ठरेल. ॥५८॥

(५९) जेव्हा ते तुझ्यापासून (उठून) बाहेर जातात, तेव्हा त्यांच्यांतून काही लोक रात्री (बसून बसून) आपण जे बोलतात त्याच्या उलट (भलभलत्या) मसलती करू लागतात आणि जशजशा मसलती रात्री (बसून बसून) ते करितात त्या परमेश्वर (आपल्या दूताद्वारे) नोंदीत जातो. परमेश्वराने त्यांच्या कर्माच्या शासनार्थ (त्यांच्या बुद्धीस) पालथे केले आहे. (म्हणूनच ते बहकून गेले आहेत) का तुम्ही हे इच्छिता की, ज्याला परमेश्वराने बहकविले आहे त्याला तुम्ही सन्मार्गी लावावे (आणि) ज्याला परमेश्वर बहकवील, त्याच्यासाठी तुमच्यातून कोणी मार्ग काढील हे अशक्यच. - मं.१, सि.५, सू.४, आ.८१, ८८.

**(समीक्षक)** जर अल्ला (प्रत्येक जीवाच्या कर्मांचा) जमाखर्च हिशेबाच्या वहीत लिहून ठेवीत असेल तर तो सर्वज्ञ नाही. तो सर्वज्ञ असेल तर त्याला लिहून ठेवण्याची काय गरज ? मुसलमान असे म्हणतात की, सैतानच

सर्वांना चुकीच्या मार्गाला लावतो म्हणून तो दुष्ट आहे. परंतु येथे तर खुद्द अल्लाच जीवांना बहकावीत आहे. मग खुदा आणि सैतान यांच्यात काय फरक उरला ? होय एक फरक सांगता येईल की, खुदा हा मोठा सैतान असून सैतान हा छोटा सैतान आहे. कारण मुसलमानांचे असे प्रतिज्ञापूर्वक सांगणे आहे की, जो बहकावतो तोच सैतान होय. त्यांच्या म्हणण्यानुसार खुदाही सैतान ठरतो. ॥५९॥

(६०) आणि (लढाईपासून) आपले हात न आवरून धरतील तर त्यांना धरा व जेथे तुम्ही त्यांना पावाल तेथे त्यांना ठार करा आणि कोणाही मुसलमानास वाजवी नाही की त्याने मुसलमानास (जिवे) मारून टाकावे; आणि जो मुसलमानाला चुकीने (ही) मारून टाकील तर एक मुसलमान गुलाम मुक्त करणे आणि जो मुसलमानास बुध्या (जिवे) मारून टाकील तर त्याची शिक्षा जहन्नम (म्हणजे नरकाग्नी) होय. की तो त्यात नित्य राहील आणि त्याच्यावर परमेश्वराचा गजब (सादर) होईल व त्याच्यावर परमेश्वराचा शाप उतरेल. - मं.१, सि.५, सू.४, आ.९१-९३.

**(समीक्षक)** आता पाहा, ही केवढी महापक्षपाताची गोष्ट आहे ! जो मुसलमान नसेल तो जेथे सापडेल तेथे त्याला ठार मारा आणि मुसलमानांना मारू नका. चुकून मुसलमान मारले गेले तर त्याबद्दल प्रायश्चित सांगितले आहे. परंतु मुस्लिमेतराला मारल्यास स्वर्ग मिळेल असे म्हटले आहे. असला उपदेश कचऱ्याच्या टोपलीत टाकला पाहिजे. असले मतग्रंथ, असले पैगंबर, असले ईश्वर आणि असले पंथ जगाचे कल्याण करण्याऐवजी अहितच करतात. असले पंथ नसणेच चांगले. **असल्या प्रमादसह पंथांपासून चार हात दूर राहून शहाण्या लोकांनी "वेदोक्त धर्माचा" स्वीकार केला पाहिजे. कारण त्यात किंचितही असत्य नाही.** इस्लाम सांगतो की, जो कोणी मुसलमानाला ठार मारील तो नरकात जाईल आणि इतर पंथांचे लोक असे मानतात की मुसलमानाला ठार मारणाऱ्याला स्वर्ग मिळतो. आता तुम्हीच सांगा की, या दोन मतांपैकी कोणते मत स्वीकारावे व कोणते सोडावे ? परंतु असले मूर्खतापूर्ण व कल्पित पंथ सोडून देऊन वेदोक्त मताचा स्वीकार करणे हेच सर्व मानवांना उचित होय. वेदोक्त धर्म सर्वोत्तम आहे. ज्यानुसार आर्य मार्गावरून म्हणजे श्रेष्ठ पुरुषांच्या मार्गावरून चालावे आणि दस्यूंच्या म्हणजे दुष्ट लोकांच्या मार्गापासून दूर राहावे. ॥६०॥

(६१) आणि जो कोणी सरळ मार्ग स्पष्ट दिसून आल्यावर पैगंबराचे उलट जाईल व मुसलमानांच्या मार्गाशिवाय (अन्यमार्गी) लागेल, तर त्याला नरकाग्नीत (नेऊन) दाखल करू. - मं.१, सि.५, सू.४, आ.११५.

**(समीक्षक)** आता खुदा व रसूल (पैगंबर) यांच्या पक्षपातपूर्ण गोष्टी पाहा ! मुहम्मद साहेब वगैरे असे समजत होते की, आपण खुदाच्या नावावर असे लिहिले नाही तर आपला पंथ वाढणार नाही, पदार्थ मिळणार नाही व चैन करता येणार नाही. यावरूनच हे लक्षात येते की, ते आपला स्वार्थ साधण्यात आणि इतरांची उद्दिष्टे निष्फळ करण्यात पटाईत होते. यावरून ते अनाप्त होते त्यांचे म्हणणे प्रमाण आहे असे आप्त व विद्वानांसमोर कधी होऊ शकणार नाहीत. ॥६१॥

(६२) जो कोणी परमेश्वरास नाकारील व त्याच्या दूतास व त्याच्या पुस्तकास व त्याच्या पैगंबरास व शेवटच्या दिवसास (नाकारील) तर तो (सन्मार्गहीन) फारच दूर भटकत गेला. ज्या लोकांनी विश्वास धरला,

पुन्हा (विश्वासास) नाकारले व नाकारणीनंतर ते नास्तिकपणात वाढतच गेले. तर परमेश्वर त्यांना क्षमा करणार नाही व (सरळ) मार्गही दाखविणार नाही. - मं.१, सि.५, सू.४, आ.१३६, १३७.

**(समीक्षक)** अजूनही ईश्वर (खुदा) अद्वितीय राहू शकतो काय ? खुदा एकमेवाद्वितीय आहे, त्याच्यामध्ये कोणीही सहभागी नाही असे एका बाजूने म्हणत राहावयाचे आणि त्याचवेळी त्याच्यामध्ये अनेक लोक सहभागी आहेत असेही मानीत राहावयाचे हे परस्परविरोधी वर्तन नव्हे काय ? तीनदा तोबा केल्यानंतर खुदा क्षमा करीत नाही काय ? आणि तीन वेळा पाप केल्यावर सन्मार्ग दाखवितो व चौथ्या वेळेपासून सन्मार्ग दाखवीत नाही, जर लोक चार-चार वेळा नास्तिकता करतील तर नास्तिकता खूपच बोकाळेल. ॥६२॥

(६३) परमेश्वर दांभिक व नास्तिक अशा सर्वांना नरकाग्नीत (एका जागी) गोळा करील. दांभिक लोक (मुसलमानांस धोका दिल्याने जणू की) परमेश्वरास धोका देतात आणि वास्तविक (त्यांच्या परिपत्यास्तव) परमेश्वर त्यांनाच धोका देतो आहे. अहो मुसलमानांनो ! तुम्ही मुसलमानांस सोडून नास्तिकांस मित्र पत्करू नका. - मं.१, सि.५, सू.४, आ.१४०, १४२, १४४.

**(समीक्षक)** सारे मुसलमान स्वर्गात जातील व इतर पंथाचे अनुयायी नरकात जातील याला प्रमाण (पुरावा) काय ? वाहवा ! जो खुदा वाईट लोकांकडून फसविला जातो व जो इतरांना फसवितो असला खुदा आमच्यापासून दूर राहिलेलाच बरा. त्याने फसव्या लोकांशी मैत्री करावी आणि त्या लोकांनीही त्याच्याशी दोस्ती करावी. कारण,

**'यादृशी शीतला देवी तादृशः खरवाहनः'।**

जशास तसा भेटतो तेव्हा त्यांचे काम चालते. ज्यांचा खुदा फसवा, धोकेबाज आहे ते लोक म्हणजे त्याचे उपासकही तसेच फसवणूक करणारे, धोकेबाज का नसावेत ? एखाद्या दुष्ट मुसलमानाशी मैत्री आणि एखाद्या सज्जन मुस्लिमेतराशी शत्रुत्व करणे कोणाच्याही दृष्टीने उचित आहे काय ? ॥६३॥

(६४) अहो मनुष्य लोकहो ! हा पैगंबर (महम्मद) तुम्हाकडे तुमच्या पालनकर्त्याकडून सत्य (धर्म) घेऊन आला आहे. तर विश्वास धरा आणि परमेश्वर सर्वांना कर्ताहर्ता होय. बस्स ! - मं.१, सि.६, सू.४, आ.१७०, १७१.

**(समीक्षक)** पैगंबरावर श्रद्धा ठेवा असे सांगितल्याने श्रद्धेच्या बाबतीत पैगंबर हा खुदाचा सहभागी म्हणजे भागीदार ठरतो की नाही ? अल्ला एकदेशी आहे. तो सर्वव्यापक नाही. म्हणून त्याच्याकडून पैगंबर (प्रेषित) येत-जात असतात. असला अल्ला कधीच ईश्वर असू शकत नाही. कुराणामध्ये कोठे ईश्वर हा सर्वव्यापक आहे असे म्हटले आहे तर कोठे तो एकदेशी असल्याचा उल्लेख येतो. यावरून कुराण हे एका व्यक्तीने रचलेले नसून अनेकांनी ते लिहिले आहे असे सिद्ध होते. ॥६४॥

(६५) मेलेले (जनावर) व रक्त व डुकराचे मांस आणि जे (जनावर) परमेश्वराशिवाय अन्य कोणास (जबे करतेवेळी-कापताना) नामनिर्दिष्ट केले गेले असेल ते व जे गुदमरून मेले असेल ते व मार लागून मेलेले व उंचीवरून पडून मेलेले व (दुसऱ्या कोणा जनावराचे) शिंग भोसकून मेलेले आणि (तसेच) ज्या (जनावरा) स हिंस्र श्वापदांनी (फाडून) खाल्ले असेल ते (जनावर) ही सर्व तुम्हांस शास्त्रानिषिद्ध (हराम) होत. - मं.२, सि.६, सू.५, आ.३.

**(समीक्षक)** एवढेच पदार्थ हराम (निषिद्ध) आहेत काय ? मग बाकीचे पशुपक्षी, किडे वगैरे मुसलमानांच्या दृष्टीने हलाल (शास्त्रविहित, सेवनीय) आहेत असे समजावयाचे काय ? यावरूनच ही माणसाची कल्पना आहे ईश्वरी कल्पना नाही, असे सिद्ध होते. म्हणून हे वचन प्रमाण मानता येत नाही. ॥६५॥

(६६) खुषदिलाने परमेश्वरास कर्ज देत राहाल तर मी अवश्य तुमची पापे तुम्हांपासून दूर करीन आणि जरूर तुम्हांस (स्वर्गाच्या) अशा बागात नेऊन दाखल करीन. - मं.२, सि.६, सू.५, आ.१२.

**(समीक्षक)** वाहवा ! मुसलमानांच्या खुदाच्या घरी थोडादेखील पैसा अडका उरला नसावा. त्याच्याजवळ पैसा असता तर त्याने कर्ज किंवा उसने पैसे का मागितले असते ? आणि तुमची पापे नष्ट करून मी तुम्हांला स्वर्गात पाठवीन अशी लालूच त्याने पाप्यांना का दाखविली असती ? यावरून असे दिसते की, मुहम्मद साहेबांनी खुदाच्या नावावर स्वत:चा स्वार्थ सिद्ध केला. ॥६६॥

(६७) परमेश्वर ज्याला इच्छिल त्याला क्षमा करील व ज्याला इच्छिल त्याला शिक्षा देईल. तुम्हांस अशा अशा देणग्या दिल्या की ज्या अलम दुनियेच्या लोकांपैकी कोणासच दिल्या नाहीत. - मं.२। सि.६, सू.५, आ.१८, २०.

**(समीक्षक)** सैतान जसा वाटेल त्याला पापी बनवितो तसाच मुसलमानांचा खुदाही सैतानाचे काम करतो. असे असल्यामुळे स्वर्गात किंवा नरकात फक्त खुदानेच गेले पाहिजे. कारण बरी व वाईट कृत्ये करणारा खुदाच असतो; आणि जीव पराधीन असतो. सैन्य हे सेनापतीच्या आधीन असते व ते त्याच्या आज्ञेनुसार कोणाचेही रक्षण करते अथवा कोणालाही ठार मारते. त्याच्या भल्याबुऱ्या कृत्याची जबाबदारी सेनापतीवर असते. ती सैन्यावर नसते. ॥६७॥

(६८) तुम्ही परमेश्वराची आज्ञा माना व पैगंबराची आज्ञा माना. - मं.२, सि.७, सू.५, आ.९२.

**(समीक्षक)** पाहा ! पैगंबर हा खुदाचा भागीदार आहे. अशा स्थितीत खुदा एकमेवाद्वितीय आहे असे मानणे निरर्थक आहे. ॥६८॥

(६९) पूर्वी जे झाले गेले त्याची परमेश्वराने माफी केली आणि जो पुन्हा (असे काम) करील तर परमेश्वर त्याच्यापासून (आज्ञाभंगाचा) बदला घेईल. -मं.२, सि.७, सू.५, आ.९५.

**(समीक्षक)** केलेल्या पापांबद्दल क्षमा करणे म्हणजे पाप करण्याची अनुज्ञा देऊन पापांच्या वाढीस उत्तेजन देण्यासारखेच आहे. पापाला क्षमा करण्याची गोष्ट ज्या पुस्तकात असेल ते ईश्वराने अथवा एखाद्या विद्वानाने रचलेले नसून ते पापवर्धक आहे, होय ! भावी पापांपासून दूर ठेवण्यासाठी एखाद्याची प्रार्थना करणे आणि पापापासून अलिप्त राहण्यासाठी पुरुषार्थ व पश्चात्ताप करणे हे उचित आहे. परंतु माणूस फक्त पश्चात्ताप करीत राहील आणि पापे करणे सोडणार नाही तर त्याने काहीच साध्य होणार नाही. ॥६९॥

(७०) आणि अशा मनुष्याहूनही जास्त जालीम (आणखी) कोण होणार की, जो परमेश्वरावर खोटे कुभांड रचितो, अथवा असे प्रतिपादितो की, मजकडे प्रकटीकरण आले आहे आणि वास्तविक पाहू जाता, त्याजकडे कसलेच काही प्रकटिले गेले नाही ? आणि जो विधान करितो की, (कुरआन) जे (तुम्ही म्हणता की, ते) परमेश्वराने प्रकट केले आहे. (म्हणाल तर) तसलेच मी आता प्रकट करीन. - मं.२, सि.७, सू.६, आ.९३.

**(समीक्षक)** या आयतीवरून असे सिद्ध होते की, 'माझ्याकडे परमेश्वराकडून आयती (वचने किंवा आज्ञा) येतात', असे जेव्हा मुहम्मद साहेब म्हणत होते तेव्हा आणखी कोणीतरी मुहम्मद साहेबांप्रमाणेच 'माझ्याकडेही ईश्वराकडून आयती येतात, म्हणून मलाही पैगंबर माना' असे म्हणणारा निघाला असावा. आपल्या या प्रतिस्पर्ध्यावर मात करावी आणि आपले महत्त्व वाढवावे या हेतूने त्यांनी ही आयत रचली असावी. ॥७०॥

## खुदा व सैतानाचे भांडण

(७१) आणि आम्हीच तुम्हांस (म्हणजे तुमचा पिता आदम यास) निर्मिले व नंतर आम्हीच तुमचे (म्हणजे तुमचा पिता आदम याचे) रूप धाडिले. तदनंतर आम्ही दूतास फर्माविले की, तुम्ही आदमच्या पुढे नमन करा. तेव्हाच (सर्वांनी) नमन केले. पण इब्लीस (सैतान) हा नमन करणाऱ्यांत (सामील) झाला नाही. परमेश्वराने (इब्लीसला) विचारले की, जेव्हा मी तुला हुकूम दिला तेव्हा (आदमच्या पुढे) नमण्यापासून तुला कोणत्या वस्तूने अटकाव केला ? तो बोलला, मी याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे. (का की) मला तू अग्नीपासून निर्मिलेस व त्याला (आदमला) मातीतून पैदा केलेस. (यावर परमेश्वराने) फर्माविले (की तुझी ही शेखी आहे) तू स्वर्गातून खाली उतर. का तर तुला हे शोभत नाही की, तू स्वर्गात (राहून) शेखी मिरवावीस ! तो अर्ज करू लागला की, ज्या दिवशी (सर्व) लोक (पुन्हा जिवंत) उठवून उभे केले जातील त्या दिवसापर्यंतचा तू मला अवकाश दे. (परमेश्वराने) म्हटले, (जा ! मंजूर !) तू अवकाश दिलेल्यांपैकी आहेस. (यावर सैतान) बोलला की, जशी तू माझी वाट मारली आहेस तसाच मीही तुझ्या सरळ मार्गावर मनुष्य जातीस टपून बसेन तरच खरा आणि तू बहुतेक मनुष्य जातीस (आपले) आभारी पावणार नाहीस. (परमेश्वराने) फर्माविले की, स्वर्गातून निघ. (तू) तुच्छ व बहिष्कृत झालेला (आहेस). मनुष्यमात्रातून जो कोणी तुझे अनुकरण करील, मी निःसंशय तुम्हां सर्वांनी जहन्नम भरून टाकीन. - मं.२, सि.८, सु.७, आ.११-१८.

**(समीक्षक)** आता खुदा आणि सैतान यांच्यातील भांडणाची सुरस कथा लक्ष देऊन ऐका. एखाद्या अगदीच साधारण पट्टेवाल्याच्या लायकीचा असणारा सैतान हा देवदूत (फरिश्ता) होता. तो खुदालाही दबला नाही; आणि खुदाही त्याच्या आत्म्याला पवित्र करू शकला नाही. जो सैतान पापी बनून बंड करून उठला तरी खुदाने त्याला सोडून दिले. खुदाची ही फारच मोठी चूक होती. सैतान हा सर्वांना बहकाविणारा आहे आणि खुदा सैतानाला बहकावतो. यावरून असे सिद्ध होते की, खुदा हा सैतानाचाही सैतान आहे. कारण खुद्द सैतानच देवाला सांगतो की, "तू मला चुकीच्या मार्गाला लावलेस." यामुळे खुदामध्ये पावित्र्य आढळत नाही आणि सर्व पापांचे मूळ कारण खुदाच ठरतो. असला परमेश्वर मुसलमानांनाच होऊ शकतो. इतर श्रेष्ठ विद्वानांचा तो परमेश्वर असू शकत नाही. शिवाय देवदूतांशी माणसाप्रमाणे संभाषण करणारा देहधारी, अल्पज्ञ व न्यायरहित असा मुसलमानांचा खुदा आहे. म्हणूनच विद्वान लोक इस्लामी पंथ पसंत करीत नाहीत. ॥७१॥

(७२) (लोकांनो) निःसंशय तुमचा पालनकर्ता हाच (असा) परमेश्वर होय की, त्याने सहा दिवसांत

आकाश व पृथ्वी ही निर्माण केली; व मग तो (अर्श ऊर्फ) महासिंहासनारूढ झाला. (लोकांनो !) तुम्ही आपल्या पालनकर्त्याचा काकुळतीस येऊनच चुपचाप धावा करीत जा. - मं.२, सि.८, सू.७, आ.५४, ५५.

**(समीक्षक)** छान ! जो सहा दिवसात जग बनवितो म्हणजे आकाशातील सिंहासनावर विश्रांती घेतो तो ईश्वर कधीतरी सर्वशक्तिमान आणि सर्वव्यापक असू शकतो काय ? तसा तो नसल्यामुळे त्याला खुदा म्हणजे ईश्वरही म्हणता येत नाही. तुमच्या खुदाला मोठ्याने ओरडून बोलवावे लागते. म्हणजे तो बहिरा आहे की काय ? या सर्व गोष्टी अनीश्वरकृत आहेत. म्हणून कुराण ईश्वरकृत असू शकत नाही. त्याने सहा दिवसात जग निर्माण केले व सातव्या दिवशी सर्वांत वरच्या (आठव्या) स्वर्गात विश्रांती घेतली. म्हणजे तो थकून गेला असावा. तो अजून झोपला आहे की, जागा झाला आहे ? जर तो जागा असेल तर हल्ली तो काही काम करतो की नुसतीच भटकंती आणि ऐषआराम करतो ? ॥७२॥

(७३) देशात फिसाद फैलावीत फिरू नका. - मं.२, सि.८, सू.७, आ.७४.

**(समीक्षक)** ही गोष्ट चांगली आहे. परंतु याउलट कुराणामध्ये इतरत्र जिहाद (धर्मयुद्ध) करा आणि काफिरांची कत्तल करा असेही सांगितले आहे. या परस्परविरोधी गोष्टी नव्हेत काय ? यावरून असे दिसते की, जेव्हा मुहम्मद साहेब दुर्बळ झाले असतील तेव्हा त्यांनी या सामोपचाराच्या मार्गाचा उपदेश केला असावा आणि सबळ झाल्यावर जिहादची कल्पना त्यांना सुचली असावी. या दोन्ही गोष्टी परस्परविरोधी असल्यामुळे त्या दोन्ही खऱ्या नाहीत. ॥७३॥

(७४) यावर मूसाने आपली काठी टाकून दिली. तो काय पाहतात की तो धडधडीत अजगर आहे.

- मं.२, सि.९, सू.७, आ.१०७.

**(समीक्षक)** आता या लिखाणावरून असे दिसून येते की असल्या खोट्या गोष्टी खुदा आणि मुहम्मद साहेब हे दोघेही खऱ्या मानीत होते. जर असे असेल तर ते दोघेही विद्वान नव्हते. कारण डोळे पाहण्याचे आणि कान ऐकण्याचे जे काम करतात ते इतर अवयवांकडून करवून घेता येत नाही म्हणून ही सगळी जादूगिरी आहे. ॥७४॥

(७५) मग आम्ही त्यांच्यावर तुफान (वादळ) पाठविले व तसेच टोळ, उवा, बेडूक आणि रक्त. (सारांश) सरतेशेवटी आम्ही त्यांच्यापासून (त्यांच्या खोडसाळपणाचा) बदला घेतलाच (घेतला); आम्ही त्यांना समुद्रात ठार करून टाकले आणि आम्ही बनी इस्राएलांस समुद्रपार पोहोचवून दिले आणि जी (जी) कर्मे हे लोक करीत आले आहेत ती (सर्व) निरर्थक होत. - मं.२, सि.९, सू.७, आ.१३३, १३६, १३८, १३९.

**(समीक्षक)** आता पाहा. एखाद्या लबाड इसमाने एखाद्याला अशी धमकी द्यावी की मी तुला ठार मारण्यासाठी तुझ्यावर साप सोडीन, तशीच ही गोष्ट आहे. जो खुदा पक्षपात करून एका जातीला बुडवून टाकतो आणि दुसऱ्या जातीला पैलतीराला सुखरूप नेऊन पोचवितो तो अधर्मी, पापी आहे असे का म्हणू नये? ज्या दुसऱ्या पंथांचे कोट्यवधी अनुयायी आहेत ते पंथ खोटे आहेत आणि आपणच खरे आहोत असे जो पंथ म्हणतो त्याच्याहून जास्त खोटा पंथ कोणता असेल ? कारण कोणत्याही पंथात सर्व माणसे चांगली अथवा सर्व

माणसे वाईट असू शकत नाहीत. असा एकतर्फी निर्णय देणारा पंथ हा महामूर्खांचा पंथ आहे. जुन्या कराराच्या (बायबलाच्या) आधारावर उभारलेला धर्म खोटा होता काय ? की खोटा ठरविला गेलेला पंथ दुसराच एखादा होता ? जर तो दुसरा एखादा पंथ असेल तर तो कोणता होता ? कुराणामध्ये कोणत्या नावाने त्या पंथांचा उल्लेख आलेला आहे ? ॥७५॥

(७६) मग जेव्हा त्याच्या पालनकर्त्याने पर्वतावर (आपले) जाज्वल्य स्वरूप प्रकट केले तेव्हा (भूकंप झाला व परमेश्वराने) त्याला चक्काचूर केले व मूसा (मोझेस) मूर्च्छित होऊन पडला. - मं.२, सि.९, सू.७, आ.१४३.

**(समीक्षक)** जे पाहण्यात येते ते व्यापक असू शकत नाही आणि जर खुदा असले चमत्कार करीत पूर्वी फिरत होता तर आता तो असले चमत्कार कोणालाही करून का दाखवीत नाही ? या सगळ्या गोष्टी ज्ञानविरोधी व म्हणून खोट्या असल्यामुळे त्या मान्य करण्यास योग्य नाहीत. ॥७६॥

(७७) आणि हे (पैगंबरा !) तू आपल्या मनातल्या मनातच नम्रतापूर्वक व भिऊन (भिऊन) मोठ्या आवाजात नव्हे (तर मंद स्वराने) सांजसकाळ आपल्या पालनकर्त्याचे स्मरण कर. - मं.२, सि.९, सू.७, आ.२०५.

**(समीक्षक)** कुराणामध्ये कोठे-कोठे असे लिहिले आहे की, आपल्या स्वामीला जोरजोरात ओरडून हाक मार. तर कोठे-कोठे मनातल्या मनात हळूहळू ईश्वराचे स्मरण कर असे सांगितले आहे. आता तुम्हीच सांगा, यातली कोणती गोष्ट खरी आहे ? आणि कोणती खोटी ? परस्पर विरोधी गोष्टी बोलणे म्हणजे प्रमत्त गाणे होय. अर्थात् चुकून एखादी गोष्ट परस्पर विरोधी लिहिली बोलली गेली असेल तर ती चूक मान्य करण्यास काहीच हरकत नसावी. ॥७७॥

(७८) (हे पैगंबरा ! मुसलमान शिपाई) तुला लुटीचे मालाविषयी प्रश्न करतात. (तर तू त्यांना) सांगून दे की, लुटीचा माल तर परमेश्वर व पैगंबर यांचा होय. म्हणून तुम्ही परमेश्वरास भ्या. - मं.२, सि.९, सू.८, आ.१.

**(समीक्षक)** जे लुटालुट करतात, दरोडे घालतात व घालायला लावतात त्यांनी स्वतःला खुदा, पैगंबरा व प्रामाणिकही म्हणवून घ्यावे ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे ! हे लोक अल्लाची भीती दाखवतात व दरोडे घालण्यासारखी दुष्टकृत्येही करीत राहातात. या लोकांना 'आमचा पंथ फार चांगला आहे'. असे म्हणण्याची लाज कशी वाटत नाही ? हटवादीपणा सोडून देऊन सत्य अशा वैदिक धर्माचा स्वीकार न करणे याहून अधिक वाईट गोष्ट ती कोणती ? ॥७८॥

(७९) आणि नास्तिकांचा (काफिरांचा) मूलच्छेद (समूळ उच्चाटन) करून टाका. मी लागोपाठ हजार देवदूतांनिशी तुमची (तुम्हाला) मदत करीन. मी लवकरच जे नास्तिक आहेत त्यांच्या अंतःकरणात दहशत घालून टाकीन. (बरे) तर मारा त्या नास्तिकांच्या मानांवर व मारा त्यांच्या (बोटांच्या) पेरापेरावर. - मं.२, सि.९, सू.८, आ.७, ९, १२.

**(समीक्षक)** वाहवा ! कसला हा खुदा आणि कसले हे पैगंबर ! निर्दयी आहेत हे ! ते मुसलमानांखेरीज इतर मतस्थ काफिरांची पाळेमुळे उखडून टाकतात. जो खुदा आपल्या भक्तांना काफिरांच्या माना कापण्याचे व हातापायांचे सांधे कापून टाकण्याची आज्ञा, अनुमती देतो व त्या कामी त्यांना मदत करतो तो क्रौर्याच्या

बाबतीत रावणाहून कमी आहे काय ? हा सारा प्रपंच कुराण रचणाऱ्याचा आहे. तो ईश्वराचा नाही. परंतु जर तो खुदाचाच असेल तर असला खुदा आमच्यापासून दूर राहिलेला बरा आणि आपणही त्यांच्यापासून दूर राहावे हेच बरे. ॥७९॥

(८०) परमेश्वर विश्वासू मुसलमानांबरोबर आहे. तुम्ही परमेश्वर व पैगंबर यांचा हुकूम (सावधान चित्ताने ऐका व) मान्य करा. अहो मुसलमानांनो ! परमेश्वर व पैगंबर यांच्याशी दगलबाजी करू नका व आपल्याही अमानतीत दगलबाजी करू नका व परमेश्वर डाव चालवीत होता आणि परमेश्वर सर्व डावकर्त्यांत उत्तम डावकर्ता आहे. - मं. २, सि.९, सू. ८, आ.१९, २४, २७, ३०.

**(समीक्षक)** अल्ला मुसलमानांचा पक्षपाती आहे काय ? तसे असेल तर तो अधर्म करीत आहे. कारण परमेश्वर हा सर्व जगाचा आहे. जोराने हाक मारल्याशिवाय खुदाला ऐकू येत नाही काय ? तो बहिरा आहे काय ? त्याच्या बरोबरीने पैगंबराला भागीदार समजणे ही अत्यंत वाईट गोष्ट नाही काय ? अल्लाला चोरीची एवढी भीती का वाटते ? त्याने आपला खजिना कोठेतरी भरून ठेवला आहे की काय ? अल्ला आणि रसूल यांची चोरी करू नका असे कुराण सांगते म्हणजे इतर सगळ्यांची चोरी करावी काय? असला उपदेश अविद्वान वा अधर्मी लोकच करू शकतात. जो फसवाफसवी करतो आणि लबाड लोकांचा साथीदार आहे तो खुदा कपटी व लबाड व अधर्मी नव्हे काय ? म्हणूनच कुराण हे खुदाने रचलेले नसून एखाद्या कपटी व लबाड माणसाने रचले असावे. तसे नसते तर कुराणात असल्या आक्षेपार्ह गोष्टी लिहिल्या का असत्या ? ॥८०॥

## लुटीतील खुदाचा हिस्सा

(८१) आणि नास्तिकांशी (काफिरांशी) लढत राहा. येथपर्यंत की, फंदफितूर (नावास देखील बाकी) राहणार नाही व धर्म सर्वस्वी परमेश्वराचाच होईल आणि तुम्ही हे जाणून ठेवा की, जी चीजवस्तू तुम्ही (लढाईत) लुटून आणाल तिचा पाचवा हिस्सा परमेश्वराचा व पैगंबराचा. - मं.२, सि.९, सू.८, आ.३९, ४१.

**(समीक्षक)** अशा प्रकारे अन्यायाने लढणारा-लढविणारा व शांततेचा भंग करणारा मुसलमानांच्या खुदाखेरीज दुसरा कोण असणार ? आता या पंथाचे स्वरूप पाहा ! अल्ला आणि रसूल (पैगंबर) यांच्यासाठी साऱ्या जगाला लुटणे, लुटविणे हे लुटारूंचे काम नव्हे काय ? आणि लुटीच्या मालात खुदाची भागीदारी असणे म्हणजे जणू लुटारू बनणेच आहे. अशा लुटारूंची बाजू घेणारा खुदा आपल्या खुदाईला म्हणजे ईश्वरत्वाला बट्टाच लावतो आहे. हा ग्रंथ, असला खुदा आणि असला पैगंबर हे जगाला उपद्रव देऊन शांतता भंग करून मानवजातीला दुःख देण्यास कोठून आले ? असले पंथ जगात निर्माण झाले नसते तर साऱ्या जगाचे आनंदवन झाले असते.॥८१॥

(८२) आणि (हे पैगंबरा) तू जर अशा वेळी नास्तिकांची स्थिती पाहशील तर (फार बरे होईल की) जेव्हा दूत या नास्तिकांचे प्राण हरण करतात (व) त्यांच्या तोंडावर व पाठीवर (लाथाबुक्क्यांचा) प्रहार करीत जातात व म्हणत जातात की घ्या, धगधगीत नरकाग्नीची शिक्षा तर चाखा. आम्ही त्यांना त्यांच्या पापकर्माबद्दल नष्ट करून टाकीले आणि फिरऔनचे लोकांस गर्क करून टाकीले. जितकी तुमच्याने होता येईल तितकी नास्तिकांच्या (सामन्या) साठी तयारी ठेवा. - मं.२, सि.९, सू.८, आ.५०, ५४, ६०.

**(समीक्षक)** काय महाराज ? अलीकडेच रशियाने तुर्कस्तानचा पाडाव केला आणि इंग्लंडने ईजिप्तची दुर्दशा करून टाकली. तेव्हा फरिश्ते झोपले होते काय ? पूर्वीच्या काळी खुदा आपल्या भक्तांच्या शत्रूंचा नायनाट करीत असे, ही गोष्ट खरी असती तर आताही त्याने तसेच करायला हवे. परंतु तसे काही घडत नाही. म्हणून या गोष्टीवर विश्वास ठेवता येत नाही. आता पाहा ! ''तुमच्याकडून होतील तितकी परमतस्थांना दुःख देणारी कृत्ये तुम्ही करा.'' ही केवढी वाईट आज्ञा आहे ! असली आज्ञा विद्वान, धार्मिक व दयाळू व्यक्तीची असू शकत नाही. तरीही ते लिहितात की, खुदा दयाळू व न्यायी आहे. असल्या आज्ञांवरून मुसलमानांचा खुदा न्याय, दया वगैरे सद्‌गुणांपासून फारच दूर आहे. ॥८२॥

(८३) हे पैगंबरा ! परमेश्वर व मुसलमान लोक जे तुला अनुसरतात ते तुला पुरे होत. हे पैगंबरा ! तू मुसलमानांस (नास्तिकांशी) लढण्याचे प्रोत्साहन दे; की जर तुम्हां (मुसलमानां) पैकी सहनशील (व करारी) असे वीसही असतील तर ते दोनशे (नास्तिकां) वर जय पावतील. पण (असो,) जे काही तुम्हांस लुटीत मिळाले आहे ते हलालाचे (शुद्ध) व पवित्र समजून खा; आणि परमेश्वरा (चे कोपा) स भीत राहा. परमेश्वर क्षमाशील (व) दयाळू आहे. - मं.२, सि.१०, सू.८, आ.६४, ६५, ६९.

**(समीक्षक)** जो आपल्या बाजूचा आहे त्याने अन्याय केला तरी त्याचाच पक्ष घ्यावयाचा आणि त्याचा फायदा करावयाचा ही काय न्यायाची, विद्वत्तेची व धर्माची गोष्ट म्हणावयाची ? आणि जो प्रजेमध्ये शांतताभंग घडवून आणतो, भांडणे लावून देतो, लढाया करवितो आणि लुटीचा माल शुद्ध व पवित्र ठरवितो त्यालाच क्षमावान् व दयाळू म्हणणे हे काम खुदाचेच काय पण कोणत्याही भल्या माणसाचे असू शकत नाही. असल्या गोष्टींमुळे कुराण हे ईश्वरप्रणीत होऊ शकत नाही. ॥८३॥

(८४) (आणि हे लोक) त्या बागांत सदासर्वदा राहतील. निःसंशय परमेश्वरासमीप (पुण्याईचे) मोठे प्रतिफल होय. अहो मुसलमानांनो ! जर तुमचे बाप व तुमचे भाऊ विश्वासापुढे नास्तिकपणास प्रिय जाणतील तर तुम्ही त्यांना (आपले) स्नेही बनवू नका. मग परमेश्वराने आपल्या पैगंबरावर व (तशीच) मुसलमानांवर आपल्याकडून शांती उतरविली आणि (तुमच्या कुमकेस दूतांची) अशी सैन्ये पाठविली की, जी तुम्हाला दिसून येत नव्हती आणि (अखेर) नास्तिकांस त्याने शिक्षा दिली. मग या पश्चात् परमेश्वर ज्याचा इच्छिल त्याचा पश्चात्ताप मान्य करील. जे परमेश्वराला मानीत नाहीत अशा (लोकां) शीही तुम्ही लढा. - मं.२, सि.१०, सू.९, आ.२२, २३, २६, २७, २९.

**(समीक्षक)** छान ! स्वर्गात राहणाऱ्यांच्या जवळ अल्ला राहत असेल तर तो सर्वव्यापक कसा होऊ शकेल ? जो सर्वव्यापक नसेल तो सृष्टिकर्ता व न्यायाधीश होऊ शकत नाही आणि आपली आई, बाप, भाऊ व मित्र यांना सोडून देण्यास-त्यांचा त्याग करण्यास सांगणे ही अगदीच अन्यायाची गोष्ट आहे. ते चुकीचा उपदेश करतील तर तो ऐकता कामा नये. परंतु सदैव त्यांची सेवा केली पाहिजे. पूर्वी खुदा मुसलमानांवर बेहद्द खुष होता आणि त्यांच्या मदतीसाठी स्वर्गातून खाली लष्कर पाठवीत होता, हे खरे असेल तर मग आता तो तसे का करीत नाही ? तो पूर्वी काफिरांना शिक्षा देत होता आणि तर तो आता कोठे गेला ? आपल्या अनुयायांना युद्ध

करायला लावल्याशिवाय खुदा आपल्या विचारांचा प्रसार करू शकत नाही काय ? हा कसला खुदा ? तो तर डावपेच करणारा खेळाडूच दिसतो. अशा खुदाला आमची कायमची तिलांजली ! ॥८४॥

(८५) आणि आम्ही तुमच्या ठायी या गोष्टीची वाट पाहतो आहो की, परमेश्वर तुम्हांला आपल्याकडून एखाद्या शिक्षेत पीडा देवो. अगर आमच्या हातून (तुम्हांस एखादी शिक्षा देवो !). - मं.२, सि.१०, सू.९, आ.५२.

**(समीक्षक)** सगळे मुसलमानच ईश्वराचे पोलीस झाले ? म्हणून इतर पंथाच्या लोकांना स्वत:च्या हातांनी पकडतो अथवा मुसलमानांच्या हातून पकडवितो काय ? इतर पंथाचे कोट्यावधी लोक ईश्वराला अप्रिय आहेत काय ? मुसलमानांतील पापी लोकही त्याला प्रिय आहेत काय ? तसे असल्यास अंधेर नगरीच्या मूर्ख राजासारखी ही व्यवस्था दिसते. बुद्धिमान मुसलमानही या निराधार व तर्कविसंगत धर्मावर श्रद्धा ठेवतात, हे केवढे आश्चर्य आहे ! ॥८५॥

(८६) विश्वासू (श्रद्धावान) पुरुष व विश्वासू स्त्रिया यांच्याशी परमेश्वराने (अशा स्वर्गीय) बागांचा वायदा केला आहे की, ज्यांच्या खालून (पाण्याचे) पाट वाहत असतील (व ती) त्यांत नित्य राहतील आणि (तसाच परमेश्वराने त्यांच्याशी) चिरकालिक निवासस्थानांचे बागांत छानदार (छानदार) घरांचा (वायदा केला आहे) आणि परमेश्वराची सुप्रसन्नता फारच थोर होय. हेच मोठे सार्थक होय. एवंच ते त्या (सर्वा) वर हसतात. पण परमेश्वर या (दांभिकां) वर हसतो. - मं.२, सि.१०, सू.९, आ.७२, ७९.

**(समीक्षक)** हे खुदाच्या नावाने स्वत:च्या स्वार्थासाठी स्त्रीपुरुषांना लालूच दाखविण्यासारखे आहे. कारण मुहम्मद साहेबांनी असे प्रलोभन दाखविले नसते तर कोणीही मुहम्मद साहेबांच्या इस्लामी जाळ्यात अडकले नसते. इतर पंथाचे लोकही असेच करतात. माणसे एकमेकांशी थट्टामस्करी करतातच. परंतु परमेश्वराने कोणाची टर उडविणे किंवा टिंगल करणे हे त्याला शोभत नाही. हे कुराण काय आहे, मोठा खेळ आहे. ॥८६॥

(८७) परंतु पैगंबर व ज्यांनी त्याच्या बरोबर (परमेश्वर) विश्वास ठेविला आहे. (या सर्वांनी) आपले धन व आपले तनमन (परमेश्वराच्या मार्गात) अर्पण करून जिहाद (धर्मयुद्ध) केले. हेच लोक होत की, ज्यांना (इहलोक व परलोक या सर्वांचे) श्रेय होय आणि परमेश्वराने त्यांच्या अंत:करणावर मोहर लावून दिली आहे. म्हणून हे (लोक जिहादच्या खुब्या) समजत नाहीत. - मं.२, सि.१०, सू.९, आ. ८८, ९३.

**(समीक्षक)** याला म्हणतात स्वार्थसाधूपणा ! ज्यांनी मुहम्मद साहेबांवर श्रद्धा ठेवून इस्लामचा स्वीकार केला ते लोक चांगले आणि ज्यांनी तसा स्वीकार केला नाही ते लोक वाईट ! ही गोष्ट पक्षपातपूर्ण व अविद्यायुक्त नाही काय ? ईश्वरानेच मोहर ठोकल्यावर पाप करण्यामध्ये त्यांचा काही अपराध नसून तो खुदाचाच अपराध ठरतो कारण त्या बिचाऱ्यांच्यावर सील ठोकून त्यांना सदाचार करण्यास त्याने प्रतिबंध केला. हा केवढा मोठा अन्याय आहे !!! ॥८७॥

(८८) (हे पैगंबरा ! हे लोक आपल्या मालाची जकात देतील तर) त्यांच्या मालाची जकात घेत जा, का की ही (जकात स्वीकारल्या) ने तू त्यांची (पापापासून अंतर्बाह्य) शुद्धी करतोस. परमेश्वराने मुसलमानांपासून त्यांचे प्राण व त्यांची धनदौलत (या वायद्याने) खरेदी घेतली आहे की, त्यांच्याऐवजी त्यांना स्वर्ग (प्राप्ती)

होईल. (हे लोक तन, मन व धन यांची पर्वा न बाळगता) परमेश्वराचे मार्गाने लढतात, (आणि ते लढतात) तेव्हा (शत्रूस) मारून टाकतात व (आपणही वेळेस) मारले जातात. - मं.२, सि.११, सू.९, आ.१०३, १११.

**(समीक्षक)** वाहवा मुहम्मद साहेब ! तुम्ही तर गोकुलिये गोसाव्यांचीच बरोबरी केली की ! आपल्या भक्तांकडून संपत्ती घेणे व त्यांना पवित्र करणे हीच गोष्ट गोसावी लोक करतात. वाहवा खुदाजी ! तुम्ही चांगलीच सौदेबाजी चालविली आहे ! मुसलमानांच्या हातून इतर गोरगरिबांचे प्राण घेणे हाच नफा आहे. वस्तुतः त्या अनाथांना ठार करणाऱ्या त्या निर्दय लोकांना तुम्ही स्वर्ग दिला म्हणून खुदा दया व न्याय यांनाच पारखा झाला आणि आपल्या ईश्वरत्वाला बट्टा लावून बुद्धिमान् धार्मिक लोकांच्या दृष्टीने तिरस्कृत बनलात. ॥८८॥

(८९) अहो मुसलमानांनो ! तुम्ही आपल्या आसपासच्या नास्तिकांशी लढा आणि त्यांना तुमच्यात उग्रता (व शौर्य) आढळून आले पाहिजे आणि का हे लोक इतकेही अवलोकन करीत नाहीत की, प्रतिवर्षी एकदा किंवा दोनदा ते संकटात तावून सुलाखून पाहिले जातात. यावरही ते पश्चात्ताप करीत नाहीत व त्यांना अद्दलही घडत नाही. - मं.२, सि.११, सू.९, आ.१२३, १२६.

**(समीक्षक)** पाहा ! ही देखील एक विश्वासघाताची गोष्ट खुदा मुसलमानांना शिकवितो आहे की शेजारी असोत की कोणाचे नोकर असोत, त्यांच्याशी संधी सापडताच लढाई करा किंवा त्यांना ठार मारा. कुराणातील या आज्ञा प्रमाण मानून मुसलमानांनी अशा पुष्कळ गोष्टी केल्या आहेत. आता तरी कुराणातील हा बदसल्ला अयोग्य आहे हे ओळखून मुसलमान या वाईट गोष्टी सोडून देतील तर फार बरे होईल.॥८९॥

(९०) (लोकानो !) तुमचा पालनकर्ता तोच परमेश्वर होय की, ज्याने सहा दिवसांत आकाशास व पृथ्वीस निर्माण केले. नंतर दिव्य सिंहासनावर तो विराजमान झाला. (की तेथूनच) प्रत्येक कामाची व्यवस्था लावीत राहतो. - मं.३, सि.११, सू.१०, अ.३.

**(समीक्षक)** आसमान किंवा आकाश हे एकच अनादी आहे. ते बनविले असे कुराणात लिहिलेले आहे त्यावरून कुराणाच्या लेखकाला पदार्थविद्येचे ज्ञान नव्हते याविषयी खात्री पटते. परमेश्वराला सृष्टी रचण्यास सहा दिवस लागले काय ? वस्तुतः कुराणात असे लिहिले आहे की, ''मी 'हो' असे म्हटले आणि माझ्या हुकुमाने ते झाले.'' अल्लाचे एवढे सामर्थ्य असताना सृष्टीच्या उत्पत्तीला सहा दिवस लागू शकत नाही. म्हणून सहा दिवस लागले हे म्हणणे खोटे आहे. खुदा सर्वव्यापक असता तर तो अस्मानातावर (अर्शमध्ये) कशाला राहिला असता ? आणि जेव्हा तो कामाची व्यवस्था करतो तर तेव्हा तो खुदा माणसासारखाच आहे. कारण जो सर्वज्ञ आहे तो बसल्या-बसल्या कसली व्यवस्था करणार ? यावरून असे दिसून येते की, ईश्वराला न जाणणाऱ्या जंगली लोकांनी हे पुस्तक रचले असावे. ॥९०॥

(९१) आणि विश्वासू (मुसलमान) लोकांसाठी सदुपदेश व दया. - मं.२, सि.११, सू.१०, आ.५७.

**(समीक्षक)** हा खुदा काय फक्त मुसलमानांचाच ईश्वर आहे ? इतरांचा नाही ? तो जर फक्त मुसलमानांवरच दया करीत असेल व इतरांवर दया करीत नसेल तर तो पक्षपाती आहे. जर इमानदार लोकांना मुसलमान म्हटले जात असेल तर त्यांना सदुपदेश (मार्गदर्शन) करण्याची काही आवश्यकता नाही आणि जर तो खुदा मुसलमानांखेरीज इतरांना उपदेश करीत नाही तर त्याची विद्या (ज्ञान) व्यर्थ होय. ॥९१॥

(९२) त्याने तुम्हां लोकांस पडताळून पाहावे की, तुमच्यात कोणाची कृत्ये उत्तम आहेत ? आणि (हे पैगंबरा!) जर तू (या लोकांस) सांगशील की, 'मृत्यूनंतर तुम्ही सर्व पुन: (जिवंत) उठवून उभे केले जाल,' तर अश्रद्ध लोक अवश्य असे म्हणतील की, 'ही तर उघडउघड जादू आहे.' - मं.३, सि.१२, सू.११, आ.७.

**(समीक्षक)** जर खुदा कर्माची परीक्षा करीत असेल तर तो सर्वज्ञच नाही आणि जर तो मृत्यूनंतर पुन: जिवंत करीत असेल तर तो मृतजीवांना तसेच ताटकळत ठेवतो काय ? शरीर सोडून गेलेला जीव पुन: शरीरात प्रविष्ट होणार नाही हा आपलाच नियम तो मोडतो. या साऱ्या गोष्टींमुळे खुदाला बट्टा लागतो. ॥९२॥

(९३) आणि हुकूम फर्माविला गेला की, हे धरित्री ! तू आपले पाणी शोषून घे आणि हे आभाळा ! तू थांबून जा आणि पाणी (चढलेले) उतरून गेले आणि हे माझ्या बांधवांनो ! ही परमेश्वराची (धाडलेली) सांडणी तुम्हाकरिता (माझ्या पैगंबराची) एक निशाणी होय. तर तिला (ह्याच स्थितीत) सुटी राहू द्या, की परमेश्वराच्या जमिनीतून हवी तेथे चरत फिरेल. - मं.३, सि.१२, सू.११, आ.४४, ६४.

**(समीक्षक)** ही कीती पोरकटपणाची गोष्ट आहे ! पृथ्वी आणि आकाश हे कधी काही ऐकू शकतात काय ? छान ! खुदाजवळ सांडणी (उंटीण) आहे म्हणजे उंटही असणार. मग हत्ती, घोडे, गाढवे वगैरे प्राणीही असणार आणि सांडणीला चरण्यासाठी शेतात सोडून देणे ही गोष्ट खुदाला शोभणारी आहे काय ? तो कधी उंटणीवर स्वारही होतो काय ? या सगळ्या गोष्टी होत असतील तर खुदाच्या घरात नबाबी धूसपूस झाली असे म्हटले पाहिजे. ॥९३॥

(९४) (आणि) जोपर्यंत आकाश व पृथ्वी कायम आहेत तोपर्यंत ते सदासर्वदा त्यातच राहतील आणि लोक सुदैवी असतील ते स्वर्गात राहतील आणि जोपर्यंत आकाश व पृथ्वी कायम आहेत तोपर्यंत सदैव त्यातच राहतील. - मं.३, सि.१, सू.११, आ.१०७, १०८

**(समीक्षक)** प्रलयानंतर न्यायनिवाडा होऊन सर्व लोक स्वर्गात व नरकात जातील. मग आकाश आणि पृथ्वी यांची काय गरज ? आणि जर स्वर्ग व नरक हे आकाश व पृथ्वी अस्तित्वात असेपर्यंत कायम राहणार असतील तर 'आत्मे सदैव स्वर्गात अथवा नरकात राहतील' हे विधान खोटे ठरते. असले कथन अविद्वानांचे असते. ते ईश्वराचे किंवा विद्वानांचे नसते. ॥९४॥

(९५) (एक काळ असा होता की) जेव्हा यूसुफने आपल्या बापाला (याकूबला) असे सांगितले की, "हे माझ्या पित्या ! मी (स्वप्नात) अकरा नक्षत्रे व सूर्य-चंद्र ही पाहिली...." - मं.३, सि.१२, सू.१२, आ.४-५९.

**(समीक्षक)** या प्रकरणामध्ये पितापुत्राच्या जो संवादरूप कथांचा एक संग्रहच आहे. यावरून कुराण ईश्वराने रचलेले नसून एखाद्या माणसाने माणसांचा इतिहासच त्यात वर्णन केला आहे असे दिसते. ॥९५॥

(९६) परमेश्वर असा (परम समर्थ) आहे की, ज्याने आकाशाला कोणत्याही आधारावाचून उंच बनवून उभे केले की ते तुम्ही (लोक) पाहतच आहा. नंतर तो महासिंहासनावर विराजमान झाला आणि त्याने सूर्य व चंद्र यांना नियंत्रित केले आणि तोच (असा परम समर्थ आहे) की, ज्याने पृथ्वीचा विस्तार केला. (त्यानेच) आकाशातून पाणी वर्षविले. मग आपापल्या अंदाजाप्रमाणे ओढे वाहू लागले. परमेश्वर ज्याला इच्छितो त्याला निर्वाहासाठी विपुल धन देतो आणि (ज्याला इच्छितो त्याला) हात राखून देतो. -मं.३, सि.१३, सू.१३, आ.२, ३, १७, २६.

**(समीक्षक)** मुसलमानांच्या खुदाला पदार्थविज्ञानाचें ज्ञान मुळीच नव्हते. ते त्याला असते तर आकाशामध्ये गुरुत्वाकर्षण नसल्यामुळे आकाशाला खांबांच्या आधाराची आवश्यकता असल्याची कपोलकल्पना त्याने केली नसती. जर खुदा अर्शरूपी एका स्थानामध्ये राहत असेल तर तो सर्वशक्तिमान व सर्वव्यापक असू शकत नाही. त्याचप्रमाणे खुदाला मेघविद्येचे ज्ञान असते तर त्याने आकाशातून पाणी खाली आणले असे लिहिल्यानंतर पृथ्वीवरून पाणी आकाशात चढविले असे लिहिले असते. यावरून कुराण रचणाऱ्याला मेघविद्येचेही ज्ञान नव्हते ही गोष्ट स्पष्ट दिसून येते. तसेच बऱ्या वाईट कृत्यांचा विचार न करता तो सुखदु:ख देत आहे तर तो पक्षपाती, अन्यायकारी, निरक्षर भट्ट आहे. ॥९६॥

(९७) (तू त्यांना) सांग की, परमेश्वर ज्याला इच्छितो त्याला मार्गाहून चळवितो आणि जो कोणी (त्याचेकडे) वळतो त्याला आपल्याकडे (पोहोचण्याचा) मार्ग दाखवितो. - मं.३, सि.१३, सू.१३, आ.२७.

**(समीक्षक)** जर अल्लाच चुकीचा मार्ग दाखवीत असेल तर मग खुदा व सैतान यांच्यात काय फरक उरला? लोकांना चुकीच्या मार्गाने नेल्याबद्दल, बहकाविल्याबद्दल सैतानाला वाईट म्हटले जाते तर तसलेच कृत्य करणाऱ्या खुदाला वाईट सैतान का म्हणू नये? आणि लोकांना बहकाविण्याच्या पापाबद्दल त्याला नरकात का पडावे लागू नये?॥९७॥

(९८) आणि अशाच कारणाने आम्ही कुराणास अरबी (भाषेचा) हुकूम म्हणून सादर केले आहे, (की अरब लोकांस हे सहज समजेल) आणि (हे पैगंबरा!) तुला ज्ञान होऊन चुकले आहे. त्या उपरांतही जर तू त्यांच्या मनोवासनांस अनुसरशील तर (मग) परमेश्वरापुढे कोणी तुझा पुरस्कर्ता होणार नाही व बचावणाराही होणार नाही. काही झाले तरी (आमच्या आज्ञा) पोहोचविणे हे तुझे काम होय व (त्यांच्यापासून) हिशोब घेणे हे आमचे. - मं.३, सि.१३, सू.१३, आ.३७, ४०.

**(समीक्षक)** कुराण कोणत्या बाजूने खाली उतरले ? खुदा वर राहातो काय ? जर तसे असेल तर तो एकदेशी ठरतो व म्हणून तो ईश्वर असू शकत नाही. कारण ईश्वर हा सर्वत्र एकरस व्यापक आहे. संदेश (निरोप) पोचविणे हे जासूदाचे किंवा निरोप्याचे काम असते; आणि जो माणसांप्रमाणे एकदेशी असतो त्यालाच निरोप्याची गरज असते. तसेच हिशेब देणे-घेणे हेही माणसाचे काम आहे. ईश्वराचे नव्हे कारण तो सर्वज्ञ आहे. यावरून अशी खात्री पटते की, कुराण हे एखाद्या अल्पज्ञ माणसाने रचले आहे. ॥९८॥

(९९) सूर्य व चंद्र हेही तुमच्या ताब्यात करून दिले की, दोन्हीही चक्कर खात (फिरत) राहतात. काही संशय नाही की मनुष्य मोठाच अन्यायी (व) अनुपकारी आहे. - मं.३, सि.१३, सू.१४, आ.३३, ३४.

**(समीक्षक)** चंद्र व सूर्य सदा फिरत असतात आणि पृथ्वी फिरत नाही काय ? पृथ्वी फिरत नसती तर अनेक वर्षांचे दिवस व रात्री झाल्या असत्या आणि माणूस नक्कीच अन्याय व पाप करणारा असेल तर कुराणाद्वारे त्याला उपदेश करणे व्यर्थ आहे. कारण ज्यांचा स्वभावच पाप करण्याचा असेल त्यांच्यामध्यें पुण्य करण्याची बुद्धि कधीच येणार नाही. परंतु जगात तर नेहमीच पुण्यात्मे व पापात्मे दिसतात. म्हणून असले विधान ईश्वरकृत ग्रंथातील असू शकत नाही. ॥९९॥

(१००) तर जेव्हा मी त्याला पूर्णपणे बनवीन व त्यात आपला (स्वनिर्मित) आत्मा फुंकेन तेव्हा तुम्ही

त्याच्यापुढे साष्टांग नमस्कार घालीत (भराभर पालथे) पडा. (सैतान) म्हणाला, हे माझ्या पालनकर्त्या! तू जशी (मानवाखातर) माझी वाट मारलीस, (तसेच) मीही पृथ्वीत त्यांना (जगाचे) उत्तम चित्र दाखवून या सर्वांस बहकवीन. - मं.३, सि.१४, सू.१५, आ.२९, ३९-४६.

**(समीक्षक)** जर खुदाने आपला आत्मा आदमसाहेबाच्या शरीरात घातला असेल तर तो (आदम) ही खुदाच झाला आणि जर तो खुदा नव्हता तर त्याला सिजदा करा, साष्टांग नमस्कार घाला असे सांगून त्याने आदमला आपला भागीदार का करून घेतले? सैतानाला बहकाविणारा खुदाच असेल तर तो सैतानाचाही सैतान, त्याचा थोरला भाऊ, गुरू का नाही? कारण तुम्ही बहकाविणाऱ्याला सैतान समजता आणि खुदानेही सैतानाला बहकविले आणि खुद्द सैतानाने म्हटले की, मी बहकावीन. तरीही त्याला कैद करून खुदाने त्याला शिक्षा का केली नाही? त्याला मारून का टाकले नाही? ॥१००॥

(१०१) आणि आम्ही प्रत्येक जनतेसाठी (कोणी ना कोणी) पैगंबर (या गोष्टी समजाविण्यासाठी) पाठवीत राहिलो आहोत. जेव्हा आम्ही एखाद्या वस्तूचा इरादा करतो, तेव्हा आमचे म्हणणे तिच्या संबंधाने फक्त एवढेच असते की, आम्ही तिला फर्मावितो की, 'हो' आणि ती होऊन जाते. - मं.३, सि.१४, सू.१६, आ.३६, ४०.

**(समीक्षक)** जर सर्व जमातींसाठी पैगंबर पाठविले आहेत तर मग जे लोक आपापल्या पैगंबराच्या आदेशाप्रमाणे वागतात ते काफिर कसे ठरतात? तुमच्या पैगंबराखेरीज इतर पैगंबर माननीय नाहीत काय? तसे असेल तर ही अत्यंत पक्षपाताची गोष्ट आहे. जर सर्व देशांसाठी पैगंबर धाडले तर आर्यावर्त्तामध्ये कोणता पैगंबर धाडला? म्हणून ही गोष्ट मान्य करता येत नाही. जेव्हा खुदा इच्छा करतो आणि म्हणतो की, 'हे पृथ्वी, तू हो,' तेव्हा ती जड असल्यामुळे ते ऐकू शकत नाही आणि केवळ खुदाचा हुकूम कसा आमलात येईल? आणि खुदाखेरीज दुसरी कोणतीच वस्तू नाही तर त्याचा हुकूम कोणी ऐकला? आणि कोण झाले? या साऱ्या अडाणीपणाच्या गोष्टी आहेत; आणि अज्ञानी लोकच त्यांच्यावर विश्वास ठेवतात. ॥१०१॥

(१०२) आणि हे नास्तिक लोक (दूतास) परमेश्वराच्या मुली ठरवितात. (वाहवा!) परमेश्वर (जो) परमपवित्र (त्याच्यासाठी मुली) आणि खुद्द आपणासाठी; जी काही आकांक्षा ते बाळगतात ती (म्हणजे मुलगे) (हे पैगंबरा!) परमेश्वराची (म्हणजे आम्हांला आपली) शपथ आहे की, तुझ्यापूर्वीही आम्ही (भिन्नभिन्न) जनतांकडे पैगंबर पाठविले. - मं.३, सि.१४, सू.१६, आ.५७, ६३.

**(समीक्षक)** अल्ला मुलींचे काम करणार? मुलींची गरज तर माणसाला (पुरुषाला) असते. खुदासाठी मुलीच का निवडल्या जातात, मुले का निवडली जात नाहीत? याचे कारण काय ते सांगा. शपथ घेणे हे खोटारड्या लोकांचे काम असते. ईश्वराने शपथ घ्यायची नसते. कारण जगात सामान्यत: असे आढळते की, जो खोटा असतो तोच शपथ घेतो. खऱ्या माणसाने शपथ कशाला घ्यावी? ॥१०२॥

(१०३) हेच ते लोक होत की, ज्यांच्या अंत:करणावर व ज्यांच्या कानांवर व ज्यांच्या डोळ्यांवर परमेश्वराने मोहर करून टाकली आहे; आणि हेच (पराकाष्ठेचे) बेफाम होत आणि प्रत्येक जणास त्याने जे केले सवरले त्याचा भरपूर मोबदला दिला जाईल व लोकांवर (कोणत्याही तऱ्हेचा) जुलूम केला जाणार नाही.

- मं.३, सि.१४, सू.१६, आ.१०८, १११.

**(समीक्षक)** खुदानेच माणसाच्या अंत:करणावर व कानांवर मोहर ठोकल्यावर विनाकरण ते बिचारे बिना अपराध मारले गेले. कारण अल्लानेच त्यांना पराधीन केले आहे. हा त्याचा केवढा मोठा अपराध आहे! वर पुन्हा असे सांगतात की, ज्याने जेवढे केले असेल तेवढेच त्याला दिले जाईल. कमी-जास्त नाही. छान! त्यांनी जी पापे केली ती स्वेच्छेने केली नाहीत; खुदाच्या करविण्याने केली. म्हणून तो त्यांचा अपराधच नव्हे. त्याचे फळ त्यांना भोगावे लागता कामा नये. त्याचे फळ खुदालाच भोगावे लागणे हे उचित होय आणि ज्याच्या त्याच्या कर्माची फळे त्याला मिळत असतील तर मग क्षमा कशाबद्दल केली जाते? क्षमा केली जात असेल तर न्याय उरत नाही. असला हा गडबड घोटाळा ईश्वराकडून कधीच होणे शक्य नाही. निर्बुद्ध पोरासोरांकडूनच तो होत असतो. ॥१०३॥

## काफिरांसाठी नर्क

(१०४) आणि आम्ही नास्तिकांसाठी जहन्नमचा बंदीखाना (तयार) ठेवलाच आहे आणि आम्ही हरेक माणसाचे (बरेवाईट) भाग्य त्याचे त्याच्या गळ्यात घालून टाकले आहे. (म्हणजे ज्याचे प्रारब्ध त्याच्याबरोबर होय) आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही (त्याचा कर्म-) लेख काढून त्याच्यापुढे ठेवू (व) तो त्याला आपल्या समोर उघडलेला पाहिल आणि 'नूह' (नोहा) च्या नंतर आम्ही कितीतरी वस्त्या नष्ट करून टाकल्या.

-मं.४, सि.१५, सू.१७, आ.८, १३, १७.

**(समीक्षक)** जे कोणी कुराण, पैगंबर, कुराणात सांगितलेला खुदा, सातवे अस्मान, नमाज वगैरे गोष्टींना मानीत नाहीत तेच काफिर आहेत आणि त्यांच्यासाठीच नरक असेल तर ती गोष्ट निव्वळ पक्षपाताची ठरते. कारण कुराणावर श्रद्धा ठेवणारे तेवढे सगळे चांगले आणि इतर पंथाचे अनुयायी तेवढे सगळे वाईट असे कधीतरी असू शकेल काय? प्रत्येकाच्या गळ्यात त्याच्या कर्मांचे पुस्तक (किंवा खातेवही) अडकवलेले असते ही कल्पनाच किती बालिशपणाची आहे! आम्हांला तर कोणाच्याही गळ्यात हे कर्मपुस्तक टांगलेले दिसत नाही. त्याचा उद्देश प्रत्येकाला त्याच्या कर्माचे फळ देणे हा असेल तर मग माणसांच्या अंत:करणांवर, डोळ्यांवर वगैरे मोहर ठोकणे आणि पापांबद्दल क्षमा करणे हा कसला पोरखेळ खुदाने चालविला आहे? कयामतीच्या रात्री खुदा पापपुण्याच्या जमाखर्चाची वही बाहेर काढणार आहे म्हणे. तर ती वही सध्या कोठे आहे? सावकाराच्या खातेवहीप्रमाणे खुदा प्रत्येक माणसाची खातेवही रोजच्या रोज लिहित असतो काय? या ठिकाणी विचार करण्यासारखी गोष्ट ही आहे की, इस्लाममध्ये पूर्वजन्माला मान्यता दिलेली नाही. त्यामुळे जीवांच्या कर्मांचा प्रश्नच उपस्थित होत नाही. मग त्या कर्मांची नोंद कशी ठेवली जाणार? पूर्वजन्माची कर्मेच नसतील तर ती नसताना त्यांची नोंद करणे हा अन्याय आहे. बऱ्यावाईट कर्मांच्या अभावी जीवांना खुदाने सुख-दु:ख का दिले? 'खुदाची मर्जी' असे म्हणत असाल तर तोही खुदाचा अन्यायच म्हटला पाहिजे. बऱ्यावाईट कर्मांचा विचार न करता सुख-दु:खरूपी फळे कमी अधिक प्रमाणात देणे यालाच अन्याय असे म्हणतात आणि न्यायनिवाड्याच्या वेळी स्वत: खुदा ती वही वाचणार की एखादा शिरस्तेदार ते वाचन करणार? जीवांचा काही अपराध नसताना खुदाने त्यांना दीर्घकाळपर्यंत वाट पहयला लावून त्यांचा नाश केला तर तो अन्यायकारी ठरेल आणि जो अन्याय करतो तो परमेश्वरच असू शकत नाही. ॥१०४॥

(१०५) आम्ही समूद (च्या लोकां) ला सांडणीचा देखत चमत्कार दिला होता आणि त्यांच्यातून ज्यांना तू आपल्या (मोहक) स्वराने (बहकवू) शकशील त्यांना बहकव. (आणि मोठे श्रेष्ठत्व तर त्या दिवसाचे होय की) ज्या दिवशी आम्ही सर्व लोकांस त्यांच्या (त्यांच्या) पुढाऱ्यासमवेत (आपल्यासमोर) बोलावून हजर करू. मग ज्यांचा (कर्म) लेख त्यांच्या उजव्या हातात दिला जाईल. - मं.४, सि.१५, सू.१७, आ.५९, ६४, ७१.

**(समीक्षक)** वाहवा ! खुदाच्या अस्तित्वाच्या ज्या आश्चर्ययुक्त खुणा आहेत त्यापैकी सांडणी ही एक निशाणी व परीक्षेचे साधक आहे. खुदानेच सैतानाला बहकविण्याचा हुकुम केला. याचा अर्थ असा की, खुदाच सैतानाचा सरदार व सर्व पापे करविणारा ठरला. अशा खुदाला परमेश्वर समजणे हे केवळ अल्पज्ञानच होय. कयामतीच्या रात्री म्हणजे प्रलयकाळीच न्यायनिवाडा करण्यासाठी पैगंबर व त्यांचे अनुयायी यांना खुदा बोलवणार. म्हणजे प्रलय होईपर्यंत सर्वांना कच्च्या कैदेतच राहवे लागणार आणि खटल्याचा निकाल लागेपर्यंत कच्च्या कैदेत राहणे हे नेहमीच दु:खदायक असते. म्हणून तावडतोब निकाल देणे हे उत्तम न्यायाधीशाचे कर्तव्य असते. हा तर पोपांचा न्याय झाला. एखाद्या न्यायाधीशाने असे म्हणावे की, जोपर्यंत गेल्या पन्नास वर्षातील चोर आणि सज्जन एकत्र गोळा केले जाणार नाहीत तोपर्यंत त्यांचा न्यायनिवाडा करून त्यांना शिक्षा अथवा प्रतिष्ठा बहाल करता कामा नये. तसेच हे झाले. एकजण पन्नास वर्षे कच्च्या कैदेत डांबून राहिला आणि एकजण आजच पकडला गेला. म्हूणन त्या दोघांना आजच शिक्षा करावयाची ! याला न्याय म्हणत नाहीत. न्याय पहायचा असेल तर तो वेदामध्ये आणि मनुस्मृतीत पाहा. तेथे न्यायदानाला एक क्षणाचाही विलंब होत नाही; आणि जीव आपापल्या कर्मांनुसार सदैव शिक्षा किंवा प्रतिष्ठा प्राप्त करीत असतात. दुसरी गोष्ट अशी की, पैगंबरांना साक्षीदार म्हणून वागविणे हे ईश्वराच्या सर्वज्ञतेत उणीव आहे. तेव्हा असले हे पुस्तक कधी ईश्वरकृत असू शकते काय ? आणि असल्या पुस्तकाचा उपदेश करणारा कधी ईश्वर असू शकतो काय? मुळीच नाही! ॥१०५॥

(१०६) ते हेच लोक आहेत की, ज्यांच्या राहण्यासाठी (स्वर्गाच्या) कायमच्या बागा आहेत. या लोकांच्या (हवेल्या) खालून पाण्याचे पाट वाहत असतील; तेथे त्यांना अलंकारार्थ सोन्याची कंकणे घातली जातील; आणि ते तलम रेशमाची किनखाबाची हिरवी (हिरवी) वस्त्रे ल्यालेले असतील व (तेथे सिंहासनावर टेक) लावून (खुशाल बसलेले) असतील. (कितीतरी) उत्कृष्ट पुण्यफल हे ! आणि ऐपआरामाचे दृष्टीने (स्वर्गाची किती तरी) उत्तम शय्या ही ! - मं.४, सि.१५, सू.१८, आ.३१.

**(समीक्षक)** छान ! कुराणातला स्वर्ग काय बहारदार आहे ! त्यात बागा, दागिने, कपडे, गाद्या-गिरद्या वगैरे गोष्टी विलासासाठी आहेत. वाहवा ! कोणीही बुद्धिमान माणूस विचार करील तर त्याला असे आढळून येईल की, इहलोकातील चैनीच्या व विलासाच्या गोष्टीहून मुसलमानांच्या स्वर्गात अधिक असे काहीच नाही. तेथे असणारी विशेष गोष्ट म्हणजे अन्याय ही होय. त्यांच्या कर्मांना अंत असतो. परंतु त्या कर्मांची फळे अनंत काळपर्यंत चालत राहातात. रोज-रोज गोड धोड खाल्ले तर थोड्याच दिवसांत त्याचा वीट येतो आणि मिष्टान्न हे विषवत वाटू लागते. मुसलमानांच्या स्वर्गात त्यांना कायम सुख भोगावे लागते. त्यामुळे त्यांना ते सुखच दु:खासारखे वाटत असणार. म्हणून महाकल्पापर्यंत मुक्तीचे सुख भोगून पुनर्जन्म घेणे हाच सिद्धांत खरा आहे. ॥१०६॥

(१०७) आणि (आद व समूद वगैरे घराण्यांच्या) ह्या वस्त्या (की ज्या तुम्ही अरब लोक सीरिया देशाच्या मार्गावर ओसाड पडलेल्या पाहता त्या) जेव्हा त्यांनीही शिरजोरी केली तेव्हा आम्ही त्यांचा संहार करून टाकला आणि त्यांच्या संहाराचीही आम्ही एक वेळ मुक्रर केली होती. - मं.४, सि.१५, सू.१८, आ.५९.

**(समीक्षक)** संपूर्ण वस्तीच कधी पापी असू शकते काय ? आणि मग त्यांच्या विनाशाची प्रतिज्ञा खुदा करतो. याचा अर्थ जो सर्वज्ञ नाही. कारण त्यांचा अन्याय पाहिल्यावर त्याने प्रतिज्ञा केली. त्या आधी त्याला काहीच माहीत नव्हते. त्याच्या त्या कृत्यामुळे तो निर्दयीही ठरला. ॥१०७॥

## खुदा चे भयभित होणे

(१०८) आणि मुलगा (जो होता) त्याचे आई बाप उभयताही विश्वासू होते. तर आम्हांस अशी आशंका वाटली की, (असे न व्हावे, मोठा झाल्यावर) त्याने शिरजोरी व नास्तिकपणा करून त्या उभयतांस इजा द्यावी. येथपर्यंत की जेव्हा तो (चालता चालता) सूर्यास्त होण्याच्या जागी पोहचला तेव्हा त्याला असे आढळले की, सूर्य (जणू) काळ्या काळ्या चिखलाच्या कुंडात बुडतो आहे. त्या लोकांनी (आपल्या भाषेत) अर्ज केला की, हे जुलकरनैनो ! (या घाटाच्या पलीकडे) याजूज व माजूज (यांचे राष्ट्र आहे व ते लोक आमच्या) देशात येऊन नासाडी (वंडाळी) माजवितात. - मं.४, सि.१६, सू.१८, आ.८०,८६,९४.

**(समीक्षक)** पाहा ! हा खुदाचा केवढा अडाणीपणा आहे. मुलाचे आईबाप माझा वर्ग सोडून भलतीकडेच आपल्या विरुद्ध दिशेला जाणार नाहीत ना, या शंकेने तो घाबरला. ईश्वराच्या स्वभावाशी हे सुसंगत नाही. यानंतरचा त्याचा अडाणीपणा पाहा की, हा ग्रंथ रचणारा असे समजतो की, सूर्य रात्रीच्या वेळी एका तळ्यात बुडतो आणि सकाळी त्यातून बाहेर येतो. छान ! सूर्य तर पृथ्वीहून खूपच मोठा आहे. तो नदीत, तळ्यात किंवा समुद्रात कसा बुडू शकेल ? यावरून असे दिसून येते की, कुराण रचणाऱ्याला भूगोल-खगोल विद्येचे ज्ञान नव्हते. ते असते तर त्याने अशी विद्याविरोधी गोष्ट का लिहिली असती ? तसेच या ग्रंथावर श्रद्धा बाळगणाऱ्यांमध्येही विद्या नाही. जर ती असती तर अशा चुकीच्या गोष्टी असलेल्या पुस्तकाला त्यांनी का मानले असते ? आता खुदाचा अन्याय पाहा ! तो स्वतः पृथ्वीचा निर्माता, राजा, न्यायाधीश आहे. तरीही तो याजूज व माजूज यांना पृथ्वीवर बंडाळीही करू देतो. ही गोष्ट ईश्वरत्वाविरुद्ध आहे. म्हणून असल्या पुस्तकाला जंगली लोक मानतात. विद्वान लोक त्याला मुळीच मान्यता देत नाहीत. ॥१०८॥

(१०९) आणि (हे पैगंबरा !) कुराणात मर्यमची गोष्टही (लोकांस) आठवून दे की, जेव्हा ती आपल्या लोकांपासून एकीकडे होऊन पूर्वेकडेस एका जागी जाऊन बसली आणि तिने लोकांच्या पलीकडून गोषा करून घेतला. तो आम्ही आपला आत्मा (म्हणजे जिब्रील यास) तिजकडे पाठविले व तो संपूर्ण मनुष्याचे स्वरूप धारण करून तिजपुढे येऊन उभा राहिला. ती (त्याला पाहून) म्हणू लागली की, जर तू (परमेश्वराला) भिऊन वागणार असशील तर मी तुजपासून परम दयाळू (परमेश्वरा) चा आश्रय घेते. (की तू माझ्या समोरून निघून जा) (जिब्रीलने) म्हटले की, मी तर केवळ तुझ्या पालनकर्त्याने पाठविलेला (दूत) आहे. (व) यासाठी (आलो आहे) की, मी तुला एक पवित्र पुत्र अर्पण करावा. ती म्हणाली मला पुत्र होणार तरी कसा ? आणि वास्तविक पाहता (लग्नसंबंधाच्या नात्याने) मला कोणीही पुरुषाने स्पर्श केलेला नाही व मी (कधीच) जारकर्मीही नव्हते.

यावर मर्यमला (आपोआपच पुत्राचा) गर्भ राहिला व ती तो (गर्भ) घेऊन कोठे तरी अलग दूरचे जागी जाऊन बसली. - मं.४, सि.१६, सू.१९, आ.१६-२०, २२.

**(समीक्षक)** आता बुद्धिमान लोकांनी विचार करावा की, सगळे फरिश्ते (देवदूत) हे खुदाचे आत्मे आहेत. म्हणून ते खुदाहून वेगळे असू शकत नाहीत. मर्यम (मेरी) या कुमारीला मुलगा होणे हाही खुदाचा अन्याय आहे. वस्तुतः कोणाशी संभोग करण्याची तिला इच्छा नव्हती. परंतु खुदाच्या हुकुमावरून देवदूताने तिला गरोदर केले. ही गोष्ट न्यायाच्या विरुद्ध आहे. या ठिकाणी पुष्कळशा असभ्य गोष्टी लिहिलेल्या आहेत. परंतु त्यांचा उल्लेख करणे आम्हाला योग्य वाटत नाही. ॥१०९॥

(११०) (हे पैगंबरा!) काय तू (या गोष्टीचे) अवलोकन केले नाहीस की, आम्ही सैतानास नास्तिकांच्या मागे सोडून ठेवले आहे की, ते त्यांना फूस देऊन भडकवीत राहतात. - मं.४, सि.१६, सू.१९, आ.८३.

**(समीक्षक)** खुदाच सैतानास लोकांना भडकविण्यासाठी पाठवितो, तर त्यात भडकणाऱ्यांचा काही दोष असू शकत नाही. म्हणून त्यांना अथवा सैतानालाही शिक्षा केली जाऊ शकत नाही. कारण ते सारे खुदाच्या हुकुमावरूनच सर्व काही करतात. त्याचे फळ खुदालाच मिळाले पाहिजे. तो खुदा जर खरोखरी न्यायी असेल तर या दुष्कृत्याचे फळ जो नरक तो त्याने भोगला पाहिजे. तो न्यायाचा त्याग करून अन्याय करीत असेल तर तो अन्यायी ठरतो. अन्याय करणाऱ्यालाच पापी म्हणतात. ॥११०॥

(१११) आणि जो कोणी (पापापासून) अनुतप्त होईल व विश्वास धरील व सत्कृत्यही करील व मग सन्मार्गावर (कायम) राहील, तर त्या (च्या पापां) चाही मी मोठा क्षमाकर्ता आहे. - मं.४, सू.१६, सू.२०, आ.८२

**(समीक्षक)** तोबा (पश्चाताप) करण्याने पापाची क्षमा केली जाते असे कुराणात सांगितले आहे. ही गोष्ट सर्वांना पापी बनविणारी आहे. कारण पाप्यांना पाप करण्यास त्यामुळे खूप उत्तेजन मिळते. यावरून हे पुस्तक व ते रचणारा दोघेही पाप्यांना पाप करण्यास प्रोत्साहन देणारे आहेत, असे सिद्ध होते. म्हणून हे पुस्तक परमेश्वरकृत असू शकत नाही व त्यात वर्णन केलेला अल्ला हा परमेश्वर असू शकत नाही. ॥१११॥

(११२) आणि आम्हीच पृथ्वीमध्ये भारी पर्वत (योग्य त्या ठिकाणी) रोवले की, पृथ्वी लोकांसहित (एका बाजूला) कलून पडू नये. - मं.४, सि.१७, सू.२१, आ.३१.

**(समीक्षक)** कुराण रचणाऱ्याला पृथ्वीचे भ्रमण वगैरे गोष्टींचे ज्ञान असते तर डोंगरांनी धरून ठेवल्यामुळे पृथ्वी कलंडत नाही. असल्या गोष्टी त्याने कधीच लिहिल्या नसत्या. डोंगरांनी पृथ्वीला धरून ठेवले नसते तर ती डगमगली असती अशी शंका त्याच्या मनात उत्पन्न झाली. परंतु असे असूनही ती भूकंपाच्या वेळी का हादरते ? ॥११२॥

## कुरानमधील अश्लील गोष्टी

(११३) आणि त्या (मरियम) बाईची (आठवण कर की,) जिने आपली लाज सांभाळली (आपल्या वासनेवर काबू ठेवला) आणि आम्ही आमचा आत्मा तिच्यामध्ये फुंकला. - मं.४, सि.१७, सू.२१, आ.९१.

**(समीक्षक)** असल्या अश्लील गोष्टी ईश्वरीय ग्रंथात ईश्वराच्या संबंधातच नव्हे तर कोणाही सभ्य माणसाच्या

विषयीही लिहिल्या जात नाहीत. अशा गोष्टी लिहिणे माणसाच्या दृष्टीनेही चांगले समजले जात नाही तर मग परमेश्वरासमोर ते कसे चांगले असू शकेल ? असल्या गोष्टींनी कुराण दूषित झालेले आहे. कुराणात चांगल्या गोष्टी असत्या तर वेदांप्रमाणेच त्याचीही अत्यंत प्रशंसा झाली असती. ॥११३॥

(११४) (हे वाचक श्रोत्या !) काय तू या गोष्टीकडे नजर टाकली नाहीस की, जी (सृष्टी) पृथ्वीत आहे ती आणि सूर्य, चंद्र, नक्षत्रे, पर्वत, झाडे आणि चतुष्पाद जनावरे (सर्वच तर) परमेश्वरापुढे साष्टांग नमस्कार घालतात. (व) तेथे त्यांना सोन्याची कंकणे लेवविली जातील आणि (हार वगैरेंच्या आकाराने) मोती. तेथे त्यांचा (नेहमीचा) पोषाखही रेशमी असेल आणि माझ्या (या) घराला प्रदक्षिणा घालणारे व उभे राहणारे व ओणवे होऊन नमन करणारे आणि साष्टांग नमस्कार घालणारे (म्हणजे नमाज पढणारे) यांच्याकरिता पाक-साफ ठेव. नंतर आपला मळ उतरून टाकावा व आपले नवस पूर्ण करावेत आणि पुरातन (उपासनालय म्हणजे कावा) गृहाला प्रदक्षिणाही घालावी. त्याजवर (बळी देते वेळी) त्यांनी परमेश्वराचे नाव घ्यावे. - मं.४, सि.१७, सू.२२, आ.१८,२३,२६,२९,३४.

**(समीक्षक)** छान ! ज्या जड वस्तू आहेत त्या परमेश्वराला जाणू शकत नाहीत. मग त्या त्याची भक्ती कशा करतील ? यावरून हे पुस्तक ईश्वरकृत असूच शकत नाही. एखाद्या भ्रमिष्ट माणसाने ते रचले असावे, असे दिसते. वाहवा ! मोठा छान स्वर्ग आहे ! तेथे सोन्या-मोत्याचे दागिने आणि रेशमी कपडे घालायला मिळतात. म्हणजे हा स्वर्ग येथील राजेरजवाड्यांच्या महालाहून मुळीच वेगळा दिसत नाही. स्वर्ग हे परमेश्वराचे घर आहे. म्हणजे तो त्या घरात राहतही असला पाहिजे. मग ही मूर्तिपूजा होत नाही काय ? तर मग हे लोक इतर मूर्तिपूजकांचे खंडन का करतात ? खुदा भेटी स्वीकार करतो, आपल्या घराला प्रदक्षिणा घालण्याची आज्ञा देतो आणि पशू मारून खाऊ घालतो. असला हा खुदा देवळातील भैरव, दुर्गा वगैरे देवदेवतांसारखाच झाला आणि त्याने महामूर्तिपूजा सुरू केली असे म्हटले पाहिजे. कारण देवाच्या मूर्तिपेक्षा मशीद ही फार मोठी मूर्ती आहे. यावरून असे सिद्ध होते की, खुदा व मुसलमान हे मोठे मूर्तिपूजक असून पौराणिक व जैन हे छोटे मूर्तिपूजक आहेत. ॥११४॥

(११५) मग कयामतीच्या (पुनरुत्थानाच्या) दिवशी तुम्हाला (सर्वांना) उठवून उभे केले जाईल. - मं. ४, सि.१८, सू.२३, आ.१६.

**(समीक्षक)** पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत प्रेते थडग्यांमध्ये राहणार की इतर एखाद्या ठिकाणी ? जर ती थडग्यांत राहणार असतील तर कुजलेल्या दुर्गंधयुक्त शरीरामध्ये राहावे लागल्याने पुण्यात्म्यांनाही दुःख भोगावे लागेल. हा न्याय नसून अन्याय आहे. शिवाय प्रेते पुरण्याने सर्वत्र दुर्गंध पसरून रोगराई निर्माण होईल. त्याचे पाप खुदा व मुसलमान यांच्या माथी बसेल. ॥११५॥

(११६) की ज्या दिवशी त्यांच्याविरुद्ध यांच्या जिभा व यांचे हात-पाय यांच्या कार्याची साक्ष देतील. परमेश्वर (तेजानेच) आकाश व पृथ्वीचा प्रकाश होय. त्याच्या प्रकाशाची उपमा अशी आहे की, जशी एक मेहराब आहे (व) मेहराबीत एक दिवा (ठेवलेला आहे, आणि) दिवा एका काचेच्या कंदिलात आहे आणि

कंदिल (इतका पारदर्शक व चकचकीत आहे,) जणू की तो मोत्याप्रमाणे चकाकता असा एक ताराच आहे. (तो दिवा) जैतून (ऑलिव्ह) च्या एका आशीर्वादित झाडा (च्या तेला) ने जाळला जातो की ते पूर्वेकडेही नाही व पश्चिमेकडेही नाही. त्याचे तेल (इतके स्वच्छ आहे की) जरी त्याला अग्नी स्पर्शही न करील तरीही असे वाटते की ते (आपोआप) प्रकाशू लागेल. प्रकाशावर प्रकाश होय. परमेश्वर आपल्या प्रकाशाकडे ज्याला इच्छितो त्याला मार्ग दाखवितो. - मं.४, सि.१८, सू.२४, आ.२४, ३५.

**(समीक्षक)** हात, पाय वगैरे अवयव जड (अचेतन) असल्यामुळे ते कधीही साक्ष देऊ शकत नाहीत. ही गोष्ट सृष्टिक्रमाच्या विरुद्ध असल्यामुळे मिथ्या आहे. खुदा हा आग किंवा वीज आहे काय? कुराणामध्ये हा जो दृष्टांत दिला आहे तो ईश्वराला लागू पडत नाही. असले दृष्टांत साकार वस्तूंना लागू होऊ शकतात. ॥११६॥

(११७) आणि परमेश्वरानेच सर्व (चालत्या फिरत्या) प्राण्यांस पाण्यापासून निर्माण केले आहे. तर (कित्येक) त्यातून असे आहेत की, जे आपल्या पोटावर चालतात; आणि जो कोणी परमेश्वराचा हुकूम मानील, सांग की, परमेश्वराचा हुकूम माना आणि पैगंबराचा हुकूम माना. पैगंबराच्या सांगण्याप्रमाणे चला. कदाचित तुम्हांवर दया केली जाईल. -मं.४, सि.१८, सू.२४, आ.४५, ५२, ५४, ५६.

**(समीक्षक)** ज्या प्रांण्यांच्या शरीरात सर्व मूलतत्त्वे (पंचमहाभूते) दिसतात त्यांना केवळ पाण्यापासून उत्पन्न केले असे सांगणे हे कुठले तत्त्वज्ञान? हा तर निव्वळ अडाणीपणा आहे. अल्ला बरोबर पैगंबराच्याही आज्ञेचे पालन करावे लागते. म्हणजे तो खुदाचा भागीदार झाला की नाही? असे आहे तर मग खुदा एकमेवाद्वितीय आहे असे कुराणात का लिहिले आहे व तुम्ही तसे का म्हणता? ॥११७॥

(११८) आणि ज्या दिवशी आकाश फाटून ढग दिसू लागेल आणि (त्या ढगातून) देवदूताचे घोळकेच्या घोळके (जमिनीवर) उतरविले जातील. तर (हे पैगंबरा!) तू नास्तिकांचे सांगणे मानू नकोस आणि कुराणा (च्या प्रमाणा) ने त्यांच्या मोठ्या जोराने झटून सामना कर. अशा लोकांची पापे, परमेश्वर सत्कृत्यात बदलून टाकील आणि जो कोणी पश्चाताप करील व (त्यानंतर तो) सत्कृत्यही करील, तर तो खरोखरी परमेश्वराकडे वळतो. - मं.४, सि.१९, सू.२५, आ.२५, ५२, ७०, ७१.

**(समीक्षक)** आकाश ढगांनी फाटले जाईल, ही गोष्ट कधीही खरी असू शकत नाही. आकाश हा एखादा मूर्तिमंत पदार्थ असता तर ते फाटू शकले असते. मुसलमानांचे हे कुराण शांतताभंग करून भांडणतंटे वाढविणारे आहे. म्हणून धार्मिक विद्वान् लोक ते मानीत नाहीत. पापपुण्यांची अदलाबदल होणे हाही खासा न्याय आहे. तीळ आणि उडीद यांच्यासारखे पापपुण्य हे काय अदलाबदली करता येणारे पदार्थ आहेत? तोबा (पश्चाताप) केल्याने पापे नाहीशी होऊन ईश्वरप्राप्ती होत असेल तर कोणीही पाप करायला घाबरणार नाही. म्हणून या सगळ्या गोष्टी ज्ञानविरोधी आहेत. ॥११८॥

(११९) आणि आम्ही मूसाकडे आदेश पाठविला की, तू माझ्या सेवका (म्हणजे बनी इसराईला) स रातेरात घेऊन नीघ. (कारण) तुमचा पाठलाग केला जाणार आहे. यावर फिरऔनने (लोकसमुदाय गोळा करण्यासाठी) शहरात जासूद पाठवून दिले. ज्याने मला उत्पन्न केले; मग तोच (धर्मसंसाराच्या विघ्नांत) मला

मार्ग दाखवितो आणि जो मला खाऊ घालतो व जो मला (पाणी) पाजतो; आणि जो (क्षमाकर्ता, दयाळू आहे व त्याच्यापासून) मला तर आशा आहे की तो निवाड्याच्या दिवशी मला माझे अपराध क्षमा करील. - मं.५, सि.१९, सू.२६, आ.५२, ५३, ७८, ७९, ८२.

**(समीक्षक)** जर खुदाने मूसाला ईश्वरी आदेश पाठविला होता तर मग पुन: दाऊद, येशू व मुहम्मद यांना वेगवेगळी पुस्तके का पाठविली ? कारण परमेश्वराची उक्ती व कृती ही सदैव एकसारखी व अचूक असते. अशा स्थितीत त्याने कुराणापर्यंत जी पुस्तके पाठविली याचा अर्थ त्या आधी पाठविलेली पुस्तके अपूर्ण व त्रुटिपूर्ण होती, असे समजावे लागेल. जर पूर्वीची तीन पुस्तके खरी असतील तर हे कुराण खोटे ठरते. कारण या चार पुस्तकांमध्ये परस्परविरोधी गोष्टी आहेत. त्या पूर्णपणे खऱ्या असू शकत नाहीत. जर खुदाने आत्मे म्हणजे जीव निर्माण केले असतील तर ते मरूनही जातील म्हणजे केव्हा ना केव्हा त्यांचा नाश होईल, अभावही होईल ? परमेश्वरच मनुष्यादी प्राण्यांना अन्नपाणी देत असेल तर कोणालाही रोग होता कामा नये; आणि सर्वांना समान खाण्यापिण्यास मिळाले पाहिजे. राजा व दरिद्री माणूस यांना जसे श्रेष्ठ व निकृष्ट अन्नपाणी मिळते तसे परमेश्वराकडून पक्षपाताने एकाला उत्तम अन्नपाणी व दुसऱ्याला निकृष्ट खाणेपिणे दिले जाता कामा नये. जर परमेश्वरच खाऊपिऊ घालीत असेल आणि पथ्यपाणी करवीत असेल तर कोणालाच कसलाही रोग-आजार होता कामा नये. परंतु मुसलमान वगैरे लोकांनाही रोग-आजार होत असतात. खुदा रोग दूर करून माणसाला निरोगी बनवत असेल तर मुसलमानांच्या शरीरात रोग राहताच कामा नये. तसा रोग राहत असेल तर खुदा चांगला वैद्य नाही. तो कुशल वैद्य असता तर मुसलमानांमध्ये रोगराई का झाली असती ? खुदाच मारीत असेल व जिवंत करीत असेल तर त्याचे पापपुण्य त्या खुदालाच लागत असणार. जर तो जन्म-जन्मांतराच्या कर्मानुसार व्यवस्था करीत असेल तर त्याच्या हातून कसलाच अपराध घडत नाही. तो योग्य तेच करतो. पण जर तो पापाला क्षमा करीत असेल आणि कयामतीच्या रात्री न्यायनिवाडा करीत असेल तर तो खुदा पाप वाढविणारा व पापयुक्त ठरेल. तो क्षमा करीत नसेल तर कुराणातील वचन खोटे आहे असे म्हणण्याशिवाय गत्यंतर नाही. ॥११९॥

(१२०) तूही आमच्यासारखाच मनुष्य आहेस. तू जर खरा असशील तर आम्हाला एखादा चमत्कार करून दाखव. (सालेहाने) सांगितले, ही सांडणी (हाच चमत्कार) होय. हिची पाणी प्यायची (एक दिवसाची) पाळी आहे. - मं.५, सि.१९, सू.२६, आ.१५४, १५५.

**(समीक्षक)** दगडातून सांडणी निघाली या गोष्टीवर कोणी विश्वास ठेवू शकेल काय ? ज्यांनी तसा विश्वास ठेवला ते लोक जंगली होते. सांडणीची खूण देणे हा केवळ जंगली लोकांचा व्यवहार आहे. ते ईश्वरी कृत्य असू शकत नाही. जर हा ग्रंथ ईश्वरकृत असता तर असल्या निरर्थक गोष्टी त्यात आल्या नसत्या. ॥१२०॥

(१२१) हे मूसा ! हा तर मी परमेश्वर आहे. सामर्थ्यवान (व) बुद्धिमान: आणि तू आपली काठी (खाली) टाकून दे; तर जेव्हा (मूसाने) पाहिले की काठी (अशातऱ्हेने) वळवळत आहे की जणू तो (जिवंत) सापच होता. तेव्हा त्याने पाठ फिरवून पळ काढला व मागे (वळूनही) पाहिले नाही. (आम्ही आज्ञापिले) हे मूसा भिऊ नकोस. माझ्या हुजुरात (येऊन) पैगंबर (समाधान पावतात व) भीत नाहीत. परमेश्वर (असा परमपवित्र आहे

की) त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. (आणि) तोच महान अर्शा (च्या सिंहासना) चा मालक होय. (आणि परमेश्वराच्या नावानंतर) हे की माझ्यापुढे शिरजोरी करु नका आणि आज्ञाधीन होऊन माझ्यासमोर हजर व्हा. - मं.५, सि.१९, सू.२७, आ.९, १०, २६, ३१.

**(समीक्षक)** ही पाहा मुसलमानांच्या परमेश्वराची आत्मश्लाघा. अल्ला स्वतःच्या मुखानेच आपला मोठेपणा सांगतो. आत्मस्तुती करणे हे श्रेष्ठ पुरुषाचे काम नव्हे; मग ते खुदाचे कसे असू शकेल ? म्हणून तर जादूचे प्रयोग दाखवून खुदाने जंगली लोकांना भूरळ घातली व तो स्वतःच जंगलाचा ईश्वर बनून बसला. असली गोष्ट ईश्वरीय ग्रंथात कधीच असू शकत नाही. जर तो मोठ्या अर्शचा म्हणजे सातव्या अस्मानचा (आकाशाचा) मालक असेल तर एकदेशी ठरतो व म्हणून ईश्वर असू शकत नाही. बंडखोरी करणे ही वाईट गोष्ट असेल तर खुदा आणि मुहम्मद साहेब यांनी आपल्याच स्तुतीने कुराण का भरून टाकले ? खुदाच्या चिथावणीने मुहम्मद साहेबांनी अनेक लोकांना ठार मारले. ती बंडखोरी झाली की नाही ? हे कुराण पुनरुक्ती आणि परस्परविरोधी गोष्टी यांनी भरलेली आहे. ॥१२१॥

(१२२) आणि (हे वाचका, श्रोत्या !) तू पर्वतांस पाहून विचार करतोस की ते (आपल्या जागी) पाय रोवून उभे आहेत. (बदलू शकत नाहीत) पण (पुनरुत्थानाच्या दिवशी) हे (पर्वत) ढग चालतात तसे चालू लागतील. हीही परमेश्वराची कारागिरी (होय) की, ज्याने प्रत्येक वस्तू खूप भक्कम बनविली आहे. निःसंशय जे काही तुम्ही (लोक) करिता त्याच्याशी तो खूप परिचित (खबरदार) आहे. - मं.५, सि.२०, सू.२७, आ.८८

**(समीक्षक)** छान ! ढगांप्रमाणे पर्वत चालतात, ही गोष्ट कुराणवाल्यांच्या देशात घडत असेल. इतरत्र ती घडत नाही आणि खुदाची खबरदारी त्याने बंडखोर सैतानाला पकडले नाही आणि शिक्षा दिली नाही. याहून अधिक गाफिलपणा तो कोणता ? ॥१२२॥

(१२३) म्हणून मूसाने त्या (च्या शत्रू) स ठोसा मारला व (तेथेच) त्याचा निकाल लावून टाकला. (आणि मूसाने त्यावेळी) प्रार्थना केली की, हे माझ्या पालनकर्त्या ! (हा तर) मी आपल्यावर (मोठाच) जुलूम केला. तर तू माझ्या अपराधाबद्दल क्षमा कर. सारांश, परमेश्वराने त्याच्या अपराधाची क्षमा केली. (आणि) तो (फारच) क्षमाकर्ता (व) दयाळू आहे आणि (हे पैगंबरा !) तुझा पालनकर्ता जसे इच्छितो तसे लोक उत्पन्न करतो व (त्यांच्यातून ज्याला इच्छितो त्याला) निवडून देतो. - मं.५, सि.२०, सू.२८, आ.१५, १६, ६८.

**(समीक्षक)** आता आणखी असे पाहा की, खिस्ती व मुसलमान यांचा देव (खुदा) कसा वागतो. पैगंबर मूसा माणसाची हत्या करतो आणि खुदा त्याला क्षमा करतो. म्हणजे ते दोघेही अन्यायी आहेत की नाही ? खुदा आपल्या इच्छेनेच मनाला वाटेल तशी उत्पत्ती करतो काय ? त्याने आपल्या इच्छेनेच एकाला राजा, दुसऱ्याला दरिद्री आणि एकाला विद्वान व दुसऱ्याला अडाणी बनविले काय ? जर तसे असेल तर कुराण सत्य असू शकत नाही आणि खुदा अन्याय करणारा असल्यामुळे ईश्वर असू शकत नाही. ॥१२३॥

(१२४) आणि आम्ही माणसाला आपल्या आईबापांशी चांगले वर्तन करण्याची आज्ञा केली आणि (हेही समजावून दिले की) जर आईबाप तुझ्यामागे ह्यासाठी झटतील की तू अशा एखाद्याला माझा जोडीदार

मानावेस की, ज्या (च्या ईश्वरी जोडीदार होण्या) चे तुजपाशी कोणतेही ज्ञान (युक्त प्रमाण) च नाही; तर (या गोष्टीत) तू त्यांचे सांगणे मानू नकोस. तुम्हा (सर्वां) स मजकडे परतून येणे आहे आणि आम्ही नूहला त्याच्या लोकांकडे (पैगंबर करून) पाठविले; तर तो पन्नास वर्षे कमी हजार वर्षे त्या (लोकांत) राहिला. - मं.५, सि.२०-२१, सू.२९, आ.८, १४.

**(समीक्षक)** आईबापांची सेवा करणे चांगले आहे. आम्हाला देवासमान किंवा प्रतिपरमेश्वर माना असे त्यांनी सांगितले तर त्यांचे म्हणणे न ऐकणे हेही योग्यच होय. परंतु आईबापांनी खोटे बोलण्यासारख्या वाईट गोष्टी करायला सांगितल्या तर त्यांची ती आज्ञा पाळली पाहिजे काय ? म्हणून हे वचन अर्धे चांगले व अर्धे वाईट आहे. नूह (नोहा) वगैरे पैगंबरांनाच खुदा जगात पाठवितो काय ? मग इतर जीवांना कोण पाठवितो ? जर सर्वांना तोच पाठवीत असेल तर सगळेच पैगंबर का होत नाहीत ? आणि जर जुन्या काळी माणसांचे आयुष्य हजार वर्षांचे होते तर आता तेवढे आयुष्य का असत नाही ? म्हणून ही गोष्ट बरोबर नाही. ॥१२४॥

(१२५) परमेश्वरच सृष्टीस प्रथम निर्माण करतो; व नंतरही तोच (याच तऱ्हेची) सृष्टी दुसऱ्यांदा निर्माण करतो. नंतर तुम्ही (सर्व लोक) त्याच्याकडे पालटून नेले जाल; आणि त्यादिवशी (पुनरुत्थानाची) घटका कायम होईल त्यादिवशी पापी लोक निराश होऊन जातील. मग ज्यांनी विश्वास धरला व चांगली कामेही केली, ते तर (स्वर्गाच्या) बागेत असतील व आनंदी आनंद पावत असतील आणि जर आम्ही (असा) वारा चालवू व हे लोक शेत पिवळे (पडलेले) पाहतील, जे लोक समज बाळगीत नाहीत त्यांच्या मनावर परमेश्वर अशाच तऱ्हेने मोहर लावून टाकीत असतो. - मं.५, सि.२१, सू.३०, आ.११,१२,१५,५१,५९.

**(समीक्षक)** अल्ला सृष्टीची उत्पत्ती दोनदा करतो, तिसऱ्यांदा करीत नाही, हे खरे असेल तर पहिल्या उत्पत्तीच्यापूर्वी आणि दुसऱ्या उत्पत्तीच्यानंतर तो रिकामा बसून राहत असणार; आणि एक-दोनदा उत्पत्ती केल्यानंतर त्याचे सामर्थ्य संपून जात असणार अथवा निरर्थक होत असणार. न्यायनिवाड्याच्या दिवशी पापी लोक निराश होत असतील तर ती चांगली गोष्ट आहे. परंतु याचा अर्थ असा तर नव्हे ना की मुसलमानांखेरीज इतर सर्वांना पापी समजून निराश केले जाईल ? कारण कुराणामध्ये अनेक ठिकाणी मुस्लिमेतरांनाच पापी असे म्हटलेले आहे. बागेत ठेवणे आणि दागदागिन्यांनी सजविणे हाच मुसलमानांचा स्वर्ग असेल तर तो इहलोकासारखाच झाला. तेथे माळी व सोनारही असतील अथवा खुदाच माळी, सोनार वगैरेंची कामे करीत असेल. एखाद्याला कमी दागिने मिळाले तर चोरीही केली जात असेल आणि मग चोरी करणाऱ्यांना खुदा स्वर्गातून नरकातही पाठवित असेल. असे होत असल्यास, 'सदैव स्वर्गात राहाल', हे खुदाचे आश्वासन खोटे ठरेल. शेतकऱ्यांच्या शेतीवरही खुदाची दृष्टी आहे. ही विद्या शेती करण्याच्या अनुभवातूनच प्राप्त होत असते. खुदाने आपल्या ज्ञानाच्या जोरावर सगळ्या गोष्टी जाणून घेतल्या असतील तर अशी भीती घालणे म्हणजे घमेंड दाखविणेच आहे. अल्लाने जीवांच्या अंत:करणांवर मोहर ठोकून त्यांच्याकडून पाप करविले असेल तर त्या पापाची जबाबदारी खुदावर आहे. ती जीवात्म्यांवर येऊ शकत नाही. ज्याप्रमाणे जय अथवा पराजय ही सेनापतीची जबाबदारी असते त्याप्रमाणे साऱ्या पापांची जबाबदारी खुदावरच येऊन पडते. ॥१२५॥

(१२६) ही (त्याच) पुस्तका (म्हणजे कुराणा) ची महावाक्ये होत की, ज्यांत बुद्धी (व शहाणपणा) च्या गोष्टी आहेत. त्यानेच आकाशाला (जसे) तुम्ही (लोक) पाहता (तसे) स्तंभाविना बनवून उभे केले आहे आणि (त्यानेच) पृथ्वीत (भारी अचल पर्वताचे) नांगर टाकले आहेत की ती (कोठे) तुम्हांसह (एकीकडे) कलून पडू नये. का तू या (गोष्टीवर) नजर केली नाहीस की, परमेश्वरच रात्री (च्या एका भाग) स दिवसात दाखल करतो आणि तोच दिवसाला रात्रीत दाखल करतो. का तू (या गोष्टीचे) अवलोकन केले नाहीस की, परमेश्वराच्याच कृपेने गलबत समुद्रात चालते, की आपल्या (परम सामर्थ्याच्या) कित्येक निशाण्या तुम्हा लोकांस दाखवाव्या.

- मं.५, सि.२१,सू.३१, आ.२, १०, २९, ३१.

**(समीक्षक)** वाहवा ! किती युक्तियुक्त आहे हा ग्रंथ ! त्यामध्ये विज्ञानाच्या विरुद्ध असणाऱ्या गोष्टी किती ठामपणे सांगितल्या आहेत पाहा. आकाशाची उत्पत्ती, त्याला खांबाचा आधार असण्याची शंका आणि पृथ्वीला स्थिर ठेवण्यासाठी पर्वताची आवश्यकता वगैरे गोष्टी किती हास्यास्पद आहेत ! ज्याला थोडीफार विद्या अवगत झाली असेल त्याने असले लिखाण कधीच केले नसते आणि त्यावर विश्वास ठेवला नसता. जेथे दिवस असतो तेथे रात्र नसते व जेथे रात्र तेथे दिवस नसतो. या दोन अवस्थांचा एकमेकींमध्ये प्रवेश करण्याचा उल्लेख केला आहे. ही अत्यंत अडाणीपणाची गोष्ट आहे. त्यामुळे कुराण हे ज्ञानाचे पुस्तक असू शकत नाही. नौका माणसांकडून क्रियाकौशल्याने चालविल्या जातात की, त्या खुदाच्या कृपेने चालतात ? त्या ईश्वरी कृपेने चालतात असे लिहिणे ही ज्ञानविरोधी गोष्ट नव्हे काय ? लोखंडाची किंवा दगडाची नौका बनवून ती समुद्रात सोडली तर ती खुदाची निशाणी असली तरी बुडेल की नाही ? याचा अर्थ असा की, हे पुस्तक कोणाही विद्वानाने अथवा ईश्वराने रचलेले असू शकत नाही. ॥१२६॥

(१२७) आकाशापासून (ते) पृथ्वीपर्यंत तोच (प्रत्येक) कामाची व्यवस्था लावतो. मग तुम्हा लोकांच्या (इहलौकिक) गणनेच्या (अनुरोधाने) हजार वर्षांच्या मुदतीचा एक दिवस होईल. हाच (तर परमेश्वर अदृष्ट व दृष्ट अशा सर्व) गोष्टींचा ज्ञाता, परम समर्थ (व) दयाळू (असा आहे) व मग त्याने त्या (च्या पुतळ्या) स दुरुस्त बनविले व त्यात आपल्या आत्म्यास फुंकले. सांग की, मृत्यूचा दूत ज्याला तुम्हावर नेमलेले आहे तोच तुमचे प्राण हरण करतो आणि जर आम्ही इच्छिले तर प्रत्येक मनुष्याला सद्बुद्धी देतो; परंतु गोष्ट सिद्ध होऊनच राहिली की 'जिन्न', दैवत व मनुष्ये या सर्वांनीही मी 'जहन्नम' (नरक) भरून टाकीन. - मं.५, सि.२१, सू.३२, आ.५, ६, ९, ११, १३.

**(समीक्षक)** आता हे पूर्णपणे सिद्ध झाले की, मुसलमानांचा खुदा माणसासारखा एकदेशी आहे. कारण तो सर्वव्यापक असता तर तो एका ठिकाणाहून सर्व व्यवस्था पाहोणे आणि चढणे-उतरणे या गोष्टी का करीत राहिला असता ? खुदा देवदूतांना पाठवीत असेल तरीही तो एकदेशीच ठरतो. तो स्वत: आकाशात लोंबकळत बसला आहे आणि देवदूतांना धावपळ करायला लावतो आहे. देवदूतांनी लाच घेऊन एखादा घोटाळा केला किंवा एखाद्या मृताला सोडून दिले तर खुदाला काय कळणार ? जो सर्वज्ञ व सर्वव्यापक असेल त्यालाच या गोष्टी कळणार. पण तो काही तसा नाही. तो तसा असता तर देवदूतांना पाठविण्यांची आणि अनेक लोकांची अनेक

(१२६) ही (त्याच) पुस्तका (म्हणजे कुराणा) ची महावाक्ये होत की, ज्यांत बुद्धी (व शहाणपणा) च्या गोष्टी आहेत. त्यानेच आकाशाला (जसे) तुम्ही (लोक) पाहता (तसे) स्तंभाविना बनवून उभे केले आहे आणि (त्यानेच) पृथ्वीत (भारी अचल पर्वताचे) नांगर टाकले आहेत की ती (कोठे) तुम्हांसह (एकीकडे) कलून पडू नये. का तू या (गोष्टीवर) नजर केली नाहीस की, परमेश्वरच रात्री (च्या एका भाग) स दिवसात दाखल करतो आणि तोच दिवसाला रात्रीत दाखल करतो. का तू (या गोष्टीचे) अवलोकन केले नाहीस की, परमेश्वराच्याच कृपेने गलबत समुद्रात चालते, की आपल्या (परम सामर्थ्याच्या) कित्येक निशाण्या तुम्हा लोकांस दाखवाव्या.

-मं.५, सि.२१,सू.३१, आ.२, १०, २९, ३१.

**(समीक्षक)** वाहवा ! किती युक्तियुक्त आहे हा ग्रंथ ! त्यामध्ये विज्ञानाच्या विरुद्ध असणाऱ्या गोष्टी किती ठामपणे सांगितल्या आहेत पाहा. आकाशाची उत्पत्ती, त्याला खांबाचा आधार असण्याची शंका आणि पृथ्वीला स्थिर ठेवण्यासाठी पर्वताची आवश्यकता वगैरे गोष्टी किती हास्यास्पद आहेत ! ज्याला थोडीफार विद्या अवगत झाली असेल त्याने असले लिखाण कधीच केले नसते आणि त्यावर विश्वास ठेवला नसता. जेथे दिवस असतो तेथे रात्र नसते व जेथे रात्र तेथे दिवस नसतो. या दोन अवस्थांचा एकमेकींमध्ये प्रवेश करण्याचा उल्लेख केला आहे. ही अत्यंत अडाणीपणाची गोष्ट आहे. त्यामुळे कुराण हे ज्ञानाचे पुस्तक असू शकत नाही. नौका माणसांकडून क्रियाकौशल्याने चालविल्या जातात की, त्या खुदाच्या कृपेने चालतात ? त्या ईश्वरी कृपेने चालतात असे लिहिणे ही ज्ञानविरोधी गोष्ट नव्हे काय ? लोखंडाची किंवा दगडाची नौका बनवून ती समुद्रात सोडली तर ती खुदाची निशाणी असली तरी बुडेल की नाही ? याचा अर्थ असा की, हे पुस्तक कोणाही विद्वानाने अथवा ईश्वराने रचलेले असू शकत नाही. ॥१२६॥

(१२७) आकाशापासून (ते) पृथ्वीपर्यंत तोच (प्रत्येक) कामाची व्यवस्था लावतो. मग तुम्हा लोकांच्या (इहलौकिक) गणनेच्या (अनुरोधाने) हजार वर्षांच्या मुदतीचा एक दिवस होईल. हाच (तर परमेश्वर अदृष्ट व दृष्ट अशा सर्व) गोष्टींचा ज्ञाता, परम समर्थ (व) दयाळू (असा आहे) व मग त्याने त्या (च्या पुतळ्या) स दुरुस्त बनविले व त्यात आपल्या आत्म्यास फुंकले. सांग की, मृत्यूचा दूत ज्याला तुम्हावर नेमलेले आहे तोच तुमचे प्राण हरण करतो आणि जर आम्ही इच्छिले तर प्रत्येक मनुष्याला सद्‌बुद्धी देतो; परंतु गोष्ट सिद्ध होऊनच राहिली की 'जिन्न', दैवत व मनुष्ये या सर्वांनीही मी 'जहन्नम' (नरक) भरून टाकीन. -मं.५, सि.२१, सू.३२, आ.५, ६, ९, ११, १३.

**(समीक्षक)** आता हे पूर्णपणे सिद्ध झाले की, मुसलमानांचा खुदा माणसासारखा एकदेशी आहे. कारण तो सर्वव्यापक असता तर तो एका ठिकाणाहून सर्व व्यवस्था पाहोणे आणि चढणे-उतरणे या गोष्टी का करीत राहिला असता ? खुदा देवदूतांना पाठवीत असेल तरीही तो एकदेशीच ठरतो. तो स्वत: आकाशात लोंबकळत बसला आहे आणि देवदूतांना धावपळ करायला लावतो आहे. देवदूतांनी लाच घेऊन एखादा घोटाळा केला किंवा एखाद्या मृताला सोडून दिले तर खुदाला काय कळणार ? जो सर्वज्ञ व सर्वव्यापक असेल त्यालाच या गोष्टी कळणार. पण तो काही तसा नाही. तो तसा असता तर देवदूतांना पाठविण्यांची आणि अनेक लोकांची अनेक

प्रकारे परीक्षा घेण्याची काय गरज होती ? त्याने पाठविलेल्या देवदूतांना परत आणण्याची व्यवस्था करण्यास त्याला एक हजार वर्षे लागतात. यावरून तो सर्वशक्तिमान नाही हे सिद्ध होते. एखादा दूत मृत्यूदूत असेल तर त्या दूताला मारणारा कोणता मृत्यू आहे ? जर तो अमर असेल तर अमरत्वाच्या बाबतीत तो खुदाचा सहभागी किंवा ईश्वरतुल्य ठरतो. एक देवदूत एकाच वेळी नरक भरण्यासाठी जीवांना उद्युक्त करू शकत नाही आणि त्या लोकांनी काही पाप केलेले नसताना आपल्या मर्जीनुसार त्यांना नरकात ढकलून जो त्यांना दु:ख देतो व गंमत पाहतो तो खुदा अन्यायी व निर्दय आहे. अशा गोष्टी ज्या पुस्तकात असतील ते एखाद्या विद्वानाने अथवा ईश्वराने लिहिलेले असणे शक्य नाही आणि जो दयाहीन व न्यायहीन आहे, तो कधीच ईश्वर असू शकत नाही. ॥१२७॥

(१२८) सांग की, जर तुम्ही मृत्यू किंवा मारले जाण्या (च्या भीती) ने पळून जाल तर (हे पळून जाणे) तुम्हांस केव्हाच (काहीही) फायदा देणार नाही. अहो पैगंबराच्या पत्न्यांनो ! तुमच्यातून जी कोणी एखादी उघडउघड गैरशिस्त वर्तणूक करील तिला दुहेरी शिक्षा दिली जाईल आणि परमेश्वरासमीप ही (एक) सोपीशी (गोष्ट) होय. - मं.५, सि.२१, सू.३३, आ.१६, ३०.

**(समीक्षक)** लढाईच्या वेळी कोणी पळून जाऊ नये, आपला विजय व्हावा, मरणाला कोणी भिऊ नये, आपले ऐश्वर्य वाढावे व आपल्या पंथाचा प्रसार व्हावा म्हणून हे मुहमद साहेबांनी लिहिले-लिहविले असावे आणि पत्न्यांनी गोषा न करता निर्लज्जपणे येऊ नये असे म्हणावयाचे असेल तर पैगंबर साहेबांनी स्वत: तसे का करावे ? (म्हणजे गोषा न घेता बाहेर का यावे ?) या गुन्ह्याबद्दल पत्न्यांना शिक्षा व्हावी आणि पैगंबरसाहेबांनी सहीसलामत सुटून जावे हा कुठला न्याय ? ॥१२८॥

(१२९) आणि आपल्या घरात बसून राहा. (आपला शृंगार इतरांना दाखवीत फिरू नका.) अल्ला आणि रसूल यांच्या आज्ञेचे पालन करा. त्यांच्याखेरीज इतरांची आज्ञा मानू नका. मग जेव्हा जैदने तिजकडून (आपला) हितसंबंध सोडून दिला. (म्हणजे तिला काडी मोडून दिली) तेव्हा आम्ही तुझ्याशी तिचा विवाह लावून दिला; की जेणेकरून (सर्व) मुसलमानांचे दत्तक जेव्हा आपल्या स्त्रियांकडून हितसंबंध सोडून देतील तेव्हा मुसलमानांस त्यांच्या (सोडलेल्या) स्त्रियां (शी लग्न करून घेण्या) त (कोण्याही तऱ्हेची) अडचण राहू नये आणि परमेश्वराचा हुकूम तर पुरा होऊनच राहतो. परमेश्वराने पैगंबरासाठी जी गोष्ट ठरवून दिली असेल ती (करण्या) त पैगंबरास काही हरकत नाही. मुहम्मद तुमच्या पुरुषांतून कोणाचाही बाप नाही; आणि कोणतीही मुसलमान स्त्री जर ती आपल्या जीवाला पैगंबरास अर्पण करून टाकील (म्हणजे स्त्रीधनावाचून विवाहसंबंधात येऊ इच्छिल) तर (ही गोष्ट) खास तुझ्यासाठीच आहे. तू आपल्या स्त्रियांतून जिला इच्छिशील, (व तिला आपल्यापासून) अलग राखावेस आणि जिला इच्छिशील (तिला) तू आपल्याजवळ राखावेस, तर (यातही) तुजवर काही पाप नाही. अहो मुसलमानांनो ! पैगंबराच्या घरात शिरत जाऊ नका. - मं.५, सि.२२, सू.३३, आ.३३, ३७, ३८, ४०, ५०, ५१, ५३.

**(समीक्षक)** स्त्रीने घरात कैद्याप्रमाणे आणि पुरुषांनी मोकळेपणाने वावरावे ही अत्यंत अन्यायाची गोष्ट आहे. शुद्ध हवेत श्वास घ्यावा, देशामध्ये भ्रमण करावे, सृष्टीतील अनेक गोष्टी पाहाव्या अशी इच्छा स्त्रियांच्या

मनात उत्पन्न होत नसेल काय ? या अपराधामुळेच मुसलमानांची मुले विशेषकरून उनाडटप्पू व विषयासक्त असतात. अल्ला आणि रसूल यांच्या आज्ञा परस्परविरोधी व विसंगत आहेत की सुसंगत ? जर त्या एकच व सुसंगत असतील तर दोघांच्या आज्ञेचे पालन करा, असे सांगणे निरर्थक आहे आणि जर त्या परस्परविरोधी व वेगवेगळ्या असतील तर त्यांतील एक खरी व दुसरी खोटी असणार. म्हणजे एकजण खुदा व दुसरा सैतान आहे असे ठरेल. तरीही तो ईश्वराचा भागीदार किंवा प्रतिईश्वर ठरेल. कुराणातील खुदा, पैगंबर व कुराण यांची धन्य होय. ज्याला दुसऱ्याचे हित नष्ट करून आपला स्वार्थ साधणे इष्टा वाटते तो त्या दृष्टीने डावपेच करतो. या आयतीवरून मुहम्मदसाहेब अत्यंत विषयासक्त होते असे सिद्ध होते. जर ते तसे नसते तर त्यांनी आपल्या दत्तक मुलाच्या बायकोला म्हणजे स्वतःच्या सुनेला आपली बायको कशी बनवली असती ? असल्या गोष्टी करणाऱ्याच्या बाबतीत खुदाही पक्षपाती बनला आणि त्याने अन्यायाला न्याय ठरविले. जंगली लोकही आपल्या सुनेशी लग्न करीत नाहीत. खुदाने पैगंबराला विषयासक्त बनून कामुक चाळे करण्यास मुळीच प्रतिबंध केला नाही, ही केवळ भयंकर अन्यायाची गोष्ट आहे ! जर नबी हा कोणाचा बाप नव्हता तर जैद हा कोणाचा दत्तक मुलगा होता ? आणि असे का लिहिले ? याचा अर्थ एवढाच की, जे पैगंबरसाहेब खुद्द आपल्या सुनेशी शरीरसंबंध ठेवण्यास कचरले नाहीत ते इतर बायकांच्या बाबतीत कसे काय दूर राहिले असतील ? एवढा धूर्तपणा वापरला असला तरी जी गोष्ट निंद्य आहे तिची निंदा झाल्याखेरीज राहत नाही. एखादी परस्त्री पैगंबरावर फिदा होऊन त्यांच्याशी लग्न करू इच्छित असेल तर तेही शास्त्रसंमत (हलाल) समजावयाचे काय ? पैगंबर वाटेल त्या बायकोला वाऱ्यावर सोडून देऊ शकतो परंतु पैगंबर अपराधी असला तरी त्यांच्या बायका त्याला सोडू शकत नाहीत ही तर महाअर्धमाची गोष्ट आहे. ज्याप्रमाणे पैगंबरांच्या घरात इतर कोणा पुरुषाने व्यभिचाराच्या विचाराने प्रवेश करू नये, त्याप्रमाणे पैगंबर साहेबांनीही कोणाच्या घरात प्रवेश करता कामा नये. नबींनी वाटेल त्याच्या घरात बेधडक घुसावे आणि तरीही ते सन्माननीय समजले जावेत काय ? असा कोण अंतःकरणाचा आंधळा आहे की, जो या कुराणाला ईश्वरकृत, मुहम्मद साहेबांना पैगंबर आणि कुराणोक्त ईश्वराला परमेश्वर मानू शकेल ? अशा तर्कशून्य, धर्मविरोधी गोष्टींनी युक्त असलेल्या या पंथाला (इस्लामला) अरबस्थान वगैरे देशातील लोकांनी कसे काय स्वीकारले ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. ॥१२९॥

(१३०) आणि तुम्हांस हे शोभत नाही की तुम्ही परमेश्वराच्या पैगंबरास इजा द्यावी आणि हेही (शोभत) नाही की, त्याच्या मागून कधीही तुम्ही त्याच्या स्त्रियांशी विवाह करावा. परमेश्वरासमीप ही मोठी (गैर) गोष्ट आहे. जे लोक परमेश्वर व त्यांचा पैगंबर यांस (कोणत्याही तऱ्हेची) इजा देतात त्यांच्यावर इहलोक व परलोक या (दोहों) त परमेश्वराचा शाप होय आणि जे लोक मुसलमान पुरुष व मुसलमान स्त्रिया यांस त्यांनी काही कसूर केल्यावाचून (उगीच तोहमत लावून) इजा देतात, तर ते (खोटे) तुफान व धडधडीत पाप यांचे ओझे (आपल्या मानेवर) लादून घेतात. (मग) त्यांची अशी दशा होईल की, (चोहोकडून) धुतकारलेले, जेथे मिळेल तेथे पकडले व मारून त्यांचे तुकडे तुकडे उडवून दिले तर हे आमच्या पालनकर्त्या ! त्यांना दुप्पट शिक्षा दे आणि त्यांना (मोठ्यात) मोठा शाप दे. - मं.५, सि.२२, सू.३३, आ.५३, ५७, ५८, ६१, ६८.

**(समीक्षक)** वाहवा ! खुदा आपले ईश्वरत्व धर्माला अनुसरून, समतेच्या स्वरूपात व्यक्त करीत आहे काय? उदाहरणार्थ, पैगंबराला कोणी दुःख देऊ नये, हे खुदाचे सांगणे योग्य आहे परंतु पैगंबरानेही इतरांना दुःख देऊ नये म्हणून त्याच्यावर काही निर्बंध लादणे हेही आवश्यक होते. तसे त्याने का केले नाही ? अल्लाला कोणी दुःख दिल्यास तो (आल्ला) ही दुःखी होतो काय ? तसे असेल तर तो ईश्वर असू शकत नाही. अल्ला आणि रसूल यांना दुःख देण्यास प्रतिबंध केल्याने अल्ला व रसूल हे मात्र वाटेल त्याला दुःख देण्यास मोकळे आहेत असे सिद्ध होत नाही काय ? मुसलमानांना व त्यांच्या बायकांना दुःख देणे जितके वाईट आहे. तितकेच मुस्लिमेतरांना दुःख देणेही नक्कीच वाईट आहे. ही गोष्ट जर ते मानीत नसतील तर ते पक्षपाती आहेत. साऱ्या जगात हाहाकार माजविणारा खुदा आणि त्याचा नबी दोघेही धन्य होत ! यांच्यासारखे निर्दय प्राणी जगात फारच थोडे असतील. मुस्लिमेतर लोक जेथे सापडतील तेथे त्यांना पकडावे व मारून टाकावे असे कुराणात सांगितले आहे. अशीच आज्ञा इतर पंथातील लोकांनी मुसलमानांच्या बाबतीत दिली तर ती गोष्ट मुसलमानांना आवडेल काय ? जो पैगंबर परमेश्वराकडे अशी प्रार्थना करतो की, ''तू मुसलमानांच्या दुप्पट दुःख मुस्लिमेतरांना दे.'' तो केवढा हिंसक असला पाहिजे, हीही पक्षपाताची, मतलब साधूपणाची (स्वार्थसाधूपणाची) व अत्यंत अधर्माची गोष्ट आहे. यामुळेच अजूनही मुसलमानांमधील पुष्कळसे लबाड व गुंड लोक असली कृत्ये करण्यास मुळीच मागे पुढे पाहत नाहीत. माणसाला चांगले शिक्षण मिळाले नाही तर तो पशू सारखाच जगतो, हे खरे आहे. ॥१३०॥

(१३१) आणि परमेश्वरच असा (परम समर्थ) आहे की, तो वारा चालवितो व वारा ढगांना उभारतो. मग ढगांना आम्ही अशा शहराकडे हाकून लावतो की, जे (पाण्याच्या अभावामुळे) मृत (म्हणजे पडीत पडलेले) आहे. मग आम्ही पावसाच्या द्वारे जमिनीस तिच्या मृत अवस्थेतून सजीव (व टवटवीत) करून टाकतो. अशाच प्रकारे (लोकांचेही पुनरुत्थानाच्यावेळी जिवंत) उठणे होईल की, त्याने आम्हांस आपल्या कृपेने राहणाऱ्या (अशा) घरात आणून उतरविले की, तेथे आम्हाला (कोणत्याही तऱ्हेचे) श्रम पोहचत नाहीत व येथे आम्हांस (कोणत्याही प्रकारचा) थकवा लागत नाही. - मं.५, सि.२२, सू.३५, आ.९, ३५.

**(समीक्षक)** वाहवा ! काय खुदाची फिलॉसाफी ! तो वाऱ्याला पाठवितो आणि ढगांना उठवून इकडे-तिकडे फिरवितो ! आणि खुदा त्याद्वारे प्रेतांना जिवंत करीत फिरतो. ही गोष्ट ईश्वराच्या बाबतीत कधीच घडू शकत नाही. कारण ईश्वराचे काम निरंतर एकसारखे होत असते. घरे बांधल्याशिवाय तयार होत नाही आणि जी गोष्ट बनविली जाते ती सदैव राहू शकत नाही. ज्याला शरीर असते तो परिश्रमाविना दुःखी होतो आणि शरीरधारी रोगी झाल्याशिवाय राहत नाही. जो एका स्त्रीशी समागम करतो त्याला आजार झाल्याशिवाय राहत नाही. तर मग जो अनेक स्त्रियांशी शरीरसंबंध करतो त्याची काय दुर्दशा होत असेल? म्हणून मुसलमानांचा स्वर्गातील मुक्कामही सदैव सुखदायक असू शकत नाही. ॥१३१॥

## कुराण खुदाची रचना नव्हे

(१३२) कुराण ज्यात (सर्वस्वी) शहाणपणाच्या गोष्टी आहेत त्याची शपथ की, (हे मुहम्मद) काहीच संशय नाही की (इतर) पैगंबरांपैकीच तूही (पैगंबर) आहेस. (आणि धर्माच्या) सरळ मार्गावर आहेस. (हे कुराण) सामर्थ्यवान (व) दयाळू (परमेश्वराने) प्रकटिले आहे. - मं.५, सि.२३, सू.३६, आ.२-५.

**(समीक्षक)** आता पाहा ! हे कुराण ईश्वरनिर्मित असते तर ईश्वराने कुराणाची शपथ का घेतली असती ? नबी हा ईश्वराने पाठविलेला असता तर तो आपल्या दत्तक मुलाच्या बायकोवर मोहित का झाला असता ? कुराणावर श्रद्धा असणारे लोक सन्मार्गावर आहेत असे म्हणणे हा नुसता शाब्दिक खेळ आहे. कारण सत्यावर श्रद्धा ठेवणे, सत्य बोलणे, सत्याचरण करणे, पक्षपातरहित न्याय-धर्माचे आचरण करणे आणि याविरुद्ध असणाऱ्या गोष्टींचा त्याग करणे वगैरे गोष्टी ज्यामध्ये आहेत तोच सन्मार्ग असतो. परंतु कुराणात आणि मुसलमानांच्या व त्यांच्या खुदाच्या स्वभावातच या गोष्टी नाहीत. पैगंबर मुहम्मदसाहेब हे सर्वांहून श्रेष्ठ असते तर ते सर्वांहून अधिक ज्ञानवान आणि शुभगुणांनी युक्त नसते काय ? म्हणून एखादी माळीण जशी आपली बोरे आंबट आहेत असे सांगत नाही तशीच ही गोष्ट आहे. ॥१३२॥

(१३३) आणि (मग दुसऱ्यांदा) कर्णा फुंकला जाईल. तेव्हा एकदम (सारेच्या सारे) थडग्यांतून (बाहेर पडून) आपल्या पालन कर्त्याकडे धावू लागतील आणि त्यांचे पायही साक्ष देतील. त्याचे काम तर असे आहे की, जेव्हा तो कोणत्याही वस्तूचा संकल्प करतो तेव्हा तो तिला केवळ (एवढेच) सांगतो की 'हो' व ती होऊन जाते. - मं.५, सि.२३, सू.३६, आ.५३, ६५, ८२.

**(समीक्षक)** आता या असंबद्ध गोष्टी ऐका ! पाय कधी साक्ष देऊ शकतात काय ? त्यावेळी खुदाशिवाय कोण होता की, ज्याला आज्ञा दिली ? ती कोणी ऐकली ? आणि कोण (काय) बनले ? जर खुदाशिवाय दुसरे कोणी नसेल तर हे वचन खोटे ठरते आणि जर कोणी असेल तर 'खुदाशिवाय दुसरी कोणतीच वस्तू नव्हती व खुदाने सर्वकाही निर्माण केले,' हे वचन खोटे ठरते. ॥१३३॥

(१३४) त्यांच्यांत स्वच्छ मद्याचा प्याला (चौफेर) फिरवला जात असेल. (ते मद्य) पांढरे शुभ्र (असून) पिणारास (फार) स्वाद देईल आणि त्यांच्यापाशी खाली नजर राखणाऱ्या मोठमोठ्या डोळ्यांच्या (अप्सरा) असतील की, जणू त्या (शहामृगाची) अंडी होत की ती (सांभाळून) पडद्यात ठेवलेली आहेत. आता पुढे आम्हाला मरावयाचे नाही आणि काही संशय नाही. 'लूत' या अर्थात पैगंबरांपैकीच आहे. आम्ही लूतला व त्याच्या कुटूंबाला (शिक्षेतून) वाचवून घेतले. पण (त्याची) म्हातारी (बायको) मागे राहणाऱ्यांत (राहून गेली) होती. मग आम्ही इतरांचा विध्वंस करून टाकला. - मं.६, सि.२३, सू.३७, आ.४५, ४६, ४८, ४९, ५८, १३३-१३६

**(समीक्षक)** काय हो महाराज ? येथील मुसलमान दारू वाईट (त्याज्य) आहे. परंतु त्यांच्या स्वर्गात तर दारूच्या नद्या वाहतात. इहलोकी कसेबसे मद्यपान निषिद्ध ठरविले, ही गोष्ट चांगली आहे. परंतु इहलोकाऐवजी त्यांच्या स्वर्गात फारच वाईट गोष्ट आहे. बहुधा स्त्रियांच्या वास्तव्यामुळे तेथे कोणाचे चित्त ठिकाणावर राहत नसावे. शिवाय महाभयंकर रोगही होत असतील. तेथे राहणारे शरीरधारी असतील तर ते अवश्य मरतील आणि जर ते शरीरधारी नसतील तर ते भोग-विलासच करू शकणार नाहीत. त्यामुळे त्यांच्या स्वर्गात जाणे व्यर्थ आहे. जर तुम्ही लूतला पैगंबर मानीत असाल तर बायबलात असे लिहिले आहे की, लूतच्या मुलींनी त्याच्याशी समागम करून दोन मुलांना जन्म दिला ही गोष्ट खरी मानता की नाही ? जर खरी मानत असाल तर अशाला पैगंबर मानणे निरर्थक आहे ! आणि अशा माणसाला व त्याच्या साथीदारांना खुदा मुक्ती देत असेल तर तो खुदाही तसलाच आहे. कारण म्हातारीची गोष्ट सांगणारा आणि पक्षपाताने इतरांना ठार मारणारा खुदा कधीही ईश्वर असू शकत नाही. असला खुदा मुसलमानांच्या घरातच राहू शकतो. अन्यत्र राहू शकत नाही.

(१३५) सर्वकाल राहणाच्या (स्वर्गाच्या) बागा की ज्यांची दारे त्यांच्यासाठी (पहिल्यानेच) उघडलेली असतील. (आणि ते) त्यात तक्ये लावून बसतील. तेथे पुष्कळ फळे व पेये मागवितील आणि त्यांच्यापाशी खाली नजर राखणाऱ्या (पत्न्या) असतील. (व त्यात मौज ही की त्या त्यांच्या) समवयस्कही (असतील.) तात्पर्य एकूण एक सर्वच देवदूतांनी साष्टांग नमस्कार घातला. पण (एक) इब्लिस (सैतान) (मात्र नमला नाही) की तो अभिमानात येऊन गेला व नास्तिकांपैकी होऊन बसला. परमेश्वराने (इब्लिसला) विचारले की, 'हे इब्लिसा, ज्या वस्तूला मी आपल्या हातांनी बनविले त्या (वस्तू) स साष्टांग नमस्कार घालण्यापासून तुला कोणत्या वस्तूने प्रतिबंध केला ? काय तू शेखीत येऊन गेलास की तू (खरोखरीच) बड्या लोकांपैकी आहेस?' तो म्हणाला, 'मी त्याच्यापेक्षा फारच श्रेष्ठ आहे. मला तू अग्नीतून बनविलेस व त्याला मातीतून बनविलेस.' (परमेश्वराने) सांगितले, 'तू येथून नीघ (चालता हो !); की तू धोंडमार करून पिटाळला जाशील आणि (शेवटच्या) निवाड्याच्या दिवसापर्यंत तुझ्यावर माझा शाप (पडत राहील).' (तो) बोलला, 'माझ्या पालनकर्त्या! (सर्व लोक पुन:) उठवून उभे केले जातील. त्यादिवसापर्यंत मला तू अवसर दे.' (परमेश्वराने) म्हटले, '(होय), तुला त्या दिवसा पावतो अवसर आहे. की ज्याचा वेळ (मलाच) माहीत आहे.' (तो) म्हणाला, '(तर मलाही) तुझ्याच प्रतापाची शपथ आहे की या (मानवा) त जे तुझे नि:सीम भक्त आहेत त्यांना सोडून या समस्त लोकांस मी बहकवून सोडीन तरच खरा !' - मं.६, सि.२३, सू.३८, आ.५०-५२, ७३-८२.

**(समीक्षक)** कुराणात वर्णन केल्याप्रमाणे स्वर्गामध्ये बागबगीचे, कालवे, इमारती वगैरे खरोखरीच असतील तर त्या गोष्टी सदैव तेथे नव्हत्या व सदैव तशाच राहू शकणार नाहीत. कारण जो पदार्थ संयोगाने बनतो तो संयोगपूर्वी तेथे नसतो व वियोगानंतरही अस्तित्वात असत नाही. जर तो स्वर्गच कायम राहणार नाही तर त्यात राहणारे सदैव कसे राहू शकतील ? कुराणात असे लिहिले आहे की, स्वर्गात गाद्या-गिरद्या, तक्क्ये, फळे, पेये वगैरे मिळतील. यावरून हे सिद्ध होते की, जेव्हा मुसलमानांचा पंथ सुरू झाला त्यावेळेस अरबस्थान हा देश फारसा श्रीमंत नव्हता. म्हणून मुहम्मद साहेबांना गाद्यागिरद्या वगैरे गोष्टींचे आहमिष दाखवून गरीब लोकांना आपल्या पंथात ओढले. जेथे स्त्रिया आहेत तेथे निरंतर सुख कसे असेल ? त्या स्त्रिया तेथे कोठून आल्या? त्या कायम स्वर्गात राहणाऱ्या आहेत काय ? जर त्या बाहेरून आल्या असतील तर परत आपल्या गावी जातील आणि जर त्या तिथल्याच रहिवासी असतील तर निवाड्याच्या दिवसापूर्वी त्या काय करीत होत्या ? रिकामटेकड्या बसून त्या आपले आयुष्य वाया घालवीत होत्या काय ?

आता खुदाचे तेज पाहा ! त्याचा हुकूम मान्य करून इतर देवदूतांनी आदम साहेबांना नमस्कार केला. पण सैतानाने तो हुकूम मानला नाही. तेव्हा खुदा सैतानाला म्हणाला की, "मी आदमला माझ्या दोन्ही हाताने बनविले आहे. तू गर्व करू नकोस." यावरून असे सिद्ध होते की, कुराणातला खुदा दोन हात असणारा माणूस होता. म्हणून तो सर्वव्यापक व सर्वशक्तिमान मुळीच असू शकत नाही आणि सैतानाने सत्यच सांगितले की, "मी आदमहून श्रेष्ठ आहे." यावर खुदा का रागावला ? खुदाचे घर आकाशातच आहे काय ? पृथ्वीवर नाही? तर मग काबा हे खुदाचे घर आहे, असे प्रथम का लिहिले ?

छान ! परमेश्वर आपणच निर्माण केलेल्या सृष्टीपासून स्वतःला वेगळे कसे काढू शकतो ? आणि सारी सृष्टी परमेश्वराची आहे. यावरून हे स्पष्ट दिसून येते की, कुराणाचा खुदा हा स्वर्गाचा मक्तेदार (मालक) होता. खुदाने सैतानाचा धिःकार करून त्याला कैद केले. यावर सैतानाने त्याला सांगितले की, ''मालक ! मला न्यायनिवाड्याच्या दिवसांपर्यंत मोकळे सोडा.'' त्याने केलेल्या खुशामतीमुळे खुदाने त्याला कयामतीच्या दिवसापर्यंत सोडून दिले. मुक्त होताच सैतानाने खुदाला सांगितले की, ''आता मी खूप लोकांना बहकावीन आणि बंडाळी करीन.'' तेव्हा खुदा म्हणाला, ''तू जितक्या लोकांना वाममार्गाला लावशील त्या सर्वांना आणि तुलाही मी नरकात टाकीन.''

सज्जन मंडळीनो, आता तुम्हीच विचार करा. सैतानाला बहकाविणारा खुदा आहे की सैतान आपणहून बहकला ? जर खुदाने त्याला बहकाविले असेल तर तो सैतानाचा सैतान ठरतो. जर सैतान स्वतः होऊन बहकला असेल तर इतरही जीव स्वतःच बहकतील. त्यासाठी सैतानाची जरूर नाही आणि या बंडखोर सैतानाला खुदाने मोकळे सोडले, यावरून हे सिद्ध होते की, अधर्माचरण करविण्याच्या कामी खुदाही सैतानाचा सहभागी होता. एखाद्याला चोरी करायला लावून स्वतःच त्याला शिक्षा द्यावयाची, या अन्यायाला तोड नाही. ॥१३५॥

(१३६) परमेश्वर सर्व पापांची क्षमा करतो. तो निःसंशय (फारच) क्षमाशील व दयाळू आहे. (ही) सारी पृथ्वी त्याच्या एका मुठीत असेल आणि आकाश (हे पत्रांप्रमाणे) गुंडाळलेले त्याच्या उजव्या हातात आणि पृथ्वी आपल्या पालन कर्त्याच्या प्रकाशाने चकाकू लागेल व (लोकांचे कर्माचे) पुस्तक (आणून समोर) ठेवले जाईल आणि पैगंबर आणि साक्षीदार हे हजर केले जातील व लोकांचे दरम्यान (त्यांच्या मतभेदांचा) न्यायपुरस्पर निवाडा केला जाईल. - मं.६, सि.२४, सू.३९, आ.५३, ६७, ६९.

**(समीक्षक)** जर खुदा सगळ्या पापांची क्षमा करीत असेल तर तो जणू सगळ्या जगाला पापी बनवीत आहे व तो निर्दयी आहे. कारण एका दुष्टावर दया व क्षमा केल्याने तो जास्तच दुष्टपणा करील आणि इतर अनेक धर्मात्म्यांना दुःख देईल. अगदी लहानशा अपराधाबद्दलही क्षमा केल्यास जगात सर्वत्र अपराधच अपराध पसरतील. परमेश्वर अग्नीसारखा प्रकाशमान आहे काय ? आणि कर्मपत्रे कोठे जमा होतात ? ती कोण लिहितो? खुदा जर पैगंबर व साक्षीदार यांच्या भरवशावर न्यायनिवाडा करीत असेल तर तो सर्वज्ञही नाही व सामर्थ्यसंपन्नही नाही. जर तो अन्याय करीत नसेल व न्यायच करीत असेल तर तो कर्मानुसार तसे करीत असणार. ती कर्मे पूर्वजन्मातील असतील अथवा या जन्मातील असतील. अशा स्थितीत क्षमा करणे, अंतःकरणांना कुलुपे घालणे, शिक्षा न देणे, सैतानाला बहकाविणे आणि त्यांना कच्च्या कैदेत ठेवून त्यांचा छळ करणे हा निव्वळ अन्याय आहे. ॥१३६॥

(१३७) (हे) लेखी फर्मान (अशा) परमेश्वरांच्या हुजुरातून सादर होत आहे. (की जो) परम समर्थ (व सर्व) ज्ञानी (आहे). (तो) पापांबद्दल क्षमा करणारा व पश्चात्तापाचा स्वीकार करणारा आहे. - मं.६, सि.२४, सू.४०, आ.२, ३.

**(समीक्षक)** भोळ्याभाबड्या लोकांनी अल्लाच्या नावाने कुराणावर श्रद्धा ठेवावी म्हणून हे लिहिलेले आहे. यामध्ये थोडेसे सत्य असून बाकी सारे असत्यच भरलेले आहे आणि ते सत्यही असत्यासोबत जणू असत्यासारखेच वाटते. म्हणून कुराण, कुराणातील खुदा आणि त्यांच्यावर विश्वास ठेवणारे हे सारे पाप करणारे, करविणारे व पाप वाढविणारे आहेत. कारण पापाला क्षमा करणे हा फार मोठा अधर्म आहे. परंतु त्यामुळेच मुसलमान लोक पापे आणि दंगेधोपे करण्यास फारसे कचरत नाहीत. ॥१३७॥

(१३८) त्यानंतर दोन दिवसात त्याने त्या (धुक्याचा थरा) ची सात आकाशे बनविली आणि प्रत्येक आकाशात व्यवस्था त्याने (दूतांस) सांगून दिली. येथपर्यंत की जेव्हा (सर्व) नरकात येऊन गोळा होतील तेव्हा त्यांचे कान व त्यांचे डोळे व त्यांच्या त्वचा यांच्याविरुद्ध ते जसजशी कर्मे करत राहिले आहेत त्या (कर्मा) ची साक्ष देतील आणि हे लोक आपल्या त्वचांशी पुसतील की (बरे,) तुम्ही आमच्याविरुद्ध का म्हणून साक्ष दिली असेल ? ते उत्तर देतील की ज्या परमेश्वराने प्रत्येक वस्तूस वाचा दिली त्यानेच आम्हालाही वाचा दिली. तोच (परमेश्वर पुनरुत्थानाच्या वेळी) मेलेल्यांनाही जिवंत करणारा आहे. -मं.६, सि.२४, सू.४१, आ.१२, २०, २१, ३९.

**(समीक्षक)** शाबास मुसलमानांनो ! वाहवा ! तुम्ही आपल्या खुदाला सर्वशक्तिमान समजता. पण तो सात आकाश दोन दिवसांत बनवू शकला. ज्याप्रकारचा त्याप्रकारे पाहता त्याने क्षणात सर्वकाही बनवावयास पाहिजे. कान, डोळे व कातडी यांना ईश्वराने जड बनविले आहे. ते कसे साक्ष देऊ शकतील ? त्यांना साक्ष द्यावयास लावावयाचे होते तर त्याने प्रथम त्यांना जड (अचेतन) का बनविले ? आणि आपल्या आधीचे व नंतरचे काम नियमाविरुद्ध का केले ? याहूनही अधिक खोटी गोष्ट ही आहे की, जेव्हा अवयवांनी जीवांविरुद्ध साक्ष दिली तेव्हा ते जीव आपल्या कातडीला विचारू लागले की, 'तू आमच्याविरुद्ध साक्ष का दिलीस ?' कातडी म्हणाली, 'खुदाने द्यायला लावली. मी काय करणार ?' असे कधी घडू शकते काय ? एखाद्याने असे म्हणावे की, 'मी वंध्येच्या पुत्राचे तोंड पाहिले' तसे हे आहे. पुत्र असेल तर ती वंध्या कशी असेल ? जी वंध्या असेल तिला मूल होणे हीच अशक्य गोष्ट आहे. तशीच ही खोटी गोष्ट आहे. तो मृतांना जिवंत करीत असेल तर आधी त्यांना मारलेच का ? स्वत: खुदाही मरू शकतो की नाही ? जर तो मरू शकत नसेल तर मृत्यूला तो वाईट का समजतो ? आणि न्यायनिवाड्याच्या दिवसापर्यंत मृत जीव कोणत्या मुसलमानाच्या घरात राहणार ? आणि खुदाने जीवांचा काही अपराध नसताना त्यांचा निवाडा स्थगित का ठेवला ? ताबडतोब न्याय का केला नाही ? असल्या गोष्टींमुळे ईश्वरत्वाला बट्टा लागतो. ॥१३८॥

(१३९) आकाश व पृथ्वीच्या (खजिन्यांच्या) किल्ल्या त्याच्याचपाशी आहेत. तो ज्याची इच्छितो त्याची अन्नसंपत्ती वाढवितो आणि (ज्याला इच्छितो त्याला) काटकसरीने देतो. तो जे इच्छितो ते निर्माण करतो. ज्याला तो इच्छितो त्याला (निव्वळ) मुलीच देतो; आणि ज्याला इच्छितो त्याला (केवळ) मुलेच देतो. अथवा मुले व मुली (मिळून) दोन्ही प्रकारची संतती त्यास देतो आणि ज्याला इच्छितो त्याला असा (नामशेष) करून टाकतो की त्याला संततीच होत नाही आणि कोणाही मनुष्याची ताकद नाही की परमेश्वर त्याच्याशी (प्रत्यक्ष) संभाषण करील. पण प्रकटीकरणाद्वारे अगर पडद्याच्या मागून अथवा तो कोणा दूतास (त्याच्याकडे) पाठवतो. -मं.६, सि.२५, सू.४२, आ.१२, ४९-५१.

**(समीक्षक)** खुदाजवळ किल्ल्यांचे एक भांडारच भरलेले असणार. कारण त्याला सर्व ठिकाणची कुलुपे उघडावी लागत असणार. ही पोरकटपणाची गोष्ट आहे. त्याच्या मनास येईल त्याला त्याने पुण्यकर्म केले नसेल तरी तो ऐश्वर्य देतो काय ? अथवा त्रास देतो काय ? असे असेल तर तो फार मोठा अन्याय करणारा आहे. आता कुराणकर्त्याचे चातुर्य पाहा. त्यामुळे स्त्रियासुद्धा मोहित होऊन त्याच्या जाळ्यात अडकतील. त्याला वाटेल ते तो उत्पन्न करू शकत असेल तर तो दुसरा खुदाही निर्माण करु शकतो काय ? जर करू शकत नसेल तर त्याचे सर्वशक्तिमत्त्व येथे अडले. माणसांपैकी ज्यांना मुले हवे असतील त्यांना मुले व ज्यांना मुली हव्या असतील त्यांना मुली तो देतो. परंतु कोंबड्या, मासे, डुकरे इत्यादी ज्या पशुपक्ष्यांना पुष्कळ मुले होतात त्यांना ती कोण देतो ? आणि स्त्रीपुरुषांचा समागम झाल्याशिवाय तो मुले का देत नाही ? एखादीला आपल्या इच्छेने वांझ ठेवून दुःख का देतो ? वाहवा ! खुदा इतका तेजस्वी आहे की, त्याच्या समोर कोणी बोलूही शकत नाही. परंतु यापूर्वी कुराणात असे सांगितले आहे की, पडद्याआडून त्याच्याशी बोलता येते; अथवा देवदूत किंवा पैगंबर खुदाशी संभाषणे करतात. असे असेल तर देवदूत आणि पैगंबर त्याच्याशी बोलून आपला स्वार्थ साधत असणार. खुदा सर्वज्ञ व सर्वव्यापक आहे असे कोणी म्हणत असेल तर पडद्याआडून बोलणे आणि टपालाप्रमाणे बातम्या मागवून त्या जाणून घेणे व लिहिणे व्यर्थ आहे आणि असेच असेल तर तो खुदाच नसून कोणीतरी चलाखी करणारा माणूस असावा. म्हणून हे कुराण कधीच ईश्वरकृत असू शकत नाही. ॥१३९॥

(१४०) आणि जेव्हा येशू चमत्कार घेऊन आला. - मं. ६, सि. २५, सू. ४३, आ. ६३.

**(समीक्षक)** जर येशूलाही खुदानेच पाठविले होते तर त्याच्या उपदेशाविरुद्ध उपदेश करणारे कुराण खुदाने का बनविले ? आणि कुराणाविरुद्ध बायबल का निर्माण केले ? म्हणूनच हे दोन्ही ग्रंथ ईश्वरकृत नाहीत. ॥१४०॥

(१४१) याला धरा आणि ओढीत ओढीत याला नरकाच्या मधोमध घेऊन जा आणि मोठमोठ्या व काळ्या डोळ्यांच्या अप्सरांशी आम्ही त्यांच्या जोड्या लावून दिलेल्या असतील. - मं. ६, सि. २५, सू. ४४, आ. ४७, ५४.

**(समीक्षक)** छान ! खुदा न्याय करणारा असूनही प्राण्यांना पकडवितो आणि ओढत न्यायला लावतो काय ? मुसलमानांचा खुदाच असे करतो तर त्याचे उपासक मुसलमान अनाथांना व दुबळ्यांना पकडून फरपटत नेत असतील यात काय आश्चर्य ? तो संसारी माणसांप्रमाणे लग्नेही लावून देतो. जणू काही तो मुसलमानांचा भटजीच आहे. ॥१४१॥

(१४२) (मुसलमानांनो !) (लढाईत) जेव्हा नास्तिकांशी तुमची गाठ पडेल तेव्हा (बेलाशक त्यांच्या) माना उडवून टाका. येथपर्यंत की जेव्हा तुम्ही खूप त्यांचा जोर मोडून टाकाल तेव्हा तुम्ही त्यांच्या मुस्क्या बांधून टाका (म्हणजे कैद करा) आणि (हे पैगंबरा !) तुझी (ही) वस्ती (मक्का) जेथील लोकांनी तुला (घरातून) काढून लावले त्याहूनही कित्येक वस्त्या फारच बलवत्तर होत्या, की आम्ही त्यांचा नाश करून टाकला व कोणीही त्याच्या मदतीस उभा राहिला नाही. ज्या स्वर्गाचे अभिवचन (परमेश्वराला) भिऊन वागणाऱ्यांस दिले जाते त्याची तऱ्हा अशी आहे की, त्यात (अशा) पाण्याच्या नद्या आहेत की ज्यांत (नावासही) वास नाही व

(अशा) दुधाच्या आहेत की ज्याची रुची (मुळीच) बदलली नाही आणि (अशा) मद्याच्या नद्या आहेत की जे सेवन करणाऱ्यास फारच रुचकर लागेल व (तशाच) स्वच्छ (व निर्मळ) मधाच्याही नद्या आहेत; आणि त्यांना तेथे हरतऱ्हेची फळफळावळ (प्राप्त) होईल व त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमा (ती वेगळेच). - मं. ६, सि. २६, सू. ४७, आ. ४, १३, १५.

**(समीक्षक)** म्हणूनच हे कुराण, खुदा व मुसलमान दंगेधोपे करणारे, सर्वांना दुःख देणारे आणि स्वार्थी व निर्दयी आहेत. येथे जसे लिहिले आहे तसेच वर्तन इतर पंथाचे लोक मुसलमानांशी करतील तर मुसलमान लोक इतरांना जसे दुःख देतात तसेच दुःख मुसलमानांना होईल की नाही? हा खुदा मोठा पक्षपाती आहे कारण ज्यांनी मुहम्मद साहेबांना हाकलून दिले त्यांना खुदाने मारून टाकले. जेथे शुद्ध पाणी, दूध, मद्य आणि मध यांच्या नद्या आहेत तो स्वर्ग या जगाहून कोणत्या बाबतीत श्रेष्ठ आहे? दुधाच्या नद्या कधीतरी असू शकतील काय? कारण दूध फार थोड्या वेळात नासते. म्हणूनच शहाणे लोक कुराणात सांगितलेल्या गोष्टींचा स्वीकार करीत नाहीत. ॥१४२॥

(१४३) जेव्हा जमीन मोठ्या जोराने हालू लागेल; आणि पर्वताचे तुकडे तुकडे होऊन जातील की (जशी) धूळच उधळून पडली आहे. (एक) तर उजवाहातवाले, तर उजव्याहाताकडल्यांचे काय, (सांगणे)! आणि (एक) डावाहातवाले, तर डाव्या हाताकडल्यांचे काय (तरी दुर्गती)! सुवर्णाच्या रत्नजडित तक्तांवर, ते एकमेकांच्या समोर टेकून (बसलेले) असतील. त्यांच्यापाशी (स्वर्गीय) तरुण मुले जी नित्य (मुलेच बनून) राहतील. ती (सरबत पाजण्यासाठी) पेले व सुरया (तोटीदार तांब्ये) घेऊन येत जात असतील आणि (अशा) स्वच्छ मद्याचे पेलेही, की ज्या (च्या पिण्या) ने त्यांचे डोके दुखणार नाही व ते बरळणारही नाहीत आणि तसेच ज्या तऱ्हेची फळे ते पसंत करतील (ती फळे); व ज्या प्रकारच्या पक्ष्यांच्या मांसाची त्यांना इच्छा होईल (तेच मांस) आणि (या देणग्यांखेरीज) काळ्याभोर मोठ्या डोळ्यांच्या अप्सरा (असतील); की ज्या जणू घड्यात ठेवलेल्या मोत्यासारख्या (सुंदर असतील) आणि उंच उंच बिछायती (च्या सुखा) ने (मजा मारीत) असतील. या (अप्सरा) आम्ही (त्यांच्यासाठी एकदम) बनवून उभ्या केल्या आणि त्यांना (अशा) बनविल्या (की त्या कुमारिका आहेत); आपल्या पतीस प्रिय व समवयस्क (अशा आहेत) आणि त्यानेच पोटे भरावी लागतील. तथापि मी (उल्का) नक्षत्रांच्या तुटण्याची शपथ वाहतो. - मं. ७, सि. २७, सू. ५६, आ. ४-६८-९, १५-२३, ३४-३७, ५३, ७५.

**(समीक्षक)** आता पाहा! कुराण रचणाऱ्यांची विचित्र लीला! पृथ्वी ही नेहमीच हलत असते; आणि खुदाने उल्लेख केलेल्या वेळीही ती हलत असेल. यावरून असे सिद्ध होते की कुराण रचणारा पृथ्वी स्थिर आहे असे समजत होता. बरे, पर्वतांना तो काय पक्ष्याप्रमाणे उडायला लावील? ते भुंगे बनले तरीही ते सूक्ष्म शरीरधारी होतील. मग त्यांचा पुनर्जन्मही का होणार नाही? छान! खुदा शरीरधारी नसता तर त्याच्या उजव्या व डाव्या बाजूला कोणी कसे उभे राहू शकले असते? तेथील पलंग सोन्याच्या तारांचे बनलेले आहेत. म्हणजे तेथे सुतार व सोनारही राहत असणार. शिवाय ढेकूण चावत असतील व रात्री झोपूही देत नसतील. ते स्वर्गामध्ये लोडाला टेकून रिकामटेकडे बसूनच राहतात की काही कामधाम करतात? जर ते नुसतेच बसून राहत असतील

तर त्यांना अन्न न पचल्याने ते आजारी पडत असतील व लवकरच मरूनही जात असतील, नाही काय ? आणि जर ते काम करीत असतील तर इहलोकी जसे मेहनत मजुरी करतात तसेच तेथे काबाडकष्ट करून पोट भरत असतील. मग इथल्यापेक्षा स्वर्गात विशेष असे काय आहे ? काहीही नाही. तेथे सदैव मुले राहत असतील तर त्यांचे आईबापही राहत असतील आणि सासू-सासरेही असतील. म्हणजे भले मोठे शहरच तयार झालेले असणार. मग मलमूत्रादी खूप वाढल्याने रोगांचाही खूप प्रसार होत असणार. कारण जर ते फळे खात असतील, फुलपात्रांतून पाणी आणि मद्यचषकांतून मदिरा पीत असतील तर मग त्यांची डोकी का दुखणार नाहीत ? आणि ते एकमेकांविरुद्ध वाईट साईट का बोलणार नाहीत ? यथेष्ट मेवामिठाई खाल्यानंतर ते पशुपक्ष्यांचे मांसही खात असतील. त्यामुळे त्यांना नाना प्रकारचे रोग होऊन दुःख भोगावे लागत असणार. तेथे पशुपक्षी असणार, त्यांची हत्या केली जात असणार, कसायांची दुकानेही असणार आणि मृत पशुपक्ष्यांची हाडे जिकडे-तिकडे पडलेली असणार. वाहवा ! त्यांच्या त्या दिव्य स्वर्गाचे काय वर्णन करावे ? अरबस्तानापेक्षाही तो वरचढ नक्कीच असणार ! मद्यपान करून व मांस खाऊन झिंगल्यावर त्यांना उत्तमोत्तम स्त्रिया व लौंडे (तरुण मुलगे) लागणारच. त्याची सोय तेथे अवश्य असली पाहिजे. नाहीतर अशा नशाबाजांच्या डोक्यात गरमी चढून ते पिसाळतील. इतक्या सगळ्या स्त्री पुरुषांना बसण्यासाठी मोठेमोठे कोच-सोफे आणि झोपण्यासाठी मोठमोठे पलंग हवेतच. जेव्हा खुदा स्वर्गामध्ये कुमारिकांना उत्पन्न करतो तेव्हाच तो कुमारांनाही उत्पन्न करतो. आता येथून उमेदवार स्वर्गात गेले आहेत त्यांच्याशी खुदाने तेथील कुमारिकांचे विवाह लावून टाकले. परंतु सदैव तरुण राहणाऱ्या तेथील मुलांचे काय ? त्यांच्याशी तेथील कुमारिकांचे लग्ने झाली नाहीत तर त्यांनी काय करायचे ? त्यांनीही त्या उमेदवारांजवळ कुमारींसारखे राहायचे काय ? या बाबतीत काही तरतूद कुराणात केलेली दिसत नाही. खुदाकडून एवढी मोठी चूक कशी काय झाली ? समवयस्क सौभाग्यवती स्त्रिया आपल्या पतीसह स्वर्गात राहत असतील तर ते योग्य नाही. कारण स्त्रीच्या वयाच्या दीडपट किंवा दुप्पट वय पुरुषाचे असले पाहिजे. असो, ही झाली मुसलमानांच्या स्वर्गाची कथा ! आता नरकाची कथा ऐका. तेथे गेलेल्या लोकांना थूहड नावाच्या झाडाच्या (शेरासारख्या) काटेरी फांद्या खाऊन पोट भरावे लागते. याचा अर्थ असा की, नरकामध्ये काटेरी झाडे आहेत. त्या लोकांना उकळते पाणी प्यावे लागते. अशा प्रकारच्या यातना नरकात पडणाऱ्यांना भोगाव्या लागतात. शपथ घेण्याचा उल्लेख कुराणात येतो. वस्तुतः जे खोटारडे असतात ते शपथा घेतात. सत्यवादी लोक शपथ घेत नाहीत. म्हणून जर खुदाच शपथ घेत असेल तर तोही खोटारडाच ठरतो. ॥१४३॥

(१४४) जे लोक परमेश्वराच्या मार्गात फळी बांधून लढतात त्या लोकांस तर परमेश्वर निःसंशय चाहतो.

- मं.७, सि.२८, सू.६१, आ.४.

**(समीक्षक)** वाहवा ! छान ! असला उपदेश करून खुदाने बिचाऱ्या अरबांना सर्वांशी लढायला लावून जगाचे शत्रू बनविले आणि सर्वांनाच दुःखाच्या खाईत लोटले. धर्माचा झेंडा फडकावून जो कोणी लढाया घडवून आणतो त्याला कोणताही शहाणा माणूस ईश्वर मानणार नाही. जो मानव-जातीमध्ये विद्वेष निर्माण करतो तोच सर्वांना दुःख देणारा असतो. ॥१४४॥

# घरगुती भांडणांनी खुदा चिंतीत

(१४५) हे पैगंबरा ! ज्या (वस्तू) परमेश्वराने तुझ्यासाठी मुभा (विहित) केल्या आहेत त्या तू आपल्या पत्न्यांची मर्जी संपादण्यासाठी (आपल्याला) का म्हणून निषिद्ध करतोस ? आणि परमेश्वर क्षमाकर्ता व दयाळू आहे. जर पैगंबर तुम्हां (स्त्रियां) स काडी मोडून देईल तर नव्हे की, त्याचा पालनकर्ता त्याला तुमच्यापेक्षा उत्तम पत्न्या तुमच्या बदली देईल. (म्हणजे) ईश्वराज्ञाधीन, विश्वासू, भक्तिपरायण, (परमेश्वराच्या सेवेत) पश्चात्ताप करणाऱ्या उपासिका, उपोषण (रोजा) करणाऱ्या, विधवा व कुमारिका (अशा). -मं.७, सि.२८, सू.६६, आ.१,५.

**(समीक्षक)** नीट लक्ष देऊन पाहिल्यास असे दिसून येईल की, हा खुदा म्हणजे जणू मुहम्मद साहेबांच्या घराची आतील व बाहेरील व्यवस्था पाहणारा नोकरच आहे. यातील पहिल्या आयतीच्या संदर्भात दोन कथा सांगितल्या जातात. पहिली कथा अशी की, मुहम्मद साहेबांना मधाचे सरबत आवडत असे. त्यांना अनेक बायका होत्या. त्यांच्यापैकी एकीच्या घरी मधाचे सरबत पिण्यास थोडा उशीर झाला. पण तो इतर बायकांना असह्य झाला. त्यांनी मुहम्मद साहेबांना त्याबद्दल फैलावर घेतले. तेव्हा मुहम्मद साहेबांनी शपथ घेतली की, "मी यापुढे कधीही मधाचे सरबत पिणार नाही." दुसरी कथा अशी की, मुहम्मद साहेबांच्या अनेक बायकांपैकी एकीची पाळी होती. तिच्याकडे ते रात्री गेले. पण ती घरी नव्हती. ती माहेरी गेली होती. म्हणून मुहम्मद साहेबांनी एका दासीला बोलावून घेतले व तिलाच 'पावन' केले. जेव्हा त्या बायकोला ही गोष्ट कळली तेव्हा ती फार नाराज झाली. तेव्हा मुहम्मद साहेबांनी अशी शपथ घेतली की, "यापुढे मी असे करणार नाही." आणि त्यांनी त्या बायकोलाही सांगितले की, "तू ही गोष्ट कुणाला सांगू नको." त्या बायकोने आपण कोणाला सांगणार नाही असे कबूल केले. परंतु दुसऱ्या बायकोकडे गेल्यावर खुद्द मुहम्मद साहेबांनीच ही गोष्ट तिला सांगितली. या घटनेच्या संदर्भात खुदाने ही आयत पाठविली की, "आम्ही जी वस्तू तुझ्यासाठी ग्राह्य (हलाल) ठरविली ती तू निषिद्ध (हराम) का करतोस ?" आता विचारवंतांनी असा विचार करावा की, खुदा एखाद्या माणसाची घरगुती भांडणे मिटविण्याचे काम करीत फिरतो काय ? या घटनांवरून मुहम्मद साहेबांचे वर्तन कसे होते तेही दिसून येते. कारण जो अनेक बायका करतो तो ईश्वराचा भक्त अथवा पैगंबर कसा असू शकेल ? आणि जो एका स्त्रीच्या पक्षपाताने अपमान करतो आणि दुसरीचा सन्मान करतो तो पक्षपाती व अधर्मी आहे असे का म्हणू नये ? आणि अनेक बायकांनीही ज्याचे समाधान न झाल्यामुळे जो दासी-बटकींशी शरीरसंबंध ठेवतो त्याला लाजलज्जा, भीती व धर्म कोठून असणार ? कोणीतरी म्हटलेच आहे की, **'कामातुराणां न भयं न लज्जा' ॥**

कामवासनेच्या आधीन झालेल्या लोकांना अधर्माची भीती अथवा लाज वाटत नाही आणि यांचा खुदाही मुहम्मद पैगंबर आणि त्यांच्या बायका यांच्यातील भांडणाचा निर्णय देणारा सरपंच बनला आहे. आता बुद्धिमान लोकांनीच विचार करावा की, हे कुराण एखाद्या अविद्वानाने रचलेले अथवा ईश्वरकृत आहे की एखाद्या अविद्वान व स्वार्थी माणसाने लिहिलेले आहे ? त्यांना स्पष्ट समजेल. दुसऱ्या आयतीवरून असे दिसते की, मुहम्मद साहेबांवर त्यांची बायको नाराज झाली असावी. म्हणून खुदाने ही आयत प्रकट करून तिला धमकावले असावे की, "तू फार गडबड करशील तर मुहम्मद साहेब तुला सोडून देतील आणि मग त्यांना त्यांचा खुदा पुरुषाशी

संबंध न आलेल्या (कुमारिका) उत्तम बायका देईल." ज्या माणसामध्ये थोडी देखील बुद्धी असेल तो निर्णय करू शकेल की हे सारे खुदाचे काम असेल की, आपला स्वार्थी हेतू साध्य करण्यासाठी (पैगंबरानेच) केलेली चलाखी असेल ? असल्या गोष्टींवरून हे पूर्णपणे सिद्ध होते की, हे बोलणारा खुदा-बिदा कोणी नव्हता. तर देश काल पाहून आपला हेतू साध्य करण्यासाठी खुदाच्या वतीने मुहम्मद साहेबच स्वत: बोलत होते. जे लोक हे प्रकार ईश्वरीय मानीत असतील त्यांना आम्हीच काय पण सर्व बुद्धिमंत लोक असेच सांगतील की, "हा कसला खुदा ? तो तर जणू मुहम्मद साहेबांसाठी बायका आणणारा मध्यस्थ (न्हावी) चआहे !!" (१४५)

(१४६) हे पैगंबरा ! नास्तिकांशी (हातांनी) व दांभिकांशी (वाचेने) धर्मयुद्ध करीत राहा आणि त्यांच्यावर जुलूम कर. -मं.७, सि.२८, सू.६६, आ.९.

**(समीक्षक)** मुसलमानांच्या खुदाची ही करामत पाहा ! इतर पंथांच्या लोकांशी लढण्यासाठी ते पैगंबराला व मुसलमानांना चिथावणी देतो. म्हणूनच मुसलमान लोक नेहमी दंगेधोपे करतात. परमेश्वराने मुसलमानांवर कृपा करावी. म्हणजे तरी लोक दंगेधोपे करणे सोडून देऊन सर्वांशी प्रेमाने वागतील. ॥१४६॥

(१४७) आणि आकाश फाटून जाईल व त्यादिवशी फारच पोचट (फुसफुशीत) होऊन जाईल आणि त्याच्या किनाऱ्यावर दूत असतील आणि त्या दिवशी तुझ्या पालनकर्त्याच्या सिंहासनास आठ (दूत) आपल्यावरती उचलून धरतील. त्यादिवशी तुम्ही (परमेश्वरापुढे) रुजू केले जाल. तुमचे कोणतेच गूढ गुप्त राहणार नाही. तर ज्याला त्याचे (कर्म) पत्रक उजव्या हातात दिले जाईल तो म्हणेल की घ्या हो ! (हे) माझे (कर्म) पत्रक तर वाचा आणि ज्याचे (कर्म) पत्रक त्याच्या डाव्या हातात दिले जाईल तो म्हणेल, माझे (कर्म) पत्रक मिळाले नसते तर बरे झाले असते ! -मं.७, सि.२९, सू.६९, आ.१६-१९, २५.

**(समीक्षक)** वाहवा ! काय तत्त्वज्ञान आणि काय हा न्याय ! आकाशही कधी फाटू शकते काय ? ते फाटायला काय वस्त्र आहे ? जर वरच्या लोकाला (परलोकाला) आकाश म्हणत असतील तर ती गोष्ट ज्ञानविरोधी आहे. आता कुराणातील खुदा शरीरधारी आहे यात काहीच शंका उरली नाही. कारण सिंहासनांवर बसणे, आठ भोयांनी उचलणे, वगैरे गोष्टी खुदा हा शरीरधारी (साकार) असल्याखेरीज संभवत नाहीत. तसेच मागे-पुढे येणे जाणे ही गोष्टही मूर्तिमानाच्या बाबतीतच घडू शकते. जर तो मूर्तिमंत असेल तर तो एकदेशी असल्याने सर्वज्ञ, सर्वव्यापक व सर्वशक्तिमान असू शकत नाही आणि सर्व जीवांच्या सर्व कर्मांची माहिती त्याला असू शकत नाही. पुण्यात्म्यांच्या उजव्या हातात कर्मपत्र देणे, ते वाचावयास लावणे व त्यांना नरकात पाठविणे व कर्मपत्रे वाचून न्याय करणे ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. हा व्यवहार सर्वज्ञाचा असू शकतो काय ? मुळीच नाही. हा साराच पोरकटपणा आहे. ॥१४७॥

(१४८) की ज्या (पायऱ्यांच्या) (वाटा) द्वारे देवदूत व आत्मा (म्हणजे जिब्रील) त्याच्याकडे चढून जातात. (पुनरुत्थानाच्या) अशा एका दिवशी (जी घडून येईल) की ज्याचा अंदाज पन्नास हजार वर्षांचा होईल. जेव्हा हे आपल्या थडग्यातून निघून बाहेर पडतील (व) असे धावत असतील की जणू एखाद्या निशाणाकडे धावत चालते आहेत. -मं.७, सि.२९, सू.७०, आ. ४, ४३.

**(समीक्षक)** जर दिवस पन्नास हजार वर्षांचा आहे तर रात्रीही पन्नास हजार वर्षांची का नाही ? तेवढी मोठी

रात्र नसेल तर तेवढा मोठा दिवसही कधी असू शकत नाही. पन्नास हजार वर्षापर्यंत खुदा, फरिश्ते (देवदूत) आणि कर्मपत्रधारक उभे, बसलेले अथवा जागतच राहातील काय ? तसे असल्यास सर्वजण रोगी बनून पुन: मरूनच जातील. थडग्यांतून बाहेर पडून प्रेते खुदाच्या न्यायालयाकडे धावत जातील काय ? त्यांची समन्से त्यांच्यावर थडग्यांमध्ये कशी काय बजावली जातील ? आणि जे कोणी पुण्यात्मे अथवा पापात्मे असतील त्या बिचाऱ्यांना इतक्या दीर्घकाळापर्यंत थडग्यांमध्ये कच्च्या कैदेत डांबून का ठेवले ? आजकाल खुदाचे न्यायालय बंद असेल. म्हणजे खुदा आणि देवदूत रिकामेच बसले असतील की ! अथवा ते काय काम करीत असतील ? बहुधा आपापल्या घरात ऐषआराम करीत असतील, झोपत असतील, नाचगाणे व नाटक-तमाशे पाहत असतील अथवा इकडे-तिकडे फिरत असतील. असली अंदाधुंदी कोणत्याही राज्यात नसेल. असल्या गोष्टींवर जंगली लोकांखेरीज कोण विश्वास ठेवील ? ॥१४८॥

(१४९) आणि वास्तविक पाहता त्याने तुम्हास तऱ्हेतऱ्हेचे पैदा केले. का तुम्ही पाहीले नाही की परमेश्वराने एकावर एक अशी सात आकाशे बनविली आहेत ? आणि त्यात चंद्रालाही बनविले (की तो एक) प्रकाश (होय) आणि सूर्याला बनविले (की तो एक प्रकाशित) दिवा (होय) !! -मं.७, सि.२९, सू.७१, आ.१४-१६

**(समीक्षक)** खुदाने जीवांना उत्पन्न केले असेल तर ते कधीही नित्य, अमर राहू शकत नाहीत. मग स्वर्गात ते कायमचे कसे राहू शकतील ? जी वस्तू उत्पन्न होते ती अवश्य नष्ट होते. (आकाश हे निराकार आहे.) ते वरच्या बाजूला खुदा कसा निर्माण करू शकतो ? दुसऱ्या एखाद्या वस्तूचे नाव आकाश असे ठेवीत असाल तरीही आकाश हे नाव ठेवणे व्यर्थ आहे. वर खाली आकाशे बनविली असतील तर त्यांच्या मध्ये चंद्र-सूर्य कधीच राहू शकणार नाहीत. ते मध्यभागी ठेवले गेले तर त्यांच्या वरच्या व खालच्या आकाशात प्रकाश पडेल आणि इतर आकाशात अंधार पसरेल. प्रत्यक्षात तसे काही दिसत नाही. म्हणून हे सारे थोतांड आहे. ॥१४९॥

(१५०) आणि मशिदी तर परमेश्वराच्या (उपासने) साठी आहेत. तर (लोकांनो ! त्यांत) परमेश्वराबरोबर (आणखी) कोणाचा धावा करू नका. -मं.७, सि.२९, सू.७२, आ.१८.

**(समीक्षक)** ही गोष्ट खरी असेल तर मुसलमान लोक "लाइलाहइल्लिलला: मुहम्मदर्रसूलल्ला:" (लाइलह इल्लल्लह मुहम्मद उर रसूलल्लाह) या कलम्यामध्ये खुदाच्या बरोबर मुहम्मद साहेबांना का हाका मारतात ? ही गोष्ट कुराणाच्या विरुद्ध आहे. जर ती तशी विरुद्ध नसेल तर कुराणातील ही आयत खोटी ठरते. मशिदी ही खुदाची घरे असतील तर मुसलमान महामूर्तिपूजक ठरतात. कारण पौराणिक व जैन लोक लहानशा मूर्तीला ईश्वराचे घर मानल्याने जसे मूर्तिपूजक ठरतात तसे हे लोक मूर्तिपूजक का ठरू नयेत ? ॥१५०॥

(१५१) आणि सूर्य व चंद्र (दोन्ही) एकत्र गोळा केले जातील. -मं.७, सि.२९, सू.७५, आ.९.

**(समीक्षक)** सूर्य आणि चंद्र हे कधीतरी एकत्र येऊ शकतील काय ? ही किती अडाणीपणाची गोष्ट आहे पाहा आणि सूर्य व चंद्र यांनाच एकत्र करण्यामध्ये काय प्रयोजन होते ? इतर सर्व लोक-लोकान्तरांना एकत्र न करण्यात कोणते तर्कशास्त्र आहे ? असल्या अशक्य गोष्टी कधी तरी परमेश्वरकृत असू शकतात काय ? अडाण्यांखेरीज इतर कोणी असल्या गोष्टी लिहिणार नाही. ॥१५१॥

(१५२) स्वर्गवाश्यांपाशी (सेवेसाठी) मुले येत-जात असतील. ती नेहमी (मुलेच) राहतील तू त्यांना पाहशील तर तू (अशी) कल्पना करशील की, जणू ती पसरलेली मोत्येच (आहेत) व त्यांना चांदीची कडी लेवविली जातील आणि त्यांचा पालनकर्ता त्यांना पवित्र (शुद्धकारक) मद्य पाजवील. - मं.७, सि.२९, सू.७६, आ.१९, २१.

**(समीक्षक)** काय हो, मोत्यांसारखा रंग असणारी मुले स्वर्गात कशासाठी ठेवली जातात ? तरुण (प्रौढ) लोकांकडून केली जाणारी सेवा व स्त्रिया ही त्यांना तृप्त करू शकत नाहीत काय ? दुष्ट लोक किशोर वयाच्या मुलांशी जे महाभयंकर अनैसर्गिक कृत्य करतात त्याचे मूळ कुराणाच्या या वचनात असल्यास काय आश्चर्य ? तसेच, स्वर्गामध्ये स्वामी-सेवक भाव असल्याने स्वामीला आनंद मिळतो आणि सेवकाला कष्ट करावे लागल्याने दु:ख भोगावे लागते. असा पक्षपात का केला जातो ? आणि जेव्हा खुदा स्वत:च मद्य पाजील तेव्हा तो नोकरासारखा होईल. मग खुदाचे श्रेष्ठत्व ते काय राहिले ? स्वर्गामध्ये स्त्रीपुरुषांचा समागम, गरोदरपण आणि मुलेबाळे होणे या गोष्टी होतात की नाही ? जर मुलेबाळे होत नसतील तर त्यांचे विषयसेवन करणे व्यर्थ ठरते आणि जर ती होत असतील तर ते जीव कोठून येतात ? आणि खुदाची सेवा न करताच त्यांचा स्वर्गात जन्म झाल्याने स्वर्गप्राप्ती कशी होते ? जर त्यांचा जन्म तेथे होत असेल तर इस्लामचा स्वीकार न करता आणि खुदाची भक्ती न करताही त्यांना मोफत स्वर्ग मिळतो. काही बिचाऱ्यांना मुस्लिम पंथाचा स्वीकार केल्यामुळे व काहींना पंथाचा स्वीकार न करता सुख मिळणे याहून दुसरा मोठा अन्याय कोणता असेल ? ॥१५२॥

(१५३) (हा त्यांच्या कर्माचा) पुरेपूर मोबदला (होय) व (प्यावयास पवित्र मद्याचे) ओतप्रोत भरलेले प्याले. त्या दिवशी जिब्रील व (इतर) दूत व (त्याच्या हुजुरात) रांगे-रांगेने उभे राहतील. - मं.७, सि.३०, सू.७८, आ.२६, ३४, ३८.

**(समीक्षक)** कर्मानुसार फळे दिली जात असतील तर सदा स्वर्गात राहणाऱ्या अप्सरा, देवदूत व मोत्यांसारखे मुलगे यांना त्यांच्या कोणत्या कर्मानुसार सदैव राहण्यासाठी स्वर्ग मिळाला ? तेथे प्याले भरभरून दारू पितील तर त्या नशेत ते आपसात का भांडणार नाहीत ? स्वर्गातील एका देवदूताचे नाव रुह (आत्मा) असे आहे. तो सर्व देवदूतांचा दादा आहे. रुह आणि इतर देवदूत यांना रांगेत उभे करून खुदा त्यांची फलटण तयार करणार आहे काय ? त्या फलटणीकडून तो सर्व जीवांना शिक्षा देणार आहे काय ? त्यावेळी खुदा उभा असेल की बसलेला ? न्यायनिवाड्याच्या दिवसापर्यंत खुदा आपली सगळी फलटण एकत्र करून सैतानाला पकडील तर त्याचे राज्य निष्कंटक होईल. त्याला म्हणतात ईश्वरत्व ! ॥१५३॥

(१५४) ज्यावेळी सूर्या (च्या प्रकाशपटलास) गुंडाळले जाईल व जेव्हा तारे निस्तेज होतील आणि ज्यावेळी पर्वत (आपल्या जागेवरून) चालविले जातील; व जेव्हा आकाशाचे कातडे काढले जाईल. - मं.७, सि.३०, सू.८१, आ.१-३, ११.

**(समीक्षक)** गोल सूर्यलोक गुंडाळला जाईल ही कल्पना अत्यंत अज्ञानजन्य आहे आणि तारे निस्तेज कसे होतील ? पर्वत जड (अचेतन) असल्यामुळे ते कसे चालतील ? आणि कातडे सोलून काढायला आकाश हा काय एखादा प्राणी आहे काय ? ही अत्यंत अडाणीपणाची व जंगलीपणाची कल्पना आहे. ॥१५४॥

(१५५) जेव्हा आकाश फाटून जाईल; आणि तारे झडून पडतील व जेव्हा नद्या उकळून वाहू लागतील आणि जेव्हा थडगी उखडून टाकली जातील. - मं.७, सि.३०, सू.८२, आ.१-४.

**(समीक्षक)** कुराणकाराचे हे तत्त्वज्ञान मोठे विचित्र आहे. आकाश कसे फाडता येईल ? तारे कसे झाडून टाकता येतील ? समुद्राला चिरून टाकायला ते काय लाकूड आहे ? आणि थडगी जिवंत करायला ती काय प्रेते आहेत ? या सगळ्या अगदी बालिश गोष्टी आहेत. ॥१५५॥

(१५६) आकाश, ज्यात घुमट आहेत, त्याची शपथ. तर हे महनीय कुराण होय. (व ते आमच्या येथे) सुरक्षित पत्रक (मध्ये हुबेहूब लिहिलेले आहे.) - मं.७, सि.३०, सू.८५, आ.१, २१, २२.

**(समीक्षक)** हे कुराण रचणाऱ्याने भूगोल व खगोल यांचा मुळीच अभ्यास केलेला नव्हता. नाहीतर आकाश हे बुरुज असणाऱ्या किल्ल्यासारखे आहे असे त्याने का म्हटले असते ? तो मेषादी राशींना बुरुज म्हणत असेल तर इतर बुरुज का नाहीत ? वस्तुत: ते बुरुज नसून सर्व तारे लोक आहेत. हे कुराण खुदाने लिहिले आहे काय ? जर ते त्याने लिहिले असेल तर तोही विद्या (ज्ञान) व तर्कशास्त्र यांना पारखा झालेला व अविद्येने भरलेला असावा. ॥१५६॥

(१५७) नि:संशय हे (नास्तिक तर आपले) डावपेच लढवीत आहेत आणि मी (आपले डावपेच करीत आहे.) - मं.७, सि.३०, सू.८६, आ.१५, १६.

**(समीक्षक)** 'मकर' म्हणजे लबाडी, ठकबाजी. खुदाही ठक आहे काय ? आणि चोरीचे उत्तर चोरी आणि असत्याचे उत्तर असत्य आहे काय ? एखाद्या चोराने एखाद्या सज्जनाच्या घरी चोरी केली तर त्या सज्जन माणसाने त्या चोराच्या घरी जाऊन चोरी करावी काय ? वाहवा ! हे कुराणकर्त्या तुझी धन्य आहे ! ॥१५७॥

(१५८) आणि (हे पैगंबरा !) तुझा पालनकर्ता येऊन विराजमान होईल दूत रांगारांगानी (त्याच्या पुढे उभे राहतील) आणि त्या दिवशी 'जहन्नम' नरकाम्नी (सर्वांच्या समक्ष) आणून हजर केला जाईल. - मं.७, सि.३०, सू.८९, आ.२१, २२.

**(समीक्षक)** आता बोला ! जसा एखादा कोतवाल किंवा सेनापती आपल्या शिपायांच्या रांगा तयार करून त्यांच्याकडून कवाईत करवून घेतो तसाच यांचा खुदा आहे काय ? नरक ही काय एखादी घागर आहे की, जी घेऊन इकडे-तिकडे जाता येईल; नरक जर इतका लहान असेल तर त्यात असंख्य कैदी कसे मावतील ? ॥१५८॥

(१५९) यावर परमेश्वराचा पैगंबर (सालेह) याने त्यास बजावले की, परमेश्वराच्या सांडणीला (हात लावू नका); आणि तिचे पाणीही (बंद करू नका) यावरही त्या लोकांनी सालेहला पाखंडी म्हटले आहे व सांडणीला मारून टाकले. तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्या पापाबद्दल त्यांचा नाश केला. - मं.७, सि.३०, सू.९१, आ.४, १३, १४.

**(समीक्षक)** काय खुदाही उंटणीवर बसून सहल करतो ? नाहीतर त्याने ती कशाला बाळगली आणि आपला नियम मोडून न्यायनिवाड्याच्या दिवसापूर्वीच त्याने त्या लोकांना महामारीस बळी का पडले ? त्याने त्यांना रोग ग्रस्त बनविले, म्हणजे शिक्षा दिली. याचा अर्थ असा की, न्याय निवाड्याची रात्र व त्या रात्री न्यायनिवाडा केला जाणे या गोष्टी खोट्याच ठरल्या. शिवाय या उंटिणीशी संबंधित आयतीवरून असेही

अनुमान निघते की अरबस्तानात उंट व सांडणी यांच्याखेरीज ज्यांच्यावर बसून जाता येईल असे पशू फार कमी आहेत. यावरून असे सिद्ध होते की, हे कुराण अरबस्तानातील एखाद्या रहिवाशाने लिहिले आहे. ॥१५९॥

(१६०) पाहा हो ! जर तो (आपल्या कृत्यांपासून) पराङ्मुख न होईल तर आम्ही त्याच्या डोक्याचे केस धरून फरफटत ओढू. (म्हणजे) त्या लबाड, पापी (चांडाळ) चे केस (तसेच) आम्हीही (आपल्या) नरकाच्या दूतांना (त्याच्या पारिपत्यासाठी) बोलावून घेऊ. - मं.७, सि.३०, सू.९६, आ.१५, १६, १८.

**(समीक्षक)** एखाद्याला फरफटत ओढण्याचे काम खालच्या दर्जाच्या नोकराचे असते. पण ते काम करण्यापासून खुदाचीही सुटका झाली नाही. मस्तकही कधी खोटारडे व अपराधी असू शकते काय ? केवळ जीवच तसा असू शकतो. जसा एखादा तुरुंगाधिकारी आपल्या रक्षकांना (वार्डरांना) बोलावून घेतो तसा जो नरकाच्या दूतांना बोलावून घेतो तो कधीतरी खुदा असू शकेल काय ? ॥१६०॥

(१६१) आम्ही कुराणा (च्या प्रथम प्रकटीकरणाला) कद्रच्या रात्री उतरविले आणि (हे पैगंबरा !) तू समजलास की कद्रची रात्र म्हणजे काय ? त्या रात्री (पुढील सालाच्या) प्रत्येक व्यवस्थेसाठी देवदूत व पवित्रात्मा (रुह) हे आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने (पृथ्वीवर) उतरतात. - मं.७, सि.३०, सू.९७, आ.१, २, ४.

**(समीक्षक)** जर संपूर्ण कुराण एका रात्रीत प्रकट झाले (स्फुरले) असेल तर त्यातील एखादी विशिष्ट आयत (ओवी) एका विशिष्ट वेळीच स्फुरली असे ठामपणे कसे सांगता येईल ? रात्र काळोखी असते यात सांगण्यासारखे काय आहे ? आम्ही यापूर्वी सांगितलेच आहे की, अवकाशामध्ये वर आणि खाली असे काही नसते. परंतु येथे असे म्हटले आहे की, देवदूत व पवित्रात्मा खुदाच्या आज्ञेवरून जगाची व्यवस्था ठेवण्यासाठी येत असतात. यावरून असे स्पष्ट दिसून येते की, खुदा हा माणसाप्रमाणे एकदेशी आहे. आतापर्यंत कुराणामध्ये खुदा, देवदूत व पैगंबर यांचाच उल्लेख येत होता. आता एका चौथ्या पवित्रात्म्याची त्यात भर पडली. हा चौथा पवित्रात्मा हे काय प्रकरण आहे ते काही कळत नाही. ख्रिस्ती पंथात पिता, पुत्र व पवित्रात्मा ही त्रिपुटी आहे. तिच्यात या चौथ्याची भर घालण्यात आलेली दिसते. जर तुम्ही (मुसलमान) असे म्हणत असाल की, आम्ही या तिघांना खुदा मानीत नाही, तर ते असो. परंतु तर पवित्रात्मा हा इतरांहून पूर्णपणे वेगळा असेल तर खुदा, देवदूत व पैगंबर यांना पवित्रात्मे म्हणता येईल की नाही ? जर ते पवित्र आत्मे असतील तर मग एकाचेच नाव पवित्रात्मा असे का असावे ? तसेच हा खुदा दिवस, रात्र, घोडे वगैरे जनावरे आणि कुराण इत्यादींच्या शपथा घेतो. वस्तुत: शपथ घेण-देणे हे भल्या माणसांचे काम नाही. ॥१६१॥

आता कुराणातील उपदेशासंबंधी माझे म्हणणे मी थोडक्यात विचारवंतासमोर मांडतो. हा ग्रंथ कसा आहे याचा निर्णय त्यांनी करावा. मला विचाराल तर मी असे सांगेन की, हे पुस्तक ईश्वरकृत नाही, कोण्या विद्वानाने रचलेले नाही व त्यात ज्ञानाच्या गोष्टीही नाहीत. या ग्रंथातील अनेक दोषांपैकी काही थोडेच दोष आम्ही दाखविले आहेत. हेतू एवढाच की लोकांची फसगत होऊन त्यांनी आपला जन्म वाया घालवू नये. यामध्ये जो थोडा सत्यांश आहे तो वेदांच्या शिकवणीशी व शास्त्रीय ग्रंथांतील विचारांशी मेळ खाणारा असल्याने जसा मला ग्राह्य वाटतो तसाच तो इतर पंथांच्या निराग्रही व निष्पक्ष विद्वानांना ग्राह्य वाटेल. तेवढा भाग वगळल्यास या ग्रंथामध्ये इतर जे काही आहे ते सर्व अज्ञानाने परिपूर्ण असे भ्रमाचे जाळेच आहे. हे लिखाण माणसांच्या

आत्म्याला पशुवत् बनवून शांतताभंग करविते, दंगेधोपे माजविते आणि माणसांमध्ये परस्परांविषयी विद्वेष पसरविते आणि त्यांच्या दुःखात भर घालते. पुनरुक्तीच्या दोषाचे तर कुराण हे जणू भांडारच आहे. परमेश्वराने सर्व मानवांवर कृपा करावी आणि सर्वांना एकमेकांशी प्रेमाने वागण्याची व परस्परांच्या सुखात भर घालण्याची प्रेरणा द्यावी. जसा मी आपले व इतर मत-पंथांच्या लोकांचे दोष निष्पक्षपणे व्यक्त करतो तसे इतर सर्व विद्वान लोक करतील तर लोकांचा परस्परांतील विरोध नाहीसा होऊन, त्यांचे मनोमीलन घडून येऊन आनंदाने व एकमताने सत्याची प्राप्ती करून घेण्यात कसलीच अडचण येणार नाही.

अशा प्रकारे कुराणाविषयी हे थोडेसे लिहिले. बुद्धिमान व धार्मिक वृत्तीच्या लोकांनी ग्रंथकाराचा अभिप्राय समजून घेऊन त्याचा लाभ घ्यावा. जर कोठे भ्रमाने चुकले असेल तर शुद्ध करून घ्यावे.

आता शेवटी एकच गोष्ट सांगावयाची राहिली आहे. ती अशी की, पुष्कळसे मुसलमान असे म्हणतात, लिहितात अथवा छापतात की, आमच्या पंथाचा उल्लेख अथर्ववेदात आलेला आहे. त्याचे उत्तर असे की, अथर्ववेदात इस्लामचा नामोल्लेखही नाही.

**(प्रश्न)** तुम्ही संपूर्ण अथर्ववेद वाचला आहे काय ? जर वाचला असेल तर त्यातील अल्लोपनिषद पाहा. त्यामध्ये ही गोष्ट स्पष्ट शब्दात सांगितलेली आहे. मग अथर्ववेदात मुसलमानांचा नामोल्लेखही नाही असे का म्हणता ?

## अथाल्लोपनिषदं व्याख्यास्यामः ।

**अस्माल्लां इल्ले मित्रावरुणा दिव्यानि धत्ते । इल्लेल्ले वरुणो राजा पुनर्ददुः । हया मित्रो इल्लां इल्लल्ले इल्लां वरुणो मित्रस्तेजस्कामः ॥१॥ होतारमिन्द्रो होतारमिन्द्र महासुरिन्द्राः । अल्लो ज्येष्ठं श्रेष्ठं परमं पूर्णं ब्रह्माणं अल्लाम् ॥२॥ अल्लोरसूलमहामदरकबरस्य अल्लो अल्लाम् ॥३॥ आदल्लाबूकमेककम् ॥ अल्लाबूक निखातकम् ॥४॥ अल्लो यज्ञेन हुतहुत्वा । अल्ला सूर्य्यचन्द्रसर्वनक्षत्राः ॥५॥ अल्ला ऋषीणां सर्वदिव्यां इन्द्राय पूर्वं माया परममन्तरिक्षाः ॥६॥ अल्लः पृथिव्या अन्तरिक्षं विश्वरूपम् ॥७॥ इल्लाँ कबर इल्लाँ कबर इल्लाँ इल्लल्लेति इल्लल्लाः ॥८॥ ओम् अल्लाइल्लल्ला अनादिस्वरूपाय अथर्वणाश्यामा हुं ह्रीं जनानपशूनसिद्धान् जलचरान् अदृष्टं कुरु कुरु फट् ॥९॥ असुरसंहारिणी हुं ह्रीं अल्लोरसूलमहमदरकबरस्य अल्लो अल्लाम् इल्लल्लेति इल्लल्लाः ॥१०॥ इत्यल्लोपनिषत् समाप्त ॥**

यामध्ये प्रत्यक्ष मुहम्मद साहेब हे रसूल (पैगंबर) असल्याचे लिहिले आहे. यावरून इस्लाम हा वेदमूलक आहे असे सिद्ध होते.

**(उत्तर)** तुम्ही अथर्ववेद वाचला नसेल तर आमच्याकडे या. सुरूवातीपासून शेवटपर्यंत तो वाचून पाहा. अथवा कोणाही अथर्ववेदी गृहस्थाकडे जा आणि त्यांच्यो जवळ बसून वीस कांडे असलेल्या अथर्ववेदाची मंत्रसंहिता वाचा. त्यामध्ये तुम्हांला कोठेही पैगंबर साहेबांचे नाव अथवा इस्लामचा उल्लेखही आढळणार

नाही. हे जे अल्लोपनिषद आहे ते अथर्ववेदात, त्याच्या गोपथ ब्राह्मणात अथवा इतर कोणत्याही शाखेत नाही. असे अनुमान आहे की, अकबर बादशहाच्या काळी हे उपनिषद कोणीतरी रचले असावे. हे रचणारा इसम थोडीफार अरबी व थोडीशी संस्कृत शिकलेला असावा असे दिसते. कारण यात अरबीची व संस्कृतची पदे (शब्द) लिहिलेला आढळतात. पाहा! 'अस्मल्लां इल्ले मित्रावरुणा दिव्यानि धत्ते'--इत्यादीमध्ये दहा श्लोक बनविले आहेत. यातील 'अस्माल्लां' व 'इल्ले' ही अरबीची आणि 'मित्रा वरुणा दिव्यानि धत्ते' ही संस्कृतची पदे आहेत. याचप्रमाणे सर्वत्र अरबी व संस्कृत यांचे मिश्रण केलेले दिसते. यावरून अरबी व संस्कृत शिकलेल्या कोण्यातरी व्यक्तीने त्याची रचना केली असावी असे दिसते. याचा अर्थ पाहिल्यास तो कृत्रिम, तर्क विसंगत आणि वेद व व्याकरण यांच्या रीतीविरुद्ध असल्याचे आढळून येते. या उपनिषदाप्रमाणेच इतरही मतमतांतरांच्या अभिमान्यांनी आपापली पुष्कळ उपनिषदे रचली आहेत. उदाहरणार्थ, स्वरोपनिषद्, नृसिंहतापनी, रामतापनी, गोपालतापनी वगैरे.

**(प्रश्न)** आता तुम्ही जे म्हणत आहात तसे आजपर्यंत कोणीही म्हटलेले नाही. मग तुमचे म्हणजे कसे खरे मानावे?

**(उत्तर)** तुम्ही मानल्याने अथवा न मानल्याने आमचे म्हणणे खोटे ठरत नाही. ज्याप्रकारे मी हे विधान चूक असल्याचे दाखवून दिले आहे त्याप्रकारे तुम्ही अथर्ववेद, गोपथ अथवा त्याच्या शाखांच्या प्राचीन लिखित ग्रंथांमध्ये अल्लोपनिषदाचा उल्लेख असल्याचे आणि मूळ ग्रंथाशी त्याचा अर्थ सुसंगत असल्याचे दाखवून द्याल तर तुमचे म्हणणे सप्रमाण सिद्ध होऊ शकेल.

**(प्रश्न)** पाहा! आमचा पंथ किती चांगला आहे की, त्यायोगे सर्व प्रकारची सुखे मिळतात व शेवटी मुक्तीही मिळते.

**(उत्तर)** सर्वच मतांचे व पंथांचे लोक असेच म्हणतात की, आमचा मत-पंथ तेवढा चांगला असून इतर मत-पंथ वाईट आहेत; आणि आमच्या पंथाखेरीज इतर पंथांतील लोकांना मोक्ष मिळू शकत नाही. आता आम्ही तुमचे म्हणणे खरे मानावे की त्यांचे? आम्ही तर असे मानतो की **सत्य भाषण, अहिंसा, दया इत्यादी शुभ गुण कोणत्याही पंथातील असले तरी ते चांगले आहेत आणि दुराग्रहपूर्ण वाद-विवाद, ईर्ष्या, द्वेष, मिथ्या-भाषण वगैरे गोष्टी कोणत्याही पंथातील असल्या तरी त्या वाईट आहेत. तुमची इच्छा सत्य धर्म ग्रहण करावा अशी असेल तर तुम्ही वैदिक मताचा स्वीकार करा.**

यानंतर 'स्वमन्तव्यामन्तव्य' थोडक्यात लिहिणार आहोत.

**इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे**
**सुभाषा विभूषिते यवनमतविषये**
**चतुर्दशः समुल्लासः सम्पूर्णः ॥१४॥**





# स्वमन्तव्यामन्तव्यप्रकाश

सर्वतंत्र सिद्धांत अर्थात साम्राज्य सार्वजनिक धर्म जो अनादी काळापासून चालत आलेला आहे. तो सर्वच मानीत आले आहेत, आजही मानतात व यापुढेही मानत राहतील. म्हणूनच त्याला सनातन नित्यधर्म असे म्हणतात की त्याला कोणीही विरोध करू शकत नाही. अज्ञानी माणसे अथवा एखाद्या पंथाच्या लोकांकडून ज्यांची दिशाभूल करण्यात आली आहे असे लोक ज्याला खोटे समजतात व मानतात त्याचा स्वीकार बुद्धिमान करीत नाहीत. परंतु ज्याला आप्त म्हणजे सत्यमानी, सत्यवादी, सत्यकारी, परोपकारी, पक्षपातरहित विद्वान स्वीकारतात ते सर्वांच्या दृष्टीने मंतव्य म्हणजे मानण्यास योग्य असते. याउलट जे अमन्तव्य नसल्यामुळे मानण्यायोग्य नाही ते मानले जात नाही. आता जे वेदादी सत्यशास्त्रे आणि ब्रह्मदेवापासून जैमिनी मुनीपर्यंत सर्वांनी मान्य केलेले ईश्वरादी पदार्थ आहेत ते मीही मान्य करतो; आणि सर्व सज्जनांसमोर ते प्रकट करतो.

जे भूत, वर्तमान व भविष्य या तीन्ही काळांत सर्वांना समान रूपाने मानण्यास योग्य आहे तेच माझे मंतव्य आहे असे मी समजतो. एखादी नवीन कल्पना अथवा मतमतांतर प्रस्थापित करणे हा माझा हेतू मुळीच नाही. परंतु जे सत्य आहे ते मानणे व मानावयास लावणे आणि जे असत्य आहे ते सोडणे व सोडावयास लावणे हे माझे अभिष्ट आहे. मी पक्षपाती असतो तर आर्यावर्त्तात प्रचलित असलेल्या मतांपैकी एखाद्या मताचा आग्रह मी बाळगला असता. परंतु आर्यावर्त्तात किंवा इतर देशांत जो काही अधर्मयुक्त व्यवहार आहे त्याचा स्वीकार आणि ज्या धर्मयुक्त गोष्टी आहेत त्यांचा त्याग मी करीत नाही व करू इच्छित नाही. कारण असे करणे मनुष्यधर्माच्या विरुद्ध आहे.

जो मननशील असेल आणि इतरांची सुखदु:खे व लाभहानी ही आपलीच आहेत असे समजेल तोच मनुष्य आहे. माणसाने अन्याय करणाऱ्या बलवानालाही भीता कामा नये व धर्मपरायण दुबळ्यालाही भ्यावे. इतकेच नव्हे तर आपल्या सर्व सामर्थ्यानिशी धर्मात्म्यांचे रक्षण, उन्नती व प्रियाचरण करावे. मग ते धर्मात्मे अत्यंत अनाथ, दुर्बळ व गुणरहित असले तरी हरकत नाही. तसेच जर एखादा अधर्मी चक्रवर्ती, सनाथ, महाबलवान

आणि गुणवान असला तरीही त्याचा नाश, अवनती व अप्रियाचरण माणसाने सदैव करावे. अर्थात शक्य असेल तोपर्यंत अन्याय करणाऱ्यांच्या सामर्थ्याची हानी व न्यायी लोकांच्या सामर्थ्याची उन्नती त्याने नेहमी करावी. हे करीत असतांना त्याला कितीही दारूण दु:ख भोगावे लागले, किंबहुना प्राणही द्यावा लागला तरी त्याने या माणुसकीरूपी धर्माचा त्याग कधीही करू नये. या बाबतीत श्रीमान महाराजा भर्तृहरी आदींचे श्लोक उद्धृत करणे उपयुक्त होईल.

**निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु,**
**लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम्।**
**अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा**
**न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥१॥** भर्तृहरिः नीतिशतक ८४

**न जातु कामान्न भयान्न लोभाद्**
**धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतो:।**
**धर्मो नित्यः सुखदु:खे त्वनित्ये,**
**जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥२॥** उद्योगपर्व ४०।११ उत्तरार्ध, १२ पूर्वार्ध, महाभारते श्लोक ११-१२

**एक एव सुहृद्धर्मो निधनेऽप्यनुयाति यः।**
**शरीरेण समं नाशं सर्वमन्यद्धि गच्छति ॥३॥** मनु. अ. ८। श्लो. १७

**सत्यमेव जयते नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः।**
**येनाऽऽक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥४॥** मुण्डकोप. मुण्डक ३। सं. १। श्लो. ४

**न हि सत्यात्परो धर्मोनानृतात्पातकं परम्।**
**न हि सत्यात्परं ज्ञानं तस्मात्सत्यं समाचरेत् ॥** मुण्डकोप. मुण्डक. ३। सं. १। श्लो. ४

या महापुरुषांच्या श्लोकांमधून जे सांगण्यात आले आहे त्याप्रमाणे सर्वांना आचरण निश्चय केले पाहिजे. आता मी ज्या-ज्या पदार्थांचा जो अर्थ मानतो त्यांचे वर्णन थोडक्यात येथे करतो. त्यांची विस्तृत व्याख्या या ग्रंथामध्ये त्या-त्या प्रकरणात केलेली आहे. ते पदार्थ असे:-

१. प्रथम **'ईश्वर'** याला ब्रह्म, परमात्मा इत्यादी नावे आहेत. तो सच्चिदानन्दादि लक्षणांनी युक्त आहे. त्याचे गुण, कर्म, स्वभाव पवित्र आहेत. तो सर्वज्ञ, निराकार, सर्वव्यापक, अजन्मा, अंनत, सर्वशक्तिमान, दयाळू, न्यायकारी, संपूर्ण सृष्टीचा कर्ता, धर्त्ता, हर्ता, सर्व जीवांना त्यांच्या कर्मानुसार सत्य-न्यायाने फळ देणारा वगैरे लक्षणांनी युक्त आहे. त्यालाच मी परमेश्वर असे मानतो.

२. चारही **'वेद'** (विद्या धर्मयुक्त ईश्वरप्रणीत संहिता मंत्रभाग) निर्भ्रांत (भ्रमरहित) व स्वत:प्रमाण आहेत असे मी मानतो. ते स्वत:च प्रमाणरूप आहेत. ते प्रमाणित आहेत हे सिद्ध करण्यासाठी दुसऱ्या कोणत्याही

ग्रंथाची आवश्यकता नाही. ज्याप्रमाणे सूर्य व दीपक हे आपले स्वरूप स्वत:च प्रकाशित करतात आणि पृथ्वी वगैरे इतर पदार्थांनाही प्रकाशयुक्त बनवितात, त्याप्रमाणे चारही वेद स्वयंप्रकाशित आहेत. या चार वेदांचे ब्राह्मण (नावाचे ग्रंथ), सहा अंगे, सहा उपांगे, चार उपवेद आणि ११२७ (अकराशे सत्तावीस) वेदांच्या शाखा हे सर्व वेदांच्या व्याख्या करणारे ग्रंथ ब्रह्मादी महर्षींनी रचलेले आहेत. त्यांना मी परत:प्रमाण म्हणजे वेदांना अनुकूल असल्यास प्रमाण मानतो आणि त्यांमध्ये जी वचने वेदांच्या विरुद्ध आहेत त्यांना मी अप्रमाण मानतो.

३. (**'धर्माधर्म'**) जे पक्षपातरहित, न्यायाचरण सत्यभाषण आदींनी युक्त ईश्वराज्ञा आहे, जे वेदांच्या अविरुद्ध आहे त्याला मी **'धर्म'** मानतो; आणि जे पक्षपातसहित अन्यायचरण मिथ्याभाषण आदि ईश्वरी आज्ञेचा भंग करणारे आहे, वेदांच्या विरुद्ध आहे त्याला मी **'अधर्म'** मानतो.

४. (**जीव**) जो इच्छा, द्वेष, सुख-दु:ख, ज्ञान आदी गुणांनी युक्त, अल्पज्ञ, नित्य आहे त्याला मी **'जीव'** मानतो.

५. (**जीव आणि ईश्वर**) जीव आणि ईश्वर हे स्वरूप व वैधर्म्य यामुळे भिन्न आणि व्याप्यव्यापक व साधर्म्य यामुळे अभिन्न आहेत. अर्थात ज्याप्रमाणे आकाशापासून मूर्तिमान द्रव्य कधी भिन्न नव्हते, नाही व नसेल आणि कधी एक नव्हते, नाही व नसेल त्याचप्रमाणे परमेश्वर व जीव हे व्याप्य-व्यापक, उपास्य-उपासक आणि पिता-पुत्र आदी संबंधयुक्त मानतो.

६. **'अनादी पदार्थ'** तीन आहेत. एक ईश्वर, दुसरा जीव आणि तिसरी प्रकृति म्हणजेच जगाचे कारण. यानांच नित्य असेही म्हणतात. जे पदार्थ नित्य आहेत त्यांचे गुण, कर्म व स्वभावही नित्य आहेत.

७. **'प्रवाहाने अनादी'** संयोगाद्वारे जी द्रव्यें, गुण व कर्मे उत्पन्न होतात ती वियोगानंतर उरत नाहीत. परंतु प्रथम संयोग होतो ते सामर्थ्य त्यांच्यात अनादी असते. त्या सामर्थ्यामुळे पुन: संयोग होईल आणि वियोगही होईल. या तीन्हींना मी प्रवाहाने अनादी मानतो.

८. **'सृष्टि'** वेगवेगळ्या द्रव्यांचा ज्ञान-युक्तिपूर्वक मेळ होऊन नानारूपे धारण करणे.

९. **'सृष्टिचे प्रयोजन'** हे आहे की ज्यात ईश्वराच्या सृष्टिनिमित्त गुण, कर्म, स्वभावाची सार्थकता होणे जसे एकाने दुसऱ्याला विचारले की, ''डोळे कशासाठी आहेत ?'' त्याने सांगितले की, ''पाहण्यासाठी''. त्याच प्रमाणे सृष्टी करण्याच्या ईश्वराच्या सामर्थ्याची सार्थकता सृष्टी (निर्मित) करण्यात आहे. तसेच जीवांच्या कर्मांचा यथावत भोग करणे इत्यादि.

१०. **'सृष्टि सकर्तृक'** आहे. तिचा कर्ता पूर्वोक्त ईश्वर आहे. कारण सृष्टि रचनेच्या प्रत्यक्षाद्वारे आणि जड (अचेतन) पदार्थात स्वत: होऊन यथायोग्य बी-बीयाण्यांचे आकार धारण करण्याचे सामर्थ्य नसल्यामुळे सृष्टिचा **'कर्ता'** अवश्य आहे.

११. **'बंध'** सनिमित्तक म्हणजेच अविद्या निमित्त (बंधाचे कारण अविद्या ही) आहे. सारी पापकर्मे ईश्वराव्यतिरिक्त उपासना करणे, अज्ञान आदि सर्व दु:खदायक आहेत. म्हणूनच हा **'बंध'** आहे की ज्याची इच्छा नसते परंतु तो भोगावा लागतो.

१२. **'मुक्ती'** सर्व दु:खांतून मुक्त होऊन बन्धरहित सर्वव्यापक ईश्वराच्या सृष्टीत स्वेच्छेने विचरण करणे आणि ठरलेल्या काळापर्यंत मुक्तीचा आनंद उपभोगून पुन: जगात येणे.

१३. **'मुक्तीची साधने'** ईश्वरोपासना म्हणजे योगाभ्यास, धर्मानुष्ठान ब्रह्मचर्य यांच्याद्वारे विद्या प्राप्त करणे, आप्त विद्वानांचा सत्संग, सत्यविद्या, सुविचार आणि पुरुषार्थ आदि आहेत.

१४. **'अर्थ'** जो धर्मानेच प्राप्त केला जातो तो अर्थ होय; आणि जो अधर्माने सिद्ध केला जातो तो **'अनर्थ'** होय.

१५. **'काम'** धर्म व अर्थ यांच्या साह्याने प्राप्त केला जातो तो **'काम'** होय.

१६. **'वर्णाश्रम'** हे गुणकर्माच्या योग्यतेवर आहे असे मी मानतो.

१७. **'राजा'** जो शुभ गुण, कर्म व स्वभाव यांनी प्रकाशित, पक्षपातरहित न्याय धर्माचे सेवन करतो, प्रजेशी पित्याप्रमाणे वागतो आणि प्रजाजनांना आपल्या मुलांसमान मानून त्यांची उन्नती आणि त्यांचे सुख वृद्धिंगत व्हावे यासाठी सतत प्रयत्न करणारा असतो.

१८. **'प्रजा'** जी पवित्र गुण, कर्म व स्वभाव यांना धारण करून पक्षपातरहित न्याय धर्माचे सेवन करून राजा व प्रजा यांची उन्नती चिंतिते, राजद्रोह न करता राजाशी मुलांप्रमाणे वागते ती **'प्रजा'** होय.

१९. (**'न्यायकारी'**) जो नेहमी विचार करून असत्याचा त्याग व सत्याचा स्वीकार करतो, अन्याय करणाऱ्यांचे पारिपत्य करतो, न्याय करणाऱ्यांना वाढवितो, आपल्या आत्म्याप्रमाणे सर्वांचे सुख इच्छितो तो **'न्यायकारी'** होय. त्याला मीसुद्धा योग्य मानतो.

२०. मी विद्वानांना **'देव'** अविद्वानांना **असुर**, पाप्यांना **'राक्षस'** आणि अनाचार करणाऱ्यांना **'पिशाच'** समजतो.

२१. (**'देवपूजा'**) विद्वान, माता, पिता, आचार्य, अतिथी, न्यायी राजा व धर्मपरायण लोक, पतिव्रता स्त्री आणि पत्नीव्रती पती यांचा सत्कार करणे ही **'देवपूजा'** म्हटली जाते. या विपरीत जी पूजा तिला मी अदेवपूजा समजतो. या व्यक्तींना मी पूज्य समजतो आणि इतर दगडाधोंडे आदिंच्या जड (अचेतन) मूर्तींना मी सर्वथा अपूज्य समजतो.

२२. **'शिक्षा'** ज्यायोगे विद्या, सभ्यता, धर्मपरायणता, जितेंद्रियता, वगैरे वृद्धिंगत होतात आणि अज्ञान वगैरे दोष दूर होतात त्याला **'शिक्षा'** म्हणतात.

२३. **'पुराण'** ब्रह्मादींनी रचलेले जे ऐतरेयादी ब्राह्मण ग्रंथ आहेत त्यांनाच मी पुराण, इतिहास, कल्प, गाथा व नाराशंसी नावाने मानतो. भागवत वगैरेंना नाही.

२४. **'तीर्थ'** ज्यांच्या योगे दु:खांतून पार पडता येते अशी सत्यभाषण, विद्या, सत्संग, यमादी योगाभ्यास, पुरुषार्थ, विद्यादान इत्यादी जी शुभ कर्मे आहेत त्यांनाच मी तीर्थ समजतो. इतर जलस्थलादींना नाही.

२५. **'प्रारब्धाहून पुरुषार्थ श्रेष्ठ'** यासाठी आहे की, पुरुषार्थामुळे संचित, प्रारब्ध बनत असते. पुरुषार्थ सुधारला की सर्व सुधारते व पुरुषार्थ बिघडला की सारे बिघडते म्हणून प्रारब्धाहून पुरुषार्थ श्रेष्ठ आहे.

२६. **'माणसाने'** सर्वांशी यथायोग्य स्वात्मवत् वागावे. इतरांचे सुख, दु:ख, हानी, लाभ ह्यात वागणे श्रेष्ठ याउलट वर्तन हे वाईट समजतो.

२७. **'संस्कार'** ज्यायोगे शरीर, मन व आत्मा उत्तम बनतात त्याला **'संस्कार'** असे म्हणतात. ते गर्भाधानापासून अंत्येष्टी पर्यंत सोळा प्रकारचे संस्कार आहेत. यास कर्तव्य समजतो. मात्र दहनानंतर मृतकासाठी काहीही न केले पाहिजे.

२८. **'यज्ञ'** ज्यात विद्वानांचा सत्कार, यथायोग्य शिल्प अर्थात रसायनादि जो की पदार्थविद्येचा वापर करणे, विद्यादी शुभ गुणांचे दान, अग्निहोत्रादिद्वारा वायू, वृष्टि, जल, ओषधीची पवित्रता करून सर्व जीवांना सुखी बनविणे म्हणजे **'यज्ञ'** होय. ती गोष्ट उत्तम आहे, समजतो.

२९. श्रेष्ठ माणसांना **'आर्य'** व दुष्टांना **'दस्यु'** म्हणतात. मीही तसेच मानतो.

३०. **'आर्यावर्त्त'** देश हे या भूमीचे नाव यासाठी आहे की सृष्टीच्या प्रारंभापासून आर्य लोक राहत आले आहेत. मात्र याच्या चतु:सीमा उत्तरेस हिमालय, दक्षिणेस विंध्याचल, पश्चिमेस अटक व पूर्वेस ब्रह्मपुत्रा नदी अशा आहेत. या चतु:सीमेत असणाऱ्या देशाला आर्यावर्त्त असे म्हणतात आणि जे लोक या प्रदेशात निरंतर राहत आले त्यांनाही **'आर्य'** असे म्हणतात.

३१. (**'आचार्य'**) सांगोपांग वेदविद्यांचा जो अध्यापक सत्याचाराचे ग्रहण व मिथ्याचाराचा त्याग करवितो त्याला **'आचार्य'** असे म्हणतात.

३२. (**'शिष्य'**) जो सत्य शिक्षण व विद्या यांचे ग्रहण करण्यास योग्य, धर्मात्मा, विद्याभ्यासाची इच्छा बाळगणारा व आचार्याच्या मनाप्रमाणे वागणारा असतो त्याला **'शिष्य'** असे म्हणतात.

३३. **'गुरू'** माता, पिता आणि जो सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करवितो तो सुद्धा **'गुरू'** म्हटला जातो.

३४. **'पुरोहित'** जो यजमानाचा हितकर्ता व सत्याचा उपदेश करणारा असतो.

३५. **'उपाध्याय'** जो वेदांचा एक भाग किंवा अंगे शिकवितो तो.

३६. **'शिष्टाचार'** धर्माचरणपूर्वक ब्रह्मचर्याने विद्याध्ययन करणे, प्रत्यक्षादी प्रमाणांद्वारा सत्यासत्याचा निर्णय करून सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करणे हाच शिष्टाचार आणि जो याचे पालन करतो तो **'शिष्ट'** म्हटला जातो.

३७. प्रत्यक्षादी आठ **'प्रमाणांना'** सुद्धा मानतो.

३८. (**'आप्त'**) जो यथार्थवक्ता, धर्मात्मा व सर्वांच्या सुखासाठी प्रयत्न करतो त्यालाच **'आप्त'** असे म्हणतो.

३९. **'परीक्षा'** पाच प्रकारची असते. पहिली परीक्षा ज्यात ईश्वर, त्याचे गुण-कर्म-स्वभाव व वेदविद्या, दुसरी प्रत्यक्षादी आठ प्रमाण, तिसरी सृष्टिक्रम, चौथी आप्तांचे व्यवहार आणि पाचवी आत्म्याची पवित्रता, विद्या. या पाच परीक्षांच्याद्वारे सत्यासत्याचा निर्णय करून सत्याचा स्वीकार व असत्याचा त्याग केला पाहिजे.

४०. **'परोपकार'** ज्यायोगे सर्व मानवाचे दुराचार व दु:खे दूर आणि श्रेष्ठाचार व सुखे वृद्धिंगत होते त्याच्या करण्याला **'परोपकार'** म्हणतो.

४१. **'स्वतंत्र' 'परतंत्र'** जीव हा आपल्या कर्मात स्वतंत्र आणि कर्माची फळे भोगण्यात ईश्वरी व्यवस्थेमुळे परतंत्र. त्याचप्रमाणे ईश्वर हा आपली सत्याचार आदि सर्व कामे करण्याच्या बाबतीत स्वतंत्र आहे.

४२. **'स्वर्ग'** विशेष सुखांचा भोग आणि त्याची सामग्रीची प्राप्तीचे नाव **'स्वर्ग'** आहे.

४३. **'नरक'** विशेष दु:ख, भोग आणि त्याची सामग्रीची प्राप्ती होणे आहे हा **'नरक'**.

४४. **'जन्म'** शरीर धारण करून प्रकट होणे म्हणजे **'जन्म'** होय. त्याचे पूर्व, पर व मध्य तीन प्रकारचा भेद मानतो.

४५. शरीराच्या संयोगाचे नाव **'जन्म'** आणि त्याच्या वियोगाला **'मृत्यू'** म्हणतात.

४६. **'विवाह'** नियमाप्रमाणे प्रसिद्धिने आपल्या इच्छेने पाणिग्रहण करणे याला **'विवाह'** म्हटला जातो.

४७. **'नियोग'** विवाहानंतर पतीच्या निधनादी वियोगात अथवा नपुंसकत्वासारख्या कायमच्या रोगामुळे आपत्काली आपल्या वर्णाच्या किंवा आपल्याहून उत्तम वर्णाच्या स्त्री किंवा पुरुषाबरोबर संतानोत्पत्ती करणे.

४८. **'स्तुती'** गुणगान, श्रवण आणि ज्ञान होणे म्हणजे **'स्तुती'** याचे फळ प्रेमादि होते.

४९. **'प्रार्थना'** आपल्या सामर्थ्यानंतर ईश्वराकडून जी विज्ञानादी वगैरे प्राप्त होतात, त्यांच्यासाठी ईश्वराकडे याचना करणे याचे फळ निरभिमान वगैरे होते.

५०. **'उपासना'** जसे ईश्वराचे गुण, कर्म, स्वभाव पवित्र आहेत तसे आपले बनविणे, ईश्वराला सर्वव्यापक व स्वत:ला व्याप्य समजून आपण ईश्वराजवळ व ईश्वर आपल्याजवळ असा निश्चय योगाभ्यासाद्वारे साक्षात करणे, याला **'उपासना'** म्हटली जाते. ज्ञानोन्नती वगैरे ही उपासनेची फळे आहेत.

५१. **'सगुणनिर्गुणस्तुतिप्रार्थनोपासना'** जे-जे गुण परमेश्वरात आहेत, त्या गुणांनी तो युक्त आहे आणि जे-जे गुण त्याच्यात नाहीत त्यांच्यापासून तो दूर आहे समजून प्रशंसा करणे, याला सगुणनिर्गुणस्तुती. शुभ गुणांच्या प्राप्तीची इच्छा ईश्वराकडून बाळगणे आणि दोषांपासून दूर होण्याच्या कामी परमात्म्याचे साह्य मागणे, ही सगुणनिर्गुण प्रार्थना होय. परमेश्वर हा सर्व गुणांनी युक्त व सर्व दोषरहित, हे ओळखून आपल्या आत्म्याला परमेश्वर व त्याची आज्ञा यांना समर्पित करणे ही **'सगुणनिर्गुणोपासना'** म्हटली जाते.

हे स्वसिद्धांत मी संक्षेपाने नमूद केले आहेत. त्यांचे सविस्तर विवेचन या **'सत्यार्थप्रकाश'** ग्रंथाच्या वेगवेगळ्या प्रकरणांत आलेले आहे. तसेच **'ऋग्वेदादिभाष्यभूमिका'** वगैरे ग्रंथांमध्येही लिहिली आहे. अर्थात जी-जी गोष्ट सर्वांच्या दृष्टीने माननीय आहे तीची मान्यता. जसे खरे बोलणे हे सर्वांच्या दृष्टीने चांगले आणि खोटे बोलणे वाईट अशा सिद्धांतांना मी स्वीकार करतो आणि मतमतान्तरांची जी एकमेकांविरुद्ध भांडणे आहेत ती पसंत करीत नाही. कारण या मत-पंथियांनी आपापल्या मताचा प्रचार करून मनुष्यांना त्यात गुंतवून एकमेकांचे शत्रू बनविले आहे. म्हणून त्या गोष्टिंचे खंडन व संपूर्ण सत्याचा प्रचार करून सर्वांमध्ये एकमत स्थापन करून,

द्वेष त्याग करून, परस्परांत दृढ प्रेमयुक्त करून आणि सर्वांना सर्वांकडून सुखाची प्राप्ती व्हावी यासाठी प्रयत्न व अभिप्राय आहे. सर्वशक्तिमान परमात्म्याची कृपा, साह्य आणि आप्तजनांची सहानुभूतीने **हा सिद्धांत संपूर्ण विश्वामध्ये लवकरच पसरो,** ज्यामुळे सर्व लोक सहजपणे धर्म, अर्थ, काम व मोक्षाची सिद्धि करून सदैव उन्नत व आनंदित होत राहावे. हाच माझा मुख्य उद्देश आहे.

**अलमतिविस्तरेण बुद्धिमद्वर्य्येषु**

**ओ३म्। शन्नो मित्रः शं वरुणः शन्नो भवत्वर्य्यमा।**

**शन्न इन्द्रो बृहस्पतिः शन्नो विष्णुरुरुक्रमः।**

**नमो ब्रह्मणे। नमस्ते वायो। त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि।**

**त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मवदिषम् ऋतमवदिषम् सत्यमवदिषम्।**

**तन्मामावीत् तद्वक्तारमावीत् आवीन्माम् आवीद्वक्तारम्।**

**ओ३म् शान्तिः शान्तिः शान्तिः॥** तै. आ. ७। १२

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य्याणां परमविदुषां श्रीविरजानन्दसरस्वतीस्वामिनां शिष्येण श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिना विरचितः स्वमन्तव्यामन्तव्यसिद्धान्तसमन्वितः सुप्रमाणयुक्तः सुभाषाविभूषितः सत्यार्थप्रकाशोऽयं ग्रन्थः सम्पूर्त्तिमगमत्॥**

> **मुनिवर गुरुदत्त विद्यार्थी** एम. ए. म्हणतात की, मी अनेक वेळा **'सत्यार्थ प्रकाश'** या अपूर्व ग्रंथाचे अध्ययन केले प्रत्येक वेळी मला नव-नवीन पैलूंचा साक्षात्कार झाला.
>
> म्हणून वाचकांनी सुरुवातीचा समुल्लास कठीण वाटल्यास आपल्या आवडीप्रमाणे कुठून ही वाचन केले तरी वाचकांना निश्चितच लाभ होईल.

हिंदू जातीच्या थंडशा रोमारोमात उष्ण रक्ताचा संचार करणारा हा ग्रंथ अमर होवो, अशी कामना आहे. 'सत्यार्थप्रकाश' च्या विद्यमानतेत कोणी विधर्मी आपल्या पंथाची शेखी मारु शकत नाही.

**-स्वातंत्र्यवीर वि. दा.सावरकर**

मी स्वत:हृदयाने आर्यसमाजी आहे.... आर्यसमाज हे धर्मोपदेशक बनलेल्या जातीचे जुलमी जू झुगारून देण्यासाठी उत्पन्न झाले आहेत. आपले संघ बनवून भांडवलदारांचा जुलूम नाहीसा करणे जितके महत्त्वाचे आहे, त्यापेक्षाही हे बनावटी धार्मिक जू काढून टाकणे जास्त महत्त्वाचे आहे. त्याकरिता मी आर्यसमाजास चाहतो.

**-राजर्षि शाहू महाराज**

स्वामी दयानंद सरस्वती भारताची नव-निर्मिती, धार्मिक पुनरुत्थान व नैतिक जागरणाची मशाल पेटविणाऱ्या त्या अनेक महापुरुषांपैकी निश्चितपणे एक होते. त्यांनी स्थापिलेल्या आर्यसमाजाने निर्विवादपणे हिंदू समाजाची पुनर्बांधणी, सुधार व नवचैतन्याच्या निर्मितीत एक महत्त्वपूर्ण भूमिका वठविली आहे.

**-नेताजी सुभाषचंद्र बोस**

असहायतेच्या खोल चिखलात रूतून बसलेल्या भारताच्या उद्धारासाठी स्वामी दयानंदांनी केलेले कार्य अतिशय मोलाचे आहे. खरे पाहता, त्यांनीच भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीचा पाया घातला. त्यांनी अस्पृश्यता व जबरदस्तीने धर्मांतरित केलेल्या व्यक्तिसाठी हिंदू धर्मात पूनर्प्रवेशासाठी दारे उघडी केली.

**-सरदार वल्लभभाई पटेल**

जेव्हा आर्य समाज धावतो तेव्हा हिंदू समाज चालतो, जेव्हा आर्य समाज चालतो तेव्हा हिंदू समाज बसतो, जेव्हा आर्य समाज बसतो तेव्हा हिंदू समाज झोपतो आणि जर आर्य समाज झोपला तर हिंदू समाज मरून जाईल.

**-महामना पं.मदनमोहन मालवीय**